# संपादकीय निवेदन

तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।
करूनि घेयावें हें तुमतें । विनवितु असें ॥ –ज्ञानेश्वर १.८०.

या सातव्या विभागानें संकल्पित महाराष्ट्र शब्दकोशाची परिसमाप्ति होत आहे, त्याचा आम्हांस आनंद होत आहे. दहा वर्षांपूर्वी महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचें काम संपवून आम्हीं या शब्दकोश रचनेला जें वाहून घेतलें तें जनतेच्या सहानुभूतीच्या बळावरच. ती थोर सहानुभूति आणि अढळ विश्वास आम्हांस फार उपयोगी पडला व हें अवघड कार्य एकदाचें फार पडलें. प्रतिकूल परिस्थितीच्या भोंवऱ्यांत सांपडून लवकर डोकें वर काढतां न येतें तर मात्र आमच्याविषयीं 'आरंभशूराः' असा साहजिक प्रवाद पडता व डॉ. केतकर यांनीं दिलेली शिकवण कच्ची ठरती. पण सुदैवानें आतां डॉ. केतकर यांच्या कर्तेत्वाविषयीं असणाऱ्या लौकिकांत आम्हांस कांहीं भर टाकतां आली व त्यांचें ऋणहि थोडेंबहुत फेडतां आलें, याचा आम्हांस अभिमान वाटतो.

शब्दकोशरचनेचा सविस्तर इतिहास पुढें प्रस्तावनेंत दिलाच आहे. त्यावरून आमच्या कार्याची आणि प्रगतीची दिशा कळून येईल. झालें यापेक्षां अधिक चांगलें कार्य व्हावयास पाहिजे होतें असें आम्हांसहि पदोपदीं वाटतें. महाराष्ट्राच्या विद्यमान परिस्थितींत सर्वांगपरिपूर्ण शब्दकोश करणें कसें अशक्य आहे, हें पाहिल्या विभागाच्या प्रस्तावनेंत दिग्दर्शित केलेंच आहे. झालें हेंच विशेष, असें मानण्यासारखी आजची स्थिति आहे हें कोणीहि सुज्ञ व्यावहारिक विद्वानास पटेल. असो.

ज्यांचें ज्यांचें या कामांत लहानमोठें साहाय्य झालें त्यांचा त्यांचा गौरवपर नामनिर्देश प्रस्तावनेंत केला आहे. चुकून कोणाच्या नांवाचा अगर मदतीचा उल्लेख राहिला असेल तर त्यांनीं उदार मनानें आम्हांस क्षमा करावी. दीर्घकाल चाललेल्या एवढ्या मोठ्या कामाशीं संबंध आलेल्या सर्वच व्यक्तींचा किंवा गोष्टींचा आठव रहातो असें नाहीं, तेव्हां ज्यांचे आभार प्रस्तावनेंत मानावयाचे राहिले असतील त्यांचे या ठिकाणीं मोठ्या कृतज्ञतेनें मानीत आहोंत.

कोशांत अनेक कारणांमुळें ज्या चुका राहून गेल्या आहेत त्यांच्या दुरुस्त्या व पुरवणी शब्दसंग्रह देण्याचा विचार तूर्त रहित करावा लागत आहे, याचें फार वाईट वाटतें. अगोदर कोशाचे दोन भाग वाढले म्हणून कांहीं ग्राहक आमच्यावर नाखूष आहेत. त्याप्रमाणेंच आतांच घाईनें पुरवणी काढण्यापेक्षां काहीं काल थांबून गळलेले शब्द वगैरे जमविण्यास कांहीं अवधि आऊं देऊन पुरवणी काढल्यास ती अधिक उपयुक्त होईल असें वाटतें व तशी ती आज जरी नाहीं तरी पुढें लवकरच काढूं. तोंपावेतों कोशात आढळणाऱ्या उणीवा व चुका आम्हांस दाखवून ठेवाव्यात अशी सर्वांना आग्रहाची विनंति करतों.

ज्ञानकोशाप्रमाणेंच याहि कोशाचें संपादन-प्रकाशन सार्वजनिक मदतीवर झालेलें आहे. हीच अखंड मदत आम्हांस सर्वांत महत्त्वाची वाटते. आपल्या महाराष्ट्र जनतेला अशा व्यापक राष्ट्रसंवर्धक कार्याची महती पटलेली आहे याची आमच्या सारख्याना नेहमीं प्रचीति येते. यापुढें आम्ही घेऊं त्या कामांत आम्हांस अखिल महाराष्ट्राचा पाठिंबा राहील असा विश्वास वाटतो.

शेवटीं, ज्यांना हा महाराष्ट्र शब्दकोश अर्पण केला आहे, त्या महाराष्ट्रभाषाभिमानी महाराज श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांना कोश पुरा झालेला पाहून फार समाधान होईल याबद्दल आम्हांस धन्यता वाटते. परमेश्वरानें महाराज साहेबांस दीर्घायुरारोग्य देऊन त्यांच्याकडून अधिकाधिक वाङ्मयाभिवृद्धि करवावी अशी त्यास प्रार्थना आहे.

आतां अखेरीस ज्या जगनियंत्या परमेश्वरी शक्तीनें आमच्या हातून हें लेणें आपल्या महाराष्ट्र भाषेच्या अंगावर चढविलें व या दहा वर्षांच्या अवधींत संपादकवर्गास कार्यक्षम व एकत्र ठेवलें व सहकार्याचें उदाहरण घालून दिलें त्या सर्वश्रेष्ठ शक्तीस वंदन करून मराठी भाषेच्या जाज्वल्य अभिमानी व तिच्या गौरवास कारण झालेल्या परमपूज्य अशा महाराष्ट्रीय संत व कविवर्य ज्ञानेश्वरांच्या शब्दांत हें निवेदन पूर्ण करतों.

जें मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड । तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ –ज्ञा १८.१५७४,

यशवंत रामकृष्ण दाते.

# प्रस्तावना

हनुमानेष विजानाति धर्मं सागरलंघने ।
तथैव ग्रंथकर्तैव ग्रन्थकर्तुः परिश्रमम् ॥ —रामचंद्र-मनुस्मृति टीका.

**विषय प्रवेशः**—मराठीमध्यें शब्दकोशरचनेचे जे प्रयत्न आजपर्यंत झाले त्यांची सविस्तर माहिती शब्दकोशाच्या पहिल्या विभागाच्या प्रस्तावनेंत दिलीच आहे.

त्यानंतर या शब्दकोशाच्या रचनेचा प्रथम कल्पनेपासून पूर्ण होईपर्यंतचा इतिहास येथें देण्याचें योजिलें आहे. हेतु हा कीं या कोशरचनेच्या कार्याची प्रथम कल्पना कशी आली, तिला मूर्त स्वरूप येण्याच्या मार्गांत कोणकोणती परिस्थिति उत्पन्न झाली व प्रत्यक्ष कार्यारंभापासून अखेरीपर्यंत कोणकोणत्या घटना व क्रिया घडत गेल्या याचें थोडक्यांत टांचण करून ठेवल्यास अशा कार्यामध्यें पडणाऱ्या आगामी कार्यकर्त्यांस त्याच्या वाचनापासून कार्य पद्धतीचा बोध व्हावा, त्यांतील अडचणींची कल्पना यावी, न्यूनत्वाचा बोध व्हावा, वैगुण्याची जाणीव व्हावी व पुढील प्रयत्नामध्यें मागील अनुभवाचा फायदा मिळावा व शक्य तीं वैगुण्यें त्यांचीं कारणें लक्ष्यांत घेऊन दूर करण्यात यावीं. असो.

**प्रथम कल्पना.**—शब्दकोशाची कल्पना माझ्या मनात प्रथम इंदूरच्या संमेलनाची हकीगत वाचतांनाच आली. १९१७ मध्यें इंदूर येथें जें साहित्यसंमेलन भरलें त्यावेळीं तेथें मराठीमध्यें एक सर्वांगीण शब्दकोश असावा ही कल्पना प्रामुख्यानें मांडली गेली असें वृत्तपत्रांतून मीं वाचलें. १९१६ सालीं एल्एल्. बी च्या परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यावर कोर्टांतील सनद काढावी वगैरे विचार करीत असता महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचें कार्य नुकतेंच सुरू झालेलें होतें त्यात प्रथम फुरसुदीच्या दिवसात कांहींतरी कार्य करावें म्हणून काम करण्यास मी नुकताच आरंभ केला होता. त्यावेळीं प्रत्यक्ष वाङ्मयक्षेत्रांत असें मीं प्रथमच पाऊल टाकलें होतें तेव्हां प्रत्यक्ष संमेलनास हजर राहण्याइतकी उत्सुकतेची तीव्रता उत्पन्न झाली नव्हती. त्याचवेळीं महाराष्ट्रीय वाङ्मयसूचीचें कार्य निकडीनें व शक्य तितक्या थोडक्या वेळात करावयाचें ठरलें होतें व त्या सूचीचें संपादनाचें काम मजकडेच देण्यात आल्यामुळें तशी सवड अशी मुळींच नव्हती, परंतु ज्ञानकोशाप्रमाणेंच शब्दकोशाचेंहि कार्य हें एक अत्यंत महत्त्वाचें असून मराठी भाषेंत तें होणें अवश्य आहे अशी मनामध्यें एक प्रकारची निश्चित वृत्ति उत्पन्न झाली होती किंबहुना अर्धो ज्ञानकोश की अर्धा शब्दकोश अशा प्रकारची चर्चाहि त्यावेळीं आमच्या संपादक मित्रमंडळींत चालत असे. इंदूर येथें अशा तऱ्हेचा शब्दकोश तयार करावयाची निश्चित कल्पना झाल्याचें ऐकण्यांत आलें.

त्यासंबंधानें इंदूर येथें भरलेल्या नवव्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाच्या इतिवृत्तांत पृष्ठ दोनवर पुढें दिल्याप्रमाणें मजकूर आढळतो.

"साहित्यसंमेलन आतापर्यंत आठ वेळां ठिकठिकाणीं भरलें पण प्रत्यक्ष व चिरस्थायी असें महत्त्वाचें कार्य त्याच्या हातून म्हणण्यासारखें कांहींच झालें नाहीं असा आक्षेप वारंवार घेण्यात येत असतो. या अपवादाला जागा ठेवूं नये व कांहींतरी प्रत्यक्ष कार्याची योजना यंदाचे संमेलनात सर्वांच्या विचारानें तयार होऊन शक्य तितक्या त्वरेनें अंमलात यावी म्हणून या गोष्टी-संबंधानें चर्चा करण्याकरितां रा. वासुदेव गोविंद आपटे यांनीं ठिकठिकाणच्या प्रमुख साहित्यसेवकांस पत्रें लिहून संमेलनाचे आदले दिवशीं म्हणजे ता. ८ मार्च रोजीं हजर राहण्याविषयीं त्यांस विनंती केली होती. त्याप्रमाणें सुमारें पाऊणशें गृहस्थांची खासगी सभा रा व सरदार किबे यांचे बंगल्यात ता ८ मार्च रोजीं तिसरे प्रहरीं भरली होती रा. आपटे यांनीं प्रत्यक्ष कार्य करण्यासंबंधाची आपली योजना मंडळीपुढें मांडली व तिच्या छापील प्रती मंडळींत वाटल्या ही योजना परिशिष्टांत दिली आहे. ( प्रस्तुत अहवालास परिशिष्ट नाहीं ! ) या योजनेंत अग्रस्थान मराठी भाषेचा कोश तयार करण्याच्या कामास दिलें होतें हा विषय अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें इतर सर्व गोष्टी बाजूला ठेवून कोशाची रचना या एकाच विषयावर जवळ जवळ तीन तास चर्चा करण्यात आली. आणि शेवटीं—१ रा. हरि नारायण आपटे, पुणें ( अध्यक्ष ) २ रा. गणेश सदाशिव भाटे, मुंबई ३ रा. जनार्दन विनायक ओक, पुणें ४ रा लक्ष्मण गणेशशास्त्री लेले,

पुणें. ५ रा. विनायक कृष्ण मुळये, इंदूर. ६ प्रो. परशुराम नारायण पाटणकर, देवास–या गृहस्थांची कमिटी कोशाच्या योजनेला व्यवस्थित स्वरूप देण्यासाठीं नेमण्यांत आल्यावर रात्रीं ८ वाजतां सभा बरखास्त झाली. "

या कमिटीनें पुढें काय कार्य केलें याबद्दल कोठें वाचनांत आलें नाहीं.

पुढें १९२१ मध्यें बडोदें येथें जें दहावें महाराष्ट्र साहित्य-संमेलन भरलें त्यास ज्ञानकोशमंडळाचा प्रतिनिधि म्हणूनच मला पाठविण्यांत आलें होतें. त्यावेळीं रा. वासुदेव गोविंद आपटे हे प्रवासांत आमचे बरोबरच होते तेव्हां प्रवासामध्यें व नंतर प्रतिनिधि–वसतिगृहांत शब्दकोशाबद्दल मागील संमेलनांत काय झालें व तें कार्य कसें करतां येईल यासंबंधीं वारंवार चर्चा चाले व त्यावेळीं इंदूर संमेलनांत या कार्याकरितां दहा हजार रुपये मिळा-ल्याबद्दल मधून मधून उल्लेख येत तेव्हां दहा हजार रुपये मिळ-तील तर आम्ही तेव्हांच शब्दकोश तयार करून दाखवूं असें मी सहज म्हणालों; परंतु तें कार्य तावडतोब हातीं घेण्याची खरोखर त्यावेळीं माझी किंवा आमच्या मंडळीचीहि तयारी नव्हती; कारण ज्ञानकोशाचे फक्त दोन भागच प्रसिद्ध झाले होते व तेहि प्रस्तावनाखंडाचे, खऱ्या ज्ञानकोशाचा अद्यापि आरंभ व्हावयाचाच होता व त्याची प्रचंड जबाबदारी डोक्यावर असतां दुसरें कार्य अंगावर घेण्याची गोष्टसुद्धां काढणें शक्य नव्हतें. तथापि शब्दकोश व्हावा ही जनतेची इच्छा कायम होती व तसा एक ठराव बडोदें येथील साहित्यसंमेलनांत मान्यहि झाला होता तो ठराव असाः—

म रा ठी श ब्द को शा सं बं धीः—" मराठी भाषेचा विस्तार महत्त्व व तिजमधील शब्दभांडार लक्षांत घेतां, विशेषतः तिच्या वाढत्या अध्ययनाचीं व प्रगतीचीं स्पष्ट चिन्हें दिसू लागलेलीं आहेत. अशावेळीं मूलरूपें, शब्दसिद्धि, समानार्थक शब्द, योज-नादर्शक अवतरणें वगैरे सर्व अंग–उपांगांनीं पूर्ण असा व्यापक व विस्तृत मराठी शब्दांचा कोश अत्यंत अवश्य असून मराठी साहित्य परिषद, इतर साहित्यसभा व महाराष्ट्रांतले लोक यांच्या सहकारितेनें किंवा व्यक्तिस्फूर्तीनें ही उणीव लवकरच भरून निघेल अशी या सभेस आशा वाटत आहे. "

प्रस्तुत ठराव इतका महत्त्वाचा व निकडीचा होता कीं या कोशाच्या आवश्यकतेसंबंधीं विवेचन करण्याची मुळींच जरूर न भासल्यामुळें व यासंबंधीं सर्वांचें ऐकमत्य असल्यामुळें हा ठराव अध्यक्षांकडूनच मांडण्यांत आला."

त्यानंतरहि ही कल्पना माझ्या मनांत घोळत राहिलीच होती तिला पुन्हां चालना पुणें येथील साहित्य संमेलनांत मिळाली. त्यापूर्वी केसरीमध्यें महाराष्ट्रीय ज्ञानकोश पुरा झाल्यावर ज्ञान कोशाच्या संपादकवर्गानें जें पुढील कार्य अंगावर घ्यावयाचें त्याबद्दल सूचना म्हणून २१ नोव्हेंबर १९२६ च्या 'केसरी' पत्रांत एक पत्र प्रसिद्ध झालें होतें तें पुढें दिलें आहे.

## ज्ञानकोशमंडळास व महाराष्ट्रास विनंति

" ज्ञानकोश मंडळानें अंगीकारलेल्या ज्ञानकोशाचें काम आतां थोड्याच दिवसांत पुरें होणार आहे. मंडळानें हें जें काम शिरावर घेतलें होतें तें किती जिकीरीचें, खर्चाचें व अवघडीचें होतें त्याची तसल्याच कामांत जे कोणी पडले असतील त्यांनाच कल्पना येईल. असल्या कामाची सांगता करण्यास नाना प्रकारचे किती कष्ट पडतात व निरनिराळ्या आपत्तींना कसें तोंड द्यावें लागतें आणि वेड्या–वाकड्या व खाचखळ-ग्यांच्या वाटेवरीतून मोठ्या कुशलतेनें गाडी नेऊन ठरलेले ठिकाण कसें गांठावें लागतें हें सांगणें सोपें असलें तरी करणें बहुत कठीण आहे. परंतु असलें बिकट काम पूर्ण करून डॉ. श्री. व्यं. केतकर हे आणखी एक महिन्यानें आरंभलेल्या या वाङ्मय–यज्ञांतून मोकळे होऊन अवभृत स्नान करणार आहेत.

महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळ जरी अनृणी झालें तरी त्यानें एकदां जें ज्ञानमय यज्ञचक्र प्रवर्तित केलें तें कायमचें बंद करावें काय? असा एक प्रश्न मराठी भाषेच्या अभिमान्यांपुढें येत आहे. आमच्या मतें हें चक्र आणखी असेंच पुढें चालावें. तशी सोय या मंडळाच्या स्थापनेच्या नियमावलींत आहे. मंडळानें पहिल्या प्रथम ज्ञानकोश काढावा व मग इतर मराठी ग्रंथ काढावेत आणि तेणेंकरून मराठी वाङ्मयांत भर घालावी अशी ही सोय आहे. तिचा फायदा घेऊन या मंडळानें ज्ञान-कोश संपल्यावर असल्या जातीचें दुसरें एखादें काम अंगावर घ्यावें असें आम्हांस वाटतें असें केल्यानें आज अनेकवर्षें मंडळांत काम करून बहुश्रुत व जाणता बनलेला संपादकवर्ग फुटून पांगला न जातां ज्ञानकोश–कार्यालयांतच कायम राहू शकेल. वाङ्मयाच्या कामीं असल्या वर्गाची किती आवश्य-कता आहे हें स्पष्ट करण्याची जरूरी नाहीं. असलीं कामें अनेक प्रकारचीं सांगतां येण्यासारखीं आहेत; पण सुतें आम्ही पुढील एक कार्य सुचवितों, तें म्हणजे मराठी भाषेचा " बृहत्कोश " काढणें. सध्यां असा मराठी कोश अस्तित्वांत नाहीं. श्री. वा. गो. आपटे यांचा " मराठी शब्दरत्नाकर " नांवाचा एक कोश आहे पण तो छोट्या स्वरूपांत आहे. सर्वांगानीं परिपूर्ण असा नाहीं, असें खुद्द कर्त्यानेंहि आपल्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे (पृ. ११). यानें आपल्या कोशास तसल्या भावी सर्वांगसुंदर " कोशाचा कच्चा खर्डा " असें म्हटलें आहे. म्हणून खरोखरच असल्या एका कोशाची सांप्रत आवश्यकता आहे."

या कोशाचें स्वरूप थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मराठी भाषेंतील (जुने आणि नवे) एकूण एक शब्द, त्यांचा मरा-

टींतच सांगितलेला अर्थ यांचा संग्रह त्यांत असावा. असे प्रयत्न यापूर्वी कांहीं झाले आहेत, उदाहरणार्थ—

( १ ) मानभावी मराठी कोश, पंधराव्या शतकांतील दत्त राज महानुभाव—यानें करून ज्यास "टीप" असें नाव ठेविलें आहे तो.
( २ ) शास्त्र्याच्या १८२९ तील कोश
( ३ ) गोडबोले याचा १८६३ तील हंसकोश.
( ४ ) मुळे याचा १८६७ तील कोश
( ५ ) गोडबोले यांचा १८६७ तील नवीन कोश.
( ६ ) याच सालांतील सुबद्द कोश
( ७ ) हस यांचा रत्नकोश
( ८ ) वापट व पंडित याचा शुद्धकोश.
( ९ ) भारत इतिहास मंडळाचा फार्सी—मराठी कोश,इत्यादि

याखेरीज आणखीहि कांहीं कोश झालेले आहेत. पण या सर्व कोशात अपूर्णता असून कांहीं कांहीं कोश तर विशिष्ट विषयापुरतेच तयार झालेले आहेत शिवाय कांहीं कोश सुमारें १७० वर्षापूर्वीचे जुने आहेत अर्थात गेल्या शतकात मराठी भाषेंत ज्या हजारों नवीन शब्दांचा भरणा झाला आहे त्याचा समावेश त्यात साहजिकच झालेला नाहीं. आज देशी व विदेशी अशा अनेक शास्त्राचा व विषयाचा मराठी भाषेशीं संबंध आलेला आहे व येत आहे. यामुळें तदंतर्गत बनलेल्या नवीन मराठी शब्दाचें कायमचें समावेशन कोशात होणें जरूर आहे. असे कांहीं फुटकळ प्रयत्न तुर्त झाले आहेत व होत आहेत. पण तेहि विशिष्ट विषयापुरते मर्यादितच आहेत खेरीज या २५।३० वर्षात मराठीचा अभ्यास विद्वान् लोक ज्यास्त आस्थेनें करू लागले असुन मुंबई, नागपूर या युनिव्हर्सिटयानीं मराठी भाषेकडे विशेष लक्ष देण्यास सुरुवात केली आहे पुढें-मागें महाराष्ट्र युनिव्हर्सिटी निघणार असें वाटत आहे. महाराष्ट्राशिवाय परप्रांतीय कांहीं युनिव्हर्सिटयानीं आपल्या उच्च अभ्यासक्रमात मराठीचा समावेश केला आहे अशावेळीं मराठी भाषा शब्दरूपानें एकेजागीं विराजलेली दिसणें अत्यवश्य आहे आजची मराठी भाषा शास्त्र्याच्या कोशाच्या वेळच्या मराठी भाषेपेक्षा पुष्कळ पुढें गेली आहे फार्सी किंवा आरबी शब्दाचा त्याकाळीं जितका भरणा मराठींत झाला होता तितका किंबहुना त्याच्यापेक्षा जास्त इंग्रजी व इतर कांहीं युरोपीय भाषा यांच्यातील शब्दांची भरती आजच्या मराठींत झाली आहे असल्या परकीय शब्दाचें मराठींतून उच्चाटण करण्याचें कांहीं प्रयत्न हल्लीं चालू आहेत ते सफल होवोत किंवा निष्फल होवोत त्याचा विचार करणें कोशकाराचें काम नाहीं भाषेंत जे शब्द रूढ आहेत व ज्या शब्दांनीं वस्तुजात अथवा पदार्थमात्र जाणविला जातो तो प्रत्येक शब्द असल्या कोशात समाविष्ट होऊन त्याचें उपबृंहण झालें पाहिजे, मग तो स्वदेशी असो किंवा परदेशी असो. भाषेची वाढ व्हावयाची असल्यास व ती अनेक लोकांना ( किंवा देशांना ) समजावी अशी इच्छा असल्यास स्वभाषेंत आवश्यक अशा परकी शब्दांचें समावेशन होणें अपरिहार्य आहे. म्हणून अशा परकी व देशी सर्व शब्दाची कुळकथा व विस्तार असल्या कोशात पाहिजे. मूळ शब्द, त्याचा धात्वर्थ, प्रसंग विशेषानें बनलेले त्याचे ( आढळतील तेवढे ) अर्थ, त्याचें व्याकरणातील स्वरूप, त्याची जात, विशेष अर्थ जेथें होतात तेथले संदर्भ, त्यावरील संक्षिप्त टीपा ( आणि पाटल्याम जे परके लोक मराठी भाषा शिकतात त्यांच्यासाठीं अगदीं मोजके इंग्रजी प्रतिशब्द ) इत्यादि प्रकारची कोशाची रचना असावी. शब्दाबरोबर मराठी भाषेंत रूढ झालेल्या म्हणी व वाक्प्रचारहि कोशात घ्यावेत याखेरीज जितक्या अंगानीं शब्दांचे स्वरूप जास्त स्पष्ट करतां येईल तितक्या अंगाचा त्यात समावेश व्हावा. सारांश, वर सांगितल्याप्रमाणें आज मराठी भाषेंत जे एकूण एक शब्द आहेत त्याचा अर्थ मराठी भाषेंत देणारा सर्वांग परिपूर्ण असा एक बृहत्कोश होणें जरूर आहे तेव्हा आमची ज्ञानकोश मंडळास अशी अत्याग्रहाची सुचना आहे कीं, त्यानें असला मराठी कोश निर्माण करण्याचें काम यापुढें तात्काळ हातीं घ्यावें एतद्विषयक व्यावहारिक ज्या कांहीं योजना करावयाच्या त्या ज्ञानकोश मंडळास सांग ण्याची विशेष जरूर नाहीं. कारण त्याला याचा अनुभव आहे ज्ञानकोश मंडळाप्रमाणें बृहन्महाराष्ट्रालाहि आमची विनंति आहे कीं, त्यानें हें कोशाचें काम मंडळानें हातीं घेण्याबद्दल सक्रीय सहानुभूती दाखवावी आणि सर्वतोपरी मदत करून हें मंडळानें आरंभलेलें यज्ञचक्र पुढें चालू ठेवण्याचें श्रेय पदरात घ्यावें

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाची उभारणी कंपनी तत्वावर म्हणजे व्यापारी दृष्टीनें करण्यात आली होती. परंतु अशीं कामें स्वार्थत्यागाच्याच बळावर अखेर निश्चिततेनें आणि यशस्वितेनें परतीर गाठतात असें आम्हास वाटतें तरी इकडे लक्ष ठेवून आणि व्यवहार दृष्टीचाहि यथाप्रमाण अंगिकार करून कोशकार मंडळींनीं नूतन उपक्रम करावा अशी आमची सूचना आहे "

**खंडेराव चिंतामण मेहेंदळे . दत्तो वामन पोतदार**
**सदाशिव महादेव दिवेकर दत्तात्रेय विष्णु आपटे**

या पत्रास प्रेरणा कोठून मिळाली होती हें चाणाक्ष महाराष्ट्रीयानीं तेव्हाच ओळखलें होतें

त्यानंतर पुणें येथें भरलेल्या बाराव्या साहित्यसंमेलनांत पुढें दिल्याप्रमाणें एक ठराव स्वीकृत करण्यांत आला.

'मराठी भाषेचा एक सर्वांगीण बृहत्कोश व्हावा असें या सभेचें मत आहे व हें काम ज्ञानकोशांतील संपादक मंडळानें हातीं घ्यावें अशी या सभेची शिफारस आहे आणि महाराष्ट्र साहित्यपरिषदेनें या कार्यास सर्व प्रकारें साहाय्यक व्हावें.' प्रस्तुत ठराव श्री. ना. गो. चापेकर यांनीं मांडला होता व श्री. वा. म. जोशी यांनीं त्यास अनुमोदन दिलें होतें. (–अहवाल पृ. २५).

याच वेळीं महाराष्ट्र साहित्य परिषदेची जी सभा संमेलन प्रसंगीच पुणें येथें झाली होती त्या सभेंत शब्दकोशाची योजना तयार करण्याकरितां एका ठरावानें एक समिति नेमण्यांत आली होती व खर्चाकरितां १०० रुपये मंजूर करण्यांत आले होते. या समितींत श्री. श्री. कृ. कोल्हटकर व कांहीं पुणें व मुंबई येथील गृहस्थांचीं नांवें घालण्यांत आलीं होतीं व रा. य. रा. दाते यांस या समितीचे चिटणीस नेमण्यांत आले होते. या समितीची एक सभा जुलै १९२७ मध्यें मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयांत बोलावण्यांत आली होती परंतु त्या सभेस चिटणीसाशिवाय कोणीच उपस्थित झालें नाहीं.

पुढें अशा कोशाची एक योजना मीं स्वतःच तयार करून ग्वाल्हेरला भरणाऱ्या परिषदेच्या सभेपुढें मांडावयाचें ठरविलें व ती छापून घेऊन त्याच्या प्रती समितीच्या सभासदाकडे पाठविल्या व त्याची अनुमति मागविली. त्या योजनेस रा. श्री कृ कोल्हटकर यांची अनुमति आली होती बाकी कोणाकडून उत्तर आलें नाहीं. सदर योजना पत्रक न. २ म्हणून प्रसिद्ध करण्यांत आली होती ती अशी.

### महाराष्ट्र शब्दकोश–स्वरूपयोजना.

हा शब्दकोश कां व कसा काढावयाचा याची सामान्य रूपरेखा आम्ही पहिल्या पत्रकात दिली आहे (हें पत्रक पुढें दिलें आहे); येथें कोशाच्या स्वरूपासंबंधीं योजना देतों.

का र्य क्षे त्र—आतापर्यंत जे कोश प्रसिद्ध झाले आहेत त्यांत साधारण अभिजात मराठी म्हणून जिला म्हणतां येईल अशा (उ. पुणें–सातारा प्रांतांत बोलल्या जाणाऱ्या) मराठीचाच भरणा केला गेला आहे. क्वचित् एखाद्या कोशात तुरळक तुरळक कोंकणी भाषेंतील शब्द आले आहेत पण ते फार कमी आहेत. कोंकणी सोडल्यास इतर प्रांतिक मराठी भाषांचा शब्दसंग्रह असलेला कोशांत आढळत नाहीं. आम्ही आमच्या या कोशांत ही पहिली सुधारणा करणार आहों, म्हणजे खास पुणेरी भाषा तर यांत येईलच, परंतु तिच्याबरोबर सातारी कडे माणदेशी, वायदेशी (वाई), कोल्हापुरी, मराठी, वागलाणी, खानदेशी, अहिराणी, घाटेघाटी, वऱ्हाडी, गंगथडी (मराठीचा मूळ प्रांत अथवा तिचें माहेर ही गंगथडीच होय), वैतुली, नागपुरी यांचा समावेश होईल. तसेंच कर्नाटकाच्या सीमेवर असलेल्या विजापूर, धारवाड, बेळगांव, दक्षिण महाराष्ट्रांतील कांहीं संस्थानें, निजामाच्या संस्थानांतील कांहीं जिल्हे इकडील कानडी–मराठीचा अंतर्भाव करण्यांत येईल. शहाजीराजे भोंसले यांनीं कर्नाटकांत आपलें ठाणें बेंगरूळपासुन थेट तंजावरपर्यंत बसवून मराठीचा प्रसार तिकडे केला होता. *हें मराठीचें वर्चस्व परवां परवांपर्यंत म्हैसूर व मद्रास येथील* दफ्तरांत चालू होतें. त्यामुळें त्या प्रांतांत सरकारी कामकाजांत जी मराठी शिल्लक राहिली होती ती हुडकून तिलाहि कोशांत समाविष्ट होण्याचा मान देण्यांत येईल. यानंतर वसई ते रत्नागिरीपर्यंतची कोंकणी, गोव्यांतील गोमातकी, तिच्या शेजारची कारवारी या समुद्रकिनाऱ्यावरील भाषा आम्ही घेऊं. मराठ्यांनीं आपलीं संस्थानें जेथें जेथें स्थापिलीं तेथें तेथें मराठी भाषा नेली होती, *ती अद्यापि बऱ्याच संस्थानांतून* जिवंत आहे. अशा संस्थानांपैकीं बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर, धार, देवास हीं संस्थानें मोठीं आहेत. या संस्थानांत मराठी चालू आहे. मात्र कांहीं ठिकाणीं तिनें नेमाडी, हिंदी, रांगडी, गुजराथी, काठेवाडी अशा निरनिराळ्या ओढण्या किंवा बुरखे आपल्या अंगावर घेतले. परंतु त्या बुरख्यांतून तिचें मूळचें महाराष्ट्रीय स्वरूप स्पष्ट दिसून येतें. अर्थात् या भाषांचा अनादर करणें म्हणजे मराठीचाच अनादर केल्यासारखें होणार म्हणून याहि भाषां (किंवा प्रांतिक भाषां)तील शब्द आमच्या कामापुरते आम्ही घेऊं. काशी हें प्राचीन विद्यापीठ आहे व तेथें प्राचीन कालापासुन *महाराष्ट्रीय पंडितांची परंपरा* कायम आहे म्हणून काशी व तिच्या *आसपासच्या* क्षेत्रांतील मराठीचाहि सन्मान आम्ही करूं. एकंदरींत सांप्रतच्या हिंदुस्थानात मराठी भाषा ज्या ज्या प्रांतांत बोलली जात असेल त्या त्या ठिकाणच्या बोलींतील शब्दसंग्रह जमवून तो कोशांत समाविष्ट करण्याचा व त्या ठिकाणीं त्याचें प्रांतिक नांव देण्याचा आम्ही यावच्छक्य प्रयत्न करावयास चुकणार नाहीं.

व्या क र ण व व्यु त्प त्ति—असा शब्दसंग्रह तयार झाल्यावर त्याची व्याकरणविषयक वगैरे देण्यांत येईल; म्हणजे त्या त्या शब्दाचें स्थान व्याकरणांत काय आहे हें सांगण्यांत येईल.

भाषाशास्त्राचा एक डोळा व्याकरण तर दुसरा व्युत्पत्ति हा असल्यामें शब्दांची व्युत्पत्ति लावण्यांत येईल. अर्थभेदानें ही निरुक्ती निरनिराळी होण्याचा संभव असतो; अशा ठिकाणीं ते अर्थभेद व व्युत्पत्ती सांगण्यांत येतील.

अर्थनिश्चिति—यानंतर शब्दांचे वेगवेगळे अर्थ द्यावयाचे अर्थात् ते अर्थ वेगवेगळे कसे बनले त्याची तत्तदर्शक उदाहरणें द्यावीं लागतील, म्हणजे त्यांचे आधार किंवा संदर्भ द्यावे लागतील ते क्वचित् एखाद्या वाक्यखंडात तर क्वचित् सबंध वाक्यातहि आढळणार त्यामुळें तीं वाक्यखंडें किंवा वाक्यें उद्धृत करावीं लागणार याप्रमाणें शब्दाच्या नावापासुन त्याच्या अर्थापर्यंत त्यांच्या वरील होणाऱ्या सत्काराचें वर्णन येथपर्यंत केलें आतां कोशाच्या दुसऱ्या अंगाकडे वळतों

शब्दसंशोधन—आपल्या मराठी भाषेच्या जन्माबद्दल पंडितामध्यें वाद चालु आहे काहींच्या मतें तिचा जन्म शक १००० च्या सुमाराचा आहे (कै डॉ गुणे वगैरे मंडळी) तर कांहींच्या मतें शक ६०० मध्यें ती जन्मास आली (कै वि. का राजवाडे वगैरे मंडळी) या वादात आम्हांस पडावयाचें नाहीं व कोणत्याहि एका पक्षाचा आग्रह आम्हास धरावयाचा नाहीं तर प्रत्यक्ष प्रमाणांनीं मराठीचा उद्गम मागें किती जातो, हें पाहावयाचें आहे, तें पुढीलप्रमाणें —

पुष्कळ काळपर्यंत अशी समजून होती कीं, विवेकसिंधु व ज्ञानेश्वरी हेच काय ते मराठींतील आद्य गद्यग्रंथ होत पण ही समजुत अलीकडील १५–२० वर्षांत पालटली आहे कै वि का. राजवाडे यांनीं महानुभावांच्या वाङ्मयाचा शोध लावून तें उजेडात आणण्याचा पहिला मान पटकावून असें सिद्ध केलें कीं, मुकुंदराजाच्याहि थोडेसें मागें मराठीचें नागर स्वरूप दृष्टीस पडतें या महानुभावी वाङ्मयानें मराठी भाषेचा नानाविध विलास दृष्टिगोचर होऊ लागला आहे गद्य, पद्य, कोश, व्याकरण, प्रवासवर्णन वगैरे मराठीचीं अनेक अंगें आपल्यास दिसु लागलीं आहेत महानुभावाच्या या प्राचीन ग्रंथात देवगिरीजवळची–यादव राजवटींतील–खरीखुरी मराठी आढळते तिला म्लेंच्छस्पर्श बिल्कूल झालेला नाहीं, असें हें "देशीकार लेणें" आहे या पंथातील महींद्रव्यास, महदंबा, भास्करव्यास, भावेदेवव्यास वगैरे आद्य कवी आणि कवयित्री असुन त्यानीं बाराव्या शतकाच्या शेवटच्या चरणात ग्रंथनिष्पत्ति केली आहे (उदा लीलाचरित्र, धवळे, शिशुपालवध, पूजावसर इत्यादि) शक १२७५ मधील एका ग्रंथात तत्कालीन वऱ्हाडातील कांहीं तीर्थयात्रांचें व क्षेत्राचें वर्णन आहे पंधराव्या शतकात दत्तराज नावाच्या एका महानुभावानें प्रसिद्ध महानुभावी ग्रंथातील कठिण शब्दाचा एक कोश केला आहे, तो कोश तर आम्हास अवश्य पाहावा लागेल कदाचित् मराठी भाषेंतील हाच प्रथम कोश असावयाचा! या पंथाचा प्रसार पंजाब व पेशावरकडे झाला असल्यानें त्याच्या तत्स्थानस्थ मठांतून मराठी भाषेंत लिहिल्या गेलेल्या पोथ्या! वाचल्या जातात व तेथील मठपती मराठी बोलतातहि तेव्हां या मराठी बोलणाऱ्या महानुभाव पंजाबी, काश्मिरी (काश्मिरांतहि या पंथाचे मठ आहेत) लोकांना म्हणजे त्यांच्या मराठी भाषेला सोडून कसें चालेल? त्यांच्या बरोबरच महानुभावाचे प्राचीन ग्रंथहि अवलोकन करून त्यातील शब्दसंग्रह आमच्या कोशांत सांठविणें भाग आहे

महानुभावांचा स्वतंत्र पंथ व त्यांचें स्वतंत्र वाङ्मय सोडून आपल्या मराठी संतकवींच्या वाङ्मयाकडे आपण पाहिल्यास मन दडपून जाईल, इतका तो वाङ्मयोदधि विस्तीर्ण आहे मुकुंदराजापासून होनाजीबाळापर्यंतचे हे कवी घेतल्यास त्याची संख्या सुमारें ७२३ पर्यंत म्हणजे ठोकळमानानें ७०० पर्यंत भरते (संतकविकाव्यसूचि पहा) या कवींची परंपरा शक १११० पासुन शक १७४० पर्यंतची असल्यानें त्यांच्या ग्रंथात ६५० वर्षांच्या मराठीचें स्वरूप आढळेल या अर्धसहस्रकाच्या कालात मराठीचें हें स्वरूप कसकसें बदलत गेलें, देवगिरीवर झळकणाऱ्या गुरुगेश्वराङ्कित ध्वजापासून शनिवारवाड्यावर लागलेल्या युनियन जॅकच्या बावट्यापर्यंतचा काळ या मराठीनें कोणकोणतीं वळणें घेत पाहिला, यादवांचें स्वराज्य, मुसलमानांचें परराज्य, शिवाजीचें स्वराज्य व पुन्हां इंग्रजांचें परराज्य या कालखंडात तिचा प्रकर्ष किंवा अपकर्ष कसकसा झाला, हें समजून येतें म्हणून या संतकवींच्या सर्व वाङ्मयाची ओळख करून घेणें जरूर आहे पण हें काम अत्यंत अवघड असल्यानें त्यातील प्रख्यात प्रख्यात व्यक्तींची प्रसिद्ध प्रसिद्ध कामगिरी तेवढीच पाहावयास परवडेल ती कामगिरी तपासली म्हणजे मूळ मराठी, मुसुलमानस्पृष्ट मराठी, शिवाजीनें शुद्धिसंस्कार केलेली मराठी आणि इंग्रजीस्पृष्ट मराठी अशा मराठीच्या निरनिराळ्या परिवर्तनांचें आपल्यास ज्ञान होईल या ७०० संतकवींत नर्मदेपासून रामेश्वरापर्यंतचे मराठींत काव्यरचना करणारे कवी येत असल्यानें वर आम्हीं सांगितल्याप्रमाणें मराठी भाषेंतील निरनिराळ्या प्रांतिक भेदाचें स्वरूप आपोआपच पुढें येईल या ६५० वर्षांचे पुढीलप्रमाणें कालखंड करणें शक्य आहे १ मुकुंद–ज्ञानेश्वरकाल, २ चोभाकाल, ३ एकनाथकाल, ४ रामदासकाल, ५ निरंजनमाधवकाल, ६ मोरोपंतकाल, ७ होनाजीबाळा काल, या कालखंडातील विवेकसिंधु (मुकुंदराज), ज्ञानेश्वरी (ज्ञानेश्वर), ज्ञानेश्वरसमकालीन गोरा, चोखा, नामा, जनाबाई वगैरे संतमंडळींचे अभंग, उपाहरण (चोभा), नाथभागवत, रुक्मिणीस्वयंवर (एकनाथ), गीतार्णव (दासोपंत), अपरोक्षानुभूति (शिवराम कल्याणीकर), अनुभूतिलेशटीका (वामनपंडित) महाभारत (मुक्तेश्वर), दासबोध (रामदास), अभंग (तुकाराम),

रामायण युद्धकांड (कृष्णदास मुद्गल) कथाकल्पतरू (कृष्ण याज्ञवल्की) सीतास्वयंवर (वेणाबाई), समर्थप्रताप (गिरिधर), शिवलीलामृत (श्रीधर) गुरुचरित्र (सरस्वतिगंगाधर), भागवत (बहिरा जातवेद) पवनविजय (शेखमहमद), दीपरत्नाकर (रत्नाकर) नित्यानंददीपिका (शिवकल्याण) आर्याभारत (मोरोपंत) ख्रिस्तपुराण (स्टिफन) भक्तिविजय (महिपति) कटाव, पदें वगैरे (अमृतराय, रामजोशी, अनंत फंदी) लावण्या पवाडे (सगनभाऊ होनाजी बाळा परशुराम, प्रभाकर अनंतदास) इ इ ग्रंथसंपत्तीचें अवलोकन केलें म्हणजे वाङ्मयाच्या सतकर्वीच्या कार्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं ती चालण्यासारखें आहे तथापि त्यांचेंहि प्रसिद्ध झालेलें सर्व काव्यवाङ्मय एकदां डोळ्याखालून घालावें लागेल तद नंतर म्हणजे शक १७४० पासून आजमितीपर्यंतचें आधुनिक काव्यवाङ्मय पहाणें लागेल हें ओघानेंच आलें पाश्चात्य कल्पनांशीं घर्षण होऊन अलिकडील काव्यामध्यें कांहीं नवीन कल्पना शिरल्या असल्यानें नवीन शब्द रूढ होत आहेत सध्यां त्याचाहि परामर्श घ्यावा लागेल हें झालें पद्य वाङ्मयाबद्दल

मराठींतील गद्यवाङ्मयाचा शोध महानुभावातील जुन्या ग्रंथापर्यंत जातो त्यांत पद्याइतपतच गद्य वाङ्मयहि आहे व तें बाराव्या शतकापासूनचें आहे तत्पूर्वी म्हणजे शक ९६१ च्या सुमारास सुप्रसिद्ध श्रीपति या ज्योतिर्विदानें मराठींत आपली रत्नमाला गुंफिलीहि आहे तर तत्पूर्वी कांहीं मराठी शिलालेख किंवा ताम्रपटहि आढळतात श्रवणबेळगोळ येथील गोमटाच्या पुतळ्यावर शक ९०५ च्या सुमाराचा एक मराठी शिलालेख आहे चिकुर्डेचा ताम्रपट हा मराठींतील जुना ताम्रपट आहे पाटणचा पंढरपूरचा चौन्यायशीचा कर्णेश्वरचा वगैरे शिलालेख हे जुन्या मराठींत कोरलेले आहेत नंतर बखरींचा काल येतो याचेळीं मराठीला फारशीचा बराच स्पर्श झाला होता बखरींचें स्वरूप मोस्तकें कथावर्णनपर (महिकावतीची बखर) चरित्रपर (शिवाजीच्या बखरी व पेशव्यांच्या बखरी) शासनशास्त्रीय (अमात्याची व मल्हाररामरावाची राजनीति) प्रवासवर्णनपर कहाण्या इत्यादि विविध आहे त्यामुळें हीं शिलालेखताम्रपटबखरीआदिकरून साधनें पहावीं लागतील

शास्त्रीय वाङ्मयावर मराठींत जुनें गद्य लिखाण बरेंच आहे दुसऱ्या वैद्यकावर दोनशें बाडें आढळतात (यांत कांहीं बाडें गद्याप्रमाणें पद्यमयहि आहेत) ज्योतिष शालिहोत्र रसायन स्थापत्य, तत्त्वज्ञान इत्यादि विषयावर मराठींत पूर्वी ग्रंथ निर्माण झाले आहेत इंग्रजीनंतर या विषयांत भरच पडत गेली आहे आणि त्याबरोबरच शास्त्रीय परिभाषा नवीन बनत आहे अर्थात या जुन्या-नव्या परिभाषाचें संकलन आम्हाला देणें प्राप्त आहे

एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या चरणांत आमच्याकडील विद्वानांचें लक्ष्य इंग्रजींतील शालोपयोगी अशा पुस्तकांकडे व नंतर इतर प्रसिद्ध पुस्तकांकडे वळून त्यांचीं भाषांतरें किंवा रूपांतरें करण्याकडे लागलें या भाषांतरांत गद्य वाङ्मयाचीं बहुतेक अंगें आलीं आहेत प्रथम हें काम मिशनऱ्यांनीं हातीं घेतलें आणि त्याला आमच्यातील कांहीं शास्त्रीमंडळींनीं हातभार लाविला तदनंतर इंग्रजी शिकलेल्या पहिल्या पिढीनें (कै कृष्णशास्त्री चिपळुणकर) सरकारच्या मागणीवरून व स्वयंस्फूर्तीनें हा उद्योग पुढें चालविला यापुढें धाकटे चिपळूणकरांनीं आपली प्रख्यात निबंधमाला काढिली व एक प्रकारें सामाजिक क्रांतीबरोबरच राजकीय क्रांतीसहि प्रारंभ केला, त्यानंतर इंग्रजी शिक्षणाची वाढ बरीच झाल्यानें व आपल्या मातृभाषेंत उत्तम उत्तम ग्रंथ तयार व्हावेत अशी इच्छा देशांत उत्पन्न झाल्यामुळें सर्व बाजूंनीं मराठीचा उत्कर्ष होईल असा प्रयत्न होऊं लागला तो अजून चालूच आहे अशा या काळातील कोणकोणत्या ग्रंथांचा आधार आम्हीं कोशास घेऊं तें येथें सांगणें अशक्य आहे फक्त एवढेंच सांगतां येईल कीं, २५।२५ वर्षांचे कालखंड पाडून त्या त्या काळांतील उत्तमोत्तम पुस्तकांची ओळख आम्हांस करून घ्यावी लागेल अलीकडच्या १०।१२ वर्षांत गेल्या महायुद्धामुळें आमची यौद्धिक परिभाषा बरीच नवीन बनली आहे तसेंच बंगभंगाच्या चळवळीपासून आजच्या सायमन कमिशनच्या काळापर्यंत निरनिराळ्या प्रकारची राजकीय परिस्थिति बनत गेल्यामुळें मराठींत अनेक राज्यशासनशास्त्रीय शब्द नवीन रूढ होत चालले आहेत सारांश या सर्व परिभाषाचा संग्रह आम्हांला करावा लागेल

पूर्वप्रयत्न—आजपर्यंत लहानमोठे मराठी कोश अनेक झाले असून आम्हीं हा कोश पुन्हां काढण्याचा उद्योग कां चालविला अशी शंका येणें साहजिक आहे; त्याचें समाधान पुढीलप्रमाणें—आजपर्यंतचे कोश अपुरे होते आम्हीं आमच्या कोशांतील शब्दांचें जें स्वरूप आतापर्यंत वर्णन केलें, तशा स्वरूपाचा एकहि कोश आमच्या आढळांत नाहीं मराठी भाषेंतील पहिला कोश दत्तराज महानुभावाचा होय, हा कोश फक्त महानुभावातील प्रसिद्ध सात ग्रंथांतील कठीण शब्दांचा आहे, इतर महानुभावी वाङ्मयाचा किंवा तत्कालीन मराठी भाषेचा हा कोश नाहीं हेमाडपंताचा एक संस्कृत-मराठी कोश होता असें के राजवाडे म्हणत पण तो उपलब्ध नाहीं त्याचप्रमाणें त्यांनीं छापविलेल्या शक १२३९ पर्यंतच्या

काळातील दोन (एक शुद्ध मराठी व दुसरा संस्कृत-मराठी) कोशहि उपलब्ध नाहींत. राज्यव्यवहारकोश प्रसिद्ध आहे खरा पण तो फारशी-मराठी (किंवा अरबी-संस्कृत) आहे आणि तो केवळ राजशासनपरशब्दाचाच आहे, म्हणजे अपुराच आहे. इ. स. १८१० मधील कॅरेचा व १८२४ तील केनेडीचा हे कोश साप्रत दुर्मिळ असून दुसरा तर मराठी-इंग्रजी आहे. शाळ्याचा म्हणून प्रसिद्ध असलेला कोश हल्लीं दुर्मिळ असून त्यांतहि तत्कालीन सर्व मराठी शब्दसंग्रह आलेला नाहीं. मोलस्वर्थ व कँडीचा कोश मराठी-इंग्रजी आहे व तोहि आतां दुर्मिळ आहे माधव चंद्रोबाचा शब्दरत्नाकर कोश संस्कृत-मराठी आहे. गोडबोले याचा मराठी भाषेचा नवीन कोश हा मराठी-मराठी आहे खरा पण तो अत्यंत ल्हान आहे. हंसकोशात बहुतेक मराठी पद्यग्रंथातील शब्दाचा-व तोहि थोडासा-च भरणा आहे. बाबा पदमनजीचा कोश अपुरा असून साप्रत दुर्मिळ आहे. याशिवाय काहीं किरकोळ कोश आहेत पण एक तर ते छोटे छोटे असून त्यातील काहीं एखाद्या विषयापुरतेच आहेत अशी स्थिति आहे म्हणून साप्रत आम्हीं हें काम हातीं घेतलें आहे. आज मराठी भाषेत जेवढे शब्द आहेत त्या सर्वांचा मराठींतील वाक्प्रचार, म्हणी वगैरे निरनिराळ्या अंगासह या कोशात समावेश व्हावा अशी आमची इच्छा आहे व हेंच आमच्या कोशाच्या स्वरूपाचें थोडक्यात वर्णन आहे. आजच्या अदाजानें मराठींत साप्रत पाऊण लक्षाइतके शब्द असावेत; अर्थात त्या सर्वांचा संग्रह करावा लागेल

का र्य वि भा ग—यासाठीं निरनिराळे विभाग पुढीलप्रमाणें पाडले आहेत

१ शिलालेखवाङ्मय -यात प्रसिद्ध अप्रसिद्ध सर्व प्रकारचे मराठी शिलालेख येतील, तसेंच ताम्रपत्रवाङ्मयहि येईल.

२ महानुभावी वाङ्मय -हें वाङ्मय फारच महत्त्वाचें आहे यापैकीं प्रसिद्ध असें थोडें आहे, यासाठीं अप्रसिद्ध मूळ ग्रंथ पाहावे लागतील

३ मुकुंद व ज्ञानेश्वर वाङ्मय -यात मुकुंदराज, ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरकालीन आणि तेथपासून एकनाथापर्यंतचे इतर संतकवी याचें वाङ्मय येईल विशेषत यात ओंवीवाङ्मय येईल उ विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी, इत्यादि

४ एकनाथ-मुक्तेश्वर वाङ्मय -वरीलप्रमाणें, एकनाथापासून मुक्तेश्वर, वामन, समर्थपंचायतन यांचें ओंवीवाङ्मय उ एकनाथी भागवत, मुक्तेश्वरीभारत, अपरोक्षानुभूति इ.

५ रामदासीवाङ्मय -हें स्वतंत्रच आहे यात ओंवी, व इतर श्लोक, पदें अभग, वगैरे सर्व प्रकारचें काव्य येईल भी- समर्थ व त्याचा संप्रदाय याचें सर्व वाङ्मय यात येणार उ. दासबोध, समर्थप्रताप, सीतास्वयंवर वगैरे.

६ अभंग व स्फुट वाङ्मय -यात नामदेव, नामदेवकालीन इतर संत, ज्ञानेश्वरादिबंधु एकनाथ, तुकाराम, निळोबा, व सर्व संतकवी याचे अभंग आणि इतर श्लोक, कटाव, पदें वगैरे वाङ्मय यात येईल. उ गाथापचक, काव्येतिहाससंग्रहातील पदसंग्रहाचे भाग, इतर अभंगाच्या गाथा इ.

७ आर्यावाङ्मय -यात विशेषेंकरून मोरोपंत व याच्या धर्तीवर ज्यानीं आर्या रचिल्या त्याचा समावेश होईल. उ. मोरोपंताचें आर्याभारत, रामायणें, मोरोपंती इतर प्रकरणें, वगैरे

८ जुनें शाहिरी -यांत आगलाई पूर्वकालीन शाहीर, कीर्तनकार, गोंधळी वगैरेंचे पवाडे, लावण्या, गारूड, कटाव वगैरे सर्व प्रकारचें वाङ्मय येईल. उ शालिग्रामानीं प्रसिद्ध केलेले पोवाडे, रामजोशी, प्रभाकर, होनाजी बाळा, परशराम, इत्यादिकाचे लावण्या व पोवाडे, अमृतराय, अनंतफंदी याचे कटाव.

९ ऐतिहासिक -यात ऐतिहासिक कागदपत्रें, बखरी, प्रशस्त्या याचा समावेश होईल. राजवाडे याचे खंड, खरे याचे लेखसंग्रह, काव्येतिहाससंग्रहातील बखरी, इतिहाससंग्रह, प्रभात, भारतवर्ष वगैरे मासिकातील ऐतिहासिक मजकूर इत्यादि लेखसंग्रह येईल. तसेंच भारतइतिहाससंशोधकमंडळानें प्रसिद्ध केलेलें वाङ्मय.

१० निबंधमालाकालीन गद्य -यांत सदाशिव काशिनाथ छत्रे याजपासुन विष्णुशास्त्र्यांच्या निबंधमालेपर्यंत मराठींत जीं जीं उत्कृष्ट गद्य पुस्तकें झालीं त्यांचा समावेश होईल यात कादंबऱ्या, निबंध इत्यादि पुस्तकें येतील

११ आधुनिक काव्य:-यात केशवसुतापासून आज मित्तीपर्यंतच्या आधुनिक कवींचें काव्यवाङ्मय व त्यावरील चर्चात्मक वाङ्मय याचा अंतर्भाव केला जाईल यांत पहिल्या पिढींतील-केशवसुत, लेले, आगाशे, भिडे, चंद्रशेखर, विनायक, आपटे इत्यादि मंडळी येतील आणि दुसऱ्या पिढींतील-गोविंदाग्रज रविकिरणमडळ, तिवारी, टेकाडे, इत्यादि मडळी येतील

१२ मराठी नाट्य.-यात पूर्वींचीं ललितें, जुनीं नाटकें आणि हल्लींचीं नाटकें आणि त्यावरील वाङ्मयाना स्थान दिलें आहे

१३ शास्त्रीय -यांत जुनें व नवें दोन्ही प्रकारचें वाङ्मय येईल जुनी शास्त्रीय परिभाषा (निरनिराळ्या शास्त्रातील) व हल्लींची परिभाषा याचा समावेश यांत करावयाचा आहे साप्रत अशी सर्वमान्य परिभाषा रूढ झाली नाहीं एकाच शास्त्रावर निरनिराळ्या विद्वानांनीं निरनिराळ्या परिभाषा उपयोगांत आणल्या

आहेत. त्यासाठीं त्यांच्याऐवजीं सर्वसामान्य अशी परिभाषा सर्व विद्वानांच्या मदतीनें तयार करण्यात येईल

१४ परीक्षणात्मक उर्फ टीकात्मक –यांत टीकाशास्त्रानुरोधानें जें वाङ्मय सांप्रत तयार होत आहे त्याचा संग्रह केला जाईल निरनिराळ्या विषयांवर मराठींत जीं पुस्तकें हल्लीं तयार होत आहेत त्यांचें समालोचन करण्यासाठीं ज्या टीका प्रसिद्ध होत असतात त्यांना यात वाव मिळेल.

१५ निबंधात्मक –निरनिराळ्या विषयावरील निबंधाचा हा एक निराळा वर्ग पाडण्यांत येईल हे निबंध इंग्रजी सुरू झाल्यापासून आजपर्यंतचे असतील.

१६ वर्तमानपत्रीय उर्फे नियतकालिक –मराठींत वर्तमानपत्रें निर्माण झाल्यावर, समाजांत ज्या निरनिराळ्या प्रकारच्या चळवळी उत्पन्न झाल्या त्याचा फायदा घेऊन वर्तमानपत्रकर्ते यांनीं बरेच नवीन शब्द बनविले आहेत, त्यांचा संग्रह करावा लागेल. उदा० नोकरशाही, खासदार, आमदार, बहिष्कार, वगैरे

१७ लौकिक प्रांतिक भाषा –यात गोवें, कारवार, बागलाण, नेमाड, खानदेश, व ऱ्हाड, वगैरे प्रांतातील निरनिराळ्या लौकिक पोट भाषाचा समावेश होईल शब्दाबरोबर वाक्प्रचार व म्हणी हीं येतील

१८ कारुवाङ्मय–सोनार, सुतार, लोहार, कृषि, वाणिज्य, इत्यादि धंद्यातील विशिष्ट शब्दहि येतील.

याप्रमाणें आम्हीं आमच्या कोशात येणाऱ्या शब्दसंग्रहाचे १८ ठोकळ भाग पाडले आहेत या विभागणीनें संग्रहाचें कार्य लवकर होईल, म्हणजे सर्व मराठी वाङ्मय या १८ विभागात वाटून त्याची संपादकीय व्यवस्था निरनिराळी करता येईल तसेंच आमच्याशीं सहकार्य करणाऱ्या व्यक्ती किंवा संस्था यानाहि ही विभागणी सोईची पडेल, म्हणजे यातील जो विभाग ज्याच्या आवडीचा असेल त्यानें तो निवडून त्यातील शक्य तो शब्दसंग्रह जमा करून आमच्याकडे तो पाठवूं शकेल हे १८ विभाग आम्हीं कायमचेच केले आहेत असें नाहीं, याहून जास्त कोणी सुचविल्यास किंवा या १८ ची संख्या कमी करावी असें म्हटल्यास आमची ना नाहीं, मात्र हे विषय (व याहून जास्त असल्यास तेहि) त्या संख्येंत आले म्हणजे झालें.

किंमत—एकदर कोश कमींत कमी डबलक्राऊन आकाराच्या अठपत्री छाप्याचीं २५०० पृष्ठें तरी होईल असें वाटतें आज किंमतीचें मान ठोकळमानानें आगाऊ दर १०० पृष्ठांमागें १ रु असें धरलें आहे याहूनहि पृष्ठें जास्त वाढण्याचा संभव आहे, त्या वाढीचाहि हिशेब याच आकारानें होईल

मदतीची अपेक्षा—या कामासाठीं महाराष्ट्रातील व बृहन्महाराष्ट्रांतील निरनिराळ्या वाङ्मयीन संस्थांचें व विद्वान मंडळींचें साहाय्य आम्हास घ्यावें लागेल आणि त्याप्रमाणें त्यांनीं तें द्यावें अशी आमची त्यांना विनंति आहे. आमच्या माहितीप्रमाणें व्यक्तिश असलेल्या विद्वानांना आणि संस्थांना आम्हीं विनंतीपत्रें पाठवीत आहोंतच, पण नजरचुकीनें कोणी राहिल्यास त्यांना ही जाहीर विनंति करून मदतीची अपेक्षा करीत आहों

आतापर्यंत पुढील संस्थांनीं व व्यक्तींनीं आम्हांस सहाय्य करण्याचें आश्वासन दिलें आहे. बोधमाला कार्यालय (फलटण), मराठी ग्रंथसंग्रहालय (ठाणें), रा नी वि दळवी (मडगाव–गोवें), रा. विठ्ठलराव सुखटणकर (गोवें), विदर्भसाहित्यसंघ (उमरावती), वाङ्मयविहारमंडळ (नाशिक), महाराष्ट्र शारदाधाम (यवतमाळ), रा. शं बा गोडबोले (सं. प्रकाश सातारा)

आम्हांला संस्थांची व विद्वानांची जी मदत पाहिजे आहे तिचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे. आपापल्या आवडीच्या विषयांवरील शब्दसंग्रह जमा करून तो आम्हाला पुरविणें उदा० ज्यांना शास्त्रीय परिभाषेची आवड असेल त्यांनीं किंवा ज्यांना कारागीर लोकांच्या शब्दांची ओळख असेल त्यांनीं त्याचें टिपण करून आमच्याकडे धाडावें. महानुभावी, रामदासी, वारकरी, लिंगायत इत्यादि वाङ्मयांतील, ऐतिहासिक वाङ्मयांतील, धर्मशास्त्र स्थापत्य, संगीत, रसायन, ज्योतिष वगैरे शास्त्रांतील, राजकारणशास्त्रातील याप्रमाणें निरनिराळ्या वाङ्मयीन विषयांची ज्यांना आवड आहे, त्यांनीं या आपल्या विषयांतील शब्दांची माहिती आम्हांला द्यावी अशी विनंति आहे

ही योजना ग्वाल्हेर येथें भरलेल्या साहित्यपरिषदेच्या बैठकीस सादर करण्यात आली होती.

परंतु सदर कार्याकरिता मंजूर केलेली शंभर रुपयांच्या रकमेची आम्ही परिषदेकडे मागणीहि केली नाहीं व ती आम्हांस मिळालीहि नाहीं

ज्ञानकोशानंतर—महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचा एकविसावा भाग १९२६ मध्यंच छापून निघाला होता व तेविसावा भाग छापण्याचें व बाविसावा सूचीविभाग तयार करण्याचें काम चाललें होतें.

ज्ञानकोश पूर्ण झाल्यावर कोणतीं कामें मंडळानें घ्यावीं याबद्दल संपादकवर्गात मधूनमधून चर्चा होत असे व जमलेली कार्यकर्तीमंडळी एकत्र राहून कांहींतरी कार्य सुसूत्रतेनें चालू रहावें व ज्ञानकोशमंडळामार्फतच मराठी भाषेत अधिक भरीव, महत्त्वपूर्ण व अभिजात ग्रंथांची भर पडावी अशी बहुतेक सर्वांची इच्छा होती परंतु या बाबतींत निश्चित अशी योजना कोणतीच ठरली नव्हती मधूनमधून या प्रश्नाला आमच्याकडून चालना मिळे व डॉ केतकर यांच्याकडे दोनतीन निरनिराळ्या योजना तयार

करून पाठविण्यातहि आल्या होत्या परंतु त्याचेकडून एकाहि योजनेचा निश्चितपणें स्वीकार होईना. विद्यासेवक मासिक, पुणें समाचार वगैरे गोष्टी थोडयाफार पुढील कार्याचा अदाज घेण्याच्या स्वरूपाच्याच होत्या त्याचप्रमाणें कथामंदिर मासिक, राजवाडे धातुकोश प्रकाशन वगैरे कार्यांचीहि घोषणा झाली होती, परंतु प्रत्यक्ष अशी कोणतीच योजना निश्चित होईना व मंडळाच्या चालकवर्गाची सघटना किंवा रचना कोणत्या प्रकारची असावी यासबंधीहि कांहीं निश्चित होईना.

अल्पारंभ—माझ्या मनानें 'मात्र ज्ञानकोशाच्या कार्यानंतर शब्दकोश तयार करण्याचें कार्य अंगावर घ्यावयाचें निश्चित ठरविलें होतें व ज्ञानकोशमंडळाच्या भविनव्यतेच्या वाटाघाटी चालल्या असतानाच शब्दकोशाची जुळवाजुळव करण्याच्या मार्गास मी लागलों होतों व त्याकरिता साधनसामुग्री जमवीत होतों. १९२१ सालीं बडोदें येथें समेलनासाठीं गेलों असता तेथील एक वृद्ध साहित्यिक रा. अनंत बाबाजी देवधर याची भेट झाली तेव्हां त्याच्या ग्रंथसग्रहात पूर्वी शास्त्री मडळानें तयार केलेला ' महाराष्ट्र भाषेचा कोश ' शिलाप्रेसवर छापलेला व अत्यत दुर्मिळ झालेला पाहावयास मिळाला होता त्याचवेळीं त्यास मी माझ्या पुढील कामासाठीं त्याची मागणी केली होती व यावेळीं त्याजकडे माझे मित्र रा संत याचे मार्फत बोलणें करून व त्यांनींहि अनेकवार जाऊन त्याची प्राप्ती करून घेतली व विजयादशमीच्या मुहूर्तावर त्या वरून कार्डे लिहावयास रा कर्वे यांच्या घरीं आरंभ केला, कारण त्यावेळीं माझें गृह गृहिणीहीन होतें असो.

याप्रमाणें शब्दकोश तयार करावयाचा हें निश्चित ठरल्यावर हें काम अनेक सहाय्यकाच्या मदतीशिवाय होणें शक्य नाहीं ही गोष्ट लक्ष्यात घेऊन निरनिराळ्या प्रकारच्या वाङ्मयाचे अभ्यासक विद्वान् गृहस्थ व महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागात राहणारे भाषाप्रेमी गृहस्थ व सस्था यास आपआपल्या परिचित वाङ्मयातील व प्रातातील विशिष्ट व प्रातिक स्वरूपाचे शब्द जमवून पाठविण्यासाठीं विनतिपत्रकें पाठविण्यात आलीं त्याचा नमुना पुढें दिल्याप्रमाणें होता –

| मुख्य संपादक | महाराष्ट्र शब्दकोश कचेरी |
|---|---|
| यशवंत रामकृष्ण दाते | |
| बी. ए एलएल् बी. | पुणें ... ... .... |
| सहसंपादक | |
| चिंतामण गणेश कर्वे, बी ए | |
| भावा चांदोरकर | |
| हौत्रवेत्ते वे शा सं चिंतामणशास्त्री दातार | |

" महाराष्ट्र शब्दकोशाचें कार्य सुरू होऊन आतां त्यास बरेंच स्वरूप येत चाललें आहे सोबत जोडलेल्या पत्रकांतील योजने प्रमाणें आमच्या कार्याचे एकदर १८ विभाग केले आहेत. या विभागांतील शब्दशोधनाचें कार्य आम्ही निरनिराळ्या विद्वान् मंडळींकडे सोंपविणार आहोंत आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या कोशांतील व सामान्य वाङ्मयात आढळणाऱ्या शब्दाचा सग्रह करण्याचें कार्य कार्यालयांत चालू आहे परंतु विशिष्ट वाङ्मयातील विशेष शब्दाची निवड करण्याचें काम त्या त्या वाङ्मयाचा विशेष व्यासंग असणाऱ्या व्यक्तींकडे सोंपविण्याचें आम्हीं योजिलें आहे तसेंच निरनिराळ्या प्रातिक बोलींत रूढ असलेल्या शब्दाचा संग्रह करण्याचें कार्य त्या त्या प्रातात बरींच वर्षे वास्तव्य करून राहिलेल्या प्रातिक भाषेंतील शब्दाच्या व अर्थाच्या खांचा खोचा वगैरेशीं पूर्ण परिचय असलेल्या गृहस्थांकडे देण्याचें आम्हीं ठरविलें आहे आपला .......... वाङ्मयाचा विशेष व्यासग असल्यामुळें आपण त्या वाङ्मयातील ( आपण ... प्रातातील स्थाईक रहिवासी व तेथील भाषेशीं विशेष परिचित म्हणून ... प्रातातील भाषेतील ) विशेष शब्दाची निवड करून ते शब्द अर्थ व अवतरणासह व शक्य तर व्युत्पत्ति देऊन आम्हास पुरविल्यास आमचें मोठें कार्य होणार आहे व या महाराष्ट्रास भूषणभूत होणाऱ्या ग्रंथाच्या रचनेंत सहकार्य केल्याचें श्रेय आपणास मिळणार आहे तरी आपण हें कार्य आपल्या अगावर घेऊन आम्हास आभारी कराल अशी आशा आहे कळावें हे विनति "

आपला,

यशवंत रामकृष्ण दाते.

## महाराष्ट्रीय साहित्यभक्तांस विनंति

याप्रमाणें अनेक सस्थास व लेखकास विनति करतां यावी म्हणून ' महाराष्ट्रीय साहित्यभक्तास विनति ' म्हणून एक पत्रक तयार करून अनेक साहित्यिकास पाठविण्यात आलें होतें तें पुढें दिल्याप्रमाणें होतें –

### महाराष्ट्र शब्दकोश

" महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचें मुख्य कार्य आता पूर्ण झालें आहे व आता उरलेले पुरवणीभागहि लवकरच बाहेर पडतील यानंतर ज्ञानकोशाच्या संपादकवर्गानें रा यशवंतराव दाते यांस संपादक नेमून महाराष्ट्र शब्दकोश तयार करावयाचें काम हातीं घेण्याचें ठरविलें आहे या कामाची सापतिक बाजूची योजना लवकरच स्वतंत्र रीतीनें जाहीर करण्यांत येईल पण सपादकीय व रचनेचें धोरण सामान्यत पुढें दिल्याप्रमाणें आखावयाचें ठरविलें आहे—

सपादकीय मुख्य कार्य पुण्यास करावयाचें ठरविलें आहे तथापि केवळ पुण्यास राहून किंवा पुण्याच्याच मडळीकडून एकाद्या हें कार्य पूर्ण होणें शक्य नाहीं याकरितां निरनिराळ्या

शहरीं कार्याचीं केंद्रे करावयाचें ठरविलें आहे आणि याकरितां कामाची विभागणी पुढें दिल्याप्रमाणें करावयाचें ठरविलें आहे

पुण्यास मुख्यत आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या सर्व कोशांतील शब्दांचा संग्रह करण्याचें कार्य करून जें कार्य दुसऱ्या कोठेंहि होण्यासारखें नसेल तें पुरें करावयाचें व असरची हस्तलिखित प्रत तयार करावयाचें काम करावयाचें

आपल्या महाराष्ट्रांत निरनिराळ्या विषयांचा अभ्यास करणारीं लहान लहान वाङ्मयमंडळें बरींच निर्माण झालीं आहेत उदाहरणार्थ, यवतमाळ येथें रा यशवंत पुरुषोत्तम देशपांडे एम् ए एलएल् बी यांनीं काढलेली शारदाश्रम ही संस्था महानुभावी वाङ्मयाचें प्रकाशन व अभ्यास करण्याचें कार्य करीत आहे धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेच्या रा देव वगैरे मंडळींनें रामदासी वाङ्मयाच्या अभ्यासास आपणास वाहून घेतलें आहे शिवाय तेथें रा भट यांच्यासारखे इतिहास व धर्मशास्त्र यांचा अभ्यास करणारे व कार्यकर्ते वाङ्मयसेवक आहेत बडोदें येथें महाराष्ट्र वाङ्मयमंडळ ही संस्था शास्त्रीय संज्ञांच्या क्षेत्रांत कार्य करीत आहे व तेथें ऐतिहासिक संशोधकांचाहि एक चांगला संघ आहे याखेरीज दादर येथील गोविंदाग्रजमंडळ, मुंबई येथील वाङ्मय सेवामंडळ, यासारख्या लहानमोठ्या संस्था नाशिक, मुंबई, उपनगर वगैरे ठिकाणीं विशिष्ट वाङ्मयशाखेस वाहून घेऊन कार्य करीत आहेत तेव्हां अशा संस्थांचें सहकार्य असल्याशिवाय एवढें मोठें प्रचंड कार्य चांगल्या तऱ्हेनें शेवटास जाणें शक्य नाहीं

खुद्द पुणें शहरांतहि भारतइतिहाससंशोधकमंडळ, मयूरमंडळ वगैरेसारख्या संस्थांचें सहकार्य आम्ही मिळविणार आहों

याखेरीज कांहीं गृहस्थ या बाबतींत स्वत च आपल्या पुरेसे वैयक्तिक प्रयत्न करीत आहेत उदाहरणार्थ, रा सा नारायण गोविंद चापेकर यांनीं निरनिराळ्या कारागीर लोकांत त्यांच्या धंद्यासंबंधीं प्रचलित असलेले शब्द जमविण्याचें कार्य चालविलें आहे प्रो मा त्रिं पटवर्धन यांचा फारसी मराठी कोश हा अशा तऱ्हेच्या प्रयत्नांचेंच एक दृश्य फल आहे तेव्हां अशा विवक्षित क्षेत्रांत कार्य करणाऱ्या वाङ्मयभक्तांचेंहि साहाय्य आम्हांस पाहिजे आहे

याकरितां आम्ही अशा तऱ्हेनें जेथें जेथें वाङ्मयसेवेचें कार्य चालू आहे किंवा होण्यासारखें आहे अशा सर्व संस्थांस व ज्या ज्या व्यक्ती अशा तऱ्हेनें कार्य करीत असतील त्यांस आमच्या कार्यांत सहकार्य करण्याची या पत्रद्वारें विनंति करीत आहों

तरी आमच्या वाचकवर्गांनीं आपल्या बाजूच्या अशा ज्या संस्थांची माहिती आपणास असेल त्यांचीं नांवें, कार्यकर्त्यांचीं नांवें व पत्ते आम्हांस कळविण्यास त्यांसहि आम्ही विनंतिपत्र पाठवूं तरी आमचे वाचक अशा तऱ्हेची मदत आम्हांस अवश्य करतील अशी आशा आहे."

यशवंत रामकृष्ण दाते

याखेरीज अखिल महाराष्ट्रीय जनतेस म्हणून एक विनंति पत्रक काढण्यांत आलें होतें तें पुढें दिलें आहे –

महाराष्ट्र-शब्दकोश-मंडळ, सदाशिव पेठ,
भाऊमहाराजांचा वाडा, पुणें, १।५।२८

## अखिल महाराष्ट्रीयांना विनंति

भाषेचे डोळे व्याकरण व कोश हे आहेत, त्यांच्याखेरीज कोणतीहि भाषा आंधळी होय या न्यायानें पाहिलें म्हणजे प्रत्येक भाषेनें हे आपले डोळे शाबूत ठेविले पाहिजेत आपल्या मराठी भाषेच्या बाबतींत आतापर्यंत असे प्रयत्न झालेले आहेत त्यांत मराठी कोशाची परंपरा तर फार जुनी, म्हणजे शालिवाहनाच्या बाराव्या शतकापासून आहे त्या वेळच्या महानुभावी कोशापासून परवांच्या शब्दरत्नाकरापर्यंत वीसबावीस मराठी कोश तयार झाले आहेत परंतु सर्वांग परिपूर्ण व शास्त्रीय दृष्टीनें तयार केलेला असा एकहि कोश आज बाजारांत मिळत नाहीं आतापर्यंत जे कोश तयार झाले होते त्यांत मराठी भाषेच्या सर्व प्रांतिक पोट-भाषांचा समावेश करण्यांत आलेला नसे अलीकडील पंधराबीस वर्षांत निरनिराळ्या चळवळी व घडामोडींमुळें मराठी भाषेंत अनेक नवीन शब्दांची भर पडली आहे शास्त्रीय परिभाषा बनत चाललेल्या आहेत, विद्यापीठांतून मराठीचा बहुमान उत्तरोत्तर जास्त होत जाणार व सध्यां होत आहे, त्याप्रमाणेंच महाराष्ट्रीयांचें वाङ्मय-लेखन मराठींतून उत्तरोत्तर अधिकाधिक निर्माण होत आहे अशा वेळीं हल्लींच्या मराठी भाषेंत प्रचलित असलेल्या सर्व शब्दांचा संग्रह एकत्रित करण्याचा समय प्राप्त झाला आहे हा संग्रह करतांना अलीकडील शास्त्रीय दृष्टि सोडतां कामा नये ज्ञानकोशसंपादकवर्गानेंच हा कोश हातीं घ्यावा अशाबद्दलचा ठराव पुण्यास भरलेल्या साहित्य संमेलनानें केलेला असून महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचा याला पूर्ण पाठिंबा आहे सारांश वरील सर्व गोष्टी लक्षांत घेऊन मराठीचा एक सर्वांगपरिपूर्ण असा बृहत्कोश तयार करावा अशी इच्छा मनांत बाळगून आम्ही त्या कामास हात घालीत आहों या प्रयत्नांत निरनिराळ्या मराठी वाङ्मयसंस्थांनीं व विद्वानांनीं आम्हांला मदत करण्याचें आश्वासन दिलें आहे

* हें पत्रक केसरी व इतर प्रमुख महाराष्ट्रांतील पत्रांतून प्रसिद्ध झालें आहे

कोशाचें नाव "महाराष्ट्र शब्दकोश" असें ठेवण्यात आलें आहे त्याची एक साग्र योजना छापून काढण्यात आली असून तिलाहि वरील विद्वानाची व सदस्यांची अनुमति मिळाली आहे कामास सुरुवात गेल्या विजयादशमीपासुन झालीच आहे कोशात साधारणपणें पाऊण लक्षापर्यंत शब्द येतील सुपर रॉयल आकाराचे पाचशें पाचशें पानाचे पाच खड तयार होतील किमतीचें मान दर शभर पृष्ठागणिक एक रुपाया, याप्रमाणें पचवीस रुपये तूर्त ठरविलें आहे याहून जास्त पृष्ठें वाढल्यास हेंच प्रमाण राखण्यात येईल यासाठीं पचवीस रुप याचा एक भाग ठेउन ही भागीदाराची रजिस्टर्ड कपनी करण्यात आली आहे व भागीदाराना भागाच्या तारणावर ग्रथ मिळण्याचीहि योजना केली आहे खालील सर्व मडळींनी ज्ञानकोश सपवून हें काम स्वतत्रपणें हातीं घेतलें आहे, तेव्हा आता यापुढें महाराष्ट्र शब्दकोश मडळाचा व ज्ञानकोश मड ळाचा काहीं सबध नाहीं शेवटीं अखिल महाराष्ट्रातील सर्व मराठी-भाषाभिमान्याना आमची आग्रहाची विनति आहे कीं, त्यानीं या कामीं आम्हाला सर्व प्रकारें मदत करून मराठी भाषेच्या अगावर हें "देशीकार लेणें" आमच्या हातून लेव विण्याचें श्रेय स्वत घ्यावें

यशवंत रामकृष्ण दाते,
चिंतामण गणेश कर्वे,
आबा चादोरकर
चिंतामणशास्त्री दातार,
गजानन नारायण टिळक

या पत्रकास पुढील गृहस्थानीं खालीं दिल्याप्रमाणें पुष्टी दिली होती –

वरील मडळींनीं "महाराष्ट्र शब्दकोशा 'ची जी योजना आखून प्रसिद्ध केली आहे ती चागली असून आज असल्या कोशाची अत्यत जरूरी आहे असलें अवजड काम पुरें पाड ण्यास जी दृष्टि व कार्यक्षमता लागते ती या सर्व मडळींच्या ठिकाणीं आहे हें सांगण्याची गरज नाहीं याच्यात वेदाभ्यासी समाजाभ्यासी, श्रौताभ्यासी, इतिहाससशोधक इत्यादि निर निराळ्या अभ्यासक व्यक्ती आहेत शिवाय त्यानीं ज्ञान कोशासारखें प्रचड काम नुकतेंच पार पाडलें आहे, म्हणजे यानीं आतापर्यंत मराठी भाषेची निरनिराळ्या अगानें सेवा चालविली आहे त्यामुळें शब्दकोशाचें काम अगावर घेण्यास त्याना एक प्रकारें अधिकार आलेला आहे या कामीं आमची पूर्ण सहानुभूति असुन अखिल महाराष्ट्रातील मराठी भाषा बोलणाऱ्या एकूण एक महाराष्ट्रीयास आमची अशी विनति आहे कीं, त्यानीं या कार्यास सर्व बाजूनीं हातभार लावून हें वाङ्मय कार्य पुरें करून मराठी भाषेचें ऋण फेडावें

आपले,

न चिं केळकर, श्री नी चाफेकर, गं ना मुजुमदार, खंडेराव चिंतामण मेहेंदळे, वै का राजवाडे, शि म परांजपे गो चि तुळपुळे श्री व्यं केतकर, वा गो आपटे, द वा पोतदार, मा वि किबे (इंदूर), य खु देशपांडे (यवतमाळ), ना गो चापेकर (बदलापूर) भा वा भट (धुळें), चिं वि वैद्य, डॉ आंबेडकर (मुबई), मा श्री अणे (यवतमाळ), या मा काळे (बुलढाणा), रा ना मडलीक (अलीबाग), द व्यं पै (गोवें) ग श्री खापर्डे (उमरावती), र वि धुळेकर (झांसी), पा धें शिराळकर (कऱ्हाड), श्री बाळासाहेब पतप्रतिनिधि (औंध), गा अ ओगले (नागपूर), श्री कृ कोल्हटकर (जळगाव, वऱ्हाड), वगैरे

**प्रत्यक्ष कार्य योजना**—ज्ञानकोशमडळातून प्रत्यक्ष बाहेर पडण्यापूर्वीच शब्दकोशाचें कार्य करावयाचा निश्चय झालेला असल्यामुळें व डॉ केतकर यानीं अनेक वेळा यासबधीं चर्चा चालली असता तें काम आपण अगावर घेणार नाहीं, तुम्हीं पाहिजे तर घ्या असें म्हटल्यामुळें या कार्याकरिता कदाचित् एखादी नवीन योजना करावी लागेल असें वाटू लागलें होतें व याकरिता खासगी प्रसाराकरिता म्हणून नवीन नोंदावयाच्या मडळीचा एक प्रॉस्पेक्टस छापून काढला होता (हें पत्रक न १ होतें) व त्याचा काहीं मिनामध्यें प्रचारहि केला होता एवढेंच नव्हे तर काहीं लोकाकडून त्याप्रमाणें अर्ज व पैसेहि आले होते हें पत्रक असें –

(फक्त खासगी प्रसाराकरिता)

**भा ड व ल**—रुपये २५००० (वाढविण्याचा अधिकार आहे) १००० भाग प्रत्यकीं भाग २५ रुपयाचा

**भा ग व सु ली**—प्रत्येक भागाबद्दल अर्जाबरोबर रु ५ भाग मजूर झाल्याबरोबर रु ५ पुढील रु १५ जसजसे लागतील तसतसे तीन हप्त्यानीं वसूल केले जातील दोन हप्त्यां मधील अतर कमींतकमी ३ महिन्यांचें राहील

आतापर्यंत खालील गृहस्थानीं पुढें दिल्याप्रमाणें भाग घेण्याचें कबूल केलें आहे,

| नाव | भाग | रुपये |
|---|---|---|
| यशवत रामकृष्ण दाते, बी ए एलूएल् बी | ४० | १००० |
| चिंतामण गणेश कर्वे, बी ए | १० | २५० |
| पाडुरग मार्तंड उर्फ आबा चादोरकर | १० | २५० |
| गजानन नारायण टिळक | १० | २५० |

### उद्देश

महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचें प्रचंड काम अंगावर घेऊन ज्ञानकोशमंडळातील उत्साही मंडळींनीं तें नेटानें व चिकाटीनें १२ वर्षे परिश्रम करून पुर्ण केलें आहे. त्यानंतर महाराष्ट्राच्या कीर्तीला साजेल असा व ज्ञानकोशाच्या संपादकवर्गाच्या योग्यतेस साजेल असा दुसरा कोणता तरी ग्रंथ प्रसिद्ध करावयास घ्यावा अशा जाहीर व खासगी सुचना अनेक मित्रांकडून व शुभचिंतकांकडून मंडळाकडे आल्या. त्यांत प्रामुख्यानें महाराष्ट्र भाषेचा एक सर्वांगपरिपूर्ण कोश करावा ही सुचना बऱ्याच विद्वान मंडळींकडून आली. आणि गेल्या पुणें येथें भरलेल्या बाराव्या साहित्यसंमेलनामध्यें एक स्वतंत्र ठराव या विषयावर होऊन ज्ञानकोशाच्या संपादकवर्गानें हा कोश करावा असें सुचविण्यांत आलें. या सर्व गोष्टींचा विचार करून अशा तऱ्हेचा कोश तयार करावयाचें काम ज्ञानकोशाच्या संपादक-वर्गांतील कांहीं प्रमुख मंडळींनीं अंगावर घेतलें आहे. त्याप्रमाणें एक महाराष्ट्र शब्दकोश तयार करावयाचा.

त्याप्रमाणें शास्त्रीय पारिभाषिक संज्ञांचा एक कोश तयार करावयाचाहि उद्देश आहे. अशा तऱ्हेच्या कोशाची आवश्यकता किती आहे हें येथें विस्तारशः सांगण्याचें कारण नाहीं. याप्रमाणेंच वैदिक कोश व इतर सदर्भग्रंथ एकामागून एक तयार करावयाचें धोरण आहे. याखेरीज सवडीनें प्रौढ वाङ्मयाची वृद्धि होईल अशा तऱ्हेचे प्रयत्न निरनिराळ्या शाखांत ग्रंथ लिहून ते छापून काढून करावयाचे आहेत.

कंपनीचें धोरण—ज्याप्रमाणें महाराष्ट्रीय ज्ञानकोश हा ग्रंथ, ग्रंथाकरिता होणाऱ्या ग्राहकांकडून मिळणाऱ्या पैशांतूनच खर्च करून पुरा करण्यात आला तशाच तऱ्हेचें धोरण हा ग्रंथ करतानाहि मुख्यत. पुढें ठेवलें जाईल. तथापि या ग्रंथामध्यें संपादकीय धोरणाबद्दल मतभेद होण्याचा संभव नाहीं. तसेंच शब्दाकरिता बरेंच संशोधन व त्याकरिता प्रवासहि करावा लागेल. व काम निरनिराळया ठिकाणीं वाटून द्यावें लागेल. याकरिता प्रांतिक सरकारें, युनिव्हर्सिटया इत्यादिकांकडून संशोधनाकरिता देणग्या मिळाल्यास स्वीकारण्यांत येतील. बिनकौल देणग्या न स्वीकारण्याचें धोरण राहील. कंपनी ग्रंथ प्रकाशनाच्या मुख्य उद्देशानें काढली असल्यामुळें महाराष्ट्र शब्दकोश प्रसिद्ध होईपर्यंत भागांवर फायदा वाटला जाणार नाहीं.

काम करणारीं सर्व माणसें, व्यवस्थापक, संपादक, वगैरे कंपनीचे वैतनिक कामगार राहतील.

धंदास सुरवात कमींत कमी २००० रुपयाचे भाग खपले म्हणजे करण्यात येईल.

कंपनीचे शेअर शक्य तों खासगी प्रयत्नानें विकण्यांत येतील. प्रसंगीं पगारी नोकरांकडूनहि हें काम केलें जाईल. भाग विकण्याबद्दल कमिशन शेंकडा पांचपेक्षा अधिक दिलें जाणार नाहीं. कमिशनवर भागविक्रीचा हमीदार घेण्यांत येणार नाहीं.

कंपनी उभारण्यास प्राथमिक खर्च ५०० रुपयांपेक्षां जास्त लागणार नाहीं असा अंदाज आहे.

मेमोरँडम व आर्टिकल्स ऑफ असोसिएशन कंपनीच्या आफिसांत पाठावयास मिळतील.

शब्दकोश—शब्दकोशाच्या प्रत्यक्ष कामास गेल्या विजयादशमीच्या शुभ मुहूर्तावर सुरवात केली असून प्रथम शास्त्र्यांचा महाराष्ट्र भाषेचा कोश यांतील शब्दांच्या कार्डां तयार करण्यास सुरवात केली असुन सुमारें २५००० कार्डां तयार झाल्या आहेत. अशाच दुसऱ्या कोशातील निवडक कार्डां तयार करण्याचें काम प्रथम पुणें येथें करावयाचें असुन प्रांतिक व विशिष्ट वाङ्मयांतील शब्द जमविण्याचें कार्य निरनिराळ्या शाखांकडे वांटून द्यावयाचें आहे. याकरितां महाराष्ट्रांतील निरनिराळ्या साहित्यभक्तांशीं पत्रव्यवहार चालू आहे आणि कांहीं संस्थांकडून संमतिदर्शक पत्रेंहि आलीं आहेत.

शब्दकोशाची किंमत आतांच अमुक एक रकम असें जाहीर न करतां दर १०० पृष्ठास १ रुपया याप्रमाणें भागीदारास व आगाऊ कांहीं रकम भरून वर्गणीदार होणारास ठेवावी असें योजिलें आहे. मागाहून होणाऱ्या ग्राहकास १। रुपयास १०० पृष्ठें असा दर ठेवावा व पुस्तक सर्व प्रसिद्ध झाल्यावर घेणारास १॥ रुपयास १०० पृष्ठें असा दर ठेवावा असें योजिलें आहे. नक्की किंमत भागीदारांच्या सभेंत ठरेल

पृष्ठाप्रमाणें किंमत ठेवावी असें धोरण अंगीकारण्याचें कारण असें कीं, आधींच सर्व ग्रंथाची किंमत नक्की जाहीर केल्यास तेवढ्याच किंमतींत ग्रंथ देतां यावा म्हणून मागाहून तयार झालेल्या मजकुरासहि कात्री लावण्याचा मोह उत्पन्न होतो; येवढेंच नव्हे तर प्रसंगीं तसें करणें भागहि पडतें. ज्ञानकोशामध्यें दोन तीन भाग अधिक वाढवूनहि १८ ते २१ या भागात बरीच काटकसर करावी लागली हा अनुभव आहे.

शब्दकोशांत अशा तऱ्हेनें काटाकाट करणें इष्ट नाहीं म्हणून वरील धोरण स्वीकारलें आहे.

कोशाचें स्वरूप—या शब्दकोशामध्यें आजपर्यंतच्या मराठी वाङ्मयामध्यें उपलब्ध होणाऱ्या सर्व शब्दांचा अंतर्भाव करण्यांत यावयाचा आहे म्हणजे ज्ञानेश्वरापूर्वीच्या महानुभावी

वाङ्मयात आढळणारे शब्द, ज्ञानेश्वर व तदुत्तरकालीन संत कवींच्या काव्यातील व रामजोशी, अनंतफंदी यासारख्या शाहीरांच्या पवाडे, लावण्या वगैरे शाहिरी काव्यातील शब्द, तसेच अव्वल इंग्रजी आमदानींतील गद्य व पद्य ग्रंथ व अर्वाचीन गद्य व पद्य ग्रंथ, ऐतिहासिक कागदपत्रें व बखरी, वामनपंडित, रामदास, मोरोपंत इत्यादि कवींची काव्ये यातील सर्व शब्दाचा संग्रह या कोशात करावयाचा आहे तसेच नागपुरी, वऱ्हाडी, खानदेशी, नगरी, सोलापुरी, कोंकणी वगैरे प्रांतिक प्रचारातील बोलींतील शब्द व वाक्प्रचार याचाहि संग्रह करण्यात येईल.

प्रत्येक शब्दाची व्युत्पत्ति व निरनिराळे अर्थ देण्यात येऊन प्रत्येक निराळ्या अर्थास आधार देण्यात येतील

यशवंत रामकृष्ण दाते,
तारीख १।१।२८ सपादकीय व्यवस्थापक-ज्ञानकोश.

महाराष्ट्र कोशमंडळ लिमिटेड.

मॅनेजर महाराष्ट्र कोशमंडळ लि पुणें यास वि. वि मी ... भाग विकत घेऊं इच्छितों. त्याकरिता सोबत प्रत्येक भागाकरिता रुपये पाचप्रमाणें रक्कम पाठवीत आहें तरी त्याप्रमाणें भाग किंवा त्यापैकीं जितके देता येतील तितके भाग मला देण्याची कृपा करावी. कळावें हे विनति

ता सही——————

पूर्ण नाव——————

पत्ता——————

परंतु मध्यंतरी पुन्हा एकदा असा विचार मनात आला कीं नोंदणी, स्टाप वगैरे खर्च निष्कारण पडूं नये म्हणून हें मंडळ सहकारी कायद्याखालीं नोंदवावें. यावेळीं माझा सहकारी चळवळीशीं डेक्कन जिमखाना कोऑपरेटिव्ह हौसिंग सोसायटीचा अवेतन चिटणीस म्हणून बराच संबंध आला होता व मी त्या सुमारास प्रांतिक सहकारी इन्स्टिट्यूटच्या कौन्सिलचाहि सभासद होतों तेव्हां या सवलतीचा फायदा घ्यावा म्हणून एक नियमावली तयार करून व दहा सभासदांच्या सह्या घेऊन सहकारी कायद्याखालीं मंडळ नोंदण्याकरिता अर्ज दिला व त्यावेळचे रजिस्ट्रार श्री व्ही एस भिडे यांचीहि गांठ घेतली परंतु आमचे कार्य मिश्र स्वरूपाचें म्हणजे केवळ भांडवल पुरवणारें किंवा केवळ लेखक किंवा केवळ ग्राहक अशा स्वरूपाचें नसल्यामुळे सहकारी खात्यांत तें बसत नाहीं म्हणून नोंदतां येत नाहीं, असें आम्हास बरच दिवसांनीं कळविण्यात आलें

कायदेशीर कार्यारंभ—तेव्हां मग अखेरीस कंपनीच्या कायद्याप्रमाणें मंडळ नोंदावयाचें ठरवून ज्ञानकोश मंडळाच्याच धर्तीवर मेमोरँडम व आर्टिकल्स तयार करून महाराष्ट्र कोशमंडळ लि. पुणें म्हणून मंडळ ४ सप्टेंबर १९२८ रोजीं नोंदविण्यात आलें व कार्यास आरंभ करण्याचें सर्टिफिकेट २८ जानेवारी १९२९ रोजीं मिळालें.

प्रत्यक्ष मंडळ नोंदविण्यास वगैरे जरी इतका विलंब लागला तरी प्रचार, ग्राहक जमविणें, शब्द गोळा करणें वगैरे कामें चालूच होतीं व पहिल्याच भागवाटणींत ८६७ भाग प्रत्यक्ष वाटण्यात आले.

प्रथम कंपनी फक्त २५ रुपयाचा एक असे हजार भाग म्हणजे २५००० रुपये भाडवलाकरिताच नोंदली होती व मी स्वत ४० रा कर्वे व चादोरकर यानीं प्रत्येकीं २० व रा. दातार यानीं १० शेअर घेतले होते पण पुढें ग्राहक जसजसे वाढत गेले तसें भाडवल वाढवून पुढें रु ७५००० भाडवल करण्यात आलें.

शब्दसंकलन—शब्दकोशाचें मुख्य कार्य जें शब्दसंकलन तें करण्याची पद्धती पुढें दिल्याप्रमाणें स्वीकारली होती.

१ उपलब्ध, मराठी–मराठी, मराठी–इंग्रजी व इंग्रजी–मराठी, हिंदी–मराठी, फार्सी–मराठी वगैरे सर्व कोशाचा संग्रह करून त्यातील यच्चयावत् शब्दाच्या पत्रिका तयार करण्यात आल्या. म्हणजे जुन्या कोणत्याहि कोशातील शब्द गळूं नये

२ मराठी वाङ्मयातील शब्द जमविण्यासाठीं मराठी वाङ्मय याचे पुढें दिल्याप्रमाणें वीस विभाग पाडण्यात आले.

शब्दसंशोधनाकरिता केलेले मराठी वाङ्मयाचे विभाग

| | |
|---|---|
| १ शिलालेख वाङ्मय | २ महानुभावी. |
| ३ मुकुंद–ज्ञानेश्वर | ४ एकनाथ–मुक्तेश्वर. |
| ५ रामदासी वाङ्मय. | ६ अभंग व स्फुटकाव्य |
| ७ आर्या वाङ्मय | ८ जुनें शाहिरी वाङ्मय. |
| ९ ऐतिहासिक | १० नियममालाकालीन गद्य |
| ११ आधुनिक काव्य | १२ नाट्य–नृत्य. |
| १३ साहित्य ( अलंकार ) | १४ शास्त्रीय वाङ्मय |
| १५ परीक्षणात्मक वाङ्मय | १६ निबंधात्मक वाङ्मय. |
| १७ वृत्तपत्रीय | १८ प्रांतिक भाषा. |
| १९ कारवाङ्मय | २० स्त्रीवाङ्मय |

यापैकीं त्या विभागाचा अभ्यास केलेले विद्वान गृहस्थ आढळून आले त्यांस त्या त्या विभागांतील शब्द निवडून पाठविण्यासाठीं विनति करण्यांत आली. या विनंतीस अनेक विद्वान मंडळींनी मान दिला परंतु रामदासी वाङ्मयाच्या एका अधिकारी व्यक्तीस लिहिलें असतां केलेल्या अभावीं नकार दर्शविण्यांत आला व

पडावी म्हणून खटपट करण्यांत आली व त्याबाबद धुळें येथील मंडळीशीं पत्रव्यवहारहि करण्यांत आला पण त्यापासून प्रत्यक्ष कांहीं लाभ न होतां मध्यंतरीं या धातुकोशासंबंधीं चाललेल्या वादविवादांत शब्दकोशाच्या कार्यकर्त्यांविषयीं गैरसमज मात्र पसरविण्यात आला परंतु त्यावेळीं आम्हास वादविवादांत पडून आगीं तेल ओतण्यास सवड नव्हती व इच्छाहि नव्हती म्हणून त्या बाबतींत आम्हीं पूर्णपणें मौन स्वीकारलें होतें. परंतु आतां हें कार्य व धातुकोशाचेंहि कार्य पूर्ण झालें असल्यामुळें त्यासंबंधीं आमची वृत्ति काय होती हें आमच्या ग्राहक व सहानुभूतिक वर्गापुढें तरी स्पष्ट करणें इष्ट आहे व हें कार्य त्यासंबंधीं पुढें दिलेल्या दोन पत्रांवरून होईल अशी आशा धरून त्या पत्रावर कांहींहि विवरण न करितां तीं पत्रें पुढें देत आहे.

श्री

विश्वनाथो विजयते.

राजवाडे संशोधन मंडळ, धुळें.

रा. न. वि. वि.— १०-१-३४.

आपलें तारीख ८ जानेवारीचें पत्र पावलें, पत्रांत आपण दर्शविलेल्या मनोभावनेबद्दल आपला आभारी आहे. राजवाड्यांच्या धातुकोशाविषयीं आपण आपल्या पत्रांत जें लिहिलें आहेत त्याविषयीं थोडा खुलासा करितों. राजवाड्यांनीं जो मराठी धातुकोश तयार केला आहे त्याचे उपयुक्ततेविषयीं व सत्यतेविषयीं महाराष्ट्राची अद्याप अकारणे साशंक वृत्ती आहे. आपला कोश वादग्रस्त विषयान्यतिरिक्त सर्वमान्य व्हावयाचा आहे. ही गोष्ट मनात घेऊन आपण राजवाड्यांचा कोश आपल्या ग्रंथाची पुरवणी म्हणून छापणें इष्ट होणार नाहीं. वास्तविक आपला कोश तयार होत असतां राजवाड्यांनीं त्यांच्या कोशांत दिलेल्या व्युत्पत्ति आपल्या कोशातील प्रत्येक शब्दापुढें देणें युक्त व इष्ट झालें असतें. परंतु ही गोष्ट आता साध्य होणें शक्य नाहीं. शिवाय आपण हातीं घेतलेलें मुख्य काम पुरें झाल्याशिवाय आपणास हा ग्रंथ छापतां येणार नाहीं. धातुकोशाशिवाय, नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें इत्यादींच्या व्युत्पत्ति राजवाड्यांनीं केल्या आहेत. हें प्रकरण धातुकोशाइतकेंच मोठें आहे. याशिवाय धातुकोशासंबंधाचे राजवाड्यांचे दुसरे लेख व अनेक टिपणें आहेत हें सर्व लिखाण आहे तसेंच छापावयाचें आहे. स्वतंत्र ग्रंथरूपानें हे सर्व लिखाण छापणें युक्त आहे अशी आमच्या मंडळाची समजूत आहे नागपुरास रा दाते यांनीं मराठी धातुकोशासंबंधीं ठराव रा. देव मांडणार होते त्यास विरोध केला असें समजलें. राजवाड्यांचें कार्य हें माझें खाजगी नाहीं त्यांत माझा वैयक्तिक लाभ कांहीं नाहीं. हें ध्यानांत घेऊन ठरावास विरोध केला गेला नसता तर बरें झालें असतें. विरोध झाल्यानें कांहीं बिघडत नाहीं. येथें प्रसिद्धीची योजना यशस्वी होणार यांत संदेह नाहीं. आमच्या कार्यास यशप्राप्ती व्हावी अशी सदीच्छा ठेवावी एवढेंच मागणें आहे. कळावें, लोभ असावा.

आपला,

भा. वा. भट.

श्री. भा. वा. भट. धुळें यांसः—

ता. १० । ३ । ३४.

सा. न. वि. वि.

आपलें १० । १ । ३४ चें रा. चिं. ग. कर्वे यांस आलेलें पत्र त्यांनीं मला दाखविलें त्यावरून राजवाडे धातुकोशासंबंधीं आमच्या विचारांबद्दल आपला थोडाफार गैरसमज झाल्यासारखें वाटतें म्हणून हें पत्र लिहीत आहे. कै. राजवाडे यांनीं धातुकोशाचें कार्य आरंभिलें होतें त्यावेळीं ते डेक्कन जिमखान्यावर माझ्या शेजारींच रहात होते. त्यावेळीं त्यासंबंधीं आमचें पुष्कळ बोलणें झालें होतें. त्यावेळीं मी ज्ञानकोशाचें कार्य करीत होतों व जमल्यास ज्ञानकोशमंडळामार्फतच तें काम छापलें जावें अशी आमची इच्छा होती व त्याप्रमाणें मी संपादित असलेल्या विद्यासेवकामध्यें प्रसिद्धहि केलें होतें. पुढें ज्ञानकोशमंडळाशीं माझा असलेला संबंध सुटून मी कांहीं सहकाऱ्यांसह शब्दकोशाचें कार्य सुरू केलें त्यावेळींहि धातुकोश आमच्या दृष्टीआड नव्हता. एवढेंच नव्हे तर आम्ही स्थापित केलेल्या व्युत्पत्तिचर्चामंडळाच्या अनेक बैठकींत त्यातील चिठ्यांचा उपयोग करण्यांत आला होता. कारण त्यावेळीं त्या चिठ्या रा. कुळकर्णी यांजजवळ असून ते येथेंच होते.

आतां शब्दकोश व धातुकोश यांचा संबंध जोडण्याची आमची योजना अशी होती कीं धातुकोशांतील व्युत्पत्तींचा पूर्ण उपयोग शब्दकोशांतील व्युत्पत्ति देताना करावयाचा, मात्र शब्दांच्या शेवटीं संपादकांस मान्य तेवढ्या व्युत्पत्ती द्यावयाच्या, कांहीं तुलनात्मक स्वतंत्र राजवाडे नाव घालून द्यावयाच्या व तशा सध्याच्या कोशांतहि कांहीं ठिकाणीं राजवाडे यांनीं प्रकाशित केलेल्या स्थळांचा उल्लेख करून दिलेल्या आपणांस आढळतील व याखेरीज राजवाड्यांचा धातुकोश सर्वच पुरवणी म्हणून जितकीं अक्षरें कोशात येतील तितक्या अक्षरांचा त्या त्या भागांत छापावयाचा व याच्याच अधिक प्रती ( Off prints ) छापल्या म्हणजे स्वतंत्र धातुकोशाचें पुस्तकहि तयार होईल. सध्या आमच्या प्रस्तावनेचीं स्वतंत्र पुस्तकें आम्ही छापलीं आहेतच. अशा रीतीनें राजवाड्यांच्या ग्रंथांत कोणताहि फेरफार न होतां तो छापला गेलाच असता पण त्याचा शब्दकोशरचनेतहि उपयोग

झाला असता. परंतु आपली इच्छा तशी नव्हती यामुळें शब्द-कोशास त्याचा उपयोग होऊं शकला नाहीं हें मराठी भाषेचें दुर्दैव. राजवाडे धातुकोश स्वतंत्रतेनें केव्हांही छापला गेलाच असता याबद्दल आम्हास कधींच संशय वाटला नाहीं. कारण अशा कामाची आतां आम्हास संवय झाली आहे.

आतां नागपुरास साहित्य संमेलनप्रसंगीं जें झालें त्यासंबंधींहि थोडें लिहिणें आवश्यक दिसतें. आपणांस हें विदितच असेल कीं राजवाडे यांच्या धातुकोशाबद्दलचा ठराव कोल्हापूर येथील साहित्य संमेलनाच्या वेळीं माझे मित्र रा. निजसुरे यांनीं मांडला होता. त्या वेळीं मी संमेलनास, विषयनियामक कमिटीच्या बैठकीस वगैरे सर्वत्र हजर होतों एवढेंच नव्हे तर ठरावाचें लेखन (Drafting) विषयनियामक मंडळीकरिता मींच केलें होतें ही गोष्ट रा. निजसुरे यांस ठाऊक असेल, निदान एक चिटणीस प्रो. पटवर्धन हे या बाबतींत साक्ष देतील. त्यावेळीं जर राजवाडे धातुकोशाबद्दल आमच्या मनात काहीं किंतु असता तर तेथेंहि विरोधाचा सुर निघणें शक्य होतें पण तसें कांहीं झालें नाहीं व तो ठराव विषय नियामक मंडळात व समेलनात विनाविरोध म्हणुन अध्यक्षाकडून मांडला गेला व पासहि झाला

आतां त्याच विषयावर पुन्हां दुसऱ्याच वर्षी ठराव मांडण्याची जेव्हा विषयनियामक मंडळींत रा. देव यांनीं प्रस्तावना केली तेव्हां तत्वत. अशा एकच प्रश्नाबद्दल संमेलनात ठराव दरवर्षी करणें साहित्यसंमेलनाच्या दृष्टीनें ठीक नव्हे. यामुळें पुढेंपुढें त्रास होईल व अनवस्था प्रसंग येईल व अनेकांना नाराज करावें लागेल असें मी आपलें मत मांडलें यात काहीं गैर झालें असेल असें मला अद्यापहि वाटत नाहीं व ही विचारसरणी रा. देव यांसहि पटली व त्यांनीं ठराव पुढें मांडला नाहीं व संमेलनातील आपल्या भाषणातहि(साहित्यपरिषदेस मदत करण्यासंबंधींच्या) या गोष्टीचा उल्लेख करून माझें मत त्यास रास्त वाटल्याचें बोलून दाखविलें. या प्रकारचा ठराव त्याच बैठकींत एवढाच नव्हता दुसरा टिळक-विद्यापीठास मदत करण्यासंबंधींचा होता व तोहि याच मुद्यावर संमेलनात मांडूं नये असें सर्वानुमतें ठरलें आता रा. राजवाडे किंवा लो टिळक यांची योग्यता यामुळें कोणास कमी वाटते असें त्यावेळीं कोणासच वाटलें नाहीं व त्यांच्या कार्यास समेलनाच्या एखाद्या ठरावानें काहीं विशेष बळ येईल असेंहि नाहीं. शिवाय या सर्व गोष्टी विषयनियामक मंडळींत झाल्या, संमेलनात नव्हे, व समजा, रा देव यास जर ठराव मांडावयाचाच असता तर त्यांच्या सारख्या वक्तृत्वसंपन्न व महाराष्ट्रास पूज्य व परिचित अशा व्यक्तीपुढें माझी दाद कधींच लागली नसती हें मला ठाऊक आहे व त्यांनीं तशी इच्छा प्रदर्शित केली असती तर विषय नियामक मंडळातहि ठरावास विरुद्ध मत देण्याइतका विरोध मी दाखविला नसता मग संमेलनात विरोध करण्याची गोष्टच नको. आणि मीहि त्यांस 'आमच्या धांगुलपणाचा अधिक फायदा घेऊं नये' या शब्दानींच ठराव न मांडण्याबद्दल सुचविलें.

राजवाडे यांचा धातुकोश आपण प्रसिद्ध करणार व तो होणार यांत संदेह नाहीं याबद्दल आम्हालाहि आपल्याप्रमाणेंच आनंद आहे. मात्र मराठी भाषेंत होणाऱ्या शब्दकोशास त्याचा उपयोग झाला असता तर आपल्या भाषेच्या दृष्टीनें तें अधिक चांगलें झालें असतें असें आम्हास वाटतें व तसें अजूनहि वाटते आपला कोश प्रसिद्ध झाल्यावर अर्थात् राहिलेल्या भागासाठीं तो आम्हास उपयोगांत आणतां येईलच व तो सहज थोड्या किंमतींत घेऊनहि करता येईल. त्याकरिता तो छापण्याची जबाबदारी आमचेवरची गेली यांत आमचें नुकसान कांहींच झालें नाहीं नुकसान कोणाचें झालें असेल तर महाराष्ट्र भाषेच्या शब्दकोशाचें व त्याचा उपयोग करणारांचें. त्यांत हर्षविषाद आम्हास कांहींच नाहीं.

असो, आपण लिहिलेल्या माझ्या विरोधाचा व धातुकोशासंबंधीं माझ्या वृत्तीचा थोडक्यात अल्पमतीनें जो खुलासा करतां आला तो केला आहे. यानें जें आपलें समाधान होईल तें होईल. यापेक्षा अधिक लिहिण्याचें प्रयोजन दिसत नाहीं असो, लोभ असावा हें विनंति

आमच्या फिरतींत पुढें मुक्कामीं आलों असतां आपली समक्ष भेट घेण्याची इच्छा होती परंतु आपण औंध येथें गेल्यामुळें भेटीचा योग आला नाहीं. असो.

आपला
य. रा दाते

या राजवाडे धातुकोशाच्या कच्च्या चिठ्ठयावरून श्री कृ पां. कुळकर्णी हे पुणें येथें धातुकोशाचें संपादन करीत असतांना आमच्या मंडळातील श्री कर्वे यांना मदतीला घेण्याचा त्यांचा विचार होता व त्याप्रमाणें त्यांनीं धुळ्यास विचारलेंहि होतें, पण संमति मिळाली नाहीं, असें समजलें असो, याप्रमाणें महाराष्ट्र शब्दकोशाच्या कामात कै राजवाड्यांच्या लिखाणाचा जो सहजा सहजीं फायदा मिळावयाचा तो मिळूं शकला नाहीं पण याबद्दल आमचें मंडळ कर्में दोषी नाहीं हें वरील मजकुरावरून समजून येईलच वरील पत्रास उत्तरहि आलें नाहीं मात्र धातुकोश खपविण्याकरिता महाराष्ट्रांतील ग्राहक होण्यासारख्या गृहस्थाची यादी करण्याकरितां रा. विश्वनाथराव जावडेकर पुणें येथें आमच्याकडे आले व आमच्या ग्राहकांची यादी जी सहसा कोणी धंदेवाईक दाखवीत नाहीं ती, आम्ही त्यास दिली व त्यावेळीं त्यास वरील पत्रेंहि दाखविलीं व त्यांनीं त्या बाबतींत आपलें समाधान झाल्याचें बोलून दाखविलें. असो.

**प्रतिलेखन**—याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर शब्दपत्रिकांची वर्णानुक्रम रचना करून प्रत्यक्ष मुद्रणप्रत लेखनाची तयारी केली व पुढें दिल्याप्रमाणें पद्धती अनुसरली.

सर्व संपादकांनीं एका टेबलाभोंवतीं बसून समोर शब्दपत्रिका व अनेक कोश ठेवावयाचे व एका शब्दाच्या सर्व पत्रिका वाचून त्याचें व्याकरण, शक्य ते सर्व अर्थ व व्युत्पत्ति निश्चित करावयाची व निरनिराळ्या अर्थांकरितां अगदीं साधे सरळ अर्थ शोधून शक्य तितकीं अवतरणें धुंडाळावयाचीं. कांहीं अवतरणें शब्दपत्रिकांवर असत, नसतील तेथें आपल्या वाचनाचा अगर पठणाचा अवलंब करून प्रत्येक संपादकानें योग्य व शक्य तीं अवतरणें सुचवावयाचीं व त्यांतून जुन्यांत जुनीं, अधिक परिचित, विशेष सुलभ अशा तऱ्हेच्या अनुक्रमानें निवडून यावयाचीं.

शब्दाचे निरनिराळे अर्थ निश्चित करताना जरूर तेथें चर्चा करून संदर्भग्रंथ पाहून सर्वानुमतें योग्य वाटतील ते अर्थ योग्य शब्दात नमूद करावयाचे, अशा तऱ्हेची क्रिया करावयाची असे. संपादक मग याप्रमाणें सर्व क्रियांशीं परिचित होऊन आपआपलें कार्य करण्यास जसजसा अधिकाधिक कार्यक्षम होऊं लागला तसतसे त्यास कांहीं पदवीधर मदतनीस देण्यांत आले व प्रत्येक संपादक आपले मदतनीस घेऊन स्वतंत्रपणें प्रतिलेखनाचें कार्य करूं लागला व अशा पद्धतीनें मुद्रणाची कच्ची प्रत तयार करण्यात आली.

**प्रत तपासणी**—प्रारंभीं मुद्रणाची कच्ची प्रत तयार करण्यात आल्यावर तिच्या नागरी टंक (टाइपरायटर) यंत्रानें चार प्रती तयार करण्यात येऊन त्या चार गृहस्थास तपासण्याकरितां देण्यात येऊं लागल्या. यापैकीं कांहीं गृहस्थ बाहेरगांवींहि राहणारे असत या प्रती निरनिराळ्या गृहस्थांकडून तपासून आल्यावर संपादकानें त्यांतील दुरुस्ती, सूचना, शंका वगैरेचा विचार करून व सर्वांचा योग्य तो परामर्ष घेऊन शेवटची प्रत तयार करावयाची असा क्रम ठेवला. जोंपर्यंत मंडळाबाहेरचे गृहस्थ तपासावयास मिळूं शकले तोंपर्यंत हा क्रम अव्याहत चालू ठेवला.

**मुद्रण**—सुमारें सर्व स्वराचे शब्द लिहून झाल्यावर मुद्रण करावयास प्रारंभ करावयाचें ठरविलें व कांहीं भाग प्रेसकडे पाठविला व फक्त पहिलीं आठ पृष्ठें जुळण्यास सांगितलीं. जुळणी शुद्ध व्हावी, जुळारी तरबेज व्हावे व पाहिजे तितकी दुरुस्ती करणें शक्य व्हावें म्हणून स्वतःचा टाइप वगैरे विकत घेऊन 'शारदा प्रेस' नावाचा छापखाना काढला; पण छापण्याच्या यंत्रांत रकम फार गुंतून राहते व एका यंत्रास केवळ शब्दकोशाचें काम पुरें पडणार नाहीं म्हणून दुसऱ्या छापखान्यांत छापून घ्यावयाची योजना केली.

पहिलीं आठ पृष्ठें छापून झाल्यावर सुमारें १०० अभ्यासू विद्वान् गृहस्थांकडे पाठवून त्यांच्या सूचना मागविल्या व पुण्यांतील कांहीं गृहस्थांस मुद्दाम पाचारण करून त्यांजबरोबर चर्चा करून योग्य त्या सूचनांचा स्वीकार करून कोश छापण्याच्या पद्धतीचा निश्चय करण्यांत आला व कामास सुरवात करण्यांत आली.

शब्दकोशाच्या शब्दपत्रिका लिहिणें, त्या तपासणें, शब्दपत्रिकांवरून कच्ची प्रत तयार करतांना करावयाच्या कृती, उदाहरणार्थ व्याकरणसंज्ञा, अर्थनिश्चिति व अर्थांचा क्रम लावणें, अवतरणांची निवड करणें, व्युत्पत्ति देत असतां भाषांचा क्रम लिहिणें वगैरेसंबंधीं वेळोवेळीं योग्य त्या सूचना लेखक व संपादकवर्गास देण्यांत येत असत व सर्व कार्य सुसंगत रीतीनें चालावें व एकपद्धति सर्वत्र अंगीकारली जावी म्हणून अशा सूचना वेगवेगळ्या लिहून त्या सर्व लेखकास दिल्या जात आणि कार्यालयांत प्रमुख ठिकाणीं फलकांवर लावून ठेवलेल्या असत.

याप्रमाणें मुद्रणप्रतीचा कांहीं भाग तयार करून छापावयास सुरवात झाली तरी शब्दसंकलनाचें वगैरे कार्य चालूच होतें व प्रत्यक्ष मजकूर छापला जाईपर्यंत नवीन शब्द, अर्थ, अगर योग्य अवतरण सांपडल्यास त्याचा अंतर्भाव करण्यांत येत असे. प्रत्यक्ष शब्द छापून झाल्यानंतर उपलब्ध झालेली माहिती अगर शब्द पत्रिका यांचा पुरवणीकरितां संग्रह करून ठेवण्यांत येत असे.

शब्दकोशाच्या अंतरंगासंबंधीं व धोरणासंबंधीं कांहीं गोष्टींचा वर उल्लेख आलाच आहे. याशिवाय कांहीं बाबींचें स्पष्टीकरण करणें जरूर आहे म्हणजे तें निदान पुढील कार्यकर्त्यांस उपयुक्त होईल.

**परकीय शब्द**—कोणत्याहि जिवंत, चालू व वाढत्या भाषेचा कोश करावयाचा म्हणजे त्या भाषेतील शब्द जमविण्यास कितीहि वेळ दिला तरी तो अपुराच पडणार हें प्रत्येक कोशकाराच्या अनुभवास येतें व आम्हांस तर आमच्या ग्राहकांचा विश्वास कायम ठेवावयाचा तर या कार्यास कांहीं तरी मर्यादा घालणें अवश्यच होतें; यारीतीं मागें वर्णिल्याप्रमाणें शक्य ते प्रयत्न करून शब्द जमविण्याचें कार्य अव्याहतपणें चालू ठेवलें तरी सुमारें ४ वर्षांनंतर या कार्याकडील लक्ष्य कमी करून तें पुढील कार्याकडे देणें अवश्य झालें. त्यामुळें तेवढ्यांत मुख्यतः जें शब्दसंकलन झालें त्यावर सुरवात करावी लागली व पुढें हें कार्य तुरळक स्वरूपात झालें. त्यामुळें कांहीं शब्द घ्यावयाचे राहिले असणें शक्य आहे. शब्दसंकलन करीत असतां मराठी

भाषेंत शिरलेल्या परकीय शब्दांचा समावेश कितपत करावा हा मोठा महत्त्वाचा प्रश्न पुढें उभा राहिला. मराठी भाषेंत मूळ संस्कृत तत्सम शब्द, तद्भव शब्द व येथील मूळ कांहीं देश्य शब्द हे आद्य घटक होत. पण याखेरीज महाराष्ट्रीय लोकांचा ज्या अनेकभाषाभाषी लोकांशीं संबंध आला त्यांनीं अनेक शब्द या भाषेंत रूढ केले आहेत; त्यांपैकीं मुख्य म्हणजे अरबी, फारसी, उर्दू, पोर्तुगीज, फ्रेंच, इंग्रजी या परकीय व कानडी, तेलगू वगैरे द्राविड तशाच गुजराती, हिंदी वगैरे देश्य भाषा या होत.

यांपैकीं कानडी, तेलगू वगैरे भाषांतील बरेच शब्द आत्मसात् होऊन गेले आहेत, गुजराती, हिंदी फारसे नाहींत पण अरबी, फारसी व उर्दू या भाषांची छाप दीर्घकाल पडून शासन शाखासारखे कांहीं प्रांत तर त्यांनीं बरेचसे बळकावले आहेत. तसेंच पोर्तुगीज व फ्रेंच शब्दांचा प्रवेश जरी पूर्वी झाला असला तरी आज बंद झाला आहे. परंतु इंग्रजीचें आक्रमण भरमसाटपणें चालू आहे. तेव्हां या बाबतींत विवेक करणें प्राप्त आहे. अशा वेळीं भाषाशुद्धि करणाऱ्याची भूमिका स्वीकारून सर्व परकीय किंवा परसंभव शब्दांचें एकमहा निष्कासन करावयाचें किंवा कांहीं मध्यम मार्ग आचरावयाचा हा प्रश्न संपादकांपुढें पडला व अखेरीस कोशकाराचें कार्य हें संग्राहकाचें कार्य असून भाषाशुद्धिकाराचें नव्हे, तेव्हां संग्रह करतांना तरी मराठी वाङ्मयांत आढळणाऱ्या सर्व शब्दांच्या पत्रिका करण्यांत याव्यात. त्या अवस्थेंत तरी त्यांत गाळागाळी करूं नये असें धोरण प्रथम ठरविण्यात आलें. अर्थात् जे परकीय शब्द संग्रहीत करण्यात आले ते मराठी ग्रंथांतूनच निवडण्यांत आले होते. वर्तमानपत्रें वगैरे चालचलाऊ वाङ्मयांतून नव्हे ही गोष्ट येथें नमूद करणें जरूर आहे.

यानंतर फारसी, अरबी, उर्दू वगैरे भाषांतून आलेले शब्द जे अत्यंत रूढ होऊन गेले आहेत किंवा जुना पत्रव्यवहार, बखरी, दस्तऐवज, कागदपत्र वगैरेमध्यें आढळतात त्याचा शुद्ध अगर अपभ्रष्ट ज्या स्वरूपात ते आढळतील त्या स्वरूपात संग्रह करून कोशात अंतर्भाव करावयाचा असें ठरविलें. कानडी, तेलगू व तद्भव शब्द तर आत्मसात् झालेच होते. पोर्तुगीज, फ्रेंच वगैरे भाषांतील शब्दहि ऐतिहासिक कालातच रूढ होऊन बहुतेक अपभ्रष्ट स्वरूपांत, भाषेंत मिसळून गेले होते. इंग्रजी शब्दांच्या बाबतींत मात्र जरी संग्रह करतांना सढळ हात ठेवला होता तरी प्रत्यक्ष कोशात घालतांना बरीच काटाकाट करण्यांत आली व दुसऱ्या विभागापासून पुढें तर अगदींच आत्मसात् झालेले तेवढेच शब्द फार अल्प प्रमाणांत घेण्याचें ठरविण्यांत आलें.

म्हणी—म्हणींचा संग्रह जरी विस्तृत प्रमाणांत करण्यांत आला तरी विशिष्ट शब्दांचा विशेष अर्थ देण्याच्या कामीं उदाहरणादाखल जेथें उपयोग झाला तेथेंच म्हणींचा अंतर्भाव कोशांत झाला; पण साऱ्या 'अती राग भीक माग.' 'भटो लग्न करा तर म्हणे तुम्हीच वाढील व्हा.' 'राजाला दिवाळी माहीतच नाहीं.' अशा प्रकारच्या म्हणी प्रत्यक्ष कोशांत अंतर्भूत झाल्या नाहींत. याकरितां जमलेल्या साहित्यांत भर घालून म्हणींचा व वाक्संप्रदायांचा एक स्वतंत्र कोश करावयाचा विचार आहे.

अवतरणें—अवतरणें कोणत्या क्रमानें व किती द्यावयाचीं याबद्दलहि निश्चित पद्धति अंमलांत आणतां आली नाहीं. अवतरणें कालानुक्रमें द्यावयाचीं तर विशेषतः मध्यकालीन पद्य वाङ्मयांत अनेक शब्दांस ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, दासोपंत, श्रीधर वगैरे अनेक कवींचीं तुल्यबल अवतरणें आढळून येत त्यांत निवड करणें कठीण होऊं लागलें. सर्वांत प्राचीन यानें तर ज्ञानेश्वर, महानुभावी अवतरणेंच फार येऊन पुढील कवींचीं अवतरणें मागें ठेवावीं लागतीं; तेव्हां त्यांतल्या त्यांत जुनें पण शक्यतर अधिक परिचित अवतरण प्रथम द्यावयाचें व नंतर इतर द्यावयाचीं असें धोरण ठेवलें. पहिल्या भागांत एकाच अर्थास एकाहून अधिकहि अवतरणें देण्याचा क्रम स्वीकारला, पण त्यामुळें पृष्ठसंख्या फारच आटोक्याबाहेर जाईल असें दिसूं लागलें. २५०० पृष्ठांचा अजमास होता तो ३००० वर जाणार हें तर शब्दसंख्येवरूनच दिसूं लागलें, परंतु अवतरणें भरपूर दिल्यास ५००० संख्याहि कमी पडेल असें वाटूं लागलें. तेव्हां एकापेक्षा अधिक अवतरणें देण्याचें धोरण कमी केलें, जमविलेलीं अवतरणें तर शक्यतों द्यावयाचीं हें धोरण ठेवलें पण जेथें एक अवतरण असेल तेथेंहि शोधून शोधून अधिक अवतरणें घालावयाचें धोरण कमी केलें.

पृष्ठसंख्येप्रमाणें कालमर्यादेकडेहि पाहणें अवश्य होतें. संकल्पित ५ ते ७ वर्षांपेक्षा तीन वर्षें अधिक लागलीं. यापेक्षां अधिक काल या कार्यास दिला असता तर आमचा ग्राहकवर्ग अधिकच अधीर झाला असता असें दिसूं लागलें. यामुळें सामान्यतः तिसऱ्या भागानंतर अवतरणांच्या बाबतींत हात आंखडता घ्यावा लागला.

अवतरणें देण्याच्या बाबतींत दुसरी एक महत्त्वाची गोष्ट लक्ष्यात घ्यावी लागते ती म्हणजे ज्या ग्रंथातील अवतरण द्यावयाचें त्याची संशोधनपूर्वक पाठशुद्ध आवृत्ति उपलब्ध असावी लागते पण मराठीमध्यें ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाचीहि संशोधनपूर्वक शुद्ध पाठाची आवृत्ति अद्यापि तयार झाली नाहीं मग तुकाराम, मोरोपंत, वामन किंवा इतर कवींची काय कथा?

ज्ञानेश्वरींतील अवतरणें देतानाहि राजवाडेप्रत, माडगांवकरप्रत, वेंकटस्वामीप्रत वगैरेमध्यें पाठभेद दिसून आल्यामुळें त्या प्रतींचा निर्देश करून कांहीं अवतरणें दिलीं आहेत

तसेंच बखरी व ऐतिहासिक कागदपत्रांत वाचनाच्या अशुद्ध्या आढळतात उदा० नाहकबद्दल जाहला, सानकबद्दल साजक वगैरे त्यामुळें फारच घोंटाळा होतो या बाबतींतहि संशोधकांनीं लक्ष्य दिलें पाहिजे

काहीं काव्यग्रंथांत तळटीपांत चुकीचे अर्थ दिल्यामुळेंहि कोशकाराची अनेक ठिकाणीं दिशाभूल होण्याचा संभव असतो

**व्युत्पत्ति**—व्युत्पत्तीच्या बाबतींत आम्हीं काय प्रयत्न केले ते पूर्वी सांगितलेच आहेत या कामीं जेवढा वेळ द्यावा व जितें साहाय्य घ्यावें तितकें थोडेंच आहे त्यामुळें या बाबतींत समाधानकारक परिश्रम झाला नाहीं शक्य तो केला आहे संस्कृत शब्द मराठींत कोणत्या पायऱ्यांनी आला हें दाखविणें अवश्य आहे पण तें तितकेंच वादग्रस्त होण्याचा संभव आहे व केवळ कोशकार म्हणून केवळ अनुमान धपक्यावर व्युत्पत्ति ठोकून देणें रास्त नव्हे, या विषयाचा विशेषतः प्राकृत भाषांचा अभ्यास अधिक झाल्याशिवाय मधील टप्प्याचा निश्चय करणें सुलभ नाहीं तेव्हां चुकीचें लिहिण्यापेक्षा न लिहिणें बरें असें समजून व्युत्पत्ति साग्र न देतां फक्त दिग्दर्शित केल्या आहेत फारसी व अरबी व्युत्पत्ति देतानाहि अनेक शब्द मूळ अरबी असून फारसीमार्फत मराठींत आले आहेत ते केवळ फारसी म्हणून न देतां त्यांची मूळ अरबी व्युत्पत्ति दिली पाहिजे कारण शुद्ध फारसी भाषा ही संस्कृतची बहिण—अवेस्तापल्हवी मार्फत—असल्यामुळें शुद्ध फारसी व संस्कृत शब्दांत धातुसाम्य आढळतें तसें अरबींतून फारसींत आलेल्या शब्दांत नसतें या बाबतींत फारसी कोशाचाहि व्हावा तितका उपयोग होत नाहीं संस्कृत जाणणारे फारसीचे व अरबीचे अभ्यासक उत्पन्न होतील तेव्हां याकामीं अधिक संशोधन होऊन ही शाखा पूर्णत्वास येईल व्युत्पत्तिसंशोधन हें एकट्यादुकट्या व्यक्तीचें कार्य नसून त्यास अनेक संशोधक अभ्यासकांचें साहाय्य होईल तरच तें विचारांत घेण्यासारखें होईल, असो

वास्तविक कोशामध्यें प्रत्येक शब्दाचा इतिहास दिला गेला पाहिजे ही जी कोशाच्या परिपूर्णतेची कल्पना ती साध्य व्हावयास आपल्यास अजून पुष्कळच वाट पहावी लागेल असें दिसतें

**उच्चारचिन्हें**—याशिवाय तालव्य व दंत्यतालव्य च वर्ग, शब्दावरील जोरामुळें उच्चाराचें दीर्घीकरण वगैरे बाबतींत शब्दांचे उच्चार स्पष्ट कळण्यासाठीं उच्चार देणें कोशांत अवश्य असतें पण तेंहि छापण्याच्या कामीं योग्य साधनाभावीं करतां आलें नाहीं

काहीं विद्वानांचें म्हणणें असें असतें कीं शब्द शुद्ध स्वरूपांत तेवढेच कोशांत अंतर्भूत करावे अपभ्रष्ट रूपें देऊं नये परंतु शब्दकोश रचनेचें शास्त्र काय यासंबंधीं पहिल्या विभागाच्या प्रस्तावनेंत आम्ही विवेचन केलेंच आहे (पृ २६–२७) कोशकाराचें काम केवळ अभिजात शब्द देणें हें नसून 'कोश म्हणजे केवळ भाषेंतील शब्दांचा संग्रह असावा' हें डीन ट्रेंच यांचें म्हणणेंच आज सर्वमान्य झालें आहे त्यामुळें भिन्न रूपांतहि शब्द दिल्यास पाहणाऱ्यास सुलभ होतें मात्र तो शिष्ट कीं अशिष्ट, शुद्ध कीं अशुद्ध वगैरे दिग्दर्शित केलें म्हणजे झालें

**पुरवणी**—शब्दसंकलन कितीहि कसोशीनें केलें तरी जोंपर्यंत सर्व मराठी बोलणाऱ्यांमध्यें या कामासंबंधीं आस्था उत्पन्न होत नाहीं तोंपर्यंत प्रांतिकशब्द, बोलींतील शब्द व काव्य वाङ्मयांतील शब्द संपूर्णतया संकलित होणें शक्य नाहीं, त्यामुळें काहीं शब्द राहिले असणें शक्य आहे काहीं आम्हीं पुरवणीकरितां जमविले आहेत तथापि आणखी काहीं दिवस प्रयत्न झाल्यास नष्ट होण्याच्या मार्गास लागलेले हे शब्द संकलित होणें शक्य आहे तसेंच निरनिराळ्या ग्रामभाषांचे कोश झाल्यास हें कार्य अधिक सुलभ होईल

आतां कोणी म्हणेल कीं हीं प्राथमिक कार्यें झाल्याशिवाय आधीं शब्दकोश तयार करावयास कां घेतला? तर त्यास उत्तर एवढेंच देतां येईल कीं, सामान्यतः भाषेंतील सर्व शब्द देणाऱ्या कोशाची जरूर आज पन्नास वर्षांपासून लोकांस वाटत आली आहे व ती आजपर्यंत मोठमोठ्या लोकांनीं प्रयत्न करूनहि पूर्ण झाली नाहीं उदाहरणार्थ रा सा विश्वनाथ नारायण मंडलीक यांनीं सरकारच्या साहाय्यानें एक कोश करण्याचा प्रयत्न केला होता त्याप्रमाणेंच लो टिळक यांचे स्नेही रा माधवराव नामजोशी यांनी एक प्रयत्न केला होता पण हे दोन्ही प्रयत्न दृश्य स्वरूपास पोंचले नाहींत आज आमच्याजवळ ज्ञानकोशामुळें एक कार्य करणाऱ्यांचा निदान संच तरी होता व हीं कामें एकट्यादुकट्या व्यक्तींचीं नाहींत तेव्हां आज संपूर्ण मिळत नाहीं म्हणून मजीबात काहींच न करण्यापेक्षा शक्य तेवढें करावें व या संचाचा फायदा घ्यावा म्हणून हें कार्य यावेळीं हातीं घेण्यात आलें नाहीं तर या पिढींत तरी हें झालें नसतें व जो तो केवळ व्हावें म्हणून म्हणत असतो पण प्रत्यक्ष करावयास पुढें कोणीच होत नाहीं ते आम्ही पाहतों एवढेंच आम्हीं कोश करावयास घेतला त्यावेळीं ज्ञानेश्वरीचा एक स्वतंत्र कोश आम्ही करीत आहों असें एक मुंबईचे प्रोफेसर मजजवळ म्हणाले होते, परंतु त्याचा अद्यापि कोठें मागमूस दिसत नाहीं असो

मुद्रिताची तपासणी कितीहि कसोशीनें केली तरी काहीं मुद्रणदोष राहणें अपरिहार्य आहे; तसे ते या कोशांतहि राहिले असले पाहिजेत तथापि आजच घाईनें शुद्धिपत्र काढण्यापेक्षा काहीं दिवस जाऊं देऊन पुरवणीबरोबरच शुद्धिपत्र काढल्यास तें अधिक उपयुक्त होईल असें वाटून आजच शुद्धिपत्र जोडलें नाहीं

**आर्थिक बाजू**—१ एप्रिल १९२८ या दिवशीं आम्ही ज्ञानकोश मंडळ सोडून बाहेर पडलों प्रारंभीं रा दाते, रा कर्वे,

रा. चांदोरकर व रा. टिळक अशी मंडळी एकत्र येऊन नवीन कार्याची योजना करावयाची असें घाटत होतें व त्याप्रमाणें केसरी मध्यें जाहीरहि केलें होतें. यावेळीं ज्ञानकोशमंडळाच्या पुनर्घट नेच्या वाटाघाटी चालूच होत्या. त्यामध्यें येथें खोलांत शिरण्याचें कारण नाहीं. ज्ञानकोश मंडळाचा किंबहुना ज्ञानकोश रचनेचा इतिहास जरी लिहिला गेला असला तरी अलिखित वृत्तांतहि मोठा आहे पण तो लिहिण्याचें हें स्थान नव्हे. असो, आम्हीं वर लिहिल्याप्रमाणें १ एप्रिल रोजीं ज्ञानकोशमंडळांतून निघालों व शब्दकोशाच्या कार्यास लागलों. परंतु ज्ञानकोशमंडळाची निरवा-निरव करण्यास रा. टिळक यांची अवश्यकता असल्यामुळें ते पुन्हां तिकडेच राहिले व रा. दातार हे आमच्याकडे आले व हळूहळू ज्ञानकोशांतील इतरहि कांहीं मंडळी जरूर तशी आम्हीं लावून घेतली.

ज्ञानकोशमंडळांतून बाहेर पडलों त्यावेळीं किंवा त्यापूर्वी वेळेवर व पुर्ण असा पगार कोणासच कधींच मिळत नसे, त्यामुळें यावेळींहि कोणाजवळ एका पगाराचेहि पैसे नव्हते. तेव्हां शक्य तेवढ्या कमी खर्चात काम करावयाचें ठरविलें व लागलीच शब्द कोशाची योजना तयार असल्यामुळें भावी कंपनीचे भागीदार मिळविणें व ग्राहक मिळविण्याचें कार्य सुरू केलें.

प्रथम कार्य फारसें नसल्यामुळें आम्हीं चालविलेल्या सर स्वती मंदिर संस्थेतच कचेरीचें काम करीत असूं; त्यामुळें भाड्याचाहि खर्च नसे. व ज्ञानकोशमंडळाचीच जागा सरस्वती-मंदिर संस्थेनें घेतल्यामुळें त्याच जागेंत काम करण्यास मिळे पुढें काम वाढल्यावर कांहीं दिवसांनीं प्रथम एक व नंतर दोन अशा खोल्या तेथेंच भाड्यानें घेण्यांत आल्या व मुद्रणप्रत तयार होईपर्यंत त्याच जागेंत काम चालविलें. पुढें मुद्रणाच्या सोईकरितां जमखंडीकराच्या वाड्यात कचेरी आणण्यांत आली व स्वतः कंपोज करून गणेश प्रिंटिंग छापखान्यात पहिले दोन भाग छापून घेतले; पण त्यात दिरंगाई फार होऊं लागल्यामुळें छापण्याचें काम दुसरीकडे यावें लागलें व गणेश प्रिंटिंगला ती जागा पाहिजे असल्यामुळें त्यांनीं आम्हास नोटीस दिली तेव्हां तेथें सोईस्कर जागा नव्हती म्हणून पूर्वीच्या ज्ञान कोशाच्या जागेंत म्हणजे शनवार वाड्याजवळील फुटक्या बुरजाजवळच्या मोतीवाल्याच्या वाड्यात कचेरी आणण्यांत आली व ती आजतागायत तेथेंच आहे. या एकंदर प्रकारात जागाभाड्याचा खर्च मंडळीस फारच अल्प प्रमाणात करावा लागला.

कितीहि कमी खर्च करावयाचा म्हटला तरी कांहीं तरी खर्च करावा लागतोच व तो भागविण्याकरिता भागीदार व ग्राहक मिळविण्याचें काम सर्वांनीं सतत नेटानें चालविलें होतें व पहिल्याच भागवाटणींत ८६७ भाग वाटले गेले, हें पूर्वी सांगितलेंच आहे. आम्हां प्रथम चार कार्यकर्त्यांबाहेरचे पहिले भागीदार म्हणजे येथील कंत्राटदार रा. कृष्णाजी रावजी साठे हे होत. हे ताबडतोब भागीदार झाले एवढेंच नव्हे तर त्यांनीं भागाचे सर्व (२५) रुपये एकदम देऊन टाकले. यामुळें जनतेचा आमच्यावर किती विश्वास आहे हें आम्हांस कळून येऊन काम करण्यास फार उत्तेजन मिळालें. त्याप्रमाणेंच प्रथम सहकारी तत्त्वावर मंडळ नोंदावयाचें म्हणून खटपट करण्यांत वेळ गेला व नंतर कंपनीच्या कायद्याप्रमाणें नोंदण्यांत येऊन कार्यारंभास परवानगी जानेवारी १९२९ मध्यें मिळाली. याप्रमाणें मध्यंतरीं बराच वेळ गेला तरी कोणीहि त्याबद्दल कुरकुर अगर टीका केलेली आमचे कानीं आली नाहीं. अर्थात् ग्राहक मिळविण्याबरोबरच शब्द गोळा करण्याचें आमचें काम चालूच होतें व प्रचारकार्याची, कोशकार्याची वगैरे माहिती दर तीन महिन्यांनीं साधारणतः केसरी वगैरे पत्रांत देण्यांत येत असे. त्यामुळें आमच्या ग्राहक वर्गास कार्याची प्रगति कळून येत असे.

**चालक**—मंडळ नोंदावयाचें तेव्हां प्रथमचा चालक वर्ग पुणें येथीलच व काम लागलें असतां सहज भेटण्यासारखा असाच नेमण्यांत आला. पहिले चालक, संपादक वर्गापैकीं रा. दाते, रा. कर्वे व रा. आबा चांदोरकर हे असून बाहेरचे रा. ल. बा. कोल्हटकर, रा. द. गो. फडके, रा. वि. वि. काणे व रा. रा. रा. करंदीकर. हे होते. बाहेरच्यांपैकीं पहिले दोघे आम्हीं स्थापन केलेल्या सरस्वतीमंदिर संस्थेच्या सभासदांपैकींच आमचे सहकारी होते. रा. काणे हे एक परिचित इंजिनिअर व कंत्राटदार होते व रा. करंदीकर हे धारवाडचे पण आमच्या ज्ञानकोश सहकाऱ्यांपैकींच होते. याप्रमाणें कार्याची योजना, कंपनीची घटना वगैरे होऊन कार्यास रीतसर प्रारंभ झाला व लवकरच त्याची प्रगतीहि समाधानकारकपणें होऊं लागली.

यानंतर कंपनीच्या चालक वर्गांत पुढील मंडळी त्यांची संमति मिळवून घेण्यात आली. व त्यांनीं आम्हास सर्व बाब-तींत फार मदत केली यावद्दल त्यांचे येथें आभार मानणें अवश्य आहे.

श्री. माधवराव विनायकराव किबे, श्री. पाडुरंग केशव शिराळकर, श्री. मा. ग. बावडेकर, श्री. सरदार राजाराम जनार्दन पोतनीस, व श्री. विश्वनाथ नारायण जोग.

**प्रचार**—ज्ञानकोशाचें काम करीत असताहि वारंवार पैशाची अडचण पडत असे त्यामुळें संपादक वर्गासहि वरचेवर प्रचारा-करितां बाहेर पडावें लागे त्यामुळें प्रचार कार्याबद्दल अनेक सुशिक्षित लोकांत जी साशंक वृत्ति दिसून येते ती आमच्या

बाबतींत अजीबात नाहींशी झाली होती व सर्व महाराष्ट्रभर प्रवास झाल्यामुळें अनेक ठिकाणीं आधींच ओळखी झाल्या होत्या. अनेक ठिकाणीं व्याख्यानें वगैरे दिल्यामुळें आदरहि उत्पन्न झाला होता व ज्ञानकोशाचें कार्य पूर्ण केल्यानंतर हें कार्य सुरू केल्यामुळें लोकांमध्यें विश्वास उत्पन्न झाला होता व डॉ. केतकरांबद्दल जो कांहीं लोकांत प्रतिकूल ग्रह उत्पन्न झालेला होता तो आम्ही त्यापासून स्वतंत्र झाल्यामुळें आम्हांस बाधक झाला नाहीं. तसेंच सर्वच संपादक वर्ग आळीपाळीनें प्रचारा करितां बाहेर पडत असल्यामुळें प्रचाराचें काम वाटलें गेलें व कोणाहि एकावर बोजा पडला नाहीं.

याशिवाय महत्त्वाची गोष्ट म्हणजे शब्दकोशाकरितां शब्द संकलनाचें कार्य करावयाचें होतें. विशेषतः प्रांतिक व बोलींतील शब्द निरनिराळ्या ठिकाणाहून जमवावयाचे होते, त्याकरितां प्रवास करणें आवश्यक होतें; तेव्हां शब्द व ग्राहक दोन्हीहि जमविण्याचें कार्य त्याच परिश्रमात होऊं शकलें, व पुढें मुद्रण कार्य सुरू झाल्यावर येथें कचेरींत अधिक काम पडूं लागणार तेव्हां त्यावेळीं प्रचारास वेळ मिळणार नाहीं याकरितां हें काम त्यापूर्वीच करणें आवश्यक होतें त्यामुळें खरोखर पहिल्या तीन वर्षांत प्रचाराचें काम पुष्कळच झालें, हें पुढें दिलेल्या ग्राहक सख्येवरून कळून येईल.

| | | | |
|---|---|---|---|
| पहिल्या | वर्षाच्या | अखेरीस | ८६७ |
| दुसऱ्या | " | " | ११७० |
| तिसऱ्या | " | " | २०५७ |
| चवथ्या | " | " | २४२५ |
| पांचव्या | " | " | २५९१ |
| सहाव्या | " | " | २७५४ |
| सातव्या | " | " | २९१८ |
| आठव्या | " | " | ३००० |
| नवव्या | " | " | ३१८१ |

म्हणजे पहिल्या तीन वर्षांत दोन हजार ग्राहक झाले तर पुढील एक हजार मिळविण्यास सहा वर्षें लागलीं.

या प्रचाराच्या कामात आम्हांस अनेक ठिकाणच्या मित्र-मंडळींकडून पाहुणचारापासून प्रत्यक्ष ग्राहक मिळवून देण्याच्या कामापर्यंत पुष्कळच मदत झाली; त्याचें सविस्तर वर्णन येथें देतां येणार नाहीं पण त्यांपैकीं विशेष मदत करणाऱ्या मित्रांचीं नावें येथें नमूद करणें अवश्य आहे.

### मदतीबद्दल विशेष उल्लेख करण्यासारख्या व्यक्ती

हैद्राबाद—श्री. काशिनाथराव वैद्य, वकील, वासुदेवराव हर्डीकर, कै. लक्ष्मण बाळकृष्ण फाटक

ग्वाल्हेर—कॅप्टन मोडक, श्री. रामचंद्र वासुदेव दाते, हाय. जज्ज.

बडोदें—श्री. सरदार राजे शिर्के, श्री. कृष्णाजी रामचंद्र संत.

नगर—श्री. रा. ब. हिवरगांवकर, श्री. य. द. नवाथे.

नासिक—श्री भा. ल. पाटणकर.

पणजी—श्री. शिवा फटु पै, आंगले.

मडगांव—श्री. दत्तात्रय व्यंकटेश पै.

कोल्हापूर—श्री. गोविंदराव उपळेकर.

सांगली—श्री. बाबुराव करमरकर, श्री. लागू वैद्य.

फलटण—श्री. भा. ल. लिखिते, फायनॅन्समेंबर.

कर्जत—श्री. आरेकर, इनामदार.

धारवाड—श्री. रा. रा. करंदीकर, श्री. भा. र. पटवर्धन.

बेळगांव—श्री. आबेवाडी.

जमखंडी—श्री. वा. त्र्यं. आपटे.

देवास—श्री. चिं. ग. ओक, श्री. कें. ब. विडवई.

इंदूर—प्रो. वा. गो ऊर्ध्वरेषे.

उज्जैन—डॉ. खिरवाडकर, प्रो. ना. घा. पराडकर.

कल्याण—श्री. विनायक महादेव वैद्य.

कराची—श्री. य. मो. नानल.

धुळें—श्री. द. ज. गोखले.

जळगाव—कै. ल. ना. फडणीस, वकील.

अमळनेर—श्री. म. गो. भालेराव, वकील.

नंदुरबार—श्री. डॉ. काणे.

सातारा—श्री. शंकरराव गोडसे, श्री. शेवडे वकील.

कऱ्हाड—श्री. पां. के शिराळकर.

राजापूर—श्री. र. कृ. पाटणकर.

रत्नागिरी जिल्हा—श्री. रा. मा. फडके.

बंगलूर—श्री. नारायणराव नाईक.

विजापूर—श्री. नारायणराव जोशी.

चिकोडी—श्री. सदाशिवराव कल्लोळकर, वकील.

नागपूर—श्री. गोपाळराव देव, श्री. दा. वा. रानडे.

जबलपूर—श्री. रा. के. पेंडसे, वकील.

रायपूर—श्री. राजिमवाले वकील.

बालाघाट—श्री. देवपुजारी वकील.

सागर—श्री. वासुदेवराव सुभेदार.

मुंबई—श्री. द. गो. परचुरे.

मद्रास—श्री. राजारामपंत पिंगळे.

शब्दकोशाचा पहिला विभाग छापून झाल्यावर तो ग्राहकांकडे पाठवावयाचा त्यावेळीं तो ग्राहकांस कमींतकमी खर्चात कसा देतां येईल या गोष्टीकडे लक्ष्य देण्यात आलें. ज्ञानकोशाचे वेळेस असा अनुभव आला कीं जे १०० रुपये देऊन आमचे, कागद

ग्राहक झाले त्यांस प्रत्येक भाग पोष्टानें व्ही. पी. करून पाठवावयाचा म्हणजे जवळजवळ एक रुपया खर्च येत असे. शिवाय ज्ञानकोशाची विनामूल्य म्हणून जी कागदी बांधणी योजण्यांत आली होती ती इतकी भिकार होती कीं अशा प्रवासास ती बांधणी कोणीहि पतकरणार नाहीं. त्यामुळें कापडी बांधणीचा एक रुपया व पोष्टखर्च मिळून सुमारें दोन रुपये खर्च प्रत्येक भागास ग्राहकास सोसावा लागे व पांच रुपयाचे पुस्तकास दोन रुपये वरखर्च म्हणजे प्रमाणाबाहेर होत असे व १०० रुपयांचा ग्रंथ जवळजवळ दीडपट किंमतीस पडावयास जाई. यानंतर मागाहून किंमतींत वर्गणीदार झालेल्यावर तर हा बोजा फारच होई. तेव्हां यावेळीं विनामूल्य देण्याच्या बांधणींतहि सुधारणा करून बाजूस जाड पुठ्ठा व मागें कापडी पट्टी अशी अर्धकापडी बांधणी विनामूल्य द्यावयाचें ठरविलें व पूर्ण कापडी बांधणीस एक रुपया ऐवजीं फक्त बारा आणे अधिक घ्यावयाचें ठरविलें. त्याप्रमाणेंच ज्यांस आपल्या मित्रामार्फत कार्यालयांतून ग्रंथ नेण्याची सोय असेल त्यास तशी सूचना देऊन अशी सोय असणारांची नोंद करून ठेवली व ज्या ठिकाणीं बरेचसे ग्राहक होते अशा ठिकाणीं कांहीं मित्रांमार्फत ग्रंथ वाटण्याची सोय केली. या सोईनें जवळजवळ एक रुपयाऐवजीं फक्त चार आण्यांत ग्रंथ घरपोंच मिळूं लागला व तोहि पोष्टामार्फत येऊन खराब न होतां चांगल्या पार्सलमध्यें आल्यामुळें चांगल्या स्थितींतहि मिळूं लागला.

याकामीं आम्हांस अनेक मित्रांनीं साहाय्य केलें अशा प्रकारचे आमचे साहाय्यक अगर प्रतिनिधींचीं नांवें पुढें दिलीं आहेत.

### महाराष्ट्र शब्दकोश प्रती वाटणें व वसुली करणेंचें काम करणारे साहाय्यक व प्रतिनिधि

१ श्री. धोंडो सखाराम कुलकर्णी, ॲड. ऑफिसर, अंमळनेर.
२ श्री. विष्णु वामन काळे, कराची.
३ श्री. महादेव रामचंद्र जागुष्टे, बुकसेलर, अहमदाबाद.
४ श्री. कमलाकर वामन ऊर्ध्वरेषे, रामबाग, इंदूर.
५ श्री. डी. श्री. दाबेकर, बुकसेलर इंदूर.
६ श्री के रा. कुलकर्णी, कोल्हापूर.
७ श्री. व्यंकटेश स. फडी व श्रीनिवास स. फडी, ग्वाल्हेर.
८ श्री. रा. गो. हुंकरी, धारवाड. '
९ प्रो मा. स. पाटणकर, दहीपूल, नाशिक.
१० श्री. श्री. बा. दाते, नागपूर.
११ श्री. शिवा फदू पै कांगले, पणजी.
१२ श्री. नारायण गोविंद नाईक बंगलोर.
१३ श्री. कृष्णाजी रा. संत, बडोदें.
१४ श्री. लक्ष्मण नारायण फडणीस, जळगांव.
१५ श्री. दत्तात्रय व्यं. पै, मडगांव.
१६ श्री. पी. डी. जोशी, मद्रास.
१७ श्री. रा. बा. कामत, मालवण.
१८ श्री. रा. शि. सिद्धये, मुंबई.
१९ श्री. पी. डी. सोवनी, वर्धा.
२० श्री. विनायक महादेव वैद्य, कल्याण.
२१ श्री. रघुनाथ कृष्ण पाटणकर, राजापूर.
२२ श्री. जी. व्ही. करमरकर, सराफ, सांगली.
२३ श्री. शं. बा. गोडसे, सातारा.
२४ श्री. लक्ष्मण शे. नाईक, हैद्राबाद.
२५ श्री. रा. व. हिवरगांवकर, नगर.
२६ श्री. द. गो. परचुरे, मुंबई.

**साहाय्यक**—शब्दकोश प्रकाशनाच्या कार्यांत ज्यांचें आम्हास वर उल्लेखिल्याखेरीज विशेष आर्थिक साहाय्य झालें त्यांचे येथें आदरेसून आभार मानणें अवश्य आहे.

### श्री. सयाजीराव गायकवाड.

यांमध्यें श्री. महाराज सयाजीराव गायकवाड यांचें नांव प्रामुख्यानें प्रथम पुढें येतें. विद्यमान् महाराष्ट्रीय संस्थानिकांत विद्येबद्दल आस्था व अभिरुचि या बाबतींत श्रीमंतांस सहजच अग्रेसरत्व प्राप्त झालें आहे. त्यांच्या सारखा स्वतः सुविद्य व विद्येचा चाहता संस्थानिकांत काय पण इतरत्रहि मिळणें कठीण आहे. त्यांनीं या कार्यास सर्वांत मोठें साहाय्य केलें आहे व त्यांत विशेष हें कीं त्यांनीं आमच्या कार्यास हें साहाय्य अनाहूतपणें दिलें आहे याबद्दल व कृतज्ञताबुद्धीनें हा ग्रंथ त्यांस अर्पण करण्यांत आला आहे. आम्ही १९२९ च्या डिसेंबर महिन्यात जेव्हां बडोदें येथें शब्दकोशाच्या प्रचाराकरितां गेलों त्यावेळीं तेथें गांवांत हिंडून एकंदर सुमारें ९० ग्राहक मिळविले त्यावेळीं श्री. महाराज बडोद्यांत होते परंतु आमच्या जवळ प्रत्यक्ष दृश्य अशा स्वरूपांत कांहीं नव्हतें केवळ योजना होती. तेव्हां अशा वेळीं महाराजांची भेट न घेतांच आम्ही परत आलों. यावेळीं भेट न घेण्याला एक कारण औरहि होतें कीं, ज्ञानकोशाच्या वेळीं १९२१ मध्यें मीं बडोद्यास गेलों असतां श्री. महाराजांची व्यवस्थितपणें भेट व्हावी म्हणून जी मीं खटपट केली ती मनाजोगती यश न मिळून मध्यस्थांबद्दल एक प्रकारचा तिटकारा मात्र उत्पन्न झाला. तेव्हां यावेळीं आमच्या नेहमीच्या निरस्या प्रमाणें मध्यस्थ हेच अ.मचे महाराज असें समजून फक्त त्यांच वर्गांत आम्ही काम केलें. परंतु आम्ही बडोद्यास येऊन गेल्याचें जेव्हां श्री. महाराजांस कळलें तेव्हां आमचें कार्य समजून घेण्याची उत्सुकता उत्पन्न होऊन त्यांनीं आमचें प्रसिद्धिपत्रक मागवून संपूर्ण वाचून पाहिलें व आमच्या मित्रमंडळी मार्फत

आम्हास बडोद्यास बोलावून घेऊन आमची योजना पूर्णपणें समजावून घेतली व अशा रीतीनें अगाऊ ग्राहक मिळवून प्रथप्रकाशन करण्याची आमची योजना त्यांस पटून त्यांनीं आमच्या कार्यास सहाय्य करण्याची मनीषा प्रकट केली तेव्हां आम्ही देणगीची मागणी न करतां कांहीं प्रती घ्याव्या अशी विनंति केली अखेरीस आम्हास ५००० रुपये अर्पणपत्रिकेकरितां देणगी म्हणून व प्रत्येक भागाच्या १०० प्रती प्रसिद्धीनंतर घ्यावयाच्या अशी आज्ञापत्रिका मिळाली त्याप्रमाणें आम्ही ग्रंथ अर्पण करण्याची अनुज्ञा मिळाल्याबद्दल आभार मानून व देणगीचा स्वीकार करून परत आलों यावेळीं श्री रामचंद्र शामराव मान पाटील श्री सडकर पवार श्री अवधूतराव राजे शिर्के व त्यांची कांहीं मित्रमंडळी यांनीं आम्हांस फारच मदत केली व एकंदर श्रीमंतांनीं जी वागणूक ठेविली तीमुळें माझा ज्ञानकोशाच्या बाबतींत झालेला ग्रह बराच बदलला तथापि कांहीं अधिकारी वर्गास जणूं ही रकम आपल्या पगारांतूनच जात आहे असा सारखा क्लेश होऊन त्यांनीं निदान ही देणगी लांबणीवर पाडण्याचा प्रयत्न केलाच पण प्रत्यक्ष श्री महाराजांचीच हुकूम असें कार्य विलंब न लावतां तावडतोब व्हावें अशी असल्यामुळें आम्ही देणगीचा चेक घेऊन तावडतोब परत येऊं शकलों

## एक हितचिंतक हैद्राबाद

यानंतरचें आम्हांस मोठें साहाय्य आमचे हैद्राबाद दक्षिणचे 'एक हितचिंतक' यांचे झालें यांसहि आम्हीं कांहीं भाग घ्यावे अशी विनंति केली असतां त्यांनीं भाग न घेतां १००० रुपये देणगी दाखलच देऊं केले व तेंहि वार्षिक हप्त्यांनीं आणि आपलें नाव जाहीर न करण्याच्या अटीवर त्यामुळें आमच्या कार्यावर त्यांची देखरेख राहून आम्हांस त्या निमित्तानें त्यांची वारंवार भेट घेण्याची व अधिक परिचय करून घेण्याची संधि मिळाली व आमच्या कार्यावर त्यांचा कायमचा लोभ जडून पुढें निझाम सरकारकडून जी देणगी मिळाली ती मिळण्यासहि त्यांचेच परिश्रम व वजन कारणीभूत झालें

## निझाम सरकार

निझाम सरकारनेंहि आमच्या कार्याचें महत्त्व जाणून हालीं एक हजार रुपयांची देणगी दिली तीबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे

## श्री पंतप्रतिनिधि

यानंतर महाराष्ट्रीय संस्थानिकांपैकीं श्री भवानराव श्रीनिवासराव पंत प्रतिनिधि राजेसाहेब औंध यांनीं दहा प्रतींची मागणी करून एकंदर सातशे रुपयांची मदत केली विद्येस उत्तेजन देण्याच्या कामीं स्वतःचें लहान संस्थान असूनहि हे संस्थानिक खरोखर इतरांस उत्तम उदाहरण घालून देणारे आहेत स्वतः काटकसर करून योग्य ठिकाणीं आपल्या द्रव्यराशीचा व्यय करणारे असे संस्थानिक जर आपल्यांत अधिक निघतील तर दरिद्री महाराष्ट्राचाहि भविष्यकाल उज्ज्वल होईल यांत शंका नाहीं

## श्री बाबासाहेब इचलकरंजीकर

याप्रमाणेंच श्री नारायणराव गोविंद उर्फ बाबासाहेब घोरपडे इचलकरंजीकर यांचा हात तर कोणत्याहि उपयुक्त कार्यास मदत करण्यांत नेहमीं तत्पर असतो यांनीहि आमच्या विनंतीस मान देऊन पांचशें रुपयांची या कार्यास अगाऊ मदत केली आहे

## श्री सरकार करवीर

श्री छत्रपति राजाराम महाराजसाहेब संस्थान कोल्हापूर हे तर महाराष्ट्राचे छत्रपतीच आहेत तेव्हां सर्व महाराष्ट्राचा त्यांचेवर हक्कच आहे या अधिकाराची त्यांनीहि जाणीव ठेवून त्यांच्या सरकारनें या कार्यास तीनशें रुपयांची देणगी दिली आहे याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहों

## श्री बाबासाहेब चिपळूणकर

श्री विनायक धुंडीराज उर्फ बाबासाहेब चिपळूणकर यांचा आमचा फार पूर्वीपासूनचा ऋणानुबंध असल्यामुळें त्यांनीं प्रथम मंडळाचे दोन भाग घेतलेच होते पण पुढां सहाव्या भागाच्या वेळीं त्यांस विनंति केली तेव्हां त्यांनीं २०० रुपये देणगीदाखल दिले हें विशेष होय

**श्री राजेसाहेब जमखंडीकर** यांनीं चार प्रती घेतल्या व **श्री राजे बाळासाहेब मिरजकर** यांनीं तीन प्रतींची मागणी केली यांनीं पुस्ती व नवियाचे शब्द पुरविण्याबद्दलचा उल्लेखपूर्वी आला आहे

याखेरीज **श्री प्रतापशेट अमळनेर रा ब गो स सरदेसाई** कामशेत व **श्री अवधूतराव घाटगेजीराव राजे शिर्के** यांनीं प्रत्येकीं शंभर रुपये देणगीदाखल दिले त्यांचेहि आभार मानणें अवश्य आहे

डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीनें महाराष्ट्र शब्दकोशाच्या प्रत्येक विभागास बक्षिसादाखल रु १२५ प्रमाणें दिले आहेत वास्तविक या संस्थेकडे बक्षिसासाठीं शब्दकोश पाठविण्याचा आमचा विचार नव्हता व ज्ञानकोश या संस्थेकडे पाठविण्यांत आला नव्हता कारण आमच्या मतें या संस्थेकडे जो थोडा फार निधि आहे त्यांतून नवीन होतकरू लेखकांस मदत व्हावी मोठ्या प्रयास साहाय्य करण्यानें लहान प्रयत्नांची उपासमार होऊं नये असें आमचें मत होतें परंतु पहिला भाग बाहेर पडला तेव्हां सदरहू संस्था आमची ग्राहक असल्यामुळें तो भाग न्यावयास आलेल्या मनुष्याबरोबर असा

निरोप आला कीं, संस्थेजवळ थोडी फार रक्कम असून शब्दकोश परीक्षणार्थ पाठविल्यास कांहीं बक्षीस मिळेल. व त्या निरोपानुसार मिळणाऱ्या मदतीस नाहीं म्हणणें योग्य होणार नाहीं म्हणून आम्हीं ग्रंथ पाठविला व त्यास व पुढें प्रत्येक भागास रुपये १२५ प्रमाणें आम्हांस मदत मिळाली, याबद्दल संस्थेचे आम्हीं आभारी आहों.

याशिवाय आम्ही जेव्हां प्रचाराकरितां बाहेर फिरत होतों त्यावेळीं आमच्या मंडळाचा भाग जरी पंचवीस रुपयांचा होता तरी कांहीं मंडळीस आम्ही अशी विनंति करीत असूं कीं, आपण एकच भाग घ्यावयाच्या ऐवजीं कांहीं अधिक भाग घ्यावे. आपण शब्दकोशाचे ग्रंथ एकाच भागाकरितां घ्यावे पण अधिक भाग घ्यावयाचे ते एवढ्याकरितां कीं, आम्हांस एक एक भाग खपविण्याकरितां जे श्रम लागतात ते कांहीं भाग एकदम घेतल्यास वांचतील. व पुढें आम्हास जीं इतर कामें करावयाचीं आहेत त्यांस हें भांडवल उपयोगी पडेल ही विचारसरणी कांहीं गृहस्थास पटून व यांत प्रत्यक्ष फायदा मिळण्याचा संभव नसताहि या कार्यास मदत म्हणून त्यांनीं अधिक भाग घेतले अशा मंडळींचीं नावें पुढें दिलीं आहेत. त्यापैकीं **श्री. रावराजे गणपतराव राजवाडे,** ग्वाल्हेर यांनीं पांचशें रुपयांचे भाग घेऊन शिवाय युद्धविषयक शब्दसाहित्यहि पुरविलें. तसेंच **कै. श्री. वामन रावजी नाईक** यांचा आमचा प्रथम परिचय नसताहि त्यांच्या उदार बुद्धीस अनुसरून भाषा व संस्कृति यावरील प्रेमानें उद्युक्त होऊन त्यांनींहि पांचशें रुपयांचे भाग घेतले हें विशेष होय तसेंच आमचे मित्र कोल्हापूर येथील सराफ **श्री गोविंदराव उपळेकर** यांनी आमचे तीनशें रुपयांचे भाग घेतले एवढेंच नव्हे तर आमच्या कोल्हापूर येथील कार्यांत आम्हांस मदत केली. सामान्यतः सराफी वगैरेसारख्या धंद्यात पडलेल्या गृहस्थांस विद्येची अभिरुची कमीच दिसून येते परंतु रा. गोविंदराव हे या बाबतींत अपवाद असून त्यांचा सर्व मित्रवर्ग सुशिक्षित वर्गापैकींच असून त्यांचें वाचनहि चौरस आहे व त्यांचा ग्रंथसंग्रहहि सर्वगामी व अद्यावत दिसून येतो हें त्यांस भूषणावह आहे.

## विशेष भागीदार

| | |
|---|---|
| श्री. रावराजे गणपतराव राजवाडे, ग्वाल्हेर, | रु. ५०० |
| कै. वामन रावजी नाईक, हैद्राबाद. | रु. ५०० |
| श्री गोविंदराव उपळेकर, कोल्हापूर. | रु. ३०० |
| श्री. सरदार चंद्रोजीराव आंग्रे, ग्वाल्हेर. | रु. २५० |
| श्री. सरदार माधवराव किबे, इंदूर. | रु. २५० |
| श्री. सरदार देवराव जाधव, ग्वाल्हेर. | रु. २५० |
| श्रीमंत सरदार जगन्नाथ महाराज पंडित, पुणें. | रु. २२५ |
| श्रीमंत मा. वि. भिडे, हायकोर्ट जज्ज, लाहोर. | रु. २५० |
| श्रीमंत पां. के. शिराळकर सावकार, कऱ्हाड. | रु. २५० |
| श्री. धों. कृ. साठे, कॉन्ट्रॅक्टर, पुणें. | रु. २५० |
| श्री. स. वि. रानडे, पुणें. | रु. २५० |
| श्री. शं. न. दातार, पुणें. | रु. २५० |
| श्रीमंत वि. ना. जोग, धारवाड. | रु. २५० |
| श्रीमंत सरदार पाटणकर, ग्वाल्हेर. | रु. १७५ |
| श्री. रा. रा. करंदीकर, धारवाड. | रु. १५० |
| श्री ग. म. दाते, बारामती. | रु. १५० |
| श्रीमंत सरदार खं. रा. वि‍ंचूरकर. | रु. १२५ |
| श्री. नायब दिवाण, सावंतवाडी. | रु १२५ |
| श्री. त्रि. वि. काणे, पुणें. | रु १२५ |
| श्री. र. हि. दोशी, सोलापूर. | रु १२५ |
| श्री. त्रि. वि साठ्ये, पुणें. | रु. १२५ |
| श्री. डेव्हिड आ. तरणखोपकर, मुंबई. | रु १२५ |
| श्री. ध. रा. गाडगीळ, पुणें. | रु १२५ |
| श्री. द. रा. घारपुरे, मुंबई. | रु. १२५ |
| श्री ल. का. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी. | रु. १२५ |
| श्री. रा. मा. देशमुख, नागपूर. | रु. १२५ |
| श्री. के. जी. घारपुरे, पुणें. | रु १२५ |
| श्री रा. ब. वा. अ. वाळवेकर, मुंबई. | रु. १२५ |
| श्री. भा. के दाबके, | रु १२५ |
| श्री किसनलाल ओंकारदास, अकोला. | रु. १२५ |
| श्री. अ वि. दातार, चाळिसगाव. | रु १२५ |
| श्री. गो. प्र. भाडारकर, इंदूर. | रु. १२५ |
| श्रीमंत सरदार गं. ना. मुजुमदार, पुणें. | रु. १०० |
| श्री प्रायव्हेट सेक्रेटरी, श्रीमंत महाराज सरकार, देवास. | रु १०० |
| श्री. ना. श्री. राजहंस, (बालगंधर्व). | रु. १०० |
| बॅ. त्रि वि. ओक, मुंबई. | रु १०० |
| श्री. द ल. सहस्रबुद्धे, पुणें | रु. १०० |
| श्री. रा. अ कानिटकर, बुल्ढाणा. | रु १०० |
| श्री ल. र. गोखले, पुणें. | रु. १०० |
| श्री. ल वा. कोल्हटकर, पुणें. | रु. १०० |
| श्री. ग. स. मराठे, पुणें. | रु. १०० |
| डॉ. ग. ब. खोले, मुंबई. | रु १०० |
| श्री. ह. ग. घारपुरे, पुणें. | रु १०० |
| श्री. द. गो. फडके, पुणें. | रु. १०० |
| श्री. न. रा. गोडबोले, पुणें. | रु. १०० |
| श्री. का. बा. कर्वे, बंगदूर. | रु. १०० |

| | |
|---|---|
| श्री. गो. ह. जोशी, पुणें. | रु. १०० |
| श्री. आ. धों. धोपेश्वरकर, धारवाड. | रु. १०० |
| श्री. पु. मं. लाड, आय्. सी. एस्. | रु. १०० |
| श्री. त्रि. वि. गोरे, पुणें. | रु. १०० |
| श्री. मो. कृ. शारंगपाणी, बडोदें. | रु. १०० |
| श्री. दि. बा. परांजपे, पुणें. | रु. १०० |
| श्री. वि. द. डबीर, हैद्राबाद (दक्षिण). | रु. १०० |
| श्री. रा. का. भिडे, पुणें. | रु. १०० |
| श्री. वि. गो. गोखले, पुणें. | रु. १०० |
| श्री. शं. बा. डावळे, आय्. सी. एस्. | रु. १०० |

प्रस्तावना—आम्ही शब्दकोशाची रचना करावयाचें निश्चित केलें तेव्हां कोशरचनेसंबंधीं कांहीं वाङ्मय उपलब्ध आहे काय म्हणून बरीच चौकशी केली, अनेक पुस्तक विक्रेत्यांस लिहिलें, ग्रंथसंग्रहालयें धुंडाळलीं, ग्रंथसूची चाळून पाहिल्या पण इंग्रजींमध्येंहि कोशरचनेसंबंधीं वाङ्मय उपलब्ध झालें नाहीं. त्यावेळीं पूर्ण होत आलेल्या ऑक्सफर्ड कोशाच्या कार्याबद्दल कांहीं बुकलेटें निघालेलीं ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीचीं पत्रकें मात्र मिळालीं तेव्हां आपणास जरी कांहीं साहित्य उपलब्ध झालें नाहीं तरी मराठी वाचकांस कोशरचना शास्त्रासंबंधीं व कोशरचनेच्या इतिहासासंबंधीं माहिती व्हावी म्हणून पहिल्या विभागास या विषयावरच एक विस्तृत प्रस्तावना लिहावी असें ठरविलें व उपलब्ध साधनांवरून निघंटूपासून अर्वाचीन कोशासंबंधीं सर्व माहिती देणारी प्रस्तावना संपादक वर्गानें तयार करून पहिल्या भागास जोडिली.

यानंतर शब्दकोश रचनेबरोबरच जो भाषाशास्त्रविषयक अभ्यास आम्हास अवश्य झाला. त्या अभ्यासाचें फळ केवळ आपल्या डोक्यांत साचवून ठेवण्यापेक्षां मराठी वाचकवर्गास उपलब्ध करून दिल्यास भाषाभ्यासकांस त्याचा उपयोग होऊन मराठींत उणीव असलेल्या एका शाखेंत चांगली भर पडेल असें मनांत येऊन प्रत्येक भागास भाषाशास्त्रविषयक व मराठी भाषेच्या उत्पत्तीस व वाढीस अनुसरून एक विस्तृत प्रस्तावना जोडावयाची असें ठरविलें व त्या प्रमाणें सर्व भागांस एक एक प्रस्तावना जोडली. यामुळें शब्दकोशाचा नवीन भाग आल्याबरोबर ग्राहकांस कोशाखेरीज वाचनीय असा मजकूर सहजच मिळत गेला व त्यामुळें कोशाचा बराच मोठा वाचकवर्ग उत्सुकतेनें प्रत्येक भागाची वाट पाहूं लागला. व या निमित्तानें या विषयावर एक मागल्याप्रतीचें लिखाण मराठी भाषेंत तयार झालें.

या प्रस्तावनांचा मराठी भाषेच्या अभ्यासकांस विशेष उपयोग होईल याकरितां या प्रस्तावनांच्या स्वतंत्र प्रती काढाव्या अशी कांहीं अभ्यासु मित्रांची सूचना आल्यावर सर्व प्रस्तावनांच्या सुट्या प्रतीहि डेमी आकारांत काढण्यांत आल्या व त्या स्वतंत्रपणें मिळण्याची सोय केली.

या प्रस्तावनांसंबंधीं आम्हास शाबासकी अनेक लोकांकडून मिळाली पण आम्हास दोन गृहस्थांनीं दोष देण्यासहि कमी केलें नाहीं. त्यापैकीं एक येथील एका बोळांतील छापखानदार असून आमचे ग्राहक नव्हते पण प्रस्तावनेमुळें आमच्या ग्राहकांस तेवढीं कोशाचीं पानें कमी मिळतात अशी त्यांची तक्रार होती. दुसरे गृहस्थ आमचे ग्राहक असून विद्वानहि होते व त्यांनीं तर प्रस्तावनांचा खर्च अनाठायीं असून तो डायरेक्टराकडून वसूल करण्यांत यावा असेंहि आम्हांस कळविलें. तेव्हां आम्ही रीतसर तो प्रश्न एका सर्वसाधारण सभेपुढें ठेवून त्या सभेची संमति घेतली. अर्थात् चालकांकडून किंवा संपादकांकडून जर ही रकम वसूल करण्याची आमच्या ग्राहक वर्गाची इच्छा दिसती तर आम्ही त्या गोष्टीस माघार घेतली असती असें कधींच झालें नसतें कारण वेतनाचा पगार ठरवून तोहि पूर्ण न घेतां त्याचीच बाकी मंडळाकडे राहण्याची प्रथा ज्ञानकोशापासूनच आमच्या अंगवळणी पडली आहे व हौसेच्या कार्यांत थोडी घस लागली तर ती सोसावयाची आमची तयारी नेहमींच असते. तेव्हां या सद्गृहस्थांची मनीषा पूर्ण झाली असती तरी आम्हास त्यांत विषाद वाटला नसता. असो.

या प्रस्तावनांबद्दल कोणाचे विशेष अभिप्राय देण्याची जरूर नसली तरी दुसऱ्या विभागावर जे डे. व्ह. ट्रा. सोसायटीच्या परिक्षकांनीं परीक्षण केलें आम्हांस त्यांनीं कृपेनें पाठविलें त्यांतील प्रस्तावनेसंबंधीं अभिप्राय पुढें उध्दृत करतों. कारण हे अभिप्राय म्हणजे वर्तमानपत्रांत थोड्या अवधींत व घाईनें लिहिलेले केवळ उत्तेजनार्थ व प्रसिध्यर्थ दिलेले अभिप्राय नसून तज्ज्ञ परीक्षकांकडून मिळालेले अभिप्राय आहेत.

१ " या भागांतील विशेष गोष्ट म्हणजे त्यांतील ' भाषाशास्त्र व जगांतील भाषा ' या बाबतींतील स्वतंत्र प्रस्तावना होय. मराठींमध्यें भाषाशास्त्रविषयक वाङ्मय फारसें नाहीं. तसें वाङ्मय निर्माण करण्याच्या उद्देशानें ज्याप्रमाणें पहिल्या विभागांत 'कोश रचना शास्त्र ' या विषयाचें विस्तृत विवेचन केलें आहे त्याप्रमाणें सामान्य सुशिक्षित माणसास भाषेची उत्पत्ति, विकास, पोटभाषा कशा बनतात याची माहिती, भाषेचें अनेक कारणांनीं बदलणारें स्वरूप, निरनिराळ्या भाषांचा वांशिक संबंध वगैरेंचें ज्ञान विशेष खोलांत न शिरतां व्हावें या हेतूनें प्रस्तुतच्या भागांत आपल्याकडे व पाश्चिमात्य देशांत भाषाशास्त्रविषयक विचारांची वाढ कसकशी होत गेली याचें सविस्तर विवेचन केलें असून जगांतील बहुतेक सर्व भाषांची थोडक्यांत माहिती दिली आहे. तसेंच प्रस्तावनेच्या परिशिष्टांत जगांतील महत्वाच्या भाषा, हिंदुस्था-

नांतील भाषा व इंडो-युरोपियन भाषा यांचें वंशवार वर्गीकरण दिलें आहे प्रकाशकांचे मनांत प्रत्येक भागाचे आरंभीं भाषाशास्त्रविषयक वाङ्मयाची माहिती देणारी अशाच प्रकारची प्रस्तावना देण्याचें आहे प्रत्येक भागास जोडलेल्या अशा प्रस्तावना एकत्र करून छापल्यास मराठी भाषेंत भाषाशास्त्राची माहिती देणाऱ्या एका चांगल्या ग्रंथाची भर पडेल."

२ "कोशाच्या या विभागांत 'ओ' पासुन 'ख' पर्यंत काम पुरें झालेलें आहे याशिवाय आरंभी एक विस्तृत प्रस्तावना जोडलेली असुन तींत भाषाशास्त्राचा विस्तृत इतिहास-प्राचीन व अर्वाचीन भाषेच्या उत्पत्तीविषयीं निरनिराळ्या भाषाकोविदांनीं सुचविलेल्या तर्कांची थोडीशी हकीगत, जगांतील निरनिराळ्या भाषांची कुलपीठिका, एकाच भाषेंत कालभेदामुळें होणारे विकार, भाषा व बोली यांचें विवेचन व विविध भाषांची थोडीफार माहिती इत्यादि विषय आले आहेत. समग्र प्रस्तावने पैकीं हा एक पोटविभाग असल्यामुळें व बाकीचे विभाग पुढें व्हावयाचे असल्यामुळें ह्यावर अखेरचें मत आतांच देतां येणार नाहीं. मात्र आहे तो मजकूर अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिलेला आहे व वाचनीय आहे एवढें मात्र सांगतां येईल."

३ "संपादकांनीं आरंभी जोडलेला प्रास्ताविक निबंध अगदीं माहितीनें भरलेला आणि मराठी वाचकांस फारच उपयुक्त असा आहे. थोडक्यात पुष्कळ माहिती संपादकांनीं ठासुन भरली आहे. प्रत्येक भागास जोडले जाणारे हे प्रास्ताविक निबंध एकत्र केले असतां मराठी भाषेंत एका चांगल्या ग्रंथाची भर निःसंशय पडेल. किंबहुना आजही स्वतंत्रपणें हे निबंध थोडक्या किंमतीस विक्रीस ठेवण्यालायक आहेत."

**सरकार व संस्थानिकांचें सहाय्य**—ज्ञानकोशाच्या वेळेस देणग्या न घेण्याचे धोरण होतें पण बारीकसारीक देणगी न घेतां ठळक देणगी मिळाल्यास घ्यावयाची असें धोरण ठेवण्यांत आलें पण शक्यतों प्रती देऊन मदत घ्यावी असें योजलें होतें व आम्ही मागणी केली नव्हती असें म्हणता येऊं नये म्हणून प्रथम पासुनच शब्दकोशाच्या कार्यास थोडेसें स्वरूप येऊं लागल्याबरोबर मुंबई सरकार, मध्यप्रांत व वऱ्हाड सरकार व महाराष्ट्रांतील प्रमुख संस्थानिक व महाराष्ट्राबाहेरील मराठी भाषा बोलणारे इंदूर, ग्वाल्हेर, बडोदें, धार, देवास वगैरे संस्थानिक यांजकडे या कार्याकरितां मदत मिळावी म्हणून अर्ज करण्यांत आले होते. मुंबई सरकारकडुन डायरेक्टरकडे अर्ज करावा असें उत्तर आलें. डायरेक्टरकडुन नेहमींप्रमाणें पैसा नाहीं हें उत्तर आलें मध्यप्रांत सरकारकडुन कांहींच उत्तर आलें नाहीं. मध्य प्रांतांत एक मराठी अॅकेडमी नांवाची वाङ्मयोत्तेजनाकरितां संस्था स्थापन झालेली आहे. त्या संस्थेचे त्या वेळचे अध्यक्ष रा. यादव माधव काळे यांस समक्ष भेटलों असतां अवश्य मदत करूं म्हणून उत्तर मिळालें परंतु अर्ज केला तेव्हां मात्र सदरहु कार्य मध्यप्रांताबाहेर चाललें असल्यामुळें कांहीं मदत करतां येत नाहीं असें उत्तर आलें. जणुं कांहीं मराठी भाषेच्या कोशाशीं मध्यप्रांत-वऱ्हाडचा कांहींच संबंध नाहीं!! असो. संस्थानिकांकडुनहि कोणाकडून उत्तर आलें नाहीं. परंतु समक्ष गाठी घेतल्या असता जी मदत मिळाली ती पूर्वी नमूद केलीच आहे.

**खर्चाचा अंदाज**—शब्दकोशाकरितां भांडवल जमविण्याकरिता कंपनी काढून भाग खपविले, देणग्या मिळविल्या, वर्गणीदार मिळविले तरी जोंपर्यंत छपाईचें काम चालु नव्हतें तोंपर्यंत पैशाची अडचण मुळींच भासली नाहीं व सामान्यतः सर्वांचा पगारहि देता येत असे पण छपाईचें काम सुरू झाल्यावर छपाईकडे पैसा फार लागूं लागला. सामान्यतः आमच्या ग्राहकांची संख्या तीन हजारा जवळ जवळ आली होती तरी प्रत्यक्ष पाच हजार प्रती छापून घेत असुं.

यासंबंधीं आमच्या एकंदर कामाचा व खर्चाचा अंदाज असा होता कीं, ज्ञानकोशासारख्या सुमारें १०० रुपये किंमतीच्या ग्रंथास तीन हजार ग्राहक मिळाले. तर महाराष्ट्रांत अशा कामास ज्याअर्थी शंभर रुपये देणारे तीन हजार लोक मिळतात तर पाच भागाच्या प्रथम अंदाजाप्रमाणें २५ रुपये देणारे ५००० लोक मिळण्यास अडचण पडूं नये. व पाच हजार लोकांचे सवालाख रुपये येतील त्यांत छपाई २५०००, संपादकीय व कचेरी खर्च ५००००, विक्रीखर्च २५००० याप्रमाणें एक लाख रुपयात हें काम व्हावें. २५००० रुपयांची तजवीज, आकस्मिक खर्च किंवा कुस म्हणून रहावी. त्याप्रमाणें सामान्यतः आमच्या प्रचारांत ज्ञानकोशाच्या तीन ग्राहकामागें शब्दकोशास पाच ग्राहक मिळणें हें प्रमाण बहुतेक जुळत आलें हो क्रिया १९३० पर्यंत सुरळीत चालली. पण पुढें मंदी वाढत गेली व प्रचार कार्यास तितका वेळ देणें अशक्य होऊं लागलें. कारण छपाई सुरू झाल्यामुळें मुद्रणप्रत तपासणें, मुद्रितें तपासणें व छापण्याची व्यवस्था करणें याकडे लक्ष्य द्यावें लागून आयात कमी होऊं लागली पण खर्च मात्र वाढत चालला. शिवाय प्रत्येक विभागामागें २००० प्रती बैठ्या राहू लागल्या व त्यात कांहीं पैसा अडकून बसला व ही रकम प्रत्येक भागाबरोबर वाढूं लागली व कमी प्रती काढाव्या तर अशा ग्रंथ बाहेर निघाल्याबरोबर दुर्मिळ होणार व असे ग्रंथ वरचेवर निघत नसल्यामुळें कांहीं प्रती तरी विकावयास राहणें अवश्य आहे व एकंदर मुद्रणखर्चाच्या

मानानें याच वेळीं खर्च होणारा पैसा प्रमाणानें थोडा लागतो. छापखान्याचें सामान घेण्यांत सुमारें दोन हजार रुपये गुंतून पडले. याप्रमाणें चालू रकमेची चणचण भासूं लागली. तथापि सामान्यतः हें प्रमाण प्रत्येक प्रसिद्ध झालेल्या विभागामागें एक हजार रुपयांपर्यंतच राहिलें. कारण संपादक वगैरेहि पूर्ण पगार न घेतां जरूर तेवढीच व कचेरीच्या सोईनें रकम उचलूं लागला व कांहीं मालहि उधारीवर मिळूं शकला. तथापि प्रत्यक्ष कांहीं रकम कर्जाऊ काढावी लागली

**सावकार**—त्यावेळीं प्रथम सावकाराची गरज लागली त्यावेळीं वऱ्हाड येथील शिराळकर यांच्या पेढींतून एक हजार रुपये कर्जाऊ काढले, हे कांहीं दिवसांनीं परत करतां आले पण पुढें त्यांजकडून वेळोवेळीं काढलेल्या सर्व रकमा परत करतां आल्या नाहींत व सहाव्या विभागाच्या शेवटीं त्यांचें देणें व्याजा सुद्धा सुमारें पसतीसशें रुपये राहिलें. ही मदत केल्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहों.

याप्रमाणेंच केसरी–मराठा ट्रस्टनेंहि तिसऱ्या विभागाच्या वेळीं एक हजार रुपये कर्जाऊ दिले होते ते आम्ही सुमारें तीन वर्षांनीं परत केले कारण त्यावेळीं श्री. तात्यासाहेब केळकर व श्री. विद्वांस यांनीं आपल्या जागाचे राजीनामे देऊन नवीन ट्रस्टी यावयाचे होते तेव्हां रा. तात्यासाहेबांच्या हातचा व्यवहार त्यांच्याच हस्तें पुरा होणें योग्य होतें म्हणून ती रकम परत करण्यात आली. मात्र त्यांनीं झाल्या दिवसाचें सर्व व्याज आम्हास सोडून दिलें याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों

याखेरीज श्री. गणेश सदाशिव मराठे यांनीं पांचशें रुपये कर्जाऊ दिले आहेत तसेंच रा. नरहर विष्णु देशमुख यांनींहि एक हजार रुपयाची रकम कर्जाऊ म्हणून दिली आहे. त्यांचे आभार येथें मानणें अवश्य आहे

अशा कामात अडचणी या वारंवार येतातच व अनेक लोकांशीं व्यवहारात संबंध येतो. परंतु आम्ही ज्यांच्याशीं व्यवहार केला त्यांत सर्वांनीं आमच्या कार्याकडे दृष्टि ठेवून आम्हांस अत्यंत सहानुभूति दाखविली. त्यांच्या सहानुभूतीच्या अभावीं आम्हांस या प्रचंड शब्दसागराचें पैलतीर गाठणें शक्य झालें नसतें.

या सर्वांत प्रामुख्यानें निर्देश करावयाचा म्हणजे डेक्कन पेपरमिलचे मॅनेजर शेट फर्दुनजी पदमजी हे होत यांचेकडे जेव्हां प्रथम मी कागदासंबंधीं करार करावयास गेलों तेव्हां त्यांची माझी मुळींच ओळख नसतां त्यांनीं अत्यंत आदरानें वागवून आम्हांस सवलतीच्या भावानें कागद द्यावयाचें कबूल केलें, एवढेंच नव्हे तर मध्यंतरीं भाव उतरला असतां ठरलेल्या दरापेक्षां आम्ही मागणी न करतांहि आमच्या कागदाचा दर कमी केला व आम्हाकडे बाकी थकली असतांहि कधीं आमच्या कामाची खोटी होऊं दिली नाहीं. त्यामुळें सर्व शब्दकोशास आम्हांस देशी कागद वापरतां आला व त्यांनीं आपली सहानुभूतीची दृष्टि आमच्यावर आजतागायत चालू ठेविली याबद्दल आम्ही त्यांचे अत्यन्त ऋणी आहों. या गुजराती बोलणाऱ्या पारशी गृहस्थानीं जी सहानुभूति आम्हांस दाखविली तिचा सहस्रांशहि मराठी बोलणाऱ्या ब्राह्मण कागदाचे व्यापाऱ्यांनीं दाखविली असती तर आम्हास अधिक आनंद झाला असता.

त्याप्रमाणेंच छपाईचें काम प्रथम गणेश प्रिंटिंगमध्यें करून घेत असतां फार दिरंगाई होऊं लागली व त्यामुळें बराच खर्च अंगावर फार बसूं लागला म्हणून तिसऱ्या भागापासून कलागृह छापखान्याकडे छपाईचें काम देण्यात आलें तें अखेरपर्यंत त्यांचेकडेच चालू राहून त्यांनींहि आम्हास फार सहानुभूतीनें वागविलें याबद्दल त्या छापखान्याचे मालक रा. शंकर सखाराम दाते यांचे आम्ही फार आभारी आहों.

मध्यतरीं सहावा विभाग छापण्याचें काम फारच लांबणीवर पडूं लागलें व पैशाचीहि अत्यंत टंचाई भासूं लागली. कारण भागीदाराकडून आलेली रकम पांच भाग छापण्यात खर्च होऊन गेली होती व सर्व भागीदारांनींच कांहीं विनंति केल्याप्रमाणें सहाव्या विभागाची रकम आगाऊ दिली नाहीं त्यामुळे फार अडचण झाली. अशावेळीं आम्ही आमचे मित्र रा. रा. न. अभ्यंकर व रा. श्री. र. राजगुरु यांची मदत मागितली व त्यांनींहि आम्हास सहावा विभाग छापून काढण्याच्या कामीं मदत करून आम्हांस मोठ्या पेंचांतून बाहेर काढलें. सहावा विभाग बाहेर पडल्यावर सातव्या विभागाची एवढी अडचण आम्हास वाटली नाहीं. कारण त्यापूर्वीच संपादकाचें काम व पगार निम्मा करून इतर सर्व मदतनीस कमी केले होते व खर्चावर अगदीं काटकसर चालविली होती व अखेरहि नजरेंत आल्यामुळें एक प्रकारचा उत्साहहि वाटूं लागला होता. तेव्हां या वर उल्लेखिलेल्या मदतीबद्दल आम्ही या मित्रद्वयाचे आभार येथें व्यक्त करणें अवश्य आहे.

मध्यतरीं तिसरा, चवथा व पाचवा विभाग लवकर छापून निघावे म्हणून त्याच्या प्रस्तावना समर्थ भारतकडे छापून घेतल्या त्यांचाहि या सहाय्याबद्दल निर्देश करणें अवश्य आहे.

जोंपर्यंत गणेशप्रिंटिंग वर्क्स मध्यें काम चालू होतें तोंपर्यंत बाघणीचें कामहि त्यांचेकडेच असे परंतु तेथून काम काढल्यानंतर रा. कोकाटे बंधु यांचेकडे बाघणीचें काम देण्यात आलें व त्यांनींहि तें शेवटपर्यंत आमच्याशीं सहानुभूतिपूर्वक वागणूक करून तडीस नेलें याबद्दल त्यांचेहि येथें आभार मानिले पाहिजेत.

शब्दकोश छपाईचें काम ज्ञानकोशापेक्षाहि जास्त किचकट व कटाळवाणें व वरचेवर दुरुस्त्या करावयास लावणारें, यामध्यें प्रत्येक स्वल्पविराम, अर्धविराम वगैरे चिन्हें, ल्हानमोठा टाइप, अवतरणचिन्हें, डॅश वगैरे सर्वांसच महत्त्व व आकडेहि नीट टाकले पाहिजेत नाहीं तर प्रत्येकात चुक व्हावयाची याकरितां हेंच काम करण्यात तरबेज झालेला जुळारीवर्ग अवश्यक होता व शक्य तों ज्ञानकोशान असलेल्या मडळीस एकत्र ठेवावयाचें या प्रयेस अनुसरून ज्ञानकोशामध्यें विद्यासेवकाचें काम करणारे रा रा मुकुंद सदाशिव देवकुळे याचेकडे आरभापासुन छापखान्याची व्यवस्था सोंपविली व त्यानींहि आमचा हतु पूर्णपणें ध्यानात घरून आपला जुळारी वर्ग तयार केला व मुद्रित दुरुस्तीचे आमचे श्रम वाचविले मजकूर ध्यानात घेऊन दुरुस्ती लक्ष्यात घेऊन काम शक्य तितकें शुद्ध करण्याकडे त्यांनीं नेहमीं लक्ष्य ठेवून अत्यंत निरलसपणें व चिकाटीनें व आमच्या अडचणींतहि स भागी होऊन हें काम पूर्ण होईपर्यंत आम्हास सहाय्य केलें या बद्दल आम्हास त्याचा अभिमान वाटणें साहजिकच आहे रा देवकुळे ह सुप्रसिद्ध कै रावजी मोरेश्वर देवकुळे याच्याच परपरेतील आहेत ही गोष्ट येथें नमूद करावीशी वाटते

सपादक वर्गाचीं नावें प्रथावर येतात व तीं सर्वांस माहीत होतात पण कचेरीची व्यवस्था पाहणारी मडळी पडद्याआड अस तात पण त्याचीहि मदत अशा कार्यांत महत्त्वाची असते तेव्हा हिशोबी व लिहिण्याचें काम करणारे व आमचे मदतनीस रा रामचद्र मोरेश्वर देव हे ज्ञानकोशाच्या कार्यांतहि कचेरींत असून विद्यासेवकाच्या कामात मला मदत करीत असत तेव शब्दको-शाच्या आरभापासून आमच्याकडे सर्व अडचणी सोसून र हिले हें त्याचें कामावरील व आम्हावरील प्रेमाचें द्योतक आहे व त्या बद्दल आम्हास फार धन्यता वाटते तसेच एक ज्ञानकोशातीलच आमचे सहायक रा द ना. वोकील हहि या कार्यांत बरेच दिवस आमच्या कचेरींत होते पण मध्यतरीं केलेल्या काटकसरींत त्यास आम्हांस सोडावें लागलें तिसरे आमचे कचेरींतील कार्यकर्ते रा. ना न्य पुरंदरे हेहि आपलें काम दक्षतेनें व काळजीपूर्वक करून आम्हास सर्व प्रकारें मदत करीत आले आहेत

याखेरीज मध्यतरीं काहीं पदवीधर व इतर कार्यकर्ते आम्ही आमच्या मदतीस घेतले होते त्याचीं नावें पुढें दिलीं आहेत

रा रा यशवत गोपाळ कानेटकर, रा रा पुरुषोत्तम सावळा राम दीक्षित, रा रा नरहर रामकृष्ण तळेकर, रा रा विठ्ठल दिनकर आधारकर, रा रा वि ल कोराणे, रा रा केशव नरहर शास्त्री, रा रा भालचद्र शकर डागे, रा रा गो वि राजगुरु, रा रा नारायण लक्ष्मण करमरकर, रा रा एम् व्ही पेंडसे

आमचे ग्राहक--महाराष्ट्र शब्दकोशाच्या कामांत विशेष सहाय्य कोणाकडून झालें त्याचा निर्देश मागें केलाच आहे. त्याचें सहाय्य हें विशेष प्रकारचें असल्यामुळें त्याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहोंच पण आमचा मुख्य भर ज्या मध्यम वर्गावर असतो त्या वर्गाकडून आमच्या कार्यास कशी सहानुभूति मिळाली हेंहि येथें नमूद केल्यास त्याचेहि आम्ही उतराई होऊ व इतर कार्यकर्त्यांसहि तें बोधप्रद होईल यात शका नाहीं. मध्यमवर्गास विशेष महत्त्व देण्यात पूर्वी ज्याचा आम्ही उल्लख केला त्याचें महत्त्व आम्ही कमी समजतों असें नव्हे तर उलट त्याच्या सारखी जर काहीं मडळी अशा कार्यांत विशेष लक्ष्य घालतील तर अशीं कार्यें अधिक विविध प्रकारचीं व जास्त व्यव स्थित व पद्धतशीर होण्यास मदतच होईल वाङ्मयीन कार्य-कर्त्यांमागचा द्रव्य जमविण्याचा व बिलें देण्याचा ससेमिरा जर कमी होईल तर त्यास आपलेंच कार्य अधिक उत्साहानें, मन व्यग्र न होऊ देता व अधिक कार्यक्षमतेनेंहि करण्यास सापडेल पण मध्यम वर्गावर भार टाकण्यापासुनहि कार्यकर्त्यास एक लाभ होतो तो म्हणजे मनुष्यस्वभावाचा अभ्यास करण्यास मिळा-लेली सधि, सर्व महाराष्ट्र किंबहुना देशभर प्रवास करण्याची जरूरी व त्यामुळें विविध प्रकारच्या कार्यकर्त्यांशीं, मित्राशीं वगैरे होणारा विचारविनिमय, परिचय व ज्ञानवृद्धि हा होय असो आमचे मध्यम वर्गातील ग्राहक सर्व महाराष्ट्रातच नव्हे तर सिमल्यापासुन रामेश्वरापर्यंत सर्व देशभर पसरलेले आहेत त्यात-ल्यात्यात ज्या ठिकाणीं आमचे दहापेक्षा अधिक ग्राहक आहेत अशा गावाची पुढें प्रदेशवार माहिती दिली आहे ती बरीच उद्बो-धक होईल

त्याप्रमाणेंच या माहितीमुळें दुसराहि एक जनतेचा गैरसमज दूर होईल असेंहि म्हणावयास हरकत नाहीं अलीकडे सामान्यत सर्वत्र असें प्रतिपादण्यात येतें कीं पुण्यातील मडळी स्वत पैसा खर्च न करता बाहेरून पैसा आणून पुण्यातील सस्था चालवितात आता पुण्यात सस्था पुष्कळ आहेत ही गोष्ट खरी व त्यातील काहीं सर्व महाराष्ट्राच्या तर काही अखिल भरतखडाच्या उपयोगी असें कार्य करीत आहेत उदा० पुण्यास स्थापन झालेलें वैदिक सशोधन मडळ, महिला विद्यापीठ भाडारकर प्राच्य विद्यामदिर, वगैरे सर्व भरतखडाचें कार्य करीत आहेत भारतइतिहाससशोधक-मडळ वगैरे सारख्या सस्था महाराष्ट्राचें कार्य करीत आहेत महाराष्ट्र शब्दकोशाचें कार्यहि सर्व महाराष्ट्राचें आहे तेव्हा असें कार्य कोठेंहि होत असलें तरी त्यास सर्व महाराष्ट्राकडून सहाय्य होणें जरूर आहे ज्ञानकोशाचें कार्य नागपुरला सुरू झालें तरी पूर्ण होण्याकरिता पुणें येथेंच आणावें लागलें शब्दकोशाचें कार्य तर पुण्यासच सुरू झालें तेव्हां प्रथम पुणें येथील जनतेनें या

कार्यास कसें सहाय्य केलें व त्या मानानें इतर ठिकाणीं कोणत्या प्रमाणांत सहाय्य झालें हें पाहिलें म्हणजे पुण्यावरील वर उल्लेखिलेल्या आक्षेपास परभारेंच उत्तर मिळेल.

महाराष्ट्राच्या पुणें मुंबई व नागपूर या तीन राजधान्या मानल्या जातात व त्यांत पुणें ही महाराष्ट्राची शैक्षणिक राजधानी आहे ही गोष्ट मुंबई युनिव्हर्सिटीच्या व्हाइस चान्सेलरनींच आपल्या एका पुणें येथील भाषणांत बोलून दाखविली होती व शब्दकोशाच्या कार्यांत तरी पुण्यानें आपला हा लौकिक कायम ठेवला आहे ही गोष्ट पुणें येथें ३८० मुंबई येथ २३० व नागपूर येथें १४४ ग्राहक आहेत यावरून उघड होईल म्हणजे पुणें शहरानें नागपूर व मुंबई मिळून होणाऱ्या संख्येपेक्षाहि अधिक ग्राहक देऊन आपल्यावरील जबाबदारी उत्तमरीतीनें पार पाडली आहे.

आतां वऱ्हाडकरांच्या मंडळींचें नेहमीं असें म्हणणें असतें कीं महाराष्ट्र नेहमीं वऱ्हाड प्रांताला लुटून पैसा नेतें व कामें करतें. शब्दकोशाच्या बाबतींत तरी वरील तीन शहरें सोडून जिल्ह्यांच्या ठिकाणांचा विचार करतां वऱ्हाडची ही उदार वृत्ति आमच्या उपयोगी पडली नाहीं हें दुर्दैवानें नमूद करावें लागतें. पुण्यानंतर सर्वांत जास्त अशी ग्राहकांची संख्या महाराष्ट्रांतील सर्वांत दुष्काळी म्हणून प्रसिद्ध असलेल्या अहमदनगर शहरांत (३९) आहे. त्या खालोखाल सोलापूर (३७), नाशिक (३६), सातारा (३३), व धुळें (३१) अशी असून सर्वांत श्रीमंत समजल्या जाणाऱ्या पूर्व खानदेशाच्या राजधानींत धुळ्यापेक्षां कमीच (म्हणजे २४) ग्राहक आहेत उलट कोंकणच्या किनाऱ्यावरच्या मागासलेल्या समजल्या जाणाऱ्या मालवण गांवीं (२७) आहेत ठाणें व कल्याण या दोन्ही गांवीं प्रत्येकीं (२२) ग्राहक असून राजापूरच्या पेठेंत (१९) तर अमळनेरच्या पेठेंत (१२) रत्नागिरी व देवरुख येथें (११), तर पंढरपूर क्षेत्रांत (१२) व वाई क्षेत्रांत (१०) ग्राहक आहेत.

या बरोबर वऱ्हाडच्या जिल्ह्यांच्या ठिकाणांची तुलना केली तर अकोला (२४), अमरावती (२२), यवतमाळ (१२) व वणी या तालुक्याच्या गांवीं (१०) अशी संख्या आहे.

मराठी मध्यप्रांतांत नागपूरचा आंकडा वर दिलाच आहे. त्यानंतर वर्धा (२१), चांदा (१२) व भंडारा येथें (१०) ग्राहक आहेत म्हणजे मध्यमहाराष्ट्रांतील ग्राहकांची संख्या वऱ्हाड व मराठी मध्यप्रांताच्या ग्राहकांच्या दुप्पट आहे.

हिंदी मध्यप्रांतांत जरी जिल्ह्यांच्या ठिकाणीं महाराष्ट्रीय वस्ती बरीच असली तरी आमच्या दृष्टीनें दहा ग्राहकांच्या वर संख्या आढळलेलीं ठिकाणें फक्त जबलपूर (२२) व खांडवा (१०) हीं दोनच आहेत.

महाराष्ट्राच्या बाहेरच्या विभागाचा विचार करावयाचा म्हणजे कर्नाटकांतील महाराष्ट्रीयांचा संबंध महाराष्ट्राशीं विशेष दृढ असून तेथें महाराष्ट्रीय संस्कृति चांगलीच दृढमूल झाली आहे. त्यामुळें त्या भागांत शब्दकोशाच्या ग्राहकांची संख्या समाधानकारक दिसून येते त्यांत अर्थात् बेळगांव अर्धे महाराष्ट्रीय असल्यामुळें सर्वांत पुढें असून तेथें (२०) तर हुबळी (१६) आणि धारवाड व विजापूर येथें (१४) याप्रमाणें ग्राहक आहेत व दक्षिणेकडे बंगलोर येथें (१४) तर मद्रासेस (१०) आहेत.

त्या मानानें गुजराथकडे महाराष्ट्रीयांची संख्या दिवा महाराष्ट्रांतील कार्याबद्दल आस्था कमी असावी असें वाटतें. कारण तिकडील खुद्द बडोदें सोडलें तर दहापेक्षां अधिक ग्राहक असलेलें शहर फक्त अहमदाबाद असून तेथें १५ ग्राहक आहेत.

बृहन्महाराष्ट्रांतील उत्तरेकडचा भाग घेतल्यास कानपूर, दिल्ली व बनारस हीं आपल्या संस्कृतीचीं केंद्रें असून तेथें अनुक्रमें दहा, तेरा व दहा असे ग्राहक आहेत.

गोमांतक हा जरी राजकीय दृष्ट्या अलग असला तरी आम्ही त्यास महाराष्ट्राचाच भाग समजतों व तेथील मंडळींची महाराष्ट्रांतील चळवळीस जी सहानुभूति आढळून येते ती इतरत्र क्वचितच आढळते व आमच्या कार्यावर त्यांचें विशेषच प्रेम दिसून आलें. त्यामुळें त्यांतील मुख्य जीं पणजी (२२) व मडगांव (२०) हीं गावें, त्या ठिकाणीं आमचे ग्राहक खुद्द महाराष्ट्रांतील कांहीं जिल्ह्यांच्या ठिकाणांपेक्षांहि अधिक आहेत ही गोष्ट विशेष अभिनंदनीय आहे.

यानंतर संस्थानांकडे दृष्टि दिल्यास महाराष्ट्रीय संस्थानांत सर्वांत मोठें संस्थान जें ग्वाल्हेर तेथेंच आमचे सर्वांत अधिक म्हणजे (८९) ग्राहक आहेत. अर्थात् या ठिकाणीं प्रत्यक्ष संस्थानिकांकडून मिळणाऱ्या मदतीचा विचार केलेला नसून इतर जनतेसंबंधीं आपण विचार करीत आहों ही गोष्ट लक्ष्यांत ठेवली पाहिजे. ग्वाल्हेरनंतर अनुक्रम बडोद्याचा लागतो व त्या दोहोंमध्यें फक्त एकच आंकड्याचें अंतर आहे. यावरून बडोदें शहर आकारानें लहान असूनहि तेथें जी विद्याभिरुची वाढली आहे तिचा स्पष्टपणें बोध होतो. त्यानंतर आमची महाराष्ट्राची व छत्रपतींची राजधानी कोल्हापूर (६८) येते. वास्तविक हें शहर बडोदें व ग्वाल्हेरपेक्षां बरेंच लहान असून तेथें विद्येची प्रगति किती झाली आहे याचें हें द्योतक आहे.

यानंतर महत्त्वाचें संस्थान इंदूर यांत ६४ ग्राहक आहेत पण इंदूर व कोल्हापूरपेक्षांहि हैद्राबाद येथें ग्राहकांची संख्या अधिक असून ती ७० आहे. या गोष्टीचें आपणास नवल वाटल्यावांचून राहणार नाहीं.

यानंतर अनुक्रमें सांगली (१०), मिरज (१४), देवास (१२), धार (१०) याप्रमाणें ग्राहक आहेत व फल्टण सारख्या ल्हान गावातहि आमचे (११) ग्राहक आहेत ही गोष्ट तेथील संस्थांच्या सुविद्य अधिपतींनीं व दिवाणांनीं प्रजेंत उत्पन्न केलेल्या विद्येच्या अभिरुचीमुळेच शक्य झाली आहे याबद्दल शंका वाटत नाहीं.

याप्रमाणें एकंदर आमच्या ग्राहकांचा प्रादेशिक दृष्टया ठोकळ आढावा आहे. यांत एकदम मिळालेल्या देणग्या वगैरेंचा विचार केलेला नसून दहापेक्षां कमी ग्राहक असलेल्या गांवांचाहि विचार केलेला नाहीं ही गोष्ट मात्र लक्षांत ठेवून याचा विचार केल्यास तो फराच उद्बोधक होईल यांत शंका नाहीं.

प्रसिद्धी—आजचें युग जाहिरातीचें असून जो तो आपल्या कार्याची जाहिरात करीत असतो या कामीं बंगाली लोक सर्वांच्या पुढें असून आपण महाराष्ट्रीय सर्वांच्या मागें आहोंत. तथापि आपलें कार्य जनतेच्या नजरेपुढें नेहमीं असणें अवश्य आहे हीहि गोष्ट तितकीच महत्त्वाची आहे. तेव्हां आम्ही आमच्या प्रचारकार्यामध्यें अगर इतर आनुषंगिक कामामुळें व्याख्यानें वगैरे देण्यास अगर परिषद्–संमेलनास गेलों तर आमच्या कार्याची माहिती, व्याख्यान अगर इतर मार्गांनी शक्य तितकी देतच असूं पण वर्तमानपत्रांतहि मधून मधून आमच्या प्रगतीचे अहवाल देऊन हें प्रचाराचें कार्य चालू ठेवीत असूं. विशेष प्रचाराची जरूर आमचे ग्रंथ बाहेर पडण्यापूर्वीच होती पुढें प्रत्यक्ष ग्रंथ पाहून अनेक लोकांस कार्याची कल्पना येत असे. या आरंभीच्या काळांत व नंतरहि आम्हांस अनेक पत्रकारांनीं आम्ही वेळोवेळीं पाठविलेलीं विनंतिपत्रकें, जाहीरपत्रकें वगैरे चांगल्या ठिकाणीं छापून आम्हांस पुष्कळच मदत केली. या प्रकारचें साहाय्य आम्हांस केसरी, ज्ञानप्रकाश, महाराष्ट्र व नवाकाळ यांकडून विशेष मिळालें केसरीमध्यें तर आमचीं यच्चयावत् पत्रकें छापून आलीं होतीं व आमच्या शेअरच्या अर्जाचाहि फॉर्म एकदा छापला होता व तोच कापून काढून भरून पाठवून देवासचे रा. चि. ग. आक हे आमचे भागीदार झाले ही गोष्ट आम्हांसहि नवल वाटण्यासारखी वाटली. केसरी मोंगलाईंत जात नाहीं त्या प्रांतात महाराष्ट्र व ज्ञानप्रकाश यांचा आम्हांस फार उपयोग झाला.

आमचे विभाग जसजसे प्रसिद्ध होत गेले तसतसे अभिप्रायहि वरील पत्रांनीं देऊन आम्हांस उत्तेजन दिलें.

वरील पत्रांची आम्हांस विशेष सहानुभूति असल्यामुळें व आम्ही पाठविलेली माहिती बहुधा प्रमुख जागच्या मजकुरांत येत असल्यामुळें त्याचा आम्हांस इतका उपयोग झाला कीं, प्रत्यक्ष जाहिरातीवर अगा आम्ही एक पैसुद्धां खर्च केला नाहीं व जाहिरात न मिळतांहि या पत्रांनीं आमच्या कार्याची प्रसिद्धि केली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

जाहिरात न देण्याचें दुसरें एक कारण असें कीं अशा ग्रंथाला जाहिरातीनें क्वचितच मागणी येते असा आमचा ज्ञानकोशाच्या वेळचा अनुभव आहे ज्यास हा ग्रंथ घ्यावयाचा आहे तो जाहिरातीची वाट पहात नाहीं पण आमचे बहुतेक ग्राहक व्यक्तिशः विनंति करूनच मिळविलेले आहेत तेव्हां जाहिरातींत होणारा खर्च आम्ही अजीबात वांचविला.

ग्रंथांची मदत—अशा तऱ्हेच्या कार्यांना ज्याप्रमाणें द्रव्यबल व मनुष्यबल लागतें त्याप्रमाणें ग्रंथबलहि लागतें. ज्ञानकोशरचनेच्या वेळीं आम्ही फार उत्तम ग्रंथसंग्रह जमविला होता पण तो आमच्याकडून शक्य ते प्रयत्न होऊनहि आम्हांजवळच नव्हे पण येथें पुण्यातहि कोठें एकत्र राहूं शकला नाहीं. तेव्हां शब्दकोशाच्या कार्यास ग्रंथ तर अनेक लागणार व पुढें त्याची वाताहत झाल्यास जें दुःख होतें त्याचा अनुभव पुन्हां येऊं नये म्हणून यावेळीं प्रथमपासून असें धोरण ठेविलें कीं, जोंपर्यंत विनामूल्य किंवा वापरण्यापुरता ग्रंथ मिळेल तोंपर्यंत तो प्रत्यक्ष विकत घ्यावयाचा नाहीं जे महत्त्वाचे कोशादि संदर्भग्रंथ वरचेवर लागतात तेवढेच विकत घ्यावयाचे व बाकीच्या ग्रंथांचें काम उसनवारीवर भागवावयाचें. तेव्हां आम्हांस ग्रंथाकरितां अनेकांकडे याचना करावी लागली परंतु आमची विनंति कोणीहि अमान्य केली नाहीं या कामीं आम्हांस ज्यांची मदत झाली त्यांचा उल्लेख पुढें करीत आहें

बडोदे सरकारनें पुष्कळच ग्रंथ आजपर्यंत प्रसिद्ध केले आहेत त्यांपैकीं कांहीं विकत मिळतात पण कांहीं केवळ त्यांच्याच उपयोगाकरितां खानगीमधून तयार झालेले ग्रंथ आहेत ते बाहेर मिळणें शक्य नसतें तेव्हां आम्ही खाजगी कारभारी व विद्याधिकारी यांचेकडे अर्ज करून त्यांचेमार्फत प्रसिद्ध झालेले ग्रंथ आम्हांस मिळावे अशी विनंति केली व ती मान्य होऊन आम्हांस ते सर्व ग्रंथ मिळाले याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत याचप्रमाणें केसरी कचेरीमार्फत प्रसिद्ध झालेले सर्व ग्रंथ आम्हांस विनामूल्य मिळाले यानंतर व्युत्पत्ति वगैरेच्या दृष्टीनें बहुमोल ग्रंथ श्री गंगाधरराव नारायणराव उर्फ आबासाहेब मुजुमदार यांचेकडून मिळाले, भारत इतिहास संशोधन मंडळांतील ग्रंथसंग्रहाचाहि आम्हांस फार उपयोग झाला तसेच श्री सरदार तात्यासाहेब मेहेंदळे व श्री. दत्तो वामन पोतदार व श्री. दाजीसाहेब पटवर्धन यांचेकडूनहि बरेच

प्राचीन ग्रंथ मिळाले, तसेच श्री. श्रीकृष्ण नीळकंठ चाफेकर, श्री पांडुरंगण्णा शिराळकर, वगैरेकडून कांहीं उपयुक्त ग्रंथ मिळाले. श्री. रामचंद्र बळवंत टिळक यांनीं नामजोशी कोशाची हस्तलिखित प्रत दिली तिचा आम्हांस फार उपयोग झाला.

तसेच प्रस्तावना लिहितांना भांडारकर इन्स्टिट्यूट, फर्ग्युसन कॉलेज व सर परशुरामभाऊ कॉलेज, सर्व्हंट्स ऑफ् इंडिया सोसायटी, केसरी संस्था यांच्या ग्रंथ संग्रहालयांचाहि आम्हांस भरपूर उपयोग करून घेतां आला त्याबद्दल त्यांचाहि कृतज्ञता पूर्वक उल्लेख करणें जरूर आहे.

याखेरीज विशेष आभार मानावयाचे म्हणजे ज्या गृहस्थांस आम्ही सल्लागार मंडळांत येण्याची विनंति केली व ती ज्यानीं मान्य केली व जेव्हां जेव्हां आम्हांस जरूर वाटली व आम्ही विचारलें तेव्हां योग्य सल्ला दिला याबद्दल खालीं नांवें दिलेल्या मंडळीचे आम्ही विशेष आभारी आहों. यामध्यें श्रीमत संस्थानिकापासून वाङ्मसेवकापर्यंत अनेक दर्जाची व योग्यतेची मंडळी आहेत.

श्री महाराज सयाजीराव गायकवाड, ( बडोदें )
श्री. राजेसाहेब पंतप्रतिनिधि, ( औन्ध ).
श्री. राजेसाहेब बाळासाहेब पटवर्धन, ( मिरज ).
श्री नारायणराव उर्फ बाबासाहेब घोरपडे, (इचलकरंजी)
श्री रावराजे गणपतराव राजवाडे, ( ग्वाल्हेर ).
श्री गंगाधर नारायण उर्फ आबासाहेब मुजुमदार.
श्री नरसिंह चिंतामण केळकर.
कै श्री. चिंतामण विनायक वैद्य
श्री. विठ्ठल रामजी शिंदे.
प्रि. वैजनाथ काशिनाथ राजवाडे.
प्रो दत्तो वामन पोतदार.
श्री. नारायण गोविंद चापेकर.
श्री. यादव माधव काळे.
प्रो श्रीकृष्ण निळकंठ चापेकर.
प्रो. यशवंत खुशाल देशपांडे.

अशारीत आम्ही सर्व संपादक मंडळी ज्ञानकोशांत अनेक वर्षे एकत्र काम करून त्यांतून पुढें निघालेल्या या महत्त्वाच्या स्वभाषेच्या कार्यांत आज दहा वर्षे एकत्र राहून काम करीत आलों व ज्ञानकोशाची परंपरा पुढें चालविली व मला पुढें करून माझे मित्र रा चिंतामणराव कर्वे, रा. आबा चांदोरकर व रा. चिंतामणशास्त्री दातार यांनीं निरलसपूर्ण आतापर्यंत सर्व प्रकारच्या अडचणींत समभागी होऊन माझ्याशीं जें सहकार्य केलें त्याबद्दल त्यांचाहि येथें मित्र भावानें सादर उल्लेख केला पाहिजे अशीं कार्यें केवळ एकट्यादुकट्या व्यक्तीच्या हातुन होत नाहींत व संघशक्तीनें तीं केलीं तरच यशस्वी होतात व त्याकरिता अशा तऱ्हेनें एकजुटीनें कार्य करण्याची ही परंपरा महाराष्ट्रांत यापुढें वाढत जाईल व मराठी भाषेच्या व एकंदर महाराष्ट्राच्या उत्कर्षास अनेक अंगानीं कारण होत जाईल अशी आशा व्यक्त करून महाराष्ट्रानें अशींच कार्यें आम्हाकडून यापुढें करून घ्यावीं व परमेश्वरानें तीं करण्यास आम्हांस समर्थ करावें व 'क्लेश: फलेनहि पुनर्नवतां विधत्ते ' ही उक्ति आमच्या बाबतींत सार्थ करावी एवढीच प्रार्थना करून ही प्रस्तावना पुरी करतों.

यशवंत रामकृष्ण दाते.

# महाराष्ट्र शब्दकोश

## ग्रंथसंक्षेप सूची (पुरवणी)

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक प्रकाशक इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| अग्नि | अग्निक्रीडा | संपा. रं. स. लाळे किंकवीकर | पृष्ठ |
| अर्वाचीन | अर्वाचीन कविता (पूर्वार्ध) | संपा. कवि चंद्रशेखर, प्र. ग्रंथप्रसारक मंडळी सन १९०४ | पृष्ठ |
| अस्पृ | अस्पृष्टांचा प्रश्न | ले. श्री. म. माटे; लोकसंग्रह प्रेस, १९३३ | पृष्ठ |
| आन | आनंदतनयकृत नवरसचरित्र | आनंदतनयकृत कवितासंग्रह, संपा. ज. बा. मोडक, वा. दा. ओक, निर्णयसागर १८९१ | कविता, अंक |
| आफर्माने | आदिल्शाही फर्मानें | भा. इ. सं. मं. अखेरची यादी | |
| आमहा | आनंदतनयकृत महाबळ चरित्र | आनंदतनयकृत कवितासंग्रह | कविता, अंक |
| आराम | आनंदतनयकृत रामचरित्र | ,, ,, | ,, ,, |
| आश-आशबरी | आनंदतनयकृत शबरी आख्यान | ,, ,, | ,, ,, |
| आविश्वा | आनंदतनयकृत विश्वामित्राभिगमन | ,, ,, | ,, ,, |
| आसेतु | आनंदतनयकृत सेतुबंध | ,, ,, | ,, ,, |
| एक | एकचप्याला नाटक | संपा. गडकरी आवृत्ति ६ वी १९३२ | पृष्ठ |
| एशिआ | एका शिपायाचें आत्मवृत्त | संपा. जनरल नानासाहेब शिंदे, सयाजी साहित्यमाला, पुष्प २३९ वें | पृष्ठ |
| कथासारा | कथासारामृत (महिपतिकृत) | | अध्याय, ओवी |
| कला | कलावंत खातें (बडोदें) | | पृष्ठ |
| कांगमो | कांचनगडची मोहना नाटक | संपा. कृ. प्र. खाडिलकर, आवृत्ति ५वी, १९२१ | पृष्ठ |
| कालिका | कालिकापुराण | | अध्याय, ओवी |
| किंशुक | किंकरकविकृत शुकरंभासंवाद | अनेककविकृत कवितासंग्रह भाग २ रा | कविता |
| कीच | कीचकवध नाटक | संपा. कृ. प्र. खाडिलकर, आवृत्ति २ री | पृष्ठ |
| कीर्तन | कीर्तनतरंगिणी | संपा. दामोदर गणेश जोशी, आवृत्ति १० वी, सन १९१२ | भाग, पृष्ठ |
| कृकौ | कृष्णकौतुक | | कविता |
| कृयु | कृष्णार्जुनयुद्ध नाटक | संपा. न. चिं. केळकर | पृष्ठ |
| खाअ | खासगी खात्यातील अंमलदाराचे अधिकार | बडोदें | पृष्ठ |
| खानो | खानगींतील नोकरांचे पोषाख | बडोदें | पृष्ठ |
| खाला | खानगी खातें लागतीचे नियम | बडोदें | पृष्ठ |
| खेया | खेड्यातील यात्रा | संपा. द. वा. पोतदार, आनंद प्रेस, सातारा सन १९२९ | पृष्ठ |
| गलिव्ह | गलिव्हरचा वृत्तांत | | पृष्ठ |
| गुजा | गुन्हेगार जाती | संपा. त्रि. ना अत्रे | पृष्ठ |
| चंद्रग्र | चंद्रग्रहण नाटक | संपा. य. ना. टिपणीस | पृष्ठ |
| तप | तपशीलपत्रकें. मॅरट पहा. | कर्नल मॅरटकृत पुस्तकाचें भाषांतर, संपा. शं. श्री. देशपांडे | पृष्ठ |

| संक्षेप | ग्रंथनाम | संपादक प्रकाशक इ० | आंकड्यांचा खुलासा |
|---|---|---|---|
| तीप्र | तीर्थयात्रा प्रबंध | संपा. लेले | पृष्ठ |
| देकृष्णजन्म | देवनाथकृत कृष्णजन्म | | कविता |
| देहु | देशी हुन्नर ( हिंदुस्थानांतील कारागिरीचें वर्णन ) | संपा. बा. आ. गुप्ते, प्रका. मा. का. नामजोशी, आर्यभूषण प्रेस, १८८९ | पृष्ठ |
| द्रौ | द्रौपदी नाटक | संपा. कृ. प्र. खाडिलकर, आवृत्ति २ री | पृष्ठ |
| नव, नवनीत | नवनीत | संपा. परशुराम तात्या गोडबोले आवृत्ति, ८ वी सन १९२१ | पृष्ठ |
| पाक | पाकशास्त्र | संपा. पाठक | पृष्ठ |
| पुण्य | पुण्यप्रभाव नाटक | संपा. गडकरी, सन १९१७ | पृष्ठ |
| पेब | पेशव्यांची बखर | संपा. कृष्णाजी विनायक सोहनी, प्रका. का. बा. साने. आवृत्ति ५ वी | पृष्ठ |
| पेशवे | पेशवेकालीन महाराष्ट्र | संपा. वा. कृ. भावे | पृष्ठ |
| पैमा | पैमाबिंदु | कविभास्कर ( अप्रकाशित ) | कला |
| प्रेम | प्रेमसंन्यास नाटक | संपा. गडकरी, आवृत्ति २ सन १९२२ | पृष्ठ |
| बाचि | बालरोगचिकित्सा | संपा. पांडुरंग गोपाळ, मुंबई १८७२ | पृष्ठ |
| बाय | बायकांचें बंड नाटक | संपा. कृ. प्र. खाडिलकर | पृष्ठ |
| भारा | भावार्थ रामायण | एकनाथकृत | कांड, अध्याय, ओवी |
| मऐलि | मराठी ऐतिहासिक लिलालेख | | |
| मराचिथोरा | म. रा. चिटणीस–थोरले राजाराम महाराज | बखर | पृष्ठ |
| मानाप | मानापमान नाटक | संपा. कृ. प्र. खाडिलकर | पृष्ठ |
| माज्ञा | माडगांवकराची ज्ञानेश्वरी | | अध्याय, ओवी |
| मोमरा | मोरोपंतकृत–मंत्ररामायण | | अध्याय, कविता |
| मोविराट | मोरोपंतकृत–विराटपर्व | | अध्याय, कविता |
| बाददुबा | दुसरा बाजीराव रोजनिशी | संपा. ग. चि. वाड | पृष्ठ |
| विकार | विकारविलसित | गोपाळ गणेश आगरकर | पृष्ठ |
| शास्ते | शास्ते | बायबल मराठी भाषांतर | अध्याय, वचन |
| सुपनि | सुपदार्थ नियम | संपा. शं. रा. हतवळणे, मुंबई १८८९ | पृष्ठ |
| ज्ञागा | ज्ञानेश्वर गाथा | | अभंग |

याशिवाय ज्या ग्रंथांतील अवतरणें शब्दकोशांत थोडयाच वेळां घेतलीं आहेत त्यांचीं नांवें संक्षेप करून न देतां संपूर्ण दिलीं आहेत असे अनेक ग्रंथ आहेत त्यांपैकीं कांहींचीं नांवें पुढें दिलीं आहेत:—अध्यापन, अरुणोदय, आठल्ये ( कृ. ना. ) यांची कविता, आनंदीरमण, इलासुंदरी, उष:काल, कमला, करुणाष्टकें, कल्याण नाटक, कान्होपात्रा, किरातार्जुन, केशवकुमार ( कविता ), गुप्तमञ्जूष, गोविंद कवि, ग्रामराज, चक्रधर सिद्धांतसूत्रें, जन्मरहस्य, तात्याची कविता, तुफान, दत्तपदें, दामाजी नाटक, धनुर्भंग नाटक, धर्मसिंधु, धर्माजी, पुणेबखर, प्रतिमासाधन, प्रेमशोधन, बदलापूर, बदीशाला, बाजीराव, भयंकर दिव्य, मराठयांची बखर, महाराष्ट्र कुपीबल, महाराष्ट्र शारदा, महिपतिकृत पांडुरंग स्तोत्र, मिताक्षरा, मुलांचा व्यावहारिक कोश, यशोधन, रत्नकांता, रत्नप्रभा, राजसंन्यास, रासक्रीडा, लक्ष्मी आणि सरस्वती, वज्राघात, वरदचीची कथा, वाग्वैजयंती, विध्याचल, वेडयांचा बाजार, वाशिसेना, शापसभ्रम, शारदा, शिवपाविजय, शिवाजी, सवतीमत्सर, सहचारिणी, सौभद्र, स्वरशास्त्र इत्यादि.

॥ श्री ॥

# महाराष्ट्र शब्दकोश

## विभाग सातवा

## वे

**वे**—( संक्षेप ) वेदशास्त्रसंपन्न

**वें**—जुन्या मराठींतील तृतीयेचा प्रत्यय, नें 'निरूपणी येऊन बैसला। तो विंचुवें फणकाविला।' –दा १८ १० २३ [ ए प्रत्यय ]

**वेउळ**—पु एक हिंस्र पशु चित्ता 'मग तया सिंहें आपुले सेवक। वाघु वेउळु कोल्हा काउळा। तयातें म्हणितलें।' –पंच ३९ ४१ [ स व्याल ] **वेउळी**–स्त्री वाघीण, इगळी 'का आयुष्य जातिये वेळे। शेळिये सात वेउळी मिळे।' –ज्ञा १६ २५९

**वेंकट**—पु व्यंकटेश, व्यंकोबा 'कथा वेंकटीची कथा वीटलाची।' –राक १ ११ –वि वाकडा 'भृकुटी वेंकट वेंकट पाहे।' –दावि ७७० [ स व्यंकट ]

**वेंकावल्या**—स्त्री अव ( प्र ) वाकुल्या, वेडींवाकडीं तोंडें, ओठें करून वेडावणें

**वेक्ती**—स्त्री ( प्र ) व्यक्ति, १ माणूस 'पिंडब्रह्मांडतत्त्व रचना। विधाकारें वेक्ती नाना।' –दा ४ ९ १३ २ व्यक्ति, व्यक्तता, उघड आकृति, दिसणारा आकार 'जे अवेक्त पुरुषाची वेक्ती। विस्तारें वाढली इच्छाशक्ति।' –दा १ ३ ११ [ स व्यक्ति ] **वेक्त**–वि व्यक्त, स्पष्ट, उघड, आकारयुक्त 'ऐसीं पंचमहाभूतें। पूर्वी होतीं अवेक्तें। पुढें जालीं वेक्तें। सृष्टिरचनेसी।' –दा ८ ३ ५७ [ सं व्यक्त ]

**वेख**—पु १ वेष, पोशाख २ आकृति, रूप, सोंग 'तो ब्रह्मचि मनुष्यवेखें। ओळख तू।' –ज्ञा ४ १०५ ३ दृष्टि, स्वरूप 'तरीं वैसेनि या वेखें। सदा सुखियें एकें।' –ज्ञा १५ ४१२ [ स वेष ]

**वेखंड**—न एक औषधी द्रव्य मूळ हें वात आणि कृमि याचा नाश करणारें आहे [ स वच+खंड ] म्ह० वेडा वाणी वेखंडाचा पसारा

**वेखसें, वेखासें-शें**—वि १ विरुद्ध, वाकडें 'परी धर्मासि वेखासें। जावों नेदी।' –ज्ञा ७ ४७ २ बोखटें, वाईट 'तेवीं वेखासें अतरीं। राहों नेणें।' –ज्ञाप्र १०१ ३ व्यर्थ [ स द्वेष्य, प्रा वेस; स द्वेषस्=शत्रुत्व ]

**वेग**—पु १ गतीचा जोर, जोराची गति, गतिमान् पदार्थाचा जोर 'आणि मातलिया इंद्रियांचे वेग।' –ज्ञा १६ १९२. २ त्वरा, गडबड, घाई, झपाटा, सपाटा, जल्दी –ज्ञा २.१७. 'तुम्हीं आता वेग कीजे। नळाची शुद्धि लाविजे।' –कथा १. १० ७५ ३ आवेश, जोर, उत्साह 'आटु वेगु विंदाणु। आशा शंका प्रतारणु। हे सन्यासिले अवगुणु। जिया वाचा।' –ज्ञा १३. २७१ ४ वेदना, कळ, अंगात भिनत असलेल्या विषाच्या लहरी किंवा वेदनेच्या उसळया प्रत्येक, पेटका ५ मलमूत्र विसर्जनाची घाई, गुदद्वारें मलविसर्जन होताना येणारा आवेग शौच, जुलाब, ढाळ ६ हल्ला 'कपीवीर चौताळला वेग केला।' –राक १ ६ ७ एखादें काम करण्याची आकस्मिक उसळी, मनानें एकदम घेतलेलें वळण, जोराचा उमाळा, मानसिक शक्तीचा एकदम झालेला उद्रेक, उसळी ८ आधिक्य [ स ] सामाशब्द– **वेगत्तरु**–क्रिवि वेगवत्तर, अतिवेगानें, मोठया जल्दीनें 'घेऊनि निघाला बाहेरि। वेगत्तरु।' –गीता २ २३५५ [ स वेगवत्+तर ] **वेगमान**–न वेगाचें प्रमाण, भ्रामकत्व ( इं ) मोमेंटम [ वेग+मान=मोजणी ] **वेगमोड**–स्त्री वेग कमी करणारी वस्तु, ढकली, खई, धोरपड [ वेग+मोडणें ] **वेगलधार**–पु एक नोकर, वेगवार –राव्य १ १६ **वेगवत(त्त)र**–क्रिवि अति वेगानें, तावडतोब 'कन्हणा नेणता देवो चाले। कौंडण्यापुरा वेगवत्तरू।' –धवळेपू २ ३ ४ **वेगवंत वेगवान्**–वि १ चपळ, वेगानें जाणारा, जलद धावणारा २ जोराची गति असलेला, मोठा वेग असलेला **वेगवती, वेगसंधी**–स्त्री घोडयाच्या गतीचे निरनिराळे प्रकार. –अश्वप १ १८५ **वेगसार**–क्रि ( गो ) लवकर **वेगा** क्रिवि वेगानें, वेगें 'विरहें घालूनिया वेगा।' –मुसभा ९ ८४ **वेगाघात**–पु जिनें चलनयुक्त पदार्थ दुसऱ्या पदार्थावर आपटतो

ती शक्ति हा वेगाघात पदार्थाचें प्रकृतिपरिमाण आणि वेग याच्या गुणाकाराबरोबर असतो -यमू २१९ **वेगाडा-ढा-** वि वेगवान्, वेगवत, वेगाढ्य 'वारेआ पासौनि वेगाढे। पर्वता हौनि दळवाढे।' -शिशु ९३४, -गीता १४५१ 'पुढें जुपिले सबळ घोडे। जे का अनिळाहुनि वेगाढे।' -ह २२ ६३ -ह २४ १५ [स वेगाढ्य] **वेगाडा-ढा, वेगाढें**-क्रिवि (महानु) त्वकर, वेगानें, त्वरेनें, जोरानें 'जेणें दोष माझे नासती वेगाढे। तो अधिकार फुढे नाहीं मज।' -ज्ञाप्र १३१ 'यादव उठिले वेगाढे। रथीं जुपिले जी घोडे।' -एभा ३१० **वेगाढे पण**-न सवेगता, अतिगतिमान् असण्याचा गुण 'जैसें मनाचें वेगाढेपण।' -कृमुरा २५ १५५ **वेगातिशय**-पु वेगाचें आधिक्य [वेग+अतिशय] **वेगायत**-क्रिवि वेगानें 'धावति तो पोरें पळता धरी वेगायत।' -निगा ९३ **वेगाल**-वि. वेगवान्, चागली गति असलेला **वेगीं-गें**-क्रिवि त्वरेनें, वेगानें, जलदीनें, चटकन, त्वरित -ज्ञा २१७ 'तात कोठें तो सांग मला वेगीं।' -ध्रुवचरित्र (नवनीत पृ ४११)

**वेंग**—स्त्री दोन्ही हात अगापासुन लाब करून त्याच्यात माणूस, वृक्ष, गाठोडें इ० पकडावयासाठीं घातलेली मिठी, कव, कवळा, कवळी, कवटळा 'अकुराचा काहीं वर्षांनीं सपाटा सुधा वनून दहा मनुष्याच्या वेंगेंतहि तो मावणार नाहीं' -नि ४७१ २ (गो) आलिंगन (क्रि० मारणें, घालणें) ०**मारणें**-वेंगेंत, कवळींत घेणें, धरणें **वेंगटणें वेंगाटणें**-क्रि १ वेंगेंत धरणें, वेंग मारणें हातानीं कवटाळणें २ उराशीं धरणें, आलिंगन देणें, मिठी मारणें **वेंगणें**-सक्रि १ वळसा घालणें, प्रदक्षणा घालणें 'झाडाला वेंगून जा'=झाडाला वळसा घालून जा २ वेंघणें पहा **वेंग(गा)ळणें**-क्रि (कों) वेंग मारणें, मिठी मारणें, कवटाळणें **वेंगाटी**-स्त्री वेंग पहा **वेंगाटी मारणें, वेंगाटींत धरणें-घेणें**-कवटाळणें, वेंग मारणें **वेंगेवर घेणें**-कडेवर घेणें

**वेंग**—न १ (काव्य) व्यंग, उणेपणा 'इतुकें हें नस्तां वेंग। नरदेह आणी सकळ साग।' -दा ११० ३२,१५ ९ २१ [व्यग]

**वेंग(गा)टणें, वेंग(गा)डणें**—क्रि (नेहमीं तोंड या शब्दाशीं जोडून) दीनपणाची मुद्रा करून एखाद्यापाशीं काहीं याचना करणें, याचनेसाठीं तोंड पसरणें 'माझ्या पुढें तोंड कशाला वेंगाडतोस? तुला नोकरी देणें माझ्या हातात नाहीं' [ध्व वेंवें किंवा स व्यकट=वाकडा]

**वेंगड-डी, (वेंगड्या-अव)**—स्त्री १ स्नायू आखडण्याची क्रिया (पेटी, भीति इ०नें) (क्रि० वळणें) 'वळे विने काची वेंगडी। पडे शब्दाची बोबडी।' -दा १५ १० २ गडडी, मुरकुंडी 'म्हणौनि परतावया तातडी। आस्था धरिली चोखडी। तव वळली वेंगडी। जेथील तेथ।' -स्वादि १० ५ १० 'तितका वेळ तेथें बसवत नाहीं घडीनें वेंगडी वळते' ३ तिढा, पायांत पाय अडकण -ज्ञा १३ ५७० 'पळतां पडती वेंगडी।' -एरुस्व ११ ५१ ४ वाकडी गति 'देखोनि मृत्यूची धाडी। पाया वळनसे वेंगडी।' -एभा ९ २७१ वेंगड्या असा अनेकवचनी प्रयोग बहुधा येतो (वेंगड्या वळणें-चळणें-होणें-उतरणें असे प्रयोग होतात) [स व्यकट] ०**पडणें**-पायांत पाय अडकणें, वाकडें पाऊल पडणें -एभा २३ ५३०

**वेंगणें**—अक्रि अति कष्ट, चिंता, उपास इ० मुळें थकणें, ग्लानि येणें, गळणें [वेंग]

**वेंगती**—स्त्री व्यक्ति, वेक्ति पहा [स व्यक्ति]

**वेंगलण-णें**—न (राजा) पोटाशीं पोर बाळगणारी माकडी, वानरी [वेंग=आलिंगन]

**वेगळ**—वि (काव्य) पृथक्, निराळा, वेगळा पहा. -क्रिवि १ शिवाय, विना, खेरीज 'तिखटावेगळ भाकर न धके।' -विक ७९ २ मोडून, वाचून [वेगळा] ०**चार**-पु (व) एकत्र असलेलें कुटुंब विभक्त होणें वेगळेचार पहा. **वेगळणें**-क्रि १ वेगवेगळें करणें, पृथक् पृथक् करणें; भाग पाडणें २ वगळणें, गाळणें, काढून टाकणें. [वेगळा] **वेगळवाणें**-वि भिन्न, वेगळें असें 'म्हणोनि तें तैसें बोलणें। नव्हे सपातळ आड लावणें। केले मनचि वेगळवाणें। भोगावया।' -ज्ञा ६ ११४ [वेगळा+वाणा] **वेगळवेटाळी**-स्त्री निरनिराळ्या पदार्थांचें एकीकरण 'ना अशक्तपणें आणिकें। वेगळवेटाळी न टके।' -ज्ञा १६ ३०० [वेगळी+वेटाळी] **वेगळा**-वि १ विभक्त केलेला अलग, अतरावर सारलेला-ठेवलेला, विभिन्न 'बोळपौनी करी वेगळा।' -उषा २८ १७ २ निराळा, विधर्मीय, अन्य ३ विभिन्न झालेला किंवा केलेला, एखादी गोष्ट कमी असलेला, न्यून असलेला (समासात) दृष्टीवेगळा (अदृष्ट, अंध), बुद्धीवेगळा, ज्ञानावेगळा (ज्ञानातीत, निर्बुद्ध) कृपवेगळा, लोभावेगळा, विद्येवेगळा एखादी गोष्ट केली नाहीं असा जाण्या-येण्या-बसण्या-उठण्या-वेगळा, निराळा पहा -क्रिवि सोडून, शिवाय, खेरीज विना 'श्रीं राम तुजवेगळा एकक्षण। सर्वथा नव्हे हा भिन्न।' [स विगल दे प्रा वेग्गल, गु वेगळु] **वेगळा घालणें**-निराळें काढणें, विभक्त करणें. 'मजहि वृद्धपण आलें। तेंरीं वेगळें घातलें।' -दा ३ ५ ३३ **वेगळाचार**-पु वेगळा आचार, विभक्त राहणें, वेगळेचार पहा [वेगळा+आचार] **वेगळाला**-वि निरनिराळा, पृथक्पृथक् 'वेगळालें अक्षर वाचावयास सोपें' **वेगळावणें**-सक्रि निराळी होणें, बदलणें, पालटणें 'जेवु ध्यानस्तु होते वेळां। पालटली

प्रभा गुरुकमळा। वेगळावली रूपलिळा। सर्वांगीची।' -शिपू २ ३४५ वेगळावा-पु (कों. गो ) भेद, भिन्नता, वेगळेपणा वेगळीक-स्त्री १ भिन्नता, वेगळेपणा, पृथक्‌पणा, वेगळेपणाची स्थिति -ज्ञा १३ ११२३, -एभा १३ ३०२ 'देव तोचि भक्त नाहीं वेगळीक।' -निगा १७९ २ विभक्तपणा, कुटुंबातील माणसांनी वेगळें राहणें ३ वरच्या दर्जाच्या माणसांना वागवितांना दाखविलेला फरक, मानाप्रमाणें भेदभाव करणें ४ (व ) निवडून वगळें करणें, वर्गीकरण, वेगळें केलेली स्थिति 'रुपये आणि मोहरा ह्याची वेगळीक कर ' वेगळीव-स्त्री भिन्नता, वेगळीक 'जेथें गुरुदु:खासी वेगळीव। आथीचना।' -शिपू ७ ५८ वेगळेचार-पु १ विभक्तपणा (विशषत कुटुंबातील माणसांचा ), विभक्तपणाची स्थिति 'तुझ्या घरीं वेगळेचार झाला ही गोष्ट खरी का?' -निच १८९ वेगळ राहणें २ असा विभक्तपणा होण्यास कारण असतें तें त्याचें वर्तन ३ मतें, आचार-विचार, हिताहित इ० मधील भिन्नता, फरक, अंतर ४ (गो ) विभक्त राहण्याचा विचार [वेगळा+आचार] वेगळेपण-णा-नपु भिन्नभाव, निराळेपण

वेंगणें—वेंघणें पहा वेंगणी-स्त्री (ना) वर चढणें

वेंघणें—उक्रि १ पर्वत, झाड, जिना, घोडा इ० वर आरोहण करणें, चढणें 'शृंगारिला हय त्यावरि भूप वघ।' -र 'तदुपरी जव वेंघे विप्र सोपानपंक्ति।' -सारह ५२२ २ लोंबकळणें, (फांदी इ० ला लोंबकळून) खालीं ओढणें, वाकविणें; लोंबकळत राहणें (अकर्मक प्रयोग) 'दवही तैसं तरू कवळुनी। वृक्षावरी वधनी।' -नव १२ १७८ ३ मिठी मारणें 'म्हणोनि गळ्यासि वेंघत।' -कथा १ १३ २० [वेंग=कव टाळणें]

वेंघणें—अक्रि करू कीं नको करू या विचारानें साशंक स्थितींत पडणें, कचरणें, शंकित होणें

वेंघणें—अक्रि (आजार कष्ट, चिंता, उपवास इ० कारणामुळे) खंगणें, गळणें वेंगणें पहा [स व्यग, म वेंग]

वे(वें)च—पु १ खर्च, व्यय (खर्च शब्दाशीं युक्त होऊन प्रयोग), खर्चवेंच 'परि न योग्य हा असा वेंच।' -मोउद्योग ८ १४, -ज्ञा १५ ५५८ 'वेंचास रुपये वीस दविले ते आज्ञाप्रमाणें पावविले।' -पेद ८ २७ २ क्षय नाश 'तरी तें पद गा नाहीं। वेंचु जया' -ज्ञा १५ ३०६ [स व्यय, प्रा विच्च, का वेच्च] ०खर्च-पु खर्च, खर्चवेच पहा ०क-वि खर्चिक, सढळ हातानें खर्च करणारा, दिलदार, उदार वेंचणें-उक्रि १ खर्चणें, खर्च करणें, होणें 'फुकाचे मुखीं बोलतां काय वेंचे।' -राम २ नाहींसा होणें, खपणें; कमी होणें, क्षीण होणें 'साहित्य स्वारस्य समस्त वेंचे।' -सारह १ ४६ 'आपुलें पाप आपणासी। आम्य नव्हे पुत्रशिष्यासी। न भोगतां स्वदेहासी। न वेंचे पाप परियेसा।' -गुच २ १७८ ३ अर्पण करणें, पाणी सोडणें, गमावणें, कामीं लावणें 'घेउनि सरस्वातें, युष्मत्प्रियहित करीन वसुधा मी।' -मोभीष्म २ १५ ४ खर्च करणें, देणें, योजणें, योग्य कारणीं उपयोग करणें 'तोंडीचें पोटीचें गांठीचें। माता बाळकाऽगीं वेंचे। तेवीं भा[illegible]। सरस्व साचें मी वेंचीं।' -एभा ११ [illegible] केलें अभाग्य। शिश्नोदरा सांग केलें।' -एभा ७ ६३[illegible] [स व्यय=खर्च, प्रा विच्च, का वेच्च] ,वेंचता-वि ([illegible]) क्षीण होणारा 'लिंगदेह कमठाचा। पोटीं वेंचतया चित्भ्रमाचा।' -ज्ञा १६ ४ वेंचिक-वि (गो ) खर्चिक वेंचुकरी-वि १ (महानु ) खर्चिक २ व्ययाधिकारी 'सेनवै दिनकरू। वेचुकरी सुधाकरु।' -शिशु ५० वेंचू-पु १ खर्च, वेच पहा. 'अधिक वेंचू कोण साही।' -एभा २३ ९६ २ नाश 'कापुरीं आगी प्रवेश। कीं अग्नी घातला पोतास। तैसा नव्हे सौरस। वेंचु जाला।' -अमृ ७ १७७

वेचक-का—वि १ निवडक, निवडून वेगळा काढलेला, वेंचलेला २ (ल ) उत्कृष्ट, उच्च प्रतीचा [वेंचणें]

वे(वें)चकुली—स्त्री वाकुली, वेडावणें (सामान्यत अनेकवचनांत उपयोग-वचकुल्या), टिवल्याबावल्या; तोंडें वेडीं वाकडीं करणें 'वाक्कृष्णपताचा रामराम होताच गाडीवाहर तोंड काढून माकडासारख्या वेंचुकल्या महाराजांनीं करून दाखविल्या' -विविज्ञ १ ३६ [विचकणें]

वेचण—स्त्री विक्री -वि विकलेला 'परगणे मजकूरची जमीन गहाण व वेचण जाली असेल ..' -वाडसमा २ २६७. [व्यय]

वेचणी—स्त्री (कों ) लहान टोपली

वेंचणी—स्त्री भाजी काढणी, तोडणी, तोड, गोळा करणें [वेंचणें] वे(वें)चणें-सक्रि १ एकक निपणें, गोळा करणें, एकेक उचलून एकत्र करणें २ जमविणें, साठविणें 'गंधविषया मिलिंद भुलोन। कमलकोशीं वचिती।' ३ निवडणें, पसत करून वेगळें काढणें, बाजूस काढणें, निवडून घेणें 'त्यानें भारतातील श्लोक वेंचून काढले' ४ वजा करणें 'एका एकु वेंचला। शून्य विंदु शून्ये पुसिला।' -अमृ ७ १७८ [स विच्=वेगळें करणें, स वि+चि=गोळा करणें] म्ह० नाव लक्ष्मी व गोऱ्या (गवऱ्या) वेंची वेंचला-वि १ वेचक, निवडून काढलेला, बाजूस काढून ठेवलेला, पसत केलेला २ विचारात घेतलेला, योग्य ठरविलेला, विचारपूर्वक निवडून योग्य ठरविलेला (विषय, मुद्दा) ३ नियमित, प्रमाणशीर, योग्य (खर्च इ० ). [वेंचलेला] ०घेणें-निवडणें, वचणें, टिपणें वेंचा-पु १ निवडक भाग, उतारा, एखाद्या

ग्रंथातून निवडून काढलेला उतारा, कांहीं श्लोक इ० 'शब्दोदधीचे निवडून घेंचे।' -साह्द १४६ २ सारांश, संक्षेप ३ (बहुधा अनेकवचनी उपयोग) सारसंग्रह, निवडून काढलेल्या भागाचा संग्रह, मुख्य मुख्य भागाचे उतारे एकत्र करून झालेला ग्रंथ उदा० मोरोपंती घेंचे वामनाचे घेंचे इ० ४ (ना) शेतांतून कापूस गोळा करून आणल्यावर केलेली मोजणी **घेंचे घेंचे बोलणें**-१ निवडक शब्दांत, निवडक शब्द, वाक्प्रयोग इ० योजून बोलणें. २ विचारपूर्वक, योग्य तितकें बोलणें, मुखांतून वावगा शब्द जाऊं नये किंवा भलतेंच विधान केलें जाऊं नये अशी काळजी घेऊन बोलणें ३ शहाणपणानें बोलणें **घेंचीक**-वि (गो.) निवडक वेचक

**घेंचवी, घेंचवीण**—स्त्री खरजेचा प्रकार ही मनगटें, घोटे यावर होते विंचवी खरूज पहा

**घेचावण-न**—स्त्री वेचावण पहा

**घेंचू**—पु (राजा कुण) विंचू

**घेज-जें, घेझ-झें**—न १ मोतीं, मणी, रत्नें इ० ना पाडलेलें भोंक, छिद्र. 'तया ब्रह्मस्वरूपाचा गुणीं। भणौनि घुवेझु भरले मुक्तामणी।' -ऋ २४. -रपा १७२९ २ सुई, दाभण इ० चें भोंक, नेढें (क्रि० पाडणें) ३ (सामा) छिद्र, भोंक 'पडलें काळिजा घेज दवौघनागाच तेज।' -मोरामायणें १ २५२ २६ ४ वर्म, लक्ष्य, वेंद्र 'चुकलिया त्यागाचें घेझें। केला सर्वे त्यागुही होय वोझें। निषिद्धें त्या सर्वत्र जुझे। वीतराग तो।' -ज्ञा १८ १३४ [स वेध प्रा वेज्झ, वा वेज्ज] **घेझ देणें**-भोंक पाडणें 'प्रज्ञा फळतया अर्था घेझ देणे जें।' -ज्ञा १८ ८६३, -शिशु १०३७ **घेजीं पडणें**-घेजीं उतरणें पहा 'आता नय नका लपवू तीं उतरलेली घेजीं पडलेलीं मोतीं दिसु देत सर्वांना' -भाऊ ४८ **घेजीं उतरणें**-मोतीं, माणिक इ० चें भोंक तार, रेशीम इ०च्या सततच्या घर्षणानें मोठें होणें (घेज मोठें झाल्यास किंमत कमी होते) 'शिंदे होळकर एवढे लढते सरदार असता त्याची केवळ किंमत इरली. घेजीं उतरलीं' -भाव १०४ **घेज टिकली**-स्त्री (सोनारी) ज्यांतून तार ओढली जाते तें लोखंडीपट्टीला पाडलेलें भोंक **घेझपट्टी**-स्त्री (सोनारी) चांदी-सोन्याचें सुत अगर तार ओढण्याची, भोंकें असलेली पट्टी, जंतरपट्टी

**घेजीत**—वि पराभूत, पराजय झालेला, जिंकलेला 'गाव मग आणिला घेजीत।' -ऐपो ४४७ [सं विजित] **०पत्र**-न जजितपत्र पहा

**घेट घेट**—पुस्त्री १ (पेंढा, गवत, झाडाची साल, कापड इ० चा) वळून केलेला दोर, दोरी, वेष्टन 'आणि सिकतेचें घेट वळून दाते।' -ह १४ २३२ २ वायूचे विकृतीमुळें, किंवा प्रेमाच्या असोसीमुळें आतड्यांना पडणारा पीळ, पीळ पडल्याची होणारी भावना (क्रि० उठणें, वळणें, येणें, फिरणें; पिळणें) 'पोटचा-बेंबीचा घेट वळला-पिळला' ३ एखाद्या पदार्थाभोंवतीं घातलेला दोरी इ० चा वेढा, वळसा, फेरा ४ अबादीची तीन पदरी दोरी ५ एक वेल (हिचा पाला गुरें खातात) ६ (व ना) चाकाची लोखंडी धाव ७ वेठ पहा [स वेष्ट्, प्रा वेढ] **०घलणें**-१ कांहींएक कार्यासाठीं ऐकमत्य होणें, एकजूट होणें, सघशक्तीनें काम करणें २ गर्दी करणें, खेचाखेच करणें, एकावर एक पडणें (भयादि कारणानें-गुरें, माणसें) 'फौजेचा त्या किल्ल्यावर मोठा घेट घलला.' ३ हैराण करणें 'गुराचा मुसळवाऱ्यानें (पटकीनें) एक घेट घलला' **घेटली-ळी.** **घेटणें घेंटणें**-नस्त्री १ पीळ घालून वळलेली गवताची दोरी, वेटाळी २ (मूल हुगलेलें काढण्यासाठीं घेतलेली गवतकाड्याची) गुंडाळी ३ वेढण, वेष्टन **घे(घें)टणें**-जोरानें वेढा देणें, आवळणें **घेटा-ळणी**-स्त्री १ वेढा, विळखा, फेरा, भोंवती गुंडाळणें, वेष्टणें (क्रि० घालणें) २ कापलेल्या पिकाच्या पेंढ्याची बांधणी, कापून ठेवलेले पिकाचे कवळे एकत्र बांधणें **घे(घें)टाळणें**-उक्रि १ एखाद्या भोंवतीं हात, दोरी, दोरखंड इ० नीं) वेढा देणें, वेष्टणें, गराडा घालणें २ (दोरी इ०) गुंडाळणें -उदा १४६ ३ जोरानें गुंडाळणें, आवळणें, वेढा घालणें 'तेव्हळीं घेटाळीला बहुतीं।' -उपा १५१ १८०२ ४ गोळा करणें, एके ठिकाणीं करणें 'तेय आपलेनि बळें। भोगिजे जें जें घेटाळें। हें वांचोनि कें वेगळें। पुण्य आहे।' -ज्ञा १६.२५९ ५ लुबाडणें ६ कव-टाळणें, (ल) व्यापणें 'हा ठायवरी लोभु। करी स्वैरत्वाचा राबु। घेंटाळिता अलाभु। तो तो उरे।' -ज्ञा १४.२३० **घेटाळा-ळी-ळें, घेटोळें**-पुस्त्रीन १ वळसा, वर्तुळ, वेढा २ साप किंवा दोरी यांची गुंडाळी, वळकटी, सुरळी **घे(घें)टाळी**-स्त्री घेटळी पहा **घे(घें)टी**-स्त्री १ गवताची बारीक दोरी, बारीक घेंट २ (राजा) मुडा बांधण्याकरितां भातेणाची पीळ घालून केलेली दोरी ३ वेढण 'मस्तकीं मुगुट आणि किरिटी। सभोंवतीं शिळमिळ्याची दाटी। त्यावरी मयूरपिच्छाची घेटी। ऐसा जगजेठी देखिला।' -व्य ६९

**घेटण**—न (बे) १ जुवांच्या मधोमध असणारें जुपणें, सेटण पहा २ वेष्टन, गाठ [सं वेष्टन]

**घेटणें, घेंटणें**—उक्रि १ (कणसें, फुलें, कापूस इ०) वेचणें; खुडणें; तोडून गोळा करणें. वेचणें पहा **घेटाळणी**-स्त्री ओंधळा खुडणें, तोडणी -गांगा १०० **घेटाळणें**-उक्रि ओंधळा खुपटणें, खुडणें

**घेटणें**—वटणें पहा लाटणीं फिरवून कापसांतून सरकी काढणें इ० दिवस गेला रेटारेटी दिवे लावून कापूस घेटी.

**घेटपण-णॉं, घेटावणें**—न वेडावणें, वाकुल्या तोंडें वेगैरे व तऱ्ही लेहून केलेली चेष्टा, उपहास; चाळे ( क्रि० दाखवणें, दावणें, करणें ) [ग विटंबन ]

**वे( वें )टविणें, घेटाविणें**—उक्रि वाकुल्या दाखविणें, वेडावणें, उपहास, विडंबन करणें ( अव ) वेटावण्या ( -स्त्री )

**घेटाळ**—पु ( व ना ) पुरा, मोहल्ला, पेठ [ सं वेष्ट् ]
॰संबंध-पु ( ना ) शेजारसंबंध

**घेठ**—स्त्री विगार, रोख मेहनतान्यावाचून करावें लागणारें काम -गांगा ४९ मजुरी न देतां अंमलदार, जमिनीचा मालक, खोत इ० नीं करून घेतलेलें काम. ' गाठीचें तें सोडू नावडे खाय आइतें दिलें । सांपडलें वेठीं बोडी रे भार वाहतां मेलें । ' -तुगा १७० ( कायदा ) कोणा मनुष्याकडून त्याच्या संमतीवाचून काम करून घेणें ( इ ) कंपलसरी लेबर २ पैसे न देतां खोत, सरकारी अंमलदार इ०नीं कुळें किंवा रयत यांपासून अधिकाराच्या जोरावर घेतलेले निरख, खोतवेठ ३ जुलमानें मनुष्य किंवा जनावर याकडून वाहून नेलेलें ओझें [ स विष्टि, प्रा विट्टि वट्टि, ते वेट्टि ] म्ह० १ वेठीच्या घोड्यास तरवडाचा फोंक २ ( गो ) वेठीधर्मानं गोंय ( वेठीला धरून नेल्यानें गोवें पहाण्यास मिळालें ) =वाइटांतून चांगलें निघणें ॰करणें-चलणें-काढणें-कर्मधर्म, कर्में तरी, निष्काळजीनें काम करणें **वेठीचें करणें-वारणें**—न वरवर, कर्में तरी, निष्काळजीनें केलेलें काम, हलगर्जीपणाचें काम **( एखाद्याला ) वेठीस धरणें**—आपलें काम करण्यासाठीं एखाद्याला भाग पाडणें, फुकट काम करण्यासाठीं धरणें, ताब्यांत घेणें **वेठकरी, वेठ्या, वेठी**-पु १ वेठीस धरलेला माणूस, विगारी २ ( सामा ) हमाल ' रावत तेथें कितियेक वेठे । ' -साप्ट ३ ३१ ॰**विगार-बिगार-निरळा**-स्त्रीपु १ वेठीनें करविलेलें काम, विगार, वेठ पहा २ वेठीनें काम करवून घेण्याचा खोत इ०चा हक्क **वेठणें**-क्रि वेठीला धरणें, आपल्या कबजांत घेऊन मर्जीप्रमाणें काम करावयास लावणें -ज्ञा १८ १४५९ ' पुंडलिकें पितरास्तव वीटेवर वेठिलें विठोबाला । ' -गोसलेकृत देवी सुशील **वेठी, वेठें वेठ्या**-पु मनु विगारी ' नाहींवेठी जेवा सारा । जाहाती नाहीं म्हणियारा । ' -तुगा ३६०

**वेठ**—स्त्री जुनीं भांडीं मोडींत घालून नवीन भांडीं विकत घेतांना अधिक द्यावा लागणारा पैसा

**वेंठ**—स्त्री ( महानु ) पठ, उतारपेठ ' कीं धमाची उत्तर वेंठ । ' -ऋ ११

**वे( वें )ठ**—पु १ वेट पहा २ वळलेल्या चन्हाटाचे जे अनेक पड असतात ते प्रत्येक **वेठण-न-न** १ नांगराचें जोसड टेंकूजवळ इसाडास जोडण्याचा दोर, जुपण व इतर दोर, विण कऱ्याच्या राहाटाचा दोरखंड, तेगार ( सामा. ) सर्व आउतास वेटक घालण्यास लागणारी दोरी २ ( कों ) सुमाची जाड दोरी, चन्हाट ३ गाडी इ० कामासाठीं जोडणें, गाडीवर सरंजाम घालणें ४ ( कुण ) गुबी, सफाई, हातोटी, कसब, उद्योगांतील कौशल्य ५ वेठन पहा ६ घोड्यावरील साज [ सं वेष्टन, प्रा वेढण ] **वेठणें**-उक्रि १ गाडी, नांगर, कुळव इ० ला वेटण बांधणें, जोसड आणि इसाड वेठणानें एकत्र बांधून गाडा, नांगर इ० कामाला तयार करणें २ (दोन्या, जोसड इ०) एकत्र जोडणें, बांधणें, जुपणें ३ ( सामा ) वेढणें पहा सज्ज तयार होणें वेठला शब्दाच्या द्विरुक्तीनें आढूनवेढून, आटलावेठला असे प्रयोग येतात **आटलावेठला**-वि. दोन्या, वद इ० नीट बांधून तयार केलेला, व्यवस्थित रीतीनें जोडलेला, सज्ज केलेला -अक्रि १ वेठलें जाणें, बांधलें जाणें ' आणि पूर्णाहुता वेठलें ' -अमृ १० १५ ' ते भोगावरी न वेठती । त्यागावरी न तुटती । ' -एभा १ ४८ २ पोशाख करणें, धारण करणें ' जैसा जैसा पुरुष वेंठे । तैसी तैसी छाया नटे । ' -एभा ७ ६६ [ स वेष्टन, प्रा. वेढण ]

**वेठणें**—अक्रि ( महानु ) उठणें, निघणें ' आवेशें सरिसा वेठिला । गांजिवा हातु घातिला । ' -शिशु ९७८ [ उठण ]

**वेठणें**—अक्रि १ मूर्त होणें, आकाराला येणें ' तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें । वेदु वेठला भलत्वें । सैन्य होआवया । ' -ज्ञा १८ १४५९ -शिशु ३६८ २ वठणें, उमटणें ' तेया मुरारीचें सैन्य पालाणिलें । जैसें मूर्तिसहाय तेंज वेटलें । ' -शिशु १०१५ ३ दिसणें, वाटणें चोरु साधुत्वें नटे । लटिका साचा वेठे । ' -ऋ १०३

**वेठी**—स्त्री १ ( कु )वळीवदारी वेट पहा ' झाड मालाची वेठोनि वेटी । ' -दावि ४२ २ भुली झुल तुरा, भूषण ' मिरवे मुळाळी मौक्तिकाची वेठी । -दाव २४३ ३ तोंडण, वेढ, घर ' तया मुकुटाचे त्ववटीं । मुक्तमयुरपत्राची वेटी । ' -एरुस्व १ ६५ [ वेष्टन ]

**वेड**—स्त्री १ मडळीतील म्हणजे गर्जीनील गच्छाच्या पेंट्या चोराना उपसून काढता येऊ नयेत म्हणून त्याच्या ताटाच्या मुळाची भनीभोंवती घातलेली वेणी-गुंफण २ -स्त्री हाताच्या किंवा पायाच्या बोटांत घालण्याचा दागिना, वळें, वेढें [ वेढणें स वेष्टन ]

**वेड**—स्त्री. इंडलिंचावें झाड -न ईडलिंपू याचभयी वेड-लिंपू-निंपू [ ईड ]

**वेड**—न मेंदूमध्यें कांहीं बिघाड झाल्यामुळें उत्पन्न होणारा आजार, बुद्धिभ्रंश (यांत भलभलतें बोलणें, करणें इ० गोष्टी होतात), मेंदूचा विकार व त्याचा परिणाम, खूळ २ मूर्खपणा, मूर्खपणाचें कृत्य ३ ( ल ) अतिशय आसक्ति, अत्युत्कट किंवा फाजील इच्छा, छंद, नाद, उत्कट लहर ' जगांतील सर्व महत्कार्यांचा उदय

वेडाच्या उदरींच झालेला आहे '–रणदुंदुभि ४६ ४ सबळ कार णाशिवाय मनांत ठाम बसलेली समजूत 'या काव्यात कवीच्या पूर्वचारित्र्यातील काहीं चमत्कारिक घडामोडींचा उल्लेख आहे असें वेडगिरी डोक्यात शिरतें '–केकावली १ ५ अविचार, अज्ञान 'तो वलावीत होता तेव्हा गेग नाहींत हें वेड केलत ' [का एड्र–इड्ड=मूर्खपणा, मूर्ख माणूस, तु॰ स वैधेय(मूर्ख)–वेदेअ–वेड–वेड –भाअ १८३५] ॰काढणें–१ वेड पांघरणें, वेड घेणें २ एखाद्यानें मुद्दाम पांघरलेलें वेड धाकदपटशा दाखवून घालविणें, खोड मोडणें ॰घेऊन पेडगांवास जाणें–आपला काहीं मतलब साधण्यासाठीं वेड दाखविणें, पांघरणें ॰पांघरणें–मुद्दाम वेड्यासारखें करणें, वेड काढणें अर्थ १ पहा ॰पिकणें, वेडाचा पाऊस पडणें–१ एखाद्या गोष्टीबद्दल अवास्तव कुतूहल उत्पन्न होणें २ असमंजसपणा, अविचार यांची समृद्धि होणें, एखाद्या वस्तूचा ध्यास लागणें ॰भरणें–वेड लागणें, ॰भरणें–भरविणें–वेड लावणें, वेडा करणें, वेड लागेपर्यंत त्रास देणें, फार उपद्रव देणें ॰लावणें–१ एखाद्याला मोहित करणें; त्याचें मन आकृष्ट करणें, छंद लावणें 'वेड लावलें भ्रताराला। नाहीं राहिला लौकिक।' २ घोटाळ्यांत घालणें ३ वेड लागण्याइतकी स्थिति होईपर्यंत एखाद्याला अति उपद्रव करणें, वेडा करणें वेडीचें सोंग घेणें–वेड पांघरणें, वेडाचें ढोंग करणें (कुणबी दिवा-ळखोरी दरबारांत असल्यास किंवा एखादा लायक इसम नाल-यकी दाखवीत असता हा वाक्प्रचार योजितात) वेडगळ, वेडका, वेडगेला वेडसर–वि वेड्यासारखा, अर्धवट मूर्ख, वेड्यांत जमा, वायचळलेला, खुळचट वेडगळणें–अक्रि १ (व) वेडें होणें २ वेडेचार करणें, छांदिष्टपणा, आडदांडपणा, मूर्खपणा करणें वेडझवा–वि १ व्यवहारज्ञानशून्य, खुळचट, मूर्ख, चमकली, विक्षिप्त, चमत्कारिक, विलक्षण, अडाणी 'अशा वेडझवा म्हणूनि विभवा देतो अशा गाढवा।' २ भ्रमांत पडलेला, गोंधळलेला, काय करावें तें सुचत नाहीं असा, भ्रमिष्ट (ह्या शब्दाचें मूळचें अश्लील स्वरूप जाऊन आता तो सभ्य लोकांच्या बोलण्यांतहि येतो) वेडविणें–सक्रि (वेड लागण्याइतकें वेडावून, त्रास देऊन) छळणें, सतावणें, गांजणें वेडाविणें पहा. [वेड]

वेंड—स्त्री (कु) दोन बाजूला दोन काठ्यांत अर्धवर्तुळाकार लावलेलें मासे धरण्याचें जाळें

वेड—न (गो) कुडें वेडींजोड–पु कुड्याचा जोड

वेडण—न (राजा) हाताच्या किंवा पायाच्या बोटांत किंवा अंगठ्यांत घालण्याचें सोन्या–चांदीचें वळें, वेढें [वेढणें]

वेडा—वि १ ज्याला वेड लागलें आहे असा ज्याच्या मेंदूत बिघाड झाला आहे व त्यामुळें जो भलतेंसलतें बोलतो किंवा करतो तो, खुळा, भ्रमिष्ट २ मूर्ख, ज्याला व्यवहारचातुर्य नाहीं असा १ बेताल, फाजील, मूर्खपणाचें, असंबद्ध विसंगत (वर्तन, भाषण इ॰) 'ही वेडी कल्पना तुझ्या डोक्यांत कोणी घातली ' ४ आसक्त, मोहित, आकृष्ट झालेला 'त्या गवयानें मला अगदीं वेडा करून सोडलें ' ५ छांदिष्ट, नादी, एखाद्या गोष्टीचा ज्यानें ध्यास घेतला आहे, सारखा त्याच्या पाठीमागें आहे असा ६ एकदम पुष्कळ कामें करावयाचीं असतां काय करावें, कसें करावें अशी मनाची भ्रांतिष्ट स्थिति झालेला, किंकर्तव्यमूढ, संभ्रांत झालेला. [वेड] ॰ऊंस–पु रानऊस, खुळा ऊस याचा औषधा-करितां उपयोग होतो 'नाहिं करित कोणाची आस। औषधास वेडाऊस साजणा।'–सला ३२ ॰खुळा–पिसा–वि वेडा, पिसाट, निरहादिकांनीं वेड्यासारखा वागणारा (वेडा, खुळा, पिसा, हे तिन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत) 'जयाचे नेत्रकटाक्षें होती। वेडेपिसे देवादी।' ॰गोळा–वि अगदीं अडाणी, मूर्ख, वेडा –सूपनि १३४ ॰धोतरा–वि (ल) मूर्ख, मायफिरू, वेडा. धोतरा पहा ॰पीर–पु १ छांदिष्टपणें, बेताल वागणारा–बोलणारा; आततायी मनुष्य 'हा एक आपला वेडापीर आहे जें तोंडाला येईल तें बडबडत असतो '–पिंगला २ अजागळ, वेडगळ माणूस, मूर्ख मनुष्य [वेडा+फा पीर] ॰बागडा–वि १ वेडावाकडा, अनेक ठिकाणीं वाकलेला वाकडातिकडा. २ (ल) सरळ मार्गानें न चालणारा, लहरी, छांदिष्ट. 'मी साधा आहें, मी वेडाबागडा आहें, एवढाच काय तो माझा अपराध आहे '–भा ९५ वेडावाकडा पहा ॰मधुरा–पु एक प्रकारचा दोषिक ताप यांत शीतोपचार झाला असतां वात होऊन वेड लागल्यासारखी स्थिति होते मधुरा पहा. ॰वाकडा–वि १ अनेक ठिकाणीं व निरनिराळ्या तऱ्हेनें वाकलेला, वाकडातिकडा २ (ल) कुटिल, वक्र, सीधा नसलेला, वाममार्गानें चालणारा (माणूस) ३ लहरी, भ्रमिष्ट ४ असंबद्ध भरमसाट, जसें आलें, सुचलें तसें–अगदीं वाईटहि नाहीं व वाखाणण्यासारखेंहि नाहीं असें (भाषण, कृति इ॰) 'वेडेवाकडें गाईन। परि दास तुझा म्हणवीन।' (एखाद्याला) वेडें वाकडें होणें–एखाद्यावर अनपेक्षित संकट येणें (एखा-दीचें) वेडेवाकडें होणें–(बायकी) वैधव्य प्राप्त होणें, संसार विसकटणें ॰विद्रा, विपारा–वि १ वेडा आणि कुरूप, कुरूप आणि कुस्वभावी, भीतिदायक; भेसुर, हेंगाडा 'मग पुरुष कसलेही वेडेविद्रे, साधेभोळे, खुळे, अजागळ असले तरी बिघडत नाहीं.'–सवतीमत्सर ८३ २ वेडावाकडा 'ढोलकें पिटणाऱ्याच्या भोंवती भक्तांनीं वेड्याविद्या उड्या माराव्या '–टि ४ ७९. वेडी हळद–स्त्री १ जाड्या खोडाची किंवा मोठी कुडीं असलेली हळद २ (ल) वेडगुळी, खुळी, मूर्ख, वेडसर ३ (ल) वेडें पीक वेडेचार–चाळे–पुअव १ वेडेपणाचीं कृत्यें, मूर्खपणाचीं कामें 'वेडेचार शिकविति,बाळांना। खेळुनि खेळीं।'

–होळीचें पद २ वेडातील हावभाव, चेष्टा चाळे इ० [वेडे+आचार] **वेडें पीक**–न १ मशागतीवाचून विपुल येणारें पीक उदा० एरंडाचें–निवडुंगाचें वेडें पीक २ आलें तर पुष्कळ नाहीं तर मुळींच नाहीं असें पीक ३ (सामा) पुष्कळ भरभराट, फाजील पीक, उत्पादन, प्रचार इ० ४ (ल) वळला तर हवें तें देईल नाहींतर एक कवडीहि न देणारा दाता, अतिरेकी दाता, लहरी दाता ५ (ल) क्षुल्लक कारणावरून कधीं कधीं अतिरेक, आततायीपणा करणारा पण एरवीं मोठा उपद्रव दिला तरी अगदीं शात राहणारा मनुष्य ६ (ल) छादिष्ट वर्तन, हास्यकारक वर्तणूक, वेडेचार **वेडें भाग्य**–न नादान, नालायक, कर्तृत्वशून्य माणसाला प्राप्त झालेलें भाग्य, शिक्षण, शहाणपण किंवा योग्यता हीं कांहींहि नसता आलेलें भाग्य **वेडेवेडे चार**–पुअव छादिष्टपणाचीं कृत्यें, वेडयासारखें आचरण, खुळेपणाचीं कृत्यें **वेडें-ध्यान**–न चळ, खूळ, पिसें, मूर्खपणा **वेडयांचा बाजार**–पु विचार न करता एखाद्या गोष्टीच्या नादीं लागणाऱ्या, कांहीं तरी करणाऱ्या लोकांचा जमाव, मूर्ख माणसांची टोळी (क्रि० भरणें) **वेडथर, वेडदु(धु)ल्ली**–वि वेडगळ पहा 'जा, वेडदुल्ली, तुला काय समजतें?'–वाळ २ १८४ [वेडा+थर, दुल्ला] **वेडपा**–वि वेडगळ पहा **वेडबंर–बंबू**–वि वेडा, मूर्ख **वेड-वणें, वेडावणें**–अक्रि १ मूर्ख किंवा वेडा होणें, खुळावणें २ वाकुल्या दाखविणें ३ जड होणें, मुकी, स्तब्ध होणें (वाणी) 'वेडावेलचि रसना, नकरी सिंहापुढें शिवा चाळा।'–मोकर्ण २८ ८१ –सक्रि १३. **वेडाळणें**–अक्रि १ वेडें होणें, खुळावणें 'सिंहावलोकनें पहताळिता ग्रंथ। अविवकी तेथें वेडावू लागत।' –मुआदि १९८ **वेडावणें**–न (अव वेडावणीं) वाकुल्या दाखविणें, चिडविणें **वेडावणें**–उक्रि १ वेडविणें, मोह पाडणें, एखाद्या गोष्टीच्या भरीं भरणें 'तिनें आमच्या तरुण विद्वानास इतकें वेडावून टाकलें आहे कीं घरात शुद्ध मराठी बोलण्याची मारामार'–नि ५ **वेडाळ–ळया**–वि वेडा, अर्धवट मूर्ख, वेडसर **वेडाळवाणी**–विक्रिवि वेडाळ पहा वेडयासारखें (बोलणें, करणें इ०) 'सकळ राजसदनींचीं माणसें। वेडाळवाणी बोलती त्यास।'–नव १८५३ [वेडाळ+वाणी=सारखें] **वेडीव**–स्त्री (काव्य) वेडेपणा, अजाणपणा, नवीव –ज्ञा १३ १९० 'बाया वेडीव घडे चतुरें। शब्दास वाखाणिजे शस्त्रधरें।' –मुसभा ७ ६९

**वेंडा**–पु (बडोदें) मातीचें भाडें, मडकें कुंभ 'या प्रतिमेपुढें पाढरा रग लावलेला वेंडा ठेवतात'–ऐरापुविवि ८१

**वेढ**–स्त्री १ चांदी–सोन्याचें हाताच्या किंवा पायाच्या बोटात घालण्याचें वळ, आगठी; वेढणें २ (गो) कानातील मोत्याचें बुडें ३ –पु (कों) (विहीर, घर, कमर इ०चा) घेर [स वेष्ट् प्रा वेढ, ब वेड, हिं बेट] **वेढणें**–न १ बायकाचें पायाच्या मधल्या बोटात घालण्याचें वळें, वेढें, जिरोली (विशेषत लग्नाच्या वेळीं वधू घालते) २ भातझोडणीसाठीं हातात घेतलेल्या पेंडीस बाधलेली भातेणाची (पेंढयाची) दोरी –कृषि २३९

**वेढणी**—स्त्री उडीद इ० च्या पिठात तिखटमीठ घालून केलेलें घिरडें किंवा घिरडयासारखें तोंडीलावणें

**वेढणें**—उक्रि १ घेरणें, गराडणें, गराडा घालणें, वेढ घालणें २ एखाद्या पदार्थाभोंवतीं (दोरी इ०) गुडाळणें, लपेटणें, वळसा, विळखा घालणें 'हृदय हृदया लागुनी वेढ हातीं।'–मम ३३ ३ (ल) (अडचणी, सकटें इ०नीं) चहूंबाजूनीं घेरणें, पाठपुरावा करणें, सर्व बाजूनीं अगावर कोसळणें ४ (सामान्यत वेढून घणें) कसें तरी नेसणें, कमरेभोंवतीं सरासरीनें गुडाळून घणें (स्नान वगैरे इ० करावयाचें असता) ५ परिधान करणें; नेसणें 'जैसे जीर्ण वस्त्र साडिजे। मग नूतन वेढिजे।'–ज्ञा २ १४४ ६ (ल) धादाक्रात करणें, (देश, गाव इ०चा) पूर्ण कबजा घेणें, ताब्यात घेणें, व्यापून टाकणें 'प्रणवाचिये पेंठे। जाहलें शब्द ब्रह्म माचिठें। तें जयाचिय यशा धाकुटें। वेढू न पुरे।'–ज्ञा ६ १०९ –अक्रि १ (कागद, भिंत इ०) चित्रें, अक्षरें इ० नीं व्यापला जाणें, लिहून भरला जाणें २ (कोणी मनुष्य) कामाखालीं दडपून गेलेला असणें [स वेष्टन, प्रा वेढण] **वेढा**–पु १ गराडा, फेरा, घेरा (क्रि० घालणें) २ (एखाद्या पदार्थाभोंवतीं घातलेला दोरी इ०चा) विळखा, फेरा ३ मळसूत्र, भोंवरा इ०चा स्वताच्या आसाभोंवतीं होणारा एक सबध फेरा, गिरकी, मध्यबिंदूभोंवतीं किंवा स्वत भोंवतीं फिरणाऱ्या पदार्थाची एक फेरी, गिरकी, वर्तुळ ४ मात्रा इ० सहाणेवर उगाळताना होणारा तिचा एक वळसा [स वेष्ट्] ०**घालणें–देणें**–एखाद्या शहराला किंवा किल्ल्याला गराडा घालणें भोंवतालीं सैन्याचा फेरा धरणें, कोंडून धरणें घेरणें; वेढणें ०**रिग(घ)णें**–(काव्य) भ्रमण करून गणें 'भ्रामकाचनि संगें। जैसें लोहीं वेढा रिंग।'–ज्ञा १८ १३११ **वेढाळणें**–(काव्य) वेढणें, वेढणें 'मी मज माक्षि यानि वेढाळिलें बाई'–निगा ८२ –अक्रि वेढला जाणें –गीता २ ५९ **वेढिता**–वि नसणारा **वेढें**–न हाताच्या किंवा पायाच्या बोटात घालावयाचें सोनें–चादीचें वळें, जाड आगठी, वेढणें

**वेढा लावणें**—(प्र) वेड लावणें भुलविणें, फसविणें, भ्रम पाडणें गुंतविणें 'म्हणोन दृश्य मिथ्या झालें। परतु वेढा लाविलें। सकळाम गणें।'–दा ९ ७ ४४; ११ ३ १९

**वेण, वेणा**—स्त्री १ प्रसववेदना, प्रसूतिसमयीं स्त्रीस पोटात येणारी कळ; तिडीक (क्रि० येणें, दणें, होणें) (वेणा–ग्या असा विशेषण अव उपयोग) 'नाहीं लागली वेण उदरा। नाहीं

दुखिगलें गर्भपोट।' –भारा बाल ६ ७ –मोकर्ण २७ १४ 'यतिया परम दुःखद वेणा।' –विगवि ५४ २ आमांश झाला असतां किंवा अन्य कारणानें मलविसर्जनाचे वेळीं येणारी तिडीक, वेदना, कळ ३ (वेण) स्त्रीच्या प्रसूतीचा प्रकार (उशीरा, सहजा सहजीं, स्वाभाविक किंवा त्रास होऊन प्रसूत होणें) 'गोदू बाईची वेण हरिणीसारखी आहे' [स वेदना, प्रा वेअणा] **वेणा-ण्या देणें**–१ (जनावरानें) प्रसूतिसमयीं कष्ट भोगणें, कण्हणें, कुथणें, वेणटणें २ परमावधीचा प्रयत्न करणें एखाद्या कामात अतिरट, श्रम सोसणें **वेणा(ण्या)टणें, वेणावणें**–अक्रि प्रसववेदना होत असणें, प्रसूतीच्या आधीं पोटात कळा उटणें–येणें तिडका येणें

**वेण**—स्त्री (कु) नदींत थोड्या पाण्यात मासे पकडण्याचें जाळें

**वेण**—स्त्री (कु गो) विहीण

**वेणा-णें**—वि (को) घरटात घालून भरडून काढलेला (तांदूळ) न सडलेला, असडी (विशेषत तांबडा व हलक्या प्रतीचा तांदूळ) **वेणे तांदूळ**–पुअव फक्त भरडलेले, न सडलेले तांदूळ, कडइ; असडी तांदूळ

**वेणी**—स्त्री १ डोक्याचे केंस, वाख इ० चे तीन किंवा अधिक पेड एकांत एक विशिष्टप्रकारें गुंतवून सर्पाकार केलेला आकार अशा प्रकारची रचना बांधणी (क्रि० घालणें) 'दन्ह दिया वणिया खोविरिया –शिशु ६५४ २ गुताःगुत 'तिहीं पुसरी योगाची वाहाणी। ताता हें शुण चीत्ताची वेणी।' –माए ६७० ३ पाण्याचा अरुंद ओहळ, प्रवाह ४ नद्यांचा संगम, त्रिवेणी संगम ५ पंक्ति; रांग ६ फुलें वेणीप्रमाणें दोऱ्यात गुंफून केलेला (बायकांनीं खोपा–अंबाडा या भोंवतीं घालण्याचा) गजरा ७ वेणीफणी पहा 'शाळा तुझी सकाळीं। वेणी नाहीं झालेली। –अभिनयगीत ८ करवतीची वेणीसारखी दिसणारी धार [विणणें] **०करणें-करविणें** वेणी घालणें 'तों गुरुपत्नी न्हाउनि वेणी करवीत वैसली होती।' –मोआदि २ ११८ **०दंड**–पु (काव्य) वेणीचा पट्टा दावणा 'वेणीदंड काढिला। गळफास वेगीं घातला।' **०दान**–न प्रयागक्षेत्रात सुवासिनींनीं आपल्या वेणीचीं दोन बोटें लांबीचीं अग्रें कापून त्रिवेणीस केलेलें दान किंवा या दानाचा विधि (सर्वांस या क्षेत्रीं मुंडन सांगीतलें आहे पण सुवासिनींनीं फक्त दोन बोटें लांबीची वेणी कापून गंगेला अर्पण करावयाची असते –तीप्र ९३) **०दार**–वि वेणीच्या आकाराचा एका लाकडाच फळीस वेणीदार खिळ मारून सुरा करतात' –विविधज्ञा १ ८३ **०फणी**–स्त्री केसांना तेल लावणें, ते विंचरणें त्याची वेणी घालणें कुंकू लावणें, डोळ्यात काजळ घालणें इ० स्त्रियांचा प्रसाधनविधि (क्रि० करणें, होणें) (सामा) स्त्रियांचा सकाळचा शरीरमंडनविधि 'तुझी वेणीफणी सुद्धां अजून झाली नाहीं' –अमात्यमाधव [वेणी+फणी, गुल० म वेणी प्रवेणी]

**वेणु**—पु १ वेळू, बांबू, कळक २ वेळूची मुरली, पावा, बासरी –एरुस्व ६ ७३. 'वाहिला गोपाळें वेणुनाद पडे कानीं।' –तुगा १६१ [स] **०दंड**–पु वेळूची काठी 'केवळ वेणु दंडमंडश। तेणें मन्यासत्व न घडे जाण।' –एभा १८ १०३ **०बीज-यव**–नपु वेळूचें धी ध्टरा उपधान्यांपैकीं हें एक आहे

**वेत**—न १ विणें, जनावराची प्रसूति २ प्रसूतीची वेप, पाळी ३ वीण [स वी=प्रसवणें]

**वेत**—पु १ एक वेळूच्या जातीची वनस्पति, वेल याच्या सालीच्या परड्या, खुर्च्या इ० करतात २ या वेलाची काठी, छडी [स वेत्र प्रा वेत्त, हिं बेत] **०सरी**–स्त्री खुर्ची इ० विणण्यासाठीं काढलेली वेताची साल **वेतस-सी**–पुस्त्री वेताचा वेल, वेत [स] **वेतसवृत्ति, वेतसीवृत्ति**–स्त्री १ वाकण्याची, नमण्याची, लीनपणानें वागण्याची पद्धत–रीत २ वारा वाहील तशी पाठ देण्याची, प्रसंग पडेल तशी वागण्याची रीत ३ लवचीकपणा, ताठरवृत्तीचा अभाव **वेतसी**–स्त्री वेत –वि वेताचा, वेताचा बनविलेला (पदार्थ–टोपली खुर्ची इ०) **वेताचा मल्लखांब** पु १ मल्लखांबावरच्या उड्या आसनें, कसरती करण्याकरता छताला टांगण्यासारखा केलेला १०–१२ फूट लांबीचा वेत २ अशा मल्लखांबावरचा खेळ **वेताटी**–स्त्री १ वेताची काठी, छडी –एरुस्व १५ १०४ वेताटी घेऊन त वेळां। ताडन करावया उदित।' –जै ५२ ५०; –ह ९ ४१ २ हातांत धरावयाची काठी वेताटी धरून अत्ययाची।' –दावि १३९ [वेत+काठी] **वेतारी**–वि १ वेत्रधारी २ अधिकारी –शर

**वेत**—स्त्री (गो) वीत (हाताची), विशिष्ट सदी [वीत]

**वेत**—स्त्री इस्टेटीच्या एका भागावर सारा कमी चढल्यास दुसऱ्या एखाद्या भागावर जो जास्त बसवितात तो –बॉबरम्यु १७ १८२७ [व्यतीत?]

**वेतड**—पु हत्ती 'वेतड ऐसा धरती रसाळा। वनात गौ सुंदर गोरसारा।' –वामन, विराट ५ ८५ [स]

**वेतन**—न १ मजुरी, पगार, केलेल्या कामाचा मोबदला, बिदागी 'वरदास दाससेना ह नाथा वेतनांत माग हे।' –मोकृष्ण ८४ २० –मोवन ४ १ ७ २ (विशेषत) सालीना नेमणूक (पूर्वी पुराणिक, पोतनीस, फडनीस इ०ना देत ती) 'गावकाम गाराशिवाय वतनपद्धतीला फाटा मिळाला व चाकरीबद्दल वतनाऐवजी वेतन देण्याची पद्धत चालली' –गागा ६८ [स] **०गुरु**–पु भाडोत्री निव्वळ पगारी मास्तर –टिव्या **वेतनी**–वि १ वेतन ठरवून कांहीं कामास लावलेला (गडी, मजूर, पुराणिक आश्रित इ०) 'मृत्यु न म्हणे वेतनी। वेतन धर्ता।' –दा ३ ९

१३ २ काहीं कामाबद्दल एखाद्याला रोख पैसे किंवा पगार न देता त्याच्या मोबदला बक्षीस दिलेला (गाव, हक्क, अधिकार इ०) वतन पहा ३ वेतनासबधाचा (तगा, हिशब इ०) ४ भाडोत्री, पगारी

वेतवेतून घेणें—वेवतो पहा

वेतस, वेतुस—न शरीरातून रक्त काढावयाचें एक साधन विशेष; तुबडी

वेताळ—पु १ पिशाचाचा राजा, भूतनाथ -ज्ञा १७ २९८ वेताळ फेताळें। जळो त्याचें तोंड काळें।'-तुगा ७९१ २ भूतपिशाचातील एक उच्च जाति किंवा त्या जातींतील एक व्यक्ति ३ द्वारपाळ, वैतालिक ' भाट वेताळ बंदीजन। भाइनग्वे वुलाग्गण।' -जै १०४१ ४ एक क्षुद्र देवता ग्रामदेवता -खया [स वेताल] म्ह० वेताळ आहे तेथें भुतावळ आहेच ०पूर्वस्थळीं येणें-१ (एखादी व्यक्ति) पूर्वकर्मानुसार वायू लागणें, (वेताळ पचविशीतील गोष्टीवरून) नियन्त्रण गल्यावर पुन्हा पूर्वीचा पेशा पत्करणें २ (बिघरलेल्या मनुष्यानें) चौदावें रत्न दाखविल्यावर वठणीवर येणें ०सेना-स्त्री पिशाचवत् क्षणिक क्वचित् दिसणारी किंवा दिसताच अदृश्य होणारी शक्ति वेताळ-सेना दृष्टी पडोनी। कोठें लपली नेणवे।' -दावि २५० भुतें, पिशाचाचा समूह वेताळाची फेरी-स्त्री वेताळाची प्रदक्षिणा, सचार वेताळाची स्वारी-स्त्री १ वेताळ आणि त्याचे गण, अनुचर याची यात्रा मिरवणूक २ पिशाचदीपिका वेतोबा-पु (कु) वेताळ देव

वेत्ता—वि ज्ञाता, जाणता, एखाद्या विषयात पारगत असलेला तज्ज्ञ [स] वेत्तृत्व-न एखाद्या विषयाचें ज्ञान; त्यातील पारगतता [स]

वेत्यास—पु (प्र) व्यत्यास, फरक विरुद्धपणा, विसगतता विपर्यय [स व्यत्यास]

वेत्र—पु १ वेत २ वेताची छडी, वेताटी ३ (राजा किंवा मोठा अधिकारी याच्या) छडीदार-चोपदाराच्या हातातील काठी [स] ०धर-धारी-पाणी-पु भालदार चोपदार द्वारपाळ; द्वाररक्षक [स] ०यष्टी-स्त्री वेताची काठी ' घेती बिरोटावरी वेत्रयष्टी।' -रुरुह ५२५ [स] ०वतिका-वेत्रवती-स्त्री स्त्रीद्वारपाल राजाच्या सनिध असणारी दासी वेत्रासन-न वेताची बैठक वेताचें आसन, खुर्ची [वेत्र+आसन] वेत्रकीय-वि वेतानीं परिपूर्ण भरलेलें खूप वेत असणारें-होणारें [स]

वेथा—स्त्री १ व्यथा दुःख शारीरिक किंवा मानसिक पीडा ' औषध नेघे असोन वेथा।' -दा २१२२ २ सकट ' वेथा मोठी रावणा।' -नेसीस्व ४१०२ [स व्यथा]

शाको ७ २

वेद—पुमव १ भारतीयाचे पवित्र आद्य धर्मग्रथ, श्रुति, जगातील अत्यंत प्राचीन वाङ्मय वेद चार आहेत ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद यांतील मूळचे तीन हे मुख्य वेद होत आणि इतिहास व पुराणें याना पाचवा वेद म्हणण्यात येतें ' २ ज्ञान ३ (मद्रास) मराठी-बदलापूर १६९ -वि चारही सत्य। ' दोन अक्षौहिणी पांडवदळ। वेदअक्षौहिणी हें त्याचें बळ।' -जै ८३ २७ [स वेद विद्-जाणणें] एखाद्याचे वेद हरणें-सर्व युक्त्या वेत इ० फसून कर्तव्यमूढ होणें; काहींएक मार्ग न सुचणें, तत्रमत्र हरणें ०त्रय-न ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद -ज्ञा ७८४ ०त्रयी-स्त्री १ धर्म, अर्थ व काम ह्याचा समुच्चय २ सहिता, ब्राह्मण व आरण्यकें मिळून होणारे ग्रथ ३ ऋग्वेद यजुर्वेद व सामवेद हे तीन वेद ०निंदक-पु वेदाची निंदा करणारा, बौद्ध, जैन इ० अन्य धर्मीय मनुष्य ०पद्य-न वेदवाक्य वेदातील ऋचा ' घुमघुमिती घोषा। वेदपद्याचा।' -ज्ञा १५१८८ ०पुरुष-पु वेदरूपी पुरुष, वेद ' वेदपुरुष तरि नतो का वचन। निवडूनि भिन्न दास विलें।' -तुगा १६५३ ०प्रतिपाद्य-वि वेदाच्या प्रतिपादनाचा असणारा (विषय) ' ॐ नमो जी आद्या। वेदप्रतिपाद्या।' -ज्ञा ११ ०मुख-वि वेद तोंडपाठ येत असलेला, घोकलेले वेदपठण केलेला ०मूर्ति-स्त्री (मूर्तिमत वेद) वेदविद्यासपन्न, विद्वान् भिक्षुक, शास्त्री इ० च्या नावामागें लावण्याची सन्मानदर्शक पदवी ०रक्षण-न वेदाचा प्रतिपाळ हा ब्राह्मणाचा आचार मानला आहे ०लोक-कु-पु वेद आणि जग किंवा वेद हेच जग श्रुतिशास्त्र ' तो गा मी निरुपाधिकु। क्षराक्षरोत्तमु एकु। म्हणोनि म्हणे वेदलोकु। पुरुषोत्तमु। -ज्ञा १५५५७ ०वती-स्त्री पृथ्वी, वेद (अन्न) युक्त पृथ्वी ' जयाचनि सौरम्भे जीवित जोडे। वेदवतीये। -ज्ञा ११२२४ ०वाक्य-न १ वेदश्रुतिसहिता, वेदातील वचन वेदवाक्यातून आगगाडी, तारायंत्र काढण्याचा प्रयत्न जितका असमजस ' -टिळे ४५२ २ ज्याच्या प्रामाण्याला निराळा आधार लागत नाहीं असें वेदातील वाक्य ३ (ल) प्रमाण वचन ०वादरत-वि वेदातील अर्थवादामध्यें मग्न असलेला म्हणोनि हे पाया। दुर्बुद्धि देख सर्वैया। तया वेदवादरता। मनीं वसे।' -ज्ञा २२५५ ०विद्-वि वेद जाणणारा विद्वान् -ज्ञा ८१०३ [स] ०शास्त्रसपन्न वि वेदमूर्ति शास्त्रपुराणादि जाणणाऱ्या प्रतिष्ठित ब्राह्मणाच्या नावापूर्वी कागदोपत्रीं लिहावयाची पदवी याचा सक्षेप वे० शा० स० असा करतात ०सार-नपु वेदाचें सार किंवा रहस्य, वेदाचें सार असलेली देवता ' जयजय जगद्गुरु वेदसारा।' वेदांगें-नमव वेदानुपयोगी शास्त्र वेदाचाच भाग म्हणून गणलेलें शास्त्र, उपवेद हीं अंगें सहा आहेत शिक्षा कल्प, व्याकरण छद ज्योतिष व

निरुक्त षडंगें पहा [वेद+अंग] **वेदांत-पु** (वेदाच्या अंतीं असलेला) वेदाचें सार १ ब्रह्मज्ञान सांगणारा वेदानंतरचा भाग, उपनिषदें उत्तरमीमांसा, षड्दर्शनांतील सहावें दर्शन, उपनिषदां तील तत्त्वज्ञान 'वेदांतु तो महारसु। मोटकें मिरवे।' -ज्ञा १ ११ -एभा १७ ४० २ प्रपंचाचें ऐहिक सुखदु खाचें मिथ्यात्व आणि ब्रह्माचें सत्यत्व प्रतिपादिणारी साधुसंत, हरिदास इ० सांगतात ती गोष्ट, उपदेश, ब्रह्मज्ञान ३ ब्रह्म हेंच सत्य आहे, बाकी जग मिथ्या आहे असें सांगून ईश्वराच्या सच्चिदानंद स्वरूपाचें निरूपण कर णारें मत, जीवात्मा आणि परमात्मा यांचें ऐक्य दाखविणार अद्वैतमत वेदांताचे द्वैत, अद्वैत व विशिष्टाद्वैत असे मुख्य तीन पंथ आहेत [वेद+अंत] **वेदांती-वि** १ उपनिषदांतील ब्रह्मज्ञान अभ्यासणारा किंवा त्याप्रमाणें वागणारा, ब्रह्मज्ञानी, वेदांतमताचा २ ज्ञानमार्गी, ज्ञानकांडप्रतिपादक याच्या उलट धादांती -गीर २८७ म्ह० वेदांत्यापेक्षां धादांती बरा **वेदाध्ययन-न** वेद पठण, वेद शिकणें पंचमहायज्ञांतील एक यज्ञ -गीर २८८ [वेद+अध्ययन] **वेदाभ्यास-पु** १ वेदाचें अध्ययन, वेदपठन २ ॐकाराचा जप [वेद+अभ्यास] **वेदाज्ञा-स्त्री** वेदानें सांगितलेलें कर्तव्य, वेदाची आज्ञा, वेदवचन [वेद+आज्ञा] **वेदोक्त-वि** १ वेदांत कर्तव्य म्हणून सांगितलेलें २ वेदमंत्रोच्चारपूर्वक ३ (ल) वेदमंत्रोच्चारपूर्वक करावयाचा(धर्मविधि) याच्या उलट पुराणोक्त 'वगमट, तुला काय काय वेदोक्त करता येतें?' -तोव ६१ **वेदोक्तकर्म-न** वेदोक्त, वेदोक्त मंत्रानें करावयाचा गृह्यसंस्कार जुन्या शास्त्राप्रमाणें हा अधिकार फक्त त्रैवर्णिकांना असे 'अली कडे इंग्रजीविद्येनें व पाश्चिमात्य शिक्षणानें संस्कृत झालेल्या मराठे मंडळींच्या मनांत जीं कांहीं खुळें शिरलीं आहेत त्यांपैकींच वेदो क्तकर्माचें खूळ एक होय' -टिले ४ ३१६ **वेदोदित-वि** वेदोक्त पहा [वेद+उदित] **वेदोनारायण-पु** १ वेदस्वरूपी परमेश्वर वेदविद्यासंपन्न ब्राह्मणाला सन्मानद्योतक लावावयाची पदवी [स]

**वेद—न** कपट, कारस्थान 'म्हणोन ईश्वर पाप मृत्याचें। वेद दवडील लोकनिंदेचें।' -मुआदि १६ १४८ [स वेध]

**वेद—पु** (प्र) वेध, नाद, छंद 'अरतह हरिकथेचा छंदु। सकळाम लागे नामवेदु।' -दा १९ ६ १८ [वेध] **वेदणें-क्रि** (महानु) मोहून जाणें (प्र) वेधणें पहा 'एक वेदुनी म्हणती देवातें धावी रुक्मीणी।' -धवळेपू ४२ २

**वेदकु—पु** (काव्य) जाणणारा, ज्ञाता 'तैसा वेद्याच्या विल्यीं। केवळ वेदकु उरे पाहीं।' -ज्ञा १८ १२०३ [स विद्-वेद म वेदणें]

**वेदणें—सक्रि** (काव्य) जाणणें -खिपु [स विद्]

**वेदना—स्त्री** १ तीव्र दु ख, कळ, तिडीक, यातना. २ कळविणें, जाणीव देणें, दिग्दर्शन, ज्ञान, समजावणी [स] म्ह० ह्या बोटाची वेदना त्या बोटाला येत नाहीं =एकाच्या दु खाची जाणीव दुसऱ्यास मुळींच होत नाहीं

**वेदि-दी, वेदिका—स्त्री** १ उच्च आसन २ यज्ञकुंडाचें वरची बाजू, भोंवतालची जागा, आहवनीय, गार्हपत्य व दक्षि णाग्नि या तीन अग्निकुंडाच्यामधील विशिष्ट आकृतीची दर्भाच्छा दित जागा यज्ञानें, उपकरणीं इ० ठेवण्याची स्वतंत्र जागा (देऊळ, मंडप इ० ठिकाणीं) 'वेदिका रचे माडवीं। हरी रांच्या।' -ज्ञा ८ ४९ ३ लग्न, मुंज, इ० विधींत घातलेलें बहुलें, देवळांतील देवांच्या मूर्ति असलेला उंचवटा [स]

**वेदित—वि** कळविलेलें, उघड केलेलें, पुढें मांडलेलें, जाण विलेलें [स] **वेदितव्य-वि** कळवावयाचें, जाणवावयाचें, जाणावयास योग्य

**वेद्य—वि** जाणण्यास योग्य, जाणावयाचें (जगत, ब्रह्मवस्तु इ०) [स] (समासांत) तर्कवेद्य, मनोवेद्य ज्ञानवेद्य, इंद्रियवेद्य -ज्ञा ६ ४७९ 'वेद्या देता मिठी। वेदही मुके पोटीं।' -अमृ २ १५

**वेध—पु** १ मोती, माणिक इ० ना भोंक पाडण्याची क्रिया, छिद्र करण्याची क्रिया २ छिद्र, भोंक, वेज ३ भेद, दृष्टि, बाण, गोळी इ० नीं एखाद्या लक्ष्यावर केलेला परिणाम, लक्ष्य पदार्था वर झालेला परिणाम ४ सूर्यग्रहणाच्या पूर्वी चार प्रहर आणि चंद्रग्रहणाच्या पूर्वी तीन प्रहर अशी धर्मशास्त्राप्रमाणें असलेली ग्रहणसंबंधीं दोषाची व्याप्ति या कालांत भोजन इ० निषिद्ध आहे ५ (ज्यो) खस्थ पदार्थाचें क्षितिजापासून किंवा खस्वस्तिका-पासून असलेलें कोनात्मक आणि कालात्मक अंतर ६ मुख्य तिथिनक्षत्राचा दुसऱ्या तिथिनक्षत्राच्या त्या दिवशीं सकाळीं किंवा सध्याकाळीं असणाऱ्या अंशात्मक भागाशीं येणारा गुणदोष-प्रयोजक संबंध 'आज मंगळवारी दशमी तीन घटिका आणि एकादशी पडली सत्तावन घटिका म्हणून ह्या एकादशीला दशमीचा वेध आहे' ७ सप्तशलाकादि चक्राचे ठायीं एकशलाकादिगत जीं नक्षत्रादिक असतात त्यांतून एकीकडचे नक्षत्रादिकावर जो कोणी ग्रह असतो त्याचा दुसरीकडचे नक्षत्रादिकांवर जो दृष्टिपात असतो तो. एका नक्षत्रानें दुसऱ्यासमोर येण्यानें होणारा परिणाम (एक वस्तु दुसऱ्या समोर अगदीं समरेषेंत आली असली म्हणजे तें अशुभ मानतात यामुळें घराचा दरवाजा व दिंडीदरवाजा हे समोरा समोर नसतात, किंवा एक खिडकी दुसरीच्या समोर नसते) (यावरून पुढील अर्थ) ८ अटकाव अडचण, विरोध, उपसर्ग, पाय बंद अडथळा. 'जातो खरा पण वेध न आला म्हणजे बरा' ९ एखाद्यावर असलेल्या कार्याच्या भारामुळें, काळजी-यातनामुळें

त्याला स्वतन्त्रपणें मागतां न येणें 'प्रपचाचा वध ज्याच्या पाठी मागें आहे त्याला गेळ-समाधी कोठून सुचतील?' १० चाल लेल्या कामांत अडथळा आल्यानें झालेला खोळंबा 'माझ्या कामांत वेध आला' ११ काळजी, निकड, चिंता, घोर, पुढें करावयाच्या गोष्टीचें आधीं लागलेलें व्यवधान 'ह्या कामाचा मला वेध असा लागला कीं रात्रीं मला झोंप आली नाहीं' १२ ध्यास, छंद, नाद, आकर्षण, चटका, ओढा 'जडे पाठीं धावेती वधें। आनंद डुलति चतुष्पदें।' -ऋ ३६ -ज्ञा ११ ४१० -एरडव ६५ -तुगा ११७ १३ तळें, विहीर इ०चा खोलपणा १४ प्रवेश, शिरकाव 'एक एकाशीं होय वेध। परि प्राप्तीविण नव्हे बाध।' १५ नेम (बाण इ० चा) १६ सूक्ष्म, लक्ष-पूर्वक अवलोकन, टाव घण १७ चित्ताकर्षकपणा 'वेधें परि मळाचें बीक मोडे। जयाचेनि।' -ज्ञा ६ १५ १८ चिंतन -ज्ञा १८ ९६१ [स विधू=छिद्र पाडणें] ०घेणें-करणें-दुर्बीण इ० साधनांनीं खस्थपदार्थांची स्थिति, गति इ० मापणें किंवा ठरविणें, अवलोकन करणें

वेधक—वि १ भोंक पाडणारा २ (ल) झोंबणारा, बोचणारा, तिखट, कडक ३ हृदयस्पर्शी, शहारे आणणारा, टाव घेणारा ४ आकर्षक, चित्तहारक (समासांत) मनोवेधक 'म्हणती वेधका वनमाळी। आम्हांस टाकून गोकुळीं। तुम्हीं द्वारका वसविली।' -ह ३६ ३९ [स] वेधणें-उक्रि १ भोंक पाडणें, भोसकणें २ मारणें, टोंचणें, विद्ध करणें 'प्रभुसी शिरतीं वेधी' -मावर्ण ११ २१ ३ एकाग्र करणें, स्थिर ठेवणें (मन) ४ आकर्षून घेणें, गुतविणें 'ज्याच्या नीतिश्रवणीं ज्ञात्याची चित्तवृत्ति वेधावी।' -मावर्ण ७ ? ५ क्षत पाडणें अतःकरण विद्ध करणें, भेदणें ६ परिणाम करणें, व्याप करणें 'एऱ्हवीं दिठी वेधली कवळें। तें चादणियातें म्हणे पिवळें।' -ज्ञा ९ १४१ [स वेधन] वेधन-न १ छिद्र, भोंक, वेध पाडणें, टोंचणें २ गिरमिट, भोंक पाडण्याचें एक हत्यार [स] वेधनीय-वि वेध पाडण्यास योग्य इष्ट [स] वेधवती-स्त्री १ वेधकपणा, आकर्षकता 'ते काई वाणौं वेधवती।' -शिशु ६०९ २ प्रेमशक्ति 'आता वेल्हाळ वेधवती।' -भाए ९२ -वि वेध लावणारी, आकर्षक 'कीं जगातें भूलवीति। ते श्रीकृष्णाची वेधवती।' -शिशु २४३ वेधशाला-स्त्री ग्रहाचे वेध घेण्याचे ठिकाण वेधशास्त्र न आकाशस्थ ज्योतींचें अवलोकन करून त्यांच्या गती, स्थिती, वगैरे निश्चित करणारें शास्त्र वेधित-वि १ विद्ध करणारें, भेदणारें २ वेध करण्यांत कुशल वेध्य-वि वेधण्यास योग्य शक्य, इष्ट, योजित [स]

वेधमक्षिका—स्त्री एक जातीची माशी (इ) इच्न्युमॉन फ्लाय -प्राणिमो ११६

वेंधळा—वि १ मद आणि अव्यवस्थित, बावळट व गचाळ 'धांव, धाव, असा काय वेंधळ्यासारखा इकडेतिकडे पहातो आहेस' -हामुबा. २ गोंधळलेला, गोंधळ घालणारा वेंभळ

वेधा—स्त्री (महानु) (प्र) विद्या, ज्ञान 'ते अब्रह्मा पलीकडे। ज्ञानसूर्य उजियडे। शुद्ध वेध तव जोडे। कैवल्यनिधि।' -ज्ञाप्र ३

वेधा—पु ब्रह्मदेव [स]

वेपी—स्त्री (गो) मासळी विकणारी महळी

वेपथणें—अक्रि (महानु) चळचळा कापणें 'वातहतें कर्दळीपत्रें। तेसीं वेपथे सर्व गात्रें।' -ऋ ६४ [स वेप्-वेपथु]

वेपथु-पु कप

वेंब(भ)ळ—वि १ (महानु) चांचरी, बोबडी 'तैसी वेंभळ वाणी। जिए श्रीमुखिची।' -ऋ ९४ २ (महानु) बावळा, वेंधळा 'एका कर्णे तारसे वेंभळें।' -दाव २८५ ३ लुला, गलित 'कैसे सेविव शकही पडनि यद्गात्रें भयें वेंबळें।' -मोकृष्ण ६८ २९ [स विह्वल; प्रा विंभल] वेंभळणें-अक्रि चाचरणें

वेमा, वेम—पुन १ (विणकाम) मागावर बाणा दाबण्याचें साधन; फणी २ माग [स वम]

वेय—पु (गो) व्याही पहा ०जेवण-न व्याहीजेवण

वेयो—क्रि (खा) झाला 'राम खूब खूस वेयो' [स भू हिं हुवा]

वेर—स्त्री भेग, चीर वेरणें-चिरणें 'लाकडाचा भुसा लांकूड वेरून पडतो' -अधप ११२७

वेरजार-झार-धार—स्त्री जा चे (प्र) वेरझार पहा 'जामुद करति वेरझार।' -राला ५९

वेरीं, वेऱ्हीं—शब १ (काव्य) पर्यंत; पावेतों (काल-स्थलवाचक) 'पहींहुनि मुगुटवेऱ्हीं। राममूर्ति देखिली साजिरी।' -स्वादि १२ २५ 'ज्या आजवरि सरिता तुजशीं मिळून।' -विवि ८ ७ १२३ 'समुद्रजळ उसळत कैलासवेरी।' -ज्ञा १ ९५५ वर पहा २ कडून, वारीं 'धुधुवातें कुठारें वऱ्हीं। बान भुजाचीं करौनी काढौरीं।' -शिशु ४५५ म्ह० अंधळें धावे कुडावेरीं

वेरुल—पु (महानु) लाडगा 'हर्षामर्षे वेरुल चोहीं। दिशा धावताति।' -ज्ञाप्र २७० [स व्याल, वेउल]

वेरुळचा निचाडया—वि (व) अतिशय कृपण, कद्रु [वरूळ+निचाड]

वेरवाळी, वेरवाळीं—क्रिवि (प्र) वेळेवारीं पहा

वेर्थ—(प्र) व्यर्थ पहा 'नाहीं तरी हें वेर्थचि गेलें।' -दा ११० ६१ [व्यर्थ]

वेल—पुस्त्री १ लता, वृक्षादिकावर चढणारी वनस्पति २ नागवेल ३ बुडूक, काप इ० कानातल्या दागिन्यास

सोन्यामोत्याची साखळी असते ती. ४ वश, वंशज 'पार्थ म्हणे रक्ष या स्वर्ये वेल।'-मोभभ ४ ४०. ५ वेलाच्या आकाराची नक्षी ६ सोललेल्या झाडांचे पातळ वस्त्र, साल (भारा इ० बांधण्याच्या उपयोगी) [स वल्लि, प्रा वल्ली, गु पं वेल] ०चढविणें-उतरविणें, वेलाला आढ्या देणें-(पानमळा) वेल वर गुडाळणें, खाली करणें इ० क्रिया ०परतविणें-वेल उलटविणे (रताळी इ० चा) ०मांडवास जाणें-चढणें-वंश वाढणें, कुटुंबविस्तार होणें. 'प्रिय पुत्रातें भेटोनि म्हणे माडवास जा वेला।' -मोभाश्रम ४ २. ०गुंडी-स्त्री (व) नवताच्या धराबर टाकण्याकरितां तुन्हाटयाचे वेट दूरदूर लावून केलेला कडा ०गोंड-पु एक भाजी ०चवळी-स्त्री एक प्रकारची चवळी ०पत्ती-स्त्री वेल, पानें यांची नक्षी, बूट ०पाळी-स्त्री एक बुगडयाप्रमाणें कानातला दागिना 'कानीं घेवया आणिक वेलवाळया मोत्याचे सर।' -अफला ५५ ०बुटी-ट्टी-बूट-बुट्टा-स्त्रीपु भिंत, कागद, छीट इ० वर काढलेली वेलाची नक्षी, तन्हतव्हेची बूट ०बोंडी-स्त्री एक भाजीचा वेल फळाला वेलबोंडे म्हणतात. ०मिरची-स्त्री एका जातीची मिरची. ०वटी-स्त्री कुपण. 'तेणें बाचेस पडली वलवटी। बोलों उफराटी विसरली।' -एभा ९ ४२४. ०वाक-पु (ना) वेली वगैर समुच्चयानें ०वांगी-स्त्री वांग्याची एक जात फळाला वेलवांगें म्हणतात ०विस्तार-पु झाड किंवा इतर वेलींचा मोठा विस्तार, फैलाव. ०विस्तार वाढणें-(ल) वंश, कुटुंब वाढणें (आशीर्वादांत योजतात)

वेलरी-स्त्री वेल, वल्ली, वेलींचे जाळें 'मग पै कामनाचि लया। जिया जाल्या वेलरिया।' -ज्ञा १६ ३६७ [स वल्लरी]

वेली-स्त्री १ वल पहा २ लाव गाणें 'एकु हामामा घालीति हुवळी। एकु वेली गाताती।' -दाव ८५ ३ वश 'आमुची वेली कां खुंटिली। हा हा देवा वृत्ति बुडाली।' -दा ३ ३. ४० वेली जाणें-विस्तारणें, वाढणें 'जैसा वर्षाकाळु गगनीं। पाल्हे जे नवघनीं। तैसें आकारजात अज्ञानीं। वेलीं जाय।' -ज्ञा १५ १५२, -एभा २६ २५०. वेल्या करंज-पु करंज झाडाची एक जात

वेल—स्त्री (खा) तुळई -भाजै ७१४

वेल—स्त्री घोडयाना होणारा क्षयासारखा एक रोग

वेलची—स्त्री १ एलची, एलदोडा पहा २ कळीची एक जात

वेलचूल—स्त्री वैलचूल पहा

वेलंडी—वेलांटी पहा.

वेलदोडा—पु वेलची, एलदोडा पहा

वेला-ळा—स्त्री १ समुद्रकिनारा 'दर्पणागर वेळा। साडुनि चले।' -ज्ञा १६ ३९३ २ वेल ३ सीमा, मर्यादा [स]

वेलाउळ—न १ किनारा 'श्रीं भवार्णवाचे वेलाउळ। मुमुक्षूचें।' -ऋ ३८. २ बंदर, उतारपेठ 'जे परिमळाचे वेलाउळ। सारमादिवासी।' -ऋ ९६

वेलांटी, वेलांटी-डी, वेल्हांटी-डी—स्त्री. १ व्यंजनाला इ, ई स्वर जोडताना योजावयाच्या ि, ी, चिन्हांची संज्ञा 'क ला वेलांटी व म्हणजे की होईल' २ वृद्धि विस्तार 'पै जेथुनी ह एकडी। विश्वपरंपरेची वेलांडी।' -ज्ञा १५ ३८१ [वेल]

वेल्दावणें—वेल्हावणें पहा

वेली-ल्ली—स्त्री (गो) एक ल्हान जातीचा मासा -मसाप ३ ३

वेली—स्त्री घोडयाचा एक गांठीचा रोग -अश्वप २ १८०. वेल पहा

वेलें—न (बाई) मांगाचा मधला दांडा व जू याना बांधावयाचा कातडी दोर

वेलाणी—वि (ना) विडयाच्या पानाची एक जात

वेल्यें हुरथें—न एक प्रकारचा तांदूळ

वेल्हवणी—स्त्री विस्तार, पाल्हाळ 'तसी प्रकृतीच्या गुणीं। जया कर्माची वेल्हावणी।' -ज्ञा १८ ८२७ [वेल + लावणें] वेल्हावणें वेल्हवणें-कि १ विस्तारणें 'सत्व वेनि शोलासे। बोधतरु वेल्हावतु दिसे।' -भाए १८४ -अमृ ७ १३५ २ सुखावणें, आनदणें. 'ब्रह्मानंदे जीं डुल्लत। निजसुख वेल्हावत।' -एभा ७ २६९ ३ डोलणें, लोळणें 'आपु ऊनि समीरणें। वेल्हावती विहरणें।' -अमृ ९ २. -ऋ ५४. [स वेल्=हालणें]

वेल्हाळ—पु १ काव्यात्मक मडणें, विस्तार २ अतिशयोक्ति, तिखटमीठ (कि० लावणें, माडणें, करणें) ३ (सामा) वाढ, विस्तार 'हाक वेल्हाळ देसी नवी। जैसी साहित्यातें योजवी।' -स्त्री गर्विष्ट स्त्री -वि फोफावलेलें, विस्तारलेलें 'जैसी अकुरेंसी सरल। वेली दिसे वेल्हाळ।' -अमृ ७ ४१ [? वल्ली; प्रा वेल्ल] ०पणा-पु विस्तार 'वसी वैराग्यशाखा कवळिया। वेल्हाळपणें।' -ज्ञा १५ १९० वेल्हाळया-ळी-वि अतिशयोक्ति करणें, रगवून सांगणें, यांची खोड असलेला-ली

वेल्हाळ—पु नवरा किंवा इतर प्रियकर यासबधीं लाडिकपणें म्हणतात -स्त्री १ बायको किंवा इतर प्रियपात्र यासबधीं योजतात 'वदत वेल्हाळ गौरवर्णी।' -ह ९ १८२ (निंदार्थी) नगरभवानी, विलासिनी -वि १ लाडका, प्रिय 'पंच वर्षाचा चिल्या बाळ। बत्तीस लक्षणी वेल्हाळ।' -शिली (नवनीत पृ २३४) २ सुदर 'डोळम आणें वेल्हाळ।' -दाव ६४ ३ नाजुक 'कटावून पिक दिसे अशी वेल्हाळ।' -अफला ५४.

[देप्रा. वेढाल] वेल्हाळा-ळी-स्त्री. १ पत्नी, रक्षा, प्रीतिपात्र इ० स लावतात. 'कीं वेल्हाळा विगुल्हा। सेजे आलिया।' -शिशु ७५१. २ सुंदरी; प्रिय स्त्री; वेल्हाळ. 'देखोनि हासिन्नला वनमाळी। भिऊं नको वो वेल्हाळी।' -एरुस्व ८.५६. -र १२.

वेव—पु. आश्रय. -मनको.

वेंव—न. (महानु.) मागाचें सुत गुंडाळण्यास लागणारें सरळ लकूड. 'कव्हणी एक साळी हाटासि वेंव घेयावेया जाए।' -दृष्टांतपाठ ११. [सं. वेम]

वेवट—न. संकट; त्रास. 'पांडवांच्या याचें मी काय लागें। त्यांचीं वेवटें सोडी अनेगें।' -एभा २४.३८३. [सं. विवेट] वेवतणें, वेवंतणें-उक्रि. १ वेढा घालणें व लगटणें, नेट करणें. २ भंडावणें; त्रास देणें; जिकीर करणें (भिकारी इ० नीं) [सं. विवेष्टन] वेवतून घेणें, वेतवेतून घेणें-भंडावणें; त्रास देणें.

वेवधान—न. (प्र.) व्यवधान पहा. 'सावधान वेवधान उरलें नाहीं।' -दावि ५४.

वेवर्धना—स्त्री. विवंचना; चिंता. 'ऐसी वेवर्धना करी। दु:ख वाटलें अंतरीं।' -दा ३.४ ४६.

वेवसा, वेवसाय-व—पु. १ खरेदी विक्री; व्यापार. २ धंदा; उद्योग, व्यवहार. 'लज्जा वाटे जीवा। ग्रासलों या दु:खें वेवसाय देखें। तुटी देतां।' -तुगा ६५३. 'सोडोनिया वेवसाव। बोणा हातीं।' -रामदासी २.६५. (प्र.) व्यवसाय पहा. वेवसाई-(प्र.) व्यवसायी पहा. 'मृत्यु न म्हणे हा देसाई। मृत्यु न म्हणे वेवसाई।' -दा ३.९.१४.

वेवस्ता—स्त्री. (प्र.) व्यवस्था पहा. 'एवं देहाची वेवस्ता। ऐसी असे।' -दा ३.१.२७.

वेवाद—पु. विवाद; वाद पहा. 'निरूपण मिसें निंदा घडे। संवाद मिसें वेवाद पडे।' -दा ७.८.६६. [सं. विवाद] वेवादणें-अक्रि. वादविवाद करणें. वेवदरणें-विवाद करून भंडावणें. 'दुर्जनीं वेवदरून घेतला।' -दा १८.१०.४०. वेवादी-वि. विवादक; वाद करणारा. 'नेले बहुत वेवादी। बहुतापरीचे।' -दा ३.९.५४.

वेवारणें—उक्रि. (प्र.) व्यवहारणें पहा. 'बहुतजनासि वेवारिलें। तें खरे कैसेनि मानावें।' -दा ६.८.६.

वेंवें—न भीति, गोंधळ इ० कारणामुळें तोंडातून निघणारा अस्पष्ट उच्चार. 'बोलूं म्हणता आहा, पण विचार करा, नाहीं तर तेथें गेला म्हणजे वेंवें होईल' [ध्व.]

वेव्हार—पु (प्र.) व्यवहार १ व्यापार; देवघेव, धंदा. २ अडचणी, हरकती आणून उत्तर देणें; प्रतिवाद; सबबी; ढोंगाच्या गोष्टी सांगणें. (क्रि० सांगणें; करणें) ३ एखादी क्रिया, आचार, प्रापंचिक गोष्ट. 'तुजवांचोनि आता वेव्हार। खुंटला माझा।' -कथा ३.१२.१००. ४ लोकरीत; व्यवहार. ५ व्यवहाराची जागा; दुकान. 'राजद्वारीं कां सभे माझारीं। पैमावें पारीं अथवा वेव्हारीं।' -एभा१३.१४३. ६ खटला; दावा. 'न दिसे नरहरी। जिंतोनी वेव्हारीं। घेईन जाणा।' -गुच १.१२४. [सं. व्यवहार] वेव्हार-रा-री-पु. १ सावकार; व्यापारी. 'तेथें वर्धमान नामें वेव्हारा' -पंच १.५. 'मज प्रयोगमु फळावया। वेव्हारा होई।' -ज्ञा १४.१६. वेव्हारी-वि. १ व्यापारी. २ अडचणी; हरकती, सबबी आणणारा; हुज्जतखोर.

वेश—वेष पहा.

वेश्या—स्त्री. १ द्रव्याकरितां वाटेल त्याला आपल्या शरीराचा विक्रय करणारी स्त्री; रांड; कसबीण. 'वेश्या म्हणजे जोडयांतल्या खडयासारख्या आहेत, त्यकर निघत नाहींत आणि सुपल्यावांचून रहात नाहींत.' -मृ ५०. २ कलावंतीण; नायकीण; नर्तकी. [सं.] ०गमन-न रंडीबाजी. ०वृत्ति-व्यवसाय-स्त्रीपु. शरीरविक्रय; कसब; भगवृत्ति. वेश्याचार्य-पु वेश्यांचा मालक; वेश्या बाळगणारा. [वेश्या+आचार्य] वेश्यागार, वेश्यालय, वेश्याश्रय-पुन. वेश्या राहतात तें ठिकाण, घर; कुंटणखाना [वेश्या+आगार, आलय, आश्रय]

वेष—पु. १ पोशाख; कपडे; पेहराव. २ पोशाखाची तऱ्हा, प्रकार, रिवाज ३ मुखवा; सोंग; मिष ४ रूप. 'मी सूर्यचिनि वेषें। तपें तैं हें शोषे।' -ज्ञा ९ २९६. [सं] ०धारी-पु. १ वेष, सोंग, मुखवा घेणारा; सोंगाड्या. 'पुरुष-स्त्री वेषधारी.' 'येर मायीक वेषधारी। असत्हिय।'. २ ढोंगी. ०भूषा-स्त्री. वस्त्रालंकार घालणें; पोशाख करणें, प्रसाधना. (इं.) टॉयलेटला नवा प्रतिशब्द.

वेष्टक—वि वेढा, वळसा, आवरण इ० घालणारा. [सं.] वेष्टणें-उक्रि. १ वेढणें; घेरणें. 'वेष्टिन सभे देखोनि वृरें। दरी वृत्तांत विचारी।' -मुआदि ४.१४३ २ भोंवतीं गुंडाळणें; लपेटणें. [सं. वेष्टन] वेष्टन-ण-न १ घेरणें; वेढणें. २ आवरण; आच्छादन ३ पिशवी; म्यान, गवसणी. ४ कुंपण; तट; कोट. ५ वळसा, फेरा (रस्त्याचा पर्वताभोंवतीं) ६ नृत्यांतील एक प्रकार, हावभाव ७ वेढण्याचें वस्त्र; धोतर [सं. वेष्टन] वेष्टनीय-वि. वेटण्यास, भोंवतीं गुंडाळण्यास, झांकण्यास योग्य. [सं.] वेष्टा-पु वेढा; घेरा. 'वेष्टा धनंजयाला आत्मयशें सत्य पाड वेष्टाया।' -मोद्रोण २.२०. वेष्टित-वि. वेष्टिलेला. वेष्टी-स्त्री. १ (तंजा) धोतर; लुंगी. २ आंतडीं गोळा होणें वेट पहा. 'हृदयीं कवळून जठरवेष्टी। होत असे मोहानें।' -नवनीत १४.६.

वेस—स्त्री. १ गावकुसाचा दरवाजा, नगरद्वार. २ परसाचें, कुंपणाचें दार. ३ घराचें मोठें दार; दिंडीदरवाजा. ४ सरकारी पट्टी,

सारा भरणें (गांवचे दरवाजे लावून तो वसूल करीत यावरून) [सं विश्] वेशी-वेशीवर-ला-स बांधणें-टांगणें-मोठ्यानें सांगणें, जाहीर करणें, सर्वांना कळविणें 'हे मार्से वेड मी यचव्या लेखात जनतेच्या वेशीवर टांगल आहे' -ककाभार्या १ (दुखणें) वेशीस बांधणें-आपली अडचण, आपत्ति जाहीर करणें ०कट-ड-स्त्री. कुपणाच्या दाराची कवाडी, फाटक ०कर-री-पु वेस राखणारा महार (पूर्वी गांववेशीवर महाराचा पहारा असे) 'जोहार मायबाप जोहार। सारा यावया आले वेसकर।'-तुगा ३३६ ०धारी-पु (वों) घर राखणारा मूळ पुरुष (सर्प), किंवा देवता ही घरास्वामीतासेताची बाधा होऊ देत नाहीं

वेसगणें—अक्रि (व) दुबळे होणें, व्यंग पावणें 'म्हातारपणीं हातपाय वेसगला तर कोण सभाळ करील?'

वेसजी—स्त्री १ शुद्धि २ प्रकाश 'जयाचेनि आंगिकें तेजें। आपों रविशशीचिये वकिजे। म्हणऊनि जग वेसजे-। वीण असे तया।' -ज्ञा ६ ११० [सं विशुद्धि, प्रा विसुज्झि]

वेसण-न—स्त्री १ बैल, टोणगा इ० कार्नी स्वाधीन रहावें म्हणून त्याच्या नाकांत ओंवलेली दोरी नथणी 'कीं नासिकीं वेसण घालून। महावृषभ वरिती दीन।' २ (ल) पकड, छाप, वर्चस्व मालकाच गुप्त व बारीक काम नोकराकडे आलें म्हणजे नोकराची गुप्त आणि बारीक वेसण मालकाच्या मर्मस्थानीं बसलीच' -सत्वपरीक्षा ५८ ३ एक नाकांतला अलंकार-बुलाख 'त्यावरी वेसण साजिरी वसुमतीधीशात्मजा नासिकीं।'-शशिसेना ४ (कुस्ती) आपल्या जोडीदारास खालीं घरून आपली बोटें जोडीदाराच्या नाकपुडींत घालून वर ओढून जोडीदाराला चीत करणें [दप्रा अवयासिणी=नासारज्जू तुल० गवेसण]

वेसणी-स्त्री वेसण अर्थ १ पहा 'वेसणी घालीन, मासा। मनोरथ पुरवी।' -दा ३ ३ ४२

वेसन-नी—व्यसन-नी पहा वेसन भलें निष्काम झालें नर ना॰ नारी। -तुगा २९७ 'घाहाड वेसनी निग्रहीं।'-दा २ ३ २७

वेसवा—स्त्री १ वेश्या कसबीण २ नवरा असून व्यभिचार करणारी स्त्री ३ (सामा) छचोर, चेटगी स्त्री ४ (शिवी) निर्लज्ज स्त्री [सं वेश्या]

वेसवार—पु १ दोन तीन प्रकारच्या डाळी, धने, हळद, मिरच्या इ० पदार्थ तळून किंवा भाजून भाजी इत्यादिकांवर घालण्यासाठीं त्यांचें जें कूट करतात तो मसाला २ मेतकूट ३ (वों) कच्चा मसाला 'मांस व वेसवार यांचों पोटींसें वाता वैद्यावर बांधावीं' -वार २ ३६१ [सं वेशवार] वेसवारचें लोणचें-न मोहऱ्या, मेथ्या, हिंग, हळद इ० चें चूर्ण आत घालून करतात तें लोणचें

वेस्त-स्तीं—वि अव्यवस्थित, व्यस्त पहा 'मूर्ख अभक्त वेस्ती। दरिद्र भोगिजे।' -दा १४ ८ ३, -दा १२ ६ १. [व्यस्त] ०वेस्ता-वि अस्ताव्यस्त 'परंतु येथील कारभार वेस्तवेस्ता' -पेद १ ४३

वेहकळी, वेहंकळी—स्त्री एक लहान झाड, विकळी. 'सोवणी टाहकळी वेहकळी' -कालिका २२ १४

वेहणें—अक्रि (मिनी) राहणें जिया हारीं जीव घुस वेहतो' -मि ३१

वेहरण—न आळ, दोष 'यार्णे टाविली ममतामाया। मजवरी वेहरण आलें वाया।' -भवि ४ २१० विहरण प.]

वेहळा—पु बेहडा, झाड व फळ

वेहळा वेहेळा—पु ओढा, नाला, ओहोळ वहाळ पहा

वेहायली—स्त्री लगामाचा एक प्रकार -अश्वप १ १८५

वेहाळ—स्त्री उषःकाल, 'वेहाळीचे वार वाता।' -उषा ७३ २१

वेळ—पुस्त्री १ कालविभाग, काल २ आताचा काळ व काहीं कार्य होण्याचा काळ यामधील अवकाश, अंतर 'पेरे होण्यास अजून वेळ आहे म्हणून अर्धी घरें शाकारून घ्या' ३ फुरसत, न गुंतलेला, रिकामा वेळ 'माझे पाटीसीं काम आहे वेळ सापडल्यास येईन' ४ अपेक्षित किंवा योग्य कालापेक्षां जास्त काळ, उशीर (क्रि० लावणें, लागणें) 'मला शाळेंत जाण्यास वेळ झाला' 'वेळ लावला-ली, वेळ लागला-ली' ५ (स्त्री) समय, हंगाम, विशिष्ट काल 'ही वेळ पोथी वाचावयाची नव्हे' ६ दिवसाचा अर्ध भाग, सकाळ किंवा दुपार ७ तीस घटिकांच्या (रात्रीं किंवा दिवसा) आठ विभागांपैकीं एक अमृत, उद्योग, काळ (मृत्यु), चंचळ (चोर), रोग, लाभ, शुभ आणि स्थिर वेळ याखेरीज इतर पुष्कळ प्रकारच्या वेळा आहेत उदा० अघरी-घोर-भीत-राक्षस-वेळ, जाती-यती वेळ इ० ८ मुहूर्त ९ प्रसंग, खेपी -क्रिवि वेळा पहा ता दिवसास तीन वेळ जेवतो' [सं वेला] ०दवडणें-व्यर्थ, निष्फळ वेळ घालविणें ०मारून नेणें-प्रसंगीं कमीपणा येऊ न देणें, युक्तीनें प्रसंग साजरा करणें बाणी राखणें 'केवळ शब्दामात्रें वेळ मारून न नेतां कृति करून दाखविली पाहिजे' -निच ०वाहणें-बरें किंवा वाईट होण्यास समय अनुकूल होणें सामा शब्द- ०अवेळ-स्त्री उचित किंवा अनुचित, अनुकूल किंवा प्रतिकूल असा काळ, प्रसंग (विवक्षित कामाविषयींचा) 'वेळ अवेळ आहे घार प्रसंग जवळ अधिक असू द्या' -क्रिवि वेळ किंवा अवेळ न पाहतां वाटेल त्यावेळीं 'वेळ अवेळ बाहेर जातोस परंतु एथें पिशाचाचा उपद्रव भारी आहे' ०काळ-पु. काळ

वेळ पहा (क्रि० येणें, जाणें, गुदरणें, पडणें, टळणें) **वेळा काळाला कामास येणें**-प्रसंगविशेषीं, अडीअडचणीला उपयोगी पडणें **वेळणेवारचा, वेळणेवारी**-विक्रिवि वेळेप्रमाण, वेळेनुसार, वेळेच्या चांगल्यावाईट गुणाप्रमाणें व भाषा किंवा वृत्ति यांच्या प्रसारानुसार पडणारी (गोष्ट इ०) अनिष्ट परिणामाच्या, कृतीच्या, वचनाच्या प्रसंगीं योजतात 'वेळणेवारचा उगाच तूं बोलतोस काय म्हणून' [वेळ आणि वार] **०(अ)नसार-(वेळनसार)**-वेळेनुसार पहा **०नावारीं**-क्रि बरीवाईट वेळ न पाहतां वेळअवेळ पहा म्ह० वेळ ना वारीं गाढव आलें दारीं [वेळ+ना+वार] **०प्रसंग**-पु काळकथा, वळकुवल, वेळअवेळ पहा **०भर**-क्रिवि १ सारा दिवस, वरचेवर 'वेळ भर करसी वेरझारा धाक याचा वाटे मजप्रती।' -होला ९८ २ अर्धा दिवस पर्यंत ३ थोड्याच वेळपर्यंत **०मारणारा-मान्या**-वि समयसूचक, प्रसंगावधानी. **०वारीं**-क्रिवि वेळेवारी पहा **०साधणारा-साधु**-वि १ संधी साधून काम करणारा २ वक्तशीर **वेळा**-स्त्री १ हंगाम, समय, विशिष्टकाळ २ आवृत्ति वाचक गणनाकाळ **वेळां**-क्रिवि संख्यावाचक किंवा गुणवाचक उपसर्ग लावून आवृत्ति दाखविण्यासाठीं योजतात उदा० एक-तीन-बहुत-किती-वेळां 'एक वेळा सोसीन, दोन वेळा सोसीन, तिसऱ्यानें बोलशील तर तोंडात खाशील' **वेळाईत**-वि वेळेवर, संकटप्रसंगीं सहाय्य करणारा, मदतीस धावणारा, कैवारी -विउ ११ २८ 'तुका म्हणे देव भक्त। वेळाईत। भक्त ते निश्चिंत त्याचि यानें।' -तुगा २२७५ [वेळ+आगत? तुल० हिं वेलाइतो=वेळेवर] **वेळापत्रक**-न आगगाड्या, आगबोटी, शाळा इ०च्या कार्याचा वेळा दाखविणारा तक्ता (इं) टाईम-टेबल **वेळाप्रकाशक**-पु (गणित) पट दाखविणारी संख्या, वार संख्याक, गुणक **वेळायित**-वेळाईत पहा 'धावला राघव वेळायितु।' -दावि १४३ **वेळावणें**-अक्रि आबाळणें, वेळेवर गरजेच्या गोष्टी न मिळाल्यानें खंगणें (पीक, जनावर, मूल इ०) **वेळावेळ**-स्त्री १ वेळअवेळ पहा २ (क) विलंब उशीर 'तो अलीकडे वेळावेळानें येऊं लागला आहे' [वेळ+अवेळ] **वेळेन(नु)सार**-क्रिवि १ वेळ, प्रसंग याला अनुसरून २ वेळप्रसंगीं, कधींकधीं **वेळेवारचा**-वि वेळेवर असलेला कधीं वेरेवाळचा असा अशुद्ध प्रयोग येतो **वेळेवारीं**-क्रिवि योग्य वेळीं, वेळ टळण्याच्या आधीं, वेळेचा अतिक्रम न होतां 'तुला चाकरी सोडणें असल्यास वेळवारींच सांग नाहींतर आयते वेळेस फसवशील' **वेळावेळां**-क्रिवि १ वरचेवर, वारवार २ वेळ येईल त्याप्रसंगीं, प्रत्येक वेळीं [वेळ द्वि]

**वेळ**—स्त्री एक वनस्पति

**वेळ**—स्त्री समुद्रकिनारा वेल पहा

**वेळ**—पु वेळू पहा **०अंवस**-स्त्री पंढरपूर येथील कार्तिकी किंवा मार्गशीर्षी आवस यादिवशीं वेणुनाद कृष्णाप्रीत्यर्थ नदीतील वाळवंटावर लोक जेवतात **०कट-कूट**-न वेळूकाचा तुकडा. [वेळू+काठ] **०काठी**-स्त्री काठी, वांबूचा वासा **०वन**-न. वेळूचें वन 'यदुवंशाचीं वेळवनें। घनदाटी असती।' -भाए ५३. **वेळवी**-वि वेळूसंबंधी 'वेळवी वंसा' 'वेळ्ाचे वेल यांचे न पदवति जसे तें तसें वेळवांचे।' -र (गजेंद्रमोक्ष) ५४

**वेळ**—न (गो) जीभ खरवडण्याची (सोनें-चांदीची) पट्टी

**वेळ**—स्त्री वळी (गंधादिकाची)? 'ज्याच्या कपाळाची वेळ। सुर सकळ वांछिती।' -भारा बाल ६ ५६. [वळी]

**वेळकोट**—एळकोट पहा 'कि वाचे वेळकोट बोलती।' -वेप ९३.

**वेळटी**—स्त्री (क) विळी (मराठेलोकांत प्रचार) [विटी अल्प]

**वेळण**—स्त्री १ पेज 'वेढिलें वेळण भाताचें।' -ययादि १७ १३३ २ वेळवण-णी पहा 'शेवया वळिल्या अतिकुसरी। असार वेळण सांडिलें दुरी।' -एरुस्व १४ ११३ **वेळणी**-स्त्री १ वेळण काढण्यासाठीं केलेलें तव्यासारखें खोलगट पितळी भांडें २ (व) मडक्यावर झांकण ठेवण्याचें मातीचें भांडें ३ झांकणी, वाडगी 'का घडे गाडगें वेळणी।' -एभा १३ ३२४ ४ वाडगा, थाळी 'त्या सापापुढे दुधाचि वेळणी ठेवूनि। आपण घरासि आला।' -पच ३ १४. [सं विट्=आच्छादणें-वेलनी]

**वेळणें**-उक्रि १ (शिजलेला भात, भाजी इ० ची) पेज, पाणी निथळून काढणें 'त्वरित परम तेथें भात हे वेळथेलें।' -सारुह ६ ७० २ (कऱ्हाडी) गव्हले, शेवया इ० उकडून हलक्या हातानें हालवून पाणी निथळून काढणें ३ गाळणें **वेळवण-णी**-न भाजी, डाळ, पुरण इ० पदार्थ वेळून त्याचें जें पाणी काढतात तें [वेळणें+पाणी सं वन=पाणी यापासून मराठी प्रत्यय]

**वेळणें, वेळविणें-वेळावणें**—उक्रि (दुसऱ्या शब्दाशीं जोडून येतो) सैल सोडून हलविणें उदा० डोई-मान-पाय-हात वेळणें [सं वेल्लन]

**वेळवोंड-डी**—न स्त्री (प्र) वेलवोंड-डी पहा

**वेळा-ळ-ला**—स्त्री दंडांत घालावयाचा एक अलंकार 'दंडीं वळा वाकड्या गुजऱ्याचा झणत्कार।' -अफला ५५. [सं वलय, म वाळा]

**वेळा**—स्त्री अर. वेलची एळा-ला पहा 'लवंगा वेळानीं समरसच रामा मुखरणी।' -विसुदाम ३८

**वेळा**—स्त्री १ समुद्रकिनारा 'वेळा लंघुनि वेळही न लागतां, जाई त्वरें श्यामला।' -आसेतु ५ २ मर्यादा, हद्द 'दर्पसागरु वेळा। साइनि उते।' -ज्ञा १६ ३९३ [सं वेला]

वेळाउळ–न वेलाउळ पहा मंदिर, गृह मुख्य पेठ 'तो जाण वेल्हाळ। ज्ञानाचें वेळाउळ।, –ज्ञा १३ ३११, –ऋ ९३

**वेळिलवाणें**—(सुवीनें) वेळिल्वाणें पहा

**वेळीप**—पु (गो) गोव्यातील एक हिंदु शेतकरी जात

**वेळू**—पु बांबू कळक वंश बांस [स वेणु प्रा वेळु] म्ह० बारा हात वेळू फिरतो आहे=मूर्तिमंत दारिद्र्य नांदत आहे ०जाळ–वेळूचें वन 'दैवें वायूच्या कल्लोळीं। परस्परें वेळूजाळीं। स्वजाति काचणी इगळी। पेटली ते होळी वनाची करी।' –एभा १३ १८९ [स वेणु+जाल]

**वै**—स्त्री कुपण वई पहा

**वै**—स्त्री (विणकाम) ओवी पहा ०काठी–स्त्री वैची पट्टी, कामटी

**वै**—स्त्री वहुल्या भोंवतीच्या मडक्यांची उतरंड वही पहा

**वैकल्पिक**—वि १ ज्याविषयीं मतभेद आहे असा (मुद्दा, सिद्धांत) २ ज्याविषयीं विकल्प सांगितला आहे असा (नियम, विधि), ऐच्छिक ३ अनिश्चित संशयित [स]

**वैकल्य**—न १ वैगुण्य, पंगूपणा; अवयवाची मोडलेली, नासकेली व्यंग पावलेली स्थिति २ व्याकुळता 'देह वैकल्याचा वारा। स्पर्शे लागेल या सुकुमारा।' –ज्ञा ८ ११२ ३ अपूर्णता कमतरता (धर्म प्रयोग इ० तील) ०पूर्ण–(सांकेतिक) (राघोबादादा पेशवे) 'वैकल्यपूर्णाबरोबर जावस नव्हतें' –ख १२७० [स]

**वेकळ**—वि (प्र) वायकळ पहा

**वैकारिक**—पु (वास्तु) दाब ताण (इ) स्ट्रेस [? स विकार–वैकारिक]

**वैकुंठ**—पुन १ विष्णु देवतेचें निवासस्थान, विष्णुलोक 'तणें वैकुंठा पासौनि विशाळें। मजलागीं केलीं राउळें।' –ज्ञा ९ ३८९ २ विष्णु कृष्ण –ज्ञा ११ १८१ 'वैकुंठाच्या कटीं घालुनि मिठी रडे पृथा आया।' –मोउद्योग ७ ४४ [स] ०चतुर्दशी स्त्री कार्तिक शुद्ध चतुर्दशी ०नाथ–नायक–पु विष्णु 'आता यावरी तो वैकुंठनाथु।' –ज्ञा १ २७४; 'तोपोनि वैकुंठनायक। वर दिधला अलौकिक।' –व्य १०१ ०पीठ–न वैकुंठ पहा 'नातरी वैकुंठपीठनायकें।' –ज्ञा १० १८ 'तुका झाला स सनुष्ट। घरा आलें वैकुंठपीठ।' –तुगा ६७८ ०भुवन–न वैकुंठलोक 'वैकुंठभुवनीं देहासहित। नेला तुकया कलयुगीं।' ०वासी–वि १ विष्णूचें अभिधान 'शेषशायना सार्वभौमा। वैकुंठवासिया निरुपमा।' –व्य ५१ २ मृत्यु पावलेल्या विष्णुभक्तासंबंधीं कागदपत्रांत त्याच्या नांवापूर्वीं लिहितात ०समाराधना–स्त्री कथुरणानें वरपक्षाप दिलेली मेजवानी

**वैकृत**—वि बदललेला (आकार किंवा घटना यांत) विकृत पहा –पु (वास्तु) ताण भेद (इ) स्ट्रेन

**वैक्रांत**—न एक रत्न एक प्रकारचा हिरा [स]

**वैखरी**—स्त्री १ जिच्या योगानें शब्द बाहेर पडतात ती चतुर्विध वाणींपैकी चवथी, (परा, पश्यंती मध्यमा व वैखरी) स्वपरवेद्यवाचा 'उच्चार होतां अक्षराला। वैखरी बोलिजे।' –दा १७ ८ २ २ वाचा, वाणी 'फेडुनि जन्माची जवनिका। वैखरीयतें करी वादक।' –माए ६०४ ३ वाग्देवता, व वाक्शक्ति ४ जीभ 'घातल्या मुखामध्यें प्रेमानें वैखरा। वाटतो आतां तो हृदयांतरीं खरखरा।' –प्रला २०० ५ भाषा 'तुझें उदारत्व श्रीहरी। वदूं न शके प्राकृत वैखरी।' [स]

**वैंगणें**—न (कों) उन्हाळ्यांत होणारें भात –कृपि ११० वायगण पहा

**वैगुण्य**—न १ गुणामधील फरक, विरोध, गुणधर्मांचा विरोधीपणा २ व्यंग, उणीव, दोष [स]

**वै(वें)चणें**—उक्रि सुपानें पाखडून, घोळून जाडा–बारीक अंश वेगळा करणें 'नंतर तो रवा वैंचावा' –पाकशास्त्र २३ [स विच्=भिन्न होणें] **वैचपाखड**–स्त्री (व्यापकार्थी) घोळणें–पाखडणें [वैचणें+पाखडणें]

**वैचंदी**—स्त्री (व) एका कंदाच्या वाळलेल्या चकत्या या तळून उपासाला खातात

**वैचक्षण्य**—न १ नैपुण्य, पारंगतता २ संशोधनांतील प्रावीण्य [स]

**वैचा**—पु (जरतार धंदा) निरनिराळ्या आकाराचे व आकृतीचे जरीचे ठसे उमटविणें [? वेंचा]

**वैचित्र्य**—न १ विविधता भिन्नता (रंग इ० ची) २ विलक्षणपणा आश्चर्य [स] ०वादी–वि रम्याद्भुत (इ) रोमॅन्टिक –मनोरंजन मार्च १९१४ पृ २८२

**वैज**—पु (कु कों) वैद्य [स वैद्य प्रा वेज्ज] **वैजी**–स्त्री (गों) १ स्त्रीवैद्य डाक्टरीण २ दाई सुईण 'तव आणि येकु प्रबंदु करितु। दोघी वैजी होतिया वर्शांतु।' –सिंपु १ १५ १२ ०पण–न सुईणपण

**वैजयंती**—स्त्री १ काळी तुळस २ एक फुलझाड ३ विष्णूच्या गळ्यातील माळ हींत पृथ्वी–आप–तेज–वायु–आकाश या पांच तत्त्वांचीं दर्शक नीळ, मोतीं माणिक, पुष्पराज व हिरा अशीं पांच रत्नें असतात –ज्ञा ११ ६०३ 'परम विसाळ जेथें वैजयंती विराजे।' –साहह ८ ११९ [स] ०माला–ळ–स्त्री वैजयंती अर्थ ३ पहा 'वरी डोले वैजयंतीमाळ।'

**वैजात्य**—न १ जातींची भिन्नता वर्ग, प्रकार, तऱ्हा या संबंधांत भेद २ जात, प्रकार तऱ्हा यासंबंधीचा परकेपणा [स]

करणारा-री, कलेला-ली -एभा १ १९१ ३ दुराचारी, व्यसनी, स्वैरवर्तनी व्यभिचारीभाव-पु (साहित्य) रसाच्या उत्पत्तीस साह्यकारी असे ३२ भाव, सचारीभाव निर्वेद, ग्लानि, शका, असूया, मद, श्रम, आलस्य, दैन्य, चिंता, मोह, स्मृति, धृति, क्रीडा चपलता, हर्ष, आवेग, जडता, गर्व, विषाद औत्सुक्य, निद्रा अपस्मार सुप्ति विबोध अमर्ष, अवहित्था, उग्रता मति अपस्म व्याधि उन्माद मरण त्रास आणि वितर्क मिळून ३४ होतात

व्यय—पु १ खर्च, वेंच २ नाश -ज्ञा १५१२२ ३ एका सवत्सराचें नाव -वि नश्वर -एभा २ ३९४ [स] ०बुद्धि-स्त्री १ खर्चिक स्वभाव उधळेपणाची प्रवृत्ति २ (ब) औदार्य बुद्धि, सढळ हात ०वेत्ता-वि खर्चिक व्ययबुद्धीचा पार्थ पहाशील सुखें व्ययवेत्ते वित्त वेंचिनी यज्ञा।'-मोवर्ण (नवनीत पृ ३३६) ०शकिन-वि कृपण कद्रू ०शील-वि खर्चीक, उधळया ०स्थान-न (ज्यो) कुडलींतील बारावें स्थान व्ययित-वि खर्चेलेलें, व्यय केलेलें व्ययी-वि सढळ हाताचा, खर्चिक

व्यर्थ—वि निरर्थक, निष्फल, फुकट 'रे धर्मा व्यर्थ तुझें झालें सद्धार्मिक ।'-मोभीष्म १ २४. -क्रिवि वृथा [स]

व्यलीक—स्त्री फसवेगिरी, लबाडी 'ऐसा तुझ्या व्यलीका समजुनि न कळे कोण जाणेल तूर्ते।'-निगा१, विठ्ठलस्तोत्र११ [स]

व्यवकलन—न वजाबाकी, उणें करणें [स] व्यवकलित-वि वजा केलेलें [स]

व्यवच्छिन्न—वि १ निराळा, वेगळा केलेला २ विशष, भिन्न मानलेला, अपवादित [स] व्यवच्छेद-१ निराळेपणा, विशिष्टीकरण २ अपवाद ३ पृथक्करण ४ छेदन कर्तन [स] व्यवच्छेदक-वि व्यवच्छेद करणारा व्यवच्छेद जीवन क्रिया-स्त्री (शाप प्राणि) पृथक्करणपूर्वक अपचय (इ) कॅटॅबोलिझम व्यवच्छेदन-न (वैद्यक) फाडाफाडी, शस्त्र क्रिया [स]

व्यवधान—न १ आड येणें, अमण डोंगराच व्यवधानानें सूर्य दिसत नाहीं' २ मध्यवर्ती अवकाश अंतर ३ आड येणारी वस्तु अडचण तयाचिया ठायीं हान। या योला म्हणती व्यवधान। -ज्ञा १३ ६२२ ४ अडथळा, प्रतिबंध (प्रतिबंध करणारी वस्तु किंवा कारण) 'भिंतीनें वायूचें व्यवधान होतें पण दृष्टीचें व्यवधान हात नाहीं' ५ खड, घोडा विराम, निरोध (सुरू असलेल्या कामात) ६ दुर्लक्ष 'पन्निद्रा पद यो सावधान। विलब न करावा व्यवधान। प्रात काळीं आड लग्न। ऐशिया समयीं पावावें।'-एरुस्व १५ ६१ ७ उशीर, वेळ 'नाहीं लग्नासी व्यवधान। वेगीं करा फळार्पण।'-एरुस्व १५ ६१ [स] व्यवधायक-वि १ मध्यें, आड येणारा २ प्रतिबंध, अडथळा करणारा [स]

व्यवसा—(प्र) व्यवसाय पहा

व्यवसाय—पु १ धंदा, व्यापार, व्यवहार -ज्ञा१३ ५५६ २ खात्री, निश्चय ३ खटाटोप, श्रम, सततकाम 'तरी कीर्तना चेनि नटनाचें। नाशिलें व्यवसाय प्रायश्चित्ताचे।'-ज्ञा ९ १९७ व्यवसायात्मक-वि निवडानिवड करणारी -गीर १३६ व्यवसायी, व्यवसायक-ईक व्यवसाई-वि १ व्यापारी, धंदा करणारा 'ता मार्गी करून व्यवसाइक। त्या बजारें वृषभ कटक'-नव २४ १७६ २ खटपटी, उद्योगी व्यवसित-वि निश्चित केलेलें, ठरविलेलें व्यावसायिक-वि व्यवसाय, उद्योग करणारा, व्यापारी 'कृषिक नव जाती कृषिक। तीर्थयात्रेसी पाथिकें। व्यवहार साडिला व्यावसायिकें। धेनु वना नवजाती।'-मुद्गरिश्चंद्राख्यान (नवनीत पृ १८६)

व्यवस्था—स्त्री १ योजना, तजवीज २ निर्णय, निकाल, शेवट ३ कायद्याचें मत, कायदा ४ मत 'तरी अर्जुनिवरी पार्था। साडी साडी हे व्यवस्था।'-ज्ञा ११ ६३१ ५ रचना, प्रकार 'या लागीं तया पार्था। विश्वतोमुख हे व्यवस्था। आली वाक्पथा। श्रुतीचिया।'-ज्ञा १३ ८८० ६ गणती, मोजदाद 'पैं महोदधीचिया तरगा। व्यवस्था धरू नये जैंवीं गा'-ज्ञा १० ३०१ ७ वर्णनसगती 'तैंसें टणकोनी सवैया। हें तें ऐशी व्यवस्था।'-अमृ ७ ११८ [स,] व्यवस्थणें-उक्रि ठरविणें, निश्चित करणें 'जें अतींद्रिय म्हणोनि व्यवस्थिलें। -ज्ञा ११ १५९ व्यवस्थापक-वि व्यवस्था करणारा, लावणारा -पु कारभारी, मॅनेजर व्यवस्थापत्र-न आपल्या मरणानतर आपल्या मिळकतीची कशा प्रकारें व्यवस्था लावावी याबद्दचा लेख, मृत्युपत्र व्यवस्थापन-न व्यवस्था करणें, तजवीज, रचना व्यवस्थापित-वि व्यवस्था केलेलें नियोजिलेलें व्यवस्थित-वि १ नीट लावलेलें ठेवलेलें, रचलेलें, योजलेलें (काम, वस्तु पद्धत इ०) २ यथायोग्य, खरें 'गुण ते ते व्यवस्थित। दोषचि मानी -ज्ञा १८ ७२७ ३ पद्धतशीर, शिस्तीचा, वतशीर (मासुम)

व्यवहर्ता—वि व्यवहार चालविणारा, पाळणारा व्यवस्था पक चालक [स] व्यवहर्तृत्व-न व्यवस्था, वखरख, कार्यकर्तृत्व

व्यवहार—पु १ कार्य, क्रिया, व्यापार २ वहिवाट पद्धत, रीत ३ धंदा, उदयम व्यापार -ज्ञा ७ २६ ४ व्यवसाय,

उद्योग, काम ५ न्यायालयाची वहिवाट, कोर्टाची रीत ६ खटला, चौकशी 'कोणत्याही व्यवहाराचा निर्णय करताना सात सभासदांचे सम्यानें निकाल करावा।'–टि ११६० ७ न्यायालयात निर्णयासाठीं यणारी गोष्ट ८ योग्य वर्तणूक, वगैरे ९ माइदत 'कृतघ्ना उपेगु केला। कां चोरा व्यवहारु दिधला।' –ज्ञा १३ ७२८ १० देणी 'मग उत्तम ओपे सिंधु। हा तुरचि व्यवहारभेदु।'–ज्ञा १६ १३९ [स] ०कुशल-चतुर-दक्ष-द्रष्टा-निपुण-वि व्यवहारात हुशार तरबेज, तज्ज्ञ ०दर्शन-न न्यायतत्त्वशास्त्राचा अभ्यास. 'राजानें व्यवहारदर्शन नित्य करीत रमावें' ०धर्म-पु व्यवहारशास्त्र पहा ०पद-न १ खटला होण्यासारखी गोष्ट २ खटला; कायदेशीर इलाज ०यात्रा-स्त्री व्यवसाय, व्यवहारक्रम शाब्दांच्या व विद्या राच्या भरभक्कम शिदोरीवरच सगळे लेखक वक्ते, धर्मोपदेशक, वगैरे लोकांची व्यवहारयात्रा चालते'–सार (प्रस्तावना) ०विषय-पु व्यवहारपद पहा ०शास्त्र-न सामाजिक चाली रीती, ०व्यवहार यांसबंधी नियम याच्या उलट धर्मशास्त्र ०शुद्ध-वि योग्य वर्तनाचें, व्यवहाराचें, चोख ०शून्य-ज्ञानशून्य-वि व्यवहाराच्या कामीं अडाणी, रीतीचा व्यवहार माहीत नसलेला ०ज्ञ-त्रि १ वयात आलेला, अज्ञान नसलेला, सज्ञान (कायद्याच्या दृष्टीनें) २ व्यवहारात कुशल, तरबेज ०ज्ञान-न व्यवहारासंबंधी चांगली माहिती व्यवहारणें-उक्रि योग्य कामीं लावणें, उपयोजणें 'मनप्रेरितें इंद्रियद्वारें। बाह्यविषयीं व्यवहारे। –परमा ६ १२ व्यवहारि(री)क-वि व्यावहारिक पहा व्यवहारा-वि १ व्यवसायांत, धंद्यात गुंतलेला, धंदेवाईक २ व्यापारी व्यवहारी अपूर्णांक-पु (गणित) एका सख्येच वाटल तितके भाग पाडून त्यापैकीं काहीं घेणें व्यवहारी ज्योतिषी पु मुंज लग्न इ० चें आन्हिक चालविणारा ब्राह्मण, काहीं ठिकाणीं याच्याकडे धर्माधिकाऱ्याचेहि हक्क असतात व्यवहारी यस्तानी-स्त्री (गणित) रुपयाचे पैसे कितीहि असले तरी १६ गंडे (खुर्दातले) म्हणजे १ रुपाया असा हिशेब करणें व्यवहार्य-वि १ उपयोगाला, व्यवहाराला योग्य, अवश्य शक्य (मनुष्य वस्तु इ०) २ अनुसरण्याला, करण्याला योग्य (धंदा, उद्योग) ३ कायदेशीर इलाज करण्याजोगा व्यावहारिक-वि १ ०व्यवहारासंबंधी (भाषा, लिपि इ०) २ रूढ सामान्य नेहमीचें ३ व्यवहारोपयोगी ०व्यवहाराला योग्य इष्ट [श] ०अपूर्णांक-पु व्यवहारी अपूर्णांक पहा ०दिवस-पु (ज्यो) मध्यम सौरदिवस हा रात्रीं १२ पासून दुसऱ्या रात्रीं १२ पर्यंत धरतात (इ) सिव्हिल डे ०नाम-नांव-न १ प्रचारातील परिचयाचें नाव चालते-वाहतें नांव उदा० आण्णा आबा, आत्या इ० २ नक्षत्र नामाखेरीज मुलामुलीचें नाव ठेवतात तें उदा० गणेश नर्मदा इ० ०नीति-स्त्री शिष्टाचार, सामान्य, व्यवहारातील नीति ०वर्ष-न सरकारी वर्ष (३६५ दिवसाचें), कायद्याप्रमाणें ठरलेलें वर्ष ०शिक्षण-न १ व्यवहार करण्यास उपयुक्त असें शिक्षण याच्या उलट पुस्तकी शिक्षण २ धंदेशिक्षण

व्यवहित—वि अडथळ्यामुळें थांबलेलें, प्रतिबंध केलें गेलेलें व्यवधान पहा 'ते अव्यवहिता भक्ति तद्विलक्षण। व्यवहिता भक्ति तो दोष न असता।' –यथादी १८ २४३८

व्यवहृत—वि उपयोजिलेलें, व्यवहारविषय केलेलें व्यवहार पहा

व्यवाय—पु संभोग, रति 'तिनें गर्भारपणी आनंदयुक्त व प्रसादापासून निराळें म्हणजे व्यवायाशिवाय रहावें'–वाचि २ [सं]

व्यष्टणें—क्रि व्यापणें 'मी माझिया विभूति। आणि व्यष्टलिया व्यक्ति।'–ज्ञा १० १०७ [वेष्टणें]

व्यष्टि—स्त्री १ एकेकट व्यक्तित्व, व्याप्ति अवयवभूत, विभाजित सस्थिति, एखाद्या समुच्चयाचा, मिश्रणाचा अंश विशेष किंवा व्यक्ति, जातींतील, वर्गातील एक याच्या उलट समष्टि २ देह, पिंड [स] ०ग्रह-पु अवयवाचा व्यक्तींचा बोध, ग्रह याच्या उलट समष्टिग्रह ०रूप-वि वैयक्तिक 'व्यष्टिरूप सत्तेची परमावधी करून अभिनंदन करितो'–धर्मभंग १०

व्यसन—न १ आसक्ति, चट, नाद छंद 'जो गुरुसेवा व्यसनें सव्यसनु निरंतर।'–ज्ञा १३ ४४१ २ वाईट, दुष्ट सवय, खोड ३ अडचण 'सांगें देवलीरा जावें। ऐसें व्यसन का जय पावे।'–ज्ञा ३ ४७ ४ पाप गुन्हा, दुराचरण ५ तन्मयता, एकसारखें लक्ष ६ संकट, आपत्ति 'नीच व्यसनीं मुदता निर्दिति देवास न स्वकर्मास।'–मोकर्ण [स] समान व्यसनाचें सख्य-न १ एकाच व्यवसायाच्या, आवडीच्या, सवयीच्या माणसाची एकी २ सवय इ०च्या सारखेपणामुळें होणारें सख्य ३ सारखेच संकटात पडलेल्यांचें सख्य ४ सामान्य विपत्तीमुळें होणारें सख्य व्यसनाईत-वि १ व्यसनी २ (ल) अभिलाषी 'आम्हा व्यसनाईत आवघे। काहीं आणीकांना।'–रू २८, व्यसनी, व्यसनीक-वि १ खोडी, चट, सवय असलेला; दुराचरणी २ नादी, छांदिष्ट

व्यंसित(करण)—न (नृत्य) कालीदस्यान करून हात रेचित करून वक्ष स्थलावर ठेवणें व उंच करून खालीं सोडणें [स]

व्युसुता—स्त्री मरण, मृत्यु मुनि सांगे वर्षांतीं यश ल्या भूप-पुत्रका व्युसुता।'–मोवन १३ २० [स वि+असु+ता]

व्यस्त—वि १ वेगळा, पृथक्, भिन्न २ उलट्या विपरीत क्रमाचा 'कालक्रीडित हें बघून रडला हें व्यस्त काहीं नस।'

व्यवहार करणारा ३ व्याज असणारें ( कर्ज ) ०पैलापणी-१ जमेकडील आणि नावकडील व्याज वेगवेगळें काढून कमी असेल तें अधिकांत वजा करून बाकी काढणें २ सवध मुदतीचें किंवा वर्षाचें व्याज आकारण्याचा प्रकार 'याच्या उलट व्याज करावणी ०बट्टा-पु ( व्यापारपणें ) सरापी व्यवहार ( कर्जाऊ रकमा देणें यांनी वगावणें हुवपापाडया दर्शवणें, इ० ) ०भरा-वि वर्जीत सुट्टन व्याजावारी ज्याचें सवध उत्पन्न जातें आहे असा व्याजाऊ व्याजी-जू-वि व्याज असणारें ( कर्ज ) व्याजानें दिली-घतलेली ( रक्कम )

व्याज—न १ निमित्त कारण 'जें धर्मालय म्हणिजे । तेथ पाहत आणि माहे । गेले असती व्याजें । जुसाचेनि ।'—ज्ञा १ ८६ २ मिष कपट ढोंग 'व्याज न जर्थे नसे बकता, उपचारांची पीडा ।'—नि १८ ३ रूप, वप सुधी ४ सवब, बतावणी पितृवचनाचें करूनि व्याज । वना आ'ास तूं रघुराज ।'—रावि २२ १८ [ स ] ०निंदा-स्त्री एक अर्थालंकार खोटी निंदा, बाहरून निंदा दिसावी पण गर्भितार्थ स्तुतिपर असावा, प्रछन्न स्तुति या शब्दाचा इतर अर्थहि उलटसुलट आहेत १ एकाच्या निर्देशें दुसऱ्याची निंदा करणें उदा० 'मीच मूर्ख म्हणून तुला हें काम सांगितलें' २ प्रछन्न निंदा व्याजस्तुति ०स्तुति-स्त्री एक अर्थालंकार स्तुति करण्याच्या मिषानें निंदा किंवा निंदा करण्याच्या मिषानें स्तुति केली असता हा अलंकार होतो उदा० ( कोणी मुलगा पहिल्यापेक्षां व ईट वाचू लागल्यास ) वाहवा ! आता तर तू फार चांगलें वाचू लागलास तसेंच '( निंदेच्या योगें स्तुति) आज एवढया पद्यास उठून धडा पाठ करायाची ही अव दसा तुला कोठून आठवली ?' व्याजोक्ति-स्त्री एक अलंकार मनांतून जें बोलावयाचें तें स्पष्ट न बोलता निमित्तांतरानें भाषण करून त्यांत स्यांभिप्रेत अर्थ आणावयाचा २ गुप्त गोष्ट स्वरूप प्रगट झालें असता तें कांहीं सबबी सांगून लपवून टाकावयाचें

व्याजवी—वि वाजवी पहा

व्याज्य—न चिंता घोर काय तुलाद लागलें व्याज्य । —रावि ४३२

व्याध—पु १ पारधी शिकारी कां गोरिचिया मुली । मृग व्याधा दृष्टि न घाली । —ज्ञा १३ ७३९ २ एक नक्षत्र लुब्धक पहा [ स ]

व्याध—( प्र ) व्याधि पहा व्याधि-स्त्री ( सरून शब्द पु ) १ शरीरव्यथा, रोग, आजार हा शब्द आधि शब्दाशीं जोडूनहि येतो हृष्ण पावलिया आधिव्याधी । जाती निशुद्धी सर्वथा । —एरुस्व १३ ७९ २ रक्तपिती महारोग ३ ( व्यापक ) संकट आपत्ति ४ पीडा त्रास लचांड ५ अवाच्य त्रासदायक पोरास निंदार्थी म्हणतात [ स ] ०व्याधित-वि रोगी, अजारी [ स ] व्याधिग्र-स्त-वि रक्तपिती, क्षय, शूल इ० मोठा आजार झालेला, व्याधिग्रस्त

व्यान—पु पंचप्राणवायूंपैकीं एक हा सर्व शरीर व्यापून राहतो 'देह जसा व्यापिजे सदा व्यानें ।'—मोआदि १४ ७५, —ज्ञा १८ ३३८ [ स ]

व्याप—पु १ सतत वास, लक्ष व्यग्र असणें एकसारखें व्यापृत, उद्योगांत निमग्न असणें 'तनु धन विषयाचा । मर्म जो जो पसारा । अकृतचि परि माझा । त्यामध्यें व्याप मारा ।' २ प्रापंचिक उद्योग व त्रास आयुष्यांतील हालअपेष्टा कष्ट इ० ३ पसारा विस्तार मोठा व्यवहार 'जितुका व्याप तितुकें वैभव ।' —दा १४ ६ २६ ४ उप० व्याप [ स वि+आप ] ०द्धू० व्याप तितका संताप व्यापक-वि १ व्यापणारा आच्छादणारा, सर्व विस्तार आपल्यांत घेणारा २ पूर्णपणें भेदणारा व आक्रमणारा ३ अंतर्भाव समावेश करणारा सर्व पोटांत घेणारा 'मनुष्यत्व जाति ब्राह्मणत्वजातिपक्षां व्यापक ४ पसरणारा विस्तार पावणारा ५ मोठया, उदार विचाराचा ( माणूस ) तेथें भल आहे वती । व्यापक तेहि करीं येती ।'—दा १९ २ २१ व्यापणें-उक्रि आच्छादणें, घेरणें घणें, समाविष्ट करणें ( ल व शब्दश ) —अक्रि १ पसरणें, व्यापृत होणें २ भिनणें फैलावणें ( विषादि अंगात ) 'विष जों सर्वांगीं व्यापलें नाहीं तोंपर्यंत उपाय चालतो' व्यापन-न १ आक्रमण, प्रसरण २ समावेशन व्यापण्याचा व्यापार [ स ] व्यापी-वि व्यापणारा पसरणारा, समावेश करणारा ( समासांत उपयोग ) जगद्व्यापी सर्वव्यापी व्यास व्यापित-वि १ व्यापलेला, आच्छादलेला समाविष्ट केलेला २ जिरलेला मुरलेला ३ परिपूर्ण भरलेलें ४ व्यप्त प्राप्त व्याप्ति-स्त्री १ आक्रमण सर्वत्र विद्यमानता २ विश्वव्यापकता शिवादि दवतेचें एक अभिधान ३ ( सामा ) विस्तार पसारा, व्याप दखें हे शब्दाची व्याप्ति ।'—ज्ञा २ ११४ ४ प्राप्ति, मिळकत ५ ( प्राप ) वर्गीकरण विभागणी ६ ( प्राप ) स्थान, अस्तित्वाचें, मिळण्याचें ठिकाण —सँपू १ ६३ ७ ( तर्कशास्त्र ) निकट व अविभाज्य साहचर्य निश्चित अनुमानकारण 'अग्नीची व्याप्ति धूमावर ( धुरामध्यें अग्नीचा समावेश असतोच तन्नीं अग्नीच्या अस्तित्वाचें अनुमान निश्चित ) व्याप्य-वि १ व्यापावयाचें किंवा व्यापलेलें आक्रमित २ समाविष्ट व्हावयाचें किंवा झालेलें, अंतर्भूत ३ ( तर्कशास्त्र ) अनुमानविषय असलेलें ०कोटि-स्त्री अंतर्भूतवर्ग गौण, पोटविषय वर्ग व्याप्यकोटि-प्रविष्ट-अंतर्गत इ० समास ०वृत्ति-स्त्री ( तर्क ) निरंतर साहचर्य व्यापन-वि नेहमीं बरोबर चिकटून असणारें अंतर्वर्ती, अनुषक्त असणारें ०व्यापक भाव-पु एक व्याप्य आणि एक व्यापक असा उभयतांचा संबध

व्यापादणें—क्रि. मारणें; नाश करणें. [ सं. व्यापादन ]

व्यापार—पु. १ काम, कर्म; कृत्य. 'कां निमेषोन्मेषांचे व्यापार' –एभा २.४३३. २ क्रिया; व्यवहार; कार्य; उद्योग 'मेंदूला रोग झाल्यास त्याचे व्यापार बंद पडतात.' ३ हालचाल; चलनवलन; चळवळ. ४ धंदा; उदीम; व्यवसाय; देवघेव; व्यवहार. 'लुगड्यांचा, भाड्यांचा इ० व्यापार.' [ सं. ] अव्यापारेषु व्यापार–पु. ज्यांत कांहीं संबंध नाहीं अशा गोष्टी करणें; नसत्या भानगडी करणें. 'सरकारी शाळांची कशी काय व्यवस्था असते व तेथील विद्याभ्यासाच्या मानानें कोणत्या तऱ्हेचीं पुस्तकें तेथें चालणें जरूर आहे याविषयीं या पुस्तकात उठाठेव करणें म्हणजे अव्यापारेषु व्यापार होणार' –नि. व्यापारक–पु. (शाप.) योगवाही साधन. ( इं ) कॅटॅलिटिक एजंट. 'धातूंचें आमिडावर जितकें त्वरित कार्य घडतें तितकें आल्कोहोलाचें आसिडांवर घडत नाहीं, दुसऱ्या व्यापारकाची मदत लागते.' –सेंपू १.२२२. व्यापारणें–उक्रि. १ कामाला लावणें; वापरणें; ज्याच्या त्याच्या विशिष्ट, योग्य कारणाला लावणें. –अक्रि. क्रिया करणें. 'तैसें प्रकृति आधारें। कर्मेंद्रिय विकारें। निष्कर्मेंही व्यापारे। निरंतर।' –ज्ञा ३.६२. व्यापारी–पु. १ व्यापार, धंदा करणारा; दुकानदार; देवघेव करणारा. २ उपयोग करणारा; उपयोगास लावणारा; चालना देणारा. ३ कर्मकर्ता; क्रियावान्. 'एऱ्हवीं चामाचे डोळेवरी। जे देखती देहवरी। ते कीरतो व्यापारी। ऐसेंचि मानिती।' –ज्ञा १८.४३७. –वि. व्यापार–वाणिज्य यासंबंधीं; उदीमधंद्याचे. 'व्यापारी कायदा–पत्रव्यवहार इ०.' 'त्या वाचे लोकांच्या जहाजांनीं व्यापारी गलबतावर हल्ला करावा.' –कोरकि ४. व्यापारी व्यापारोपयोगी वारे–पु अप. ( भूगोल ) सतत वाहणारे अमिय वारे. हे व्यापारी गलबतांना हितकारक असतात. ( इं ) ट्रेडविंड्स. व्यापृत–वि. १ उद्योगांत, उपयोगांत असलेला; योग्य मार्गी लावलेला. २ गुंतलेला; मग्न 'कार्यव्यापृत.'

व्याम—पु. सहा फूट ( पुरुष ) लांबीचें माप, वाव. [ सं. ]

व्यामिश्र—वि. १ ( शाप. ) मिश्र, संकीर्ण. –सेंपू १ ३. २ संदिग्ध; दुरर्थी. 'व्यामिश्रवाक्यें बुद्धीनें हरिसी मोहल्यापरी।' (–गीता ३.२. टीका). [ सं. ]

व्यामोह, व्यामोहता—पु १ भ्रम, मोह –ज्ञा २.११०, १५.१०२. २ विस्मरण; स्मृतिनाश. [ सं ]

व्यायाम—पु. १ दंड काढणें, जोडी फिरविणें इ० शरीरावयवाना मेहनत देणारी क्रिया, खेळ. २ कसरत; मेहनत. ३ (सामा) शरीराला चलनवलन होईल अशा प्रकारचा उद्योग. ( आरोग्य आणि शरीरपोषण यासाठीं ). ४ वाव; व्याम पहा. [ सं. ] ०शाळा–स्त्री. व्यायाम, मेहनत करण्याचें ठिकाण, आखाडा; तालीम. ( इं. ) जिम्नॅशिअम. दासो. ७.५

व्याल—पु १ हत्ती. २ साप; सर्प. –ज्ञा १५.४२०. [ सं. ] व्याली–स्त्री. सर्पिणी. व्यालनकुल न्याय–साप आणि मुंगूस हे एकमेकांचे शत्रू आहेत. यावरून हाडवैराचा संबंध.

व्याली—वि. ( प्र. ) व्यालेली. –स्त्री. १ नुकतीच वाळंत झालेली स्त्री. २ विणारी; मूल प्रसवणारी स्त्री. 'तानयाचे लळे पुरवणें। हे व्यालीची वेदना व्याली जाणें।' –एभा २९.४९२. ३ जन्मदात्री आई. –एभा ३.६०७. 'व्यालीचा कळवळा। जीव बहुत कोंवळा।' –तुगा १९७५. म्ह० व्यालीच्या वेदना व्यालीस कळेत वांझेस काय समजे.

व्यावर्तित( अंगुली )—स्त्री ( नृत्य ) एका हातानें दुसऱ्या हाताच्या कनिष्ठिकेपासून आरंभ करून त्या हाताच्या आतल्या बाजूनें बाहेरील बाजूस वेढा घालणें.

व्यावृत्त—वि. १ अलग; भिन्न केलेला. २ बाहेर टाकलेला; वगळलेला. [ सं. ] व्यावृत्ति–स्त्री. १ वेगळेपणा; उच्चाटण; वगळणूक. 'चक्षुस दिव्य हें विशेषण दिल्यानें चर्मचक्षुची व्यावृत्ति होते.' या अर्थाचे सामासशब्द–दोष–भय–रोग–विघ्न–व्यावृत्ति. २ निराळेपणा; भिन्नपणा. 'घटादिक कार्याचे ठायीं मृत्तिकात्वाची अनुवृत्ति आहे परंतु मृत्तिकेचे ठायीं घटत्वादि धर्माची व्यावृत्ति.' ३ व्यतिरेक; नाहींपणा. ४ त्याग; खंडन. ५ निरास. –अमृ ५.१०. [ सं. ] व्यावर्तक–वि. १ वगळणारा; दूर करणारा; निराळा ठेवणारा. २ भिन्नभिन्न; निरनिराळा. 'वरील पद्धतीनुसार जबाबदार पद्धतीचें अस्तित्व अगर तिचा अभाव या गोष्टींकडे लक्ष देतां वसाहतींचे डोमिनियन्स व क्राउन कॉलनीज असे दोन व्यावर्तक विभाग पाडतां आले असते.' –वसा १५. व्यावर्त्य–वि. वगळणारा, वेगळे करण्यास शक्य, योग्य, जरूर.

व्यावृत्ति—स्त्री. १ मनाचा गोंधळ; गडबड; अस्वस्थता. 'मी मोठ्या व्यावृत्तींत सांपडलों.' २ संकट; आपत्ति. 'तो काय हो व्यावृत्तींत पडला, घटकेमध्यें मरणार.' ३ त्राण; दगदग; लचांड. 'प्रपंचाची–लग्नाची–दुखणेकऱ्याची–पोराची–व्यावृत्ति.' ४ अडचण; किंतु; आक्षेप. 'ज्याच्या मनांत कोणत्यादि गोष्टीविषयीं व्यावृत्ति नाहीं तो सालायाला.' [ सं. वि+वृत्ति ]

व्यास—पु १ ( भूमिति ) वर्तुळपरिघाच्या एका बिंदूपासून निघून मध्यबिंदूतून समोरच्या बिंदूपर्यंत जाणारी सरळ रेषा; ही त्रिज्येच्या दुप्पट असते. २ विस्तार. [ सं. ] ०खंड, व्यासार्ध–नपु त्रिज्या

व्यास—पु १ महाभारत व पुराणें ज्यानें रचिलीं तो ऋषि. २ ज्यानें वेदांच्या संहिता केल्या तो ऋषि. कृष्ण द्वैपायन; बादरायण. 'तेव्यासादिकांच्या मतीं। तेचि मेखळा मिरवती।' –ज्ञा १. ९. २ पुराणिक; प्रवचनकार. [ सं. ] ०पीठ–न. १ पुराणिकाचें आसन. २ पोथी ज्यावर ठेवतात ती घडवंची. ३ उच्चासन.

(इ) हायस (सभामंडपातील) '०पूजा–स्त्री पुराणसमाप्तीच्या वेळी पुराणिकाची पूजा, बहुमान करतात तो २ नेहमीच्या पुराणिकाची कार्तिकपौर्णिमेस जी पूजा करतात ती ३ आषाढी पौर्णिमेस गुरु सन्यासी इ० ची जी पूजा करतात ती **व्यासासन**–न व्यासपीठ **व्यासो नारायण**–व्यास अर्थ १ पहा

**व्यासंग**—पु १ एकसारखा परिश्रम, उद्योग (विद्या, कला इ० विषयी) २ काळजीपूर्वक अभ्यास ३ नाद (समासांत) *अध्ययन-विद्या-विषय-स्त्री-धन-व्यासंग* [स ] **व्यासंगी**–वि व्यासंग असलेला, अभ्यासी, उद्योगी, लक्ष घालणारा (विशिष्ट विषयात)

**व्यासज्यवृत्ति**—वि १ एकापेक्षा अधिक विषयाशी संबद्ध, विषयांत अंतर्भूत (गुणधर्म, अनुबंध इ०) २ (ल ) दुटप्पी, तडजोड करण्याच्या वृत्तीचा, स्वभावाचा [स वि+आ+सज्+वृत्ति]

**व्याहत**—वि १ अडविलेला, प्रतिरोध झालेला २ पराहत, प्रतिहत ३ आघात केला गेलेला, आहत पहा

**व्याहार**—पु भाषण 'व्याहारवव्यवहार'–पकोवे (टीका कोल्हटकर ६१) [स ]

**व्याहाळ**—न अरण्य, ओसाड जागा, रान 'म जाऊनी अरण्य-व्याहाळीं।'–मुवन १२ ३५ **व्याहाळी**–स्त्री (महानु) शिकार 'रावो व्याहाळीए बाहिरी नीगे।'–दृष्टांतपाठ ७७ –एभा १३ ७०१ **व्याहाळी जाणें-निघणें**–शिकार, करणें –एभा ६ ३६४ 'तव राव गेला बाहेरा। व्याहाळीसि।'–कथा १ ५ १२८ **व्याहाळणें**–शिकार करणें –एभा ७ २६०

**व्याही**—पु स्वत च्या मुलाचा किंवा मुलीचा सासरा मुला मुलीचे वडील परस्पर व्याही असतात, परस्पराचे विहिणीचेहि व्याही होतात [स वैवाहिक प्रा ववाहिअ, गु वेवद, बं वेहाइ] **०भोज-भाजन**–पुन (रमात) व्याह्यास विशेषत मुलीच्या बापास दिलेली मेजवानी

**व्याहृती**—स्त्री गूढस्वर, मत्र भू, भुव, स्व, मह, जन, तप सत्य या सात व्याहृती आहेत वेदमत्राला आरंभ करण्यापूर्वी ओंकारपूर्वक यांचा उच्चार करण्यात येतो

**व्याळ**—पु साप 'जैसा नखाग्नीं व्याळु लागे। तो शिखांत व्यापी वेगें।'–ज्ञा १ ५५९, –तुगा १३६१ नाग, भुजग यानाहि हा शब्द वापरतात [स व्याल]

**व्याळी**—स्त्री रात्रीचें भोजन –दार [वप्रा विमालिअ=सायकाळचें भोजन, हिं व्यालु तुल० स विकाल,प्रा विआल=सध्याकाल]

**व्याक्षेप**—पु १ विघ्न अडथळा आडकाठी २ खोळंबा ३ अडी, अस्वास्थ्य 'इतकी माणसें बरोबर नेलीं तर त्यांचे चित्तास व्याक्षेप पडेल '–सूर्योदय ३३१ [स वि+आक्षेप]

**व्याक्षोभ**—पु क्षोभ, अस्वास्थ्य खळबळ (राग, लोभ इ० विकारामुळें होणारी) [स वि+आ+क्षोभ]

**व्युत्क्रम**—पु १ उलट, विरुद्ध प्रकार, विपरीत, प्रतिगामी व्यवस्था २ अव्यवस्था, गोंधळ ३ (गणित) व्युत्क्रांत, उलट मांडणी, उदा० $\frac{1}{5}$ चा व्युत्क्रम ५ [स ] **०कोन**–पु (भूमिति) समांतर रेषांतील विरुद्ध प्रतिकोन (इ ) आल्टरनेट अँगल **०प्रमाण**–न व्यस्त प्रमाण 'कोणत्याही दोन प्रवाही पदार्थांची उंची व घनता व्युत्क्रम प्रमाणात असतात तेव्हा ते परस्परास तोलून धरितात'–मराठी ६ वें पुस्तक (१८७५) पृ ९६ **०भाव**–पु उलट क्रम, विपरीतता –शिक्षणमीमांसा ११५ **०मिश्रगणित**–न मिश्रगणिताचा एक प्रकार याच्या उलट मध्यममिश्रगणित

**व्युत्थान**—न उत्थान उठणें, समाधि अवस्थेतून बाहेर येणें 'यालागीं समाधि आणि व्युत्थान। या दोन्ही अवस्था सदित जाण। बुद्धि होय ब्रह्मार्पण।'–एभा ९ २०९ [स वि+उत्थान]

**व्युत्पत्ति**—स्त्री १ नैपुण्य, प्रावीण्य (विशेषत शास्त्रात), शास्त्रवाङ्मयाशीं परिचय, ज्ञान 'तुझें नाम जरी ते पुसती। तरी वाहुक सागे तयाप्रती। अश्वविद्येची व्युत्पत्ती। करीं तेथें।'–कथा १ १० २२ २ अर्थज्ञान (शब्दाचें विशिष्ट अर्थी) विशिष्ट पदार्थास अनुरूप जी अर्थकल्पना ती 'वैदिक या शब्दीं वेदातें जो जाणणारा किंवा वेदानें सांगितलें जें कर्म अशा दोनही व्युत्पत्ती संभवतात' ३ शब्दाची घटना, उगम, निरुक्ति ४ विद्वत्ता –एभा २ ४६३ ५ ज्ञान –एभा २७ ३४४ ६ उत्पत्ति, स्वरूप –एभा ३ १२४ ७ हातोटी युक्ति 'स्वधर्म घडे भागवतकी। ऐसी अति गुह्य आहे व्युत्पत्ति।'–एभा १८ ३६७ ८ परिस्फुरता, व्याख्यान 'वेदातीं ब्रह्मस्थिती बोलिली मानी यथा निगुती। इतर स्तोत्रीं ब्रह्म व्युत्पत्ती। तही अति नीति मानी तू।'–एभा ८ १०१ ९ ज्ञानाचा गर्व अभिमान 'एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जें जगा धाकुटें होइजे।'–ज्ञा १३ ७८ [स ] **व्युत्पन्न**–वि १ शास्त्र आणि वाङ्मय यात प्रवीण, विद्वान, पंडित 'कवी व्युत्पन्नाची योग्यता।'–रामदास (नवनीत पृ १६०) २ साधित सामासिक (शब्द) ३ (पासून) निघालेला, उत्पन्न झालेला **व्युत्पन्नत्व**–न विद्वत्व 'तया शरीर जें जाहलें अज्ञानाचें धीं विरुढलें। तयाचें व्युत्पन्नत्व गेलें। अज्ञानेंसीं।'–ज्ञा १३ ८४० **व्युत्पादक**–वि ज्याच्या योगानें व्युत्पत्ति समजते दाखविली जाते असा (ग्रंथ, भाषण, इ०), उत्पादक पहा

**व्यूह**—पु सैन्याची रचना याचे विविध प्रकार आहेत दड–भोग–मडल–असहत–शकट–मकर–पताका–व्यूह 'हलें दळ

दुर्धर। नाना व्यूहीं परिकर।' –ज्ञा १६१ २ शत्रुपराजयार्थ युक्ति मसलत ३ (सामा) कट कारस्थान, निमू (क्रि० रचणें, ढासळून टाकणें) 'या माझ्या मूर्ख मुलाना कांहीं सागितलें नाहीं तर हा माझा व्यूह ढासळून टाकील' –गुप्तमजूष ३ मूर्ति, शरीर 'पूजिला जी श्रीपती। चतुर्मूर्ती व्यूहरूपें।' –एभा ६११६ [स] ४ (योग तत्त्व) शारीरिक किंवा इंद्रियाची विशिष्ट रचना ०चतुष्टय–न सैन्यरचनेचे चार प्रकार–दड, भोग मडल असहत इ०

व्येखंड—न (ग्राम्य) वेखड पहा

व्येवसाओ—(प्र) व्यवसाय पहा 'साधुसमाचेनि भाड वें। ज्ञानमार्गाचा ०यवसाओ फळें।' –शिशु ७२

व्योम—न आकाश –अमृ ७४५ [स] ०कुसुम–न आकाशाचें फूल; खपुष्प अशक्य गोष्ट 'व्योमकुसुमाचा पाडवा। करणें देंठ तोडावा।' –ज्ञा १५२३५ ०केश–पु महादेव, शकर ०गामी–वि आकाशाकडे जाणारा 'चित्तेंचि व्योम। गामिय करिती।' –ज्ञा ५१५२

व्रज—पु १ गवळीवाडा, गोकुळ –एभा १८१५९ २ समुदाय जमाव [स] ०प–पु गौळवाड्याचा मुख्य, गोकुळचा राजा (नद) व्रजांगना–स्त्री गोपी, गवळण 'पाहें पा बाळभावेंचेनि व्याजें। तिया व्रजागनांचीं निजें।' –ज्ञा ९४६५

व्रजवत्रू—वि (व) गळेठ 'व्रजवत्रू वाढला आहे नुसता' [व्रज=(गल्ल्या)+वत्रू]

व्रण—पु १ क्षत छिद्र, एक रोग २ जखम, दुखापत, भेग [स] ०स्फोट–पु व्रण फुटणें, वाहणें व्रणित, व्रणा–वि व्रणविशिष्ट क्षत पडलेला, जखमी झालेला

व्रत—न १ स्वतःला लावून घेतलेला एखादा धार्मिक नियम, नेम, वहद्दशाचा एक मार्ग –हृ ८१० (क्रि० घेणें) २ असा नेम पाळण्याची केलेली प्रतिज्ञा पण ३ ब्रीद प्रतिज्ञा बाणा 'व्रतावनधृतमन ज्वलन तूंचि या धावनीं।' –कका ६ [स] (वाप्र) तीळ खाऊन व्रत मोडणें–अगदीं क्षुल्लक कारणासाठीं, फायद्यासाठीं बाणा नेम सोडणें सामाशब्द– ०बध–पु मुज यज्ञोपवीत धारण करणें हें एक प्रकारचें व्रतच आहे [स] ०भिक्षा–स्त्री व्रतबधाच्या आनुषंगिक कर्मांपैकीं एक भिक्षा मागणें [स] ०वैगुण्य–न १ व्रताची अपूर्णता त्यातील न्यूनता कमीपणा २ लहानमहान व्रतें, नेम इ० व्रत अर्थ १ पहा ०संग्रह–पु व्रत घेणें, व्रतस्थ असणें व्रतस्थ व्रती–वि १ व्रत पाळीत असलेला व्रताप्रमाणें कांहीं नेम करणारा २ स्त्रीसग न करणारा ब्रह्मचर्य पाळणारा 'अमृतराव सात वर्षांचा असताना त्याचें आई स्वर्गवासी झाली, तेव्हांपासून बापूसाहेब व्रतस्थ होते' –मौर्यीवना

व्रतति—स्त्री वल्ल लता माधवीच वचना ही माधवीला या मुग्धमनि राज। –माधव १२९६ [स]

व्रथा—(प्र) वृथा पहा.

व्रात—पु समूह, जमाव [स]

व्रात्य—पु १ योग्य कालीं उपनयन न झालेला द्विज २ ज्ञातिधर्म न पाळणारा, बहिष्कृत माणूस ३ अनार्य –वि अर्वाच्य, द्वाड 'नित्य व्रात्य उपद्रवी म्हणुनिया त्या शापिलें सत्तमीं।' –आसे २८ [स] ०स्तोम–पु १ व्रात्य व्रतबध न केलेल्याना पुन्हा जातींत घेण्याचा विधि २ अनार्य लोकाना आर्य समाजात घेण्याचा सस्कार, शुद्धिसमारभ 'परकीयास स्वसदृश करावें आणि त्यास आपल्या समाजाचें सदस्य करावें म्हणून जी चळवळ झाली तींत व्रात्यस्तोमास महत्वाचें स्थान दिलें पाहिजे' –प्राचीन महाराष्ट्र २८५ [स]

व्रीडा—स्त्री लज्जा, सकोच [स] व्रीडित–वि लज्जित, लाजलेला

व्रीहि—पु, तादूळ, भात, साळी 'यज्ञात व्रीहींचा होम सागितला आहे' [स]

व्हओल—वि (खा) झालेला, (ल) म्हातारा –भाव ७१४ [होणें]

व्हकला—पु (वे) लाकडाचा तुकडा मक्ल पहा

व्हकाल, व्होकल—स्त्री (कु गो) नवरी ०पाघणी–वरात

व्हक्कळ—(वे) मक्ल पहा

व्हगळणें—क्रि (चे) चहाडी करणें

व्हग्ग—पु (व) हंगामी गवत कापण्याचा धदा करणारा

व्हग्गाल—न (वे) एकच खोल गेलेली चाकोरी

व्हजी—स्त्री १ (माण) वहिनी २ (कों) नणद [वहिनी+जी]

व्हटाळी—स्त्री (व.) ओटाळी पहा

व्हट्ट—न (व) द्विदळधान्य भरडून वेगळें काढल्यानतर मळणीतून उरणारा पाला

व्हट्टा—स्त्री (व) गाईम्हशीची आटी, कास [का होट्टे=पोट] ०किच्च–न (व) द्वेष मत्सर [का]

व्हड्ड—वि (गो) मोठा [स वृद्ध, प्रा वड्ड] व्हडला–वि वडील, मोठा

व्हडा—पु (व) चारी बाजूंनी पाळी असून मध्यें सखल असणारी जमीन घोंडा

व्हडागणें—क्रि (वे) फकणें व्हडागा–पु फेकता दगडासारखें लाकूड

व्हणजे-सें—स्त्री स्त्रीची नवऱ्याची बहीण, ननंद

व्हन—(प्र) होन पहा

व्हन्मारा—पु (व) मेंनासुरी

**व्हयतो-ती-तें**—सना (कु ) तो, ती, तें

**व्हया**—क्रि (कु चों.) पाहिजे 'तुका केळां व्हया!' [होणें, व्हावें]

**व्हरचें-प**—क्रि (गो ) नेणें. [सं हृ-हर]

**व्हरवई**—स्त्री (गो ) रसविळपणा, घाई

**व्हलस**—वि (व ) धाईट [का ]

**व्हल्यार**—पु महार

**व्हळें**—न (वे ) भगर

**व्हाईसरॉय**—पु राजप्रतिनिधि हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरल्ला ही पदवी आहे [इ व्हाईस=दुय्यम+रॉय=राय, राजा]

**व्हाएन, व्हैन**—न (राजा कुण वे ) उखळ (ल्हान दगडी) —मसाप २ ४ १०६ वाईन पहा

**व्हान**—स्त्री (प्र ) वहाण ०घेड-न (घाघारी) वहाणे वरचा- ज्यावर पाय टेवतात तो-तुकडा

**व्हानी करणें**—(हेट ) समुद्रात टाकणें

**व्हाय**—स्त्री (गो सोनारी) एक हत्यार, अवटी पहा

**व्हायोलिन**—न एक युरोपीय ततुवाद्य याला चार ताती असुन त्या म, सा, सा, प या स्वरांत लावितात याला पडदे नस तात हें गजानें वाजवितात [इ ]

**व्हावटा, व्हायकाट**—न (गो कु ) पाण्यानें वाहून जाणारी जमीन

**व्हावस**—वि (गो ) विसगत, बेफाट, गैर (आपण ६० ) [तुल० वाहॅस ? ]

**व्हावळा**—वि हावरा, अधाशी, वखवखलेला [व्हावें, हाव ? ]

**व्हावा**—क्रि पाहिजे (लिंगानुरोधें व्हावी, व्हावं अशीं रुपें होतात ) 'तो सकळ जनासी व्हावा। जेथें तेथें नित्य नवा।' —दा ११ ३ ५ [होणें]

**व्हास**—पु (क जैन ) सध्याकाळचें जेवण (सूर्य मावळ ण्यापूर्वी)

**व्हाळ**—पु ओढा, नाला [ओहळ, वहाळ] ०कट-पु ल्हान ओढा **व्हाळी**-स्त्री १ ल्हान ओढा, ओहोळ २ झरा ओहळी

**व्हाळ-ळी**—स्त्री वल्चोंडीचें झाड

**व्हिक्टोरिया**—स्त्री एक प्रकारचें वाहन, बग्गी तीन माणसें बसतील अशी एका घोड्याची गाडी [इ ]

**व्हार**—पु (गो ) हीर नारळाच्या झावळीची काडी

**व्हेळ**—स्त्री (प्र ) वेळ पहा 'ते व्हेळीं मज गमलें ऐसें।' —दाव ३६६

**व्हेळा**—पु (राजा ) एक झाड वेहळा पहा

**व्होवरी**—स्त्री (कु ) मोरी [ओवरी]

**व्हाळीक**—स्त्री (कु.) लग्नाचें आमत्रण

**व्होळसा**—पु (गो ) पाण्याचा मोठा लोटा

---

# श

**श**—मराठी वर्णमालेंतील तिसावें व्यजन, आणि उष्म वर्णां पैकी पहिला वर्ण, हा तालव्य वर्गांतील आहे अक्षरविकास—या वर्णाच्या पाच अवस्था—१ ली अशोकाच्या काल्सी येथील शिला लेखांत, २ री, कुशानवशी राजांच्या वेळच्या मथुरेच्या लेखात (इ स. १ ले व २ रें शतक ), ३ री, राजा यशोधर्मन्च्या काळा तील मंदसोर लेखांत (इ स ५३२), ४ थी, जपानमध्यें मिळालेल्या एका (उष्णीषविजयधारिणी) ताडपत्री ग्रथात (इ स ६ वें शतक) व ५ वी, अपराजित नावाच्या मेवाडच्या गुहिलवशी राजाच्या वेळच्या कुडेश्वर लेखात (इ स ६६१)

**श**—पु शकर [सं ]

**शं**—न सुख, कल्याण [स ]

**शाउर, शाऊर**—पु १ विवेक, तारतम्य —राज्यको ८ २६. २ प्रज्ञा, चातुर्य [अर शुऊर]

**शाक**—पु १ शका, सशय, सदेह २ भीति, कुशंका कुतर्क. —हम १९८ [अर शक] ०अंदेशा-पु सशय, भय 'कोणे विशीं शक—अंदेशा न धरणें '—रा १५ ६४ ०दील-वि साशक-चित्त 'रयत शकदील होऊन तजावजा झाली आहे '—ऐच२७ ०शूभ-पु शका, सशय 'शकशुभ दिलात न आणितां करार—मोजीब खातरखा सजा करावी '—पया ४६६ [अर शक+ शुब्ह] **शकी**—वि शकी पहा

**शाक**—पु १ ज्या दिवसापासुन एखादा राजा एखाद्या कृत्याची किंवा आपल्या राज्यारोहणाची कालगणना सुरू करतो किंवा एखादी महत्त्वाची गोष्ट घडत त्या दिवसापासूनचा काल, वर्ष—कालगणना हिंदुस्थानांत अनेक शक होते —ज्ञानकोविभाग ५ पहा 'नर्मदेचे अलीकडे शालिवाहन शक चालतो, पलीकडे विक्रमशक चालतो ' २ (विशेषत ) शालिवाहनाच्या जन्मदिवसापासूनचा किंवा त्यानें विक्रमाचा पराभव केल्या पासूनचा काल —शकसव-त्सराचा उल्लेख शकाब्द ३८० तल्या एका जैन ग्रथात सापडतो याचा शालिवाहनाशीं सबध विजयानगरच्या बुक्करायान (शके १२७६) जोडून दिलेला दिसतो —सशाप १ २ सातवाहन पहा या कालाचा आरभ वैशाख शु॥ १ कलियुगाचें ३१७९ वें वर्ष, सोमवार ता १४ मार्च इ स ७८ ३ एक लोकराष्ट्र, शाक, शाक(त)वाहनाचे—शालिवाहनाचे अनुयायी ४ राज्य, राजाची

कारकीर्द ५ अधिकार आधिपत्य, अधिकाराचा हुकूम, आज्ञा ६ श्रेष्ठपणा, वर्चस्व, वरचढपणा ( क्रि० अमक्यावर शक चढणें बसणें, लागणें ) ७ हुकमत, दरारा 'श्रीमताचे प्रतापें मोठा शक केला' [ स शक्–ऐश्वर्ये या धातूवरून –राजवाडे ] ०कर्ता–पु १ ज्याच्या नांवें वर्षगणना चालते तो, शक संस्थापक २ धर्म पंथ, संप्रदाय इ० स्थापन करणारा 'कलियुगांत ६ शककर्ते होतील' ३ (साके) छत्रपती शिवाजी –पया २८९ [ स ] शकाब्द–न शालिवाहन शकाचें वर्ष [ स ] शके–अ शकामध्यें, शकारंभापासून ( संवत्सरसंख्यापूर्वी प्रयोग ) 'शके सतराशें बावन्न' [ शक शब्दाचें सप्तम्यंत रूप ]

**शकट**—पु १ गाडा, गाडी २ रोहिणी नक्षत्रांतील पांच ताऱ्यांनीं झालेली शकटाची आकृति ३ (ल) खोडा, लोढणें अडथळा करणारा मनुष्य, काम [ स ] ०भेद–पु १ रोहिणी या शकटाकृति नक्षत्रांतून एखादा ग्रह किंवा चंद्र यानें जाणें २ शकटाकृति सैन्यरचनेमधून अगर घनव्यूहामधून भेद करून जाणें, ह्यावरून फळी, जूट कट फोडणें, फूट 'मग अतस्त शकटभेद ...न कळे' –पद ५८२, –पया २५४ ३ (अव प्रयोग) लाडयाखवाडया, युक्त्या 'तूं दर्सी करूनिया शकटभेद। वधिला जालंदर रणरंगीं।' –निगा १०३ ४ कारस्थानें, मसलती, डाव पेंच [ स ] ०व्यूह–पु गाडीच्या आकाराप्रमाणें–सैन्याची रचना, व्यूह [ स ]

**शकटास्य(करण)**—न (नृत्य) खालीं बसल्यासारखें करून तळसंचर पाय खूप पुढें पसरणें व वक्षस्थळहि पुढें करणें –(भौमीचारी) जुळत्या चवड्यावर उभा ठेवलेला पाय शक्य तितका पुढें सरकविणें म्हणजे कमरेच्या वरील शरीराचा भाग मागच्या बाजूस खालीं वाकेल व छाती वर यईल याप्रकारची स्थिति [ स ]

**शकड**—न साकडें, संकट; शकट अर्थ ३ पहा 'दुष्मान पळती, वेन्याला शकड घालीती' –म सा प २ ३५४ [ स शकट ]

**शकणें**—अक्रि समर्थ असणें, होणें काहींएक करण्याविषयीं कोण्याएकामध्यें शक्ति असणें [ स शक्–शक्य प्रा सक हिं सकना ]

**शकणें**—क्रि संशय येणें वाटणें कुतर्क करणें भीति, शंका वाटणें आशंकणें 'म्हणी शकाल मद्रूपातें। माझें अभय सदा तुम्हातें।' –मुआदि ५३७ [ स शक् ]

**शकनीय**–वि संशययुक्त, शंकास्पद, विवादनीय, वादग्रस्त [ स ]

**शकपाळ**—पु (अप) शकपाल शककर्ता, शकारंभ तुळनार्थ सकपाळ आडनाव 'शकपाळ शिवाजी महाराजानें केला' (शिवाजीनें नवीन शक सुरू केला) –ऐपा ७३ [ स शकपालन ]

**शंकर**—पु १ सांब, शिव, महादेव २ सुप्रसिद्ध अद्वैतमत प्रस्थापक आद्य शंकराचार्य –वि शुभ मंगल सुखदायक, क्षेमकर (वों) शसासुराचें झाड [ स शम्=कल्याण, कर=करणारा] ०करणें–क्रि श्रीकाराप्रमाणें 'श्री शंकर' अर्से पत्रावर सही वजा लिहिणें 'होळकर राजे अशी स्वदस्तुरी करतात तुमच्या वडिलांस नोकरी देण्यांत येत आहे असा मजकूर लिहून शंकर केला' –विक्षिप्त ३ ६१ ०फारा–पु मध खाणारा एक जांभळा पक्षी ०मत–पु १ (संगीत) नोहारवाणी पहा २ अद्वैत

**शंकराचार्य**—पु १ वेदान्त तत्त्वज्ञानप्रवर्तक एक धर्मगुरूची पदवी २ (ल) मठाधिपति धर्मगुरु पीठाधिष्ठित व्यक्ति 'थोडया दिवसांपूर्वी रोम येथील ख्रिस्ती शंकराचार्यांनीं कनोस सतमाल्किंत गोवून, एका प्रसिद्ध ठिकाणीं त्याच्या पुतळ्याची स्थापना केली' –आगर ३ ५३ ३ एक मतप्रवर्तक आचार्य, गुरु ४ स्वामी वरील आचार्यांनीं ठिकठिकाणीं स्थापन केलेल्या मठांतील अधिपति [ स ] शंकराचारी–पु (अप) मठाधिपति 'शंकराचारीस साह्य जाले।' –दावि ४२८

**शंकरपट**—पु (व नाग) संक्रांत वगैरे प्रसंगीं होणारी बैल गाड्याची शर्यत बैलाची शर्यत गाडी–घोडयाची धावण्याची शर्यत 'आजच्या दिवशीं आमच्या गांवीं शंकरपट असतो' [ स संगरपट? ]

**शंकरपाळा-ळें**—पुन एक खाद्य पदार्थविशेष, साखर अगर गूळ, तूप कणिक याचा तळीव गोड पदार्थ [ स शखपाळ तुल० फा सक (क)र्–पारा, म साखरपारा ]

**शंकरा शंकराभरण**—पु (संगीत) एक राग यांत षड्ज तीव्र ऋषभ तीव्र गांधार, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति षाडव, षाडव, वादी गांधार, संवादी निषाद गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर याचा दुसराहि एक प्रकार आहे

**शकल**—न तुकडा फाक, खंड 'दोन शकलें दोन बाजूला।' –ऐपो १६७ [ स ] ०पात्र–न फुटकें भांडें 'शकल पात्रें घेउनी धावताती।' –सप्र २० १३?

**शकल**—स्त्री १ शक्ल पहा योजना 'तुम्ही मन सब्याची शकल बांधोन सर्वांची एकवाक्यता केली' –पद ५ ?६ २ रीत, स्थिति 'गंवची हे शकल व कराडचे दरमाईचाही काहीं ठीक नाहीं' –रा ६ ५९? [ अर शक्ल् ]

**शकल**—शिकल पहा

**शकस शखस**—पु मनुष्य 'एक मातबर शकस रवाना करितों' –ख ७ ३५६९ –एटि २ ३५ [ अर शख्स् ]

**शकस, शकस्त**—(प्र) शिकस्त पहा

**शंका**—स्त्री १ संदेह, भय, अविश्वास, खात्री नसणें, आशंका, किंतु 'जैसें शंका जात वेंतो लोपे। सापपण माळेचें।' –ज्ञा ९ ७३ २ आक्षेप, हरकत विरुद्ध मताचा प्रश्न (वादग्रस्त वाव तींत) (क्रि० घेणें, करणें) ३ कल्पना, सुक्ष्मसंस्कार 'तेमीया विषयाची शंका। मनीं वसती देखा। पातुककरीं अशंका। विवेक जाता।' –ज्ञा २ ३२० ४ (संगीत) गाण्यात घाई करणें ५ अडचण, अडथळा, गुंता, अडकाठी, व्यत्यय 'शंका होती पहिली तिची। नि शंक झाली व्यथिताचारासी।'–गुच ७ १५६. ६ लाज भय 'दिवसास राडच्या घरीं जातोस, लोक आपल्याला हासतील ही काहीं शंका वाळगीत जा' [स शङ्क्=संदेह वाटणें] ०घेणें–वाळगणें–लाज, भीति वाटणें ०धरणें–भीति, धाक वाटणें 'लज्जावती फार तथापि त्याची। शंका न सीता धरि हो पित्याची।' ०बाह्य–वि शंकेपलीकडे, शंका घेण्यास जागा नाहीं असें त्याचें वर्तन शंकाबाह्य आहे' ०शील–ळ–वि साशंक, संशयखोर, शंकित मनाचा [सं]

**शंकित**—वि १ साशंक, भीतियुक्त, दिक्कत बाळगणारा २ भीति घाळगलेला, शंकलेला, शंकास्पद (विषय) ०दृष्टि–वि (नृत्य) दृष्टी आजूबाजूस वळविणें व बाहुल्या गोंधळल्यासारख्या करणें असा अभिनय (शंकित मनोभाव प्रगट करण्याकडे उपयोग) [स] शंकी–वि संशयी, साशंक

**शकी**—वि दुर्दैवी विपन्न 'लढाई होऊन भाराभाई याची फौज गारत होऊन पांडुरंग शकी'–पया ३८५ [अर शक]

**शंकासुर**—पु राजतुरा एक फुलझाड व त्याचें फूल, शंखासुर

**शकार**—पु राजशालक, राजाच्या रखेलीचा भाऊ –मृ केवळ नात्यामुळें थोर अधिकार असणारा २ (ल) मूर्ख, आढ्यतेखोर व दुष्ट मनुष्य [स]

**शंकु**—पु १ अणकुचीदार वस्तु, खिळा, सळई, शूळ, टांचणी कांटा खुंटी, गज मेख काठी इ० २ मोजणी करताना काटकोन पहाण्याचें एक साधन (इ क्रॉसस्टाफ) ३ छायायंत्राची सुची कांटा ४ एकावर चौदा शून्यें देऊन झालेली संख्या सरव्याविशेष दहा महापद्म, दहाहजार अब्ज ५ (भूमिति) सूची; सुळक्याच्या आकाराची वस्तु (इ) कोन ६ (ज्यो) तारे ग्रह इ० ची लंबोन्नतीची किंवा उंचीची ज्या [सं] ०छाया–स्त्री शंकुयंत्राच्या खीलाची पडलेली छाया [स] ०यंत्र–न छायायंत्र, दिनमान पहाणें किंवा प्राचीसाधन या करिता याचा उपयोग करितात (इ) सन्–डायल [स] शंक्वाकार–वि १ शंकु किंवा सुळका या आकाराचें (इ) कॉनिकल २ मळसुत्राकार (इ) स्पायरल –सेंपू २ ४४ [शंकु+आकार] शंकाकृति–स्त्री शंकूसारखी आकृति शंक्वाकार पहा [शंकु+आकृति]

**शकुंत**—पु १ एक पक्षी, घार २ सामान्यतः पक्षी [स]

**शकुंतल**—न घोड्याच्या कानाचें मूळ –अश्वप १ ६१

**शकुन**—पुन १ शुभाशुभ चिन्ह भविष्य सुचक चिन्ह किंवा वस्तु; (शब्द, दर्शन इ० रूप) लक्षण 'एका नाकें बहु सिका। सहदेव म्हणे शकुन निका।' २ ज्या लक्षणचिन्हावरून–गोष्टीवरून ज्योतिषी, भविष्य कथन करतो ती ३ कौल, देवानें दिलेलें उत्तर ४ अनुकूल गोष्टी होण्याबद्दल केलेली प्रार्थना, स्तोत्र मंत्र ५ एक पक्षी [स]

**शकुन**—पु (वों) माशाच्या आकाराचें पिठाचें केलेलें चित्र, याला काकडीच्या बिया टोचलेल्या असतात 'धूपारतीनंतर कुंभारानें एका ताटात शकुन व दिवा घेऊन यावयाचें'–आदिवऱ्याची महाकाली [स] ०उंडा–पु १ मंगलकार्याच्यावेळीं कणिकेंत साखर वगैरे घालून केलेलें पक्वान्न उंडा पहा २ पुरणाचा वडा –पाकशास्त्र ५५ ०गाठ ग्रंथी–स्त्री १ एखादी पुढें होणारी किंवा देशांतरीं झालेली जी गोष्ट ती विषयीच्या शकुनाची आठवण राहण्यासाठीं पदरास बांधलेली खूणगाठ शकुनाला मान्यता देणें (क्रि० बांधणें). 'स्वचक्रप्राप्ती हे त्वरित शकुनग्रंथि दिधली' –सारुह ८ ३८; –वेसीस्व १ ४१ २ शुभदायक, हितकारक घटना, बनाव, प्रसंग मंगलकारक शुभ चिन्ह लक्षण ३ लग्नांत वधुवराच्या पदरास वराच्या मेहुणीनें बांधलेली शुभगाठ ०गाठ बांधणें घालणें–१ अगदीं पूर्ण मनावर बिंबवणें, पक्कें ध्यानांत ठेवणें २ खात्री करणें चालला, बरोबर अजमास करणें 'इकडे हीं तिघेजणें बाघोबाच्या तडाक्यांतून कमची पार पडतात अशी त्यानें शकुनगाठ बांधून ठेविली' –सभाजी ०पोतें–पु शकुनाबाबतचा एक सरकारी कर –पया १२९ ०लाडू–पु प्रयाणकालीं शुभदायक म्हणून पदरांत लाडू बांधतात तो 'आता वेळु नलावावा। राम या मुहूर्तें जावा। ता शकुनलाडू बांधावा। याच्या पदरीं।' –वेसीस्व २ ७. ०वती–वि भविष्य सांगणारी 'इच्छि ते शकुनवती। होय देती तात्काळ।' –तुगा ३२१६ –स्त्री भविष्यग्रंथ पोथी ही बघून ज्योतिषी, टोक जोशी भविष्यें वर्तवितात शाकुनिक–न शकुन दुश्चिन्ह; उत्पात अद्भुत –वि शकुनासंबंधी, अद्भुत कारक; अरिष्टकारक अवलक्षणीय [स]

**शकुनि**—पु १ एक पक्षी, गिधाड २ गांधार, दुर्योधनाचा मामा ३ (ल) कपटी कारस्थानी, वदसल्ला देणारा आप्त, मनुष्य ४ (ज्यो) ववादि करणांतील आठवें करण शकुनिचतुष्टय–न १ दुर्योधन दुःशासन शकुनि व कर्ण हे चौघ २ (ल) दुष्ट इसमाची टोळी, कपट–चांडाळचौकडी [स]

**शकून**—पु १ शब्द भाषण बोलणें, उच्चार २ मसलत ३ हुकमत शकुनात असणें–चालणें–घालणें–वचन किंवा

आज्ञा दिल्याप्रमाणें वागणें **शकुनांत घेणें**-१ एखाद्याशीं संबंध ठेवणें, वसणें, बोलणें, असणें ( निषेधार्थी-वारा न घेणें यासारखा प्रयोग होतो ) २ सल्लामसलत घेणें

**शकुनी**—वि समर्थ, शक्त 'साहे महापराधहि, दंड खळाला करावया शकुनी।' -मोसभा ४ ५८ [स शक्-शकु]

**शकृत**—न घाण, मैला, विष्ठा [सं]

**शकेश्वर**—पु 'शकासुर' पहा

**शक्क**—पु संशय, शंका शक पहा [अर शक्क्]

**शक्कल**—स्त्री १ युक्ति, कल्पना, तोड, उपाय, योजना. ( क्रि० काढणें, करणें, योजणें, निघणें, पाडणें ) 'हीच का तु शक्कल काढलीस' -इंप ११३ 'शक्कल काढावयाला अक्कल लागते' -रणदुदुंभी ३७ २ -नक्की स्थिति, प्रकार, स्वरूप (एखाद्या कामाचें, वस्तूचें) 'इकडून ही हे शक्कल जल्द नमूदात यावी म्हणोन पत्रें जातात' -पया ४७७ [अर शक्ल्]

**शक्त**—स्त्री सामर्थ्य, बल, पराक्रम, जोर, ताकद, (प्र) शक्ति पहा -वि १ समर्थ, कार्यक्षम, योग्य, लायक, तरबेज 'हरी भक्त तो शक्त कामास मारी।' -राम ८७ २ पराक्रमी, प्रबल, शक्तिमान 'शक्त नामचि तुझें रघु-राया।' -(वामन, नामसुधा नवनीत पृ ९१) ३ (व्या) सूचक, दर्शक, विशेष अर्थ दर्शक, (शब्द वाक्यप्रचार), सशक्त [शक्-योग्य, समर्थ होणें]

**शक्ति**—स्त्री १ सामर्थ्य, योग्यता, लायकी २ बळ, ताकद, प्रभाव. समासांत उपयोग उदा० शरीरशक्ति, इंद्रियशक्ति, नेत्रशक्ति, कर्णशक्ति, वायुशक्ति, ज्ञानशक्ति, योगशक्ति, काल-शक्ति 'नाम शक्तिबळें जळीं पाषाण तरले।' २ अर्थकक्षा, मर्यादा, सीमा, व्याप्ति (शब्द वगैरेची) ३ स्त्रीदेवता, पार्वती, लक्ष्मी, इ० देवी, ईश्वराची स्त्रीरूप सामर्थ्यप्रतिमा 'तुका हरि-भक्ती करी। शक्ति पाणी वाहे घरीं।' -तुगा ४११ 'गणेश शारदा नाना शक्ती' -दा ४ ६ १० ४ माया, परमेश्वरशक्ति 'जे महत्ताची शक्ती। जे ईश्वराची शक्ति।' ५ प्रेरणा; (यंत्रास चलन देणारा कर्ता) ६ एक आयुधविशेष, अस्त्र उदा० वासवशक्ति 'चित्रनृपें प्रतिविंध्यप्राण हरायासि सोडिली शक्ति।' -मोकर्ण९ २४ ७ कुंडलिनी 'तैसीवेढियातें सोडिती। कविनकें आंग मोडिती। वदावरी शक्ति। उठली दिसे।' -ज्ञा ६.२२७. ८ स्त्रीपुरुष मिळून जें मिथुन त्यातील जी स्त्री ती ९ शिवलिंगाला प्रतिरूप म्हणून असलेली योनी, प्रकृति तंत्र मताची देवता हिची उपासना करणारे ते शाक्त १० अमुक शब्द उच्चारिला असतां अमुक अर्थाचाच बोध व्हावा असा शब्दाच्या ठिकाणीं असलेला संकेत ११ भाला [स शक्-सामर्थ्य असणें] ०ग्रह-पु १ शब्दाचें विशेषअर्थी ग्रहण, अर्थ ज्ञान २ शब्द, लक्षण, इ० वरून होणारा बोध, मत, एखाद्याच्या सवधानें झालेला ग्रह 'त्याच्या वेषावरून हा साधु असा मला शक्तिग्रह झाला होता' ३ अस्तित्वात असलेल्या वस्तूचें अस्तित्वरूपी ज्ञान, ग्रहण, बोध, वास्तविज्ञान, यथार्थज्ञान [स] ०ग्राहक-वि शब्दाच्या अर्थाचा निर्णय करणारा, निर्णायक उदा० व्याकरण, कोश, रूढी, पद्धति [स] ०चक्र-न माया-रूप विश्व, मायाचक्र 'जें शक्तिचक्राशीं वेगळ।' 'शक्तिचक्र जें अशेष। तें उपसंहरे नि शेष। मूळमायेसिसें।' [स] ०त्रय-न १ युद्धाच्या तीन शक्ति, प्रभुशक्ति, मंत्रशक्ति, उत्साहशक्ति २ घटना, रचना, यासबधी तीन शक्ति, ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति, द्रव्य शक्ति या तिन्हींस क्रमानें सत्वगुण, रजोगुण, तमोगुण यांशीं संबद्ध अशीं सात्विकशक्ति, राजसशक्ति, तामसशक्ति अशीं नावें आहेत [सं] **शक्तितः**-क्रिवि शक्तीप्रमाणें **शक्तिनसार-रूप**-वि शक्तीप्रमाणें, सामर्थ्याप्रमाणें, योग्यतेप्रमाणें 'शक्तिनसार दे सर्वदा। तो सत्वगुण।' -दा २ ७.५५ [स शक्ति+अनुसार, शक्ति+अनुरूप] ०नित्यत्व-न (शाप) शक्ति केंव्हाहि नष्ट होत नाहीं, तिचें फक्त रूपांतर होतें हा सिद्धान्त [इ] कॉन्झर्व्हेशन ऑफ एनर्जी [स] ०पात-पु १ मंत्राचा उपयोग करण्याचें गुरूनें दिलेलें सामर्थ्य, शिष्यास गुरूनें दिलेलें स्वतःच्या ठिकाणचें मंत्रबल २ शक्तिक्षय, बलहानि, दुर्बलता, दुबळेपणा ०पूजा-स्त्री शक्तीची, देवीची, दुर्गेची पूजा (शाक्ताची) ०मान्-मंत-वंत-वि १ सामर्थ्यवान, कार्यक्षम, लायक, योग्य २ बलवान, जोरदार, प्रबळ [स] ०मापक-न (शाप) यंत्राचें सामर्थ्य, गति वगैरे मोजण्याचें यंत्र (इ) डायनामोमीटर ०वैकल्य-न (कोणत्याहि प्रकारचें) सामर्थ्यातील व्यंग, बलातील उणेपणा, कमताई, कमजोरपणा ०संग्राहक-न एंजिनाची गति स्थिर रहाण्याकरितां, योजिलेलें एक महत्त्वाचें चक्र, यामुळें ज्याची गति स्थिर राहून एंजिन सारख्याच वेगानें फिरतें (इ) फ्लाय व्हील [स] ०सुत-पु १ कार्तिकस्वामी २ पराशर ऋषि ०हीन-पु दुर्बळ ०क्षीण-वि शक्तिपात झालेला, अतिशय अशक्त झालेला, आजारी उपाशी, वृद्ध, (मनुष्य), सामर्थ्यहीन, बळहीन, सत्ताहीन **शक्त्युपासना**-स्त्री शक्तिदेवतेची सेवा, पूजा, शक्तिपूजा [स] **शाक्त**-पु शक्तीचे उपासक, देवीचा उपासक, शक्तिदेवीचा भक्त 'शक्तिनें शास्त्रहि आराधिती।' -घनश्याम भूपाळी -वि शक्तिसबधाची (पूजा, अर्चा, विधी इ०) [स] ०पंथ-मार्ग-पु शक्त्युपासना, ज्यांत देवतोद्देशानं मद्य प्राशनादि करावें असें सांगितलें आहे त्या तंत्रोक्त मार्गाचें नाव वाममार्ग पहा [स]

**शक्य**—वि १ होण्याजोगें, संभवनीय, सामर्थ्याच्या आटोक्यातील, साध्य, संभाव्य, करता येण्याजोगें 'शक्य असेल तरि रहा' -धेनुहरण २ ऐकण्याजोगें, अर्थ, मतलब, उद्देश

शब्दानें ज्याचा बोध होतो असा ( अर्थ, आशय ) **०क्रिया पद**–न ( व्या ) मूळ धातूस वर्णे अथवा ववणें प्रत्यय लावून जें नवें सामर्थ्यबोधक क्रियापद सिद्ध होतें त्यास म्हणतात उदा० करवणें, जावणें, घेववणें, देववणें –मराठी भाषेचें व्याकरण १५५ **०भेद**–पु ( व्य ) क्रियापदाच्या कर्त्यास क्रिया करण्याचें सामर्थ्य आहे असें दर्शविणारा रूपभेद, प्रकार भेद पहा **शक्यरूप, शक्यार्थ**–पु १ संभाव्य अर्थ, ग्राह्य होण्यासारखें वाक्य २ (व्या ) शक्यता दाखविणारें क्रियापदाचें रूप, विधिलिङ्

**शक्र**—पु इंद्र 'शक्रसभा सार्धशत योजन दीर्घा तशीच विस्तीर्णा '–मोसभा १ २३ [ स ] **०जित, शक्रारि**–पु इंद्रजित, रावणाचा मुलगा [ स ] **०धनु**–न इंद्रधनुष्य [ स ] **०नंदन-सुत**–पु १ वाली २ अर्जुन [ स ]

**शक्रद्दर्शनी शक्रद्दर्शनीं**—क्रिवि ( अप ) सकृद्दर्शनीं, देखताक्षणींच, प्रथम दृष्टीसच, तावडतोब [ स सकृत्+दर्शन ]

**शक्स, शख्स**—पु मनुष्य, माणूस, व्यक्ती [ अर शख्स् ]

**शंख**—पु १ समुद्रांत रहाणारा एक प्राणी २ अशा प्राण्याचें घर, त्याचें अस्थिरूप शरीर, कवच याचा देवावर पाणी घालण्यासाठीं किंवा युद्धात वाजविण्यासाठीं उपयोग करितात 'मोत्यें म्हणजे शिंपाचीं पोरें आणि शंखाचे भाचे '-प्रेमशोधन १५५ ३ एक प्रकारचें वाद्य 'शंख शृंगें काहळा भेरी '–सप्र ३२ 'काहळ मृदंग शंखभेरी। दुंदुभी दमामे रणमोहरी।' –जै ६८५ ४ बोटावर असणाऱ्या शंखाकृति रेघा–रेषा याच्या उलट चक्र ५ बोंब, ओरडा आरडाओरडा, शंखध्वनि. 'शंख करी आक्रोश –रावि ३१ १६१ ६ नवनिधींतील एक ७ एक संख्या शंकू ८ कानशिलाजवळचें कपाळावरचें हाड, 'शंख शंखदूर्यी धरूनि वीजुस वीरवाणी।' –र १७ ९ घोड्याचा विशिष्ट अवयव –अश्वप १ ६२ १० चौदा रत्नांतील एक पांचजन्य 'लक्ष्मी जयास भगिनी आणि तात सिंधु। इतके असोन परि शंख फिरे भिकारी।' ११ ( ल ) अभाव, शून्य, पूज्य 'बुद्धीच्या नावानें शंख ' १२ शंखासुर ( राक्षस ) पहा –वि १ मूर्ख अडाणी टोंण्या निरक्षर २ रडका, बोंबलत्या, अपयश येणारा ३ स्वच्छ निर्मळ, पारदर्शक गुण दाखविणाऱ्या विशेषणापुढें आधिक्यार्थी योजतात उदा० निर्मळशंख, पाणी **०वाजणें**–सपणें, न उरणं, पराभूत होणें 'लाडवाचा शंख वाजला' 'परिक्षेंत त्याचा शंख वाजला' **०करणें**–१ बोंब ठोकणें–मारणं, बोंबलणें, बाजा करणें 'सात्यकि निघे, म्हणे कुरुभट हो ! शंख करूनि सुख सुजश।' मोद्रोण ११ ३५ –रावि ३१ १६ २ ( ल ) मोठमोठ्यानें ओरडणें 'पैशाच्या कल्पावर नजर ठेवून वकील शंख करीत असतो '–संगीत सत्तेचे गुलाम २१ **०करावयास लावणें**–बोंबलत बसविणें, कांहीं न देणें 'विश्वामित्राला शंख करावयाला लावून इंद्रसभेचा रस्ता धरला' –नाकु ३ ७८ **०तीर्थ**–न १ देवपूजेंत अभिषेकानंतर देवावर शंखांतून शिंपावयाचें पाणी २ ( ल ) फाल्गुनवद्य बोंब [ स ] **०तीर्थ घेणें**–शंखध्वनि करणें, बोंब मारणें 'बापलेकाचें भांडण आहलें। लेकीं बापास मारिलें। तव ते मातेनें घेतलें। शंखतीर्थ।' –दा ३ ५ १९ **०द्राव**–पु १ शंखापासून काढलेला द्रव, रस २ ज्यात शंख इ० विरघळतात असा द्रावक रस ( क्रि० करणें, पाडणें ) ३ ( शाप ) लवणाम्ल ( इं ) म्युरिॲटिक ॲसिड –पदाव ११ **०धारी**–प दोन शिंपले एकावर एक बसून झालेली शंखाकार कवचघटना –प्राणिमो ९२ [ स शंखधृ ] **०ध्मा**–पु १ ( शंख वाजविणारा ) ( ल ) उद्धट, आडदांड माणूस २ निरक्षर, शंखोबा [ स शंख+ध्मा=वाजविणें ] **०ध्वनी**–पु १ शंखाचा आवाज २ दु खोद्रेकामुळें बोंबलणें, बोंब, पांचजन्य 'पायाला चटका लागताच त्यानें शंखध्वनि केला ' –भारतभा १७१ **०निवासी**–वि शंखांत रहाणारा ( प्राणी ) **०पुष्पी**–स्त्री एक प्रकारचें गवत; विष्णुक्रांता [ स ] **०भस्म**–न शंखापासून केलेलें रसायन हें शूळनाशक आहे शंखाचें भाणिद –सयोग १ ५६ **०मणि**–पु १ शंखाचा मणि, मोती २ ( ल ) दिसण्यांत गोरागोमटा परंतु अक्कलशून्य मनुष्य [ स ] **०वटिका-वटी-भस्म**–स्त्री शंखापासून केलेलें एक औषध हें संग्रहणी व शूळ यावर देतात [ स ] **०वणी**–न १ शंखातील पाणी ( देवावर घालण्यासाटीं ) २ स्वच्छ, निर्मळ पाणी ३ ( ल ) पाणी घातलेलें दूध, ताक दहीं इ० ताकवणी पहा **०शिरोमणि**–पु मूर्ख टोंण्या, अक्कलशून्य मनुष्य 'सर्व पिढींत शंखशिरोमणि किंवा फार विद्वान एखादाच निघतो ' **०स्फुरण**–न १ शंखनाद २ ( ल ) बोंब, आरडाओरड 'लब्बाड पिंगेनि करतळें। शंखस्फुरणें करीतसे।'–मुद्दरिश्चंद्राख्यान ( नवनीत पृ १६७ ) 'हा जेणें करी शंखस्फुरण '–एभा २३ ५३५ **शंखावाती**–स्त्री बोंब 'न पेरितां जाण शेती। शिमग्यावीण शंखावाती।' –मुरशु ८० **शंखासारखें**–वि स्वच्छ, निर्मळ 'या टाक्याचें पाणी शंखासारखें आहे।' **शंखासुर**–पु १ एका दैत्याचें नाव २ एक पुष्पझाड ३ त्या पुष्पझाडाचें फूल, राजतुरा **शंखाहुली**–स्त्री एक वेल हीस 'सांखवेल' म्हणतात शंखपुष्पी पहा –वगु ५ ७८ **शंखिनी शंखीण**–स्त्री १ स्त्रियांच्या चार जातींपैकीं एक, उंच सडक बांध्याची, तामसी व कामुक स्त्री २ ( निंदार्थी ) थोडें दूध देणारी गाय ३ गोगलगाय **शंखोदक**–न देवाच्या मूर्तीवर शिंपडण्याचें शंखांतील पाणी [ स ] **शंखोला**–पु शंखाचा एक प्रकार –मुद्राम ५३ **शंखोबा**–पु टोंण्या, मूर्ख मनुष्य, शंखध्मा पहा **शंख्या**–पु

१ शखोवा २ अक्काबाईचें वाळ, अपयशी माणूस, कमनशिबी माणूस **शख्यासोमल**-सोमलात एक भेद

**शखजिरें**—न सगजिरे पहा

**शखपाल-ळ**—पु १ सापाची एक जात, एक जिवाणु 'गन्हाळे तैसेचि शखपाळ।' –गीता १ ३६९ २ पुष्कळी पालीच्या जातीचा एक प्राणी, गगपत, पाल, सरडा ३ शकर पाळें नावाचा खायपदार्थ [स शखपाल=पाताळातील सर्प]

**शखवलय-वळा-ळी, शंखावळी**—न शखाची बागडी [स शखवलय] ०**श्वेत**-पु घोड्याची एक जात 'शखा-सारखा शुभ्रवर्ण, शखाप्रमाणें ज्याचा शब्द आहे, सुशील, हसाप्रमाणें उभा रहाणारा, फार ठेंगणा नाहीं, फार उच नाहीं, अशा अश्वास शखश्वेत म्हणतात' –अश्वप १ २३

**शखळा**—स्त्री साखळी [स शृखला अप]

**शखोट**—वि शाखोट पहा

**शगूफ**—पु फूल, कळी [फा]

**शचि-ची**—स्त्री इद्राणी इद्राचा पत्नी [स] ०**नायक-पति-वर**-पु इद्र

**शट्कर्णी**—क्रिवि (प्र) षट्कर्णी, सर्वत्र प्रसिद्ध जाहीर, उघड (क्रि० करणें, होणें, जाणें, येणें यासीं जोडून) तीन मनुष्यास समजलेली गोष्ट गुप्त राहू शक्त नाहीं यावरून [स षट्=सहा+कर्ण=कान]

**शठ**—वि १ लबाड कपटी, उच्चा ठक 'कपीश्वरु कोप विलें शठें। –एभा १ ३७३ भोजन करा म्हणे शठ दव म्हणे मज कशास हो करिता।' –मोउद्योग ७ ६४ २ तिरस्कारार्ह अमगल अघोरी कुत्सित कजूष, चिक्कू कदर्यु ४ दु शील, दु स्वभावी [स] म्ह० शठप्रति शाठ्य=लबाडाशीं लबाड (जशास तसें) ०**ता शाठ्य**-स्त्री १ धूर्तता २ कापट्य [स]

**शठाई**-स्त्री १ लबाडी, कपटीपणा २ कवडीचुंबकपणा कृपणता ३ दुष्टपणा, खटपणा शठ पहा

**शड**—पु साड, अडीलबैल [स]

**शड-ढ**—पु १ नपुसक अंगनारी, हिजडा २ खच्ची केलेला, खोजा ३ निर्वीर्य चेतनारहित षढ माणूस शास्त्रात सात प्रकारचे शड सागितले आहेत [स शड]

**शड्डू**—पु (क) डावा हातकोपरापासून वर करून उजव्या हातानें काढलेला आवाज दड थोपटणें तो कुस्त्यावर शड्डू मारतो आहे' ०**ठोकणें**–आव्हान करण मांडीवर अगर दडावर हाताच्या खोंग्यानें मारणें त्यानें शड्डू टोकावा व तू गप्प बसावें हें लाछनास्पद आहे' [ध्व]

**शडायचें**—कि (गो) (वृक्षाचा) अतरसाचा काढणें [स छल]



**शण**—पु ताग, सण, वाख अवाडी [स हिं, गु] ०**पट्ट-वस्त्र**-न तागाचें वस्त्र [स] ०**सूत्र**-न तागाची दोरी, सुतळी [स]

**शणपो**—पु भात मोजण्याची मोठी ओंजळ, पसा (को)

**शणै**—शेणवी पहा 'विठ्ठल शणै' 'शणै गोयबाब वाला वलकर'

**शणोपण**—न शेणवीपण, लेखकाचें काम –भाअ १८३४

**शत**—वि शभर 'भारताचें शतें सात। सर्वस्वगीता।' –ज्ञा १८ १६६१ [स] म्ह० शत तत्र पचोत्तर शत (शभर तेथें एकशें पाच) ऐशीं तथें पचायशी (खर्च करण्यास काय हरकत?) [स] ०**क**-न शेंकडा, शभराचा समुदाय [स] ०**कूट**-वि शेंकडों तुकडे झालेला, शतधा भिन्न 'तेथ ब्रह्मकटाह शतकूट। हो पाहत असे।' –ज्ञा १ १४७ 'वाटे उर्वी शतकूट। होऊन जाईल क्षणार्धें।' –पाप्र ४१ २२ ०**कृत्य**-न १ (शतक्रतूबद्दल चुकीचा शब्दप्रयोग) शभर अश्वमे यज्ञ करण्यासारखें अचाट कृत्य, शभर यज्ञाचें कार्य २ (ल) एखादें अचाट काम, महत्कृत्य शतक्रतु पहा ३ विशेष प्रकारची चटणी, रायतें ०**कृत्य करणें**-पुण्य करणें, चागली गोष्ट करणें ०**क्रतु**-पु १ इद्र २ शभर अश्वमेध यज्ञ हे केले असता-यजमानाला इद्रपद मिळतें ३ (ल) मोठा विजय, मोठा पराक्रम, मोठें शौर्य अचाट कृत्य 'जन्मास आल्यापासुन एक तळें बाधलें एवढा कायतो शत क्रतु केला' [स] ०**गुण**-वि शभरपट 'शतगुणें स्नेहो वाढला तिसी।' –एभा ७ ६०१ [स] ०**धूत**-न शभर वेळां धुवून स्वच्छ केलेलें तूप (औषधाकरिता) [स] ०**घ्नी**-स्त्री (शभराची हत्या करणारा) लोखडी भाले खिळे बसविलेला एक ठोकळा एक विशिष्ट हत्यार कारलें, शकडों लोक मारण्याचें जुनें आयुध 'परिघ बाण लोहवृश्चिक उरण। दशघ्नया आणि शतघ्नया।' –ह २२ ३४ २ एक प्रकारची तोफ, उल्हाटयत्र 'शतघ्नी नामक अस्त्रें उच प्रदेशावर नऊन टेवावीं' –हिंदी२४ ०**चिंध्या**-स्त्री शभर जागीं फाटलेलें वस्त्र नसता किंवा वापरतां न यण्याइतकें फाटकें वस्त्र; लक्तऱ्या ०**चूर**-वि शभर तुकडे झालेल शतचूर्ण पहा 'पद घायें बीज शतचूर।' –एभा २२ ४२७ ०**चूर्ण**-न अगदीं चुरा, तुकडे तुकडे झालेले, पडलेले आहेत अशी स्थिति पार चुराडा फुगोनि होय शतचूर्ण।' –अमृ ७ ६७ 'एकचि घातें शतचूर्ण।' –एरुस्व ८ ४६ –वि चुरा झालेला, विभिन्न [स शत+चूर्ण] ०**च्छदी**-वि (शभर लुचगिन्या, फद असणारा) धूर्त, बदगी वाईट चालीचा ०**च्छिद्र**-वि शेंकडों भोकें पडलेला, चाळण झालेला (कागद वस्त्र इ०) ०**जर्जर**-वि शभर ठिकाणीं फुटलेली, शेंकडों ठिकाणी खिळखिळी झालेली शतचूर्ण पहा 'याळामीं शतजर्जर नाव।

शिंगाटणें शिंगाळू-वि १ शिंगे फुट लागलेला (बकरा, मेंढा, काळवीट इ०) २ मारकट, शिंगावर घेणारा ३ मोठया व लांबट शिंगांचा शिंगाळें न (जनावराला धरण्यासाठीं त्याच्या) शिंगाच्याभोंवतीं बांधलेली दोरी शिंगाळें केळें शिंगाळी केळ-न एक जातीचें केळें शिंगाळ्या-वि मोठया किंवा लांबलचक शिंगांचा शिंगी-स्त्री १ वाजवण्याचें ल्हान शिंग (कानफाटया गोसाव्याचें) २ लहान शिंगरू (मादी) अल्प वयस्क घोडी शिंगोटी-स्त्री १ जनावराच्या शिंगाबद्दल कल्पार्थक शब्द शिंगट २ (समुच्चयार्थी) शिंगाचीं जनावरें ३ (सामा) शिंगाचें जनावर 'दोन शिंगोटया होत्या त्याही सरकारात नेल्या' ४ शिंगाचें जनावर विकणाऱ्यापासुन घ्यावयाचा कर ५ बैलाच्या शिंगाला बांधलेली दोरी, शिंगाळें म्ह० शिंग, तिकडे शिंगोटी-शिंगाचें जनावर म्हटले कीं सरकारी कर आलाच [ हि ]

**शिंगटापाग**—पु (कों) एका जाळयाचें नाव [शिंग+पाग=जाळें]

**शिंगटी-डी**—स्त्री एक जातीचा मासा

**शिंगटया**—पु बिन खवल्याचा मासा -वदलापूर १३२

**शिंगडी-री**—स्त्री (वों) नारळाच्या झापाचें टोक किंवा पातीचें टोक, शिगा [शीग]

**शिंगडी-डें**—स्त्री न (वों) वाळलेल्या शेंगाची रास (पावटा, तुर इ० द्विदल जातीच्या धान्याच्या) [शेंग]

**शिंगर, शिंगार**—न चोई, पत्रावळ लावण्याच्या बारीक काडया प्रत्येकी [शीग]

**शिंगरी**—स्त्री कोंवळा माड, अंकुर मिटलेल्या पानाची सुरळी [शीग]

**शिंगरी**—स्त्री (प्रा) भांडें ठेवण्याचें, नेण्याचें दोरीचें शिंकाळें [शिंकें+दोरी ?]

**शिंगरू**—न घोडें, खेचर, गाढव इ०चें ल्हान पोर, बच्चा, वछडें [शिंगा] शिंगरूप-वि वच्चा, छोटा (घोडा) शिंगरट-न शिंगरू शब्दाचें प्रेमळ किंवा तिरस्कारयुक्त रूप शिंगरवट-वि वयात न आलेलें (शिंगरू, शिंगा) [शिंगरू+वत्] शिंगा-पु शिंगरू गाढव किंवा घोडा यांचें पिल्लू (नर) शिंगी-स्त्री १ शिंगरू, घोडयाचें पिल्लू मादी २ (ल) छबेली छोकरी

**शिंगरुप-व**—पु हिंगुळ, रससिंदूर [फा शगर्फ]

**शिंगऱ्या-डिंगऱ्या**—स्त्री अव (खा) मुळयाच्या शेंगा

**शिंगस्त**—न (ना) सिंहस्थ (अप)

**शिंगळदी(द्वी)प**—न (प्र) सिंहलद्वीप, सिलोन [स सिंहलद्वीप]

**शिंगा**—पु (को) माडाचे झावळीचा किंवा पातीचा अग्र भाग शिगडी पहा

**शिंगाडो**—पु (कु) सावर [शिंग]

**शिंगाळ-ळा**—(गों) एक मासा, समुद्रातील एक काळा मासा

**शिंगाळी, शिंगेळी केळ**—स्त्री एका जातीची केळ. शिंगळें-शिंगाळें केळें, शिंगेळी केळें-न शिंगाळी केळीचें फळ.

**शिगूफ, शिगूफा**—स्त्री पु फूट, बखेडा, मखेला 'दम्यानि असे सिगुफेमुळें मोठें मसलतींत कमती येते'-रा१० १६५ [फा शिगाफ्]

**शिंगोटी**—पु (व) भुगा, भोंगुळ

**शिग्राम**—पु धमणी, बैलाची गाडी एक विशिष्ट आकाराची घोडयाची गाडी

**शिग्रु**—पु शेगवा, शेवगा [स]

**शिघळ, शेघळ**—स्त्री मुडावळ, वाशिंग [स शीर्ष+गल् ?]

**शिंचा**—पु (सक्षेप) शिंदळीचा, एक शिवी, शिनळ स्त्रीचा मुलगा (यातला वाईट अर्थ निघुन गेला आहे) 'शिंच्यानें (दक्षणा) विनाकारण बुडविली'-नमना ४७

**शिजणें**—क्रि १ पाण्यात उकळून मऊ होणें, उकळत असणें, रांधलें जाणें २ पक्व होणें, तयार होणें ३ त्रासणें, संताप होणें 'भाग्यें भाजे दरिद्रें शिजे' ४ (ल) विचारात असणें, घाटत असणें, तयार होत असणें 'तुमचेकडे मुलगी यावी असें शिजतें आहे निश्चय होईल तेव्हा खरें' ५ चालणें, घडून येणें -मूरु २६ 'त्यांचें त्या ठिकाणीं कांहींहि शिजतें'-अकर्मक उष्मा, उकाडा होणें [सं सिध्, स्विद्, प्रा सिज्ज, प सिज्जणा, सिं सिमणु हिं सिन्ना सिजाना गु सिजवु, ओ. सिजिवा] शिजवक-न (राजा) भात, भाकरी इ० उरलेलें शिजलेलें अन्न शिजवण-स्त्री न शिजलेला पदार्थ शिजनिणें-क्रि पाण्यात उकळून तयार करणें, राधणें, उकडणें शिजाळू-वि लवकर शिजणारें (डाळ, अन्न इ० पदार्थ) शिझणें, शिझाळू-शिजणें, शिजाळू पहा

**शिजदा**—पु नमन, वंदन जमिनीवर डोकें टेकून वंदन, [अर सिज्दा]

**शिंट**—स्त्री शितोडा सडा, पाण्याचे उडणारे बारीक थेंब, पर्जन्यतुषार (क्रि० उडणें उडवणें, मारणें) 'पावसाची शिंट लागू नये म्हणून पागोळीला पडी बांधली पाहिजे [स सिच्]

**शिट, शिंट**—स्त्री पक्ष्याचा मल विष्ठा शीट पहा शिटया-पु (राजा) वाघळाची, पाखराची विष्ठा, शीट, शिटणें-क्रि विष्ठा

टाकणें (पक्ष्यादिकानीं), मळ थोडा पडत असेल तेव्हां ल्हान मुलासंबधींही उपयोग करितात २ घोडीनें उनाड सुटून हलक्या प्रतीच्या घोड्यापासून मैथुन करून घेणें. **शिट्या**-पु (राजा.) वटवाघूळ, पक्षी इ० ची विष्ठा, शिट पहा **शिटाऊ, शिटाव, शिट्या**-वि (ग्राम्य) १ एखाद्या मरतुकड्या घोड्यापासुन झालेलें (शिंगरू) शिटलेल्या घोडीपासून झालेला माईन्साईट (घोडा इ०) २ (ल) क्षुद्र अकुलीन हरामी इसमाबद्दल बाप रावयाचा अपशब्द, छाकटा, हलकट, पाजी, हीन, नीच ३ (अशिष्ट) धूर्त, हुषार, लबाड, बिलंदर, सोदा अशा अर्थानें ल्हान मुलाबद्दल योजतात ०बंदर-न लबाड, सोदे, भामटे वगैरे तऱ्हेच्या लोकानीं भरलेलें बंदर 'गुरुजी ह्यापरिचे। शिष्य शिटाऊ बंदरीचे' ०बंदरी-वि धूर्त, ठक, लबाड; सोदा **शिटाचें शिंगरू**-न शिटलेल्या घोडीपासुन झालेलें शिंगरू, हीन अवलादीचें शिंगरू **शिटावणें**-क्रि लबाड, लुच्चा बनणें, होणें, खोड्या करण्यास प्रवृत्त होणें, बिघडणें (मुलासंबधीं प्रयोग) [शिटाव]

**शिटकळ**—स्त्री शिसारी 'ज्याणें एकदा एरंडेल घेतलें असेल त्यास पुन्हा त्याचें स्मरण झालें तर शिटकळ येते'

**शिटा**—पु शितोडा शिंट पहा

**शिटी**—वि छिटी, चिटाचें केलेलें [छींट]

**शिटी**—स्त्री शीळ (क्रि० वाजविणें, वाजणें) [ध्व]

**शिटी**—स्त्री एक लहान झाड

**शिटुक**—वि (कों) चलाख, हुषार, चपळ; टिकाऊ

**शिट्टी-ट्टो**—स्त्रीपु (गो) एक प्रकारचें भात

**शिडकणें**—क्रि (प्रा) सडकणें, काठीनें, छडीनें बडवणें, मारणें

**शिडकणें-कावणें**—उक्रि शिडका टाकणें, शिंपडणें, शिंपणें [हिं छिडकना] **शिडकाव-वा**-पु शिडका, छिड काव, शिंपडणें [हिं छिडकाव]

**शिडका**—वि (तंजा) चिडणारा; चिडका [प्रा सिड्ढ]

**शिडव**—पु एक जंगली झाड

**शिडशिड, शिडशीड, शिडशिडी**—क्रिवि १ हाहा म्हणतां येऊन, पडून (पावसानें) २ तिरसटपणानें, चिडीनें, (बोलणें, वागणें, हडहड, टिटफिट, हिडिसफिडिस करणें) [ध्व] **शिडशिडणें**-अक्रि शिडशिड पडणें (पावसानें), जोराची पण अल्पकालीन पावसाची सर येणें **शिडशिडी**-स्त्री (कों) पावसाची जोराची अल्पकालीन सर, थोडासाच पण जोरानें पडून जाणारा पाऊस

**शिडशिडा**—वि (व) १ थकलेला २ खिळखिळा

**शिडशिडीत**—वि (राजा) (प्र) सडसडीत १ सड पातळ, कृश, पातळ शरीराचा २ फडफडीत, मोकळा व रुक्ष (शिजलेला भात वगैरे) [सडा, सडसडीत]

**शिडा, शिडासाटा**—वि (राजा) सडा सडासाटा पहा

**शिडाईत**—न कलम, पैवंद **शिडाइती**-वि कलम लावून झालेलें, कलम केलेलें (आंबा, इ० झाड)

**शिडी-ढी**—स्त्री १ दोन चार उभ्या लाकडांना आडवीं ल्हान लाकडें जोडून उंच चढण्यासाठीं करतात तें साधन, पायऱ्या, निसण २ सोपान, जिना, दादर [स श्रेढी, देप्रा सिड्ढी, हिं सीढी]

**शिणक शिणीक**—स्त्री धमक, ठणका, तिडीक, कळ, वेदना (हात, पाय इ० अवयवातून निघणारी) (क्रि० उठणें, निघणें) **शिणकणें**-क्रि ठणकणें, ठणका लागणें, शिणकानीं व्यथित होणें

**शिणगार**—पु (प्र) शृंगार पहा [स शृंगार] **शिण गारणें-शिणारणें** क्रि (प्र) शृंगारणें पहा 'शिणगारात अठरा मण तूप जळाल' (व) नेसण्या सवरण्यात, दागिने घालण्यात बराच वेळ लागला म्हणजे सुनेला सासु म्हणते

**शिणणें**—अक्रि १ थकवा, क्षीण येणें, दमणें, थकणें; भागणें, श्रमणें. २ त्रास घेणें, श्रम करणें कष्टणें 'सर्वेस्वें शिणोनि एथें। अर्जवावीं संपत्तिजातें।' -ज्ञा ३ २०७ 'म्हणे परम कृपाळु रघुवीर। सजकारणें शिणतो।' **शिणत शिणत**-क्रिवि अतिशय काकुळतीनें 'शिणत शिणत पोटीं पाहिली वाट तूझी।' -राकरुणा **शिणवटा, शिणोटा**-पु अतिशय क्षीण थकवा, ग्लानि, भागवटा, अशक्तपणा (क्रि० येणें; होणें) **शिणारणें**-अक्रि क्षीण येणें [क्षीण]

**शिणशिणणें**—शिवशिवणें पहा

**शिणा**—पु छातीच्या हाडांना लपेटलेला मांसल भाग, छातीचें मांस

**शिणारणें**—उक्रि १ क्षीण, चीण, चीर भरणें, फटी बुज विणें. २ चिणणें, दरीत दगड वगैरे घालून पक्के करणें, खांब वगैरे जमीनींत चिपा घालून घट्ट बसविणें [चीण, क्षीण]

**शितडणें**—सक्रि (कों) शिंपडणें, सडा टाकणें -अक्रि. थेंब थेंब पडणें, उगीच भुरभुरणें (पावसानें) **शितडा**-पु शितोडा, सडा; उडालेला थेंब (क्रि० उडणें, उडवणें मारणें)

**शितम**—पु खाडींतील एक जातीचा ल्हान पांढरा मासा

**शितर-री**—स्त्री ल्हान खोपटें, छायेकरिता केलेलें छप्पर

**शितरणें**—उक्रि चितरणें पहा

शितरणें, शितरणें—क्रि छिनाविणें, फसवून नागविणें 'पाश तस्कर बाटपाडा। वेष दाऊनि शितरी मूढा।' –मुआदि २५.११. शितरू सितरू-वि फसविणारा 'शठ शुभ कातरु। लड तर्मुड सितरू।' –दा २ ३ २९

शितरपाड—वि चपळ, चलाख, तीक्ष्ण, हुषार, तडफदार शितरपाडी—स्त्री चपळता, चलाखपणा, हुषारी

शितरें—न (खा) बांबूचा तट्टा, पडदा (गाडींतील सामान बाहेर पडू नये म्हणून बाजूंना लावतात)

शितळ, शीतळ—वि शीतळ पहा १ थड, गार २ सौम्य, सुलभ, सोपा, खर नव्हे असा (उतार वगैरे) [स शीतल] ०चंद-पु मद्द, मट्ठ, रेंगाळणारा, सुस्त मनुष्य ०शिमगा-पु १ शिमगी पौर्णिमेच्या पुढील दिवस, धुळवडीचा दिवस, होळी थड करण्याचा दिवस २ शिमग्यामध्यें (वसन पचमीस) गाट्या, बसती रगाचीं आगडींटोपडीं मुलास यावयाचा सण शितळाई-स्त्री १ थडपणा, थडावा २ शितळता, थडाई [स शीतळ]

शितळचिनी—स्त्री एक झाड, कंकोळ

शितळपाटी—स्त्री शीतला झाडापासुन केलेली मऊ, गार चटई

शितळादेवी—स्त्री शीतलादेवी देवी रोगाची अधिष्ठात्री देवता [सं शीतलादेवी]

शितळान—स्त्री (ना) सुर्य उतरू लागणें, ऊन कमी होणें, शीतळाई [स शीतळ]

शिता—पु (कों) स्त्रियांचा केसाचा भाग, भागातील उभी रेघ [स सीता=नागराचे तास]

शितागोरी-चंवरी—स्त्री एक झाड [स सीता+गौरी]

शिताप, शितापी, शिताफ, फी—शिताब, शिताबी, सिताफी पहा

शिताफळ-ळी—स्त्री एक फळ झाड –न त्याचे फळ [स शीतफल]

शिताब—वि १ चपळ, चलाख, तडफदार २ उत्साही, हौशी, कळकळीचा [फा शिताब्]

शिताब-बी—स्त्री १ चलाखी, चपळाई, तडफ, हुशारी, कुशाग्रता सिताफी पहा

शितारणें—क्रि म शितरणें, चितरणें पहा

शितिकंठ—पु १ शकर शिव २ मोर [स]

शिती—स्त्री एकविटी भिंत, पडभिंत पडदी

शितें—न १ (विणकाम) शीत पहा २ बायकाच्या केसांतील भाग, रेघा शिता पहा

शितेचा कानवला—पु एका जंगली झाडाचें पान याचा आकार कानवल्याप्रमाणें असतो. [सीता+कानवला]

शितैन, शित्तैन—वि साठ, ६० सख्या [अर सित्तीन्]

शितोडा—पु १ पडलेला, उडालेला थेंब, पाण्याचा कण. (क्रि उडणें, उडविणें, मारणें) २ सिंचन, प्रोक्षण, शिडका ३ सेक, सडा [स सिच् हिं छींटा] ०टाकणें-उडविणें-(ल) थोडासा कलक लावणें, थोडासा दोष देणें, जाताजाता एखाद्याविषयीं लहानसें कुत्सित विधान करणें शितोडणें-सक्रि शिंपणें, शिंपडणें, सिंचन करणें –अक्रि थेंबथेंब पडणें (पावसानें)

शितोडा—पु (कों) कळकाची फादी, बांबूस बाजूला फुटलेलें शिरें, छडी

शित्ता—वि सहा, ६ सख्या [अर सित्त]

शिथकण, शिथवड—पु (कों) शीतकण पहा

शिथड—स्त्री (विणकाम) हातमागाचा एक भाग, शीत; ओंवीच्या बाहेर साधेच्या शेवटीं असणारीं आडवीं दोन लाकडें

शिथिल—वि १ सैल, ढिलें, मजबूत, बळकट नसलेलें २ नेभळट, मद, मट्ठ, निरुत्साही, निर्बल [स] ०गात्र-वि. निःशक्त व निर्बल अवयवाचा कमजोर अवयव असलेला (सामा) दुर्बल [स]

शिंद—स्त्री खजुरीच्या जातीचें एक जगली झाड [हिं सेंध]

शिंद-ध—स्त्री १ कुडाची भिंत, बांबूच्या चिपा, कारवी वगैरेची गिलावा केलेली भिंत (क्रि० भरणें, घालणें) २ असल्या प्रकारची भिंत रचण्याचें सामान [हिं स सध्]

शिदड, शिदीड—पु १ गाढ्ळ, काढ्ळ 'श्रावणमासा शिदड मातले शेषाघरीं नेऊ लग्न।' –पला ३.

शिंदणें—क्रि (कु कों.) शेंदणें, विहिरींतून पाणी वर काढणें (यांत्रिक साहाय्यानें किंवा नुसत्या हातानीं) [हिं सेंदना]

शिंदपास देणें—क्रि माडी काढण्यास नारळाचें झाड देणें 'माड शिंदपास दिला' –कृपि ७५८

शिदलाडू, शिरलाडू—पुअव (व) कणकेंत गूळ घालून त्याचे उकडून केलेले लाडू सिद्धलाडू पहा

शिंदळ—वि जारकर्मी, बाहेरख्याली, बदफैली, छिनाल, दुराचरणी, व्यभिचारी (स्त्री, पुरुष) [देशी प्रा छिण्णो, छिण्णाल, हिं छिनाल, स छिद्-छिन्न, क्षुण्ण?] ०की-स्त्री (विशेषत स्त्रियांना हा शब्द लावतात) जारकर्म, व्यभिचार, दुराचरण, छिनाली, बदफैली ०चार-चाळ-टेव-पुअव बदफैली कर्में, छिनाल नखरे, नटणें, मुरडणें, चट्टीपट्टी करणें इ० शिंदळकीच्या चेष्टा, दुराचार ०तीट-स्त्रीपु शिंदळ माणसानें कपाळावर लाव

केली तीट, विशिष्ट प्रकारची नखरेबाज तीट, टिळा. ०नखरा-पु शिंदळचार, व्यभिचारिणीचें नखरें, मुरडणें व हावभाव, बोलणें, चालणें इ० ०घडा-वाडा-पु आरकर्मी व व्यभिचारी लोकांच्या वस्तीची जागा, घर, गांव, (सामा) व्यभिचार बाहुल्याचें ठिकाण ०सोय-पुष्य (राजा) व्यभिचारिणी प्रमाणें दोघी वर्तन, लाडिकपणा, चेष्टा इ०. सोव पहा

शिंदळपान-नी—स्त्री एक झाड

शिंदा—पु एक खेळणें

शिंदा—पु अनौरस संततीची एक जात किंवा त्यांतील व्यक्ति २ लेकवळा, दासीपुत्र ०पोरगा-पु कडू, दासीपुत्र, दास्यत्व करणाऱ्या स्त्रीपासून झालेला मुलगा [शिंदळ]

शिंदाड—न कवळ, भातशेतीची जमीन भाजण्यासाठीं लागणाऱ्या तृणकाष्ठादिकांचा ढीग [शिंद+पाड]

शिंदी, शिद्दी—पु अबिसीनियांतील रहिवासी, हबशी, हबसाण देशाचा, सिद्दी

शिंदी-धी—पुस्त्री १ जंगली खजुरीचें झाड २ या झाडाचा मादक रस, शिंदीपासून तयार केलेली दारू 'सकपायान महार शिंदी पिऊन पडला।' -ऐपो ६८ शिंदोली-स्त्री (ना॰) शिंदीचें फळ शिंदो-पु (कों) नारळ पाडणारा

शिंदोड, शिदोड—पु गांडूळ, शिदड पहा शिदोडा सारखें फुगणें-(व) व्यर्थ रुसून बसणें

शिंदेशाई-ही—वि १ कापड, दागिने इत्यादिसंबंधीं विशिष्ट तऱ्हा, घडण असणारें 'शिंदशाई पागोटें, तोरड्या, तोडा इ०' २ शिंद्यांचें राज्य, दरबार इ०संबंधीं, शिंद्यांच्या अमलांतील -स्त्री शिंद्यांचें राज्य, अमल, सत्ता [शिंद+शाई]

शिदोरी, शिधोरी—स्त्री १ रान, शेत मार्ग इ० ठिकाणीं खाण्यासाठीं गाठोड्यांत बांधून घेतलेलें अन्न प्रवासांत बरोबर घेतलेले खाद्यपदार्थ, 'कथिली विदुरें सन्मति जाणों दिधली तया शिदोरी ती।' -मोसभा ७ ३८. २ चातुर्मासांत याचकांनीं ब्राह्मणांना दान दिलेला शिधा, अन्नपाणी. ३ पुण्य संपादण्यासाठीं परक्या मुलांना दिलेलें अन्नपाणी ४ गुराखी, मजूर शेतांत किंवा कामावर बांधून नेतात तें अन्न 'काखेसि वेतोनि शिदोरी। गोपाळां सहित श्रीहरि।' -कथा ४ ५ ३ [स सिद्ध +दोरी] म्ह॰ शिकविलेली बुद्धि आणि बांधलेली सिधोरी (सर्वदा पुरत नाहीं)

शिद्धाई—स्त्री सिद्धाई पहा

शिधा—पु १ स्वयंपाकासाठीं लागणारें सामान (तांदूळ, डाळ, पीठ तूप इ०) पाकसाहित्य २ (सामा) न शिजविलेले तांदूळ, धान्य इ० ३ एक दिवसाच्या भोजनास लागणारें सामान [स सिद्ध] ०पाणी-सामान-सामग्री-न स्त्री (व्यापकार्थी) अन्न तयार करण्यास आवश्यक असें सर्व सामान (धान्य, लाकडें, भांडींकुंडीं इ०)

शिंधी—स्त्री शिंदी पहा

शिधोट—वि (ग्रां) १ सरळ व लांब आकार (नदी, पर्वताची रांग इ०) २ (ल) प्रांजळ, प्रामाणिक 'गुणी राजाचे शब्द शिधार।' -ऐपो १०७ [हि सीधा]

शिनक, शिनीक—स्त्री चमक, कळ शिणक पहा (क्रि॰ निघणें, येणें, होणें मारणें, मारलें)

शिनगार, शिनगारणें—पु न १ शिणगार, शृंगार पहा. २ (व) एकदाणी, गळसरी [स शृंगार]

शिनसाल-ळ—स्त्री जुनी साल 'भवंरीची पदळें। वोम पती शिनसाळें।' -ज्ञा ११ ५६० [स शीर्ण+छाल]

शिनळ, शिनल शिनळको, शिनळची, शिनळचार, शिनळचाळे, शिनळटेच, शिनळतीट, शिनळ नखरा, शिनळघडा-वाडा, शिनळपान, शिनळसोव, शिंदळ इ० पहा 'हो का शहाणी शिनळी नारी।' -एभा १२ १३३, 'त्याचा तो नित्य शिनळपणा पवित्र मानून रणभूमीवर रडण मुलांचे व मुलींचे पुत्र आम्ही त्याच प्रयोग करून दाखवावे?' -भागर ३ १७

शिना—वि निराळा, 'आत्मा देहाहून शिना।' -ज्ञा [स शीर्ण]

शिनाजोरी—स्त्री धैर्य, सामर्थ्य, धाडस, ताकत [फा. सीना-ज़ोरी]

शिनारणें—अकि (व) क्षीण होणें, शिणारणें

शिनारणें—उकि (व) शिणारण पहा (खाव इ०) टोकून पक्का करणें

शिनीसाफ—वि (व) निर्दोष, निष्कलंक

शिनुदलें—न शिपतर -शर

शिनें—म शानें पहा

शिनेल—न (कु) चिरा

शिंप-पी—स्त्री १ जलचर प्राण्याच्या अस्थीचें सुपलीच्या आकृतीचें आवरण, याचीं दोन पुडें असतात, त्यांपैकीं प्रत्येक शुक्ति २ पोकळ काठी नळी इ० चा तासतांना होणारा वरील सारखा आकार (लेखणी, अल्गूज, पावा वगैरेच्या टोंकास करतात त्या सारखा) (क्रि॰ मारणें, तोडणें, घेणें, पाडणें) ३ शिंपच्या आकाराची छातीची खळगी इ० [स शुक्ति, प्रा सिप्पि हिं सीप] ०मारणें-उतरणें-तिरकस काप छेद घेणें शिंपेला पाट लागेस्तूर खाणारा-वि अत्यंत अधाशी इसम शिंपला शिपला शिंपुला-पु १ मोठी शिंप, ज्यांच्या मध्यें मोत्यें उत्पन्न होतात, पाठीवर रेषा असणारी शिंप

२ शिंपेच्या आकाराची लाकडात घेतलेली खाच ( क्रि० (वर) पाडणें, घेणें, मारणें ) ३ उगाळलेलें गंध ठेवण्याकरिता शिंपेच्या आकाराची धातुची तबकडी, पात्र -वि वतरता, उतरट, ढाळता शिपली, शिंपली-स्त्री १ लहान शिंप २ सुपली शिंपा-पु मोठी शिंप, कालव शिपोटी-स्त्री (व) पोटाचा वरचा शिंपेसारखा भाग, शिंपा

शिपका, शिबका—पु १ हपका, तडाखा, हबका, पाण्याचा पातळ पदार्थाचा जोरानें मारा ( क्रि० मारणें, टाकणें देणें ) २ शिंपणी, सडा ( बागेतील झाडावर, धुराळी रस्त्यावर पाण्याचा ) [स सिच्]

शिपट, शिंपट, शिपटी, शिंपटी, शिपटें, शिंपटें, शिपूट-शिंपूट—न (वों) १ पोफळाचा तुरा, लेंगर २ पोफळाचा घड

शिपटी—स्त्री (वों) फोकाटी, शिरटी, फोक, छडी, बारीक काठी 'हातीं घेवोनिया शिपटी। माता लागली पाठी पाठीं।' -कथा ४ ३१०० 'मारू जाता शिपटी। भेणें पळतो जगजेठी।' -ह ७ २४६ शिपटणें-क्रि छडीनें, काटीनें, फोकाटीनें मारणें

शिंपडणें—क्रि १ सिंचणें, शिंपणें, प्रोक्षणें, सेक, सिंचन करणें शिंपडणी-स्त्री शिंपण, सिंचन, सेक, सडा

शिंपण, शिंपणी—स्त्री सेक सिंचन, प्रोक्षण, सडा; शिंपणें ( क्रि० करणें, टाकणें, शिंपणें ) शिंपणें, शिपणें-क्रि १ सिंचणें, वर उडविणें, सडा टाकणें, प्रोक्षण करणें, सिंचन करून ओलें करणें, अभिषिक्त करणें 'इयें वद शिंपीजे।' -वसा ६० शि(-शिं)पणें-न १ रंगपंचमीस किंवा शिमग्याच्या समासीस अंगावर रंग उडवितात तें, रंग उडविण्याचा खेळ २ रंगपंचमी 'शिंपण्या दिवशीं हल्ला नेमिली कुंप झाले तयार।' -ऐपो ३५२ ३ (वों) दाडयातून पाणी वाहून नेऊन तें झाडास देण्याची रीत शिंपणपंचमी-शिंपणेंपंचमी-स्त्री रंगपंचमी शिंपणीचा ऊस-पु पाटाच्या पाण्यावर होणारा ऊस याच्या उलट-पुरणीचा ऊस

शिपतर शिंपतर—न कळकाच्या चिपटाची केलेली पसरट परडी, उथळ टोपली ( लग्नात साहित्य ठेवण्यासाठीं किंवा गुऱ्हाळघरात रस गाळण्यासाठीं वापरतात )

शिपर—स्त्री ढाल [फा सिपर्]

शिपा—पु मोठया माशाचें तेल

शिंपा—पु नारळाच्या पोगींतून बाहेर येणारा अवयव, कणीस, शिंपट

शिपाई—पु १ सैन्यातील सैनिक, योद्धा २ पट्टेवाला, चपराशी, हरकारा, जासूद, चाकर ३ (ल) वाद, तंटा, भडचणीचे प्रसंग इ० वेळीं धीटपणें पुढें होऊन तोंड देणारा माणूस [फा सिपाही] ०की-स्त्री शिपाईगिरी, शिपायाचें काम ०गडी-पु १ शूर शिपाई, मर्द २ (सामा) शिपाई ०गिरी-स्त्री १ शिपाइकी, शिपायाचा धंदा 'केवळ शिपाईगिरीच करीत नाहीं, हिक्मतीनेंच लढाई करू' -ऐटि २ २७ २ (ल) क्षात्रधर्म; शौर्य, मर्दुमकी 'शिपाईगिरीची व मनुष्यबाजपणाची शर्त करून यशास पात्र व्हावें ऐसेंच आहा' -पया ३३३१ -वि शिपायासंबधीं, लष्करी, सैनिकासंबधीं, [फा सिपाह्‌गरी] ०खोर-पु एक मुलींचा खेळ -मखेपु ३०९. ०प्यादा-राणा-पु (०प्यापवार्थी सिपाई, चपराशी, ) सैनिक, जासूद ०बाणा-पु १ लष्करी धंदा, ०व्यवसाय, लष्करी पेशा, २ लष्करी गणवेष, पोशाख ०शाई-स्त्री लढवय्यांचें मंडळ, शूर लोक 'अपाजि बळवंतराव शिपाईशाईमध्यें एक दाणा।' -ऐपो ४३९ शिपाय-यी-शिपाई पहा शिपायडा-डें-पु न शिपायास निंदेनें म्हणतात शिपुरडा-पु शिपायडा पहा

शिपाई—पु पालखी, डोली, इ०ची दांडी, गाडी, दिवटी इ०कास आधारभूत कैचीसारखी उभी करण्याची लाकडी घोडी, ( फुलीप्रमाणें दोन लाकडें एकत्र बांधून करतात )

शिपाई—पु एक पक्षी

शिपार, शिफार—स्त्री १ गलबतास खालून पाण्याचा उपद्रव होऊ नये म्हणून केलेला डांबर, रोगण इत्यादीचा लेप. २ सदर लुकण, लेप लावावयाची क्रिया ( क्रि० करणें )

शिपारशी, शिपारस—प्र शिफारशी, शिफारस पहा

शिपिला—वि पोटाखालीं पुढीलभागीं नगापाशीं भोंवरा असलेला ( घोडा )

शिपिस्ता—पु बाळआवा पहा -मुग्या १६८

शिपी शिंपी—स्त्री एक प्रकारचें गवत [स शिल्पिका, प्रा दे शिप्प]

शिंपी—पु एक जातीचा मासा, यास तिसऱ्या असही म्हणतात -मसाप ३ ३

शिंपी—पु एक पक्षी हा कुपणाच्या कडेनें हिंडून किडे खातो

शिंपी—स्त्री शिंप पहा

शिंपी—पु शिवणकाम करणारी एक जात आणि तींतील व्यक्ति, दर्जी [स षिव्=शिवणें तुल० स शिल्पिक, प्रा. शिप्पिम दे प्रा सिप्पी=सुई] शिंपुरडा-पु शिंप्यास निंदेनें म्हणतात

शिप्पा—पु (ना) सधान [हिं सिप्पा]

शिफर्टें—न (कु) सुपारीचा पट, शिपट पहा

शिफार—शिपार पहा

शिफारस—स्त्री १ (दुसऱ्याजवळ केलेली) तारीफ, प्रशंसा, गुणगौरव 'तेथवां पादशाहापाशीं बहुत शिफारस चंद्र रायाची जाहली कीं यदे मर्द आदमी आहेत आणि जोरावर' —ऐस्कुल २३ २ वशिला, तारीफपत्र, हिमाईत ३ प्रशंसा करण्यालायक कृत्य (उपरोधिक अर्थानें उपयोग) 'त्वां काय हात मोठी शिफारस केलीस' [फा सिफारिश्] ॰पत्र-न वशिला, काम होण्यासाठीं आणिलेली ओळख, भलावणपत्र 'थोरामोठयाची चुगली म्हणजे केव्हांही सही होणारें शिफारसपत्र आहे।' —रणदुंदुभी ९४ शिफारशी-वि आश्रय दिलेले, वशिल्याचें, हात दिलेलें, उचलून धरलेलें, हिमायती ॰तट्टू-पु स्वतःच्या गुणावरून नव्हे तर केवळ वशिल्यामुळें पुढें आलेला मनुष्य, वशिल्याचें तट्टू

शिफ्ला—वि नीच, हलकट [अर सिफ्ला]

शिरका—पु शिपका पहा

शिरंदी—स्त्री कागदाचें एक पान (विशेषत दौलताबादी) हाफशीट

शिवंदी—स्त्री अनियमित शिपाई; वसुलीच्या कामासाठीं, किल्ले, शहरें, परगणे इत्यादींच्या रक्षणाकरितां व बंदोबस्ता करिता ठेवलेली फौज हशमी, विशिष्ट कामासाठीं ठेवलेली फौज 'ठाणेयात शिवंदी आहेन' [फा]

शिवरा—शिमरा पहा

शिवरा—वि (कु) छीलपट कामी पुरुष ॰करणें—(बैगनें) गाईचें मत्मूत्र हुंगून विकारयुक्त होणें, तोंड वर करणें

शिवला—पु (चांभारी) खापराचें आडवें लांबट व मोठें कुंड

शिवाड—स्त्रीन गलबतातील एक प्रकार, मोठा मचवा; हुबाल्यापेक्षा मोठी होडी

शिवाळी-ळें—स्त्रीन १ उकळत्या रसावरील मळी काढण्यासाठीं कवकाच्या दांडीला लावलेला शिपतरवजा झारा, गुऱ्हाळांत कढत रस गाळण्याची गाळणी २ (कु) आंबे वगैरे फळें झाडावरून उतरण्यासाठीं टोंकाला जाळीची टोपली बांधलेली लांब काठी, झेला [शिवें]

शिविका—स्त्री यानविशेष, पालखी [स]

शिविर—न १ रणांगणावर असतांना लष्करी तळावरील राजा, सेनापति इ०कांचे निरनिराळे गोट प्रत्यकी २ सैन्याची छावणी, तळ 'मग म्लेंच्छांचे दसोट। दागाणे दून कैवट। का शिबिरें चाहट। नगरींच त।' —ज्ञा १७२९४ ३ (सामा) तंबू ४ 'कॅंप' याचा प्रतिशब्द म्हणून योजतात [स]

शिवी—स्त्री १ एक वनस्पति २ शेंग [स शिंबा, शिंबी]

शिवुडलें—न (कों) टापलें, परडें, शिपतर पहा [शिवें]

शिवें—न जाळें, पोसाळें किंवा दोरका निवर झाला असतां, त्यांत होणारें ततुमय जाळें

शिवें—न १ एक सौम्य कुष्ठरोग, त्वचारोग २ याचे डाग, ठिपके इ०.

शिवें—न १ मध्यें सोलपट असणारें वेळणी, समराळें इ० भांडें २ चाळणी, रोवळी ३ शिवाळें, शिवाळी ४ (हर) भाताची पेज गाळण्याचा बांबूचा झारा

शिवेमांड—स्त्री (कु) भात वळतेवर्णी मडक्याच्या तोंडावर धरावयाची शाकडी फळी

शिवोळी, शिवोळें—शिवाळी, शिवाळें पहा

शिवोळी—स्त्री (कु) लहान पाटी, शिपतर

शिमटणें—उक्रि (प्र) चिमटणें पहा

शिमगा—पु १ होळीचा सण, होळीचे दिवस २ फाल्गुन महिना ३ (ल) अश्लील, अचकटविचकट भाषण [स शृंगार] म्ह॰ शिमगा जाई आणि कवित्व राही-शिमग्याचे दिवसांत अचकटविचकट केलेलीं कवनें तदनंतर मुर्दा आठवणींत रहातात शिमग्याचा मंत्र-पु बोंब, शंख, पांचजन्य (क्रि॰ जपणें, म्हणणें, वाचणें) आहे (असेल) ते दिवस दिवाळी नाहीं (नसेल) ते दिवस शिमगा-मिळेल तेव्हां उधळपट्टीनें खर्च करणें व न मिळेल तेव्हां उपास करणें 'जो मनुष्य आहे ते दिवस दिवाळी नाहीं ते दिवस शिमगा या न्यायानें वागणारा आहे त्याच्या घरादारावरून नांगर फिरून त्याच्या हातांत त्वकरच नारळाची आई यण्याचा संभव आहे।' —निच शिमगा करणें-१ बोंबलणें, बोंब मारणें २ (ल) निंदा करणें, एखाद्याच्या नांवानें खडे फोडणें, शिव्या देणें. ॰सण-पु १ वधुपक्षानें वरास बोलावून शिमग्याचा सण साजरा करणें २ या सणांत विशेषत रंग पंचमीस दिलेला अहेर, बहुमान

शिमटी—स्त्री १ शिपटी, फोक, झाडाची फांदी, छडी २ एक लहान झाड

शिमरा—वि (कों) १ वसकट, विशोभित (नाक) २ अशा नाकाचा, नकटा (मनुष्य) 'नागवी माथा मोत्याची जाळी। शिमरी सुपाणी दाणा त्याली।' —एभा ३ ३९३ (गो) शिमरो, शिमुरा

शिमा—स्त्री मर्यादा; (प्र) सीमा पहा [स सीमा] शिमघडो-पु (कु) सीमेची हद्द शिमघड्या शिमशेजारा-पु (राजा) शींवशेजारी, शिववरचा शेजारी

शिमाल—पु उत्तर [ अर ]

शिया—पु एक मुसलमानी धर्मपंथ याच्या उलट सुनी

शियारी—स्त्री शहारे, कापरें. ' परी येतुलियाही वेगळा। जो केवळ आनंदैक कळा। तया अतरात्मयाही निश्चळा। शियारी आली।'–ज्ञा ११ ३६९ [ स सीत्कार किंवा सं शिशिर, गो शीं यडी+आरी ? ]

शियाळें—न ( गो ) कोंवळा नारळ, शहाळें

शिर—न १ डोकें, माथा, मस्तक, शीर्ष ' तीन शिरें, सहा हात। तया माझें दडवत।' २ झाडाचा माथा, शेंडा, टोंक ३ सैन्याची आघाडी, विनी ४ डोई, व्यक्ति, घोडयाची सख्या मोजताना वापरतात उदा० घोडा शिर चार=चार घोडे [ स शिरस्, फा सर ] म्ह० १ शिरसलामत तो पगडया पच वीस–जोंपर्यंत शरीरात प्राण आहे, तोंपर्यंत बाह्य शृंगार वाटेल तसा करता देईल (ल) मुळ कायम असलें म्हणजे बाकीच्या गोष्टी मिळतात २ शिर सुरी तुझ्या हातीं=तुझ्या हातीं माझा प्राण दिला आहे मारणें तारणें सर्व तुझ्या इच्छेवर ०हातावर घेणें–१ धाड साचें काम करावयास सिद्ध असणें, अत्यत शूर असणें २ जिवावर उदार होऊन एखादें कार्य करण्यास उद्युक्त होणें, जिवाकडे न पहाणें शिरावर जागें राहणें शिरावर-शिरीं असणें–एखाद्याच्या संरक्षणासाठीं, कल्याणासाठीं तत्पर असणें पाठ राखणें 'श्रीरामा तू स्वामी असती माझ्या शिरावरी जागा।'–मो केकाआर्या ' शिरीं आहे रामराज। औषधाचें कोण काज।' –रामदास शिरावर घेणें–( एखादें कार्य ) पत्करणें पेशवाईच्या रक्षणाची जोखीम आम्हीं आमच्या शिरावर घेतली आहे –अरतभा १७ शिरीं भार वहाणें–जबाबदारी पतकरणें, हमी घेणें–पतकर घेणें, सोसणें ' शिरीं भार वाहेन बोले पुराणीं।'–राम ३४ शिर.कंप-कंपन–पुन डोकें लटलट हालणें, थरकापणें ०कमल–ळ–न ( काव्य ) (कमलासारखें शिर ) शिर, डोकें [ शिर+कमल ] ०गीर–स्त्री कोंवडयाच्या डोक्यावरील तुरा ०गोम–वि कपाळावर गोमेच्या आकाराचे, केस असलेला (घोडा) –स्त्री घोडयाचें एक अशुभ चिन्ह [ शिर+गोम ] ०च्छेद–पु डोकें उडविणें, वध [ स शिरच्छेद ] ०टोप–पु १ कानटोपी, माकड टोपी घरात घाल ण्याची टोपी, टकोचें, टोपडें २ शिरस्त्राण ०ताज शिर्ताज–पु डोक्यावरचा एक दागिना, शिरोलकार मुकुट ' शिरीं शिरताज रे शिरीं शिरताज गातो भरून।'–ऐपो २३७ [फा शिर्ताज्] ०दीदे शिर्दीदे–क्रिवि डोक्यावर, मस्तकीं, डोकीवर [ फा सर इ दीदा ] ०पाव, शिर्पाव, शिरोपाव–पु १राजा किंवा सरदार यानीं कृपा यत होऊन दिलेलें पागोटें, वस्त्रें इ० बहुमानाचा पोशाख ' मान पान, टिळा विडा व सिरपाव '–वाडबाबा ३ ४ १५ ' जवाहीर सिरोपाव वगैरे जिन्साना पाठविला।'–जोरा ८ २ जमाबदीच कतवे होण्याच्या वेळचा देशपाडे इ० चा हक्क [ फा सरोफा ] शिरपीडा–स्त्री डोकेंदुखी. [ स ] ०पेंच, शिर्पेंच–पु पागोटयात खोंवण्याचा जडावाचा मोत्याचा तुरा, एक अलकार [ फा सर्पेच ] ०फोडया–वि भिक्षा मिळण्यासाठीं डोक्यावर हाणून घेणारा डोकें फोडून घेणारा ( भिकारी ), भिकाऱ्याची एक जात व तींतील व्यक्ति ०बंद, शिर्बन्द, शिर्बस्ता–पु पागोटें, पगडी [ फा सर्बन्द् ] ०भारी–स्त्री डोक्यावर वाहून न्याव याजोगें ओझें [ शिर+भार ] शिरयाळें, शिरियाळें–न डोक्याचा आधार, डोक्याची बैठक ' उभऊनि करतळें। पडिघाये कपोळें। पायाचे शिरियाळे। माइ लागे।'–ज्ञा १४ १८५ [शिरस्+आल्य, म शिर+आळें] ०वपन–न हजामत, विशषतं विधवा बायकाचे केस काढणें, विकेश करणें 'कैकयीचें शिर वपन करून। छत्र धरोत कोण्हीतरी।' शिरसा–क्रिवि १ डोक्यानें २ शिर वाकवून, नम्रपणानें, आदरयुक्त, आज्ञावरहुकुम ' तुम्ही आमचे वडील, त्यापेक्षा तुम्ही साागल तें आम्हास शिरसा मान्य आहे ' शिरसावंद्य-धार्य-मान्य–वि अतिशय पूज्य, आदरणीय, माननीय [ स ] ०साष्टांग नमस्कार–दंडवत–पु ( डोक्यासहित आठ गात्रें जमिनीवर टेकून) अत्यत नम्रतापूर्वक प्रणाम ( वडील माणसें, थोर किंवा श्रेष्ठ व्यक्ति यास लिहावयाचा पत्रातील मायना) [शिरस्+अष्ट+अग+नमस्कार, दड वत ]०स्त्राण–न डोक्याचें रक्षण, आच्छादन करणारें टोपी,पागोटें इ० टोप,जिरेटोप [स ] ०स्नात–वि डोक्यावरून स्नान केलेला. ०स्नान–न डोक्यावरून केलेली आघोळ सबध स्नान शिरा तोरा-असणें–एखाद्याचा वरचढ असणें,–चा अधिकारी असणें ' गणितात तो माझा शिरातोरा आहे ' ०लावणें–दाखविणें–मिरविणें–शेखी मिरविणें, वरचढपणा गाजविणें ' खडयाला पाटिल्की मिळाल्यापासून तो भारी शिरातोरा दाखवू लागला आहे ' शिरी–स्त्री डोक्यावरील नक्षीचें, शोभिवत कापड (हत्ती, घोडा इत्यादींच्या) शिरीं–क्रिवि डोक्यावर, ऐनवेळीं उदा० लग्नाच्या शिरीं, प्रसगाच्या शिरीं, कामाच्या शिरीं ०असणें–अग्रभागीं असणें, सभाळणारा होणें ' शिरीं असता पडरिनाथ। चिंता किमपि न करावी।' शिरोग्रह–पु डोकें धरणें, शिरोवेदना होणें ( रोग विकृति इ० नें ) डोकें धरणारा, डोक्यावर परिणाम करणारा ( रोग इ० ) [ स ] शिरोबस्ती–पु डोकेंदुखी बद करण्याचा एक उपाय शिरोबिंदु–पु ( भूमिति ) अक्षाऱ्या समोरचें टोक, कोण बिंदु –महमा १२,२० शिरोभाग–पु १ मानेपासून वरचा भाग, डोक्याचा भाग २ ( एखाद्या समाजाचा, सघाचा ) नायक, गुणात योग्यतेनें उत्तम शिरोभूषण–न डोक्याला शोभा देणारी वस्तु अलकार, इ० मुकुट पागोटें, टोपी शिरोमणी–पु १ डोक्यावरील दागिना, मुकुटमणि २

मुख्य, श्रेष्ठ इसम, प्रमुख नायक उदा० पंडित शिरोमणि, मूर्ख शिरोमणि, सोदाशिरोमणि इ० 'बाप बळिया शिरोमणी। वतावेल दा वचनीं। -तुगा १६४ [सं] शिरोरोग-पु डोक्यांतील विघाड, रोग त्याचे प्रकार-वातिक, पैत्तिक, श्लेष्मिक, सन्निपातिक, रक्तक्षयज, कृमिज शिरोलेख-पु. (वृत्त) मथळा, मायना, शीर्षक, लेखारंभीं लिहिलेलें वाक्य (इ) हेडिंग 'शिरोलेखात लिहिल्याप्रमाणें अद्याप ८।१० दिवसांचा अवकाश आहे -टि २७२ शिरोवेदना-स्त्री डोकेदुखी, शिरपीडा 'मोठी शिरोवेदना होत आहे' -कम ४ शिरोवेष्टन-न. कोणतेंहि डोक्याला गुंडाळावयाचें वस्त्र, (रुमाल, पागोटें वगैरे) [स]

शिर—स्त्री (कु) फांस, पेंच

शिर—उद्गा शुकशुक, मांजरास हाकून लावण्यासाठीं करावयाचा आवाज [ध्व]

शिरकणें—कि (राजा) लोकर किंवा कापूस साफ करणें, निवडणें, कचरा व सरक्या काढून स्वच्छ करणें [शिरकी]

शिरकी-स्त्री (राजा) (प्र) सरकी पहा

शिरकणें—अकि १ घुसणें, शिरणें, प्रवेश करणें (विरोध, अडथळा इ० दूर करून) वाट करून घेणें 'त्या दाटीमध्यें माझें एक बोट शिरकलें म्हणजे मग वाट केली असती' २ हातीं लागणें, सांपडणें 'देव उठावले मुरारी। परी अमृत शिरकलें असुरकरीं।' -मुआदि ४ १२५ शिरकवणी, शिरकावणी-स्त्री (बळेंनें प्रयत्नानें आत) शिरकाव, प्रवेश, घुसणें, घुसडणी शिरकविणें, शिरकाविणें-उकि (शिरकणेंचें प्रयोजक रूप) घुसविणें, घुसडविणें, शिरविणें, प्रवेश करणें शिरकाव-पु रिघाव, प्रवेश, वाव

शिरकवा—पु (ना) १ पडसें २ पडशामुळें डोकें दुखणें

शिरका, शिर्का—पु आसव, अम्लासव [फा शिर्का]

शिरकाटणें—कि (व) प्रवीण होणें, गति होणें, प्रवेश होणें [शिरणें, शिरकणें]

शिरकाण—न १ शिरके आडनावाच्या लोकांचा प्रदेश, मुलुख -शार २ शिर्क्यांचें निर्मूलन सत्यानाश नायनाट, समूळ उच्छेद 'शिर्के जेथें असतील तितके मारावे ऐसी आज्ञा करून शिरकाण करविलें' -मराचिस २१ 'परंतु संभाजी महाराज यांणीं शिरकाण केलें त्या दहशतीनें' -मराचिथोरा ६९ [शिरके, किंवा स शीर्ष+खड]

शिरकी—स्त्री सरकी कापसातील बी

शिरकुटी—स्त्री शिंपटी, शिपटी पहा

शिरकें—न शिकाळीचा हातांत धरण्याचा भाग मूठ कडी

शिरखंड, शिरखंड—न (अप श्रीखंड) १ श्रीखंड पहा २ गंध, कपाळाला लावलेला चंदनी टिळा (क्रि० लावणें; वाटणें, उमटणें) 'आज तुम्ही शिरखंड लावून मोठें नटलांत।' [स श्रीखंड]

शिरगोळा—पु रामोळीचा दगड

शिरघोसाळी-ळें—स्त्री न दोडक्याचा वेल व फळ दोडकी, दोडका शिराळी-ळें पहा

शिरचश्मा, शिर्चश्मा—पु (डोकें व डोळा) लावण्यातील प्रियजनाविषयींची संज्ञा; प्रियजन, प्रियकर [फा सर्चश्मा शिर+चश्मा=डोळा]

शिरजोर शिर्जोर—वि १ हेकड, हेकेखोर तिरसट; हटी. टोंग २ सत्तेल, उमेद, बलवान ३ होईजड, वरचढ 'शिरजोर बायकोचा दीण जसा शांत दादला वाही।' 'शिरजोर बायकोचें शेण जसें साधु दादला वाही। घो वर्णितिचें जीवा सतही दवाती दाद लावा ही।' [फा सर्झोर] म्ह० 'चोर तो चोर वरच्यान्याहून शिरजोर'=स्वत मालक नसून मालकी हक्क गाजवू पहाणारा ०पणा, शिरजोरी-पुस्त्री १ हेकडपणा, हेकेखोरपणा, तिरसटपणा २ दांडगेपणा, वरचढपणा, वडखोरी

शिरट-टी—न १ (गों कों) बारीक छडी, फोक, शिरें, डाहळी, फांदी २ पोफळीचें शिपूट शिरटांचणें-कि (गो) छडी मारणें

शिरड-डें—स्त्री न (राजा कु) पाला झडलेल्या शिऱ्याचा समुदाय; काट्याकुट्यांचा भारा; झाडाची छाट शिरें पहा [शिरें]

शिरड—स्त्री चिरड, चीड चिरड पहा [चिरड] शिरडी—वि चिडखोर 'भीम विवेकी भला, न तो शिरडी।' -मोविराट १ १५७ ०खोर-प्र चिडखोर

शिरडी—स्त्री (राजा) फोकाटी, छडी, लहान सरळ फांदी शिपटी शिरडाविणें-कि (राजा) फोकाटीनें, छडीनें बडविणें, मारणें

शिरडी—स्त्री एक जातीचें तांदूळ

शिरडी—स्त्री चिरडी, लहान मुलींचें नेसावयाचें वस्त्र [स चीर]

शिरणी—स्त्री (ना) एक त्वचारोग

शिरणी—स्त्री खिरापत प्रसाद, शेरणी पहा शिरणीगार पु शेरणीगार हलवाई

शिरणें—अकि १ आत जाणें, शिरकणें प्रवेश करणें, घुसणें, जोरानें आंत जाणें; [स त्रि] शिरविणें-उकि घुसविणें, खुपसणें शिरकाव प्रवेश करविणें (वस्तु पदार्थ इ० चा) [शिरणें]

**शिरती**—स्त्री, (गो.) केळीचें कापलेलें पान; आगोतली. [सं. शिरस्]

**शिरद-दें**—न. एक माप; पावशेर; चिपटें.

**शिरदाली**—स्त्री. लगामाचा मुख्य भाग; सरदारी; मोहोरकी. [फा. सर्दवाल्]

**शिरदोख**—पु. बुरखा. 'कासे कासयला शिरदोख करिला।' –वसा १३१. [फा.]

**शिरप**—न. (कों.) पायास किंवा अंगास लागणारा धस; टोंच.

**शिरपुट-टी**—स्त्री. बारीक वाळलेली काटकी; शिपटी; बारीक डहाळी, छडी; फोक. [शिरें] **शिरपुटणें**–क्रि. काठीनें, छडीनें, फोकाटीनें बडविणें, मारणें. [शिरपुटी]

**शिरःफल**—पु. नारळाचें झाड व त्याचें फळ; नारळ. [सं.]

**शिरफारणें**—क्रि. (वे.) गर्वानें फुगणें, शेफारणें.

**शिरमिंदा-धा**—वि शर्मिधा; लज्जित; ओशाळा. शरमिंदा पहा.

**शिरयाणी**—शिराणी पहा.

**शिरवटमुरी**—स्त्री. एक प्रकारचा समुद्रांतील मासा.

**शिरवणी**—स्त्री, (कु.) खिरापत; शिरणी; शेरणी पहा. [फा. शीरणी]

**शिरवत**—न. (कों.) १ डोंगरमाथ्याची जमीन. २ या जमिनीवरील सारा.

**शिरवती**—न. (कु.) केळीचें वोंवळें पान, शेंडयाचें पान. शिरती पहा. [सं. शीर्षवर्नी]

**शिरवळ**—पु.स्त्री. शिरोळ, शिळवेळ पहा.

**शिरवा**—पु (कुरुड) वांबू उभा चिरून त्याच्या केलेल्या चार भागांपैकीं प्रत्येक भाग.

**शिरवा**—पु. (व) थोडाच वेळ पडलेला जोराचा पाऊस.

**शिरवाळ**—स्त्री. ऊन्ह पडलें असतां मध्येंच ढगाआड होण्याची सुर्याची स्थिति. 'उन्हाळयांत बहुधा शिरवाळ नसतेच.' [सं. शिशिर+वेला]

**शिरवाळ्या**—स्त्रीभव. (कु.) एक पक्वान्न. शेवयासारखा खाद्यपदार्थविशेष. [?+वलय]

**शिरशिरी**—स्त्रीन. थरथरणें; हुडहुडी; हींव; कांपरें **शिरशिरणें**–क्रि. थंडीनें कुडकुडणें, थरथर कांपणें; शिरशिरी येणें.

**शिरशिरी**—क्रिवि. शिडशीड-डी पहा.

**शिरशिला**—पु. वहिवाट. सिलसिला पहा. 'हा ठराव या सरकारनें मागों राज्यांतील शिरशिल्यावरून केला असावा.' –दनाम ८४. [फा.]

**शिरशी**—स्त्री. दांदोळी; सिरसासारखें एक जातीचें झाड. [सं. सरस]

**शिरस-सु**—पु एक प्रकारची मोहरी; अठरा उपधान्यां पैकीं एक धान्य. [सं. सर्षप] **शिरशेल-सेल**–न. सुरसुंचें तेल; शिरसाचें तेल. हें स्वयंपाकांत वापरतात व लोणच्यांत घालतात. [शिरस+तेल]

**शिरस**—पु (कु.) शिरीषवृक्ष. [सं. शिरीष]

**शिरस्ता**—पु. चाल; रीत; पद्धत; नियम; दंडक; वहिवाट. (समासांत) शाईशिरस्ता; सरकारशिरस्ता; जनशिरस्ता इ० [फा. सरिश्ता] **शिर(रि)स्तेदार**–पु. १ जिल्ह्याचा एक अधिकारी; मुलकी अधिकारी २ न्यायकचेरी, मामलत. कचेरी इ०तील मुख्य कारकून. **शिरस्तेवाईक**–क्रिवि. रूढ; शिरस्त्याचें; ठराविक पद्धतीप्रमाणें, नेहमींप्रमाणें.

**शिरळक**—स्त्री. बांबूची चोय (पत्रावळ लावावयासाठीं), शिलका. २ सल; धस. (क्रि० भरणें; जाणें; शिरणें). [सं. शलाका]

**शिरळक**—स्त्री. (विशेषतः अनेकवचनी प्रयोग) शिलका; चमका; शिणका. (क्रि० मारणें, भरून येणें; निघणें).

**शिरळक**—स्त्री. शीळ; शीट. (क्रि० वाजवणें; वाजणें). [ध्व.]

**शिरळा**—पु. एक मोठें झुडप.

**शिरळी समई**—स्त्री. (ओतकाम) जाड व फुगीर खांब असलेली समई.

**शिरा**—पु. सीमा, मर्यादा; कड; हद्द; गांवची हद्द. [सं. शिरस्; हिं. सिरा]

**शिरा**—स्त्री. नाडी; रक्तवाहिनी; नस; शीर पहा. [सं.] ०**ताणणें**–जोरानें, मोठयानें बोलणें; वाद करणें; रागानें बोलणें. ०**निघणें**–अशक्त होणें. ०**गत**–वि. शिरा, स्नायू यांमध्यें असलेला (रोग, दुःख इ०) **शिराळ**–वि. १ ज्याच्या शरीरावर किंवा बाह्यागावर शिरा उठून दिसतात असा (इसम, पदार्थ). मोठया व फार शिरा असलेले (शरीर). २ रेखांकित; पट्टेदार, शिरांकित. **शिरालपक्ष**–पु किडयांचा एक वर्ग. या किडयांच्या पंखास बारीक शिरा असतात. –प्राणिमो १०८.

**शिरा**—पु (तंजा.) उखळ.

**शिरा**—वि. उत्तम; उत्कृष्ट; सुरेख, डौलदार; चांगलें. 'शिरा दारू चांगली.' –पया २८५ 'दिवटे...शिरा असतील त्यांजकडून' –पया २८७. 'चेतर्हेद असतां काम शिरा जालें.' –ख ९४६७२. 'नऊ लाख सैन्य एकदिल घोडा शिरा।' –ऐपो १११. [अर.] ०**खजूर**–पु, एक जातीचा काळा खजूर.

**शिरा**—पु. १ रवा तुपांत भाजून व नंतर त्यांत गूळ किंवा साखर घालून केलेलें पक्वान्न; गोड सांजा. २ पाक; औषधी रांधा ३ अर्क; सत्त्व; काढा.

**शिराजणें**—अक्रि शोभणें, विराजणें 'नागवद झळके कटि तटी। मणि शिराजे।' –कथा १ ११ ११ [स सु+राज इ]

**शिराजी**—वि १ शिराजचें, शिराजसंबंधी (मद्य) २ एक प्रकारचें कबूतर [शिराज इराणातील शहरावरून]

**शिराटा शिराटे**—पु (कों) सिराचा, कान्क्याचा खराटा [शिरें] **शिराड**-न (कु) कटिरी फादी शिरड पहा [शिरें]

**शिराडा**—पु चुराडा 'यदुवर्शी केला कीर्तीचा शिराडा।' –गाला ४६

**शिराणी**—स्त्री (काव्य) १ अपूर्वत्व, दुर्मिळता, अलभ्यत्व थोर लाभ दुर्लभता 'तया ब्रह्मसुखाची शिराणी।'–विपू ५७ 'आज दुधाची शिराणी झाली' मोठया घरीं लेक यात्री, भेगायाची शिराणी करावी' २ आनंद सुख, समाधान, विशेष आवड कौतुक 'आणि पुत्रें मी सर्वगुणीं। जिणावी हे बापा शिराणी।' –ज्ञा १८ १६५२ ३ महत्त्व मातबरी, किंमत 'इतराची ठेविना शिराणी।'–ऐपो २१८ [स शिरस्]

**शिरामें**—न जनावराच्या तोंडाचें कातडें, टाळकें [शिर]

**शिरावण**—पु (कु) श्रावण महिना [स श्रावण]

**शिरावळ**—पुस्त्री शिरोळ आणि शिळावेळ पहा

**शिराळ**—न अभ्र-छाया दगाची काळोखी मळभ अभ्राच्छादन (क्रि० येणें पडणें, जाणें) [स शिशिर+वेला]

**शिराळदोडका**—पु ज्याच्यावर जाड रेषा असतात त्या जातीचा दोडका **शिराळी**-स्त्री १ शिराळदोडकीची वेल २ एक रानवेल **शिराळें**-न शिराळदोडका

**शिराळशेट**—पु एक विशेषनाम हा वाणी असून दुर्गादेवीच्या दुष्काळात अनेक लोकाचे प्राण वाचविल्याबद्दल यास साडेतीन घटका विजापुरास राज्य करण्याची संधि मिळाली व त्यात त्यानें अनेक देवस्थानास नेमणुका करून दिल्या अशी आख्यायिका आहे याचें स्मारक म्हणून याची श्रावण वद्य षष्ठीस प्रतिमा करून पुजा करतात २ (ल) रंगेल चैनी, कोणतीहि ददात नसणारा मनुष्य **शिराळशेट(टी)चें राज्य**-न क्षण भंगुर ऐश्वर्य, वैभव, अल्पकालीन पण वैभवयुक्त सत्ता, पाण्या वरचा बुडबुडा तुरतुर पहा

**शिरिशिरी**—स्त्री पावसाची भुरभुर, बारीक तुषारयुक्त पाऊस [ध्व]

**शिरिस्ता शिरिस्तेदार**—शिरस्ता, शिरस्तेदार पहा

**शिरी**—स्त्री हत्तीनें खागीर नीट रहावें म्हणून घालावयाचें दोहोंबाजूस खाली लावलेलें दुरचुस –पुसणी ऐरा २६१ [शीर]

**शिरी**—स्त्री (गो) शोभा, श्री [स श्री]

**शिरीं**—न (गा) माशाच्या काठयाचें केलेलें मासे धरण्याचें जाळें

**शिरीद शिरदें**—न एक माप पावशेर

**शिरीनगार**—पु हलवाई [फा]

**शिरीम**—न एक प्रकारचें कुष्ठ, कोड यात शरीरावर पांढरे डाग पडतात (क्रि० फुटणें, पसरणें)

**शिरीष**—पु एक फुलझाड, याचीं फुलें सुवासिक असतात [स]

**शिरीस**—पु शिरस, सरसु, मोहरीची एक जात

**शिरें**—न (कु) कटिरी फादी

**शिरें**—न झाडाची छाटलेली फादी, कुपण घालावयास मांडवावर घालावयास वगैरे तोडून आणतात तशी झाडाची डहाळी, काटयाची डहाळी प्रेतयात्रेहून परत यताना प्रेत परत येऊ नये म्हणून वाटेंत कटिरी शिरें टाकतात त्यावरून शिरें मारणें, तोंडावर शिरें बसो (तोंड काळें होवो) असे वाक्प्रचार रूढ आहेत

**शिरें**—न १ शाई करण्यासाठीं धान्य जाळून पाणी काढून केलेला कषाय, लाखेंचें उकळलेलें पाणी २ बाळंतिणीकरिता आहाळिव, मिरीं वगैरे घालून नारळाच्या दुधाचा केलेला काढा

**शिरें**—न (व) बाजू कड 'एका शिऱ्यानें आवे घे गधले घऊ नको' [शीर]

**शिरोती**—स्त्री (कु) आगोतली, कळीच्या पानाचा अग्र भाग [शीर]

**शिरोस**—पु पाढऱ्या चमकदार रंगाचा घोडा –अश्वप ३१

**शिरोळ**—पुस्त्री थंड वेळ शिळोपा शिरोळचा वेळ–समय–काळ–वखत शिरोळचा निघणें–जाणें–चालणें–येणें [सं शीतल+वेळा, शिशिर+वेला]

**शिरोळी**—वि शिरोळ नावाच्या गावासबधीं

**शिरोळी-ळें**—प्र शिराळी-ळें पहा

**शिर्पी**—पु (गो) डुकराची आतडी

**शिर्वा**—स्त्री (व) पावसाची सर

**शिल**—पु घोडयाचा एक रोग –अश्वप २ ३३०

**शिल**—न शेताची कापणी केल्यानंतर शेतामध्यें जीं कणसें सापडतात तीं 'शेत सवगूनि नेल्या जाण। त शेतीं प्राप्त कणसें का कण। त शिलवृत्ति संपूर्ण। ऐकलक्षण उछवृत्तीचें।'–एभा १७.४१५ [स]

**शिलक-ख**—स्त्री बत्ती, सरवती, फेर 'त्या वेळेस इकडून दोन शिलका म्हणजे फेरा एक क्षणात केल्या'–रा ३ १९१. 'तोफखान्याला शिलक दिली।' –ऐपो २१३ [अर शल्क]

**शिल्क(ग)णें**-अक्रि पेट घेणें, पेटणें आग लागणें चेतणें

**शिलका(गा)वणें-विणें**-सक्रि १ पेटविणें, आग लावणें, चेतविणें, बत्ती देणें २ (ल) चेतना देणें, उठावणी देणें, भडक विणें **शिलका(गा)वण-णी**-स्त्री १ पेटविण्याची, आग

लावण्याची क्रिया २ (ल ) सान्यासाठीं तगादा करावयास पाठविलेल्या मनुष्यानें स्वतःकरिता जवरीनें कांहीं रक्कम घेणें ३ अशा प्रकारें घेतलेली रक्कम ४ मुदतींत काम न केल्याबद्दल दररोज घ्यावयाचा दंड ५ वसूल केलेला पैसा जवळ ठेवल्याबद्दल, अफरातफर केल्याबद्दल घ्यावयाचा दंड **शिलगून देणें**-(व ) पेट विणें

**शिलक-शिलुक**—स्त्री बाकी, खर्च वजा जाता उरलेली रकम, अवशेष, शेष (द्रव्य, धान्य, पदार्थ वगैरे ) [अर सल्कू] **०झाडा**-पु हिशेब, जमाखर्च पुरा होऊन काढलेली बाकी (क्रि० काढणें, उतरणें) **०पत्र**-पु ज्या कागदावर जमाखर्च लिहून शिलक काढतात तो कागद, आढावा, हिशेबपत्रक जमाखर्चाचा तक्ता **०बाकी**-स्त्री हिशोब पुरा होऊन राहिलेली रकम **०साखळी**-स्त्री १ दररोज किंवा महिनेवार हिशेब पुरे करून काटीत आणलेली बाकीची परंपरा २ जमाखर्च तपासून काढलेला पडताळा, जमाखर्चाची तपासलेली तोंडमिळवणी, बिनचूकपणा, हिशेबाची खात्रीदीर मिळवणी (क्रि० मिळविणें, नेमवणें, मिळणें, जमणें) **शिलका**-वि शेलका, निवडक उत्तम, सुंदर, वचक **शिल्की**-वि १ राहिलेला, बाकी, उर्वरित. २ संप्रदायातील, जपून ठेवलेला, राखीव **०डागिने**-पुअव राखीव, उत्तम, उत्कृष्ट पदार्थ, वस्तु, वस्त्र-पात्र, अलंकार वगैरे

**शि(सि)लक**—स्त्री चोय, पत्रावळी लावण्याची कामटीची बारीक काडी 'सल सिलका आणि सराट।' -दा ३ ७ ४. [स शलाका] **शिलकुधा**-पु (व ) कुध्याच्या मधून मधून कुठे कुठे निघणाऱ्या शिल्का, अंकुर

**शिलक**—स्त्री चमक, उसण, लचक, कळ (क्रि० मारणें). **शिलका देणें**-छळणें, त्रासणें, गाजणें, हाल करणें

**शिलगण**—न सीमोल्लंघन, दसऱ्याच्या दिवशीं सीमेबाहेर जाण्याचा विधि [स सीमोल्लंघन] **म्ह०** शिलगणाचें सोनें पाहिजे त्यानें लुटावें

**शिल्तास**—क्रिवि तुडंब, एका तीरापासून दुसऱ्या तीरापर्यंत, तुडुंब पूर्णपणें भरून 'नदी शिलतास भरून चालली' 'शेत शिलतास पेरलें-पिकलें-आलें-गेलें-बुडालें-जळलें [शिल= कडा+तास=पात्र]

**शिलपट**—वि शिळपट नभळट, दुबळा नपुंसक अशक्त, नालायक [स शिलापट्ट]

**शिल(र)पुटी**—स्त्री हलकी बारीक वाळकी काटी, शिपटी, फोंक छडी [शिरं]

**शिल्वंत**—प्र चिल्वत पहा

**शिलशिला-ल्ला**—पु १ साखळी, सूत्र रांग ओळ 'लढाव-योरामिळून साठ शिलशिला आरमाराचा फिरता ठेविला' -पया ८७ २ संबंध, परंपरा, वहिवाट, ऋणानुबंध 'मोहय तजंग याजकडे वर्तमान कळविण्याचा शिलशिला जारी असावा' -ख ८ ४३५० [अर सिल्सिला]

**शिलशिलाटा**—पु ससेमिरा, छेडणें 'सर माल्कम हलेयाच्या सारखा ताठर मु सद्दी ०याच्या शिलशिलाटयाला कंटाळून असेंब्ली सोडून गेला.' -स्वभावचित्रें २४

**शिला**—स्त्री १ मोठा दगड, पाषाण, खडक 'जशी पद रेणें शिला परि अस न हे शापिली।' -कका ३६ २ पाटा, पदार्थ वाटावयाचा सपाट दगड ३ उंबरा, उंबरठा [स] **०कुसुम**-न दगडफूल, धोंडफूल **०जतु-जित**-पु एक औषधी पदार्थ (हा दगडांतून पाझरतो असें म्हणतात), (इं) बिटुमेन **०धातु**-स्त्री एक अल्युमिनियमयुक्त पांढरी माती, एक प्रकारचा खडा **०पट्ट**-पु पाटा **०पुत्र**-पु दगडी रूळ, चुन्याच्या घाणीचें चाक **०पुष्प**-न शिलाकुसुम पहा **०रस**-पु एक सुगंधी चिकट पदार्थ **०राशी**-पु मोठा दगड, पर्वत 'मोठे मोठे पर्वत मोडी फोडीहि जो शिलाराशी। निपुणा नरें ती केली सदेशहारिका दासी।' -विश्वप्रशंसा **०लेख**-पु दगडावर कोरलेलीं अक्षरें **शिलोच्चय**-पु पर्वत

**शिला**—पु चिल्खत, चिल्खताचा भाग [अर सिलाआ]

**शिलाई**—स्त्री शिवणावळ, कपडे शिवण्याची मजूरी [शिवणें]

**शिलाण**—न कापून, चिरून वगैरे तयार केलेली भाजी. [छिलणें]

**शिलाणें**—न स्वभाव, वर्तन, वृत्ति, शील [स शील]

**शिलावर्त**—पु घोड्याच्या गुढघ्यावरील भोंवरा [स]

**शिला**—स्त्री छिली, दरवाजाच्या दुहेरी चौकटीस जोडणारा खालचा दांडा (वरच्या दांडयास घोडा म्हणतात)

**शिली**—स्त्री पिली, भिंगुरटी, मुरकुट -भाए ९६८

**शिलाक शिलाकझाडा, शिलीकपत्र, शिलीकसाखळी**—शिलक इ० पहा

**शिलीमुख**—पु बाण 'निर्दय काम शिलीमुखविद्धहृदय राम पावला कंपा' -मोरामायण १ २९ [स]

**शिलेखाना**—पु शस्त्रागार शस्त्रास्त्रें, दारूगोळा ठेवण्याची जागा [अर सिलाहखाना]

**शिलेजोर**—पु शस्त्रसामर्थ्य, शस्त्राचें बळ 'दत्ताची शिन्दे यांणीं शिलेजोरानिशीं मारवाडी मागें सारोन गावांत घातले' -भाव १६ [स सिलाह्+जोर]

**शिलेटोप**—पु शिरस्त्राण जिरेटोप

**शिलेदार**—पु हत्यारी, पदरचें घोडें घेऊन सैन्यात चाकरी करणारा 'शिलेदाराचे पाया पडता पडता कपाळ झिजत चाललें' -पारसनीस ४१ [अर सिलाहदार] **शिलेदारी**-स्त्री

शिलेदाराचा ,धंदा, चाकरी -वि १ शिलेदारासबंधी २ (ल) गर्विष्ठ, ऐटबाज, नोकझोकाचा, उधळया, बेताल, अनिर्बंध, स्वैर वगैरे पुढें दिलेल्या शब्दांशीं जोडून योजतात. ढंग ढोंग, डौल, रीत, चाल, बाणा, कारभार, डोलणें, चालणें, गोष्ट आदर वगैरे ०ढंग-पु अवाढव्य, उधळया, बेसुमार खर्च, दिमाख, अतिशय उधळपट्टी, बेलाग ऐश्वर्यप्रदर्शन

**शिलेपाट**—पु आगगाडीच्या रुळाखालीं घालावयाचें लाकडी चौरस ओंडे [इ स्लीपर]

**शिलेपोस-स्त**—वि १ चिलखती हत्यारबंद, कवचयुक्त 'महागिरी शिलेपोस ' -बाइसमा १ ९ 'शिलेपोस पल्टणें लाविलीं पठाण जरीचे समले।' -प्रला ४७ २ (ल) तयार, सज्ज, मार्गे पाश नाहीं असा, सडा [अर सिलाह्+पोश]

**शिलेभाले**—पुअने चिल्खत व भाले, शस्त्रास्त्रें, सामान्यतः हत्यारेंपात्यारें वगैरे **शिलेभाल्यानिशीं, शिलाभाल्यानिशीं**-क्रिवि हत्यारापात्यारासह शस्त्रसामुग्रीसह, शस्त्रास्त्रयुक्त

**शिलेमान, शिलेमणी**—पु गोमेद शिव धातु

**शिलोंच्छवृत्ति**—स्त्री शेत कापून नेल्यानंतर जे धान्यादि कण राहतात ते वेंचून त्यावर निर्वाह करण्याची वृत्ति -वि अशा वृत्तीनें राहणारा (तपस्वी, मुनि) [स]

**शिलोत(त्त)रा-री शिलोत्री**—पुस्त्री १जमीनीच्या इजारदारानें खडकाराकडून घ्यावयाचा हक्क (सामान्यतः बिघ्यास एक मण) २ शिळोतरी पहा **शिलोतरीदार**-पु शिलोतरी हक्काचा मालक; शिलोतरा पाटिल शिलोत्तरा पाटील, शिलोत्तर-शिलोत्तरा पाटिलकी वगैरे या हक्कदारासच नांवें आहेत- शिलोत्तरा पहा कुलाब्याकडे मिठागराच्या मालकास शिलोत्री म्हणतात [स शिला+उत्तर]

**शिल्प**—न कोणतेंहि कलाकौशल्याचें, कुसरीचें यांत्रिक वगैरे काम, हुनर, कला, हस्तकौशल्य [स] ०**कर्म**-न यांत्रिक अथवा हस्तकौशल्याचें काम कारागिरी ०**कला**-स्त्री कलाकौशल्याच्यासबंधीं शास्त्र, ज्ञान यांत सामान्यतः वास्तुशिल्प, मूर्तिशिल्प हीं मोडतात-ज्ञाको श ६७ ०**कार शिल्पी**-पु कारागीर यंत्रशास्त्रज्ञ कलाभिज्ञ यंत्रकलाविशारद ०**विद्या**-स्त्री हस्तकौशल्य, गृहरचना, चित्रकला मूर्तिकर्म इत्यादींचें ज्ञान ०**शाला**-स्त्री कलाकौशल्याचे पदार्थ निर्माण करणारा कारखाना ०**शास्त्र**-न यंत्र, मूर्ति, चित्र वगैरेसबंधीं नियम दर्शविणारा ग्रंथ, नियम **शिल्पिक शिल्पी**-पु कारागीर.

**शिल्कल**-स्त्री (कैकाडी) एक फूट लांबीची, टोकाकडे निमुळती होत गेलेली पहार -गुजा ५३ [स शिला+ता कल्ल= दगड]

**शिल्ला**—पु (वे) भिंत बांधताना मध्यें घातलेला आडवा लांब दगड, मद, (इ) हेडर [स शिला]

**शिल्ली**—स्त्री (गो) एक प्रकारचा सरडा

**शिव**—पु एक खाडींतील मासा **शिवड्-डा**-पु (कु गो) एक मासा, मोठें सुगट

**शिव**—स्त्री सीमा, हद्द मर्यादा, कड [स सीमा] ०**धडा**-पु शेजारी, सीमेवरील, हद्दीपलीकडील मनुष्य [शिव+धडा] ०**धडी**-पु शेजारी **शिवधडे, शीमधडे, शींवधडे**-पुअव सीमेबाहेरचे शेजारच्या गावचे लोक -थोमा १७९ २१ ०**धार**-स्त्री (सांकेतिक) बारीक तुपाची धार [शिव+धार] ०**शेजारी**-पु सीमेपलीकडील, शेजारच्या गावचा मनुष्य ०**सोयरा**-पु शिवशेजारी **शिवाणीं उभा न करणें उभा न राहूं देणें**-दाराशीं उभा न करणें, आपल्या सीमेवरहि येऊं न देणें **शिवार-शिंवार**-नपु १ गावच्या सीमेच्या आंतील वस्तीखेरीज इतर जमीन, सर्व शेतजमीन २ (काहीं भागांत, विशेषत दक्षिण कोंकणात) झाडोझुडपें असलेली जमीन, बाग बगिचे, राई ३ कापून रचून ठेवलेलीं इमारतीचीं लाकडें ४ लाकडें आणावयाकरिता जंगलात केलेली खेप [स सीमागार] ०**पंडित**-पु खेडेगावातील माहितगार इसम, ग्रामपंडित, खेडेगांवातील लोक ज्याचा सल्लामसलत घेतात असा अर्धवट ज्ञान असणारा खेडवळ ब्राह्मण, अडाणी, रानवट मनुष्य ०**पाहणी**-स्त्री गावच्या जमीनीची मोजणी, तपासणी ०**हुरेपाक**-पु १ शेतातील हुरडा, ओंब्या वगैरे अन्न २ शेतांतील पदार्थांचें तयार केलेलें अन्न, जेवण **शिवारी**-पु (गो) शिवार ची देवता

**शिव**—पु १ त्रिमूर्तीतील एक देव, संहारकर्ती देवता, शंकर, महादेव, महेश्वर २ चैतन्य आत्मा, जीवापासून निराळें चित्तत्व ३ सत्तावीस योगापैकीं एकविसावा योग ४ मोक्ष ५ (द्विरुक्तीनें शिवशिव) तिरस्कार नापसति खेद उद्वेगवाचक उद्गार 'ऐकोनि कृष्ण शिव शिव ऐसें आर्धी म्हणोनि मग हासे।' -मोकर्ण ४६ २५ -न मंगल, कल्याण -वि मंगलकारक कल्याणदायक सुखदायक **शिवशिव करणें शिवाशिवा**-तिरस्कार, उद्वेग दाखविणें (क्रि० करणें म्हणणें) **शिवावरचा बेल उचलणें-काढणें-घेणें**-एक प्रकारचा शपथविधि, शपथ घेणें **शिवावरचा बेल चुकेल पण हें चुकणार नाहीं**-एखादी न टळणारी गोष्ट दर्शविण्यास योजतात ०**कळ**-स्त्री (कर) सचार अंगात येणें ०**कळा**-स्त्री (कर) राग ०**चतुर्दशी**-स्त्री माघवद्य चतुर्दशी, महाशिवरात्र ०**दिनी**-स्त्री एकादशी, शिवरात्र ०**दीक्षा**-स्त्री (चंद्रनें) अंगाला राख फासणें, रुद्राक्ष घालणें वगैरे शिवोपासनेचा व तपस्येचा अंगीकार करणें (क्रि० घेणें) ०**धातु**-पु गोमेद ०**नद**-पु एका नदीचें नांव **निर्माल्य**-न्यु

१ शिवदेवतेस वाहिलेलीं फुलें वगैरे. २ शिवस्व; स्वतः न वापरावयाची, ध्यावयाची, उपभोगावयाची दुसऱ्याची वस्तु. याचा शपथेसारखा प्रयोग होतो. ०पंचाक्षरी मंत्र-पु ॐ नमः शिवाय हा मंत्र. ०पदी-स्त्री. १ ज्यामध्यें कल्याणमय शब्द आहेत असें वाङ्मय. २ शंकराच्या स्तुतीपर पदें. ३ शिवाजी महाराजांवर रचलेलीं पदें. ०पुरी-स्त्री. १ वाराणशी; बनारस; काशी. ०भैरव-पु (राग) एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. पण अवरोहांत निषाद व गांधार हे कोमल देण्याचा प्रघात आहे. जाति संपूर्ण-संपूर्ण, वादी धैवत. संवादी ऋषभ. गानसमय प्रातःकाल ०मुहूर्त-पु सूर्योदयाबरोबरचा पहिला मुहूर्त, साडेतीन घटकांचा काल ०योग-पु सत्तावीस योगांपैकीं एकविसावा योग. ०रात्र-रात्रि-स्त्री. प्रत्येक महिन्याची वद्य चतुर्दशी. विशेषेंकरून माघ वद्य चतुर्दशी. ०रात्र वात-स्त्री. कापसाच्या सुताची १८७॥ फेरे अथवा ३७५ पदरांची वात. ही दर शिवरात्रीस लावतात. ०लग्न-न (शुभ मुहूर्त) दसरा. [सीमोल्लंघन अप.] ०लिंग-न. शंकराचें, महादेवाचें लिंग, पिंडी, प्रतिमा. ०शक्ति-स्त्री. पुरुषप्रकृति. 'तेवी शिवशक्ति विवंचना तुज मी सांगेन संपूर्ण।' -एभा २४. ६१. ०शरणार्थ-पु लिंगायत लोक नमस्कार शब्दाऐवजीं याचा उपयोग करितात. ०स्व-न. शिवास अर्पण केलेलें; ज्याचा अपहार करणें पातक होय असें द्रव्य वगैरे. शिवा-स्त्री. १ पार्वती. 'शिवा भवानी रुद्राणी। का न पावतीच कोणी।' -एरुस्व ५.७४. २ कोल्ही. शिवात्मा-पु परमात्मा; जीवाहूनयाहून निराळा जो आत्मा तो. शिवापुढचा-वि. १ नंदी, नंदीबैल, बैल. २ (ल) निर्बुद्ध; दगड; मठ्ठ. शिवामूठ-स्त्री. १ विवाह झाल्यापासून पांच वर्षेंपर्यंत श्रावणांतील दर सोमवारीं नववधूनें महादेवास अनुक्रमें तीळ, तांदुळ, सातु, मुगाची डाळ व गहूं यांची मूठ वहावयाची असते ती. २ शिवामूठ वहावयाचा विधि, व्रत. शिवालय-न. १ महादेवाचें मंदिर, देवालय. २ स्मशान.

शिवक—स्त्री. (व) टिलक; चोय (पत्रावळीची).

शिवका—पु (नंद) दागिना. 'त्यानें आपले शिवके मोडून खाले'.

शिवटणें—सक्रि. शेवटणें; दाभास, हत्यारास धार, टोंक काढणें. [शेवट]

शिवट-शेवते—पु मांग जातींतील एक पोटजात. -अस्पृ ४७.

शिवटी—स्त्री. (व.) चोय. (पत्रावळीची) -वडाप ५. २९७.

शिवण-णी, शिवन-नी—स्त्री. (कों.) एक इमारती लांकडाचें झाड.

शिवण—स्त्री. १ दोरा घालणें, दोरा व सुईनें जोडणें; टांके घालणें; जोड; सांधा, टूण. २ ढुंगणाच्यामधील शिवणीप्रमाणे रेषा. ३ शिवावयाचे, शिवलेले कपडे, कापड, जिन्नस; शिवणकाम. ४ घरावरील गवताची शाकारणी. [सं. सीवन] ०कर-पु शाकारणी करणारा; शाकारी. ०काम-न. शिंपीकाम; शिवण्याची क्रिया; शिवण्याचे कपडे वगैरे. शिवणावळ, शिवणावळ-स्त्री. शिवण्याची मजुरी, वेतन, मूल्य. शिवणी-स्त्री. सांधा; जोड. 'मग शिवणी जैसी उलटे। शुक्तिपल्लवाची।' -ज्ञा ६.२६६. शिवणें, शिंवणें-उक्रि. १ टांके मारणें; दोरा घालणें २ शाकारणें; गवताचें छप्पर करणें.

शिवणें—अक्रि स्पर्श करणें, स्पर्शणें, संसर्ग होणें; संबंध घडणें. 'तिला स्वशिशुवंचनें अधमता शिवे काय जी।' -केका १०६ [सं. स्पृश्] शिवावयाचें नसणें-स्त्री. अस्पर्श असणें शिवाशिव-स्त्री १ स्पृश्य व अस्पृश्य यांचा निकट येऊन झालेला गोंधळ; विटाळाची कालवाकालव; संपर्काचा प्रकार. २ अशौच वगैरेमुळें झालेला विटाळ. शिवूं नयेशी-स्त्री. अस्पर्श, रजस्वला स्त्री. शिवतण-अक्रि. शिवणें; स्पर्श करणें.

शिवनक—पु. भातांतील, साळींतील एक जात.

शिवर—स्त्री. (गो) भेग. शिवरांवचें-अक्रि. (गो.) बारीक भेगा पडणें.

शिवरडोली—स्त्री थावड; थावडे; अच्चूक; आळल. एक झाड. यावर कांहीं पानें हिरवीं व कांहीं पांढरी येतात.

शिवरस—पु भातावरील पातळ पेज किंवा शिजविलेल्या डाळीवरील पाणी. याचें कालवण करतात.

शिवरा—पु. (राजा.) शिंतोडा; पाणी शिंपडणें; पाण्याचा पातळ सेक [सं शिच्]

शिवराई—स्त्री शिवाजीनें पाडलेलें नाणें, पैसा. [शिवाजी]

शिवराभिवरा-भेवरा-यिवरा—पु मूठ सीना व भीमा या नद्यांच्या कांठची शेती. आता सामान्य शेती, पिकें, जमीन या अर्थी वापरतात. 'शिवराभिवरा पिकलीं=शेतें पिकलीं.' =धान्य पिकलें, पीक आलें।'

शिवरी—वि. कुरी; खवडा.

शिवरू—स्त्री. बंदुकीची दारू.

शिवर्धनी—वि. श्रीवर्धनी, श्रीवर्धन गांवचें.

शिवशाही—स्त्री. शिवाजीनें स्थापन केलेलें राज्य व घालून दिलेली राज्यपद्धति.

शिवशिव शिमगा-पु शीतळ शिमगा, धुळवडीचा दिवस

शिवशितळ—वि १ थंड ताजें, शुद्ध (हवा, पाणी वगैरे) २ सौम्य भडक नव्हे तें ३ भूतपिशाच्चादि बाध पासून सुरक्षित (रस्ता, भाग प्रदेश) ४ सौम्य सुलभ, सापें सुसाध्य, साह्य, खडतर नव्हे असें (दैवत, मूर्ति इ०) ५ भूतपिशाच्चादि पीडेपासून, दुरी टाकून, शांति वगैरे करून मुक्त केलेलें (धान्याची रास, वगैरे) ६ शांत थंड, कोमल (मन जीव वगैरे) [स शिव+शीतल]

शिवशिवणें—अक्रि शिरशिरी येणें, कापणें, फुरफुरणें झणझणणें, थंडीनें दुखणें (दांत कान, हात, पाय, शरीर वगैरे) [स सिमसिमाय्]

शिवसर—पु सिंह राशीस सुर्य असण्याचा काल, सिंहस्थ या कालात गाय व्याली असतां धन्यास अनिष्ट फल मिळतें [स सिंह+सरणें] शिवसरणें—अक्रि सिंहस्थामध्ये गाय विणें शिवसुरणें-शिवसूर-प्र शिवसरण शिवसर पहा

शिवळ—स्त्री १ जोखडाचे दोन भाग असल्यास त्यांस जोडणारी खुंटी, जोखडाची बैलाच्या मानेजवळची खुंटी, विरडी बांधावयाची खुंटी, शिऊळ २ बैलाच्या मानेचा जोखडाजवळील भाग शिवाळ-शियॊळ-शिरूळ-शिऊळ-शिवळ पहा

शिवळ—स्त्री शोळ, शीट कि वाजवणें, घालणें शिवळणें-अक्रि (कों) शिरशिरी येणें, शिवशिवणें, अंग थडथडणें कापणें, थंडीन शहारणें [ध्व]

शिवळट-ळाटी—स्त्री १ शिवळ २ बैलाचा जोखडा जवळील मानेचा भाग

शिवळवट—पु रव्याचा भिजवून केलेला उंडा, पदार्थ बनविण्यासाठीं कणकीचा केलेला लांबट गोळा

शिवळी—स्त्री एक झाड

शिवा—स्त्री पार्वती [स] ०लिखित—न पार्वतीनें लिहिलेलें फलज्योतिष, शुभाशुभ वळ

शिवा—स्त्री कोल्ही

शिवाई—स्त्री शिवराई पैसा

शिवाई-य—शअ १ शिवाय विना वाचून खरीज सोडून 'शिवाय पाटीलबावाचे परवानगी इकडून तिकडे कोणी जाऊं पहात नाहीं '—दिमरा १ ११९ २ हें असुन आणखी घरूनवर आणि वर ' इम्रज शिवाय तांफा ताहफ सव्वीस लक्ष रुपये दरसाल देत होते '—दिमरा १ १०८ ०जमा—स्त्री अवातर वसूल मिळकत शेतसाऱ्याशिवाय इतर खड, गुन्हेगारी, नजर वगैरे निरनिराळ्या बाबींच्या वसुली रकमा ०दोन्या-स्त्रीअव तबुच्या मधील खांबाच्या वरील भागाला बांधुन टोकावयाच्या दोन्या ०मिळकत-स्त्री अवांतर फायदा, प्राप्ति, किरकोळ, मुख्य बाब सोडून इतर होणारी प्राप्ति

शिवाजी—पु (हटकरी) १ काठी व परात यांस बांध लेला मोठा दोर २ शिवा एकत्र करून त्यांचे वेवट (पदर) एकात एक मिळवून जरूर असतील तितके फेर घेऊन दोन बाजू यांतील दोरीनें गुंडाळून केलेला दोर याचा उपयोग कपीस भट करून लोकृ वर उचलण्याकडे भगर खालीं सोडण्याकडे होतो ३ शिवाजी राजा

शिवारा-ऱ्या—स्त्रीअव भात झोडण्यासाठीं खळ्यात बाव रोवून घडवचीवजा केलेली माचण —कृषि २३९ —वदलापूर २९०

शिवी शिवीगाळ-ळी—स्त्री अपशब्द, दुर्भाषण, अभद्र वाक्य [स शप्ª का मीवरिशु] शिवरा-शिवराळ-वि शिव्या देणारा, अपशब्द बोलणारा 'परि नव्हेत हे शिवरे।' —मोउद्योग ११ ६१ शिवेरा-शिव्येरा-वि शिवरा

शिव्या—पु (गो) भात ठेवण्याचें रुंद तोंडाचें लाकडी पात्र

शिशपा—स्त्री १ सीताफळीचें झाड २ अशोकाचें झाड शिशपाचोध-न शिशपा झाडाविषयीं विचार, रावणानें सीतस शिशपा झाडाखालींच कां ठेवली या प्रश्नाविषयीं विनाकारण काथ्याकूट

शिशिर, शिशिरऋतु, शिशिरर्तु—पु सहावा ऋतु, मकर व कुंभ हे सौरमास किंवा माघ, फाल्गुन हे चांद्रमास याचा काल [सं]

शिशी—स्त्री लहान कुपी, बाटली [फा]

शिशु—स्त्री शिसवी, शिसव नावाचें झाड

शिशु—पु १ बालक, लहान मूल, लेंकरूं 'रडे शिशु तयास घे कवळोनि माता कडे'—केका १२१ २ प्राण्याचा लहान बच्चा पिलूं 'असो मत्स्यशिशुनें उगवून। आणून ठेविला पूर्वे स्थळीं।' [स] ०वर्ग-पु १ बालवर्ग तुकडी, शिशुवर्ग २ लहान मुलें बालक वगैरे शिश्नी-स्त्री मनुष्याचें अथवा प्राण्याचें स्त्रीजातीय बालक, पिलूं

शिश्न—न पुरुषाचें गुह्येंद्रिय [स] शिश्नोदरपरायण-वि केवळ पोट भरणें व विषयसुख यातच आनंद मानणारा याकडेच लक्ष देणारा [शिश्न+उदर+परायण]

शिष्ट—वि (शब्दश) शिस्तीचा, व्यवस्थित, नियमित, ऋजुमार्गी, नियमाप्रमाणे चालणारा, शिक्षित (रूढ) विद्वान् सभ्य संभावित २ उत्कृष्ट, वरिष्ठ, श्रेष्ठ, आदरणीय पूज्य ३ उर्वरित राहिलेला, बाकीचा शेष उदा० यज्ञशिष्ट, हुतशिष्ट 'हें शिष्ट मदन म्हणे धर्मात्मा भाविते सुकेल कसें।'

–मोसभा ४५२ [ स शिष् ] म्ह० शिष्टागमन अनध्याय संभावित पूज्य लोक आले असता आपला व्यवसाय बंद बाजूला ठेवावा ०मंडळ–न प्रेषित किंवा प्रतिनिधीमंडळ विनंति करण्याकरिता, भेट घेण्याकरिता, शिष्टाई करण्याकरिता पाठविलेली मंडळी ( इं ) डेप्यूटेशन ०संप्रदाय पु संभावित, श्रेष्ठ, पूज्य लोकाची रीत, मार्ग, पद्धति वागणूक, चाल ०सभा–स्त्री श्रेष्ठ वडया, सन्मान्य लोकाची सभा, मंडळ, समाज ०संभावना–स्त्री १ शिष्ट लोकाचें आदरपूर्वक स्वागत, वागवणूक, सत्कार ( विवाह, यज्ञादि प्रसंगीं आहेर, देणगी दान वगैरे देणें ) २ अहेर, देणगी (अशा प्रसंगीं दिलेली) शिष्टाइकी–शिष्टाई–शिष्टायकी स्त्री १ श्रेष्ठपणा, मोठेपणा, मान पूज्यता, आदरणीयता २ नियमितपणा, व्यवस्थितपणा शिस्त, चोख पणा ३ संभावितपणाची मध्यस्थी, विवाहादि व्यवहारात जुळवून आणण्याकरिता केलेली मध्यस्थी, सांगितलेल्या सम जुतीच्या गोष्टी वगैरे; दोन पक्षात ऐक्य घडवन आणण्याकरिता केलेली मध्यस्थी, वो परपर कथन वगैरे शिष्टागम, शिष्टाचार–पु १ परपरागत आलेली सभ्यपणाची, संभावीत रीत, पद्धति चाल 'शिष्टागम विधानें। विविध याग वितानें।'–ज्ञा १५ १८९ २ विवाहादि प्रसंगीं यजमानास केलेला अहेर देणगी वगैरे ३ शास्त्रात प्रत्यक्ष न सांगितलले परंतु रूढ आचार; नियम, रीत पद्धति शिष्टाचार करणें–लोकव्यवहारास अनुसरून बाहेर दिसू नये म्हणून केवळ एखादी गोष्ट वरवर करणें शिष्ट वर्णें–अक्रि श्रेष्ठत्वास चढणें, मान्यता पावणें, योग्यता नमता स्वत स मोठें समजणें, उगाच मोठेपणा अंगीं आणणें

शिष्य—पु ( शिष्या ) १ विद्यार्थी, चेला शागीर्द अनुयायी, पट्टशिष्य २ उमेदवार, विद्यार्जनाकरिता सेवा करून राहिलेला मनुष्य [ स ] ०परंपरा–स्त्री एका मागोमाग झालेल्या शिष्याची मालिका, छात्रगणाची, विद्यार्थ्यांची अनुक्रमानें रांग, ओळ, माळ ०प्रशिष्य–पुअव शिष्य व त्याचे शिष्य, शिष्याची मोठी मालिका, शिष्यगण ०वृत्ति स्त्री १ विद्यार्थि दशा २ विद्यार्थिदशेंत मिळणारें वेतन, द्रव्य विद्यावेतन इं स्कॉलरशिप ०शाखा–स्त्री एखाद्या गुरूचा अनुयायी वर्ग; शिष्यसमुदाय, पथातील लोक, अनुचर ०संप्रदाय–पु शिष्यवर्ग, मंडळ, समुदाय, पंथ अनुयायी वर्ग; शिष्यशाखा शिष्यसंप्रदायी शिष्यवर्गापैकीं (मनुष्य) शिष्यानुशिष्य–पुअव शिष्य व त्याचे शिष्य वगैरे, शिष्यपरपरा, शिष्याची मालिका 'तो काय विद्वान! त्याचे शिष्यानुशिष्य किती होऊन गले ' शिष्यानुशिष्यपरपरा–स्त्री एकामागून एक झालेले शिष्य व त्याचे शिष्य याचा अनुक्रम, मालिका

शिस—न डोकें शिर. 'भर्वेखाइ अर्धशिसी । पाच पाट काढिले शिसीं।'–एरुस्व १२ १४९ [ स शीर्ष ] ०फूल–न. स्त्रियांचें शिरोभूषण, डोक्यातील दागिना शिसळ–न केसाच्या लोंबत असलेल्या बटा जटा, पाठीवर असताव्यस्त मोकळे सुटलेले केंस शिसार शिसाळ–स्त्री मस्तकरोग, अर्धशिशी, डोकेदुखी 'शिसाराचें रागें लावग। शिसचि जैसें।'–ज्ञा १८ १७९ सोहि, सिस शिसाळ न डोक

शिसकारी—स्त्री १ पोटातील मळमळ, कळमळण २ (ल) शिसारी, वीट तिरस्कार, कटाळा

शिसनेकड—न (गो) रहाट व जूला तोलू नये म्हणून रहाटाच्या गाड्याला ज्या दोन काठ्या बाधतात त्यापैकीं प्रत्येक.

शिसली—स्त्री शिशी, लहान कुपी, बाटली [ फा ]

शिसव शिसव शिसवी—पु पु स्त्री एका काळ्या कठिण लाकडाचें झाड याचें सामान व कोरींव काम उत्तम होतें शि(शिं)सवी–वि शिसवाच्या लाकडाचें केलेलें शि(शिं)सवेल–न शिसवाच्या लाकडापासुन काढलेलें तेल

शिसा—पु ओळबा –सोहि मद्दतु

शिसा—पु शिसव, शिसवीचें झाड

शिसा—पु १ मोठी बाटली, कुपी, काचेचें माठें उभट भांडें 'गुलाबशिसे उत्तमसे तीनचार पाठविलेत तर बरें होतें' २ ( शिसा ) मचाचें मोहोळ ( आकारावरून ) [ फा शीशा ]

शिसारी–टी, शिसाटी–री—स्त्री १ तिटकारा, वीट, कटाळा, २ दुर्गंधीमुळें येणारी मळमळ, ओकारी ( क्रि० येणें, वसणें ) [ शिस ]

शिसाबासा–भासा, शिसायासा–भास—पु १ फूटतूट, नफानुकसान, अपघात, दुखणें, भूतपिशाच्चादि बाधा, मोडतोड 'भूतवैद्य केल्यानतर आमच्या गुरास शिसाबासा होत नाहीं ' २ ( व ) चीजवस्त, मालाची जबाबदारी 'लोकाचा शिसाबासा सांभाळणे मोठें जबाबदारीचें काम आहे ' [ शिसा+बासा द्वि. ]

शिसी—स्त्री ( चांभारी ) भोंक छिद्र ( चामडें टाचून पक्कें झाल्यावर त्यातील पाणी बाहेर जाण्याकरिता पाडलेलें )

शिसें—न एक काळसर जड धातु [ स शिसक ] शिसपेन–स्त्री शिसाची पेन्सिल, लकडी पेन्सिल, बिनशाईनें लिहावयाची लेखणी [ शिसें+इं पेन ] शिसाशोध–पु शिसें घालून अशुद्ध रुपें शुद्ध करण्याची रीत

शिस्त—वि योग्य, लायक, शोभेसें, बिनचूक, बरोबर [ फा शुस्त धुतलेलें ] ०बाकी–स्त्री वसुली, वर्ग राहिलेली रकम; थकबाकी ०वार–वि पद्धतशीर, योग्य प्रकारचें, शोभेसें, साजेसें, नियमानुसार शिस्तवी करणें–नेम धरणें

शिस्त—स्त्री १ नेम; निशाण, वध; संधान ( क्रि० धरणें, बांधणें) 'शिस्त धरून वर्मि करोल वधितां हरणें ठिकाणीं

अडखळती ।'–प्रला २२६ २ कुळाकडील वसूल करावयासाठीं जी कुळवार यादी करितात ती, बदोबस्त ३ विवक्षित पद्धतीनुरूप, सप्रदायानुरूप वर्तन, व्यवहार, जाबसाल, शिरस्ता, पद्धति, रीत. [फा शिस्त]

शिहाना—वि शाहणा पहा 'विचारीनि पाता शिहाना नाहीं दादापरौता ।'–शिशु २१२

शिळई, शिळी—स्त्री शीळ, शीट, (क्रि० वाजविणें, वाजणें) [ध्व]

शिळक-ळीक—स्त्री शिलक पहा

शिळकवा, शिळकोपा—पु प्र शिळोपा पहा

शिळट, शिळटी—स्त्री १ गारठा, सर्दी, हवेंतील थडपणा शैत्य (क्रि० पडणें लागण) २ जमीनींतील ओल, गारवा, ओलावा (क्रि० येणें) 'जमीनीला शिळट येऊं द्या मग पेरा '[स शीतल]

शिळटणें—अक्रि १ हवेंतील गारठा बाधणें थडीनें (पिकास) इजा होणें २ शिळें होणें

शिळणधार शिळंधार, शिळाधार—वि क्रिवि अति जोराचा, झपाटयाचा (पाऊस, सर वगैरे) [स शिला+धारा]

शिळपट—वि १ घासलेलें (नाणें पैसा, टसा) २ बोथट, बोजड, बसलेली (शस्त्राची धार, टोंक वगैरे) ३ (ल) ढिला, नेभळट, पुळपुळीत, नि सत्त्व, भोंगळ (मनुष्य कारभार, व्यवहार वगैरे) [स शिला+पट]

शिळबुडा—वि गारठा मोडलेलें, शिळमोड, कोमट, उबर, (पाणी, पदार्थ वगैरे)

शिळवट-टी—स्त्री शिवळ पहा

शिळा—स्त्री शिला, मोठा सपाट दगड, पाटा 'शिळा मनुष्य झाली । ज्याच्या चरणाचे चाली ।'–तुगा ३८८ [स शिला] ०चुंबी-पु लोहचुबक ०छाप-पु कागदावर लिहिलेला मजकूर शिळेवर उठवून छापण्याची पद्धति ०धार-धारा-वि शिळणधार पहा ०रस-पु शिलारस पहा ०राशि-पु शिलाराशि पहा. ०सेत-सेतु-पु १ दगडाचा सेतु पूल २ (ल) मजबूत, मरीब घर बाधणीचें पक्कें घर, यत्र, काम मसलत घडण वगैरे (क्रि० बाधणें) [स शिला+सेतु] शिळोच्चय-पु पर्वत [स शिलोच्चय]

शिळा—वि १ पर्युषित, घासा, पारोसा, जुना, नि सत्त्व २ (को) थड निवालेला ३ (ल) थडा, ढिला, मद (कारभार, व्यवहार, धदा, स्वभाव) [स शीतल] शिळ्या कढीला ऊत आणणें-येणें–विसरलेली, जुनी झालेली गोष्ट उकरून काढणें मागाहून अवसान आणणें ०पाका-वि उरले सुरलेलें, आदल्या दिवशींचें जुना, वेचव म्ह० शिळपाकें खाल तुम्हीं बांगडीस म्हाल ०पाडवा-पु पाडव्याचा सण झाल्या नतर दुसऱ्या दिवशीं उरलेलें सणाचें पक्वान्न खाणें ०बाजार-पु मुख्य बाजाराचा दिवस होऊन गेल्यावर नतर जो एखाद दुसरी दुकानें राहतात तीं, (मोडनेप्रमाणें) ०विद्या-पु एखाद्या कामात पडला असता तें काम लवकर सपवावयाचा नाहीं व सोडावयाचा नाहीं व कोणी बोललें तरी रागवावयाचा नाहीं असा फारच धिमा, मद, चेंगट मनुष्य शिळवड-वट, शिळावट शिळवण शिळवणें-न (राजा) शिळे पदार्थ (भात, भाकरी वगैरे) शिळव(-वि-)णें–उक्रि शिळें करणें, दुसऱ्या दिवसाकरिता राखून ठेवणें, ताजेपणा नाहींसा करणें, घालविणें शिळावळ-स्त्री शिळें अन्न खाणें शिळ्या पदार्थांचें भोजन शिळी ओटी-स्त्री गर्भाधान विधीनतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं मुलीची आई तिची ओटी निजावयाच्या खोलींत भरते ती

शिळावेळ-शिळावळ—स्त्री थड वेळ, शिळोपा [स शीतल+वेला] शिळावन, शिळान-स्त्री शिळोपा, हवेंतील थडाई अभ्राची छाया मळभ [स शीतल]

शिळासप्तमी—स्त्री श्रावण शुद्ध सप्तमी या दिवशी स्त्रिया वाण देतात [स शीतला+सप्तमी]

शिळावर्त—पु घोडयाच्या गुडघ्यावरील भोंवरा –अश्वप १९७

शिळ—पु शील, स्वभाव [स शील]

शिळासरा पाटीलकी—स्त्री खार धरावयाची असतां अथवा मिठागर करताना समुद्राचें किंवा खाडीचें पाणी आड विण्याकरिता जो बधारा बाधावयाचा असतो त्यास जें एक द्वार राखलेलें असतें तथें एक शिळा बसवीत (शीळ पहा) या द्वाराची व शिळेची देखरेख ठेवण्याकरिता जो मनुष्य नमलेला असतो त्यास जो हक्क किंवा वतन दिलेलें असतें ती

शिळोत्तरा-री-शिळोत्तरा पाटील-शिळोत्तरीदार, शिळोत्री—पु वरील शिळोत्तरा पाटिलकीचा वतनदार

शिळोपा—पु १ दिवसांतील थड वेळ शिळावेळ पहा २ हवेंतील थडावा गारवा, गारठा सर्दी [स शीतल]

शिक्षक—पु १ पतोजी गुरुजी अध्यापक, विद्या वगैरे शिकविणारा २ (दुष्ट) चोर वगैरेंस शिक्षा करणारा [स शिक्ष्] शिक्षण-न १ अध्ययन, शिकवणूक २ दडन, शिक्षा करणें, पारिपत्य शासन ३ अध्यापन शिकवणी; शिकवणूक शिक्षणीय-वि १ शिकण्यास अध्ययन करण्यास योग्य, शिकण्यासारखा २ दडनीय, शिक्षा करण्यास पात्र शिक्षणें–उक्रि १ शिकविणें समजून सागणें २ दड करणें, शिक्षा करणें, ताडन करणें शिक्षा-स्त्री १ शिक्षण अध्ययन, अध्यापन 'बापाच्या शिक्षेमुळें मीं पचवीस वर्षें अगोदर जन्मून जितकें

ज्ञान प्राप्त झालें असतें तितकें झालें ' –नि ७१ २ दड, पारिपत्य, शासन शिक्षापिणें-सकि शिकविणें 'जा का तुम्ही शिक्षापिणे। विद्या वऊनि दुष्टा केला।' –ज्ञा १९५ शिक्षावार-क्रिवि दिलेल्या शिक्षाप्रमाणें उदा० शिक्षावार-तनखा-पत्रक-तालेबद शिक्षावारी-स्त्री शिक्षाप्रमाण केलेलें पत्रक शिक्षित-वि १ शिक्षण मिळालेला, शिकलेला, निपुण, पडित २ शिक्षा, सजा दिलेला, शासित, दड झालेला ३ शिस्तीचा, सुव्यवस्थित, वळण लावलेला. ४ अध्ययन केलेला, वाचलेला, पढलेला, अभ्यासलेला (ग्रथ, विषय, पुस्तक) शिक्ष्य-वि १ शिकवायाचा शिकविण्यास योग्य २ शिक्षा करण्यास पात्र, दडनीय

शी—अ कालवाचक क्रियाविशेषणास लागणारा एक निरर्थक प्रत्यय उदा० कव्हाशी, कधींशी, तधींशी, एव्हाशी, मगशी इ० याप्रमाणेंच शन आणि शीक हहि प्रत्यय लावतात प्रौढ भाषेंत हे सामान्यत आढळत नाहींत

शीं—स्त्री (गो) थडी, शैत्य, सर्दी [स शीतम्]

शी—स्त्री घाण, विष्ठा

शी—उद्गा तिरस्कारदर्शक, तिटकारा दाखविणारा उद्गार

शीक—स्त्री शिक्षण, शिक्षा, रीत तव दसवती म्हणे आणा शीक लावू।' –तुगा १२२ म्हणोनि विद्या स्मर शीक लावी।' –सारुह २ ६२ [स शिक्ष्]

शीक—न शिंकें

शीक-ख—पु नानकपथी मनुष्य एक हिंदु धर्मातील पथ व त्यातील व्यक्ति [स शिष्य]

शींक—स्त्री शिंक छिंकणें नाकातून ठसक्यानें बाहेर पडणारा वायु (क्रि० जाणें, येणें) [स छिक्का प्र]

शीग—स्त्री १ धान्यानें माप भरलें असता मापाच्या वर येणारी निमुळती रास २ जमिनीवर धान्याची अगर इतर पदार्थाची रास केली असता वर दिसणारा निमुळता भाग ३ शिखर उचवटा ४ (ल) अखेर शेवट मर्यादा अवधि 'नली कृष्णें त्याची स्वपदाश्रित कामना शिगला जी। –मोगदा ५१७ ५ सपाट जमिनीवरील उचवटा [स शीर्षक] (वाप्र) शीगमाप दर्णे-क्रि १ चागलें माप घालणें २ (ल) एखाद्याची चागली भरपाई करणें शिगेस चढणें-शिखरास, पूर्णत्वास जाणें 'वीं बहु चढला तुजा मद सिगेला। –मोउद्योग १३ ३३ सामाशब्द- ०लाट-(शिगेच्यावर गेलेलें) अतिशय समृद्धि, सपन्नता गडगज शीगलोट पीक–अमदानी–दौलत इ० –क्रिवि समृद्धिपूर्ण सपन्नतेनें ०लाटा-वि भातीव धान्यादिकाची शीग लोटून सपाट करणें (माप पात्र) शीगवर-क्रिवि अगदीं शीग लागल इतक्या प्रमाणात अति समृद्धतेनें शिगाशीग-अ (ना) अगदीं भरून, काठोकाठ, तोंडातोंड

थाको ७ ११

शीघ्र—वि त्वरायुक्त चलाख, त्वरितगति –क्रिवि त्वरित, सत्वर, लवकर, जल्द, तावडतोब ०कवि-पु त्वरेनें काव्य करणारा, जल्द कविता रचणारा कोणत्यादि विषयावर तावडतोब काव्य करतो तो ०केंद्र-न (ज्यो) युतिस्थान (उच्च) व ग्रह यामधील सूर्याशीं होणारें कोनात्मक अतर ०कोपी-वि एकाएकीं, तत्काल, एकदम, तावडतोब रागावणारा, यत्किंचित कारणावरून रागावणारा, तापट, रागीट ०फल-न (ज्यो) ग्रहापासून पृथ्वी व सूर्य यास जोडणाऱ्या रेषा काढल्या असता त्यामध्यें होणारा कोन ०बुद्धि-वि तीक्ष्ण, तरतरीत बुद्धीचा, चलाख, कुशाग्र बुद्धीचा ०सतोष-वि लवकर सतुष्ट होणारा शीघ्रोच्च-न (ज्यो) ग्रहाच्या कक्षेंतील सूर्यापासून सर्वांत दूरचा बिंदु (इ) लोअर ॲप्सिस याच्या उलट मदोच्च शीघ्रोच्च मंदोच्च सूत्र-न (ज्यो) ग्रहाच्या कक्षेंतील सूर्यापासून सर्वांत दूरचा व जवळचा बिंदु जोडणारी रेषा, उच्च नीचरेषा (इ) लाइन ऑफ अप्साइड्स

शीट—स्त्री पक्षाची विष्ठा

शीट—न चीट, रगीबेरगी कापड [इ चिन्‌ट]

शीट—स्त्री शिटी, शीळ [ध्व]

शीड—न १ गलबताचें अवजार, वारा धरण्याकरिता गलबतावर जें कापडाच केलेलें साधन वापरतात तें २ (ल) पाणीदार घोड्याचा मानेचा बाक ०अर्धा करणें-शीड पाडणें, उतरणें, गुडाळणें ०उतरणें-(ल) कमीपणा होणें, मानहानि होणें, अपयश येणें ०उभारणें-१ शीड मोकळें सोडणें, वारा धरून गलबत चालू करणें २ (ल) भरभराट होणें उत्कर्ष होणें ०चढणें-उत्कर्ष होणें, वैभवास चढणें, ऐश्वर्य प्राप्त होणें ०धरणें-(ल) घोड्यानें चालताना ऐटीनें मान वर करणें ०हाणारणें-शीड चढविणें, मोकळें सोडणें सामाशब्द- ०काठी-स्त्री डोलकाठी, शीड बाधावयाची मोठी काठी ०दोर पु शीड आवळण्याचें दोरखड ०बंद-पु शीड फाटूं नये म्हणून त्याच्या काठास शिवलेला जाड दोर

शीण—पु १ थकवा, ग्लानि, भागवटा, अति श्रम केल्यामुळें येणारें गात्रवैकल्य, दमणूक (क्रि० येणें, वाटणें, मानणें) २ कटाळा, तिटकारा खेद, तिरस्कार तुमच्याच मुलानें तुम्हास शिवी दिली म्हणून मला शीण वाटला ' ३ व्यर्थ श्रम, निष्फळ यत्न रामदास स्वामीविण। केला तितुकाही शीण।' –नवनीत पृ १४७ [स शीर्ण] ०भाग-पु थकवा, ग्लानि, दमणूक (सामान्यत) [शिणणें+भागणें] शिणोटा-पु थकवा, भागोटा

शीण—पुस्त्री वय, उमर वयोमान वयोमर्यादा तो आणि मी एका शिणेचे आहों ' [अर सिन–वय, काल] शीण भीण

**फिटणें**–वयातील अतरामुळें वाटणारा आदरयुक्त दरारा, भीति कमी होणें **शीण भीण फेडणें**–वरील प्रमाणें आदर, भीति कमी करणें, नाहीशी होणें [शोण+भीण–भीति भेणें]

**शीण**—न (गो) उसनें वाण **,शीणकाडप**–उसनें वाण फेडणें

**शीत**—न १ शिजलेल्या भाताचा कण, दाणा २ (कों) ग्रामदेवतास दाखवावयाचा (वार्षिक) नैवेद्य, बलि [स सिक्थ] म्ह० १ शितावरून भाताची परीक्षा २ असतील शितें तर मिळ तील भुतें ०**कण–कूण**–पुन भाताचें शीत 'एक कढ येऊन गेला म्हणजे आतील एक शितकण बोटानें चेपून पाहून' –पाकशास्त्र ०**चड–स्त्री** (कों) भाताच्या शिताचा पसारा, भाताची साढ केलीं शितें ०**डी–स्त्री** गोळा, गठ्ठा, गुठळी, कवडी (नासलेलें दही, रक्त, कढी, खीर इ० चा गोठून झालेला)

**शीत**—न धनुष्याची दोरी, प्रत्यचा 'कडकड धनु मोडे मोडिता शीत नेटें' –माधव रामायण बाल २६

**शीत**—न १ (विणकाम) ताण्यामधील खालचे वरचे दोरे अलग करणारी आडवी काठी २ (कों) शिमग्याच्यें सहाणेवर पुरण्या करिता आणतात तो सुरमाडाचा किंवा इतर झाडाचा शेंडा

**शीत**—न थंडी, शैत्य, सर्दी [स शीत] –वि १ थड, गार २ (ल) मद जड, उदासीन; आळशी **शीतक**–पु पदार्थ थड करण्याचें, थिजविण्याचें यत्र (इ) कन्डेन्सर **शीत कटिबंध**–पु ध्रुव व ध्रुववृत्तें यामधील प्रदेश **शीतकर**–पु चद्र ०**काल**–पु १ हिवाळा, हेमत व शिशिरऋतूचा काळ २ हिवाळ्यातील व पावसाळ्यातील मिळून सहा महिन्याचा काळ. [स] ०**ज्वर**–पु थडीपासून आलेला ताप हिंवताप [स] ०**पित्त**–न १ एक प्रकारचें कोरडें कुष्ट २ पित्तदोषामुळ येणारें पडसें, होणारी सर्दी, शैत्यविकार [स] ०**भानु**–पु चद्र 'जैसा नभीं न भी घन गर्जे झांकोनि शीतभानु रवी' –मोकर्ण ११ २४ 'चौगुणीन जरि पूर्ण शीतभानु' –र [स] ०**मगल**–वि दोन्ही कुशीखालीं दोन भोंवरे असणारा (घोडा) –अश्वप १२४ [स] ०**मेह**–पु १ मूत्रावरून ज्ञात होणारा शैत्यविकार, सर्दी, पडसें २ अशा विकारात होणारी ल्घवी [स] ०**वास**–पु थडीच्या वेळीं पाण्यात उभें रहाणें; एक प्रकारची तपस्या [स] ०**वीर्य**–वि ज्याचे गुणधर्म थड आहेत असा, शैत्यकारक; सर्दी उत्पन्न करणारा ०**सुगंध**–पु थड व सौम्य असा सुवास –वि थड व सौम्य अशा सुवासयुक्त (धान्याची झुळुक) [स] **शीतांशु**–पु चद्र **शीतोष्ण**–वि कोंबट, अर्धवट उष्ण **शीतता**–स्त्री थडी, सर्दी, शैत्य **शीतल–ळ**–वि १ थड, गार २ मऊ सौम्य; सुखकारक **शीतळशाई**–स्त्री एक मुलाचा खेळ 'हमाम्या शीतळशाई। पारा मेली कुत्री मायी।' –भज ३३ **शीतला–ळा**–स्त्री १ देवी; अगावर उठणारा फोडयाचा रोग (क्रि० येणें, निघणें, मावळणें, कानपणें) २ या रोगाची देवता **शीतला(ळा)देवी**–स्त्री देवी या रोगाची देवता **शीतळचिनी–पाटी–शिमगा**–शितळ पहा **शीतळावो**–पु थडावा, गारवा

**शीत**—वि सहा, सहा ही सख्या अरबी वर्षांस लावतात [अर शीत्]

**शीद**—न आपटयाचें झाड –बदलापूर २८४

**शीन**—वि जुनें, मोडकें, जीर्ण, मोडकळीस आलेलें [सं शीर्ण]

**शीनबाज**—पु एक पक्षी हा गवचिमणीपेक्षा थोडा लहान असतो रग गडद उदी असून छातीवर पांढर टिपके असतात [फा]

**शीना**—पु छाती, ऊर 'त्याची दुराटी बदूक लाविली शिन्याला।' –सासह रायुपो ३ [फा सीना]

**शीप**—स्त्री शिंप, शिंपी, शुक्ति [स शुक्ति]

**शीम**—स्त्री (राजा) शींव, सीमा, मर्यादा, हद्द [स सीमा] **शीमधडा–ड्या–डी**–पु शेजारी, शिवधडा पहा

**शीर**—स्त्रीन एका बाजूस पाल्या वळलेल्या माडाचा झाप

**शीर**—स्त्री १ शरीरातील नाडी; अशुद्ध रक्तवाहिनी, धमनी, सामान्यत रक्तवाहिनी, नस २ मज्जातंतु स्नायु मांसदोरक, आंत्रदोरक ३ पान, फळ वगैरेंतील रसवाहक ततुसदृश भाग ४ लाकडातील रघा, लकीर, रेघ, (यावरून) फळी, खाब लाकूड याची कड [स शिरा] **शिरा घेणें, शिरा किंवा शीर घेणें–काढणें–तोडणें–देणें**–शीर तोडून रक्त काढणें **शिरा ताणने, ताणणें–ताणून, तानून ओरडणें–चालणें–भाडणें–रडणें–वाद करणें**, इ –मोठयानें, जोरजोरानें हाका मारणें, बोलणें, भाडणें, तडण, ओरडणें शाक करणें, वादविवाद करणें इ० **शिरा–शिर तोडणें**–थोडा खर्ची करणें **शिरा निघणें**–कृश रोड झाल्यामुळें शरीरावर शिरा स्पष्टपणें दिसू लागणें **शिरा फुगविणें**–रागानें, क्षोभानें शिरा तटतटून उठणें (म्हशीला, गाईला, घोडीला वाय कोळा) **शीर फुटणें**–दूध वाहू लागणें **घोडयाला, पोराला–शीर फुटणें**–जोरानें वाढीस लागणें **शीरवाला**–वि शिरा, रेषा उठून दिसणारा, खारवेमारखा (हिरडा वगैरे)

**शीर**—न डोकें मस्तक शीर्ष शरीराचा खांद्यापासून वरचा भाग, मुडकें [स शिरस्] म्ह० शीर सलामत तो पगडया पचास–मनुष्य जीवत राहील तर अनेक गोष्टी मिळवू शकेल शीरखड, शीरटोप वगैर शिरखड शिरटोप इत्यादि शिर खालीं पहा **शीरदळ**–रक्तपर्शींचें जाळें, रक्तपर्शींचा, शिरांचा समुदाय,

डोकें. शीर मुंडणें-मस्यास देणें शीरगणती-स्त्री माणसे-सुमारी, मनुष्यांची मोजदाद

शीर्ण—वि विस्कळित, मोडकेतोडकें, अवयव निखळलेला, विध्वस्त, विपडलेला, नासलेला [ सं ]

शीर्ष—न मस्तक, डोकें, शीर [ सं शीर्ष ] शीर्षाभिनय-पु डोकें इत्यादि केलेले अभिनय, हावभाव उदा० आकंपित, धुत, विधुत, परिवाहित, आधुत, अवधुत, अंचित, निहंचित, परावृत्त, उत्क्षिप्त, अधोगत, लोलित व कंपित ०पादी-पु अनपादी प्राण्यांच्या वर्गांतील प्राणि या प्राण्याच्या डोक्याभोंवती आठ किंवा दहा भुजा असतात शीर्षासन-न डोकें खालीं टेकून पाय वर ताठ करून उभें राहणें याचे तीन चार प्रकार आहेत —संयोग ३४१.

शील—न ( गो ) शीळ

शील—न १ स्वभाव, अंगभूत गुणधर्म, उपजत गुण, स्वस्वभाव २ सुवृत्ति; सोज्वल स्वभाव, वर्तन, वर्तणूक, चारित्र्य, सद्वर्तन (समासांत) -वि युक्त, रत, स्वभावतःच असलेला, उपजत कल असलेला, प्रवृत्तीचा उदा० अध्ययन-कर्म-धर्म-दान-पुण्य-पाप-विद्या-पठन-विचार-व्यय-दया-कृपा-न्याय-स्नानसंध्या-वादन-सुकर्म-दुष्कर्म-अधर्म-अनुशन-विवाद-शील तसेंच सुशील, दुःशील, कुशील इ० शीलवान शीलवत-वि १ सुस्वभावी, सद्वर्तनी, सुवृत्त २ उमदा, उत्तम जातीचा, जातवान, पाणीदार ( घोडा )

शील—पु धार लावण्याचा दगड —बदलापूर १०३. [ सं शिला ]

शील—स्त्री चिलखत, बख्तर 'शीलचा राउत' —इपु-स्तीपो १० 'शिवबा शील करी अगाला।' —पो १२. [ अर. सिलाह् ]

शीलवृत्ति—स्त्री शिलवृत्ति पहा

शीव, शींव—स्त्री हद्द, मर्यादा, सीमा [ सं सीमा ] शिवारणीं उभा न करणें, न राहूं देणें-दूर अंतरावर ठेवणें, जवळ येऊं न देणें, जवळ उभा न करणें ०करी-थडी-थड्या-घड्या-वि शेजारी, पडोशी ०शेजारा-सोयरा-पु शिवेजवळचा शेजारी, सीमेकडील मनुष्य ०तकरार-स्त्री हद्दीसंबधीं तंटा, भांडण ०धोंडा-पु हद्दीवरील, हद्द दाखवणारा दगड ०पूजन-न सीमानपूजन, वराचें आपल्या गावच्या सीमेवर ( हल्लीं देवळांत किंवा मंडपांत ) करावयाचें पूजन

शीवड—पु ( गो ) एक जातीचा मासा

शीवळ—स्त्री शिवळ पहा

शीस—न मस्तक, शीर, डोकें 'का शीस खाइनि आपुलें।' —ज्ञा ९५०० [ सं शीर्ष ] ०मणी-पु डोक्या-शील अलंकार, भूषण, दागिना 'भुजंग शिरीं दीपवेणी। भाळीं शीस मणी कृष्ण मणी।' —ऐ १७७२.

शीस, शींस—न फुलाच्या मागें दिसणारा फळाचा दोडा, काकडी, भोपळा वगैरे वेलावर फुलाबरोबर दिसणारी फळाची लहान आकृति ०फूल, शींसफूल—न १ ज्याच्या मागें फळ धरूं लागतें, लहानसें बोंड दिसतें असें ( काकडी, भोपळा वगैरे ) वेलाचें फूल याच्या उलट वायफूल=वांझ फूल २ डोक्यांत घालावयाचें स्त्रियांचें भूषण ०फूल-फुली-वि. फळें धरणारें, वांझ नव्हे असें फळझाड.

शीळ—स्त्री शिटी, शिळ्ळ (क्रि० घालणें, वाजणें) [ ध्व ]

शीळ—न शील पहा 'सज्जनाचें शीळ। स्वभाव जैसें।' —ज्ञा १३ २९१ [ सं शील ]

शीळ—स्त्री १ दगड, विशेषतः मऊ गुळगुळीत व सपाट दगडास म्हणतात, दगडाची चोप, पाटा, धार लावण्याचा दगड, स्नान करण्याचा दगड, धुण्याचा दगड, उतरण्याचा दगड वगैरे. —न खार धरणें, किंवा मिठागर बांधणें याकरिता जो समुद्रकांठी अथवा खाडींत धपारा घालतात त्यात मधून मधून द्वारें ठेवतात त्यांत दगड बसवावयाचा असतो त्या दगडावरून त्या द्वारासहि म्हणतात (क्रि० बांधणें, ढकणें, भरणें, मिळणें, फुटणें) नंतर हीं द्वारें रक्षण करण्याकरिता एका मनुष्याची नेमणूक करतात त्यास शिळोत्तरा पाटील म्हणतात या द्वारात दगड बसवितात त्यासहि पाटील नाव देतात खारीच्या तोंडासहि शीळ म्हणतात [ सं शिला ]

शीळवंत—पु जंगमांतील एक वर्ग व त्यांतील व्यक्ति

शु॥ —(संक्षेप) शुद्ध, शुक्र (पक्ष)

शुक—पु १ पोपट, राघू, रावा. 'जैसी ते शुकाचेनि अंग भारें।' —ज्ञा६ ७६. २ व्यासपुत्र, श्रीमद्भागवताचा वक्ता 'एन्हवीं निदेय जिणोनि जन्मले। जे शुकादिक दाटुले।' —ज्ञा ११ १७३. [ सं ] ०स्वामी-पु (ल) अत्यंत कृश मनुष्य, पाप्याचें पितर ०तुण्ड(हस्त)-पु (नृत्य) आंगठा, तर्जनी व अनामिका तळहाताकडे वळविणें व मधलें बोट व करंगळी ताठ उभी ठेवणें ०नलिकान्याय-पु पोपटास धरण्याकरिता बांधलेल्या नळीवर पोपट बसला म्हणजे ती फिरून तो उलटा होतो व पडण्याच्या भीतीनें तीस घट्ट धरून बसतो. तीस सोडलें तर आपण मोकळें होऊं हें त्यास समजत नाहीं हा दृष्टांत ०नासिक-वि पोपटाच्या चोंचीसारखें वाकदार नाक असलेला ०नासिका-स्त्री पोपटाच्या चोंची सारखें वांकदार नाक (इ) रोमननोज शुकाचार्य-पु (ल) ब्रह्मचारी, मत्स्य शुकी-स्त्री पोपटाची मादी

**शुकर**—न सूकर, डुकर 'तुका म्हणे शुयदा ऐसें । जन्म सरिसें शुकराचें ।' -तुगा २४६८ [स सूकर]

**शुकरगुजार**—वि कृतज्ञ, आभारी, शुक्र पहा [फा]

**शुका-क्का**—पु आज्ञापत्र, फर्मान, हुकूम, राजाज्ञापत्रिका [अर रुक]

**शुकूर**—वि मुलाज -राव्यको ८ २६ शुक्र पहा [फा.]

**शुकुरवार**—पु (अप) शुक्रवार पहा

**शुक्-क**—उद्गा मांजरास हांकून लावण्यासाठीं उच्चारावयाचा शब्द [स शुक्-जाणें-भाडभह १८३५] **शुक्र उासणें-** **होणें**-शून्य, निर्जन, स्तब्ध शांत असणें **शुक करणें**-निवारण करणें प्रतिषेध, प्रतिबंध करणें **शुक न करणें**-प्रतिबंध न करणें, सदर परवानगी, मोकळीक देणें **शुकशुकाट**-पु स्तब्धता, शांतता, निर्मनुष्यता; शून्यता

**शुक्ति, शुक्तिका**—स्त्री १ शिंपी 'कां शुक्ति ते शुक्ती । हे होय प्रतीति ।' -ज्ञा १३ ११३८ २ मोत्यांचा शिंपला 'निदाघाचेनि वोंदाटें । मोतियें नावरती संपुटें । मग शिंपणी जैशी उतटे । शुक्तिपत्राची ।' -ज्ञा ६ २६६ **शुक्तिमान्**-पु सात कुलाचलांपैकीं एक पर्वत सप्तपर्वत पहा

**शुक्र**—पु १ आकाशांतील एक तेजस्वी ग्रह २ दैत्यगुरु [स] **०वार**-पु शुक्रग्रहाचा दिवस सात वारांपैकीं गुरुवार व शनिवार यामधील दिवस **शुक्राचार्य**-पु १ दैत्यांचा गुरु हा एक डोळ्यानें अंध होता यावरून २ (ल) एका डोळ्यानें आंधळा मनुष्य, एकाक्ष. [स] **शुक्री**-वि पाढऱ्या फिक्या रंगाचें पाणी असलेली (माती)

**शुक्र**—न वीर्य रेत धातु 'आणि शुक्रशोणिताचा साधा ।' -ज्ञा १३ १०६ [स] **०दोष**-पु वीर्यांत होणारा बिघाड, विकार, रोग **०मेह** पु मूत्रांतून शुक्रस्राव होणारा रोग **०स्तम्भन**-न १ वीर्यपात थांबविण्याची क्रिया, रतस्खलन न होऊ देण्याचा उपाय २ रतस्खलन होऊ नये म्हणून घ्यावयाचें औषध **शुक्राश्मरी**-स्त्री शुक्रजन्य मूतखडा

**शुक्र**—न डोळ्यांतील फूल -योग २ ५३१ [स]

**शुक्र, शुक्रर**—पु आभार, आभारप्रदर्शन ईश्वरें पुनर्जन्म केला त्याचा शुक्र कोठवर करावा ' -रा ६ ६२१ [अर शुक्र] **०करना**-आभार मानणें **०गुजार**-वि कृतज्ञ आभारी **०गुजारी** स्त्री कृतज्ञता, आभारप्रदर्शन 'बडेसाहबानें आम्हापासून नवी डाकेविसीं आपली शुक्रगुजारी व येहसानमन्दाचें विनतिपत्र याजकरितांच लिहविलें ' -पदमव ९९

**शुक्ल**—पु १ फक्त ब्राह्मणांच्याच यजील याज्ञिक करणारा, ब्राह्मणांचें पौरोहित्य करणारा, ब्राह्मणाकडीलच भिक्षा घेणारा ब्राह्मणांचा वर्ग, गुजर ब्राह्मणांतील एक वर्ग, त्यांचा उपाध्याय -मदलापूर २५० २ (ज्योति) सत्तावीस योगांपैकीं चोविसावा योग -न डोळ्यांतील फूल, डोळ्याचा रोग [स] -वि १ पांढरा, श्वेत शुभ्र २ चांदण्याचा, ज्यामध्यें चंद्रकला वाढत जात तो (महिन्याचा पक्ष), या पक्षांतील (तिथि) **०काष्ठ-शुक्लकाष्ठ**-न (गाव, शुष्ककाष्ठ) १ असतीव्याद, अडगळ, अडचण, टुमणें, तमेमिरा, झेंगट, लचांड, घट, लिगाड. (क्रि० लावून घेणें) २ पुरुषाचें गुह्येंद्रिय शिश्न ३ खोडा ४ ओढाळ गाईच्या गळ्यांत बांधतात तें लोढणें म्ह० बोलामळा गेले मुराष्ट पायीं पडलें शुक्लकाष्ठ एका बाईनें विनाकारण अधिक बोलून आपल्या नवऱ्यावर सोडपांत पडण्याचा प्रसंग आणला या गोष्टीवरून **०पक्ष**-पु १ शुद्ध पक्ष, चांदण्याचा पंधरवडा, ज्या पंधरा दिवसांत चंद्राच्या कला वाढत जातात तो २ (ल) जातीमध्यें दोन पक्ष पडले असतां निर्दोष बाजूस, सत्य पक्षास म्हणतात, दुसरा कृष्णपक्ष-दोषी पक्ष, ३ प्रगति वाढ, भरभराट, चांगली बाजू **०वृत्ति**-स्त्री ब्राह्मणांकडेच पौरोहित्य करून किंवा प्रतिग्रह घेऊन निर्वाह करण्याची कृति, पद्धति; शुद्धाचरण **०बिलावल**-पु एक राग या रागांत षड्ज, तीव्रऋषभ तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात जाति संपूर्ण-संपूर्ण वादी मध्यम संवादी षड्ज गानसमय दिवसाचा पहिला प्रहर **शुक्लाष्टमी**-स्त्री ज्येष्ठ शुद्ध अष्टमी या दिवशीं शुक्ला देवीचें माहात्म्य आहे **शुक्लिस**-न वीर्य, रेत -हंको.

**शुचा**—स्त्री चिंता, काळजी, शोक, दुःख 'भगा अगाही पौती । शुचा वाहे पै चित्तीं ।' -ज्ञा १८ ६८७ [स शुच्]

**शुचि**—पु १ आषाढ मास २ शृंगार -वि पवित्र, शुद्ध, स्वच्छ निर्मल [स शुच्] **शुचित्व**-न शुद्धता, स्वच्छता, पावित्र्य 'तैसें शुचित्व नोहे । सज्जनांचें ।' -ज्ञा १२ १७४ **शुचिर्भूत**-वि निर्दोष, पवित्र, शुद्ध स्वच्छ 'छंद हरिच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ।' -तुगा २१८१ **शुचिष्मंत, शुचिष्मान्**-वि पवित्र शुद्धाचरणी 'यावरी यादव सत्राजित । परम अनुष्ठानीं शुचिष्मंत ।' -ह २५ ९

**शुचिस्रुवा**—स्त्रीपु अग्निहोत्र्याच्या पळ्या 'पेशजी शुचिस्रुवे सोन्याचे चिमाजी आपाजी याणीं नेले' -पेद ४ ४४ [सं शुचि+स्रुवा]

**शुजा**—वि शूर, पराक्रमी [अर शुजा=शूर] **शुजाअत्-शुजात**-स्त्री १ शौर्य पराक्रम २ शौर्यनिधी, एक पदवी -इम ६५ [अर शुजाअत्]

**शुट शुंठ**—पुस्त्रीन मद, मद्दड, ढ, निर्बुद्ध [स शुठ्=आळस करणें]

**शुंठ-ठी**—स्त्री सुंठ, वाळविलेलें आलें [स शुंठी]

**शुंडा, शुंडादंड**—स्त्री सोंड (हत्तीची) 'गगनगमाचे शुंडादंड ।' –पहग्व १ ४४ [सं शुण्=चालणें] ०धारी–पु प्रत्याळ्या एका वर्गाचें नाव यांत हत्ती येतो ०यंत्र–न अर्श काढण्याचें यंत्र, अंगुलित्राण, वकयंत्र, वगैरे

**शुणें**—न (गा) शुभें, शुनें [सं शुनम्]

**शुत्र**—उद्गा. मोगरें बोंबरीं यांना हाकून लावताना उच्चारावयाचा शब्द [प्रा]

**शुतर, शुतुर**—पु उंट [फा शुतुर] ०खाना–पु उंट-खाना, उंटांचा कारखाना ०नाल–स्त्री उंटावरून वाहून न्यावयाची तोफ ०वान–पु उंट हांकणारा ०सवार–स्वार–पु उंटावर बसणारा

**शुतु**—न (मद्रास) पायांतील जोडवें [तामिळ]

**शुतुर**—वि सारें, दुहेरी, गलें उदा० माहेरशुतुर [फा शुतुर्–दोन्ही, दुहेरी] शुतुरगी–स्त्री दोन्ही दाण्यांची क्रिया –आश्लिष्ट देश्यानें शुतुर्–भाषि झालेला –भाषिक्शाखीयमानें

**शुदामद, शुद्रामत**—स्त्री वहिवाट, पद्धति चाल 'कान-गोह याचे दाढी शुदामद आहे' –रा ६ ५५४ [फा शुद+आमद]

**शुद्ध**—न ज्ञान, चैतन्य 'शुद्धीं अहंकार अलुमाळ । उठता शुद्धासि करी शबळ ।' –एभा १३ ४३२ –धावि १ निर्मळ, पापरहित, दोषरहित; पवित्र, स्वच्छ निष्पाप २ शोधित संस्कारादिकांनी पवित्र निर्मळ केलेला पावन केलेला ३ निर्दोष, बिनचूक, खास, बरोबर, अव्यंग (व्यक्ति लेखन, भाषण, वर्तन, क्रिया वगैरे) ४ एकटी, साधा, विशेषणरहित 'कांदा खाऊं नये असा एक निषेध केला असता म्हणजे शुद्धाचा निषेध सर्व जातीवर जाईल' ५ केवळ, फक्त, नुसता, निवळ 'त्याची मराठ्यांच्या रणांगणावर शुद्ध लाडगेलोड चालली होती' –अस्पृ २ ६ शुक्ल पांढरें चांदण्याचा (पक्ष) ७ चांगला, शुभ, (कुयोगादि) दोषरहित, पवित्र (दिवस, तिथि) ८ योग्य, न्याय्य, बरोबर समत, 'कीं नृपशुद्ध युद्ध हा करितो ।' –मोकर्ण १३ १७ या अर्थी अनेक समासांत हा शब्द येतो उदा० आकारशुद्ध आचारशुद्ध ९ अव्यंग, निरोगी, सुदृढ, धडधाकट १० साक्षात्, मूर्तिमंत 'सुमनें तीच्या रतीच जी शुद्ध ।' –कम २ [सं शुध्=स्वच्छ करणें] ०अपूर्णांक–पु (गणित) साधा अपूर्णांक ०कल्याण–पु एक राग या रागांत षड्ज तीव्र ऋषभ, तीव्र गांधार तीव्र मध्यम पंचम तीव्र धैवत व तीव्र निषाद हे स्वर लागतात आरोहांत मध्यम, निषाद वर्ज्य, अवरोह संपूर्ण जाति औडुव संपूर्ण गानसमय रात्रीचा पहिला प्रहर याचे भेद–कामोदकल्याण, जयकल्याण भूपाळी कल्याण, यमन कल्याण, श्याम कल्याण, सावनी कल्याण, हमीर कल्याण, हिंडोल कल्याण इ० ०जाति–स्त्री (संगीत) शुद्ध स्वरांवरून तयार झालेली जाति या सात आहेत–षाड्जी, आर्षभी, गांधारी, मध्यमा, पंचमी, धैवती व नैषादी ०तान–स्त्री (संगीत) सप्तस्वरांच्या क्रमांत बदल न करतां घेतली जाणारी तान ०पक्ष–पु शुक्लपक्ष, चांदण्याचा पंधरवडा ०प्रीति–स्त्री निर्व्याज प्रेम, अहेतुक प्रेम याहून भिन्न भयप्रीति, काम्यप्रीति इत्यादि ०भोजन–न निरामिष, निर्मांस भोजन ०मति–वि मळ नसलेला, अंतर्बाह्य नसलेला, निष्कपट ०मल्लार–पु (संगीत) एक राग या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत हे स्वर लागतात जाति औडुव औडुव वादी मध्यम, संवादी षड्ज, गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर याचे प्रकार पुढें दिल्याप्रमाणें आहेत–गौडमल्हार, नटमल्हार, मीरामल्हार, रामदासीमल्हार, मियांमल्हार, मेघमल्हार, सुरदासीमल्हार, धर्म्यू मल्हार, देसमल्हार, रूपमंजरीमल्हार वगैरे ०मार्ग–पु सनातनधर्म; परंपरागत धर्म, परंपरागत मार्ग, पवित्र, गम्य, ऋजु मार्ग 'निर्वैर शुद्ध मार्ग मागावा ।' –दा २ १ ३० ०मुखी–वि पवित्र्या मुखाचा, मद्य न चाखलेला ०राग–पु (संगीत) जो राग आपल्या नियमबद्ध स्वरांनी रंजक होतो तो ०लेखन–न व्याकरण नियमानुसार जें लिहिलेलें असतें, लिहावयाचें असतें तें ०वृत्ति–स्त्री १ योग्य, अधिकारानुरूप व्यवसाय, धंदा व मागाचा धंदा–भिक्षाटन २ निष्कपट, निष्पाप, सरळ स्वभाव, वर्तन –वि निष्कपट सरळ, निष्पाप ०शब्दयोगी अव्यय–न (व्या) ज्या शब्दयोगी अव्ययांस शब्दांस जोडल्याशिवाय स्वतः चा अर्थ नसतो व जी जोडतांना शब्दांचें सामान्यरूप होत नाहीं तीं उदा० पर्यंत ०शेर ब्राह्मण–पु शुद्ध –केसरी १। ९। ३६ ०सत्त्व–पु रजोगुण अथवा तमोगुण यांच्या प्रभावानें मिश्र न झालेला सत्त्व-गुण 'आपुलें आर्तीचें अंजन । शुद्ध सत्त्वाचें पात्र जाण ।' –एरुस्व ३ १ ०समाचार–पु १ कुशलवृत्त, सुवार्ता खुशालीची बातमी २ शुद्धि भान, मन ठिकाणावर असणें ०सामंत–पु (संगीत) एक राग या रागांत षड्ज कोमलऋषभ कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत हे स्वर लागतात आरोहांत गांधार निषाद वर्ज्य, अवरोहांत निषाद वर्ज्य जाति औडवषाडव वादी षड्ज, संवादी मध्यम गानसमय दिवसाचा पहिला प्रहर ०सारंग–पु (संगीत) एक राग यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल मध्यम तीव्र मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात जाति षाडव षाडव वादी ऋषभ, संवादी पंचम गानसमय माध्यान्ह या रागाचे प्रकार–बड हंस मियांसारंग, लंकादहन, बिंद्रावनी, मधुमाद सावंतसारंग इत्यादि ०स्फटिक–पु १ (शब्दशः) निवळ स्वच्छ, पांढरा स्फटिक २ (ल) निरक्षर, निष्कांचन, अक्षरशत्रु, ढ, कफल्लक इसमास

म्हणतात, तसेंच वस्त्रहीन, अर्थहीन, सर्वस्वीं नागवलेला अशा शुद्ध त्यासहि म्हणतात ०स्वर-पु (संगीत) जुन्या मताप्रमाणें बावीस श्रुतींपैकीं ४, ७, ९ १२, १७, २०, २२, या श्रुतींस ठेवलेलीं नावें नव्या मताप्रमाणें १, ५, ८, १०, १४, १८, २१ या श्रुतींची नावें दोन्ही पद्धतींत सा, रे ग, म, प, ध, नि हींच नावें आहेत ०स्वरूप-न ब्रह्म ०ज्ञान-न ब्रह्मज्ञान, अपरोक्ष ज्ञान शुद्धद्वैती-पु एक संप्रदाय मायाविरहित म्हणजे शुद्ध जीव व परब्रह्म हीं एकच आहेत असें मत -गीर १७

शुद्द—स्त्री शुद्धि, अपभ्रंश शुद्धि पहा ०बुद्द-स्त्री शुद्धि व बुद्धि, ज्ञान, स्पष्ट जाणीव -वि १ (ल) शुद्ध स्फटिक पहा निरक्षर, निर्बुद्ध, ढ २ खलास, निकाल, शून्यवत् 'घृत नवनीत दधिदुग्ध। खाऊन केलें शुद्दबुद्द।' -ह ६ ११७

शुध्दान्त—पु कक्ष्यावध -राज्यको ७ १७

शुद्धि—स्त्री १ शुद्धता, स्वच्छता, पावित्र्य, निर्मलता, निर्दोषता, निष्पापता 'तया काळातें जुळवणें। दशशुद्धिही साधणें।' -ज्ञा १८ ६३६ २ शोधन, स्वच्छ, निर्मळ, पवित्र करण्याची क्रिया उदा० देहशुद्धि, पात्रशुद्धि, स्थलशुद्धि ३ बरोबर, बिनचूक, निर्दोष करण्याची क्रिया, किंवा तशी स्थिति, निर्दोषता, निष्पापता, बिनचूकपणा ४ ऋजुता, सरळपणा, चांगलेपणा, अशुभता, अमंगलता यापासून अलिप्तता उदा० दिनशुद्धि, नक्षत्रशुद्धि ५ देहभान, जागरूकता, सावधानता, स्मृति, चेतना, आठवण, सावधपणा, मूर्छना, वेशुद्धि, भ्रांति, भ्रम यापासून अलिप्तता 'याची का रे गेली शुद्धि। नाहीं तरायाची बुद्धि।' -तुगा ३५५ ६ शोध, तपास, विचारणा; खबर, बातमी, वार्ता 'त्यानें सांगितली त्याला माझी शुद्धि। त्या कवीची बुद्धि समदृष्टि।' -मोअभंग (नवनीत पृ २६०) 'जयचि हे होय जायें। तो शुद्धिही नेणें।' -ज्ञा ५ ७९ [स शुध्] शुद्धीवर आणणें-देहभानावर आणणें, मार्गावर आणणें, योग्य दशाप्रत आणणें शुद्धीवर येणें-देहभानावर येणें सावध होणें, योग्य मार्गावर येणें, दोष, व्यसन टाकून देणें ०पत्र-न १ ग्रंथांतील चुकांची दुरुस्ती दाखविणारें पान, पत्रक, शोधपत्र २ एखाद्या मनुष्यास पातकक्षालनार्थ प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेतल्याचा दाखला, परधर्मांतील गृहस्थास प्रायश्चित्तादि विधीनें शुद्ध करून स्वधर्मांत अगर जातींत घेतल्याबद्दलचें प्रमाणपत्र ०सूची-स्त्री शुद्धिपत्र, शोधपत्र; चुका व त्यांची दुरुस्ती यांचें पत्रक

शुध—वि (अप) शुद्ध पहा 'अति आदरें शुध कीया धरावी।' -या मनाचे श्लोक १०७ 'रुपें सुदरू जाहला शुधपक्षी।' -रामदासी ख १ पृ १८ शुधी-स्त्री (अप) शुद्धि पहा 'वेळ कठिण मोठी तेव्हांची कैकाच्या हरल्या शुधी।' -होला -ऐपो ३८६ 'तया रावणें सर्व साड्डनि शुधी।' -राक ख १ पृ १४

शुनक—न कुत्रें 'शौरि म्हणे राजेंद्रा यद्यपि बलवान् तथापि शुनकानें।' -मोउद्योग नवनीत ३०६ [स शुनस्]

शुनी-स्त्री कुत्री 'शुनी वसवसोनि पाठीं लागे।' -एभा १२ २०७ शुनें-न कुत्रें, सुणें

शुन्य—न शून्य पहा

शुपका—पु शिपका पहा

शुफा—पु (कायदा) प्रथम खरेदीचा हक्क, अग्रक्रय हक्क, शेजाऱ्याचा लगतची जमीन विकत घेण्याचा प्रथम हक्क [अर. हक्क इ-शुफा]

शुबाह्, शुभह्—पु संदेह, संशय, वहीम 'शायद गरज्यो मनुष्याचे सांगण्यावरून शुबाह् बस्वास राजे साहेबाचे अन्तःकरणात प्राप्त होईल' -रा १० २५१ 'याच चालीनें तर्हेन दिलात शुभह् आणितील' -पया ४७८१ [अर शुब्हा]

शुभ—न १ सुदैव, कल्याण, अभ्युदय, ऐश्वर्य, सुखकारक स्थिति २ (ज्यो) अनुकूलता, कृपादृष्टि; कल्याणकारकता (तिथि, युति वगैरेची) ३ हितकारकता, लाभदायकता (एखाद्या वचनाची अथवा दिग्दर्शक गोष्टीची) -पु (ज्यो) सत्तावीस योगांपैकीं तेविसावा योग -वि १ मंगलदायक, लाभदायक, सुखकारक; चांगलें; सुदैवी, सुपरिणामी (कृत्य, विधि, शकुन, चिन्ह, योग) २ मंगल; उत्सवरूपी, समारंभाचे (विधि, प्रसंग, संस्कार वगैरे) यांच्या उलट अमंगल, अशुभ, श्राद्ध, पुण्यतिथि, वगैरेसंबंधीं ३ सामान्यतः चांगलें, बरें, इष्ट 'अशुभस्य कालहरणं शुभस्य शीघ्रम्।' [स शुभ्= शोभणें, प्रकाशणें] म्ह० शुभ बोल रे नाऱ्या, मांडवास आग लागली ०कर, शुभंकर-वि शुभदायक, मंगळकारक, हितकर, सुखकर ०कर्म-कार्य-न मंगल समारंभ उत्सव, कल्याणकारक संस्कार विधि वगैरे (उदा० लग्न चौल, मुंज वगैरे) ०कृत्य-न १ (शब्दशः) चांगलें कार्य, मंगलकार्य २ (सांकेतिक) मैथुन ०गा-स्त्री एक प्रकारची लगाम -अश्वप ११८५ ०ग्रह-पु कल्याणकारक, सुखकारक ग्रह, बुध, शुक्र व गुरु ०चिंतक-वि चांगली इच्छा करणारा, चांगलें चिंतणारा, बरें होईल अशी इच्छा करणारा ०चिंतन-न चांगलें होवो अशी इच्छा कल्याण इच्छिणें ०चिन्ह-लक्षण-न मंगलप्रद, कल्याणकारक गुण, शकुन, दिग्दर्शक गोष्ट घोड्याचीं कांहीं शुभ चिन्हें-सुरेगाड, देवमण, पंचकल्याण, रणशूर श्यामकर्ण, गोम (मुल्की, शिरोमुखी), बाशिंग, गंगापाठ, कैरे डोळ, अष्टमंगळ, कंठामरण भुजावर्त,

सप्तरती, पाहाटघावन, पदकमुख, पखेती, चिंतामणी, मेखला मुग, अष्टमगळ इत्यादि, अधोमुखी गोम इत्यादि शिलावर्ते, पाटावर्ते इ०ही अपेरट अथवा मध्यम गुणकारी व इतर अशुभ चिन्हें असतात तीं अशुभ चिन्हें या शब्दांत दिलीं आहेत ०वर्तमान-न १ चांगली बातमी, सुवार्ता मंगलवार्ता, संदेश २ (ख्रि) मॅथ्यु, मार्क, ल्यूक व जॉन यांनी लिहिलेले नव्या कराराचे भाग ०वार्ता-स्त्री मंगलदायक, कल्याणकारक, सुख कारक बातमी, वर्तमान, हकीकत ०वेळ-ळा-स्त्री मंगलदायक वेळ, दिवसांतील कांहीं विशिष्ट अनुकूल काल वेळ पहा

शुभा-स्त्री १ पार्वतीचें नांव २ गोंवर या रोगास म्हणतात. ३ (सांकेतिक, अशुभ सूचना टाळण्याकरितां) गोंवऱ्या, शेणी यास म्हणतात 'घळे शुभा घवाचिती। विस्येक ढेकळें भिंती।' -चगवरून महावल्लभट चरित्र १६ 'शुभा वेंचोनि देशील मातें। तरी पावेन करून भा येथें।' -भवि ५३ ७९ 'शुभानावें विकती शाणी।' -निगा २८१ 'येका शुभा येकवटती।' -दा ६१७ शुभांगी-स्त्री सुंदर स्त्री, रूपवती स्त्री शुभाचार-पु शुद्ध, पवित्र आचरण, वागणूक 'शुभाचारें हाती नारी।' -गुच ११८ शुभानना-स्त्री सुंदरी, रूपवती, देखणी स्त्री शुभावेळ-स्त्री शुभवेळ पहा शुभाशुभ-वि (शुभ+अशुभ) बरेंवाईट, मंगल व अमंगल, ऐश्वर्य अथवा दारिद्र्य, पाप पुण्यात्मक 'तेथें शुभाशुभ कर्में। जिये निफजती प्रकृति धर्में।' -ज्ञा ३ १७८ शुभासन-न मंगलकारक आसन, बैठक, जागा, सुंदर बैठक, शकुनाची जागा 'शुभासनीं रुक्मिणी वैसलीसे।' -साब्द ८ ६२ शुभेच्छा-स्त्री ज्ञानी जीवाच्या सप्तभूमिकांतील पहिली भूमिका, ही मुळें अनुताप होऊन साधनचतुष्टयसंपन्नता येऊन गुरूपदेशपात्रता येत, चांगली मंगलदायक इच्छा

शुंभ—पु १ एका राक्षसाचें नाव यास दुर्गेनें मारलें २ (ल) मंद, मट्ठ, मूर्ख मनुष्य, बुद्धिहीन, मतिमंद पुरुष 'शठ शुंभ कातरू।' -दा २ ३ २९ [स शुभ्=शोभणें]

शुभ्र—वि पांढरें, धवल श्वेत, सफेत [स] शुभ्रा-पु (सांकेतिक) रुपया शुभ्रांशु-पु चंद्र 'शुभ्रांशूदय होता जाउनियां शत्रुच्या पुरी माजी।' -मोरामायणें १ ४४ शुभ्रीकरण-पांढरें करणें, ओपविणें, रंगहीन करणें शुभ्रोष्ण-वि पांढरें होईपर्यंत तापविलेलें -पदाव २२ शुभ्रोष्णता-स्त्री घन पदार्थ शुभ्र होई इतकी उष्णता -रसा

शुमार—पु (रूढ) सुमार पहा शुमार हें रुप शुद्ध आहे परंतु प्रचारांत सुमार हेंच आढळतें [फा शुमार]

शुरका—पु अने भागीदार, पातीदार, वाटेकरी 'तीन शरिकांपैकीं येकासी नमूद झाल्यास त्यानें दोन शुरकास इतला द्यावी' -रा ७ ८ [अर शिर्क=भागीदारी]

शुरत—स्त्री कीर्ति, नांव [अर शुहरा=कीर्ति]

शुरवात—स्त्री सुरवात पहा आरंभ.

शुरा—पु कीर्ति, नांव [अर शुहरा=कीर्ति]

शुरू—पु १ प्रारंभ, आरंभ २ अरबी सन -वि आरंभिलेलें, चालू झालेलें सुरू पहा [अर. शुरू=आरंभ]

शुरू—पु एक झाड, सुरूचें झाड [फा सर्व]

शुरू, शुरूंशुरू—वि (रूढ) सुरुंसुरू पहा

शुल्क—न १ मुलीबद्दल वराकडून घेतलेलें द्रव्य, हुंडा. २ जकात, कर, दस्तुरी ३ अहेर, (कायदा) विवाह प्रसंगाखेरीज मिळालेलें स्त्रीधन -पक्ष ६१. ४ घरगुती काम, घरचीं भांडीं वापरण्याबद्दल, दुभत्या जनावराची चाकरी केल्याबद्दल मिळणारा मोबदला, अवांतर प्राप्ति [स शुल्क्=अर्जण]

शुल्ली—स्त्री (तंजा) जळाऊ काटक्या, ढलपी [तामिळ-शुल्लि]

शुशुमार—पु सुसर, मगर 'शुशुमार घडियाळ मत्स्य मगर। कूर्म करमीन जळविस्तार।' -भादि २१ ७७ 'नेणसि भवशुशुमारा' -भ सुपद ४१ [स शिशुमार]

शुश्रूषण-षा—नस्त्री १ सेवा, चाकरी, परिचर्या 'ययाचें जें शुश्रूषण। तें स्वकर्म।' -ज्ञा १८.८८३ २ श्रवण करण्याची इच्छा [स श्रु=ऐकणें]

शुषिरवाद्य—न पोकळ वाद्य, पावा, अलगुज, मुरली, सनई वगैरे [सं]

शुषुप्ति—स्त्री सुषुप्ति पहा निद्रा

शुष्क—वि १ कोरडें, वाळलेलें, सुकलेलें 'शुष्क काष्टीं गुरगुरी। लाज हरि न धरिती।' -तुगा ३७५३ २ (ल) रोड (शरीर), कृश [सं शुष्] ०अन्न-न कोरान्न, कोरडें अन्न, शिधा, धान्य 'तयसि म्हणे बाहुक। आम्ही करू स्वयपाक। शुष्क अन्न देइजे सम्यक। आम्हालागी।' -कथा १ १० १३५ ०ऊर्ध्वपात-न (शाप) कोरड्या पदार्थास उष्णता देऊन केलेलें ऊर्ध्वपातन (इ) ड्राय डिस्टिलेशन-सेंपू २ ६९ ०काष्ठ-न सुकीनें शुस्क काष्ठ पहा ०कूप-पु कोरडी विहीर ०वाद-पु रिकामा, निष्फळ वाद चर्चा, कोरडा वाद 'शुष्क वाद वृथा गोष्टी। त्यातही वाग्वाद उठी।' -एभा १८ २०९ ०वैर-न १ अकारण शत्रुत्व, अहेतुक वाकडेपणा २ निष्फळ, बेफायदा शत्रुत्व, भांडण ३ शत्रुत्वाचा आविर्भाव, दिखाऊ भांडण शुष्काशुष्की-क्रिवि रिकामपणीं, निष्फळ, बेफायदा, निरुपयोगी (श्रम करणें, काम करणें, यातायात करणें, परिश्रम घेणें) शुष्केष्टि-स्त्री अभ्यासाकरिता, शिकण्याकरिता, प्रत्यक्ष अनुभव घेण्याकरिता, करावयाच्या संस्कार, विधि अथवा प्रयोगाची तालीम, मांडणी, पूर्व प्रयत्न [स शुष्क+इष्टि] शुष्कोपचार-पु अव

१ कोरडे, निष्फळ, व्यर्थ उपाय, योजना बेफायदा तरतूद. २ (ल) निर्विक पोकळ, प्रतिकार आश्वासन, शुभेच्छाप्रदर्शन शुभचिंतन

**शुहदा**—पु शठ सोदा, लुच्चा, हरामी, उढाणटप्पू [ हि अर शहीद=धर्मवीर अन ]

**शुहूर**—पु अरबी सन, एक कालगणना —अदिलशाही फर्मानें [अर शुहूर=महिन, शहर्=चांदमास याचें अनेकवचन रा सोर]

**शूक**—पु न १ कुसळ, कूस (गवत, धान्य याचें) २ सड कटक काटा ३ सुरवट, एक कुसळाचा किडा [स] ०दोष-पु १ ज्यामध्यें कळा, शिलक चमक टोंचणी लागते असा रोग (कुष्ठ रोगाची पूर्वावस्था) २ सुरवट घातलेल्या लेप, मलम वापरल्यामुळें होणारा रोग (असा लेप वाजीकरणात लावतात) ०धान्य-न ज्यास पुढें कुसळ असतें अशा जातीचें धान्य (भात वगैरे याच्या उलट शमीधान्य)

**शूकर**—पु डुकर **शूकरी**—स्त्री डुकरीण 'शाळीची शूकरी माय। विष्ठा खाय विटीची।'—तुगा ४१० [स शूकर]

**शूद्र**—पु चातुर्वर्ण्यातील चवथा वर्ण व त्या वर्णातील व्यक्ति इतर तीन वर्ग ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे होत हा वर्ण विराट् पुरुषाच्या पायापासून उत्पन्न झाला अशी समजूत आहे २ (ल) हा शब्द उपसर्ग रूपानें दुसऱ्या शब्दास लाविला असता त्या शब्दानें व्यक्त होणाऱ्या पदार्थाचा काळसर, धूसर, असा प्रकार दर्शविला जातो उदा० शूद्र हिरा—काळसर, मद तेजाचा हिरा तसेंच शूद्र भाग-सबजी-पिंपळ—काळी भाग-सबजी-पिंपळ वगैरे [स] ०दोक-न शूद्राचा स्पर्श झालेलें वस्त्र, पात्र, पाणी वगैरे [शूद्र+उदक] ०मुखी-वि १ पाढऱ्या कपाळाचा, कपाळास गंध नसलेला २ पाढरे पायाचा व कपाळावर कोणतीहि खूण, चिन्ह नसलेला (घोडा) ०लोक वि शूद्राचा स्पर्श झालेलें वस्त्र पात्र पाणी वगैरे **शूद्री**—स्त्री शूद्राची स्त्री, शूद्र जातीची स्त्री —वि शूद्रासबंधीं शूद्राचें (भाषा वेष, रीत विधि वगैरे) **शूद्रोदक**—न शूद्रोदक पहा

**शून्य**—न १ अभाव राहित्य नास्तित्व रिक्तता; पोकळी २ सख्यचा अभाव दाखविणारें चिन्ह पूज्य ३ अनुस्वार विसर्ग दर्शक चिन्ह ४ आकाश अवकाश पोकळी ५ (वेदांत) निराकार ब्रह्म 'आपुलिया साटोवाटीं। शून्य घाती उठाउठी।' —ज्ञा १२ ५८ —वि अभावात्मक, रिक्त रिकाम खाली, विरहित (समासात) द्रव्य-ज्ञान-युक्ति-अर्थ-जळ शक्ति-वृक्ष-पुष्प-पर्ण-शून्य २ नग्न उघड निवस्त्र पात्रादि विरहित वस्तुविरहित पोकळ, उघडेबोडके ३ उजाड निर्जन सुन वेचिराख (सभासात) शून्य मंदिर-गृह-प्रांत-स्थळ धावोनि य उदज केवळ शून्य पाहे।' मोरामायण १ ४२५ ४ बधिर चेतनारहित सज्ञाविरहित 'तो आपल्या शोकावेगानें इतका शून्यचित्त झाला होता'—मायचा बाजार (ग्राम्य) **शून्यस्थानीं पडणें**—निष्फल निरर्थक होणें, वाऱ्यावर जाणें 'परि जवणार त रोगिष्ट। तरि त सुगरिणीचे कष्ट। शून्यस्थानीं पडियले।' [स शुन्=जाणें] सामाशब्द ०ख्याति-स्त्री ख्याति पहा ०दृष्टि-स्त्री १ निर्विकार चेतनारहित दृष्टि 'तिच्याकडे तो शून्यदृष्टीनें पहात बसला'—मायचा बाजार २ (नृत्य) एक अभिनय डोळ्यांतील बुबुळें स्तब्ध व एका रेषेत ठेवणें, पापण्या निश्चळ ठेवाविलें हा चिन्तादर्शक आहे ०देह-वि बधिर चेतनारहित अग झालेला विशिष्ट रोगानें पीडिलेला ०परिकर्माष्टक-न (गणित) शून्यासबंधीं बेरीज वजाबाकी, गुणाकारादि आठ क्रिया परिकर्माष्टक पहा ०मंदिर-न मूर्ति विरहित देऊळ मशीद 'श्री शाळिग्रामशिळा यवनाचे शून्य मंदिरीं पडली।' —स्फुटभार्या ०मस्तक-स्त्री-वि ज्याचे तीन किंवा चार पाय पाढरे असून डोक्यावर (किंवा कानाजवळ) भोंवरा वगैरे कोणतेंहि चिन्ह नसतें असा (घोडा) —अश्वप १ १७ ०लब्धी-स्त्री १ भाज्यापेक्षां भाजक मोठा असल्यास भागाकार शून्य येतो ती २ (अर्वाचीन) अत्यंत सूक्ष्म सख्याचें गणित 'शून्यलब्धी पर्यंत माराकूट करून मजल मारा'—नि १०३० ०लिंग-न निराकार परमात्म्याचें, ब्रह्माचें चि ह खूण 'ज शून्यलिंगाची पिंडी। ज परमात्मयाची करडी।'—ज्ञा ६ २७३ ०वाद-पु जग हें केवळ अभावात्मक आहे म्हणज काहीं नाहीं म्हणजेच ब्रह्म असें मत ०वादी-पु शून्य वादाचा पुरस्कर्ता ०वेला-वेळ-स्त्री (ज्योति) मध्यान्ह मध्यरात्र व सध्या काळ या वेळास सज्ञा कारण यावेळीं केलेलीं कृत्यें निष्फळ होतात ०शेज-सेज-स्त्री माया ०सिद्धान्त-पु पदार्थ मात्र नाशिवंत म्हणून नाहींतच व ब्रह्महि असतें तर प्रत्ययास येतें ज्या अर्थी प्रत्ययास येत नाहीं व जें नाहीं तेंच ब्रह्म हा सिद्धान्त शून्यवाद पहा ०हृदय-वि १ सज्ञा जाणीव नाहींशी झालेला २ निष्ठुर क्रूर (मृदु) भावना नाहींशा झालेला अन्त करण नसलेला ३ मन इच्छा वासना नष्ट झालेला वासनाच्या पलीकडे गेलेला अतींद्रिय **शून्याकार**-वि १ अभावरूप ओसाड निर्जन, उध्वस्त शून्यरूप २ स्थलकालादि मर्यादा नसलेला निराकार सर्वव्यापी (प्रसरणशीलत्वेनें) सर्वनाशी (आवरणशीलतनें) (ब्रह्म) **शून्याकृति**-वि अक्रिय नाकर्ता 'लॉर्ड लान्सडौनसारखे शून्याकृति व्हाइसरॉय आले कीं निरंकुश यजमान आमचे डोक्यावर बसतात'—टिळ १ १ २८६ **शून्यतुल्य**-वि निरुपयोगी, निर्माल्यवत्.' **शून्यालय**-न मशीद-(कर्नेयाचें) आत्मवृत्त १४

**शूर**—पु वीर पराक्रमी पुरुष योद्धा लढवय्या —वि १ पराक्रमी शौर्ययुक्त युद्धकुशल २ धीट धाडसी साहसी

निर्भय, उदार, धीर. ३ कोणत्याहि गुणांत अग्रेसर, विशेषत्वानें एखादा सद्गुण असलेला उदा० (समासान) दानशूर, कर्मशूर रण-आरंभ-वाद परोपकार-गृह-गान-स्नान-भोजन-शयन-प्रवास-शूर [स] ०सेन-पु एका देशाचें नाव मथुरेच्या आसपासचा प्रदेश

शूर्प—न सुप, धान्य पाखडण्याचें बांबूचें साधन 'वसाजहि शूर्प न गुणे ल्ही सभ्याह्ताशुभ व्यजन्त।' -माकर्णे (नवनीत पृ ३३४) [स शूर्प्=मोजणें] ०कर्ण-पु सुपासारख्या कानाचा, गणपति 'शूर्पकर्ण षण्मुख जयाचे नवलपरीचे सुत।' -(प्रभाकर) -लक्ष्मी-पार्वती संवाद ०णखा-नखा-स्त्री १ रावणाची बहीण २ (ल) कुरूप स्त्री, कजाख स्त्री

शूल-ळ—पु १ एक हत्यार भाल्यासारखें हत्यार 'मधुनामकासुराला पूर्वी जो अर्पिला शिवें शूळ।' -मोरामायण १ १५५,२८५ २ तीक्ष्ण अग्राचा लोहस्तम्भ (अपराध्यास मारण्याकरिता) सूळ ३ तीक्ष्ण, तीव्र वदना निडीक, कळ ४ मेख, खिळा, टोंचणी (लोखंडी) ५ (ज्यो) सत्तावीस योगातील नववा योग ६ (आगरी) भातशेतींत उगवणारें एक तण, वेणण [स] ०गव पु एक स्मार्त पशुयज्ञ -ज्ञाको दा ९१ ०पाणि-णी-पु महादेव, शिव, शंकर 'कंठ शीतळ जपतां शूळपाणी। राम जप अविनाश भवानी।' -तुगा ३९८

शूळी-पु महादेव, शंकर 'गरळजळित शूळी रामनामें निवाला।' -दावि १६९

शृखला-ळा—स्त्री साखळी, वेडी, लोखंडी कड्यांची बनविलेली माळेसारखी दोरी [स] ०बंध-पु १ साखळीनें बांधून केलेलें निरोधन २ (नृत्य) नर्तकांनीं एकमेकांच्या हातांत हात घालून रांगेनें उभें राहून केलेलें नृत्य [स] ०बंधन-न साखळीनें वेडीनें बांधून केलेली अटक

शृंग—न १ जनावराचें शिंग २ पर्वताचें शिखर 'महरवा द्रीच्या शृंगीं बैसावया।' -ज्ञा १७ २४२ ३ चंद्राच्या कोरेचा निमुळता भाग उभें टोंक ४ (ल) भांडण उपस्थित करण्या करितां करेलें चिडखोर टोंचणीवजा भाषण कृत्य, उपस्थित केलेला मुद्दा वगैरे, तंट्याचें निमित्त ५ एक वाद्य शिंग 'टाळ मृदंग मोहरिया। पावे शृंगें घुमरिया।' -ह १० १४० [स] ०ऋष्य-पु एक मुनि, पर्जन्य पडावा म्हणून याची प्रतिमा करून आराधना करितात, दशरथाचा जामात ०ग्राहिका-स्त्री (न्यायशास्त्र) समुदायाचें एकदम ग्रहण न करिता प्रत्येक पृथक् व्यक्तिद्वारा समुदायाचें ग्रहण एखाद्या गोष्टीनें व्यक्त होणारी सर्वसाधारण सामुदायिक कल्पना घेण्याऐवजीं तींत व्यक्त होणारे निरनिराळे महत्त्वाचे मुद्दे पृथक्पणें विचारांत घेणें शृंगापत्ति-स्त्री (न्यायशास्त्र) दोन वैकल्पिक गोष्टींपैकीं कोणतीचाहि स्वीकार केला असता अनिष्ट घडून यण्याची परिस्थिति (इं) डायलेमा [स] शृंगाटक-पु चौक 'समस्त शृगाटक नोप वेती।' सारुद्र ६ ३ [स] शृगी-पु शिवाचा अनुचर, गण -स्त्री एक वाद्य शिंगी 'शृगी खेंची करि जागृत मित्रसेना।' -वामन (नवनीत पृ ९२) -वि १ शिंग असणारा २ शिखर असलेला ३ ज्याच्या शेंडींत किंवा कानाच्या मधील भागांत मांसाचा खिळा दिसतो असा (घोडा) -अश्व १ ९३

शृंगार—पु १ नवरसांपैकीं एक रस (प्रेम, कामभावना वगैरेंचें वर्णन करणारा) 'देशियचनि नागरपणें। शातु शृंगारातें जिणें।' -ज्ञा १० ४२ (समासात) शृंगार-लीला-रस-सुख-विनोद-शास्त्र-गृह-प्रिय-भाव-सभाषण-मत्सर इत्यादि २ अलंकार, भूषण, शोभा, थाट 'अगा बालका लेवविजे लेणें। तया शृंगारा बाळे काइ जाणे।' -ज्ञा १० ५८ ३ (स्त्रियांनीं केलेले) प्रेमदर्शक हावभाव, आविर्भाव, लज्जादि प्रदर्शन, नखरा, चाळे वगैरे ४ स्त्रीपुरुषाचा कामुक व्यवहार [स] ०कलह-पु प्रेमकलह, प्रेमाचें लटकें भांडण ०गळेसरी-स्त्री एक गळ्यातील भूषण, दागिना ०चेष्टा-स्त्री १ (स्त्रियांनीं केलेल्या) कामुक चेष्टा, चाळा, प्रेमविषयक हावभाव, खेळ २ स्त्रियांचा नखरा, प्रेमप्रदर्शन, प्रेमविलास ०पट्टी-स्त्री घराच्या पुढील दरवाजाच्या चौकटीच्या वरच्या बाजूस गणेशपट्टीच्या वर बसविलेली कोरीव काम केलेली पट्टी ०पण-न शोभा 'मग न चालतें कळेवीण। शशिबिंब जैसें परिपूर्ण। तैसें चोखी शृंगारपण। मनाचें जें।' -ज्ञा १७ २३० ०पेटी-स्त्री स्त्रियांची फणी-करंड्याची सुंदर पेटी 'तुम्हीं माईला तेवढी शृंगारपेटी आणलीत।' -बहकलेली तरुणी १९ ०मराळिका-मराळी-स्त्री सुंदर स्त्री, रूपवती [शृंगार+मराळिका=हंसी] ०मुरड-पु शृंगारोपभोग 'शृंगार मुरड उत्तम जन। तेथें भोग भोगितसे।' -नव ११ ६४ ०लज्जा-स्त्री प्रेमविषयक वरवर दिसून येणारी लाज, विनय, ओढूनताणून आणलेला बुजरेपणा, नखरा, कामुक लज्जेचा आविर्भाव ०लालन-न (स्त्रियांनीं केलेले) कामुक चाळे, चेष्टा, प्रेमयुक्त लाड कौतुक हावभाव ०साज-पु स्त्रियांचा गळ्यातील एक दागिना शृंगारणी-स्त्री सजवणूक आराम शोभा साज शृंगारणें-स्त्री सुशोभित करणें सजविणें नटविणें शोभविणें भूषविणें शृंगा(धा)रिक-वि १ शृंगाररसविषयी २ शृंगारी शृंगाराचा भोक्ता 'शृंगारिक नव रसिक। यामध्यें म्हणावे येक।' -दा १४ ५ २१ शृंगारित-वि सजविलेला, नटविलेला भूषविलेला शोभायमान, सुशोभित शृंगारी-क-वि १ शृंगारशास्त्रांत निपुण २ कामुक वैषयिक, प्रेमासक्त कामी ३ शृंगाररसविषयी, प्रेमविषयक ४ (कों) घराच्या बांधणीचा एक प्रकार आहे त्या प्रकारचा

घाधे ७ १२

शृंगारिलें—भावि १ शोभविलेलें, भूषविलेलें २ नकली, मुलामा दिलेलें, वरवरचें 'काय भागीपासीं शृंगारिलें चाले। पोटींचें उक्लें कसावाशीं।' –तुगा २८०६

शृंगारवेली—स्त्री एक जात (वादक नर्तक?) 'बाय धारी शृंगारवेली।' –नव ११ ७०

शृगाल-ळ—पु कोल्हा, जंबुक [स] शृगाली–स्त्री कोल्ही

शृघारी—वि शृंगारी पहा 'शृघारिया देवाचा रतिरसु।' –शिशु १५६

शृजणें—क्रि (प्र) सृजणें पहा निर्माण करणें

शृत—भावि शिजलेलें

शें—वि शभर, शत शतकवाचक शब्दापुढें या शब्दाचा विशेषत उपयोग होतो उदा० दोनशें, तीनशें, पाचशें वगैरे 'त्या सुहृद्गणातुनि यथाशर काढी सानुकप शौरी शें' –मोकर्ण ५० १ [स शतम्] शेंकडा–पु शभर वस्तूंचा गट, समुदाय, शमरी –क्रिवि दर शभरास प्रत्येक शभर वस्तूंस वगैरे 'शेंकडा आठ आणे व्याज' शेंकडों-शा'-शा–क्रिवि शतश, शभरानीं, शेंकड्यानीं

शे—क्रि (खा) आहे [गुज छे, स अस्ति]

शेऊर—स्त्री (राजा) एक झाड, शवरी पहा

शेऊळ—स्त्री शीळ 'कामु शऊळ घालु लागला' –बाळ ७० [ध्व]

शेऊळ—स्त्री (कु) शेवाळ

शेऐशीं—वि (राजा) ऐशीं अधिक सहा ८६ शायशीं [स षडशीति]

शेक—पु १ घग, झळ, विस्तवाची उष्णता ऊन कपड्यानें, गरमपाण्यानें, पानानीं औषधानीं वगैरे शरीराच्या एखाद्या भागास दिलेली ऊब, उष्णता वगैरे 'अग्नी पेटवूनी एक्या ठायीं। शेक घेती व्यवसायी।' –नव २५ ८ २ शेकोटी, आगटी (शेकण्याकरितां काटक्या पानें वगैरेची केलेली) ३ (कों) शेती वगैरेच्या वहितीसाठीं दिलेल्या बैल वगैरे जनावराबद्दल घ्यावयाचें भाडें, मोबदला (क्रि० देणें, घेणें) [स सेक माइभइ १८३४] ०लागणें–झळ लागणें, चट्टा बसणें, नुकसान होणें पैसा खर्च होणें शेकणें–उक्रि १ शेक देणें, घेणें, ऊब देणें, घणें २ (ल) अंगावर बाजू यणें चट्टा बसणें एखाद्या व्यवहारांत नुकसान येणें शे-(शें)कणी–शेक देण्याची क्रिया शेकशेगडी–स्त्री बाळंतिणीस, आजारी मनुष्य वं रोग शेक देणें इतर उपचार करणें वगैरेबद्दल सामान्यपणें योजतात (क्रि० करणें) शेकाटणें–अक्रि शेक येणें, शेकाटा घेणें, शेकाटा–पु शेक, उबारा, धग

शेकाटी-कुटी-कोटी–स्त्री शेक, आगटी, शेकण्याकरित पेटविलेला काटक्या, गवत वगैरे पानाचा विस्तव, जाळ, आग शेकायणें–अक्रि १ पोळणें, भाजणें, जाळ लागणें अंगास ज्वाला वगैरेनीं इजा होणें २ (ल) बाजू अंगावर यणें, चट्टा बसणें, नुकसान यणें, होणें

शेक—स्त्री (राजा) भाजी; शाक पहा 'शेकेक=भाजी पाला'

शेकचिल्ली—पु प्र शेखचिल्लि वेडापीर, उल्लु मनुष्य

शेकट-शेकटणी—शेगट, शेगटवणी पहा

शेकटू—वि कडवट, कडसर किंचित् कडू

शेकदार-री—पु स्त्री (प्र) शेखदार-री पहा

शेकरा-री-रू—पुस्त्रीन खारीच्या जातीचा एक प्राणी

शेंकरें—वि (कों) कुजकें घाणेरडें 'भेंकरें नि गाईदारनें शेंकरें' –शोक २ ५७

शेकलें—न (गो) स्त्रिया नाकांत घालतात तो सोन्याचा दागिना, मुरूलें

शेकाटा-टी—पु स्त्री लाव बाबू लाव काठी (कळकाची वगैरे) [स शाखा]

शेकानशेक—क्रिवि (गो) या टोंकापासुन त्या टोंका पर्यंत येथून तेथपर्यंत 'शेकान् शेक पाना दवर' येथपासुन तेथपर्यंत पानें मांड [शिखर+शेवट]

शेकार—पु १ घराचें छपर पेंढा, गवत वगैरे घालून घरावर केलेलें आच्छादन (वासे, व ओमण सोडून) छपराचा भाग २ छपराचें सामान गवत, झाप वगैरे ३ (क) कवलें छपराचें इतर सामान, शेकारणी–स्त्री घराचें छपर घारण्याचें काम, कवलें चाळणें वगैरे शेकारणें–उक्रि घरावर छपर घालणें कौलें वगैरे चाळणें

शेखीं—क्रिवि शेखीं पहा शेवटीं, अखेरीस 'कित्येक लोक उद्धरिले शेखीं।' –सप्र ८ १० ३९

शेखें—न (गो) कोंबड्याचा तुरा [स शेखर]

शेख—वि शेष, बाकीचा, राहिलेला 'विठ्ठलेभा शेखेंसी सरीसा।' –दाव ३८९ [स शेष]

शेख—पु पीर वृद्ध साधु विद्वान् [अर शेख] ०चिल्ली–पु वेडसर, भ्रमिष्ट मनुष्य, तपस्वी, औलिया स्वैर मनुष्य ०दार–पु शेखपावरील वसुली कामदार, तर्फेचा अधिकारी ०दारी–स्त्री शेखदाराचें काम हुद्दा ०सल्ली विचार–पु मनोराज्य 'परंतु या शेखसल्ली विचाराचा आज काय उपयोग?' –एका शिपायाचें आत्मवृत्त १४४ शेखी–स्त्री प्रौढी बढाई ऐट, तोरा फुशारकी (क्रि०मिरवणें चालवणें लावणें, करणें) 'मोठी झाली तीन परीक्षांच्या नवऱ्याची शेखी मिरवायला'–पढाये

[फा शेखी] शेखीशोखी—स्त्री गर्विष्ठपणा, चढेलपणा, उन्मत्त पणाची वागणूक 'मिरजेस फौज गुतली यामुळें हैदर नाइकानें शेखीशोखी केली आहे'—ख १ १३८

शेखर—पु डोक्यावरचा तुरा, मुगुटावरील तुरा. [सं] शेखरीभूत–वि श्रेष्ठ प्रतीचें, प्रमुख, मुख्य 'त्याकाळीं त्या मगध देशास शेखरीभूत अशा नगरीचें पाटलीपुत्र हेंच नाव सर्वतोमुखीं होतें'—चद्रगुप्त २१

शेखीं—क्रिवि शेवटीं, अखेरीस, पर्यवसानीं 'जीवा ऐक्य होय शेखीं।'—विपु २.९६ 'शेखीं अनुसरेल पंचत्वा'—ज्ञा ३२८ [सं शिखा, शेखर]

शेंग, शेंगळ, शेंगाळीं—पुस्त्री एका माशाचें नाव,

शेग—स्त्री (राजा कुण) राग, ओळ (एका टोंकापासुन सरळ) [शिखर, शेख, टोंक] शेगाडी–क्रिवि (कु) (सरळ रेषेनें) वर-खालीं शेगानुशेग–क्रिवि (माल) या टोंकापासुन त्या टोंकापर्यंत, येथपासुन तेथपर्यंत, सपशेल, पूर्णपणें.

शेंग—स्त्री अरुद, लाबट व आत दाणे असलेलें फळ, फळी, शिंबा [स शिंबा] म्ह० सारी रात्र जागली शेंगा वागीं राघलीं= अल्प फळाकरिता घेतलेले प्रमाणाबाहर कष्ट, श्रम

शेगट—पु एक झाड, शेगवा, शेवगा याच्या शेंगाची भाजी करतात. [स शिग्रु प्रा सेग्गु–शिग्गु] शेगटवणी–स्त्री. शेगट्याच्या झाडाचा पाला किंवा शेंगा उकडून काढलेलें पाणी

शेगटी—स्त्री लांब शेंगा येणारी शेगव्याची जात

शेंगटी—स्त्री (कु.) एका माशाचें नाव

शेगडा-रा-शेगरें—पु न (लोहार, सुनार) घासण्यासाठीं वस्तु घट धरून टेवण्याचें साधन, हत्यार, पकड.

शेगडी—स्त्री शक घेण्यासाठीं विस्तव ठेवण्याचें पात्र, कगरी, आगटी [सं शकटी]

शेंगवा, शेंगूल—पु शेगट, शेवगा याच्या शेंगाची भाजी करतात

शेगाडा-डी—पुस्त्री. (कु) शेकाटा पड्ा लांब बांबू, वेळू, काठी.

शेंगोळी-ळें—स्त्रीन हरभऱ्याची डाळ, मुगाची डाळ, उडदाची डाळ वगैरे डाळींच्या भरड्याचे तोंडी लावावयास केलेले मुटके, मुटकुळीं [शेंग]

शेंघ—स्त्री (कों) शेंग पहा

शेचाळ, शेचाळीस—वि ४६ संख्या

शेज—स्त्री १ रांग, ओळ, बाजू क्रम 'धर्मनीतिहिर्ती। शेज धरी।'—ज्ञा ४५३ २ मळवट, विवाहादि मंगल प्रसगीं कपाळावर गधाचा लेप करतात (मळवट लावण्याकरिता) ती, (क्रि० भरणें, लावणें) ३ शय्या, अथरूण, बिछाना, निजण्या करिता तयार केलेली गादी वगैरे घालून मऊ जागा. 'डोळा नलगे शेजेसी। निद्रेमाजी देखे कृष्णासी।'—एरुस्व ५ ३०. ४ मोहरमातील मखर [स शय्या, प्रा. सेज्जा, गु शेज, हि. पर्सि. सेज] (वाप्र) शेज घेणें–(चाभारी) जोड्याच्या कडेचा भाग छाटणें, व्यवस्थित करणें शेज पडणें–लागणें–रांगेस लागणें, क्रमप्राप्त होणें, सुरू होणें शेजेस घालणें–नवरानवरीस एकत्र निजविणें शेजेस येणें–१ लवडणें, झोंपण्याकरिता वसणें (घोडा) २ भरून येणें, खपली धरणें, माठळणें (जखम)

शेजारती–शेज आरती–स्त्री. रात्रीं निजावयास जाण्या-पूर्वी देवाची करावयाची आरती शेजओटी–स्त्री ब्राह्मणामध्यें गर्भाधानप्रसगीं रात्रीं माहेरचीं माणसें मुलीची ओटी भरतात ती —बदलापूर २०७ शेजघर–न शय्यागृह, निजण्याची खोली, जागा शेजार–न १ शय्यागार, निद्रागृह, निजण्याची खोली, जागा 'दुधाचीं शेजारें। क्षीराब्धी ऐसीं मनोहरें।'—ज्ञा ९ ३९०. २ बिछाना, शय्या. 'जालें आपुलें शेजार। तेथें हृदयाच्या शेजारीं।'—विपु २ ९४. [स शय्यागार]

शेजोट–पु १४–२० माणसें बसू शकतील असा चौरंग

शेजंर—रें–न १ (व) लहान ढीग.–वशाप (फे १९३५) २ (माण) खळ्याचे भोंवतीं मंडलाकार कडब्याच्या पेंढ्या उभ्या करतात तें ३ बियांची कणसें टेवण्याकरिता केलेला लाबट मुडा. ४ पेरणीचें बीं स्वतत्रतेनें मळण्याकरितां मुख्य खळ्याच्या शेजारीं करतात तें लहानसें वेगळें खळें.

शेजा—पु दिंडीदरवाज्यावर बांधलेली लहानशी खोली, घराच्या गच्चीवर बांधलेली लहान खोली, सज्जा. [स. छाया]

शेजार—पु १ पडोसीपणा, निकटवर्तित्व, लगतचें घर, जागा, आवार, सामीप्य २ शेजारी, पडोसी, लगतच्या घरात राहणारा [शेज] ०धर्म–पु शेजाऱ्यासबधीं वागणुकीची रीत, पद्धति, नियम. ०पाजार–पु शेजार, जवळ वास्तव्य, सामीप्य. [शेजार द्वि] शेजारी–पु शेजारीं राहणारा, लगतच्या घरांतील मनुष्य, पडोसी शेजारीण–स्त्री. शेजाऱ्याची बायको, शेजारीं राहणारी स्त्री वाप्र घेग शेजारणी पीस–स्वत च्या प्रतिष्ठेप्रमाणें बोलण्याप्रमाणें वागणूक न पडलेल्या शेजारणीस टोंचून बोलण्याचा वाप्र शेजारीपाजारी–पु १ सामान्यत शेजारी, शेजा-ऱ्याच्या घरांत राहणारा २ जवळपासचा मनुष्य, आजूबाजूच्या लोकास वापरावयाचा स मान्य शब्द शेजारीं–क्रिवि. सनिध, जवळ, बाजूला, लगत, समीप 'बा तूं बसत होतास मम शेजारीं। नव हा रडीत होतास अरी।'—नव २२.१६४. शेजारून–अ जवळून. शेजिया–वि शेजचा 'कीं हा एथ अनुचित गेला। शेजिया गेला।'—ज्ञा ९५२३. शेजी–स्त्री. शेजारीण म्ह० १ शेजारीं सुगरा आणि पडोसार पडला २

शेजीनें दिलें थोट त्यानें काय भरेल पोट ३ शेजीच उसन सवेंच दण शेजों-जे-क्रिवि जवळ, समीप 'तव स छाया सुशी-तळ। शेजी सरोवर निमळ।' -कथा २ ४१००. शेजुटणें-न (कों) विवाहप्रसंगीं वरवधूंची शेज भरणें, त्यांनीं सुपारी लपविणें, विडी तोडणें वगैरे विधींस म्हणतात शेझार-री-शेजार-री पहा

शेट—पु सावकार, व्यापारी, उदमी, कारागीर, सोनार, कासार वगैरे यास स्वनामतेनें किंवा त्यांच्या नावापुढें लावावयाचा शब्द 'ऐसा तु विं'ला जाउंदो रे शेट। करूनि थोभार दसी जना।' -ब ४९० २ जो मनुष्य कलावतीण, वाळगतो त्यास म्हणतात 'त्यांच्या यारास मुरळीचे शेट असें म्हणतात' -व्यनि १ [स श्रेष्ठ-श्रेष्ठिन्] म्ह० शेट सवाशेर आणि लिंग अडीच शेर=लिंगायत व्यापारी गळयात लिंग घालतात त्यावरून वरवर दिसणाऱ्या देखाव्यापेक्षा ज्याची प्रत्यक्ष योग्यता कमी आहे अशा इसमास म्हणतात ०कार-पु (गो) व्यापारी, सावकार ०की-स्त्री शेट्याचा हक्क बाजारात उपयोगात आण लेल्या धान्याची मापं सरकारी शिक्क्याचीं आहेत कीं नाहींत हें तपासणें, पेठेची व्यवस्था ठेवणें, या कामाबद्दल दुकानदाराकडून (येणाऱ्या मालावर) शेट्यास मिळणारें उत्पन्न व तें मिळ ण्याचा हक्क हा हक्क साधारण मणामागें पाव आणा असे -आडिवऱ्याची महाकाली १३ ०जी-पु शेट यासच गौरवानें म्हणतात ०शाई-स्त्री शेठजीचा तोरा, दब, ऐट, प्रतिष्ठा, सावकारीचा मान, दर्जा, हुद्दा (क्रि० करणें, लावणें, मिर वणें, मोडणें, आणणें, दाखवणें) ०शाई मोहर-स्त्री एक प्रकारची विवक्षित मोहोर (सोन्याचें नाणें) ०सावकार-पुअव व्यापारी, सावकार, उदीमी यास सामान्यपणें योजा वयाचा शब्द शेटाई-स्त्री शेटजीपणाची ऐट, दिमाख, तोरा, डौल, पदवी, हुद्दा, थोरवी शेटाणी-स्त्री सावकार, व्यापारी याची स्त्री शेटी-पु शेट पहा शेटे-शेट्या-पु १ पेठ, बंदर, गांव वगैरे ठिकाणीं मापें, वजनें, दरदाम इत्यादिकांची चौकशी, तपासणी वगैरे करणारा अधिकारी नवीन पठा वसविणें हेंहि याचें काम असे -थोमारो २ २८७ 'शेटे महाजन ऐका कोणी। चौगडियाची वरा शाधणी।' -तुगा ३७१ २ व्यापारी जातीच्या प्रमुख मनुष्यासहि म्हणतात

शेंट, शेंटफूल—न १ पुरुषाच्या जननेंद्रियावरील केस, शष्प, २ कःपदार्थ, तिरस्कार दर्शविण्याकरिता ग्राम्य भाषेंत हा शब्द योजलेला आढळतो त्याला काय शेट समजतें '[स शिट्= अनादरे' पाणिनी धातुपाठ] शेंटळणें-शेंटाळणें-अक्रि १ गुह्येंद्रियावर केंस उगवणें, वयात येणें, तारुण्यात येणें २ अवज्ञा करणें, तिरस्कार, तिरस्कारा दाखविणें, अवहेलना करणें, क्षिड-कारणें 'तुझी आज्ञा शेंटाळली तो मला काय मानतो।' ३ चनविणें, फसविणें, चकविणें, चेष्टा करणें

शेठ, शेठजी, शेठाई, शेठाणी, शेठी, शेठ्या—शेट, शेटाणी, शेटी, शेट्या, पहा

शेंठ, शेंठफूल—शेंट, शेंटफूल पहा

शेड—स्त्री १ फांक, फोड, चिरफळी, उभा लांबट कापलेला तुकडा (फळाचा) २ (माड, पोफळ, सुरमाड वगैरे झाडाची) तात, तनु हिरका, (बांधावयाकरिता काढलेली सालीची वगैरे) चिरफळी, साप, सोपट [सं छेद]

शेड—स्त्री (विणकाम) मागावर कापड ताणण्यास लागणारी धनुष्याकृती काठी

शेड-डी—स्त्री (कु) मासे मारण्याचें (फेंकण्याचें) जाळें

शेंडगलणें—सक्रि (व) शेंडे, कणसें तोडणें [शेंडा]

शेंडगाव पेंडगाव—न वादी प्रतिवादींचे मुद्दे पूर्णपणें ऐकल्याशिवाय अर्धवट केलेला निकाल, अगर समेट, अनिश्चित, संशयास जागा असलेला निर्णय, समजूत

शेंडफळ—न शेंडेफळ, अखेरचें मूल

शेडमाती—स्त्री. पिंवळसर पांढुरकी, चिकण माती शेडी, शेडू-स्त्री शाडू, पांढरी चिकणमाती

शेंडवल, शेंडवेल—स्त्रीपु एक जातीची शेंगा येणारी वेल

शेंडा—पु १ दोरीचा तुकडा, दोरखंड, वेठ, बारीक साखळी घड्याळाची साखळी २ (कों) जाडा, बळकट दोर, मोठें दोरखंड

शेंडा—पु एक प्रकारचा रंग दाट तपकिरी किंवा पिंगट रंग, भुरा रंग -वि म्हैस, बकरें वगैरेचा रंग, भुरकट, म्हैशीच्या रंगाचें.

शेंडा—पु (अधुक उजेडामुळें किंवा मदद्दष्टीमुळें दिसणारी) एखाद्या गोष्टीची छायारूप आकृति, काळसर झांक [स छाया]

शेंडा—पु एक प्रकारचें गवत हरळीसारखें गवत, शेंडेगवत, (व) जाड गवत, उदा० घोडशेंडा [स तृणाढ्य]

शेंडा—पु निशाण, ध्वज 'दोन्हीकडील शेंडे दोन उभे करावे' -वाडबाबा ३ ४९ शेंडा अर्थ २ पहा

शेंडा—पु १ शेवट, अग्र, शिखर, टोंक 'गुरुसुत नारा ज्याचा भीमल्लापातरीं शिरे शेंडा।' -मोकर्ण १०५ २ झेंडा, निशाण 'फेडून नवस माहोरास, केले लाहोरास जिंकीत शेंडे।' -ऐपो ४१८ [स शिखंडक हिं छेंडा] शेंडागोंडा-पु भाजी वगैरेच्या डिकऱ्या, कुवक, शेवग्याचीं पानें, कोंवळ्या डिग्या (सामान्यत) 'रानात गेल्यास काहीं शेंडागोंडा तरी मिळेल' [शेंडा+गोंडा] शेंड्यागोंड्यास येणें-पोटरीस येणें, कणसें बाहेर पडण्याच्या स्थितीत असणें, पसवणें शेंडाबुडखा-पु

१ वरचा व खालचा भाग, अग्र व मूळ, आरंभ अंत–पहिला व शेवटचा भाग २ आरंभापासून अंतापर्यंतचा सर्व भाग, समूळ व साग्र 'त्याचे पंचाऊतीचा झाडून सारा शेंडाबुडखा मला ठाऊक आहे' **शेंडाबुडखा करणें**–झाडाची छाटाछाट करणें **शेंडा धुंधा–शेंडामुंधा**–पु शेंडाबुडखा **शेंडा ना बुडखा**–पूर्ण अभाव, नास्तित्व, समूळ नसण्याची स्थिति 'मोरोपंताचे ग्रंथ उगीच चाळून जो पाहील त्यास सुद्धा कडून येईल कीं वरील गोष्टीस शेंडा ना बुडखा' –नि **शेंडामोरा**–पु (राजा) लहान मुलाच्या टाळूवरील न काढल्यामुळें वाढलेले व तोंडावर येणार केंस, पुढील जावळ (क्रि० बांधणें, सुटणें, पडणें) [शेंडा+मोहरा] **शेंडेछाट** पु शेंड्याची छाटणी, झाडाझुडपाची केलेली छाटाछाट (नीट दिसावें, किंवा वाढावें म्हणून) **शेंडेधान्य**–न शेत कापून झाल्यावर जे धुमारे फुटतात त्यावर आलेल्या कणसाचें धान्य **शेंडे(ड्ये)नक्षत्र**–न धूमकेतु 'हें शेंडेनक्षत्र या उत्पाताचें सूचक होय'–नि ७४६ **शेंडेपालवी**–स्त्री शेंडी पालवी पहा **शेंडे(ड्ये)फळ**–न १ मोसमाच्या अखेरीअखेरीस आलेलें फळ, अखेरच्या बहाराचें फळ २ (ल) म्हातार पणात झालेलें अपत्य ३ झाडाच्या शेंड्यावर, उंच फांदीच्या टोंकाला धरलेलें फळ ४ (ल) अखेरची गोष्ट, काम सरता सरता करावयाची गोष्ट 'असेंब्लीच्या कामाला अवघीं दोन शेंडेफळें राहिलीं होतीं' –सास २ १७० **शेंडेसलाम**–पु अनोळखी मनुष्यानें केलेला नमस्कार, दुरून केलेला नमस्कार, बोलाचाली न होता केवळ परस्पर केलेला नमस्कार

**शेंडी**—स्त्री १ डोक्यावरील केसांचा झुपका, शिखा 'सन मनीं बांधवीं जशी शेंडी ।' २ डोक्यावरील तुरा, कल्ले मोराच्या डोक्यावरील पिसें ३ धूमकेतूची शेपटी ४ घोड्याच्या टाळूवरील केस, झुलपें ५ तेल्याच्या घाण्याच्या किंवा चरकाच्या मधल्या लाटेच्या टोंकाचा भाग, बोंड ६ सोललेल्या नारळाच्या देंठा कडील काथ्याचा झुबका ७ (कु) तडीस पाण्याचें जाळें ८ मक्याच्या कणसावरील तंतूंचा झुबका ९ (चांभारी) तजास मधोमध ठेवलेलें टोंक [स शिखण्डिका, प्रा सिहण्डिआ] **शेंडी फुटणें**–अंदाजापलीकडे खर्चाची रकम वाढणें, अपेक्षे पलीकडे कोणतीहि गोष्ट जाणें, वाढणें, एखाद्या कामातून दुसरें, किरकोळ काम निघणें **शेंडी राखणें**–लहान मुलास प्रथम शेंडी ठेवण्याचा विधि करणें, चौल करणें **शेंडीस गांठी देणें**–गुरु, शिक्षक, वडील मंडळी यांच्यावर उलटणें, त्यांवर कडी करू पहाणें, त्यास अक्कल शिकविणें, त्याचा उपमर्द करणें, वरचढ करणें (**एखाद्याच्या हातीं**) **शेंडी सापडणें–गुंतणें**–कचाट्यात, तडाक्यात सापडणें अडचणीत येणें, दुसऱ्याच्या आहारीं जाणें **शेंडीस फूल बांधणें**–एखाद्या मनुष्यास चढवून आपलासा करून घेणें, एखाद्याची स्तुति करून आपलें काम साधणें, खुशामत करणें **०धर्म**–पु हिंदुधर्म **०पालवी**–स्त्री १ झाडाच्या शेंड्याचीं पानें, टिकली, अग्राचा पानांचा झुबका (क्रि० येणें, फुटणें) २ (ल) म्हातारपणात झालेलें अपत्य **०शृंगी**–वि शेंडीखालीं भोंवरा असलेला (घोडा) हें अशुभ लक्षण आहे **०शेपटी**–स्त्री (झाडाचा) अखेरचा भाग, अगदीं शेवटचीं पानें वगैरे (बागवान आपल्या कामाबद्दल म्हणतात) (यावरून लक्षणेनें) गाळसाळ, अखेरचा टाकाऊ भाग, करावयाचें शेवटचें, कमी महत्वाचें काम, किरपूर आवरसावर (क्रि० राहणें) 'काम बहुत करून आटपलें, शेंडीशेपटी मात्र राहिली'

**शेंडें**—न १ भातावर पडणारा एक रोग २ एक प्रकारचें गवत

**शेड्डी**—स्त्री (व ना) बकरी, शेरडी, शळी [शेरडी]

**शेण**—न १ गाय, म्हैस, बैल वगैरेंची विष्ठा, पुरीष २ फळें, फुलें, पानें कुजून गोळा झालीं म्हणजे त्यास म्हणतात –स्त्री १ शाणी, गोवरी, वाळलेला शेणाचा पोहो २ (वे) गुळाची ढेप [स शकृत्, शकन्, तृ शक्ना, प्रा छाण, गु छाण, सि छेणु, छेणो, स छगण–शगण–शअण–शाण–श्याण–शेण –रा ग्रंथमाला] म्ह० पडलेलें शेण माती घेऊन उठतें **शेण खाणें**–मूर्खपणाचें, निष्फळ, भलतेंच कृत्य करणें केलें खाणें पहा 'मग शेण खायला मला कशाला आणलें?' –नामना २१ **शेणाचा दिवा लावणें**–दिवाळें काढणें **शेणई**–पु शणवी पहा **शेणकई, शेणकाई, शेणकी, शेणख(खा)ई**–स्त्री १ शेण टाकण्याकरिता केलेली खाच खड्डा, उकिरडा २ (देशावर) शेणाची रास, ढीग **शेणकला–काला**–पु शेणखळा पहा **०कुंडा**–पु (राजा) घरधंदा, घरकाम, रोजचें व्यवहारातील शेणगोटा करणें, झाडणें, सारवणें, दळणें, कांडणें वगैरे काम **०कूट–कूर**–न १ गोवरीचा तुकडा, शेणीचा तुकडा २ वाळलेल्या शेणाचे तुकडे, चुरा वगैरे, गोवर **०कूर**–न शेणगोटा पहा **०कोंडा**–पु शेणात भाताचें तूस किंवा कोंडा घालून लावलेल्या गोवऱ्या **०खंड–खुट**–न शेणकूट, गोवरी, गोवर **०खळा**–पु १ सारविण्याकरिता पाणी घालून कालविलेलें शेण २ फळें, पानें, फुलें कुजून, नासून जो गोळा होतो तो **०खळी–खाई**–स्त्री शेणकई पहा **०खुट**–न १ गोवरीचें खाड, गोवर –पु २ (ल) (निंदार्थी) शेणवी **०गंड**–पु (निंदार्थी) शेणवी **०गाईर**–स्त्री (राजा) शेण कई **०गोटा**–पु १ शेण (सामान्यत) २ शेणानें सारवणें, झाडलोट वगैरे कामास योजावयाचा सामान्य शब्द यासारखेच शणगेणकूर, सडासमार्जन, सडासारवण, केरासार, झाडलोट, धूळपोतेरें, शणपोतेरें, शेणपाणी, शणसडा इत्यादि शब्द

व्यापक अर्थानें योजिले जातात **०गोठा**–पु गुराच्या गोठया सबधीं सामान्य कामाचा दिग्दर्शक शब्द, शेण काढणें, झाडणें, गोठा साफ करणें इत्यादि कामें, गोठापाणी **०गोळा**–पु १ खरकऱ्यावर लावण्याकरितां किंवा इतर कामांकरिता घेतलेला शेणाचा गोळा, शेणाचा ल्गदा **शेणगोळे घालणें**–अव्यव स्थितपण कलेलें काम तपासून दुरुस्त करणें **शेणणें**–अक्रि १ शेण टाकणें; हगणें, लेंडी टाकणें २ डोळ्यास पू येणें, चिपडें येणें **०थापणारा**–पु आळशी, निरुपयोगी, रिकामटेकडा मनुष्य; नाकर्ता, नपुंसक मनुष्य, षंढ **०दिवा**–पु दिवाळें काढल्याची खुण म्हणून लावावयाचा शेणाचा दिवा 'दिवाळखोरीचा शेणदिवाच लावणें होय' –के २० ९ ३० **शेणप**–पु (कों) शेणकला, शेणखळा पहा **शेणपा-पोह-पोहो-पोथ, शेणाचा पोहो**–पु १ शेणाचा गोळा, ल्गदा, पाहो, एका वेळीं जनावरानें कलेली विष्टा २ (ल) लट्ठ परतु दुर्बल, जड, मद्दड जनावर, दुर्बल, नाकर्ता, नालायक मनुष्य, षंढ; नपुंसक **०पाटी**–स्त्री शेण वाहून नेण्याची टोपली **०पाणी**–न १ शेणखळा, पाण्यांत कालविलेलें शेण २ शेणगोटा, सडा-संमार्जन वगैरे घरगुती कामासबधीं व्यापक अर्थानें योजावयाचा शब्द, गोठापाणी **०पुजा**–स्त्री शेणमार पहा **०पुंजा**–पु १ शेणगोळा करणारा इसम २ शेणगोळ्यासारखा मनुष्य, हलक्या दर्जाचा मनुष्य, नीच, हलकट मनुष्य **०पुंजी**–स्त्री गोंवऱ्या लावणारी स्त्री, हलकट, नीच स्त्री **०पुडा**–स्त्री वाळकेल्या शेणाचे तुकडे, चूर, गोवर **०पोतेरें**–न शेणखळ्याच्या बोळ्यानें जमीन सारवणें (क्रि० करणें) **०भोंवर**–पु शेणकिडा, शेणावरील माशी, शेणावरील भुंगा [स शेण+भ्रमर] **०माती**–स्त्री. (ना) धुळवड **०मार**–पु एखाद्याची अप्रतिष्ठा व्हावी म्हणून त्यावर केलेला शेण, चिखल इत्यादिकाचा मारा **शेणवड**–स्त्री. (कों) १ धुळवड, शेण, माती वगैरे फेंकणें, मारणें २ धुळवडीच्या दिवशीं एकमेकावर फेंकण्याकरितां केलेली शेण, माती वगैरेची राड, मारा **शेणवडणें**–अक्रि. शेणवड करणें **शेणपाणी**–न शेण कालविलेलें पाणी **शेणविरणें**–अक्रि राब करण्यासाठीं शेतात शेण पसरणें **०सडा**–पु १ पाण्यात शेण कालवून तें जमिनीवर शिंपणें, उडविणें (क्रि० टाकणें) २ फळें, फुलें, पानें कुजून त्याचा झालेला गोळा, शेणखळा ३ गर्दीमध्यें माणसावर उडविलेलीं फुलें, पैसे, कवड्या वगैरे जमीनीवर पडून पसरलेलीं दिसतात तो ४ लढाईमध्यें भयकर कत्तल झाल्यामुळें जमीनीवर सांडलेला रक्ताचा स्राव, मासाचे छिन्नभिन्न तुकडे वगैरे 'त्या अडचणींत पाचशें मनुष्यें ठार झालीं, तैशीच घोडींहि पडलीं, तैसच जखमीहि झाले, केवळ शेणसडा होऊन गेला' –भाव ७९ 'केला शेणसडा त्याच्या फौजेचा।' –गापो ३ **०साऊळ**–स्त्री. पोफळीची अळी खणून तिच्या मुळाशीं शेण घालतात तें **०सूप**–न शेण भरून टाकण्याचें सुप, शिपतर **शेणाडी**–स्त्री शेणकई **शेणामेणाचा**–वि दुर्बल, निःसत्व, अशक्त, हलका, पोकळ, वरपांगी, लिबलिबीत, मऊ, सोपा वगैरे (इमारत, वस्तु, धंदा, प्राणी, मनुष्य याच्या बाबतींत) तिरस्कार, उपेक्षा दाखविण्याकरिता योजतात 'दिवसेंदिवस शेणामेणाचे ते लेरडाचे होत चालले.' –भाव ५९ **शेणामेणा लोखंडाचा**–वि प्रथम फारच दुर्बल, शिथिल परंतु नतर कांहींसा दृढ, त्यानतर फारच दृढ असा (व्यवहार, भाषण वगैरे) **शेणार फाढप**–(गो) जमीनदोस्त करणें, नुकसान करणें **शेणारा**–पु गोंवऱ्यांचा लिंपलेला ढीग, रास **शेणी**–स्त्री १ गोवरी, थापडा, शेणाचा वाळविलेला गोळा २ शेणाचे वाळलेले पोहो (अव) 'नामयाची जनी सर्वे वेची शेणी।' –तुगा ३६९१ ३ अग्निहोत्र्यानें होमाकरिता शेणाचे वाळविलेले गोळे ४ (राजा) (सांकेतिक) ढुंढा पैसा, ढब्बू पैसा (वर) **शेणी रचणें**–जाळणें, नाहींसें करणें 'लोकलाजेवरी रचिल्या शेणी।' –मव्व २२८. **०पाणी**–न सडा घालणें, शेण्या घालणें, पाणी आणणें वगैरे काम (क्रि० करणें) **शेण्या**–पु शेणाचा पोहो –वि डोळे आले असता कमी सुपतो पण पू बाहेर येतो त्या विकारास म्हणतात **शेण्या खैर**–पु खैर झाडाची एक जात **शेण्या-साप**–पु एक काळा विषारी साप

**शेणई-य, शेणवई-वयी-वै**—पु शेणवी पहा

**शेणसा-गी**—पु हवालदाराच्या हाताखालचा नाईक [म सेना]

**शेणवी**—पु एक ब्राह्मण जात, सारस्वत, मुख्यत लेखन व्यवसाय करणारी एक जात इतर रूपें शणै, शानई; शणई. [स सेनापति, प्रा सेणावइ, शाण्णवी]

**शेणचें**—अक्रि (गो.) गहाळ होणें शेणुक=सांडायाला

**शेणणी, शेणणें**—स्त्री क्रि (प्र) शेंदणी-शेंदणें पहा

**शेणी-नी-शेणें**—स्त्रीन (राजा) (लोहार) छिनी [स छिद्]

**शेणो**—वि (राजा) शहाणा

**शेत**—न १ धान्य वगैरे लावण्याची जागा, क्षेत्र लागवड केलेली जमीन २ पीक; उगवलेलें, पिकलेलें उभें धान्य ३ शेतकाम, कृषिकर्म, धान्य पिकविण्याचे काम, शेती ४ नवरात्रात किंवा चैत्रात रुजू करतात तो, मांडवात रुजत घातलेलें धान्य व त्याचे अंकुर ५ (ल) उपजीविकेचें साधन, धदा, व्यवसाय पोटाची तजवीज [स क्षेत्र, प्रा छेत्त] **शेत उतरणें**–कणसें चांगलीं बाहेर पडून भरणें, कणसें, चांगली येणें **शेत घरात**

**ठेवणें-असणें-करणें**-खडानें न देता शेताची मशागत स्वत करणें **शेत तोडणें**-कोंवळया भाताच्या रोपावर रोग पडणें-कृपि २३६ **शेत सोसणें**-भात रोप्याचे केसर पाढरे पडणें, शेत सुकणें, वाळणें, एक रोग [स शुष्] (भरल्या) **शेतांतून काढणें-ढकलणें-उठविणें**-लाभ होण्याच्या ऐनवेळीं काढून लावणें, हातातोंडाशीं आलेला घास काढून घेणें **०आडगरा**-पु वि नाचणीची एकजात **०एरड**-पु एरडीचें झाड, सुरती एरडीचें झाड, सुरती एरड, मळा एरड दुसरा मोगली एरड, वईएरड **०करी**-पु १ शेतीवर निर्वाह करणारा, शेताची मेहनत करणारा, कृपीवल २ शेताचा मालक, धनी ३ शेती, खडकरी, शेतावर काम करणारा, कर्दा, कुळ **०कापशी**-स्त्री शेतात पेरावयाचें, उगवणारें कापशीचें झाड **०काम**-न शेतीचें काम, धदा **०कामी-काम्या**-वि शेतावर काम करणारा, शेतकीच्या कामीं येणारा, उपयोगी पडणारा, कृषीवल **०खट्या**-पु १ केवळ शेतकाम ज्याला माहीत आहे, इतर काहीं विद्या नाहीं असा मनुष्य, अडाणी, गावठी मनुष्य, गावढा २ शेतकाम करणारा परतु ज्याचा वास्तविक धदा शेतकीचा नव्हे, असा ब्राह्मण वगैरे मनुष्य **०खेत**-न जमीनजुमला, शेती, मत नवाडी **०गणा**-पु शेतजमीनीचा समुदाय, लागवडीची जमीन. **०गहूं**-पु गव्हाची एक जात, पाणी न देता शेताच्या ओलीवर येणारा गहू **०गी**-स्त्री शेतकाम, कृपिकर्म, जमीनीची मशागत, लागवड वगैरे 'वेठीचे उपद्रवामुळें रयत परागदा होत्ये, शेतगी होत नाहीं '-वाडसमा ३ २२४ **०घर**-न शेतातील घर, शेतकामासाठीं शेतात बांधलेली झोपडी वगैरे **०जमीन**-स्त्री लागवडीखालील जमीन **०पेढी**-स्त्री शेतकऱ्यास कर्जे देणारी सहकारी पतपेढी **०पोत**-न १ सामान्यत शेती, शेतीखालील जमीन, शेतीवाडी, जमीनजुमला २ शेतीचीं कामें; कृपिकर्म [शेत द्वि] **०वाडी**-स्त्री शेतभात, शेतीवाडी **०भात-शेतीभाती**-नस्त्री शेती शेतजमीन, शेतीवाडी, सामान्यत शेतीची जमीन व लागवडीचीं कामें यास व्यापक सज्ञा **०मळा**-पु शेती, बागायत वगैरे, जिराईत व बागाईत शेती यास सामान्य व्यापक सज्ञा **०माल**-पु शेतींत पिकणारा माल **०वड, शेताड**-स्त्री १ लागवडीची जमीन गावासभोंवतीची **०घड-घडा**-१ पु एक फुलझाड, दुधाणी, कुभा पहा २ एक क्षुद्रुप **०वस्ती**-स्त्री १ (हगामात) शेतावरील वास्तव्य, राहणें २ शेतकरी लोकाची वस्ती, गाव, खेडें; गावढें गाव **०घळी**-स्त्री घाभार लोकात मामानें घाशिग बांधल्यावर वर शेजारच्या घरीं जातो हा विधि **०वाडी**-स्त्री शेती, लागवडीखालील जमीन, कुरणें, बागायत, आवार, बाहणें वगैरे शेतीसबधीं जमीनीस व्यापक शब्द **०वार-पत्रक-वारी**-नस्त्री गांवासबधीं कुळकर्णी किंवा तलाटी यानें ठेवावयाचें सर्व जमीनीचें शेताच्या अनुक्रमानें नोंदणीपत्रक, तक्ता **०वाळूक**-न शेतात होणारें एक काकडीसारखें वेलाचें फळ, चिबूड **०सनदी**-वि लष्करी अथवा इतर सरकारी कामाबद्दल पूर्वी सनदेसह शेत मिळत असे, तसें शेत धारण करून नोकरी करणारा **०सनदी शिपाई**-पु लष्करी नोकरीबद्दल शेताची सनद मिळालेला सैनिक 'जेथें किल्ले आहत तेथें किल्लेदार शेत सनदी शिपाई टेवीत '-नि १०६१ **०सरी**-स्त्री शेती, पिकें वगैरेस सामान्य व्यापक सज्ञा 'शेतसरी पिकली ' **०सारा**-पु. जमीनीवरील कर, शेतीवरील कर, महसुल **०हेत**-न जमीन जुमला, शेतवाडी **शेतकी**-स्त्री १ शेतकाम, शेतकऱ्याचा धदा, व्यवसाय २ पीक, उभें पीक, शेत **शेताड-डी**-शेतवड पहा **शेती-क**-स्त्री १ शेतकी, शेतजमीन २ शेतलागवडीसबधीं कामें **शेती**-पु शेताचा मालक, धनी -स्त्री शेतजमीन; शेतकी **शेती पाऊस**-पु पिकाना योग्य असा पाऊस **शेती भाती**-स्त्री शेतवाडी, जमीन पहा २ शेतीचीं कामें

**शेतखाना**—पु शौचकुप, शौचाची जागा, पायखाना, सडास [फा सिहूहतखाना=आरोग्यगृह]

**शेताळ शेताळीस**—वि शेहेचाळीस ४६ सख्या 'विप्र तरला गती शेताळ।'-दावि ७२४६ [स षट्चत्वारिंशत्]

**शेतुक**—न (कु) एक जातीचा लहान मासा

**शेंद**—स्त्री १ नारळाचें वेलें, डहू २ वेल्याच्या आकाराचें फळ

**शेंदड**—स्त्री एक चिबडीसारखा वेल, शेंदाड, शेंदणी -न शेंदाड, वरील वेलाचें फळ

**शेंदडशिपाई, शेंदाडशिपाई**—पु पराक्रमाच्या गप्पा, पोकळ वाता मारणारा सैनिक, वाताड्या, पोकळ डौल मारणारा

**शेंदणी**—स्त्री शेंदाड; एक चिबूडासारखा वेल व तिचें फळ 'बहुत दिलें घेतलें तरि त्या कमसल कडु शेंदणी। रक्त मास मद भरित सुरुप मीं जसीं हिरकणी कोंदणी।'-अला १५३

**शेंदणी**—स्त्री (कों) शेंदण्याची, पाणी ओढून काढण्याची दोरी

**शेंदणें**—न १ पाणी काढण्याचा पोहरा, काहणें, बाल्दी वगैरे २ शेंदणी वेलाचें फळ -उक्रि १ पाणी किंवा एखादा जड पदार्थ खालून दोरीनें ओढून वर घेणें २ (व) अहणें 'माझा देह त्या भितीला शेंदला '-उक्रि चिरा पाडणें, किंचित् कापणें (कोयत्यानें फणस वगैरे) **शेंदीव**-वि शेंदून काढलेला [पाणी] 'शेंदीव, भरीव आणि साचीव पाणी '

**शेंदरी**—स्त्री १ जोंधळ्याची एक जात, नाचणीची एक जात-कृपि २८३ २ शिंदीच्या पानाची हातरी ३ एक हलक्या किंमतीचें. लुगडें, तांबड्या रंगाचें पातळ ४ एक भाड

माकडाच्या तोंडासारखें झाड ५ एक तांबडी फुलें येणारें झाड **शेंदरी-रा-ऱ्या**-वि १ शेंदुराच्या रंगाचा २ या रंगाचा आवा [शेंदूर]

**शेंदव, शेंदव**—न १ सैंधव, शेंदेलोण २ खारटपणा, लोणा (जमीनीचा), खारट पाझर 'खाडीच्या पाण्याचा एथपर्यंत शेंदव मारतो म्हणून एथल्या विहिरीचें पाणी खारें' ३ मीठ, गूळ वगैरेस सुटणारा पाझर

**शेंदवली**—स्त्री एक वेल **शेंदवलें**—न त्या वेलाचें फळ

**शेंदाड-डें**—न १ चिबूड, फूट 'पाहेपा शेंदाडें पिकलीं' —परामा १४ ३ **शेंदाड**—स्त्री चिबडाचा वेल

**शेंदूर**—पु शिस व प्राणवायु यांच्या संयोगानें होणारा एक रंग [स सिंदूर, प्रा सिंदूरा-सेंदूरो, हिं सेंदूर] ०**उतरणें**-१ मूर्तीवरील शेंदुराचें कवच सुटून पडणें, कवच टाकणें २ (ल) अपमान करणें, अवज्ञा, अवहेलना, अनादर करणें, मानहानि करणें ०**विकार**-पु घोगरा असलेला आवाज (शेंदूर खाण्यात आल्यामुळें झालेला)

**शेंदेलोण-शेंधेलोण-शेंदोलोण**—न सैंधव, मीठ, शेंद मीठ एक क्षार, खाणीचें मीठ [स सैंधव+लवण]

**शेन**—पु ससाणा पक्षी [स श्येन] **शेनी**—स्त्री ससाण्याची मादी

**शेन**—पु (गो) पावसाचा थेंब

**शेन**—अ शी पहा

**शेनणी-णें**—प्र शेंदणी-णें पहा

**शेनिश्चय**—पु पक्का निचार, ठराव, निकाल, शहानिशा, मनाची खात्री, समाधान (क्रि० करणें) शहानिशा पहा [सई+निश्चय]

**शेनोडी**—स्त्री (व) शिंदीच्या पात्यांचें लहान टोपलें

**शेनोत, शेनपत**—न (गो) केळीच्या पानाचा विडी करण्याकरिता केलेला लहान तुकडा

**शेप्पी**—स्त्री बडीशोप, ओव्यासारखें एक धान्य वी

**शेप, शेंप**—स्त्री शेपूट पुच्छ, शेपटी [स] सामासशब्द-०**किडा**-पु शेपटासारखा भाग असणारा किडा यास पाय नसून हा सरपटत चालतो ०**खळी**-स्त्री विण्याच्या सुमारास जनावराच्या शेपटीजवळ खळगी पडते ती ०**चौरी**-वि शेपेचा चौरीसारखा गोंडा असलेली (म्हैसी) ०**कल्याणी**-वि छीलपट, कामातुर विषयी (स्त्री) ०**मोडया**-वि १ केवळ शेपूट पिळल्यावरच असतांच चालणारा २ (ल) मठ्ठ आळशी, नालायक, कामचुकार ०**स्ट**-न एक जातीचें गवत ०**ळा**-पु १ एक किंवा २ मोठी क **शेपट**-स्त्री अतिशय जोरानें हाकणें पाठीस लागणें, दामटणें, धावडवणें (क्रि० काढणें) **शेपटणें**-उक्रि शेपट काढणें, दमविणें **शेपटणें**-उक्रि शेपूट पिळणें **शेपटा-शेपडा**-पु १ लांब शेपटी, लांबलचक पुच्छ २ (ल) पाठीवर मोकळी सोडलेली वेणी **शेपटी-शेंपटी-शेंपडी-शेंपुडी**-स्त्री १ पुच्छ, शेपूट २ (ल) जनावर गाय, म्हैस वगैरे **शेपटी**-स्त्री (ल) फोकाटी, छडी, शिरपुटी, शिपटी **शेपाटणी**-स्त्री शेपट, शक्तीपेक्षां जास्त श्रम देणें (क्रि काढणें) **शेपाटणें**-उक्रि शेपटी पिळणें, धावडवणें, दमविणें, फोकलणें, शिरपटणें, चमकाविणें **शेपडावणें**-उक्रि (मा) झोडपणें, मारणें **शेपाळ**-वि पुच्छ असलेला, शेपटीचा **शेपाळणें**-क्रि शेपटी पिळवटणें; कुदलणें, दमविणें, दामटणें **शेपूट-शेंपूट**-न १ पुच्छ, शेपटी, २ (ल.) टोंक, अग्र, अखेरचा भाग ३ (ल) जनावर, पशु गाय, म्हैस वगैरे 'दर शेपटास तीन रुपये पडतात' —के २५ ७ ३७ [स शेप] ०**अडकणें**-एखाद्या भानगडींत गुंतून राहणें, भानगडींत सापडणें, तींतून बाहेर पडण्यास कठीण जाणें, अडकून जाणें ०**घालणें**-भिऊन पळणें, भित्रेपणा दाखविणें, घाबरून निसटून जाणें ०**ठेवणें**-(एखाद्या कामाचा, गोष्टीचा, क्रियेचा) अखेरचा भाग पूर्ण न करता अर्धवट ठेवणें, थोडीशी शिल्लक बाकी ठेवणें ०**राहणें**-अवशेष, शेवटचा भाग, अखेरची गोष्ट मागें राहणें, पडून राहणें ०**लावविणें**-लावण लावणें, दिरंगाई करणें, मागची बाकी सारखी वाढवीत राहणें ०**हाल-विणें**-लोभीपणा करणें, हावरेपणा करणें, खुशामत करणें

**शेप**—न शिश्न [वेस अपत्यानि शेपम्-ऋ १० **शेपाळा-ळ्या**-वि छीलपट, कामी, विषयी, छदी **शेपाळू**-स्त्री छिनाल, विषयी, कामुक स्त्री

**शेप**—स्त्री बडीशोप, बाळंतशोप, एक ओव्यासारखें धान्य, वी **शेपट**-वि बडीशोपेसारखा वास येत असलेलें **शेपा-प्या**-वि १ शोप्या, बडीशोपसारखा वास येत असलेला (आवा वगैरे) २ एक जातीचा तांदूळ **शेपू**-स्त्री बाळंतशोपेचें झाड; याची भाजी करतात [स शतपुष्पा] **शेप्याघुडा-ड्या**-वि एका जातीचा तांदूळ

**शेप**—न एक फळ 'शेपें शितापळेंही खरबुज खिरणी सुदरें तूत बोरें।'—सारुह ३ ४९ [फा सेब=सफरचंद]

**शेपरणें शेपारणें**—शेफरणें-शेफारणें पहा

**शेफ**—न पुरुषाचें जननेंद्रिय, शिश्न [वैस शेप]

**शेफ**—स्त्री तरवारीचा एक प्रकार —सभ्या ६७

**शेफरणें, शेफारणें**—अक्रि फुगणें, चढून जाणें, मिजास करणें पुरारणें, गर्व चढणें [शेफ]

**शेंब शेंम**—स्त्री १ श्लेष्मा, शेंबूड, नाकांतून होणारा स्राव २ आतड्यातील मळ, स्राव, विष्ठा आम, आंव ३ घोड्याच्या नाकातून होणारा स्राव, मल निर्यास ४ नाकातून स्राव होण्याचा

रोग (घोड्याचा), शेंबा [स श्लेष्मन्; प्रा सिंभ] शेंबडा-ड्या शेंबडेरा-वि १ शेंबूड असलेले, शेंबडानें भरलेलें, चोंद लेलें (नाक) २ शेंबडानें भरलेलें नाक असलेला ३ (ल) अज्ञान, कळत नसलेला, अल्पवयीन शेंबा-पु १ घोड्याच्या नाकांतून होणारा स्राव २ या स्रावाचा रोग शेंबूड-पु १ नाकातील वाहणारा श्लेष्मा, चिकट बुळबुळीत स्राव, मळ, घाण हा वाढून खपली धरल्यास त्यास मेकूड म्हणतात. २ (ल) दिव्याची काजळी मस [स श्लेष्मोदक-भाइअइ १८३३] म्ह० मी हसल्ये लोकां शेंबूड मारे नाकां शेंबुडात लोळणें (ल) संसारात गुरफटून राहणें शेंबूड फेडणें-नाक शिंकरून टाकणें शेंबूडकिडा-पु (वे) गोगलगाय, पीक पिरूळी

शेंब-वी—स्त्री धातूचें टोपण, (काठी, छत्री, खांब, पल गाचा खूर शिंग, बाण यांच्या) टोंकाला मजबुतीसाठी बस विलेली धातूची, विडी, वढें, मायणी, टोपण वगैरे लोहंगीचें वेढें वगैरे नरसाळ्याची निमूळती नळी

शेंबय—उद्गा (गो) शाबास! वा! शिमग्यात पोस्त मागा वयाच्या वेळीं योजावयाचा शब्द

शेंबरटी-शेंबी-शेंबारटी—स्त्री एक कांगरी वेल

शेंबला—पु शामला पद्दा

शेंबा—पु (कु) (सोनारी) पत्र्याला कोंच आणण्याचें साधन [शेंबी]

शेंबाट्या—वि (चिपळूण) हलकासलका कोणीतरी, कमी दर्जाचा 'वकील शेंबाट्या असला तरी चालतो'

शेंबें—न (व) नासधूस मोडतोड 'मातीच्या चित्राचें त्यानें शेंबें शेरें केलें तेव्हा त्याचें समाधान झालें'

शेंबें—पुअव शताच्या सरहद्दीचे दगड (सर्कल इन्स्पेक्टरनें कायम केलेले) [स सीमा]

शेंभर्ट—वि (गो) शमर

शेम—स्त्री शेंब पद्दा

शेमट-टी—पुस्त्री एक जंगली झाड याचीं पानें आंब्या सारखीं लव असून चिंचोक्याहून लहान चपटीं फळें येतात —वगु ५ ९१

शेमणें—न लिंग, पुजननेंद्रिय [स शिश्न]

शेमला—पु डोकीला बांधावयाच्या पटक्याचा, रुमालाचा पदर, शेवट, कमरबंदाचा शेवट [अर शम्ला]

शेमली—स्त्री (कु) शेंब पद्दा

शेमलें—न एक वेलीवजा झाड

शेमेजणें—अक्रि थोडथोडा घाम येणें, घामानें ओलें होणें भिजणें, घाम बाहेर येऊ लागणें 'चार दिवस घाम आला नाहीं आता याचें अंग घामानें शेमेजलें आहे' [स स्वेद]

शेम्न—न (ग्राम्य) शेमणें, शिश्न, पुरुषाचें जननेंद्रिय

शेय्या—स्त्रीअव (खा अप.) शेवया

शेर—स्त्री. (कों) पक्ष्याची विष्ठा, शीट, छीट शेरणें-अक्रि पक्ष्यानें विष्ठा टाकणें, शीट टाकणें

शेर—पु चिकाडा, वाढेहुरा, निवली, एक कुंपणास लावा वयाचें काट्याकाट्या असलेलें चिकाळु झाड [फा शीर=दुध] शेरताटी-ताट-ताड-स्त्री शेराच्या झाडाची रांग, ओळ, कुंपण

शेर—पु १ पदार्थ तोलावयाचें किंवा मापावयाचें एक प्रमाण, माप याचें माप पूर्वी निरनिराळ्या भागात निरनिराळें असे पुढें दिलेले आंकडे रुपये भाराचे आहेत बेळगाव-२३ ०९, मद्रास-२४ ३, मदुरा-२४ ९१ मंगळूर-२३ ८५, म्हैसूर-२३ ८५ पांदिचेरी-२३ ६२, त्रिचनापल्ली-२३ १७, नगर-७६ ५६ सिंध-७२ ४६, माळवा-७३ ८९, अजमेर-७४ १७, पुणें-७६, रत्नागिरी-२९ चिपळूण-३०, वेंगुर्लें-२७॥, मालवण, दापोली, मुंबई-२८, राजापूर-२९, बंगाली-८०, फर्रुखाबाद-११०, लखनौ-९५ ८२, मालधा-९५ ६६, काशी-१०५ सध्या ८० भाराचा शेर सर्वत्र करण्यात आला आहे २ जासूद शिपाई, बेगारी वगैरेस पोटाकरिता जें धान्य, शिधा देतात तो ३ रोजचें अन्न नित्यवृत्ति उदरनिर्वाहाचें साधन (क्रि० उठणें उडणें काढणें, चालणें, तुटणें मिळणें, लागणें) ४ आलुंबलुंतें —भाव १०३ म्ह० शेर शिजविला आणि विस्तव विझविला=स्वतःचें थोडेसेंच काम चटकन आटोपून दुसऱ्यास दिरंगाई बद्दल दोष देणाऱ्यास म्हणतात २ थोडक्यात कारभार आटोपणाऱ्या घरधनिणीस म्हणतात शेरास सव्वाशेर=प्रतिपक्षा पेक्षां वरचढ चोरावर मोर ०पीठ-शिधा-नपु भत्ता, शिधा शिपाई बिगारी यास दिलेलें धान्य शेरका-वि १ शेरभर धान्य मावेल असा २ शेरभर वजनात भरेल असा ३ शेरभर धान्य तांदुळाचा भात शिजेल असें शेरभरकोंडा-पु एक मुलींचा खेळ —मखेपु २५८

शेर—पु १ वाघ —राज्य ३ २२ २ सिंह ३-वि जबरदस्त, धृष्ट, धीट, शूर पराक्रमी; धाडशी, अमल, सत्ता गाजविणारा 'परंतु ऐशा बखडियानीं दुश्मन शेर होतात' —रा १२ ८३ 'मागती सिलचे शेर झाले' —भाव १०८ —राज्य ८ ६० [फा हिं शेर=सिंह] ०खोर-वि उन्मत्त 'तऱ्हवाईक शेर खोर लोक हुजरातींत एकंदर ठेवूच नयेत' —मराभा १४ ०पणा-पु सामर्थ्य जबरदस्ती जोरावरी —रा ८ ४ ०बाजी-बाजू-स्त्री सरशी, वर्चस्व 'हे आपले ठायीं आपली बहुत शेरबाजी मानतात.' —जोरा ११५

**शेरडावणें, शेरडावणें**—अकि शेफारणें; फुगणें, ताठा भरणें

**शेरडी**—स्त्री शेळी, बकरी **शेरडूं**—न बकरें (शेळी किंवा बोकड) **शेरडूक**—न (तिरस्कार) बकरें, करडू कोंकरू **शेरडुकी**—स्त्री शेळी **शेरडुक्या**—पु धनगर, शेळया पाळणारा

**शेरडी**—वि एक जातीचा ऊस (गुजराथमधील)

**शेरणी**—स्त्री १ नवस फेडण्याकरिता वाटलेली मिठाई, प्रसाद, खिरापत 'यानेकरून गरुडाची पूजा करून शेरणी वाटतात' –तीप्र ४८ २ देवापुढें ठेवण्याकरितां किंवा भेट देण्याकरितां तयार केलेली गुळाची ल्हान ढेप ३ नजराणा, दंड 'तुमचे मार्गा वतन सबबे शेरणी दुतर्फा रुपये ५०० करार केले असेत' –साडशाछ १२८३ [फा शीरीनी–शिर्नि=गोडी, मिठाई, प्रसाद स श्रेणी–शेरणी –भाअ १८३३ ]

**शेरणी**—स्त्री १ नदीकाठीं वाढणारें एक झुडुप 'शेरणीचीं वर्टे व पाणि याची झील' –भाव ५६ २ दुसरें एका जातीचें झुडुप थोर शेरणी **शेरणवेट**—न शेरणीच्या झुडपाची गर्दी

**शेरणी**—स्त्री (व) एक कुष्टरोग 'त्याच्या अंगावर शेरणी फुल्ली'

**शेरव**—न एक प्रकारचें पिस्तुल 'हे लोक शेरव यापरीत' –हिल्इ २२७

**शेरवड**—न (कु) एक बारीक पाढऱ्या पानाचें झाड

**शेरवा**—पु कोंबड्याच्या मासाचा रसा, शिरवा

**शेरवान–नी**—पुस्त्री एक प्रकारचा अंगरखा 'कृष्णरावांनीं अंगातील पिवळा शेरवान काढून त्याच्या हातीं दिला' –कोरकि १२६ [फा ]

**शेरवी**—स्त्री एक जातीचा समुद्रातील मासा

**शेरा**—पु दर, सरासरी, सामान्य प्रमाण; मध्यम प्रमाण [अर शराह्=दर, पगार, भत्ता] **शेरेकरी**–पु शेऱ्याप्रमाणें पगार वेतन मिळणारा मनुष्य

**शेरा**—पु १ नियम, कायदा, पद्धति घालून दिलेली रीत रूढी, प्रचार, परपरा, धारा २ (कोर्टदरबारी) पत्र अर्ज वगैरेच्या खालीं लिहिलेलें उत्तर किंवा हुकूम 'आपण म्हणता तसें आम्हांस करतां येत नाहीं असा शेरा मिळाला' –मिरि ४४९१ निकालाचा लेख याअर्थी शेरअर्जी, शेरेयाद; शेरेहुकूम शेरेपत्रक हे शब्द रूढ आहेत येथें अर्ज, याद, पत्रक व त्यांवरील लिहिलेले हुकूम असा अर्थ होतो ३ नकल करून घेतल्यावर मूळ कागदावर तशा अर्थाचा लिहिलेला लेख ४ सपासपीसानें कागदावर आपलें मत व्यक्त करणारा लिहिलेला लेख ५ कोणत्याहि कामासंबंधीं नियम, पद्धती वगैरे घालून देणारा लेख, दिग्दर्शक यादी, नियमावली ६ टीका ७ शिफा रस 'शेरे म्हन्ती लोकलोकाचे।' –ऐपो २३८ [अर शरआ=नियम ]

**शेरा**—पु पीरावर वाघलेल्या माळांचा पुंज, चादर [अर शरआ=नियम ]

**शेरा**—पु अखेरी, टोंक शेवट [स शिरस् ]

**शेरिया**—पु (विणकाम) दोन थोक आठ कळया किंवा २४ फाळे इतक्या प्रमाणाचें रेशीम

**शेरिया**—स्त्री (गुज) अवाढी

**शेरी**—स्त्री बोळ, गल्ली, आळी, अरुंद गल्ली [स शिरस् =टोंक]

**शेरी**—स्त्री १ जमीन महसुलाकरिता घ्यावयाचा धान्यावर दरमणीं दोन शेरप्रमाणें कमाविसदार आपला हक्क म्हणून घेत असे ती, तसेंच सरकारी कामगारास अडशेरी वाटणारा कामगार आपला हक्क म्हणून जें धान्य घेत असे ती २ **शेरी जमीन**–स्त्री सरकार किंवा संस्थानिकाच्या खासगी मालकीची जमीन अशी जमीन गावाच्या क्षेत्रात सामील केलेली नसे तसेंच सरकारजमा झालेली किंवा लागवडीकरिता पूर्वी दिलेली परंतु परत आलेली जमीन याच सदरात सामील होते काहीं भागांत जमीनीच्या मालकांकरितां बाहिलेली जमीन किंवा खोती गावात खोताकरिता फुकट बाहिलेली जमीन यासहि शेरी म्हणण्याची पद्धति आहे 'शेरी रुपये २५ दरसाल।' –वाड बाबा २८७ **०करी–शेरकर**–पु शेरी जमीनीची लागवड करणारा, शेरीचा मक्तेदार खडकरी **०बाव**–स्त्री शेरी जमीनीपासुन आलेला ऐनजिनसी किंवा नगदी वसूल

**शेरूक**—न (कु) एका पक्ष्याचें नाव

**शेरें**—न नदींतील एका माशाचें नाव

**शेल**—न टोंक, शल्य 'तैसा नोहोट दुर्वाक्य शेलीं। सेलिला सासा।' –ज्ञा १३४९६ [स शल्य ]

**शेल**—न १ (व) शेवट, अखेरी, टोंक, शेंडा 'शेल पुरल'=शेवट झाला 'आम्ही शेल्या लोक गर्ले'=आम्ही शेवटपर्यंत गेलों २ (गो) काथ्याची लांब दोरी, कासरा ३ (इट) नारळाचा घड, नारळाचा देठ ४ (ल) उंचपद, उत्तम भाग, शिर, गळा [स शैल गु छेल]

**शेल**—वि (खा) समांतर (जू)

**शेलका, सेलका**—वि १ उत्तम, उत्कृष्ट, मुख्य, निवडक, श्रेष्ठ, वेचक पसंत, सुरेख सामान्यत या अर्थी व्यापक अर्थानें व क्रियाविशेषणाप्रमाणेंहि उत्तम रीतीनें, बरोबर, नमका, अचूक या अर्थी उपयोग होतो 'हरिजन म्हणेल अर्थ प्रणतो वाया न शेलका नाहीं।' –मोसाति ७१२० [स शिरू–शेलकें ]

**शेलणें-नें**—न झाडास पोंडांतून पाणी उडविण्याचें सुपासारखें लांकडी साधन

**शेलणें**—सक्रि १ (महानु) विंधणें, जखम करणें 'नवनिदित तिहीं शेल्लि यादवातें।' –गस्तो ५७ २ (कों) सोलणें, दोंगा वगैरे फोडणें. [सं शल्य]

**शेलभेल**—स्त्री मिसळ, मिश्रण, संकर, खिचड-मिचड, गिजमिजा [भेल द्वि]

**शेलवंट-टी**—स्त्री १ एका जातीचें झाड २ कोंकणात सर्वत्र आढळणारी एक वेल –न वरील झाडाचें फळ

**शेला**—पु अंगावर घ्यावयाचें एक उंची वस्त्र, हा पूर्वी चार पदरी एकत्र करून तयार करीत हा मानाच्या वस्त्रांत असे 'शेले शालू साड्या क्षीरोदक लाव रुद पाटावें।' –द्रौपदी वस्त्र हरण [स चैल हिं शेला] ०**घालणें**-दुखवट्याचीं वस्त्रें देणें **शेलकट-खंड-गट**-न भिकार, जुना, जाडाभरडा शेला (तिरस्कारार्थी) **शेलकाट**-न (सातारा) मुसलमान स्त्रिया अंगावर पांढरी चादर घेतात ती **शेलपाटी**-स्त्री शेला व पाटी (गावच्या पाटलाचा हक्क, मान) 'शेलपाटी दर सुहास मोकरर १॥ मण' –वाहशाह १ १४४ **शेला पागोटें**-न १ शेला व पागोटें, बहुमानाचीं वस्त्रें, अहेराचीं वस्त्रें पूर्वी बहुमानार्थ शेला व पागोटें देण्याची चाल असे २ सरकारी अधिकाऱ्याचा एक हक्क, कर **शेला पागोटें करणें**-पोषाख करणें **शेलारी**-स्त्री एक उंची लुगडें, भारी किंमतीची साडी, शालू 'एकांतात गाळिता घरून वळकट करीं शेलारीला।' –प्रला १६७ **शेलावाटी**-स्त्री लग्न किंवा म्होतूर लावावयाच्या वेळीं पाटलास द्यावयाचा शेला व वाटीचा मान, एक हक्क कर **शेले सांवळीचा**-वि शेला व शेमला असलेला, अकडबाज ऐटबाज 'तेथें दोनशत धनुर्धर। तीनशत उभे खांडेकर। शेलेसांवळीचे झुंझार वीर। पांचशतें पैं।' –कथा ४ ६ १७५

**शेला**—पु (कु) नारळाची पेंड, नारळाच्या पोईचा देंठ शेल पहा

**शेलाटा-टी**—पु स्त्री उंच व सडपातळ, सडसडीत पण रेखीव व मजबूत (मनुष्य, झाड, काठी) 'पोरगा शेलाटा होता' –खरा देशभक्त [शेल]

**शेलाटी**—स्त्री १ एका झाडाचें नाव २ (ल) उंच सडपातळ स्त्री

**शेलाटी**—स्त्री (पुणें) जोड जू

**शेलारें**—न कोरफड धायपात वगैरेमधून येणारा तुरा, झुबकेदार दांडा [शेल]

**शेली**—स्त्री १ टोंक, अग्र, झाडाचा शेंडा २ (कु) नारळाच्या पेंडीचा देंठ ३ (ल) मान, गळा 'कापुनि घ्याया आलों शेली।' –र ५० [शेल]

**शेली**—वि (नदभाषा) सहा, ६ सख्या

**शेलु**—स्त्री १ एक झाड –पु २ त्याचें फळ हिरवा रंग करण्याच्या कामीं याचा उपयोग होतो.

**शेलें**—न नारळाच्या पोयींतून येणारा फुलाचा घोंस. –कृषि ७४८ [शेल]

**शेलें**—न १ जू, जोखड (हें धुरीस पक्कें केलेलें असतें) २ (ल) भार, ओझें, जबाबदारी (क्रि० गळयावर, वर-शेलें असणें, होणें, पडणें, घालणें, देणें) ३ बाजू, पक्ष; प्रतिपक्षी (खेळ, युद्ध यांतील) [शेल]

**शेलें भाल्यानिशीं**—शिलें भाल्यानिशीं पहा

**शेव**—स्त्री एका फळझाडाचें नाव –न. या झाडाचें फळ, सफरचंद [फर सेब] **शेवीचें झाड**-न शेव

**शेव**—स्त्री एक खाद्यपदार्थ, हरभऱ्याच्या डाळीचें पीठ छिद्रयुक्त पात्रातून पाडून तळून करतात तो पदार्थ ०**कंड-कुंड-खंड**-न शेवेचा तुकडा ०**गांठी**-स्त्री गुजराथी शेवेचा प्रकार

**शेव**—पु १ टोंक, सीमा, अखेरीचा भाग, कड, शेवट (गाव, शेत, आळें, वस्त्र वगैरेचा), शीव, शिवेवरचा आसमंतातचा भाग, २ पदर, टोंक, शेवटचा भाग (वस्त्राचा) 'काहीं एक हसुन शेवशिरिंचा घेती कीं आलिंगना।' –गंगाधर, रस कल्लोळ ८१ ३ (ल) संबंध, धागादोरा, (तपास, गुन्हा वगैरेचा) 'वादळाचा शेव हयसर लागला' 'शहराचा शेव' ४ माडी काढावयासाठीं पोगीस जो छेद पाडतात तो [स सीमा, शेप] **शेव घालणें**-१ वस्त्राचा पदर हालवून बोलावणें २ पदरानें दिवा मालविणें **शेव घेणें**-ओसरणें, कमी होणें, खालीं जाणें, (पूर, रोग, दुखणें वगैरे) **शेव देणें**-पोहोंचवणें-साथ करणें, सूर धरणें (गवयाची) **शेव बाधणें**-(कु) सहवासामुळें पीडा होणें, वाईट संगति लागणें **शेव लावणें**-अनुमोदन देणें मदत करणें, सहाय करणें हात देणें **शेव लावणें**-जमीन उकरली न जाता वरवर खुरपणें, खरडणें **शेव येणें**-पदर येणें, स्त्री ऋतुमती होणें

**शेव**—स्त्री भाजीपाला वगैरे विकावयास आला असता त्यावर घ्यावयाचा ऐनजिनसी कर (एक जुडी किंवा मूठभर) **शेवसबजी**-स्त्री भाजीपाल्यावरील कर 'शेवसबजी व वानगी देशमुखाचे निमे करार केली असे' –वाडबाबा ३ ३ [फा]

**शेव**—क्रिवि १ उभ्या त्वरेनें, सरळ खालीं (क्रि० चालणें,) धरणें याच्या उलट करळ २ (व) हलकेच, सौम्यपणें –वि (वि) टेंगणें

**शेवई-य**—स्त्री गहू किंवा तांदूळ याचे पीठ भिजवून त्याची केलेली बारीक व लांब वळी याची खीर करतात [ शेव ]
**शेवगो**-पु (कु ) शेवया गाळण्याचे यंत्र
**शेवक**—पु प्र सेवक पहा
**शेवक**—न (गो ) नारळाच्या पेंडीचे नारळ काढून घेत त्यावर रहातो तो देठ [ शेव ]
**शेवगा**—पु शेगट, एक झाड, याच्या फुलाची व शेंगाची भाजी करतात [ स शेपुल शिग्रु शिग्राव-वाग्भट गु सरघवो ]
**शेवगा-गो**—पु शेवया, कुरडया घालण्याचे पात्र [ शेव ]
**शेवट**—पु अखेर, परिणाम, अंत, समाप्ति; अंतिम अवस्था १ -न टोंक, अग्र, कड, कडेचा भाग अंतिम भाग २ चतुवीचा तोडा [ स सीमन्-सीमा ] **शेवट धेणें**-अखेरीस नेऊन पोंचविणें, संपविणें, समाप्त करणें, अखेर करणें **शेवटचा**-वि १ अखेरचा अंतिम २ सर्वांत धाकटा **शेवटचा आदित वार** पु कधींहि न येणारा दिवस **०च्याआदितवारी** कधींहि नव्हे; कदापि न क०ादि नाहीं **शेवटचा पालखी**-स्त्री प्रेताची तिरडी **शेवटच्या वाघण्यास पाणी मागणें**-अखेरच्या अटी सांगणें, कमाल मागणी करणें, अंतिम हेतु कळविणें **सरशेवटीं**-अखेरीस, सर्व सपल्यावर, अंतिम अवस्थेमध्यें **शेवटणें**-अक्रि १ टोंक काढणें, बोथट झालेलें टोंक ( छिनी वगैरेचें ) तीक्ष्ण करणें धार लावणें ' पहार शेवटायला हवी होती ' २ घोड्यास वगैरे चाबकाच्या अग्रानें किंचित मारणें ३ (राजा ) टोंकास शेवटास लागणें चाटून, घासून जाणें ( गोळी, तीर, नेम वगैरे ) ४ शेवट लावणें, संपविणें, पूर्ण करणें ( हिशोब, व्यवहार वगैरे ) ५ शेवटीं येणें अखेरीस होणें, घडून येणें ' परिपरिणामीं शेवट। अवश्य मरण। -ज्ञा १८ २४९ **शेवटता**-क्रिवि निसटता, घासून जाणारा, चाटून जाणारा चुन्सुटका ( क्रि० लागणें, जाणें )
**शेवटला-टाल**-वि अखेरचा, अंतिम, शेवटचा **शेवडा**-वि (राजा ) गावाच्या शेवटीं राहणारा शेवडे हें आडनाव पराजपे, आपटे, गोखले या चित्पावन व एका कऱ्हाडा घराण्याचें आहे
**शेवटोर**-क्रिवि शेवटपर्यंत, अखेरपावेतों ' सकळ राज्य तत्रहि क्वीर नारोपताचे स्वाधीन करून शेवटोर ही चालवीत आले ' -तंजावर शिलालेख ९६ २३ [ शेवटवर ]
**शेवटा-टो**—पु ( गो ) एक रुचकर मासा -सह्याद्रि १४६
**शेवटा**—पु कुंभाराचें चाक ज्यावर आधारलेलें असतें तो निमुळता भाग [ शेवट ]
**शेवडा**—पु शेव या नावाचा कर वसूल करणारा अधिकारी [ फा शेव ]
**शेवडा**—पु एक गोसाव्याचा पंथ; जैन यति ' जगम शेवडे आणि फकीर।' [ म सेवा गु शेवडो, सिं सेविडो ]
**शेवडा**—पु एका जातीचा मासा
**शेवडा**—स्त्री चर्म, कातडी -हंको
**शेवडी**—स्त्री (गो ) सुपारीच्या किंवा नारळाच्या झाडाचें टोकाकडून फुललेलें चुडत
**शेवडी**—स्त्री टोंक, अखेर ' तो गावाच्या शेवडीला राहतो '
**शेवंडें**—न एक जंगली फूल
**शेवण**—न एक जातीचा मासा
**शेवती-शेंवती-शेवंती**—स्त्री १ एक फुलझाड २ एक झाड [ स सेमती ] **शेवतें**-न १ शेवतीचें फूल २ शेवतीच्या फुलासारखें डोक्यात घालावयाचें सोन्याचें फूल
**शेवती**—स्त्री (अप ) वर वधूच्या गावीं आला असता त्यास सीमेवर समोरें जाऊन त्याचा करावयाचा सत्कारसमारंभ, श्रीमती [ सं सीमांतपूजन ] **शेवतीपूजन**-न सीमांतपूजन **शेवती देणें**-सीमांतपूजन करणें ' कृष्णास पूजन शेवती । हता न कळे दिवसराती । ' -एरुस्व १५ ११
**शेवतें-शेंवतें शेवता**—नपु विस्वा दिव्यावर धरून ताप देऊन त्याच्या तळाचा दुधात मगर तुपात खालीं पाडलेला थेंब ( औषधाकरिता ) ( क्रि० पाडणें, टाकणें )
**शेवतेवाघळी**—स्त्री तांबड्या पाठीचा एक मासा
**शेवत्रा**—पु स्पर्श; संसर्ग, शिवाशिव [ शिवणें ]
**शेवपा-प्या**—वि शेपा, शेप्या पहा वहिंशोपेसारखा वास येत असलेला ( आंबा ) -कृषि ६७८
**शेवर**—पु शेवरीचें झाड
**शेवरा-शेंवरा-न्या**—पु शेवरीच्या जातीचें एक झुडुप [ स शाखोट ]
**शेवरी-शेंवरी**—स्त्री १ एक झुडुप २ मऊ कापूस येणारें एक झाड, सावरी [ स शाल्मली, प्रा सामरी, सिंबाली, हिं सेंबल सेमल ]
**शेवरा**—पु नाचणीची एक जात हिचा दाणा भुरा असून ही गर्वी आहे -कृषि २८३
**शेवरी**—स्त्री ( अशिष्ट ) शेवयाचा पुंजा, जुमडा [ शेवई ]
**शेवरें**—न भुरळी, अळवें
**शेवल शेवाल**—पु शेवळ शेवाळ पहा
**शेवळ**—न ( गो ) शाळ, नारळ काढून घेतल्यावर राहिलेला पेंडीचा देठ
**शेंवसर, शेवसरणें**—शिवसर शिवसरणें पहा
**शेवा**—स्त्री ( अप ) सेवा पहा चाकरी
**शेवा**—पु करवद वगैरे झाडाची कुंपणाकरितां लावावयास आणलेली काटेरी फांदी [ शेव ]

**शेवळ, शेवाळ, शेवाळी**—पु न स्त्री १ पाण्यावर किंवा ओल्सर जागेत उगवणारी हिरवी मऊ वनस्पती २ पाण्यात उगवणाऱ्या शेवाळीसारख्या काहीं क्षुद्रपास सामान्य नांव उदा० हड, गोंडाळ, नीळ [सं शैवाल, प्रा शेयाला, हिं शेवाल] **शेवाळणें**–अक्रि १ शेवाळीनें युक्त होणें, शेवाळ उगवणें, (दात) बुरसणें, बुरशी येणें २ (ल) बुळबुळीत होणें, गोंडस दिसू लागणें, पोसणें, पुष्ट होणें **शेवाळें**–न शेवाळाचे लाव तनु –वि शेवाळलेलें, शेवाळीनें युक्त 'तें पचक्रोश होतें शेवाळें। म्हणोनि शभु स्यापिला स्वगीळें।' –कथा २ १६ १२६

**शेवाळें**—न लोत नांवाच्या केंदाच्या झाडाचा देंठ याच्या तुऱ्याची भाजी करतात

**शेवाळ-शेवाळें खरबूज**—न खरबुजाची एक जात 'दाळ दिड शेवाळ थाळके' –अमृत ३४

**शेवाळलेली**—वि गाभण, गरोदर 'त्या वनस्पती शेवाळलेल्या मेंढयाच्या दृष्टीसमोर बांधून ठेवल्या –व्हेनिसचा व्यापारी ३०

**शेष**—पु नागाचा राजा, यास सहस्र मुखें असून याच्या डोक्यावर पृथ्वी आहे अशी समजूत आहे 'शेषकूर्म वाहाव जाले।' –दा २० ८ [स] ०कन्या–स्त्री सुलोचना, इद्रजिताची स्त्री ०तूल्पिका–स्त्री सर्पशय्या, सर्पाची गादी ०मणि–पु १ शेषाच्या डोक्यावरील रत्न २ पाचेच्या खाणींत पाचेपेक्षा फिका स्फटिक सापडतो तो

**शेष**—पु बाकी, ऊर्वरित भाग, अवशिष्ट भाग, अश 'शेष असा वरिलें रणरगीं रगोनि हानि शातनवें।' –मोभीष्म १२. २५ [स शिष्] (समासांत) रोगशेष, ऋणशेष, अभिशेष ०खड–पु राहिलेला भाग; अवशेष; अश ०जाति–स्त्री (गणित) बाकी सामील करेली ०पूरण–न न्यून भरून काढणें, बाकी भरून काढणें, पुरें करणें ०पूर्ति–स्त्री न्यूनतापूरण, न्यूनपूरणा नतरची सपूर्ण अवस्था **शेषाधिकार**–पु अविभक्त कुटुबाची मिळकत कोणी हिस्सेदार मयत झाल्यास इतर भागीदारास मिळावयाचा हक्क, अधिकार **शेषाधिकारी**–वि अविभक्त कुटुबातील कर्त्या माणसानतर ज्याकडे कुटुबाची मालमत्ता याव याची असते तो **शेष्य**–वि शिल्लक ठेवावयाचें, ऊर्वरित मागें ठेवावयाचें, बाकी रहावयाचें

**शेंस, शेंसपाट**—स्त्री (राजा) १ शेज पहा मळवट; मगलप्र गीं कपाळावर गध कुकू दहीं वगैरेचा पट्टा ओढून वर तादूळ डकवितात तो (क्रि० भरणें) सुमीवास दिधली निर्धारीं। शेंसपाट भरोनिया।' –रावि १८ ३४ २ देवदासींचें दवावरो वर लग्न लावावयाचा विधि (क्रि० घालणें) [स शीर्ष] **शेंसफूल**–न शीसफूल पहा **शेंसभरप**–न (गो) ओटी भरणें. **शेंसमारप**–क्रि (गो) सवार होणाऱ्या माणसाच्या अगा वर तादूळ टाकणें **शेंसवंत**–न महारात पाटाचेवेळीं तीन वेळा कपाळास कलश लावण्याचा विधि **शेंसविधि**–पु तरुणस्त्रीचा विधियुक्त कौमार्यभग, वेदयाकर्माचा दीक्षाविधि **शेंसे**.**ायत**–वि शेंसविधि करेली (स्त्री)

**शेंसगांठ**—स्त्री सरकगाठ, निसरगाठ, सरकफास, सुरगाठ

**शेसमर्णे**—अक्रि अ वेट वाळणें, आवटओलें होणें [स शुष्]

**शेसरा, शेंसरा**—पु सरकफास, शेंसरगाठ **शेंसरगांठ**–स्त्री सरकगाठ निसरगाठ

**शेसावणें**—अक्रि (व) सोस वाटणें, उत्कठा वाटणें 'भाकरीसाठीं शेसावला'

**शेसाळणें**—अक्रि १ राग, त्वेष इत्यादिमुळें सतापणें, जळफळणें (मनुष्य, प्राणी) २ (ल) खवळणें, क्षोभणें, जोरा जोरानें, सोसाट्यानें येणें, वाहणें (वारा, पाऊस, आग) ३ शिवशिवणें, उतावीळ होणें, फुरफुरणें (मारावयास हात, चावावयास दात, बोलावयास जीभ वगैरे) [स ईर्षा] **शेसाळा**–पु क्रोध, राग, त्वेष, क्षोभ, चेव, उत्कठा, उतावीळपणा (मनुष्य, प्राणी, मन अवयव याचा) 'शेसाळे शेसाळे शेजारा पिसाळे' [स ईर्षा]

**शेसाळणें**—अक्रि फुसफुसणें, फुत्कारणें, खवसणें; धुसमुसणें (साप, माजर, मनुष्य वगैरे)

**शेंसूर शेंसुरणें**—शिवसूर शिवसुरणें पहा

**शेहत्तर**—वि शाहात्तर ७६ ही सख्या [सहा+सत्तर]

**शेहर-हेर**—न शहर पहा 'शेहर सातारा मोहकळीस आला होता त्याची वसाहत कली' –मदरु १ १६४

**शेहेचाळीस**—वि ४६ सख्या [स षट्–चत्वारिंशत्]

**शेळ**—स्त्री शीळ, सर्प, पाल वगैरेचा शिळीसारखा आवाज. (क्रि० घालणें, वाजवणें, वाजणें) 'काम करणाऱ्या मुग्या एक प्रकारची शेळ वाजवून लागल्याच जास्त मेहनत करू लागतात' –मराठी सहावें पुस्तक पृ १३ [ध्व]

**शेळ**—स्त्री (राजा कों) १ जिच्यामध्यें उन्हाळ्यातहि ओलावा राहतो अशी भातजमीन २ पाऊस पडल्यावरोबर लावता यावें याकरिता पाणथळ जमीनींत केलेलें भाताचें रोप, **शेळीचा तरवा**–पु अशा तऱ्हेन केलेलें रोप व अशी जमीन [स शीतल]

**शेळ**—स्त्री १ (कु) सध्याकाळची वेळ २ (कु) ल्हान मुलास थडाईसाठीं सकाळीं घालावयाचें पाणी, किंवा औषध [स शीतल]

**शेळ**—स्त्री (गो) थडी, ओल [स शीतल]

शेळउंडी—स्त्री (गो) शिळा भात पाण्यात कालवून करतात तें खाद्य [शिळी+उंडी]

शेळकुंड—न (कु) गोंवरी

शेळणें—न शेल्णें पहा

शेळणें—अक्रि (कु कों) शिळें होणें, गारटणें [स शीतल, म शिळा]

शेळमेळ—स्त्री शेलमेल पहा

शेळमोडो—वि (गो) थंडपणा, गारठा मोडलेला, कमी झालेला

शेळवंडी—स्त्री सासरीं अगर माहेरीं आलेल्या मुलीवरून ओंवाळून टाकतात ती तांदुळाची अगर भाताची मूठ, व ही ओंवाळून टाकण्याची क्रिया [शिळी+उंडी]

शेळसप्तमी—स्त्री शिळा सप्तमी पहा

शेळसभा—स्त्री (राजा) विरोधी पक्षाच्या मित्रांची तडजोड करण्याकरितां भरविलेली सभा [शीतलसभा]

शेळा—न (कु) शहाळें, कोंवळा नारळ

शेळी—स्त्री बकरी [स छाग-छागलिका, प्रा छागलिआ] म्ह० 'शेळी आते निवानिशीं खाणारा म्हणतो वातड' एखाद्यानें जीव तोडून झटावें पण दुसऱ्यानें उलट नांवें ठेवावीं अशा प्रसंगीं योजतात शेळक्या—पु शेळ्या चारणारा, धनगर शेळड्—न शेरड् करड् कोंकरू शेळीचा भाऊ—पु (कों) १ बोकड २ (ल) उमेट, मगरमस्त शेळीचें गळूल—पु अजागळ शेळ्या मेंढ्या—पु बुद्धिबळांतील एक डाव हत्ती हे वाघ समजून व इतर सर्व मेंढ्या समजून खेळावयाचा खेळ शेळ्या वाघ—पु एक मुलाचा खेळ —मखेपु ११९

शेळी—स्त्री (गो) सहाण, वस्तऱ्यास धार लावण्याचा न्हाव्याचा दगड [स शिला]

शेळी, शेळें—वि (गो) शिळें

शेळ्—स्त्री (राजा) शिवळ, जोखडाच्या टोंकास असलेल्या भोंकांत घालावयाची खुंटी (अव) शेळवा

शेळ्—स्त्री (राजा) शिळ्ळ; शीळ, शेळ, शिटी (क्रि० घालणें; वाजणें वाजवणें [ध्व]

शेळो शेवाळो—पु (गो) शेवाळ

शेळोणी—स्त्री शीळ, शिटी [ध्व]

शेळाताप—पु (कु) विषमज्वर

शेळांद्रा द्रा—वि काळुद्रा काळा कुळकुळीत, काळाकुट्ट; कोळशासारखा काळा [स शिला]

शैघ्र्य—न शीघ्रता; त्वरा चपळाई; जलदी [स शीघ्र]

शैत्य—न १ थंडी थंडपणा गारठा, गारवा 'नाडी चक्कर जसा समस्त शैत्यातें।' —मोकर्ण २२ १५ २ हींव, सर्दी; थंडीचा विकार [स शीत] शैत्यपित्त—न १ थंडीपासून व पित्तापासून होणारा विकार २ कफ व पित्तकर प्रकृति [स]

शैथिल्य—न शिथिलता, ढिलेपणा, सुस्ताई, हलकपणा [स शिथिल]

शैन्य—न (अप) सैन्य, सेना 'मृत्तिकेचें शैन्य केलें।' —दा ८ १.३२ 'शैन्य अवघेचि मरावें।' —दा ८ ८ ३९ [स सैन्य]

शैय्यानिर्णे—अक्रि निजावयास घेणें, वर निजणें 'मचक समर्थ शैय्यानिला पवित्र।' —सप्र ८ ८ २८ [स शय्या]

शैल—पु पर्वत, डोंगर 'चोहळलया शैलाचें सर्वांग जैसें।' —ज्ञा ११ २४७ (अप) शैल्य —वि पर्वतासंबंधीं, डोंगरासंबंधीं [स] ०कक्षा—स्त्री पर्वताची बाजू 'शैल कक्षानिकुंजरें। जळाशय परिसरें।' —ज्ञा १३ ६१२ ०थाटें—क्रिवि पर्वताप्रमाणें 'धडधड भुमि तेणें लोटली शैल्थाटें।' —माधवरामायण बालकांड २७

शैली—स्त्री पद्धति, रीत, तऱ्हा, धाटणी, खुबी (वागण्याची, बोलण्याची, लिहिण्याची वगैरे) [स]

शैली—स्त्री (एका प्रकारच्या बुद्धिबळाच्या खेळांतील) राणी व प्रधानाची बायको ०बाजी—स्त्री एक प्रकारचा बुद्धिबळाचा खेळ यामध्यें दोन शैली असून पटावर शंभर घरें असतात

शैलूष—पु नट, नाडेभोरपी, दोरावर खेळ करणारा, कोल्हाटी [स]

शैलेयक—न शिलेवर उगवणारी वनस्पति 'शैलेयक आणि हरळी यांचें अंजन नेत्रांत घालावें।' —अश्वप २ ३० [स]

शैल्य—न शल्य याचा अपभ्रंश शल्य पहा

शैव—पु शिवभक्त 'शैव यासी म्हणती सदाशिव।' —ह ३४ १७७ —वि १ शिवोपासक, शिवाची पूजा करणारा; एका विशिष्ट पंथातील २ शिवासंबंधीं [स शिव]

शैवल, शैवाल—न शेवाळ पहा 'वारिति अन्योन्य सैन्य शैवाला।' —मोभीष्म ५ ३४ [स]

शैशव—न बाल्य ल्हानपण, बालावस्था [स शिशु]

शोक फी—पु शौक-की पहा

शोक—पु १ दुःख पीडा खेद २ आक्रोश आकांत रडारड विलाप (समासांत) शोकातुल शोकाकुलित शोकातुर, शोकान्वित, शोकार्त; शोकाविष्ट शोकाक्रांत शोकग्रस्त शोकनिवृत्ति, शोकभंग [स शुच्]

**शोकणें**—उक्रि. १ शुष्क करणें, सुकविणें, कोरडें करणें, शोषणें. २ शुष्क होणें, सुकणें, कोरडें होणें; वाळणें 'तृषेनें शोकलें शरीर।' –दा १२ ९.१४. [सं. शुष्]

**शोकणें**—अक्रि. सवकणें, शोक लागणें. 'तुझ्यारे मीं ममतेला शोकलें।' –होला ११५. [अर शौक]

**शोख, शोखणें**—शोष, शोषणें पहा 'आता धैर्याचा समुद्र शोखला।' –भाए ९४. 'राक्षसी पुतनेचें शोखण।' –दाव ३२५ [स शुष्]

**शोख**—पु प्रेम, आवड; नाद 'इतकें राजेश्री बावासाहेबाचे शोखासाठीं येथें राहणें जालें' –रा ६.५०३. [अर. शौक] **शोखीन, शौकी**–वि रंगेल, अभिरुचियुक्त, ललितकलांचा भोक्ता.

**शोखी**—स्त्री १ ऐट, अमर्यादा, दाडगाई, जुलूम, औद्धत्य 'शेंपनासानिशीं वाढून यावें अशी शोखी त्याची होती ती तूर्त मोडली.' –ख ७.३५९९. २ बंड, दाडगाई 'कर्नाटकांत हैदर नाइकानें शोखी केली.' -ख १.९७ [फा शोखी]

**शोचणें**—उक्रि. दुःख करणें, खेद करणें, शोक करणें 'तरी सांग काय शोचावें। एथ तुवा।' –ज्ञा २.१७८. [सं. शुच्] **शोचनीय**-वि. दुःखदायक, दुःखप्रद, खेदकारक **शोच्य**-वि. १ दुःखदायक, शोक करण्यास योग्य. २ शोकग्रस्त, शोकाकुल 'जे ब्रह्म करी जीवा। शोच्यातें।' –ज्ञा १३ ३६९. **शोच्यता**-स्त्री १ शोकाकुलता, खेद, दुःख. 'हे शोच्यता अन्हेरी। पंडुकुमरा।' –ज्ञा २ २१ २ अयोग्यता, खेदकारकता.

**शोण**—वि रक्त, तांबडा [सं.शोण्=रंगविणें] ०नद-भद्र-भद्रा-पुस्त्री. पाटणाजवळ गंगेस मिळणारी एक नदी.

**शोणित**—न. रक्त, रुधिर 'आणि शुक्र शोणिताचा सांधा। मिळता पांचाचा बांधा।' –ज्ञा १३.१०६. –वि तांबडें [सं]

**शोथ**—पु सूज [सं] ०व्रण-पु सुजून आलेला फोड, गळू.

**शोदा, शोदेगिरी, शोदेशाई**—सोदा, सोदेगिरी इ० पहा.

**शोध**—पु १ धुंडाळणें, हुडकणें, पहाणें २ चौकशी, तपास; विचारपूस ३ परीक्षा; निरीक्षण, बारकाईनें पहाणें ४ चौकशी, तपास वगैरेचा निकाल, फळ, परिणाम, निरीक्षणापासून बनलेला निश्चय ५ चुकीची दुरुस्ती; गाळलेला मजकूर घालून केलेली शुद्धि; गळलेला अगर चुकीचा शब्द सुधारून समावेश लिहिण्याची क्रिया. 'कोठें काहीं कोठें काहीं। शोध टार्यी स्थळासीं।' –तुगा २६२०. ६ शुद्ध करणें, स्वच्छ करणें, दुरुस्त करणें वगैरे. शोधन पहा [सं शुध्=शोधण, शुद्ध करणें] **शोध ठेवणें**–रक्षय ठेवणें, चौकशी करणें, तपास करणें; विचारपूस करणें, नजर ठेवणें. **शोधक**-वि १ चौकस, शोधणारा, हुडकणारा, धुंडाळणारा. २ तपास, चौकशी करणारा; नजर ठेवणारा ३ शुद्ध करणारा; दुरुस्त करणारा. 'जे यावाचुनि शोधक आन नसे।' –ज्ञा १८. १३८. ४ (गणित) वाद करावयाचा, ऋण (अंक). **शोधणूक**-स्त्री. शोध, तपास; परीक्षा. **शोधणें**–उक्रि. १ धुंडाळणें, हुडकणें, शोध करणें. 'मग तळवे तळहातीं शोधी।' –ज्ञा ६.२३२. २ चौकशी, तपास करणें, निरीक्षण करणें; परीक्षा करणें. 'जाणोनि शोधावीं चित्रें' –दा। ११.१०.२२. ३ शुद्ध करणें; निर्मल करणें. 'तुझ्या बहुत शोधिले अघनिधि...।' –केका ३. ४ दुरुस्त करणें; चुका काढून टाकणें, निर्दोष करणें. **शोधन**-न १ शुद्धि; स्वच्छ, शुद्ध, पवित्र, निर्मळ करणें. २ (गणित) वजाबाकी. ३ ऋणादान; कर्जफेड ४ जखम धुण्याची क्रिया. **शोधनीय**-वि. शुद्ध करावयाचा; पवित्र करावयाजोगा. **शोधपत्र-पत्रक**-न शुद्धिपत्र, ग्रंथातील शुद्धाशुद्ध दाखविणारें पृष्ठ. **शोधामणी**--स्त्री (बडोदें) १ कागदपत्र वगैरे शोधण्याची क्रिया. २ पूर्वीचे कागदपत्र शोधण्याकरितां द्यावा लागणारा पैसा, शुल्क, फी. 'नक्कल मागण्याचे अर्जाबरोबर येणारी शोधामणी...' –करा-वंतखातें नियम **शोधारणें**-सक्रि शुद्ध करणें 'पाठीं सात्विकें धीरेंतेंणें। शोधारलीं तियें करणें।' –ज्ञा १८ १०१८ **शोधित-शोधीव**-वि. शुद्ध, स्वच्छ केलेलें. 'आता जे का अमायिक। शोधितसत्वाचि सात्विक।' –एभा ३ ३३०.

**शोधणें**—न गाळण्याकरितां, पुसण्याकरितां, स्वच्छ करण्याकरितां वापरावयाचा कापडाचा तुकडा; फडकें; दान पुमावयाचें फडकें [सं शुध्]

**शोधा, शोधेगिरी, शोधेशाई**—सोदा वगैरे पहा

**शोप, शोंप**—स्त्री. बडीशोप, बाळंतशोप **शोपट, शोपा, शोप्या**-वि बडीशोपेसारखा वास येत असलेला.

**शोफ**—पु. १ सूज, शोथ. २ फोपशेपणा, शोथिल [सं]

**शोबन**—न. (अप) शोभन, मंगलकार्य 'तुमें परीचें शोबन' –वेह्रीस्व ९ ११९. [स. शोभन]

**शोभ**—स्त्री शोभा, कांति 'तेणें घनश्यामता शोभ। अतिप्रभ साजिरी।' –एभा ३० १९३

**शोभणी**—स्त्री शोभनी पहा

**शोभणें**—अक्रि. १ सुंदर, चांगलें, सुरेख दिसणें, कांतिमान, तेजयुक्त, तेजस्वी, सौंदर्ययुक्त असणें 'शोभेत कानीं जडित निराळ्या।' –सारुह ६.२४. २ साजणें, योग्य, शोभायमान दिसणें, ठीक होणें, युक्त दिसणें. 'हें स्थान मुलांनाच शोभून आलें.' –नीतिशास्त्र ७७ 'शोभेत तें करावें पचेल तें खावें.' [स. शुभ्] **शोभन**-न १ विभूषण, सुंदर, तेजस्वी, कांतिमान

दिसणें, असणें, करणें २ मंगलकार्य, उत्सव, समारंभ, 'मिठी न पवेची गे शोभन। वाया गेलें वरमायपण।' –एरुस्व १२६. ३ (सांकें) गर्भाधान, फळशोभन; मैथुन 'शोभनाग्नि नेण्या यांचें पेटणा।' –निगा १८२ ४ (सांकें शुभ शब्द) इन्धन, पुणकर्मासाठी, होमासाठी वगैरे वापरावयाचें सरपण, जळण –पु सत्तावीस योगांतील पाचवा योग ०पत्रिका–स्त्री लग्नचिठ्ठी 'राजा शोभनपत्रिकेसी। अति उत्साहें पाठवी।' –वेनीस्व ६११ शोभनिक–वि शोभा देणारें 'मुख सुख शोभनिक। श्लेष्मागमनें शिंमलें नाक।' –एरुस्व ७२६ शोभनीय–वि सुंदर शोभमान–वि सुंदर, चकचकीत, तेजस्वी, तेज पुंज, कांतिमान दीप्तिमान शोभवणा–स्त्री. सुंदर; देखणा, दिसाऊ शोभविणें–सक्रि सुशोभित करणें, सजविणें, शृंगारणें, सौंदर्ययुक्त करणें शोभा–स्त्री १ सौंदर्य, सौष्ठव, दर्शनीयत्व, देखणेपणा २ तेज, कांति, तजेला, प्रभा, रूप 'संपत्ति जाताच दारिद्र्याची शोभा दिसू लागली' ३ सौंदर्यवर्धक वस्तु, अलंकार, भूषण, पदार्थ शोभा करणें–क्रि भूषविणें, (उप) व्याजोक्तीनें, फजीती करणें; अपमान, अवहेलना करणें, 'विनोपन वगैरे तीन असामींस शोभा करून खिरयावर टाकणार' –स ५११०. शोभा होणें–फजिती होणें 'तुमची नकोश शोभा व्हावयला?' –भा २५ शोभायिणें–अक्रि शोभणें, सुंदर दिसणें 'स्वर्गोनि ते शोभायिले।' –रास ४५४ शोभादायक–वि भूषविणारा, शोभा देणारा 'परि विषम एकहि शोभादायक नसे अलंकार' –विद्याप्रशंसा शोभायमान–धावि (प्र) शोभमान, शोभणारा, सुंदर, सुशोभित [स शोभमान] शोभित–धावि. सुशोभित, भूषित, सजलेला वाटलेला शोभिवंत–वि शोभायुक्त, सुंदर, देखणा, सुरेख, तेजस्वी

शोभांजन—पु एक झाड याच्या पानाची, फुलांची व शेंगांची भाजी करतात व कोंवळ्या मुळ्यांचीहि भाजी करतात

शोभनी-णी—स्त्री १ रुक्मिणी पार्वती अथवा गौरीचें नांव. २ विवाहादि मंगलप्रसंगीं जी सजविलेली व आंत दिवा धरलेली रोंवळी धरतात ती ३ (सांकें) बाहरख्याली, व्यभिचारी स्त्री. [स शुभ्]

शोर—पु आवाज, ओरड, गलबला, गलका 'जशी कोयल करिती शोर।' –मफला ७७ –चित्र ४४ [फा शोर]

शोरा—पु १ सोरमीठ २ सोरमिठाचें आगर, दलदलीची नापीक जमीन [फा शोर=खारट]

शोष—पु १ कोरड, रुक्षता, अनार्द्रता, कोरडेपणा, वाळलेपणा २ सुकणें, वाळणें, आर्द्रता नाहीशी होणें, ओलावा नाहींसा होणें याची क्रिया ३ शोषक गुण, आर्द्रता आकर्षण करून घेण्याचा धर्म, ओलावा ओढून घेण्याचा गुण (राख चुना कोरेंचा) ४ अवर्षण, शुष्कता, जलादिकांचा अभाव (पाण्याचा शोष) ५ भयंकर तहान; तृषा, घशास पडलेली कोरड ६ कफ क्षय ७ (ल) लोभ 'शरीर क्षीण झालें नि लोभ। तरी वित्ताचा शोष शमेना।' –एभा २३४१२ [स शुष्=कोरडें होणें, सुकणें] शोषक–वि शोषून घेणारा, आर्द्रता ओढून घणारा, कोरडें करणारा शोषण–न शोषून घेण्याची क्रिया, कोरडें करणें; सुकविणें, शुष्क करणें शोषणीय–वि शोषण करण्यास योग्य, पात्र, शुष्क करावयाचें शोषणें–अक्रि १ शोषून घेणें, सुकविणें, आर्द्रता, ओलावा वगैरे आकर्षण करून घेणें, कोरडें करणें २ प्राशन करणें, घटाघट पिणें, पिऊन टाकणें ३ (ल) ओढून घेणें, रिकामें करणें, खलास करणें, आटविणें; मळविणें –अक्रि सुकणें आटणें कोरडें होणें, शुष्क होणें, वाळणें, रोडणें (शरीर, जमीन, फळें वगैरे) 'मीं सुवाचनि वेधें। तपें तें हें शोषे।' –ज्ञा ९२९९ शोषित–धावि १ शोषलेलें, सुकलेलें, शुष्क झालेलें २ (ल) कोरडा केलेला, ज्यांतलें सर्व नाहींसें झालेलें, नागवलेला ३ ओढून घेतलेलें, ग्रस्त झालेलें, जिरव लेलें शोष्य–वि शोषण्यास योग्य शक्य

शोहरत—स्त्री प्रसिद्धी, नावाई, कीर्ति, ख्याति 'तमाम लोकांत शोहरत आली कीं यास पादशाहानीं बोलाविलें आहे' –दिमरा १९२८ सरकार फौजेची आमदानी व शोहरत ऐकून' –दिमरा १२८५ [अर शुहरत्=प्रसिद्धी]

शोहरा—पु कीर्ति, प्रसिद्धी 'सभा तयकें दाखवून शोहरा करितील' –पया ४६६ [अर शुहरा=कीर्ति]

शौ—उद्गा (गो) कोंबड्यास हाकताना उच्चारावयाचा शब्द [ध्व]

शौक—पु १ मनाचा कल, आवड, छंद नाद २ इष्क, विलास, विषयासक्ति [अर शौक] शौकी–वि १ नादी, छंदी, लज्जत असलेला २ विलासी, विषयी, इष्कबाज [अर] शौकीन–वि शौकी हौशी 'ख्याली खुशाली करणाऱ्या शौकीन मंडळीचा गॅरिक ज्या मंडळींत होता तीसच तो मिळून लाभला' –नि ६६२ शौख–पु शौक पहा

शौकत—स्त्री ऐश्वर्य भव्यपणा, मोठा दर्जा, मानसन्मान –आदिलशाही फर्मान [अर]

शौच—न १ शुद्धि, दोष, मल याचें क्षालन, समार्जन, प्रायश्चित्तादि विधीनं दोषापहरण (आंतर किंवा बाह्य) २ स्वच्छता पावित्र्य, शुद्ध स्थिति शुचित्व ३ मल; पुरीष मलोत्सर्ग, मलशुद्धि [स शुच्=शुद्ध करणें] ०कूप–पु संडास पायखाना शौचखाना ०विधि, शौचाचार–पु १ मलोत्सर्ग, बहिर्दिशागमन मलशुद्धि २ प्रातर्विधि; हातपाय, तोंड धुणें, स्नान

आचमन करणें. शौच्य-न. शौच पहा. 'शौच्य आचमन करी ।' -दा ११.३.११.

शौंड—वि. समर्थ; योग्य; बुद्धिवान; हुशार; मादक. [सं.]

शौद्र—पु. उच्च वर्णीचा शुद्र स्त्रीपासून झालेला पुत्र. -वि. शूद्रासंबंधी. [शूद्र]

शौर—पु. शहाणपण, विवेक, हुशार; पोरण. 'स्यामच्ये कांहीं शौर राहिला नसे.' -पारसनीस नव २३८. [अर-शुरा]

शौरत—स्त्री. पराक्रम; धाक; दरारा; प्रख्याति. 'स्वामी आपले फौजेस सिद्ध होऊन वेढा उठविला किंवा फौजेचे शौरतीनें उठला.' -ख ८.३९२४. [अर. शुहरत्]

शौरा—वि. शूर; पराक्रमी. 'लोहांचा विशुरा, बलिभद्र नव्हे शौरा ।' -शिशु ८९३. [शूर]

शौरी—क्रिवि. कृष्ण. 'शौरि म्हणे राजेन्द्रा यद्यपि बलवान् तथापि शुनकाने ।' -मोउद्योग. [सं.]

शौर्य—न. पराक्रम; शक्ति; सामर्थ्य; धैर्य; वीर्य. **शौर्यौदार्यविद्यानिधान**-न. राजा, वीरपुरुष, योद्धा वगैरेस लावावयाचें बहुमानार्थी उपपद, पदवी. [सं. शौर्य+औदार्य+विद्या+निधान]

शौहरत—स्त्री. प्रसिद्धी; कीर्ति; आबरू. 'तुम्ने सुभेदारी औरंगाबादेची हफ्तेजुदौलान सा. खानाचा नातु त्याचे नांवे सोहरत आहे.' -पेद १०७४. [अर. शुहरत्]

श्म(स्म)शान—न. मसण; प्रेतें जाळण्याची, पुरण्याची जागा. [सं शव+शयन] ०कर्म-न. प्रेतसंस्कार; उत्तरक्रिया; दहन विधि. ०निद्रा-स्त्री. मृत्यु; मरण. (अखेरची झोप). ०भट-पु. प्रेतसंस्कार करणारा ब्राह्मण; प्रेतदहनप्रसंगीचे मंत्र सांगणारा ब्राह्मण. ०भाजन-न. १ प्रेताभोंवतीं ज्या भांड्यानें पाणी शिंपितात तें भांडें, मडकें. २ (ल.) टाकाऊ, निरुपयोगी, क्षुद्र वस्तु. ०भूमि-मी-स्त्री. मसण; मसणवटा; प्रेतें जाळण्याची किंवा पुरण्याची जागा. ०भोजन-न. प्रेतसंस्काराच्या वेळीं स्मशानांत करावयाचें जेवण; उत्तरक्रियेच्या अथवा और्ध्वदेहिकाच्या वेळीं ब्राह्मणांस घालावयाचें मृताच्या प्रीत्यर्थ जेवण. ०मित्र-पु. मरणापर्यंत, स्मशानांत जाईपर्यंत ज्याची मैत्री टिकते असा सोबती, सहचर (जन्मोजन्मींचा मित्र नव्हे). ०मैत्री-स्त्री. मरणापर्यंत टिकणारें साहचर्य, सख्य. ०रुदन-रोदन-न. १ स्मशानांतील रडणें; वायफळ, वृथा केलेला शोक (स्मशानांत कोणी ऐकून सांत्वन करूं शकत नाहीं याकरितां). २ केवळ तात्कालिक शोक; मनापासून नव्हे पण वरवरचा शोक. ०वास-पु. स्मशानांत राहणें; जगापासून अलिप्त राहणें; सर्व संग परित्याग करणें; सर्व सोडून एकटें राहणें. ०वासी-वि. १ स्मशानांत राहणारा. २ शंकराचें विशेषण. 'स्मशानवासी भूषण भयंकर पिंगट मुगुटीं जटा ।' -प्रभाकर लक्ष्मीपार्वती संवाद. शाको. ७. १४ ०वैराग्य-न. एखाद्याच्या मरणामुळें उत्पन्न झालेली तात्कालिक विरक्ति; संसाराबद्दल केवळ स्मशानांत उत्पन्न झालेली उदासीनता. प्रेतदहनास आलेल्या मनुष्यास वाटणारी संसाराबद्दलची असारता. ०विरक्त-वि. वैरागी; स्मशानविरक्ति झालेला. ०विरक्ति-स्त्री. स्मशानवैराग्य. ०साधन-न. पिशाच्चादिक वश व्हावें म्हणून स्मशानांत केलेलें जपजाप्य; मंत्रांचा प्रयोग वगैरे.

श्मश्रू—स्त्रीन. १ मिशा; दाढीमिशा; कल्ले वगैरे. २ सामान्यतः हजामत; तोंडावरचे केस. ०ल-वि. दाढीमिशा असलेला.

श्या—शब्दप्रयोग; तें याचें सामान्यरूप. 'पैं जे वानीं श्या तुका । तेचि वेगळिक याला येका ।' -ज्ञा १३.७५. 'श्या नये सहणें नये । लक्ष कोडीलागीं नये ।' -तुगा.

श्यांग—स्त्री. (कु.) (प्र.) शेंग.

श्याड—स्त्री. (कु.) शेंड; फांक.

श्याम—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, तीव्र मध्यम, पंचम, तीव्र धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. आरोहांत धैवत वर्ज्य. जाति षाडव-संपूर्ण. वादी ऋषभ. संवादी पंचम. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर २ (मुखराग) (नृत्य) बीभत्स, भयानक व करुणरसाचा अभिनय दाखविण्याच्या वेळचें तोंडावरील तेज. -वि. १ सांवळा; मेघवर्ण; काळा; निळा; अस्मानी. 'चंद्रबिंबिं श्यामरेखा ।' -एरुस्व ७.१५. [सं.] ०कर्ण-पु. फक्त कान व पुच्छ काळे व बाकी पांढरें अंग असा घोडा; काळ्या कानांचा घोडा. हा अश्वमेधास युक्त आहे. ०कल्याण-पु. (संगीत) एक राग. कल्याण रागांतील एक भेद. ०चंद्र-पु शुक्ल पक्षांतील द्वितीयेचा चंद्र. 'श्यामचंद्राची सपोष कोर । तैसी धुवुका अति सुंदर ।' -एभा १४.४७६. श्यामल-ळ-वि. गर्द निळा; काळासांवळा. 'एकें नवजलद श्यामळें । एकें चापे गौरी केवळें ।' -ज्ञा ११.१३५. श्यामता-स्त्री. काळेपणा. 'निढळीं प्रभा श्यामतेची । तोचि कस्तुरी मळवट ।' -एरुस्व ७.१४. श्यामशबल-पु. १ यमाच्या द्वारीं श्याम व शबल असे दोन कुत्रे आहेत ते. २ (ल) दुष्ट लोकांची, चांडाळांची दुक्कल, जोडी. [सं.] श्यामिका-स्त्री. १ काळेपणा; काळा रंग; नीलिमा; सांवळेपणा. 'तैसीं श्यामिका अंतराळीं । देखिली तेणें ।' -शिशु २५०. 'आणि नवतीचि श्यामिका । व्योमीं दिसे तैशी दिसो कां ।' -ज्ञा १५ २४२. २ धातूंतील हिणकस भाग, रत्नांतील दोष; काळेपणा.

श्यामाक—पु. सावा नांवाचें धान्य. 'श्यामाक दूर्वांज विष्णुक्रांता । पाद्यपात्रीं हे द्रव्य शुद्धता ।' -एभा २७ १७५. [सं.]

श्याय—न. चुन्याचा फरशीसारखा उपयोग करणें, 'चुन्याच्या अशा रीतीच्या उपयोगाविषयींची माहिती आमच्या

शिल्परत्नांतील चौदाव्या प्रकरणांत सांपडत, त्यांत पत्नीच्या भत्ता उपयोगास श्याव हें नाव दिलें आहे।' -वेमरी ५. १३७

श्याल-लक—पु बायकोचा भाऊ, शालक, साला, मेहुणा 'श्यालें सुस्या तृपाळा ' -मोकर्ण १५ १६ 'धर्म म्हणे श्यालक हा, प्रसवाव सदनाये पुत्र मानें।' -माभीष्म ३ १९ [सं]

श्येन—पु ससाणा; ससाणा पक्षी [सं] श्येनी-स्त्री ससाण्याची मादी

श्रद्धा—स्त्री १ पूज्य बुद्धि, आदर, भक्ति भाव, निष्ठा २ आस्तिक्यबुद्धि विश्वास 'मग श्रद्धायुक्त। सर्वांचें आराधन जें उचित।' -ज्ञा ७ १४९ ३ इच्छा, अभिलाष, हेतु 'हा मी धार्मिल्या मिष्टान्ना। परतानि श्रद्धा न धरी रसना।' -एमा २१ १०१ 'पहा हा भिकारिणीची थाटा। श्रद्धा करितसे राज्य पदा।' -केथा १५ १२ [सं श्रत्+धा=ठेवणें] ॰आडव्य-न श्रद्धेबद्दल्या हर एखाद्या गोष्टीवर विरुद्ध प्रमाण दिसलें तरी हठानें विश्वास ठेवणें ॰भक्ति-स्त्री १ ईश्वरासंबंधीं प्रेम व विश्वास निष्ठा व आदर, मन करणांत दरबार व बाहेरून पूजा, सत्कार वगैरे (क्रि॰ करणें, ठेवणें, असणें) श्रद्धालु-ळू, श्रद्धावान, श्रद्धावान-वि श्रद्धा ठेवणारा, भाविक, विश्वासी श्रद्धेय-वि श्रद्धा ठेवण्यास योग्य विश्वसनीय, विश्वासार्ह

श्रद्धा—स्त्री (प्र) शर्धा अपानद्वारा सोडलेला वायु पाद पर्दन (क्रि॰ सोडणें करणें सरणें, सुटणें, होणें) 'श्रद्धा करिती अधोद्वारें। नाकीं तोंडीं भरे दुर्गंध।' -एमा २१ ५५८ [स शृध्=पादणें]

श्रम—पु १ कष्ट, आयास, मेहनत, राबणूक, दमणूक २ दु ख, खेद त्रास, कंटाळा, कष्ट 'देवा होय श्रम दुजे माया।' -तुगा १५ [स श्रम्] (वाप्र) श्रम टाकणें-दु खपरिहार होणें, कष्ट वाटनास होणें 'तो स्वामीच्या देखिले आश्रमातें। कांहीं चित्तें टाकिलें हो श्रमातें।' -श्रम मागून घेणें-घडलेल्या श्रमाबद्दल क्षमा मागणें, खेद व्यक्त करणें 'घडले श्रम मागून घेतों।' -पला २० ४१ ॰कर्म-न कष्टाचें, मेहनतीचें राबावयास लागणारें काम, पुष्कळ कष्ट, मेहनत, त्रास घेऊन केलेलें काम श्रमणें-अक्रि कष्टी होणें, दमणें, थकणें, भागणें, त्रासणें, कंटाळणें, खेद होणें श्रमविरल-वि दमलेला, थकलेला, भागलेला दु खी, कष्टी श्रमविणें सक्रि कष्ट देणें, त्रास देणें थकविणें दमविणें [श्रमणें प्रयोजक] श्रमविनोदन-न श्रमपरिहार -स्वभावचित्रें ४२ श्रमविभाग-पु श्रमाची, कष्टाची, मेहनतीची वाटणी अनेकांनीं एका गोष्टीच्या सिद्ध्यर्थ सहकार्यानें श्रम घेणें, काम करणें श्रमसहिष्णु-वि कष्टाळु सहनशील

श्रमित, श्रमी-धारि थकलेला, दमलेला, भागलेला, कष्टी, दु खी, त्रासलेला 'हे वर्तमान पुण्यास न नानाहेब व भाऊसाहेब यांस कळतांच बहुत श्रमी जाहले' -भाव १७ २ असंतुष्ट, नाराज, नाखुष, रागावलेला 'गोविंदराव यांजवर बहुतच श्रमी झाले' -भाव ४९

श्रमण-क—पु बुद्धयति, संन्यासी [सं]

श्रय—न (प्र) श्रेय पहा

श्रवण—न १ ऐकणें, श्रुत होणें; ऐकण्याची क्रिया. 'श्रवणमात्रेंचि देख। निजात्मसुख पावती।' -एमा २ १०४ २ कान श्रवणेंद्रिय 'किसी श्रवण झाकिली।' -कका ३० 'मीमांसा श्रवणस्थानीं।' -दा १ १९ ३ सत्तावीस नक्षत्रांतील बाविसावें नक्षत्र [सं श्रु=ऐकणें] ॰द्वादशी-स्त्री श्रवणनक्षत्रयुक्त भाद्रपद किंवा फाल्गुन महिन्यांतील शुद्ध द्वादशी ॰पुट-न कान 'आतयाचीं श्रवणपुटें।' -दा ४ २ १२ श्रवणीय-वि ऐकण्यास योग्य ॰भक्ति-स्त्री नवविधा भक्तींपैकीं एक प्रकार 'असार तें जाणोनि त्यागावें। या नांव श्रवणभक्ति।' -दा ४ १ २९ श्रवणें-सक्रि ऐकणें 'वरि श्रवणिलि फळांची श्रुति।' -दाव ४१६ श्रवणाचें श्रवण-न कानांतील ऐकण्याचें इंद्रिय 'मती उपडोन श्रवणाचें श्रवण। श्रवण करोत पंडित जन।' श्रवणीय-वि ऐकण्यास योग्य

श्रवण—न कर्ण; काटकोनत्रिकोणाची कर्णरेषा [स]

श्रांत—वि दमलेला; थकलेला, कष्टी, कंटाळलेला 'त्यांच्या भारामुळेंच आत्मा श्रांत होऊन दृश्य जगांत आकर्षिला जातो' -साप्त ७३८ [स श्रम्] ॰संवाहन-न थकलेल्याचे श्रम परिहार, दमलेल्यास विश्रांति श्रांति-स्त्री दमणूक कंटाळा शीण

श्राद्ध—न मृत पितरांस उद्देशून पुत्रादिकांनीं करावयाचें ब्राह्मणभोजन, पिंडदान वगैरे कर्म [स] म्ह॰ विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करणें-नसती पीडा मागें लावून घेणें

श्राद्ध—वि श्रद्धा ठेवणारा; विश्वासी भाविक

श्राप श्रापगुण, श्रापग्रस्त, श्रापणें, श्रापित—शापमध्यें पहा 'कोणी येकास श्राप जो।' -दा ३ ७ १५

श्रामक—वि श्रम करणारा, कष्ट करणारा; तत्पर दक्ष; कामसु, कष्टाळु

श्राव—पु (प्र) स्राव पहा पाझर झिरपा, टपकणें श्रावणें-अक्रि ठिबकणें पाझरणें

श्रावक—पु जैनधर्मी गृहस्थ जैनमतानुयायी [स]

श्रावड—स्त्री (कों) एक झुडप यास रुपेरी पानें येतात तीं मंगळागौरीस वाहतात -न या झुडपाचें पान

श्रावण—पु चैत्रापासून पाचवा महिना हिंदु पंचांगांतील एक महिना ॰काकडी-स्त्री श्रावणांत लागलेली काकडी ही

मपूर्न म्हणून प्रथम देवब्राह्मणास अर्पण करून मग खातात ०घेवडा-पु एक घेवड्याची जात अडीचमासा ०पाटी-स्त्री विवाहानंतरच्या पहिल्या श्रावण महिन्यांत वराकडून वधू कडे जी टाळ वगैरे भरून पाठवितात ती पाटी -ऐरापुप्र १७८ ०मासदक्षिणा-स्त्री शिवाजी महाराजानीं श्रावण महिन्यात ब्राह्मणास दक्षिणा वाटण्याची पद्धति सुरू केली ती पुढें सेनापति दाभाडे व त्यानंतर पेशव्यानीं चालविली यावून पुढें दक्षिणा प्रैंस कमिटी स्थापन झाली ०सण-पु १ विवाहानंतर वधूसाठीं पहिल्या श्रावण महिन्यात करावयाचा समारंभ २ श्रावण पाटी ०सर-सरी-पावळी-स्त्री १ श्रावण महिन्यात एका पाठोपाठ येणाऱ्या पावसाच्या सरी, झडीचा पाऊस थांबून थांबून सारखा पडणारा पाऊस २ (ल) मधूनमधून वरचेवर सारखें होणारें भांडण, कज्जा, तगा श्रावणा-णी-वि श्रावण महिन्यातील किंवा श्रावण महिन्यासबधीं ०श्रावणी-स्त्री १ श्रावण महिन्यात प्रतिवर्षी ब्राह्मण जें उत्सर्जन उपाकर्म, यज्ञोपवीत धारणकर्म करतात तें २ श्रावणातील पूर्णिमा

श्राव्य—वि श्रवण करण्यास, ऐकण्यास योग्य, ऐकण्याजोगें, ऐकावयाचें; ऐकू येईल असें 'हितसत्य श्राव्य तें वदे शल्य।'—मोकर्ण (नवनीत पृ ३३५) श्राव्यत्व—न ऐकण्याविषयीं योग्यता 'श्राव्यत्वें तरी माधुर्य। पायीं घाली।'—ज्ञा १६ ११८

थ्रिंगार थ्रिंगारणें—शृगार शृगारणें पहा

थ्रिमाटु—पु (महानु) मद मस्ती 'तव तुज सवया थोर आला थ्रिमाटु।'—मस्तो ३३ श्रीमाठ पहा

श्री—स्त्री १ लक्ष्मी 'श्रियेचीं राउळें।'—ज्ञा १६ २००. 'श्रियेसारिखिया दासी। घरीं जियतें।'—ज्ञा ९ ३७३ २ ऐश्वर्य संपत्ति काति शोभा श्रीची प्राप्ति झाली म्हणजे गर्वाची बाधा होते '—गुप्तमजूष ४ ३ जगातील तीन पुरुषार्थ-धर्म अर्थ काम, समुच्चयानें 'श्री हरील शकुनी ती —मोसभा ३ ४३ ४ देवता, तीर्थे, धर्मग्रंथ, गुरु वगैरेंच्या नावापूर्वी आदरार्थ योजावयाचें उपपद ग्रंथ पत्र वगैरेंच्या आरंभीं लिहावयाचा शुभदर्शक श्रीगणेशायनम याचा सक्षेप ५ ऐश्वर्य वैभव, सौंदर्य वगैरेचा द्योतक म्हणून अनेक शब्दापुढें हा शब्द जोडतात उदा० गर्भश्री, गृहश्री, जयश्री, जलश्री, यशश्री, वनश्री वीरश्री इ० ६ (साके) कादीक्षेत्र आपण श्रीहून कधीं आला '—पया १३ ७ —पु शकराचार्य यास उद्देशून उपयोग या उत्सवास करवीर पीठाचे श्रीहि उपस्थित होते —केसरी १७ ५ ३० [स]

श्री—पु (सगीत) एक राग यात षड्ज कोमल ऋषभ तीव्र गाधार तीव्र मध्यम पचम कोमल धैवत तीव्र निषाद हे स्वर लागतात आरोहात गाधार व धैवत वर्ज्य जाति औडुव-संपूर्ण वादी ऋषभ, सवादी पचम, गानसमय सायकाल

श्री—१ (संक्षेप) श्रीमत २ श्रीयुक्त, श्रीयुत ३ श्रीमती याचा सक्षेप

श्रीक—पु (शाप) एक धातु (इ) सिरियम

श्रीकंठ—पु शकर, महादेव [स]

श्रीकरणाधिप, श्रीकरणी—पु देशातील जमाबंदीचा मुख्य अधिकारी. [स]

श्रीकांत—पु विष्णु लक्ष्मीपति 'तयाचें स्वरूप आइक म्हणे। श्रीकातु तो।'—ज्ञा १७ ३४१ [स]

श्रीकार—पु १ ग्रंथ, पत्र, लेख वगैरेंच्या आरंभीं काढावयाचें शुभदर्शक श्री हें अक्षर २ व्यापारी वगैरे लोकांन मालावर मंगलदर्शक श्री अक्षराचें चिन्ह करतात तें ३ हिशेब, लेख वगैरेचें शीर्षक [स]

श्रीखंड—न १ दह्याचा चक्का साखर, केशर मिळून केलेलें एक पक्वान्न, खाद्य पदार्थ २ चदन 'श्रीखड खंडें सुका।' —सारुह ३ ४२ ३ भागचा एक पदार्थ [स श्रीखड, प्रा सिहरण गु सिखड]

श्रीगड—पु त्र्यबकेश्वरचा किल्ला —शिदि १५२

श्रीगिरि—स्त्री छत्र शिरगीर पहा 'पाल्वछत्रा श्रीगिरी। नाहीं (तेंय) अतु।'—आद्य मराठी कवियित्री पृ ३४१,'वरी श्रीगिरीछत्र झलरी। ध्वजा पताका अबरीं।'—कान्हिपुराण ६ २०

श्रीगणेशा—पु (ल) कार्यारंभ, पहिला धडा, सुरवात [श्रीगणेशायनम याचा सक्षेप]

श्रीचक्र—न एक तांत्रिक चक्र [स]

श्रीद—पु कुबेर [स]

श्रीदर्शन—न देवतेचा साक्षात्कार देवतेचें प्रत्यक्ष दर्शन

श्रीधर, श्रीनिवास श्रीनाथ श्रीवर श्रीवल्लभ—पु लक्ष्मीचा पति विष्णु याचीं नावें अशीं अनेक आहेत

श्रीनिकेतन—न विष्णूच्या छातीवरील लक्ष्मीच्या निवासाचें चिन्ह 'श्रीवत्स श्रीनिकेतन। हृदयीं दोन्हीं भागीं जाण।' —एभा १४४८१ [स]

श्रीपति—पु १ विष्णु कृष्ण 'मागा बाळपणीं। येणें श्रीपती।'—ज्ञा १३ १८२ २ धनवान् मनुष्य श्रीमंत मनुष्य [स]

श्रीपाद—पु सन्यासी श्रीपाद जाले द्रव्याभिलाषी।' —स्वादि ९ १ ८० 'कोप आला श्रीपादासी। दडें वेढयेसी ठोकिलें।'—एरुस्व १८ २५ [स]

श्रीपूर—न कोल्हापूर

श्रीफल-ळ—न १ नारळ प्रसाद म्हणून दिलेला किंवा देवतेस अर्पण केलेला नारळ 'जेथें जनूफळाचे समुदय पिकले

घोसदी श्रीफळाचे" –र गर्जेंद्रमोक्ष १२. २ एक विशिष्ट बंगाली फळ. [ सं. श्री+फल; शिर.फल ] श्रीफळ देणें-निरोप देणें; नोकरीवरून दूर करणें. 'सीतारामभाऊ व त्याचे बंधु तात्या यांनाही श्रीफळ दिलें' –विक्षिप्त ९.४४.

**श्रीमंत**—पु. १ राजा; महाराज. २ पेशवे सरकार; गादीनशीन पेशवा. 'गेले श्रीमंत तिच्या गांवास।'–विक १४. ३ संस्थानिक. –वि. धनवान्; संपत्तिमान्; ऐश्वर्यवान; पैसेवाला. [ सं. ]

**श्रीमन्महा**—पु. आरंभ; सुरवात. 'मातुलीचा कोट घेऊन या रणयज्ञाचा श्रीमन्महा करण्यांत आला.'–केसरी २८.७.३६. [ कोणत्याहि विधीच्या आरंभीं म्हणावयाच्या श्रीमन्महागणा-धिपतयेनमः याचा संक्षेप ]

**श्रीमंतपूजन**—न. सीमांतपूजन याबद्दल चुकीचा प्रयोग. श्रीवती पूजन असेंहि म्हणतात.

**श्रीमंताचा मातु**—पु. श्रीमंतीची ऐट आणणारा धनहीन मनुष्य.

**श्रीमंती**—स्त्री. ऐश्वर्य; संपत्ति; थेरपणा; समृद्धि. –वि. श्रीमंत लोकांसंबंधीं, श्रीमंतांत रूढ ( चाल रीत, भाषा, पद्धति वगैरे ).

**श्रीमद**—पु. संपत्तीचा, ऐश्वर्याचा गर्व, ताठा, माढपता. **श्रीमदांध**-वि. ऐश्वर्याच्या गर्वामुळें आंधळा झालेला; संपत्तीची माढयता माल्यून बेगुमानपणें वागणारा.

**श्रीमाठ**—पु. संपत्तीचा गर्व; लक्ष्मीमद; अहंकार; अभिमान. 'ते मीचि का कर्मठ। ऐसा न ये श्रीमाठ।'–ज्ञा १४.३५८. [ श्रीमद ]

**श्रीमान्**—पु.वि. संपत्तिमान्; ऐश्वर्ययुक्त; आदरणीय; वंद्य; मान्य; पूज्य; दैववान्. याचें समासाच्या आरंभीं श्रीमत् असें रूप येतें. उदा० श्रीमन्नारायण; श्रीमच्छंकराचार्य; श्रीमद्भागवत.

**श्रीमुख**—न. १ भगवंताचें तोंड; ते जवुंन कांतिमान चेहरा, चर्या. 'ऐसीं श्रीमुखौनि अक्षरें। निघतीवा एकसरें।'–ज्ञा ११. १७७. 'तुका म्हणे माझे हेंचि सर्व सुख। पाहीन श्रीमुख आव-डीनें।' २ ( उप. ) थोबाड; मुसकट; तोंड. उदा० फारसा बोल-लास तर श्रीमुखात मारीन.', 'गरुड ताडिला श्रीमुखावरी।' –गरुडगर्वहरण.

**श्रीमुद्रा**—स्त्री. वैष्णव लोक आपल्या चेहऱ्यावर उठवून घेतात तीं विष्णुसंबंधीं चिन्हें प्रत्येकीं. हीं शंख, चक्र, गदा, पद्म व रामनाम अशीं असतात. 'ठसे श्रीमुद्राचे।'–दा ५.१.२७. [ सं. श्री=विष्णु+मुद्रा=चिन्ह ]

**श्रीयुत**—वि. श्रीमंत, कोणत्याहि गृहस्थाच्या नांवापूर्वी आदरार्थी योजावयाचा शब्द. [ सं. ]

**श्रीरंग**—पु. श्रीकृष्ण; विष्णु. 'जो संवादला श्रीरंगु। अर्हं-मेसी।'–ज्ञा १.५०. [ सं. ]

**श्रीरंजनी**—पु. ( संगीत ) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, तीव्र धैवत, कोमल निषाद, हे स्वर लागतात. आरोहांत ऋषभ, पंचम वर्ज्य. अवरोहांत पंचम वर्ज्य. जाति औडुव-षाडव. वादी मध्यम, संवादी षड्ज. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.

**श्रीराग**—पु. ( संगीत ) एक राग. श्री पहा. 'कल्याण गोडी श्रीराग। सुरलीत आळवी श्रीरंग।'–ह १०.११७. [ सं. ]

**श्रीराज**—पु. विष्णु; कृष्ण. 'तैसें अर्जुनाचेनि व्याजें। गीता प्रकाशूनि श्रीराजें।'–ज्ञा १८.१४५०. [ सं. ]

**श्रीवत्स**—न. १ विष्णु. २ विष्णूच्या हृदयावरील पांढऱ्या केसांचा भोंवरा. यासच विष्णूच्या हृदयावरील भृगूच्या लत्ताप्रहा-राचें चिन्ह म्हणतात. यासच श्रीवत्सांक, श्रीवत्सलांछन असेंहि प्रतिशब्द आहेत. 'श्रीवत्स श्रीनिकेतन। हृदयीं दोहीं भागीं जाण।' –एभा १४.४८१. 'सकळ भूषणाचें भूषण। ब्राह्मणाचा दक्षिण चरण। हृदयीं वाहे नारायण। श्रीवत्सलांछन गोविंद।' –एरुस्व १.६८. 'हृदयीं श्रीवत्स लांछन। मिरवी भक्तांचें भूषण।'–तुगा ७२६. **श्रीवत्सलांछन**-वि. वरील चिन्ह धारण करणारा ( विष्णु ). 'दक्षिणांगीं विप्रचरण। श्रीवत्सलांछन गोविंद।' –एभा ३०.२०२.

**श्रीविठ्ठल**—पु. पंढरपूरचें दैवत; विठोबा. याचीं विठाई, विठ्या, विठवा, विठ्ल, इटाल, इठाल, ठाल, विठामाई अशीं अनेक रूपें साधुसंतांच्या ग्रंथांतून व यात्रांतून ऐकूं येतात. हीं विष्णूचींच प्राकृत रूपें आहेत.–ग्रंथमाला–चौऱ्याशिचा शिलालेख शके ११६५ पृ ७.

**श्रीविद्या**—स्त्री. मंत्रतंत्रविद्या. 'श्रीविद्येंत आई पट्टाभिषिक्त आहे.'–वाय २.४. [ सं. ]

**श्रीवेष्टन**—न. वस्त्र. 'येक श्रीवेष्टन त्यास दिल्हे.'–पेद २०.५४. [ सं. ]

**श्रीवैष्णव**—पु. विष्णूची उपासना करणारा एक पंथ किंवा त्यांतील व्यक्ति. [ सं. ]

**श्रीशमुद्रा**—स्त्री. श्रीमुद्रा पहा. 'आगोमागी लाविती श्रीशमुद्रा।'–साप्तह ६.४७.

**श्रीवर्धनी**—वि. श्रीवर्धन गावची, श्रीवर्धन गांवासंबंधी ( रोठा सुपारी इ. ) [ सं. ]

**श्रीवृकी**—वि. ज्याचे छातीवर चोहोंकडे चार व कंठाचे ठिकाणीं चार असे आठ भोंवरे असतात असा ( अश्व ). हा शुभ आहे. [ सं. ]

**श्रीस्टी**—स्त्री (प्र) सृष्टि 'दुसरी श्रीस्टी करू आद रिली।'–उपा ७३.

**श्रीहट, श्रीहाट**—न (योग) तालुस्थानचा मुख्य बिंदु मग्नध्र 'कमोनिया श्रीहट। आत्री उद्भट ब्रम्मण्याना।'–एभा ६ १२९ 'दुसरें जें का श्रीहाट। उदकाचे मूळकपाट।' मिस ७ २६१ [स]

**श्रुत**—धावि १ ऐकलेलें, ज्ञात, प्रख्यात, प्रसिद्ध 'किंब हुना ऐसें पूर्वी। इष्ट ना श्रुत।'–ज्ञा ११ ५८८ २ ज्यानें ऐकिलें आहे असा ३ श्रुतींत, वेदशास्त्रांत पारंगत ४ श्रुतींनीं, धर्मशास्त्रानें विहित [स श्रु=ऐकणें] **श्रुत करणें**-ऐकविणें, सांगणें, कथन करणें, सुचविणें, कानात सांगणें **श्रुतकीर्ति**-वि प्रसिद्ध, प्रख्यात, विख्यात [स] **श्रुताधीत**-वि वेदाध्ययन केलेला, श्रुति वगैरे पढलेला, बहुश्रुत व पटीक 'तं श्रुताधीतही न होतु कां। परि मजसीं तुकिता तुका। तुटी नाहीं।'–ज्ञा ९ ४४९ [स]

**श्रुति**—स्त्री १ ऐकणें, श्रवण, ऐकण्याची क्रिया २ श्रवणेंद्रिय, कान 'शकुनें पुढतीकोनें म्याल्या श्रुति कापतील न सुयावे।'–मोसभा ४ ६० ३ वेद 'जे श्रुतित्रयातें जाणोनि। शतवरी यज्ञ करूनि।'–ज्ञा ९ ३१० 'मळे कलियुगीं श्रुती।'–केका ९६ ४ वार्ता, वातमी, आवई ५ (संगीत) स्वर, अखंड, स्पष्ट व मधुर या गुणानीं युक्त गायनोपयोगी नाद या श्रुती २२ आहेत त्या–तीव्रा, कुमुद्वती, मंदा, छंदोवती, दयावती, रंजनी, रक्तिका, रौद्री, क्रोधा, वज्रिका, प्रसारिणी, प्रीति मार्जनी, क्षिती, रक्ता, संदीपनी, आलापिनी, मदंती, रोहिणी, रम्या, उग्रा, क्षोभिणी ६ काटकोन त्रिकोणाचा कर्ण ७ (अर्थ दोनवरून ल) आधार, शासन, नियम 'परंतु या गोष्टीस कांहीं श्रुति आहे?' ८ वीणा 'गर्जनी गंभीर। टाळ श्रुति मृदंग।'–तुगा ३६५८. [स श्रु=ऐकणें] ०**कटु**-वि कर्णकटु कानाला न सोसणारें, कर्कश बेसुर ०**पथ**-पु श्रवणमार्ग, कर्णरंध्र, कान ०**मत**-वि १ वेदमान्य २ कर्णमधुर 'श्रुतिमत यतिप्र जेथि सुरचाप।'–मोआदि १ २

**श्रूयमाण**—वि ऐकण्यास योग्य, ऐकावयाजोगें, ऐकू येत आहे असें, ऐकू येण्यासारखें [स]

**श्रेढी**—स्त्री (गणित) मालिका रांग ओळ जेव्हा कोणा एका नियमानें एकसारख्या अनुक्रमानें संख्या वाढत किंवा कमी होत असतात तेव्हा त्या ओळीस श्रेढी म्हणतात –छअ १३६३ गणितश्रेढी, भूमितिश्रेढी [स श्रेधी] **श्रेढीफल**–न अशा मालिकाची बेरीज

**श्रेणी**—स्त्री ओळ, रांग, मालिका, पंक्ति, पंगत 'जेय यातनाची श्रेणी।'–ज्ञा १६ ३७४ 'उचलोनि दोघीं जणीं। वीरश्रेणी आणिल्या।'–एरस्व १२ २६ [स.]

**श्रेणी**—स्त्री अधिकारयुक्त महाजन मंडळ, पेढी 'गोवर्धनांत राहणाऱ्या श्रेणीकडे दोनहजार कार्षापणाची रक्कम अनामत ठेविली'–कसरी १ ८ ५ ३७

**श्रेधी, श्रेधीफल**—श्रेढी, श्रेढीफल पहा

**श्रेम्य**—वि सम्य (अपभ्रंश) 'जेवि धावती श्रेम्य गृहस्थ।'–दावि १३ १३ **श्रेम्यता**–स्त्री सम्यता (अपभ्रंश) 'ते श्रेम्यताहि सर्वा न कळे।'–दावि २ ३०

**श्रेय**—न १ शुभ, हित लाभ, कल्याण, ऐश्वर्य, चांगुलपणा, 'तरी ज्यानें मी श्रेय म्हणजे कल्याण पावेन तवढें एकच निश्चित करून मला सांगा –गीर ६४३ २ पुण्य, सुकृत, फल. [स श्रेयस्] **श्रेयस्कर**–वि १ हितकर, लाभदायक, कल्याणकारक २ पुण्यकारक **श्रेयस्संपादन**–न १ कल्याणप्राप्ति, उपकार अपकारादि कृत्यांचें फलग्रहण २ पुण्यप्राप्ति दक्षिणादि दानानें परकृत कृत्याचें फलग्रहण **श्रेयस्संपाद्य**–न श्रेय संपादन याचा अपभ्रंश **श्रेयान्**–वि श्रेष्ठ, उत्तम, वरिष्ठ मुख्य 'गोठ गस्ते यांच्यापैकीं श्रेयान् अमलदाराचे हस्ते होत जावा'–मेहेर बहुमान नियम पृ १९ **श्रेयार्थी**–वि १ शुभेच्छा प्रदर्शित करणारा, कल्याण इच्छिणारा, चांगली इच्छा असणारा, बरें व्हावें असें इच्छिणारा, अभ्युदयेच्छु शुभेच्छु २ पुण्याची इच्छा करणारा, शुभफलाकांक्षी कर्मफळाची प्राप्ति इच्छिणारा **श्रेयोवाद**–पु आशीर्वाद, आशीर्वचन शुभकारक भाषण **श्रेयोवान्**–वि. ऐश्वर्ययुक्त, शुभ, उत्कर्षकारक, समृद्धियुक्त

**श्रेष्ठ**—पु समर्थ रामदास यांचे वडील बंधु रामीरामदास गंगाधर स्वामी –वि उत्कृष्ट उत्तम, वरिष्ठ, मुख्य, ज्येष्ठ 'कीं श्रेष्ठें घडा घातला। रेवातासी।'–शिशु ९९४ 'ज्येष्ठ श्रेष्ठ नृपा तु न धरावे बोल हे मनीं कांहीं।' –मोसभा ४ ६३ [स] ०**अर्धांग**–न पत्नी (इ) बेटरहाफ –आगरकर **श्रेष्ठाचार**–वि उत्तम, उत्कृष्ट तऱ्हेची वागणूक, रीति, पद्धति **श्रेष्ठायत्त कुटुंब**–न ज्येष्ठ मनुष्यास सर्वाधिकार असलेलें कुटुंब (इ) पॅट्रिआर्चल फॅमिली –आगरकर **श्रेष्ठ्य**–न श्रेष्ठत्व

**श्रोणवी**—स्त्री भूमि, पृथ्वी 'जैसी का श्रोणवी। सप्रामीचि।'–ज्ञा १४ ३३८ [स श्रोण=गोळा करणें]

**श्रोणि-णी**—स्त्री ढुंगण कुल्ले नितंबभाग, कवर (इ) पेल्व्हिस [स श्रोण=संचय करणें] ०**फल-क**–पु १ कुल्ले, ढुंगण, नितंब, कवर २ नितंबास्थि माकडहाड (इ) ऑसि उनोमिनेट बुलॉची ०**मंडल**–न नितंबमंडळ (इ) पेल्व्हिक गर्डल

**श्रोणित**—न शोणित रक्त 'मग काढिला वोजा श्रोणितांचा।'–आए ७६१ [स शोणित]

**श्रोतव्य**—वि. ऐकावयाचें; ऐकावयास योग्य; ऐकण्या-जोगें. [ सं. श्रु=ऐकणें ]

**श्रोता**—पु. ऐकणारा; श्रवणेच्छु; ऐकावयास आलेला, बसलेला; श्रवण करणारा. 'श्रोतेन पुसिलें बरवें।' -दा ४.१.४. [ सं. श्रु ] **श्रोतृसमाज**-पु ऐकण्यास आलेले लोक; पहावयास आलेल्या लोकांचा समुदाय; सभ्य. (इं.) ऑडियन्स.

**श्रोत्र**—न. कान; श्रवण; श्रवणेंद्रिय; कर्ण; कर्णेंद्रिय. 'श्रवण करितां मासें श्रोत्र। अधिकाधिक भुकेलें।' -एरुस्व १.६. 'श्रोत्रादि इंद्रियें आवरिलीं।' -ज्ञा २.३०४. [ सं. ]

**श्रोत्रिय-त्रीय, श्रोती, श्रोत्री**—पु. १ वेदवेत्ता; वैदिक ब्राह्मण; श्रुतिपारंगत ब्राह्मण. 'श्रोत्रीय कुटुंबी निर्धन।' -मुसभा (नवनीत पृ. १७५). 'जे परब्रह्मण्य श्रोत्री।' -ज्ञा ६.४४९. २ अग्निहोत्री; यज्ञ करणारा. [ स. श्रुति ]

**श्रौत**—वि. १ श्रुतिविहित; वेदविहित; वेदप्रोक्त. २ वेदा-संबंधी; श्रुतिसंबंधी (विधि, वाक्य, कर्म). [सं.] ०**कर्म**-न वेदविहित कर्म. 'यावरी श्रौतकर्म विधान। परी यागार्थ पशुहनन।' -एभा १८.४० ०**समो**-पु. श्रुतीचा संकेत; श्रुतिमय, वेदाचा सिद्धांत. 'तें सुक्रुत ऐसें म्हणे। श्रुति समो।' -ज्ञा १४.२६०. [ सं. श्रुति + सम ] **श्रौतादिक**-वि. श्रुतिस्मृतिपुराणोक्त. 'निर्वाळलीं होमधर्मे। श्रौतादिकीं।' -ज्ञा १६.४०३. **श्रौती**-पु. श्रुतिनिपुण, श्रुतिपारंगत; श्रौत जाणणारा, श्रुतिविशारद; वेदज्ञ; वेदवेत्ता. [ श्रुति ]

**श्लथ**—वि. १ ढिला; शिथिल; सैल; लटपटीत; घट्ट न धन-लेला; न आवळलेला. २ विखुरलेले, पिंजारलेले (केस वगैरे). [ सं. श्लथ् ]

**श्लाघणें**—उक्रि स्तुति करणें; धन्य मानणें; आनंद मानणें; वाखाणणें, मोठेपणास चढणें. 'आइकोनि श्लाघत असो अंतःकरणीं।' -ज्ञा ६ १४२. 'म्हणोनि विश्वरूप लाभें श्लाघे।' -ज्ञा ११.६२३. [ सं श्लाघ् ] **श्लाघनीय, श्लाघ्य**-वि. स्तुत्य; वाखाणण्याजोगा. **श्लाघा**-स्त्री. स्तुती; बडाई; डौल; थोरवी; गौरव; प्रशंसा. **श्लाघिजणें**-अक्रि. श्लाघ्य होणें. 'तरीच हरिदास म्हणविती श्लाघिजे' -तुगा ११०३ **श्लाघ्यता**-स्त्री. गौरव; थोरपणा; मोठेपणा. 'ऐसिये श्लाघ्यतेचा नोहे। तोपु जीवीं।' -ज्ञा १८.१६७. **श्लाघ्यवाणा**-वि. १ योग्य, स्तुत्य; चांगले; लाभदायक. 'म्हणिजे होय श्लाघ्यवाणें। सर्व कांहीं।' -दा ६.१.३. २ (अशिष्ट मुखीनें श्लाघ्य याच्या विपरीत अर्थी) गरीब; कींव करण्याजोगा; लाजाळू; लाजिरवाणा.

**श्लिष्ट**—वि. द्व्यर्थी; श्लेष असलेलें, श्लेषविशिष्ट, घरसोडीचें; मोघमवाचें. [ सं. श्लिष् ]

**श्लीपद**—न. पायांकडून येणारी सूज. [ सं. ]

**श्लेष**—पु. १ द्व्यर्थी शब्द; शब्दाचें अनेकार्थत्व; एक शब्दालंकार; द्व्यर्थी वर्तन; अनिश्चितार्थी शब्दयोजना. 'वर्म बाळें पांगुरला। तरि हा श्लेषु पडला।' -अमृ ६९. 'श्लेषयुक्त शब्दाच्या एका अर्थावरोवर दुसराहि अर्थ सुचून चमत्कृति उत्पन्न करितां येते.' -जन्मरहस्य २१. २ आलिंगन, मिठी; कवटाळणें. (क्रि० घेणें). [ सं. श्लिष्=आलिंगणें ] **श्लेषार्थ-श्लिष्टार्थ**-पु. वाच्य अथवा उघड अर्थाहून निराळा अर्थ; द्व्यर्थी शब्दयोजना करून सुचवावयाचा स्पष्टार्थाहून वेगळा अर्थ, गूढ अर्थ. **श्लेषोक्ति**-स्त्री. एक अलंकार; द्व्यर्थी शब्दयोजना करून साधावयाचा अलंकार. उदा० 'औषध नलगे मजला, ऐकूनि जननी वेरें म्हणुनि बोले।' -र. (यांतील 'नलगे' शब्द)

**श्लेष्मा**—पु १ कफ; शेंबूड. 'मुखा मुख शोभनिक। श्लेष्मागमनें शिणलें नाक।' -एरुस्व ७.२६. 'देह मातवाहेरि श्लेष्माआते।' -ज्ञा ८.२१२. २ कफविकार; कफाच्या आधिक्यामुळें झालेला व्याधि. ३ सर्दी; पडसें; शैत्य. [ सं. श्लेष्मा ] **श्लेष्मपुरी**-स्त्री. शेंबडानें भरलेलें नाक. 'गळतसे नाक श्लेष्मपुरी।' -तुगा ३१७३. [ सं. ] **श्लेष्मातक**-पु. भोंकरीचें झाड. [ सं. ] **श्लैष्मिक**-वि. कफकारक; कफासंबंधी.

**श्लोक**—पु. १ पद्य; कविता; विशिष्ट प्रकारची पद्यरचना. २ स्तुति, कीर्ति. उदा० सुश्लोक; पुण्यश्लोक. [ सं. श्लोक्= जुळणें ]

**श्वः**—क्रिवि. उद्या; उदयीक. 'तरी श्व. म्हणिजे उद्या।' -ज्ञा १५.१११. [ सं. ]

**श्वा**—पु कुत्रा; श्वान. समासातील रूप श्व. [ सं. श्वन् ] **श्वदंत**-वि (प्राणिशास्त्र) कुत्र्यासारखे सुळे दांत असलेला. (इं) कनाइन. **श्वपच, श्वपाक**-पु अंत्यज; चांडाल; कुत्रा शिजवून खाणारा; क्षत्रियापासुन उच्च जातीच्या स्त्रीच्या पोटीं जन्मलेला. 'तुका म्हणे खंडी देव भक्तपण। वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो।' -तुगा २८९१. 'कीं हा श्वपचु हा द्विजु।' -ज्ञा ५.९३. **श्ववृत्ति**-स्त्री. नीच सेवा; श्वानवृत्ति पहा.

**श्वशुर**—पु सासरा; नवऱ्याचा किंवा बायकोचा पिता. [ सं. ]

**श्वश्रू**—स्त्री. सासु; सासऱ्याची स्त्री. [ सं. ]

**श्वसणें**—अक्रि श्वास घेणें. 'ऐसें श्वसोंहि नये कांहीं।' -ज्ञा ११.२९९. [ सं. श्वस् ] **श्वसन**-न. श्वास पहा.

**श्वान**—पुन. कुत्रा. 'श्वान हे लागे पाठी भारा बहु दारुण।' -तुगा ३४९. 'ना तरी हे धेनु हें श्वान।' -ज्ञा ५.९४. [ सं. श्वन् ] ०**चेष्टा**-स्त्री. कुत्र्याचे चाळे. ०**निद्रा**-स्त्री. कुत्र्याची झोंप; किंचित् आवाजानें किंवा स्पर्शानें भंग पावणारी झोंप. ०**पुच्छ**-न. १ कुत्र्याचें शेंपूट. २ (ल.) कधीं

सरळ न होणारी, नेहमी वांकडी राहणारी वस्तु; ज्याचें मन कधीं बदलत नाहीं असा पूर्वग्रहदूषित मनुष्य; वाकड्यांत शिरणारा. ०पुच्छवत्-वि. नेहमीं वाकडा, हट्टी, एकरुखी (स्वभावाचा). ०मैथुन-न. १ कुत्र्याचें झोंबट. २ (ल) प्रारंभीं सुखकर पण परिणामीं दुःखदायक गोष्ट. ०लाड-पु. कुत्र्याचा लडिवाळपणा; पुढें पुढें करणें; खुशामत ०वृत्ति-स्त्री १ कुत्र्याची रीत. २ (ल.) पुढें पुढें नाचणें; तोंडपुजेपणा; हांजी हांजी; खुशामत. ३ नीच सेवा; दुष्ट मनुष्याची चाकरी. ०वैखरी-स्त्री. १ कुत्र्याचें भोंकणें; गुरगुरणें. २ (ल.) क्षुद्र प्रसंगीं मोठमोठ्यानें संतापून आरडाओरड करणें; जोराजोरानें, तावातावानें बोलणें. 'भिक्षा द्यावयासि नसेल जरी। आवरून धरावी श्वान वैखरी।' ०वैर-न. कुत्र्यासारखा द्वेष; स्वजनांचा, नातलगांचा द्वेष, हेवा, शत्रुत्व. ०शूरत्व-न. कुत्र्याचें शौर्य; प्रतिकार नसेल तेथें जोराचा हल्ला करणें; शौर्याचा आव आणून चालून जावयाचें पण अंगावर आल्यास पळ काढावयाचा अशी रीत. ०स्वभाव-पु कुत्र्याचा स्वभाव, चिडखोरपणा; तुसडेपणा; वसवस. श्वानी-स्त्री. कुत्री.

श्वापद—नपु १ हिंस्र पशु, मांसभक्षक पशु २ सामान्यतः कोणतेंहि जंगली जनावर. 'दाट न रिगे श्वापद। शुक हन षट्पद।' –ज्ञा ६.१७६. [स श्वापाद]

श्वास—पु १ नाकानें किंवा तोंडानें आतबाहेर घेतलेला किंवा सोडलेला वायु. २ दम; सुस्कारा; धापा. ३ दमा; घर घर. [सं. श्वस्] ०कास-पु दमा; कफविकारानें कोंडलेला श्वास ०कुठार-पु दम्यावरील औषध, रसायन, मात्रा. ०दाटी-क्रिवि. धापा टाकीत; सुस्कारा सोडीत; दम कोंडून. 'जैसी वत्सालागीं श्वासदाटी। धेनु जाय।' –कथा २.७ १७९. ०नलिकामार्ग-पु शरीरांतील ज्या मार्गानें वायु आत बाहेर येतो जातो ती नळी; ज्या नळींतुन फुफ्फुसांत हवा जाते ती नळी. (इं.) वुइंडपाइप. श्वासावरोध-पु दमा; कफविकार. श्वासोच्छ्वास, श्वासोश्वास-पु वायु शरीरांत घेणें व सोडणें.

श्वित्र—न. कुष्ठ; कोड. [सं.]

श्वे श्वे—सना. स्व, स्व, आपआपल्या. 'श्वे श्वे सदना गेले जन।' –दावि २३ ६८. [सं. स्व]

श्वेत—पु. सेतु (अपभ्रंश). 'श्वेतबंद रामेश्वर।' –दा २०. ७.३.

श्वेत—वि. पांढरा; शुभ्र, शुक्ल; धवल. 'श्वेतपीत त्रिगुण वास।' –एरुस्व १७.१०. [सं. श्वित्=पांढरें होणें] ०कुष्ठ-न पांढरें कोड. ०कृष्ण होणें-काळें पांढरें पडणें, मरणें. ०द्वीप-न. पृथ्वीचा एक भाग; खंड. ०प्रदर-पु. पांढरी धुपणी; एक रोग. ०मणि-पु स्फटिक. ०वचा-स्त्री वचा पहा. एक झाड, याची मुळी पांढरी असते ०वाह-वाहन-पु अर्जुन. श्वेतांजनी-वि. आंग एकरंगी पण फासोळीला पांढरा रंग असलेला (घोडा). –अश्व १.९७. श्वेतांबर-पु जैनांतील एक पंथ.

श्वेतु—पु (अपभ्रंश) सेतु पहा.

श्वेद—पु. (अप.) स्वेद पहा. 'श्वेद रोमांच स्फुरण।' –दा २.७.३८.

---

# ष

ष—देवनागरी लिपींतील ३१ वें व्यंजन; याच्या अवस्था पुढीलप्रमाणें—पहिली खि. पू २ रें शतक घोसुंडी शिलालेख, दुसरी इ. स. दुसरें शतक मथुरा, सारनाथ इ० लेख, तिसरी इ. स. ६ वें शतक, मंदसोर लेख, चवथी तोरमाण लेख.

षट्, षड्, षण्, षष्—वि. सहा संख्या; समासांतहि उपयोग करतात [स षट्] (पुढील सामासशब्द 'षट्' या पदाशीं जोडून झालेले आहेत). ०क-न. सहांचा समुदाय. ०कर्ण-वि. सहा कानांचा. ०कर्णी-क्रिवि. तीन इसमांच्या कानीं गेलेली म्हणजे प्रसिद्धीस, उघडकीस आलेली (दोन माणसांत केलेला म्हणजे चार कानीं गेलेला गुप्त विचार उघड होत नाहीं, तीन इसमांस तो कळला तर तो फुटतो'). (क्रि० होणें; फुटणें). ०कर्म-कर्में-न अव. १ ब्राह्मणाचीं, अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, प्रतिग्रह हीं कर्मे. २ जारण, मारण, उच्चाटन, मोहन, स्तंभन, विध्वंसन हीं मंत्र व तंत्र विषयींल कर्मे. ३ ब्राह्मणाच्या उपजीविकेचीं सहा साधनें-कणवृत्ति, प्रतिग्रह, याचना किंवा भिक्षावृत्ति, कृषि, वाणिज्यवृत्ति, गोरक्ष, वार्धुषिकवृत्ति (सावकारी) ४ (हठयोग) धौती, कपालभाति, त्राटक, नेति, बस्ति, नौली. ०कर्मी-वि षट्कर्मे करणारा. ०कोण-पु १ सहा कोनी आकृति. २ इंद्राचें वज्र. –वि. सहा कोनांचा. ०चक्र-पु अव (हठयोग) देहाच्या ठायीं असलेलीं सहा पद्माकार चक्रें-मूलाधार किंवा आधार, लिंग, नाभी, हृत्, कंठ, मूर्ध. यांना पद्में असेंहि म्हणतात हीं देहाच्या मधील नाडीवर असतात. या नाडीस भागीरथी म्हणतात. तिच्या दोन्हीं बाजूस दोन नाड्या यमुना व सरस्वती या नांवाच्या आहेत. या चक्रांना आणखीहि इतर नांवें आहेत तीं-कूर्म, अनंतशेष, आधार, अनाहत, अधिष्ठान, नाभी, जठराग्नि, मणिपूर किंवा पद्म, मानस, कर्पूर (याचे शेवटास ब्रह्मरंध्र असतें), गरुड, गोल्हाट, त्रिगति इ० (क्रि० भेद करणें). ०दर्शनें-न.अव.

सौर, शाक्त, गाणपत्य, शैव, वैष्णव, स्कांद; किंवा सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदांत. ०पद्-पदी-पुस्त्री. १ भ्रमर, भुंगा. २ ऊ ३ (ल.) घोडेस्वार (घोड्याचे चार व स्वाराचे दोन मिळून सहा पाय म्हणून) –वि. सहा पायांचा (ऊ, टोळ, भुंगा इ०). –स्त्री. सहा चरणांचें कडवें असलेली कविता. ०प्रमाण–न. जीव आणि अंतःकरणपंचक मिळून सहांचें प्रमाण. ०प्रज्ञ–वि. गुण, संपत्ति, सुख, ब्रह्मानंद, जगाची प्रकृति, ब्रह्मज्ञान जाणणारा. अर्थ, पुरुषार्थ पहा. ०बाहु–वि सहा हातांचा, षड्भुज. ०शास्त्रें–न अव. १ (षडंगें) छंद, निरुक्त, व्याकरण, ज्योतिष, शिक्षा, कल्पसूत्र २ दोन न्याय, दोन मीमांसा, सांख्य, योग, किंवा (षड्दर्शनें) न्याय, वैशेषिक, मीमांसा, वेदांत, सांख्य, पातंजल योग ०शास्त्रसंपन्न-शास्त्री–वि. १ वरील सहा शास्त्रें जाणणारा. २ (ल) विद्वान, पंडित. (पुढील सामासिक शब्द 'षट्' या पदांस जोडून आहेत) ०अंग, षडंग–न १ दोन हात, दोन पाय, कमर, डोकें हीं शरीराचीं अंगें. २ वेदाचीं व्याकरण, छंद, ज्योतिष, निरुक्त, कल्पसूत्र, शिक्षा हीं उपांगें. ३ –वि. सहा अवयवांचा, अंगभूत वस्तूंचा. ०अंग-न्यास–पु. हृदय, शिर, शेंडी, शरीर, नेत्र, यांना स्पर्श करून टाळी वाजविणें (पूजा, जप, मंत्रसिद्धि इ० प्रसंगीं म्हणतांना. ०गुण–पु अव. संपूर्ण ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्य हे किंवा धर्म, वीर्य, कीर्ति, द्रव्य, दान, वैराग्य, हे ईश्वराचे संपूर्ण गुण, या गुणांनीं संपन्न तो षड्गुणैश्वर्य संपन्न–पु ईश्वर, देव. –वि. १ संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव, समाश्रय हीं राजनीतीचीं मुख्य अंगें असलेला. २ कोणत्याहि सहा गुणांचा किंवा तत्त्वांचा समुदाय असलेला ०अंगुल–ली(ळी)–वि. सहा बोटांचा. ०ग्रही–स्त्री एका राशींत सहा ग्रहांची युति ०अब्द–न सहा दिवसांचें प्रायश्चित्त ०अक्षर–न 'कांहीं येत नाहीं'. एखाद्या मूर्खास थट्टेनें योजावयाचा शब्द ०अक्षरी मंत्र–न. १ सहा अक्षरांचा कोणताहि मंत्र. २ मूर्ख, शंख, अज्ञानी. ०आनन–पु १ कार्तिकस्वामी. २ –वि. सहा बाजूंचा. ०ऊर्मि–स्त्री अव शोक, मोह, क्षुधा, तृषा, जन्म, मरण. ०ज–पु. (संगीत) सात स्वरांपैकीं पहिला स्वर, गाण्याचे प्रारंभीं, गायक आपल्यास योग्य असा जो ध्वनि मापून घेतो तो. यास ३६ इंच लांबीच्या तारेचा ध्वनि व २४० आंदोलनें पाश्चात्य शास्त्रकारांनीं धरिलीं आहेत [स षट्+ज] ०ज ग्राम–पु (संगीत) आठ शुद्ध स्वरांचा समुदाय ०दर्शनें–न अव 'षट् दर्शनें पहा' ०भांतर–न. सूर्यचंद्राचें अवरोधन; दोहोंमध्यें पृथ्वी येणें. ०भाव-विकार-रिपु-वैरी-अरि-वर्ग–पु अव काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर हे मनुष्याच्या मनाचे शत्रु समजले गेलेले सहा विकार ०भाव–पु अव. जायते (जन्म), अस्ति (अस्तित्व), वर्धते (वाढ), विपरिणमते (प्रौढ होणें), अपक्षीयते (क्षीणता), नश्यति (मृत्यु) हे शरीराचे विकार. ०भुज–पु १ षट्कोण. २ –वि. सहा हातांचा किंवा बाजूंचा. ०रस, षड्रस–पु. १ कटु, अम्ल, मधुर, लवण, तिक्त, कषाय हे अन्नाचे रस. २ –वि. स्वादिष्ट, रुचकर (अन्न), असल्या अन्नाच्या मेजवानीस 'षड्रसभोजन' म्हणतात. ०षड्रिपु–वरील 'षड्भाव' पहा. ०वर्ग–पु १ 'षड्भाव' पहा. २ –वि. सहा वस्तूंचा समूह. ०शास्त्री-शास्त्र–पु न. षट्शास्त्री पहा. षडस्र–न १ षट्कोण २ –वि. सहा कोनांचा. षड्ऋतु–पु. अव. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत, शिशिर. षडैश्वर्य–न. 'षड्गुणैश्वर्य' पहा. (पुढील शब्द 'षष्' शीं योजलेले आहेत). ०मास–पु सहा महिन्यांचा काल सहामाही. ०मास्य–वि. सहा महिन्यासंबंधीं. ०मुख–पु. षडानन पहा. ०मुखी-मुद्रा–स्त्री. (हठयोग) कानांचीं २ भोंकें, २ डोळे, २ नाकपुड्या या हातांच्या बोटांनीं दाबून करावयाची एक मुद्रा. (यापुढील शब्द 'षष्' शीं योजलेले आहेत). षष्ठ–वि. सहावें. षष्ठी–ष्ठी–स्त्री. १ पंधरवड्यातील सहावी तीथ. २ सहावी विभक्ति. ३ दुर्गादेवी, सटवी. ४ (ल.) फजीती. –वि. ५ साठ षष्ठीपूजन–न. प्रसूतीच्या सहाव्या दिवशीं दुर्गा व इतर देवता यांची करावयाची पूजा. षाडव (राग)–पु. ज्यास सहा स्वर लागतात व एक वर्ज्य असतो असा राग. षाडव औडुव–पु ज्याच्या आरोहांत सहा स्वर व अवरोहांत पाच स्वर लागतात तो राग. षाडवतान–स्त्री. सहा स्वरांची तान षाडव-षाडव–पु ज्याच्या आरोहांत सहा व अवरोहांत सहा स्वर असतात असा राग. षाडव-संपूर्ण–पु ज्याच्या आरोहांत सहा व अवरोहांत सात स्वर असतात तो राग.

षंड-ढ—पु १ नपुंसक माणूस. २ हिजडा, क्लीब; खोजा. ३ वळू; सांड; बैल. [स षण्=दान करणें]

षादमानी—स्त्री. शादमानी पहा.

षोक, षोकी—शौक, शौकी पहा.

षोडश—वि. सोळा (संख्या) [सं.] ०पदार्थ–पु अव. (तर्कशास्त्र) या शास्त्रांतील १६ विभाग.—प्रमाण, प्रमेय, संशय, प्रयोजन, दृष्टांत, सिद्धांत, अवयव, तर्क, निर्णय, वाद, जल्प, वितंडा, हेत्वाभास, छल, जाति, निग्रहस्थान. कांहींच्या मतें सोळांच्या ऐवजीं सात विभाग आहेत, त्यांना सप्तपदार्थवाद-वादी म्हणतात. व बाकीच्यांना षोडशपदार्थवाद-वादी म्हणतात. ०महादानें–न अव. सोळा प्रकारचीं मोठमोठीं दानें १ तुला पुरुष (हा शब्द पहा) २ हिरण्यगर्भ-ब्रह्मदेवाची सोन्याची प्रतिमा. ३ ब्रह्मांड=सोन्याचा पृथ्वीचा गोल ४ कल्पवृक्ष, आ

साडाची प्रतिमा ५ गोसहस्र=हजार गाईचें दान ६ हिरण्य कामधनु=कामधेनूची सोन्याची मूर्ति ७ हिरण्याश्व=सोनेरी घोडा ८ हिरण्याश्वरथ=सोनेरी रथ व घोडा ९ पचलांगलक=पांच नांगराचें दान १० धरा=जमीन इनाम देणें (जमीन विकत घेण्यास पैका देणें) ११ विश्वचक्र=एकाच्या बाहेर एक अशा सोळा फेऱ्यांचें एक सोनेरी चक्र १२ कल्पलता=एक सोनेरी वेल १३ सप्तसागर=या सात समुद्राचे प्रतिनिधी म्हणून दूध, दहि मध तूप इ० देणें १४ रत्नधेनु=रत्नांची बनविलेली गाय १५ महाभूतघट=महादेव किंवा विष्णू यांच्या नावानें द्यावयाची सोन्याची घागर १६ (काम) धेनु ०सस्कार-पु षोडश सस्कार पहा **षोडशोपचार**-पु १ देवाच्या पूजेचा प्रकार किंवा विधि-आवाहन, आसन पाद्य, अर्घ्य, आचमन स्नान वस्त्र यज्ञोपवीत (उपवस्त्र) गध, पुष्प धूप दीप नैवेद्य, दक्षिणा, प्रदक्षिणा मत्रपुष्प २ (ल) कोणतेहि मोठा प्रकार, कामें

---

# स

**स**—व्यजनमालेतील बत्तीसावें अक्षर अक्षरविकास-या अक्षराच्या पांच अवस्था दृष्टीस पडतात पहिली अशोकाच्या गिरनार लेखात, दुसरी खिस्तपूर्व पहिल्या शतकातील मथुरा येथील जैन लेखात, तिसरी पाचव्या शतकातील करडाडाच्या लेखात, चवथी त्याच शतकातील बिलसद यथील स्तभावरील लेखात व पाचवी सहाव्या शतकातील उष्णीषविजयधारिणी ग्रंथातील वर्णमालेंत आढळत -ओझा

**स**—अ नामाच्या पूर्वी स आला असता त्याचा सहित, बरोबर, युक्त असा विशेषणरूप अर्थ होतो उदा० सकुटुब, सगुण सकाम, सदोष, सजल, सकप इ० अशा प्रकारचे शब्द सस्कृत शिवाय निवळ मराठी शब्दाच्याहि पूर्वी स यऊन झालेले आढळतात उदा० सकस, सकुडी इ० २ (व्या) द्वितीया विभक्तीचा प्रत्यय उदा० गावास विशेषत कोकणात राजापुराकडे द्वितीया विभक्तीचा दुसरा जो ला प्रत्यय त्याचा उपयोग न करता केवळ स प्रत्ययाचाच उपयोग करतात ३ (व्या) चतुर्थी विभक्तीचा प्रत्यय साठीं, स्तव जाणत्यास करावा उपकार।' -दा १८२४

**स**—पु (ल) सोदा, लुच्चा स्वाद (सोदा या शब्दात आरंभीं स हें व्यजन आहे यावरून)

**सा**—(सक्षेप) १ साष्टाग २ समत ३ सरकार ४ सबब

**सो**—(सक्षेप) १ सेवेसी-शी २ सबधी ३ साहेब ४ सेकीन

**सौ**—(सक्षेप) सौभाग्यवती

घडो ७ १९

**स आदत**—स्त्री सुपोषण सुख -आदिलशाही फर्मानें [फा]

**स आदमद**—वि सुखवस्तु [फा]

**सइ**—स्त्री आठवण स्मृति [स स्मृति प्रा सई]

**सइत्य**—उभ सहित सह वगैरे सुप्रमशा देवी राणी सहत्य।' -वसा ४ [सं सहित]

**सइर, सईर**—वि स्वैर, स्वच्छदी 'दास म्हणावया न वळे रसना। सइर वचना वासगळे।' -तुगा २९७८ **सइराट**-क्रिवि स्वैरपणें, इकडेतिकडे, भलताकडे [स स्वैर, प्रा सइर]

**सइल, सईल**—सैल पहा **सइलावणें**-क्रि सैल ढिलें होणें 'चौकडपाच मोती विरकल्ती सइलावल्या तारा।' -सला ८१

**सइली, सइवर**—सैली, सैवर इ० पहा

**सई**—स्त्री आठवण, स्मृति सय [स स्मृति, प्रा]

**सई**—स्त्री (काव्य) सखी मैत्रीण 'आता सई यशोदेचे द्वारीं हा कोण रथवाला।' -होला ११ 'सईसवे गाविंदा दतो। मजवर गुलाल टाकीतो।' [सं सखी, प्रा सही, गुज सही, हिं प सिं सहेली; सखि-सहि सइ-ई, -भाम १८३४]

**सई**—स्त्री १ समतिदर्शक अथवा आतील मजकूर कबूल असल्याबद्दल एखाद्या रोख्याच्या लेखाच्या अथवा पत्राच्या शेवटीं लिहिलेलें स्वत चें नांव, स्वाक्षरी, सही (क्रि० करणें) २ प्रयत्न, खटपट मेहनत 'माझे कार्याविषयीं तुम्ही मध्यस्तापासीं सई करावी' -रा १० १६० ३ ल्हान मुलास खेळविताना प्रेमानें त्याच्या कपाळास आपलें कपाळ लावून ल्हानसा दिलेला ठासा, -वि १ जिंकलेला, ताब्यात घेतलेला, जित 'येरवी वसई सई होती अस नव्हतें व टोपकर अग्निरूप होत' -पया ४९ २ फाजील, फाल्तू पुरून अधिक उरलेला -अ खरोखर बरोबर खरेंच या अर्थानें हा शब्द योजितात उदा० 'तो मूर्ख तर सई परतु चोर नाहीं, पाऊस पडला सई परतु पुढें काहीं भिजली नाहीं तसेंच, कर तर खरा पहा तर खरा या अर्थीहि योजितात उदा० तू आधीं माग तर सई मग तो देवो की न देवो, औषध खा तर सई मग गुण तर पाहतोंच आहोंत त्याचप्रमाणें अयात खचित व निदानपक्षीं, बस पुरे या अर्थानेंहि उपयोगात आणिला जातो [अर सहीह=निर्दोष अर सअय]

(वाप्र) **सई करणें**-१ सर करणें कबज्यात, ताब्यात घेणें किल्ला राज्य सई करणें=किल्ला राज्य हस्तगत करणें 'किल्ला सई करून देतों तुला।'-ऐपो ५३ २ आक्रमण करणें, एखाद्या ठिकाणास जाऊन पोंचणें 'आपण सध्याकालपर्यंत मकाण सई करू (कोणती एक माल) सई करणें सई म्हणणें-एखादा नियम घण्याचें कबूल करणें, निश्चित ठरविणं सामाशब्द- **सईन**

शिक्का–पु एखाद्या दस्तऐवजावर, रोख्यावर केलेली सही व शिक्का (क्रि० घालणें, देणें, पडणें) सईसाक्ष–स्त्री एखाद्या महत्त्वाच्या रोख्यावर, दस्तऐवजावर सही करणें व साक्ष घालणें (क्रि० करणें, घालणें, पडणें होणें) सईसूद–वि कायदेशीर पणा येण्यासाठीं ज्यावर सही, साक्ष इ० घातलीं गेलीं आहेत असा (रोखा खत दस्तऐवज)

सई—स्त्री (कर) खेळतांना चेंडू, गोटी टाकण्यासाठीं केलेला खळगा, गल, वद सईभरणें–(कर) गलींत गोटी टाकणें

सईफ—स्त्री तरवार, सैफ 'सईफ आह ते तर्वार राम-सिंगास सांगून मागावी'–रा १२ ६२ [अर सैफ्]

सईभ—पु युक्ति, शकल, क्लृप्ति 'फिरग्यास सक्ती पोहो चावून अगर सईमानें मुलुख जप्त करून'–योमारो १ २४

सईम—वि १ स्वत च्या अगचा, स्वत च्या शरीरासब धींचा, नखशिखात असा २ (ल) अखड, अविच्छिन्न, सलग [स स्वय]

सईल—वि सारखा –नागा ११ २१

सईस—पु (व) मोतदार; घोड्याची चाकरी करणारा, घोड्याची गाडी चालू असता घोड्यापुढें धावणारा इसम [अर साईस]

सईसुमार—पु एखाद्या गोष्टीविषयीं, कार्याविषयीं सारा सार ग्राह्याग्राह्य विचार; कोणत्यावेळीं किती बोलावें, खावें, प्यावें इ० सबधींचा सुमार; अदाज, अटकळ [अर सहीह्+फा शुमार]

सउदर—पु मातीच्या सोंडेचा दोर, (प्र) सोंदर, सोंड दोर पहा [सोंड+दोर]

सऊ—वि (खा) सपूर्ण सर्व सगळा –भाग्रे ७ १ ते ४ [गुज सउ]

सऊमास—न मृदु सहज पचणारें कोंवळें मास [सुकु मार+मास] सऊअग–न मृदु नाजुक शरीर [सुकुमार+अग]

सऊळ—वि मचूळ, किंचित् खारट (पाणी, पातळ पदार्थ)

सए—सबोधन (महानु) सये 'खादावरि कावडि पडि-भरें चालतु। तो खेळे मनातु। दत्तु सए।'–आद्य मराठी कव यित्री–मातृकीस्वयवर २ [स सखी]

सक—पु सहाचा समुदाय सहा ही सख्या विशेषत खेळा वयाच्या फाशावरील दानात व उनळणींतील पाढयात, क्वचित् सके असें अनेकवचनीहि रूप येतें उदा० तीन सके अठरा [स षट्क] सकरेजा पु दुफाशी खेळात फाशावरील (सहा व एक मिळून) सात हें दान [सक–सहा+रेजा=पगडा एक]

सक—पु वर्षगणना, शक विशेषत शालिवाहन शक. –शक १० मधील मगळवेढें येथील भोज–ताम्रपट [शक]

सकइणें—क्रि शकणें, शक्य होणें 'आवडी न पुरे माय यापासीं। पडों का यविर्गीं सकईल।'–तुगा ९५८ [शकणें]

सकंकण—वि कंकणासहित; हातांत कंकण असलेला 'तेव्हां सावळा सकंकण। धारी बाह्या पगहूनि श्रीकृष्ण।'–एभा ३१ ५२९ [स स+कंकण]

सकट—क्रिवि १ सगळें, समग्र, सर्वाच्या सर्व, एकदर २ (एखादें मनुष्य अथवा वस्तु या) सह, सहित सुद्धा, सह वर्तमान, बरोबर, मिळून 'तेणें समग्र होय नाशु। देहासकट।'–माए १६८ ३ निवड न करता जसें हातास येईल तसें, सर भेसळ 'की देवा सरस निरस न पाहतां सकट शरण उद्धरिजे'–भक्तमयूरकेका १२३ ४ एकदम 'त्यसात शरांत घमुनि सर्वांमही पळवि सकट।'–मोभीष्म १० ११४ [स सकृत्= एकवार] म्ह० सकट घोडे बारा टके सकटनिकट सकटा टाळीं, सकटात, सकटामध्यें–क्रिवि सरसकट निवड न करतां, सरभेसळीनें, हातास येईल तसें 'या लुगड्याची वेगळी किंमत केली नाहीं, दहा लुगडीं शभर रुपयांस घेतलीं त्या सक टात हें आलें आहे' सकटसक्रांत–स्त्री अपराधी, निरपराधी याची चौकशी न होता सर्वांवर ओढवलेलें सकट, झालेली शिक्षा (क्रि० बसणें, बसविणें येणें) 'अन्याय केला असेल त्यासच मारा सर्वांवर सकटसक्रांत बसवू नका' सकटा–वि समग्र, सपूर्ण, सर्व 'भणौनि पागुरविला सकटा। मीचि झळबाचे नि।'–ऋ ६८

सकट—नस्त्री (हिं) हुक्क्याची नळी

सकट—न अडचण, कठिण प्रसग; प्रतिकूल परिस्थिति कसें करू काय करू इ० मनास लागणारी विवचना, आपत्ति अरिष्ट त्रास [स] ०घालणें–एखादी वस्तु प्राप्त होण्यासाठीं हट्ट धरणें 'मी तुला कांहीं सकट घातलें नसतां'–नामना ७२ सकटासमोर उभा राहणें–सकटास तोंड देणें; येईल तो बिकट प्रसग सहन करण्यास तयार असणें सकटा–स्त्री १ एक योगिनी २ सकट आणणारी एक देवता (क्रि० येणें गुदरणें, पडणें) आम्हावर सकटा गुदरली' सकटी चतुर्थी–चौथ–स्त्री (प्र) सकष्ट चतुर्थी, सकष्टी पहा

संकट—वि अरुद, सकोचित, अडचणीची (जागा, स्थल),

सकटक—वि कांटे असलेला, काट्यांनीं युक्त असा कांट्याळ (झाड, झुडुप) 'उपरि सकटक साचें परतु साचें जयांत सुरसाचें'–र [स] सकटकवर्तुळसंघ पु अपृष्ठवश प्राण्यांच्या विभागाच्या सघापैकीं एक सघ या प्राण्यांच्या शरीरा वरील कवचाच्या रचनेला हालणारे किंवा अचल असे कंटक असतात या सघांतील प्राणी समुद्रात राहतात व त्याची हालचाल मदगतीनें होते –शाको (स) १

**सकरतार**—पु चिटणीस, सेक्रेटरी 'मेहरवान गोल्ड स्मिथ सरकारचे सकरतार होत '–इनाम १३ [इं सेक्रेटरी]

**सकटमळ**—स्त्री बाजरी इ० आरूढ कडाच्या धान्याची कडासकट केलेली मळणी, सगळमळ पहा.

**सकडतरू**—पु काटेरी झाड (महानु) 'गुढी वो च्यूतां कुरू। ह सुपती सकडतरू।'–शिशु ८३८ [स सकंटकतरु]

**सकडा**—पु सहाचा समुदाय फळें इ०च्या खरेदी विक्रीच्या प्रसंगीं योजितात [स षट्क]

**सकण**—वि भरगच्च, ठेचून भरलेलें, पुष्कळ दाणे असलेलें (कणीस), भरदार कणसें असलेलें (पीक) [स+कण]

**सकणव**—वि सदय, दयार्द्र अंतःकरण असलेला 'हा भावो सकणवे। धरूनि श्रीहरी।'–ज्ञा १७ १२३७ [स+कणव]

**सकणवपण**–पु सदयता, दयार्द्रपणा 'तैसें दु खिताचें शिणणें। हिरता सकणवपणें।'–ज्ञा १६ १५५

**सकणें**—क्रि शकणें, समर्थ, शक्त होणें, असणें 'वाणी स्तवें काय सकेल तुला।'–निमा १ ६० [शकणें]

**सकत**—स्त्री (कुण) शक्ति, सामर्थ्य; बळ, ताकद, जोर. [स शक्ति]

**सकत**—वि (व) टणक, कडक, कठिण [सख्त]

**सकत जमीन**–स्त्री मृदु नसलेली, कठीण जमीन

**सकताळ**—पु (व) नागरमोथा

**संकथन**—न १ एकमेकाशीं केलेलें संभाषण, संवाद २ (ल) सभा, संमेलन [सं]

**सकनळी**—स्त्री (गो) गाय, म्हैस इ० चारा खाणाऱ्या पशूंनीं चारा खाल्ल्यावर तो पोटात उतरण्याची घशातील नळी

**सकमार**—वि (राजा कुण) नाजूक (प्र) सुकुमार पहा

**सकर**—पु वाळूचा खडा सकारी, सक्रिरा पहा 'नरदेह धुतला पवित्र शेला उडून जाईल जसा सकर।'–अफला ६३ [स शर्करा]

**संकर**—पु १ भिन्न जातींच्या अनेक पदार्थांचें मिश्रण, मिसळ, सरभेसळ, भेदभावराहित्य २ अशा प्रकारें अनेक पदार्थ, वस्तु एकत्र होऊन बनलेला पदार्थ, जाति इ० (समासात) वर्णसंकर, जातिसंकर [स] **संकर अलंकार**–पु (साहित्य) दोन किंवा अधिक अलंकार एकाच पद्यात आले असता त्यास संकर अलंकार म्हणतात याचे अंगांगीभाव किंवा मुख्य गौणभाव संकर, संदेहसंकर आणि एकप्रतिपाद्य किंवा एकवाचकानुप्रवेश रूप संकर असे तीन प्रकार आहेत **संकरजाति**–स्त्री ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार जातींतील अनुलोम विलोम अशा प्रकारच्या संबंधापासून उत्पन्न झालेली जात

**सकरकिडा**—साखरकिडा पहा

**सॅकरट, शॅकरट**—न (गो.) वाळवट [स शर्करा=वाळू]

**सकरटेटी**—स्त्री (गुज) खरबूज –कृषि ५७२

**सकरनातें**—सकरनात पहा

**संकरा**—पु (संगीत) गायनातील एक राग (प्र.) शंकरा राग पहा

**सकराई**—स्त्री हुंडी स्वीकारण्याबद्दल द्यावें लागणारें व्याज किंवा बट्टा [स स्वीकार] **सकरा(क्रा)ई नकरा(क्रा)ई**–स्त्री. हुंडी खडी राहिल्यास त्याबद्दल नुकसानभरपाईदाखल हुंडी लिहिणारापासुन घेतला जाणारा पैका हा शॅकडयावर आकारला जातो.

**सकरुण**—वि दयाळु, सदय, कोमल अंतःकरणाचा 'तो ज्ञानदानीं सकरुणु। भजिजे गुरु।'–ज्ञा १७ २०८ [स]

**सकरूबोवा**—पु (व) श्रावणमासांत शिराळशेटाबद्दल करण्यात येणारा सण शिराळशेट पहा

**सकर्मक**—वि (व्या) ज्यास कर्म आहे असं, व्याकरणात, वाक्यांत कर्माशिवाय ज्याचा अर्थ पूर्ण होत नाहीं असें (क्रियापद) [स] **सकर्मककर्तरी प्रयोग**–पु जेथें सकर्मक क्रियापदाचा योग असुन कर्त्याच्या अनुरोधानें क्रियापदाचें रूप असतें असा प्रयोग

**सकर्दम**—वि चिखलानें भरलेलें, लडबडलेलें 'सकर्दम सरोवर। अवलोकूनि चकोर।'–ज्ञा १ २३१ [स स+कर्दम]

**संकर्षकबिंदु-केंद्र**—वि १ ज्या बिंदूकडे अनेक वस्तु आकर्षिल्या जातात असा बिंदु 'तू संकर्षकबिंदुच केवळ हे अंत सृष्टि।'–टिक १८३ २ ज्या बिंदूत अनेक किरण वगैरे एकत्र होतात असा बिंदु (इ) फोकस [स]

**संकर्षण**—पु १ संध्येंतील केशवादि चोवीस नावांपैकीं तेरावें नाव, विष्णूचें एक नाव, २ शेष, बळिराम 'करून साष्टांग नमन। पुढें चालिला संकर्षण। देवकीच्या उदरीं येऊन गर्भ राहिला सातवा।'–ह ३ २७ ३ (ल) शिंद्याचा दिवाण बाळोबा तात्या पागनीस ४ (योग) चार व्यूहांतील एक व्यूह –न १ आकर्षण ओढ, खेंचण्याची क्रिया २ जमीन इ० नांगरण्याची क्रिया [स सम्+कृष्]

**संकर्षदेश**—पु केंद्र किरण जेथ केंद्रीभूत होतात तें स्थान (इ) फोकस प्रकाशाचे किरण कनीनिकेच्या द्वारें नेत्रात येतात तेव्हा नेत्ररसांतून जातसमयीं वक्रीभवन पावून शेवटी नेत्रांतील दर्पणावर संकर्षदेशात एकत्र होतात '–मराठी ६ वें पुस्तक पृ १०३

**सकल**—वि १ सर्व, संपूर्ण सगळा २ परिपूर्ण, पूर्णत्व पावलेला [स] **०गुणसंपन्न**–वि सर्व प्रकारच्या उत्तम गुणांनीं युक्त असा [स] **०गुणालंकरण**–वि उत्तम प्रकारच्या गुणरूप अलंकारांनीं शोभणारा एखाद्यास पत्र लिहिताना

आरंभींच्या मायन्यांत लिहितात. [सं.] ०वेत्ता, वेद्-वि सर्वज्ञ; सर्व प्रकारचें ज्ञान असलेला.

**सकल**—वि. १ (प्र.) ससल; खोलगट (जमीन, जागा) २ ठेंगणा; खुजा. ३ अंखुड. -शब. (गो.) साली.

**सकल**—पु. खोटें नाणें पाडण्याकरितां तयार केलेल्या साच्याचा अर्धा भाग; अर्धा छेद; एक भाग, तुकडा. 'खालच्या सकलांतील खळगा व पन्हाळी यांतों मिळतें असें भोंक व पन्हाळी वरच्या सकलात पाडतात.' -गुजा १४४. [सं. शकल]

**संकलन**—न. अनेक संख्यांचें एकत्रीकरण; बेरीज, मिळवणी. २ मिश्रण; भेसळ, सरमिसळ. ३ अनेक वस्तू एका जागीं रचून केलेली रास; ढीग. ४ संचय, संग्रह; एकत्र केलेला सांठा. [सं.] **संकलि(ळि)त**-वि. १ एकत्र जमा केलेलें; गोळा केलेलें. २ मिसळलेलें; मिश्र केलेलें. ३ विस्तार कमी करून थोडक्यांत आणलेला; संक्षिप्त; सारांशरूपानें थोडक्यांत लिहिलेला (ग्रंथ, भाषण). 'यालागीं गुणसन्निपात। सांगितला संकलित।' -एभा २५ १५०. ४ ज्याचें आकलन केलें आहे असा; आकलित. 'कीं जाति वेदद्वारा परौता। जेया परिकर्म संकलिता।' -ऋ १८. [सं.] **संकलै**-स्त्री. मिश्रण; मिसळलेली स्थिति. 'सामान्य आणि विशेषा। संकलै कीजेल देखा।' -माज्ञा १३.१२३. [सं संकलन]

**संकला**—पु. घोड्याच्या डोळ्यांस होणारा एक विकार. यानें घोड्याच्या डोळ्यास गरमी होते व ते लाल होतात. -अश्वप २.१२१.

**सकलात-द्**—स्त्री. लोंकरीचें, उंची, तलम व सुंदरी किंवा निळ्या रंगाचें कापड [अर. सकलात्; तुर्की इस्केरिएट; इं. स्करिएट, इटा स्कॅरिआलटो; फ्रें. स्कॅरिएट] **सकलाती-दी**-वि सकलाती कापडाचा केलेला (अंगरखा, टोपी).

**संकल्प**—पु. १ मनोदय; हेतु, मनांतील विचार, इच्छा; 'सत्य संकल्पाचा दाता भगवान' -तुगा. २ निश्चय; निर्धार; अमुक गोष्ट करीनच करीन असा कायम बेत; प्रतिज्ञा. 'मारितो अरीला... प्रभुजी संकल्प हा मनें वरिला।' -मोकर्ण ४३.४२. ३ एखादें व्रत, सत्कार, विधि इ० आरंभितांना अमुक एक फल मिळावें म्हणून मी हें कर्म करतों अशा प्रकारें त्या कर्माचा उच्चार करून हातांत पाणी घेऊन तें सोडण्याची क्रिया, एखाद्या तीर्थाच्या ठिकाणीं स्नान करतांना, किंवा एखादी वस्तु दान करतांना, तसेंच ब्राह्मणभोजनारंभींहि असें उदक सोडतात. 'सांगुनि संकल्प सोडवी पाणी।' -मोवन ८.२९. 'यजमान धर्मसंस्कारास सिद्ध झाला पण संकल्पाचा उच्चार करीत नाहीं' -केसरी १२ ७ ३०. ४ मानसिक कर्मप्रवृत्ति; मनोविकार, वासना. 'घेऊनि वियायक लक्षलक्षित। संकल्पपशूचा करूनि घात।' -एभा १९.७६.५ अंत:स्फूर्ति, स्फुरण. 'मूळ माया जाणीवेची। मूळींच्या मूळ संकल्पाची।' -दा १५.७.२. ६ (पुढीनें) विकल्प; संशय. 'हें देखोनि संकल्पीं पडियेला।'-दावि ७.२.२८. **संकल्पिणें**-१ बेत करणें; ठरविणें; निश्चित करणें. २ (एखादें काम इ० एखाद्यावर) सोंपविणें; हवाली करणें. माथीं मारणें. ३ योजणें; कामीं लावणें; अर्पण करणें. 'जीवित संकल्पिलें तुझ्याठायीं' -मोकर्ण ४२ ३६. ०बद्ध-वि. कोणतेंहि कर्म करण्याचा संकल्प केल्यामुळें तत्परतंत्र झालेला. ०विकल्प-पुअव. कल्पना व संशय; डळमळित स्थिति; शंकाकुशंका. 'संकल्प विकल्प निमाला। मनेंसी बुडाला मनोरथु।'-एभा ९.४२७. ०विहंग-पु. मनोरूप पक्षी; मनोरथ; मनांतील हेतु. **संकल्पित**-धावि. १ योजिलेलें, निश्चित; ठरविलेलें, टाचिक. २विधिनियत; प्रज्ञाघटित. 'जें संकल्पित घडेल सत्वर तें।' -मोउद्योग (नवनीत पृ.३११).

**सकल्या फणस**—पु. कापा नव्हे व बरकाहि नव्हे असा मध्यम प्रकारचा फणस.

**सकवार**—वि. सुकुमार; नाजूक, मृदु, हलका; सुंदर. [सं. सुकुमार] -पु. एक प्रकारचा स्वादिष्ट तांबूल.

**संकष्ट**—न. (अप) संकट पहा. अडचण; विघ्न. 'ग्राहे ग्राहे चक्रपाणी। संकष्ट हरी समर्था।' -मुविराट ३.२६. -वि. १ बिकट; श्रमाचें; अडचणीचें; पीडादायक; दु:खदायक (काम). २ कष्टाळू; सोशिक; श्रमी (मनुष्य). ३ ग्रासलेला; अडचणींत असलेला; दु:खी. ०चतुर्थी-संकष्टी चौथ,संकष्टी-स्त्री. प्रत्येक महिन्यांतील वद्य चतुर्थी. या दिवशीं विनायकाचें व्रत करावयाचें असतें. शुद्ध चतुर्थीस विनायकी चतुर्थी म्हणतात.

**सकस**—वि. कसदार; दमदार; भरीव, पौष्टिक, सत्त्वयुक्त (अन्न, औषध, पदार्थ). [स+कस]

**सकस**—वि. कठिण; मजबूद, श्रमाचें; घट्ट [सख्त अप.]

**सक(ल)ळ**—वि. १ सर्व; संपूर्ण; अवघा. २ एकूणएक; सर्वच्या सर्व. [सं. सकल] **सकळिक-ळीक**-वि. सर्व; अवघे, एकुणएक. 'उठा उठा हो सकळिक'-गणपतीचीभूपाळी. **सकळै**-स्त्री मिश्रण, काल्वाकालव. 'सामान्य आणि विशेष। सकळै कीजेल देवा।' -ज्ञा १३.३२२. [सकळाई]

**सकाळ,सकाळवेळीं,सकाळा**—क्रिवि. १सकाळच्यावेळीं; सकाळींच, लवकर. २ वेळेच्या पूर्वीच; अगदीं वेळेवर; योग्य अवधि असतां. 'तूं चाकरी सोडणार तर मला सकाळवेळीं सांग म्हणजे दुसरा कोणी पाहीन.' [सं. उष:काल; सुकाल]

**संकळणें**—अक्रि संक्षिप्त करणें, थोडक्यात आणणें; सारांश काढणें. संकलन पहा. [स संकलन] **संकळीत**-वि. (अप.) संकळीक- संक्षिप्त, सारभूत, थोडक्यात आणलेलें. -क्रिवि. थोडक्यात; संक्षेपानें, साररूपानें; सारांशानें. 'तें सकळहि निरोपिलें।

सकळीत मात्रे।' -दा ११२७ मक्ळीत योलणें-(व) संदिग्ध बोलणें

सका—पु सखा, मित्र 'एव तो धृतराष्ट्र पुत्र अवधी घेरोनि सेना सखा।' -वामनविराट ५१९ [स सखिन्]

सकाम—वि १ कामना, इच्छा असलेला, विरक्त नव्हे तो, इच्छायुक्त 'जयालागीं देव सकाम।' -ज्ञा ६ ४५५ 'जयीच्या जन्मा देव सकाम।' -एभा ५ ४४३ २ सहेतुक, स्वार्थी लाभाची इच्छा धरून केलेलें (काम, कृत्य, कर्म) 'सकाम साधन सर्वेहि सांडा।' ३ विषयी, लंपट; कामी 'जैसी सकामा न जिणवेची वनिता।' -ज्ञा ७ ९६ -क्रिवि इच्छा धरून 'हें परिसोन भीष्मकोत्तम। दर्शना सकाम उठिला।' -एरुम्व ६ १ [सं स+कम्=इच्छा करणें]

सकार—पु (स्वीकार) १ हुंडी पत्करणें, पत्करणें, मान्यता २ हुंडी पत्करल्याचा, स्वीकारल्याचा, पत्करल्याचा शेरा [स स्वीकार] ०मारणें-स्वीकारल्याचा शेरा मारणें सकारणें-उक्रि स्वीकारणें मान्य करणें, पत्करून घेणें, तसा शेरा मारणें सकाराई-स्त्रि हुंडी स्वीकारण्याबद्दलचा आकार, हुंडणावळ, वटणावळ

सकार, सकारपूर्वक—पु (सांकेतिक) सखारामबापू बोकील याबद्दल वापरीत 'सकारपूर्वक होणार' -ख १४२८ ०विरहा-व्हे-पु (सांकेतिक) सोदा, सोदा या वर्गातील; ठग, लबाड, कपटी

सकारा—पु (हट) ल्हान खडा, वाळूचा खडा (अव) सकारे=खडे [स शर्करा=वाळू]

सकासुर—पु १ शखासुर एका दैत्याचें नाव २ एक झाड व त्याचें फूल राजतुरा ३ (कों) शिमग्यात शखासुराचें सोंग आणतात तें [स शंखासुर]

सकाळ—स्त्री प्रात काल सूर्योदयापासुन माध्यान्हापर्यंतचा काल [स उप काल, सत्काल-भाभ १८३३] सकाळचा तारा-पु शुक्र सूर्याच्या अगोदर उगवतो त्यावेळेस त्यास म्हण तात सकाळ-ळा-ळीं-क्रिवि १ उदयीक; दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं २ प्रभातीं; लवकर प्रात काळीं सकाळ सकाळ-क्रि (ना) लवकर, झटपट न रेंगाळता सकाळपाणी-वाणी-क्रि लवकर वेळेवरच झटपट उशीर होण्यापूर्वीच, अगोदरच सकाळसंध्याकाळ सकाळसाज-क्रिवि सकाळीं व सायंकाळीं दोन्ही वेळीं सायंप्रात सकाळें-क्रिवि योग्य काळीं त्वरेनें 'अमर अमृतपान करिता। मरताती सर्वथा सकाळें।' -एभा ११ १३१३ सत्त्व शुद्धि होईल सकाळें।' -गीता १२ ४७६

सकिरा—पु रेंव, कंकर; खडा, वाळूतील गोटे [स शर्करा]

सकी—स्त्री (कुस्ती) एक डाव आपल्या एका हातानें जोडीदाराचा हात धरावयाचा व त्याच बाजूच्या पायांत आपला पाय घालून झोंक देऊन पाडणें [सखी]

सकी—स्त्री (गो) काठी

संकीर्ण—पु १ (ताल) पहिला विभाग नियमानें नऊ मात्रांचा असणारा दक्षिणेकडील एक ताल

सकीर्ण—धावि १ मिश्रित एकत्रित, मिसळलेलें, गोंधळ झालेलें २ दाटी झालेलें गर्दीचें, घोळका, गर्दी दाटी झालेलें (घर, खोली) ३ सकलित एकवटलेलें 'आरभी पहिलीं होतीं तयारीं। सकीर्ण त्या नारीनर लोक।' -तुगा ५४ ४ आकुंचित, थोडक्यात आणलेलें, सक्षिप्त 'मूळ सकीर्ण गुणवेगी।' -राधि २ ५ क्षीण झालेलें, ऱ्हास पावलेलें अधुक झालेलें, अतकाळचें (ज्योति, जीव, प्राण) अल्प, थोडें 'अन्नवस्त्र सकीर्ण घरीं। कुटुंब बहु आहे पदरीं।' -भवि १८ १३४ ६ मिश्र जातीचा, रक्ताचा, सकर झालेला, कडू [स] ७ (संगीत) अन्य रागाच्या मदतीनें रजक होणारा (राग)

सकीर्तन—न स्तवन स्तुति, गौरव, गुणवर्णन, परमेश्वराचें नामोच्चरण सकीर्तित-वि स्तविलेला, स्तुति केलेला, गौरव, गुणवर्णन केलेला [स]

सकु—पु शक -शिलाहार ताम्रपट, शक १०४९

सकुचित—वि सकोचित पहा आकुचित

सकुटन—न (कों) साकटणें पहा

सकुटुंब—वि कुटुंबसहित

सकुडी—क्रिवि सदेह शरीरासहित [स+कुडी=देह]

सकुमार—वि सुकुमार पहा म्ह० सकुमार सक घोरपडी इतकी मऊ-नाजूकपणाचा आव आणणाऱ्या स्त्रीस म्हणतात सकुमाराची राशी-अत्यंत सुकुमार नाजूक

सकुल—वि दाट गर्द, व्याप्त सकीर्ण [स स+कुल]

सकुलित-धावि मिसळलेलें, एकत्र केलेलें मिश्र

सकुली—स्त्री करंजी -एभा (पाठभेद) २७ २९१ [स शष्कुली]

सकुल्य—वि एकाच कुळातील, भाऊबंद, आप्त, नाते वाईक [स+कुल]

सकुळी—स्त्री समुदाय

सकून—पु शकुन पहा [स शकुन]

सकृत—क्रिवि एकदा एकवेळ एकवार, तावडतोब 'ज्यासि सकृत् ताडूनिया ध्वनिला जन एक मास वरि परिस।' -मोसभा १ ८९ [स] ०ग्राही-वि तावडतोब ग्रहण करणारा, चाणाक्ष, चलाख तीक्ष्ण बुद्धीचा ०दर्शनीं क्रिवि १ पाहताक्षणींच प्रथम दर्शनीं, पाहिल्याबरोबर २ प्रथमच मूळारभीं, प्रारभींच

**सकृप**—वि कृपालु दयाळु सदय 'तो म्हणतसे सकृपु। ऐसें राया।' –ज्ञा ४ २१०

**सके-कें**—सक पहा [स षट्क]

**सकेकरी**—पु पाणी देणारा, पाणी शिंपडणारा नोकर, भिस्ती 'वरुण ज्याचा सकेकरी।' –स्वादि ६ ४ ४१ सक्का पहा [अर. सक्का=भिस्ती]

**संकेत**—पु १ व्यवस्था, निश्चिति, स्थापना, नियतता २ *संमत, योजना, करार, कबुली, वायदा, बोली, ठराव* ३ पूर्व निश्चिति, तरतूद, योजना ४ खूण; इशारा चिन्ह, अर्थगर्भ हालचाल, सूचक अंगविक्षेप, दृष्टिक्षेप वगैरे 'सुमित्रा सुतालागि संकेत केला।' –राक १ १७ ७४ ५ प्रेमीजनाचा बेत, निश्चित स्थान, योजना 'तो करी संकेत गोपीसवें।' –सुभा ९४ ६ शर्ते, अट, ठरविलेलें कलम, गोष्ट ७ शब्दाची विशिष्ट अर्थज्ञापक शक्ति [स सम्+कित=आमंत्रण करणें] ०**कुंज**–पु प्रियजनाचें मीलन स्थान, क्रीडास्थान ०**शब्द**–पु (व्या) नाम; पदार्थवाचक शब्द ०**समीकरण**–न ज्या समीकरणांत अज्ञात अक्षराबद्दल विशिष्ट एकच किंमत घातली असता खरें असतें असें उदा० क्ष+५=१० म्हणजे क्ष=५ ०**साक्षात्कारी**–पु दोस्त, मित्र, सोबती ०**स्थान**–न प्रेमीजनाचें परस्पर भेटण्याचें योजलेलें स्थल **संकेतार्थ**–पु (व्या) एका क्रियेची सिद्धि दुसऱ्या क्रियेवर अवलंबून आहे असा बोध करणार क्रियापदाचें रूप उदा० जर तो आला तर मी जाईन' –मभाव्या १६१ **संकेतित**–धावि निश्चित, योजिलेलें, ठरविलेलें, नियोजित **संकेती**–वि ठरल्याप्रमाणें वागणारा, नियमानें चालणारा

**सकेरा**—पु रेंव, खडा, कंकर, वाळूंतील खडा [स शर्करा]

**सकेशा**—स्त्री केस असलेली विधवा स्त्री वपन न केलेली विधवा [स]

**सकेश्वर**—पु सकासुर पहा राजतुरा, एक फुलझाड व फूल

**संकोच**—पु १ आकुंचन आखडणें, आकसणें, एकत्र ओढलें जाणें, मिटणें, चिरमुटणें, अवटणें 'आपलिया संकोच विकाशा। आपणचि रूप वीरेशा।' –ज्ञा १५ ५५३ २ अरुंदपणा, निमूळतपणा, जागेची दाटी, गर्दी, मोकळेपणाचा अभाव, निरुंदपणा, (जागा वगैरे) प्रशस्त नसणें; आवळपणा (भाड्याचा) ३ जागा मोकळी, प्रशस्त नसल्यामुळें होणारी अडचण, दाटी, दाटणी 'मला येथें संकोच होतो, स्वस्थ लिहवत नाहीं' ४ (ल) मनावर निर्बंध घातला गेल्यामुळें विकाराची होणारी दाटी, स्वातंत्र्याभाव मनमोकळेपणाचा अभाव मनाचा खोलपणा ५ लज्जा, विनय, भीड, मर्यादा वगैरेमुळें वागणुकीवर पडणारा निर्बंध, दाब, अडचणल्यासारखी वागणूक (क्रि० वाटणें, होणें) [स सम्+कुच्] **संकोचणें**–अक्रि १ आकुंचित होणें, म्हान होणें, आखडणें 'आणि गंगा शंभूच्या माथा। पावोनि संकोचे पार्था।' –ज्ञा १६ २०५ २ दाब पडणें, प्रतिबंध वाटणें, अडचणें ३ मोकळेपणानें न वागणें दुष्मन असणें, वतावंतानें असणें, निर्बंधित वर्तन करणें ४ भीड, मर्यादा, लज्जा यांनीं मोकळेपणा न वाटणें, लाजणें, **संकोचन**–न आखडणें, आकसणें; मिटणें, दाटणें, कोंडणें, अडचणणें, कोताई, दाटी; चिंचोळेपणा **संकोचित**–धावि *१ आखडलेलें, आकसलेलें, आकुंचित,* दाटलेलें; एकत्र आलेलें २ अरुंद, चिंचोळें, आवळलेलें, अडचणलेलें, प्रशस्त नसलेलें, दाटीचें ३ निर्बंधित, नियंत्रित, रोखलेलें ४ दबलेलें, निरुद्ध भिडस्त, शरमिंदा, लज्जित, विनत ५ (सामान्यत) आशंकित, चुचकळ्यात पडलेल, साशंक, भीतिग्रस्त **संकोची**–वि भिडस्त लाजाळू, मागें राहणारा, मनमोकळा नव्हे असा

**सकोटण-भ, संकोटण-न**–न साकटणें, ज्यावर एखादी वस्तु साकटावयाची, खापलावयाची असते तो आधाराकरिता घेतलेला ठोकळा [साकटणें]

**सकोमळ**—वि मृदु नाजुक, लुसलुशीत, कोमळ 'सकोमळ सरिसे। बुदुद राहती आपैसे।' –ज्ञा ६ १८१ [स सुकोमल]

**सकावत**—सखावत पहा

**सकोली**—स्त्री (व) प्रेताची तिरडी

**सकोश**—वि (प्राणिशास्त्र) ज्याला पिशवी असते असा (प्राणिवर्ग) –प्राणिमो ४८ [स]

**सक्करनातें**—न १ जवळजवळच्या आप्तांमध्यें असलेली सलगी, दाट स्नेह, लोभ २ पत्नीच्या आप्तांबद्दल वाटणारा लोभ, आपुलकी, आपलेपणा [सक्कर=साखर+नातें]

**सक्करपारा**—पु (व) जरदाळू

**सक्करिया**—न रताळें –कृषि ५५० [गुज]

**सक्कस**—वि कठिण, बळकट सकस पहा [अर सख्त; स+कस]

**सक्का**—पु भिस्ती, पाणी देणारा नोकर 'पखाली व सक्के यांजकडून पाणी पोहोंचवीत होतों' –मदबा २ १२२ 'सक्का तु जल्द रसूत।' –राच्य २ ३ [अर सक्का=पाणी देणारा]

**सक्त**—धावि १ संलग्न जोडलेलें, युक्त, २ (ल) रममाण अधीन निमग्न, नियुक्त, गढलेलें, तत्पर 'सक्त ब्राह्मण भजनीं आहे स्थाचाचि सत्य हा भक्त' –मोसभा १ १००[स] **सक्ति**–स्त्री १ संयोग, जोड, संबंध २ अधीनता, निमग्नता, अनुरक्ति

**सक्त, सख्त सकत**—वि कठिण मजबूत, कणखर, कठोर, कडक जुल्मी कष्टप्रद, दुःखकारक 'पोलाद इतकें सक्त करता येतें कीं।' –पदाव १२१ 'ऐसा तीन सवयनें बायको आपला

दील सक्त करून जातात ' -ऐटि २११ [ अर सख्त् ] ०गो-वि बोलण्यात निष्ठुर ०गाई-स्त्री निष्ठुरपणा ०पाठ्याळ-वि १ कणखर मजबूत, सशक्त ( पशु ) २ ( ल ) सोशीक, कष्टाळू, काबाडकष्ट करणारा ' तुझ्या घरांत मायको सक्तपाठ्याळ आहे म्हणून तुला वक्तेवर भाकर मिळते ' ०भीड-स्त्री विशेष आग्रहाची विनंति, निकडीची मध्यस्थी ( क्रि० घालणें ) ' तुम्ही सक्त भीड घातली म्हणून माझें काम झालें ' ०मजुरी-स्त्री १ कष्टाचें काम, मेहनतीचें काम, तुरुंगांत कैद्याकडून करून घ्यावयाचें श्रमाचें काम २ कैद, असें काम करावयाची शिक्षा ०रदबदली-स्त्री निकडीची, आग्रहाची, जरुरीची विनंति, मध्यस्थी सक्ती-स्त्री १ जबरी, जुलूम, कष्ट दुःख २ कडकपणा, कठोरता, निष्ठुरता

सक्तु—पु १ एक धान्य, यव २ सातूचें पीठ सत्तू, सातवा

सक्तनहू—वि रहिवाशी -आदिलशाही फर्मानें [ अर साकीन ]

सक्याण—न कणसें काढून घेतल्यानंतरचा कडबा धाट.

सक्रंदन—न १ कापाकापी, मारामारी, कत्तल २ ( ल ) धक्काधक्की; ओढाताण, वाईट रीतीनें वागविणें [ स सं+क्रदन ]

सकृद्दर्शनीं, सकृदर्शनी—सकृद्दर्शनी पहा

सक्रम-संक्रमण—पु न १ गमन, पुढें जाणें, चालू लागणें, गति, प्रवास, स्थलांतर २ एका राशींतून दुसऱ्या राशींत जाणें ( सूर्य अथवा ग्रहाचें ), संक्रांति [ स सं+क्रम् ]

संक्रमण संक्रमणगणित—न दोन संख्यांची बेरीज व वजावाकी दिली असतां त्या दोन संख्या शोधून काढण्याची रीत क्रिया संक्रामक-वि स्थलांतर करणारा

सक्राई नक्राई—सकराई नकराई पहा

सक्रांत—स्त्री १ ( अप ) संक्रांति पहा २ ( ल ) संक्रांत एका दिशेनें येते दुसऱ्या दिशेकडे जाते व तिसऱ्या दिशेकडे पाहते यावरून अशा तऱ्हेनें विचित्रपणानें वागणाऱ्या मनुष्यास विनोदानें म्हणतात तसेंच संक्रांत अशुभफलदायी असते यावरून अनिष्ट मनुष्यासहि म्हणतात -धावि पुढें गेलेला ओलांडून गेलेला, पलीकडे गेलेला [ स ] ०फळ-न ( ज्यो ) प्रत्येक राशींतून सूर्य गेला असता त्या त्या राशीस किंवा त्या कालास अनुसरून इतर राशींस मिळणारें शुभाशुभ फल ०बसणें-( ज्या राशींतून सूर्यसंक्रमण होतें त्या राशीस अनिष्ट फल मिळतें या समजुतीवरून ) अनिष्ट काल प्राप्त होणें, अशुभ होणें संक्रांति-स्त्री १ सूर्याचें ( किंवा ग्रहाचें ) एका राशींतून दुसऱ्या राशींत गमन २ एका स्थितींतून दुसऱ्या स्थितींत जाणें स्थित्यंतर, स्थलांतर वगैरे [ स सं+क्रम्-जाणें ]

सक्राथा—पु ( व ) शिराळ शार

सक्लेश—वि श्रमदायक, पीडाकारक, कष्टकर ' तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें दंड राजस । ' -ज्ञा १८ ११०

सख—पु मित्र, सहचर, सखा विशेषत समासाच्या उत्तरपदीं, जसें-इंद्रसख, मरुत्सख, तत्सख [ स सखिन् ]

सख—पुन सहांचा संघ, समुदाय, गट ' चे सख बारा ' सक पहा [ स षट्क ] ०रजा-पु दुफाशी खेळांतील एक दान, एका फाशावर सहा आणि दुसऱ्यावर एक असला म्हणजे होतें

सखाई—अभ सबबीं, विषयीं, करितां ' तरी देखाचि मदनसेचा सखाई । घालिता होता । ' -शिशु २० ४० ५९

सखजिरें—न ( ग्र ) सगजिरें पहा

सखत, सखती—सक्त, सक्ति पहा

सखया—संबोधन सख्या, मित्रा, प्राणनाथा ' सखया रामा विश्रांति तुझिये नामीं । ' [ स सखिन् ]

सखर—वि चांगलें उपयुक्त, दाट; ठाशीव, घट्ट विणीचें, पोताचें ' बहुत सखर सेले चांगले आठ गोली । ', ' याचे वस्तु आपल सखरा होऊन साध्य पडावयाचें नाहीं ' -राजे संभाजी चरित्र १४ [ स+खर ] ०निखर-वि उत्तममध्यम, बरीवाईट, उंचसखल ( जमीन )

सखल—न १ उताराची, खोलगट जमीन, ल्हाण, खाच, खळगा २ खळगी, खाच ( जमीन, लाकूड, दगड वगैरेंतील ) -वि १ खोलगट, उताराची, खड्ड्यातील, खोल ( विहीर, खड्डा ) २ कमी उंच, ठेंगणा ०वट-वि १ थोडें सखल, खोलगट, उथळ ( जमीन ) २ खळग्याचा, कमी उंच सखलाट-वि ( गो ) खालची, तळची सखळी-स्त्री ( गो ) देवालयाच्या सभोंवार असलेली भिंत व तेथपर्यंतची खोलगट जागा

सखलात-द—स्त्री बनात लोंकरीचें कापड, जाड लोंकरीचें कापड [ तु फा सक्लात सकलात पहा ] सखलाती-दी-वि बनातीचें

सखल्या फणस—सकल्या फणस पहा

सखवार—वि सकवार सुकुमार ' वाढीति त्या गजगती सखवार नारी । ' -सारुह ६ ७७ [ स सुकुमार ]

सखा—पु सोबती मित्र सहचर स्नेही ' सख्यावें उद्धन । सखा साहे निवात । ' -ज्ञा ११ ५७४ [ स ] सखा-सखासोयरा ( विरू ) सगा-सगासोयरा पहा सखा-सख्खा वि प्रत्यक्ष, संबंधाचा, जवळच्या संबंधाचा चुलता, मामा, आत्या वगैरेच्या मार्फत संबंधाचा नव्हे ' याचा वधी जो चुलता सखा रे । ' -वामन नृसिंहावतार, ( नवनीत पृ १२६.

'मणिल कंठीं बांधुनि माझा सख्खा प्रसेम जो चुल्ला।' -मोकृष्ण ८३ १०४ **सखित्व**-न मैत्री, स्नेह **सखी**-स्त्री १ मैत्रीण, सोबतीण २ शिमग्यातील शृंगारिक लावणी ३ लावणीच्या प्रारंभीं म्हणावयाचे श्लोक वगैरे गाणें

**सखा**—पु सखाराम याचा संक्षेप सखारामबापू बोकील **सखा देवा विठ्ठला**-पेशवाईतील साडेतीन शहाण्यापैकीं तीन शहाणे, सखारामबापू बोकील, देवाजीपंत चोरघोडे व विठ्ठलसुंदर, अर्धे शहाणे नाना फडणवीस

**सखावत**, **सकोवत**—स्त्री औदार्य, दानधर्म 'सकोवतीचा माल आहे' -रा १५ १३७ [अर सखावत]

**सखी**—वि धर्मात्मा, उदार, दानधर्म करणारा. [अर. सखी] **सखीचा लाल**-पु अतिशय उदार मनुष्य, धर्मात्मा

**सखुन**—पु शब्द, वाणी, वचन; जबान, भाषण 'ही दानाई ईश्वरानीं ज्यास बक्षीस केली त्यांचे सखुनाची पास ठेवणें लाजीम' -रा ५ ८६ [अर सखन, सखुन=भाषण, वाणी तुल० सं शकुन]

**सखेद**—क्रिवि दु खानें, खेदयुक्ततेनें, खेदानें 'मग सखेद असे बोलतु।' -ज्ञा १ १९२ [सं स+खेद]

**सखोल**—वि १ अतिशय खोल, फार खोल २ गंभीर, गूढ खोल अंत करणाचा 'सम्य सखोल सात्त्विक।' -दा १४ ८ ७ 'प्रभू सखोल हृदय आपुलें।' -ज्ञा १ ६३ [स+खोल]

**सख्त**—वि सक्त पहा कठीण कडक [अर सख्त] **०गो**-वि वाचानिष्ठुर, कठोरवाणीचा 'शाहाजी सख्तगो फार यास्तव कोणाशीं बनत नाहीं' -दिमरा २ २३ **०गोई**-स्त्री निष्ठुर भाषण कठोर वाणी **सख्ती**-स्त्री सक्ती पहा जुलुम, क्रूरता, निष्ठुरता, कडकपणा

**सख्य**—न १ मैत्री, स्नेह मित्रत्व (समासांत) साधुसख्य, स्त्रीसख्य; सत्सख्य २ देवाशीं सघटन, नवविधा भक्तिपैकीं एक प्रकार, सख्यभक्ति 'अर्चन वंदन दास्य सख्य आत्मनिवेदन।'

**सख्य**—न युद्ध [स]

**संख्या**—स्त्री १ अंक, आकडा, आंस २ गणना, मोजदाद, इयत्ता 'सख्या न करवे कोणासी।' -ज्ञा ७ १६३ [स] **०मोजणें**-गणना करणें, मोजदाद करणें, रकम किती ते काढणें सांगणें **संख्यात**-भावि मोजलेलें, गणलेलें **संख्यान**-न मोजण्याची क्रिया, गणन **सख्यावत्-वान्**-वि विद्वान्, संख्या जाणणारा 'यांद शास्त्रानें हे संख्या सख्यावदाशूला पडती।' -मोविराट ४ ६४ **संख्यावाचक**-वि संख्या दाखविणारा विशेषणांचा एक प्रकार एक, दोन, तीन वगैरे **संख्याविशेषण**-वि सख्या दाखविणारा विशेषणाचा प्रकार. याचे सख्यावाचक, सख्यापूरक, सख्यावृत्तिवाचक व सख्यांशवाचक असे चार प्रकार आहेत.' -ममाव्या १३८ **सख्येय**-वि मोजण्याजोगें, गणना करावयाचें, गणण्यास शक्य

**संखया सोमल**—पु सोमलाचा एक प्रकार, एक औषध -अश्वप २ २९०

**संग**—पु १ सहवास, जोड, संगति, ऐक्य, संबंध, सोबत, आसक्ति, सयोग, मैत्री (समासांत) सत्सग, खलसग, साधुसग, भगसग, स्त्रीसग, गुरुसग, विषयासग 'म्हणऊनि सगु जव प्रकृतीचा।' -ज्ञा ३ ६३. २ स्त्रीपुरुषसमागम, मैथुनसबंध [सं सम्+गम्=जुळणें] **०चर-चारी**-वि १ सहचर, बरोबर असणारा, सहवासी, सगती २ समूहचर, सघ करून राहणारा; कळपांत राहणारा **०दोष**-पु ससर्गदोष 'जे सगदोषें हा लौकिक। भ्रंशु पावे।' -ज्ञा १ २५७ **सगें-संगें**-क्रिवि बरोबर, सगती, सोबतीनें

**संग**—पु दगड, धोंडा, फत्तर [फा सग] **संगई-सगी**-वि दगडी, सगीन 'कारंजाचे आंगें सगी फरशीवर जमीनीस शाले' -पया ४४५ **०तराश-त्रास**-पु पाथरवट, घडीवकाम करणारा 'मग बाटिली कामवट। सगत्रास पाथरवट।' -कालिका १९ ३६ **०बसरि**-पु एक धातुविशेष, सरका राज्यको २ २२ **०मरमर**-पु आरसपानी दगड, एक पाढरा विशिष्ट दगड **०मरमरी**-वि आरसपानी दगडाचा, आरसपानी **०सार**-पु दगडानीं ठेंचून मारणारा [फा] **०सारी**-स्त्री दगडानीं ठेंचून मारण्याची क्रिया [फा]

**सगई**—स्त्री सोयरीक आप्तसबंध [सग]

**सगजिरें-रा**—नपु शाकजिरें, एक औषधी द्रव्य

**सगट**, **सगटनिगट**—क्रिवि सकट, सारखें, भेदाभेद न पाहता, सरसकट, सर्व 'निंदका वदका सगट सांभाळी।' -रामदासी अभंग (नवनीत पृ १५४) 'नरपशुतनु मानसिल सगट।' -राला १०१ 'सगट लोकांचा जिव्हाळा मोडू नये।' -दा १५ १ ३१. -शअ बरोबर, सह, एकत्र 'रथासगट देईल धावें।' -उषा ७०

**संगटणें**—अक्रि एकत्र होणें, एकवटणें 'दल्बादल हेऱ्यांत श्रीमंतांसनिध सगटले।' -ऐपो ३९५ [स सं+घट्]

**सगटाई**—स्त्री सरभेसळ, एकत्रितपणा, क्रमराहित्य, समूहावस्था **सगटाइचा-नें-खालीं**-एकत्रितपणें

**सगडी**—स्त्री शेगडी 'चिंतेची सगडी जिवाखि रगडी.' आ सुदाम ४९६

**संगडी**—पु सोबती, सवंगडी 'श्रीरामा इतुकें असे सगडि तिकडे गणात ज्या राम असे।' -मोकृष्ण ५९ ८ [सं सम्+गम्]

**संगणमत-मती**—सगनमत-मती पहा

**संगणें**—(विरू) सागणें पहा. ' तोहि शिणला नि दोष। वस्तु न सगवे।'—दा १५११

**सगत**—स्त्री (गंजिफा) उजव्या हातच्या खेळगड्याकडून आलेली देणी.

**संगत-ति**—स्त्री १ सहवास, सोबत, साहचर्य, स्नेह 'उत्तम संगतीचें फळ सुख। अधम संगतीचें फळ दुःख।' —दा १७७१७ २ संयोग, मिलाफ, जोड, जमाव, मेळ, लाग, ३ ऐक्य, संबंध, जुळणी ४ पूर्वापरसंबंध, अनुरोध 'होईल श्लोकसंगति भगु। म्हणऊनियां।'—ज्ञा ५ ६६ [सं सम्+गम्=जाणें]

**संगत**—वि संबद्ध, युक्त, अनुयोगी **संगत(ति)गुण-संगगुण**-पु साहचर्यानें उत्पन्न होणारा गुणदोष, सहवासानें लागणारें वळण, होणारा परिणाम **संगतवार**-वि संबद्द, युक्त, अनुसरून असलेलें **संगतसोबत**-स्त्री १ स्नेह, मैत्री, सोबत, सहवास २ स्नेही; सोबती, बरोबरची मंडळी **संगति(त)दोष, संगदोष**-पु स्नेहामुळें, संसर्गामुळें जडलेला दुर्गुण **संगतीं-संगतें**-क्रिवि बरोबर, सह, सोबतीनें **संगतीं जाणें**-१ सती जाणें, सहगमन करणें २ संग करणें, रत होणें **संगतीसोबती**-पु स्नेही, मित्र, दोस्त **संगाती**-पु स्नेही, सोबती, मित्र; दोस्त **सांगाती-तें, संगीं**-वि बरोबर, सह 'संध्याकाळीं आपल्या मुलासांगातीं लहान डोंगरावर बसला'—नि २९ **संगी**-पु मित्र, स्नेही 'बोलिलें सकळ संगीयासी।'—प्र २६४ —वि १ संगति धरणारा, संबद्ध, युक्त उदा० साधुसंगी, गुणसंगी, स्त्रीसंगी, दुष्टसंगी, सत्संगी २ संगतवार, यथार्थ 'तव परमार्थ हा संगी न म्हणे।'—सिस ४७३ **संगीक**-वि बरोबरचा, सहचर. 'संगीक समुदाया ठेऊनि दूर'—दावि १०९ **संगीकारी**-वि बरोबरचा, अनुचारी, सोबतचा 'दोन तीन दिवसावरी। तस्कर असता संगीकारी।'—गुच १०२१ **संगें**-क्रिवि बरोबर, सह सहित; सान्निध्यात 'संगें महमदसाहब इमानी सरदार।'—ऐपो १७० **संगेमंगें**-क्रिवि स्नेहानें, सोबतीनें, एकत्र, मित्रत्वानें [संगें द्वि]

**सगद्गद**—वि गहिंवर आलेला 'येथ सगद्गदें बोलें। अर्जुनें जी म्हणितलें।' ज्ञा १५४६१ [सं]

**सगंध**—वि सुवासिक [सं]

**सगनमत**—न संकेत, परस्पर विचार करून केलेला निश्चय, परस्पर सहाय्याकरिता केलेला बेत, योजना, सहकार, संघटन **संगनमती**-पु एखादें कार्य साधण्याकरिता संकेत करणारा जमाव, संघ, पक्ष, विचारविनिमय करून ऐक्य केलेली मंडळी

**सगपण**—न आप्तपणा, नातें [सं सखा, म सगा] हाको ७ १६

**सगयहीण**-स्त्री मानलेली बहीण 'आटवण करुनी, करुनि घातली सी, माजिही सगयहिणी घरची।'—काव्येतिसं ६४ [सगा+बहिणी]

**संगम**—पु १ ऐक्य, संयोग, भेट, संमेलन, मिलाफ एकत्र येणें, एका ठिकाणीं मिळणें, एकत्र होणें उदा० 'नद्यांचा संगम, रस्त्याचा संगम 'पैं जीव परमात्मा संगमा।'—ज्ञा ६४८० २ (ज्यो) ग्रहांची युति, एकत्र येणें ३ (जरतार) हलक्या जरताराचा एक प्रकार.

**सगर, संगर**—पुत्री पाऊलवाट, सावजाचा मार्ग 'भवाटवीचा सगरा। जीवाकरिता येरझारा।'—ऋ ६

**सगर, संगर**—स्त्रीन वस्त्राचें अंग व काठाची रेशमी वीण यामध्यें एक निराळ्या रंगाची रेघ विणतात ती.

**संगर**—पुन युद्ध, लढाई [सं]

**सगरकूप**—पु. काशींतील एका विहिरीचें नांव (सगर राजानें खोदलेला) [सं]

**संगरंग**—पु (गो) समुद्रातून प्रवास करणारा [सारंग?]

**सगरणी**—स्त्री (अप) समद्दणी पहा इगवग

**संगरात**—पु. (अप) संगतरास, पाथरवट, अश्मभेत्ता —राव्यको ७१४ [फा संगतरास]

**सगर्भ-र्भ्य**—पु सख्खा भाऊ [सं] **सगर्भ**-वि गरोदर, गर्भिणी [सं.] **सगर्भप्राणायाम** पु प्रणवयुक्त प्राणायाम

**सगलंकृत**—वि गिलकृत याचें चमत्कारिक रूप [सं सम्+गल=गळा+कृत=केलेलें]

**संगव**—पु दिवसाचे पांच विभाग केले असतां दुसरा भाग सात घटिकेपासून बारा घटिकेपर्यंतचा काल, वासरें पिण्यास सोडण्याची वेळ दोहनकाल [सं सम्+गो=गाय]

**संगवई-यी**—पु १ बालमित्र; बाळपणापासूनचा सोबती २ सहचर, सहकारी, सहभागी 'नानासारखे वीर संगवये।' —ऐपो २२६ ३ सोबती, वाटाड्या, मार्गदर्शक [संग+वय]

**संगसगा**—पु १ तो करीत नाहीं तर मी का करीन अशा अर्थानें धरलेला मत्सर, स्पर्धा, असूया, अशा स्पर्धेनें केलेलें कृत्य वगैरे २ दुसऱ्याची पद्धत पाहून केलेलें कोणतेंहि सामाजिक, लौकिक कृत्य —क्रिवि बरोबर एकत्रित, सह, सोबतीनें [संग]

**सगळणें**—अक्रि (व ना) साचणें, जमणें, एकत्र होणें [सकलन]

**सगळमळ, सगटमळ, सगडमळ**—स्त्री कवळ कणसें न कापतां सर्व पिकाची केलेली मळणी [सगळा+मळणें]

**सगळा**—वि १ सर्व, सकल, एकूणएक २ पूर्ण पुरा, सर्वच्या सर्व [सं सकल, प्रा सगल, हिं प सगला, गु सगळो]

**सगळा**—पु (ना) ढीग, रास, गोळा [सकलन]

**सगा**—पु १ स्वकीय, नातेवाईक, आप्त, नातलग २ मित्र, सोबती –वि स्वकीय, जवळचा, सख्खा (तुलत, सावत्र नव्हे) [स स्वक, सखा, प्रा सक] **सगाई**–स्त्री १ नातें २ सोयरीक, विवाहसंबंध, वाङ्निश्चय **सगासो(इ)यरा**–पु स्नेहीसोबती, नातेवाईक, आप्त सोयराधायरा, इष्टमित्र

**सगा**—पु सगुणी कवडी पहा

**सगात्र**—वि ठोसर, घट्ट मजबूत, 'जैसे सगात्र सघन। होती पर्वतीचे पाषाण।' –भाए ५४९ [स स+गात्र]

**संगितरंगित**—वि सुसज्ज, सुखभोगींनीं भरलेला, परिपूर्ण 'महाल चोखट संगित रंगित। ते साहूनि विपिनीं पडाल दुःखित।' –नव १७ १४३

**संगिन**—वि संगीन पहा दृढ; घट्ट 'फुच संगिन पाहून वचन मनीं गजबजती। –होला ५९ ८७ **संगिनात**–स्त्री, स्था जमा, स्थारशिबंदी, मजबुती 'वडिलीं त्यावरावर आपली संगिनात वळून सुरक्षित त्या स्थळास पाठवून स्वसिद्धि झाल्या वर ' –बाडसारो १ ८६

**संगिनमाक्र**—पु घोडयाच्या आयाळींतील भोंवरा –अश्वप १ १०३

**सगी**—स्त्री सुवागी, सवागी, टाकणखार, कडयाखार, सोनार सोनें वितळविण्याकरिता वापरतात तो क्षार

**संगीत**—न १ वाद्यसहित गायन, गाणें-वाजवणें, गायन वादन २ गायनवादनाचीं साधनें ३ गायनवादन नर्तनशास्त्र, स्वरशास्त्र, गायनकला –वि १ गायनयुक्त, ज्यांत गाणें, पदें आहेत असें (नाटक) [स सम्–गा–गी]

**संगीत**—वि समर्पण, व्यवस्थेशीर, व्यवस्थित, यथायोग्य 'संगीत चालिला तरी तो व्याप' –दा १९ ७ २५ 'उत्तरासी संगीत उत्तरें।' –दा १९ १० ६ [स सम्+गम्]

**संगीन संगीन**—वि १ (वों कुम) जड, अवजड, भारी २ सपूर्ण, पूर्णपणें असलेला 'सामाजिक आणि राजकीय परिस्थितीचा संगीन अभ्यास मी प्रिटोरियामध्यें केला' –महा त्माजींचे सत्याचे प्रयोग १५५ [स सघन, फा संगीन]

**संगीन**—वि १ दगडी, चिरेबंदी २ वजनदार, जड, मजबूत 'करार झालेया पेस्तर तुम्हांस संगीन जाईल' –रा १५ १३६ 'संगीन कुच भरदार सजिव सजदार गुलगेन्द उसासले।' –प्रला ११३ ३ (ल) यथास्थित व्यवस्थित 'मग सुख शयनी निद्रा पहुडी। कोण संगीन करीलची।' –नव १७ १६३ 'संगीन ज्याचा सुरताल रे।' –प्रला १८० 'मान्य राजाचे संगीन।' –इपुत्रिपो ५ ४ (ल) पूर्ण, जय्यत, साग्र 'रजपुतास चन्दगीत आणून फौज संगीन तयार करविली' –रा ६ ७८९ 'त्यासबंधीं साग्रसंगीन हकीकत साग' –कोकि ७०१ ५ एक सारखा, अखंड, सतत 'अंगिड नौबत वाजती दणादण भेर वाजे संगीन' –ऐपो १०९ [स सम्+दगड]

**संगीन**—स्त्री बागनट, बंदुकीच्या टोंकास लावलेलें तीक्ष्ण हत्यार, (इं) बेयोनेट 'संगीन खोंवूनी चाले।' –मराठ्यांची सग्रामगीतें १२८ [तुर्की सुगु=भाला, फा संगीन]

**सगुण**—वि १ रूपगुणसपन्न, साकार, प्रत्यक्षानुभूत निर्गुणाचे उल्ट सत्त्व-रज-तमादि गुणयुक्त २ सफल 'परी ठेलि यादि सगुण जाहालें। ऐसेंचि मानी।' –ज्ञा २ २७० ०**दर्शन**–न प्रत्यक्ष दर्शन, स क्षाद्दर्शन 'मनामाजि आलें सगुणदर्शन' –राम दासी २ ५९५ ०**निवेदन**–न सर्व कर्ता परमेश्वर आहे आपला देह परमेश्वररूप आहे ही भावना 'कर्ता राम मी नव्हे आपण। ऐसें सगुणनिवेदन।' –दा ६ ७ ०**ब्रह्म**–न मायाब्रह्म, प्रकृति युक्त पुरुष, केवल निर्गुणब्रह्म नव्हे तें ०**रूप**–न साकार व सावयव परमेश्वराची मूर्ति, देवतेची प्रतिमा, चित्र वगैरे ०**साक्षात्कार**–पु देवतेचें प्रत्यक्ष साकाररूपात दर्शन, प्रत्यक्ष दर्शन याचे उलट निर्गुणसाक्षात्कार अथवा आत्मसाक्षात्कार-म्हणजे परमेश्वररूपाचें ज्ञान, सर्व विश्व ब्रह्मरूप आहे ही जाणीव, अंत ज्ञान ०**साक्षात्कारी**–वि देवतेचें प्रत्यक्ष दर्शन झालेला **सगुणोपासक**–वि साकारदेवतेची, प्रतिमेची, मूर्तीची उपासना करणारा **सगुणोपासना**–स्त्री साकारदेवतेची भक्ति

**सगुणी, सगुणीकवडी सगुण्या, सगा**—स्त्री स्त्री.पु तळाशी सपाट व पृष्ठभाग फुगीर व गोलाकार असलेली कवडी ही समईत घातली असता तेल कमी जळतें अशी समजूत आहे

**सगु(गू)न**—पु (व) शकुन पहा [शकुन] ०**सागर**–स्त्री शकुनसागर

**सगू**—पु १ भिडू गडी, सोबती, जोडीदार (खेळातील) २ मित्र, सखा, प्रियकर 'चातकपक्षी चाहाती जसे मेघाच्या बिंदुला। तशा त्या लज्जित सगुला।' –प्रला २१५ –क्रिवि (खेळात) भिडूभिडू जोडीनें, एकत्र [स सगम्] ०**संगू**–पुअव भिडू, सोबती, मित्र सवगडी, जोडीदार [सगू द्वि]

**सगृहीत**—धावि जमविलेलें, साठविलेलें, एकत्र केलेलें, रचलेलें, घेतलेलें [स]

**सगोत्र**—पु एका गोत्रातील, आप्त, नातेवाईक, एकाच पुरुषाचे वंशज [स स+गोत्र=कुल]

**सगोपणें**—सक्रि पालन करणें, जपणें, सभाळणें पोसणें 'जो सर्वे क्षेत्रातें सगोपोनि असे।' –ज्ञा १३ ८ [स सं+गुप्]

**सगोपन**—न पालन, जोपासना, यथायोग्य सभाळ, जपणूक (–क्रप) सगोपान, सगोपगन 'मधुरसोद्देशें। मधुकरी जन्वे जैसें। गृहसगोपन तैसें। करी जो गा।' –ज्ञा १३ ७८६ **सगोपित**–धावि पालन केलेला **सगोपिता**–पु पालक, रक्षक

क्षक ' अशा मन असाधुला इतर कोण सगोपिता।'–कका ९६

सगगड—स्त्री (काशी) मोटी टकलगाडी

सग्गा—(खा) सगा पहा

सग्रह—पु १ साठा सचय जमाव, रास, ढीग २ एकीकरण, ग्रथन, सघटण, समाहृति एकत्र आणण्याची क्रिया उदा० काव्यसग्रह, लोकसग्रह ३ धरणें, घेणें, पकडणें [सं सम्+ग्रह] संग्रहण–न जमविणें, सग्रह करण्याची क्रिया, साठवण संग्रहणें–अकि जमविणें, गोळा करणें 'क्रीडला तें मुनिनाथें। सग्रहिले अवघे।' –रास १७ 'विद्यावत ज्ञानी पडित। त सग्रहावे देऊन धन अमित।' –पात्र ३७७६ सग्रहा–वि १ सग्रह करणारा, साठा करणारा, जमविणारा २ लोभी, कृपण, हव्यास करणारा, आशाळभूत संग्रहीं असणें–राहणें–१ जवळ असणें, ताब्यात असणें, साठ्यात असणें २ पदरीं असणें, अवलबून असणें, परिवारात असणें स्वल्पकाळींच सग्रहीं राहती –दावि ८९ संग्रहात–धावि साठविलेलें, गोळा केलेलें, सचय केलेलें संग्राहक–संग्राही–वि सग्रह करणारा संग्राह्य–वि सग्रह करण्यास योग्य इष्ट, शक्य

संग्रहणी—स्त्री हगवण, अतिसार, अतिशय रेच होणें, मलसग्रहामुळें होणारा रोग (अप) संग्रणी, संग्राणी–[स]

सग्राम—पु शिग्राम पहा एक प्रकारची गाडी 'येति खाशा बाया बसून सग्राम मेणा।' –गापो ४१

संग्राम—पु युद्ध सगर, लढाई 'युद्धाची आवडी धरती। परी सग्रामीं धीर नव्हती।' –ज्ञा १९७३ [स] ०जित–वि युद्धात जिंकला गेलेला, पराभूत, पराजित, लढाईत हरलेला ०जित्–वि युद्धात जिंकणारा, विजयी 'परमप्रतापी। सग्रामजित्।' [स] ०सोर–वि युद्धात शूर, विजयी 'गेले बहुत सग्रामीं। सग्राम सौर।' –दा ३९४७

सग्री—वि सगर पहा (विणकाम) पात कोणताहि, काठ रेशमी पण त्यात नक्षी नसून पिवळ्या अगर पाढऱ्या काड्या असतात असें वाण

संघ—पु समुदाय, समाज, समूह जमाव (प्राणी अथवा वस्तूंची एकत्रित सख्या) [स सम्+हन्] ०जीवि–वि समाजावर जगणारा, मनुष्यसमुदायावर उपजीविका करणारा (भिकेकरी, हमाल, भाट, नट कथकरी, वगैर अनुत्पादक धदा करणाऱ्यास सज्ञा) सघट–पु समुदाय 'मद मुखाचिया सघटा।' –ज्ञा ११३९४ सघशः–क्रिवि गटानें समुदायानें, सघशक्तीनें, समूहामार्फत संघशक्ति–स्त्री ऐक्य, एकजुटीचें सामर्थ्य 'त्याची सघशक्ति कायम राहिली तर चव्वळीस जोर मिळेल।' –टिळे ३३२ ०सत्तावाद–पु सर्व वस्तूंत गड्यांच्या मालकीचें करणें हें तत्त्व (इं) कम्युनिझम संघीकरण–न सग्रथन, संघटन, सयुक्तीकरण हिंदुस्थानातील सर्व प्रांताचा कारभार एकसूत्री धोरणानें चालविणें –केसरी १४ ८ ३६

संघटण–ट्टन–टन, (अप) संघष्टण, संघष्टन, संघृष्टन, संघटणें—न १ निकट रुबध, सलगीचें वर्तन 'तुका म्हणे जिणें। भलें सत सघटणें।' 'आमचें त्याचें सघट्टण विशेष असेल नाहीं?' –भाव ४ २ भेट, मीलन, एकत्र येणें, सयोग, जुळणी, स्पर्श 'तुका म्हणे जरी अग्नि झाला साधु। तरी पडे बाधु सघटणें।' –तुगा ६५७ ३ घट्ट मिठी (मल्लाची कुस्तीमध्यें, प्रियजनाची आलिंगनात), भीड, विळखा, विलगणें ४ सघर्षण, धामाधास [स सम्+घट्] सघटणें–अकि भिडणें, भेटणें, एकत्र येणें, बिलगणें 'हृदयीं हाणितल्या चरणें। बळें सघटे पादसर्धी।' –मुआदि ९५१ 'जैसी परिव्राजकाबरी। राजदामी सघटे।' –मुरशु २३५ 'स्थाजवळी रामरूप सघटले।' –रावि ३२१२० २ मावणें, सामावणें 'हें देखोनि दुर्योधना। परमानद न सघटे।' –मुआदि ३१११६ संघटना–स्त्री जमाव, जुळणी, एकत्रीकरण, सयोग संघट्ट–पु. घर्षण 'मदरभ्रमणीं तरुसघट्टें। वन्हि पेटला धडधडाटें।' –मुआदि ४१०८.

सघन—वि क्रिवि दाट, घट, गर्द, गच्च; निबिड 'असो ऐसी सभा सघन। कलिंगा दृष्टीनें पाहोन।' –नव २०९२. 'तैसें गगनीं असे सघन।' –दा १३६१८. [स]

सघर्ष, संघर्षण—पुन १ घासणी, घामाघास, घमट, घर्षण २ (ल) स्पर्धा, कलह, निरोध, युद्ध संघर्षणें–कि. १ घासणें, चोळवटणें, खरडणें २ झगडणें, झटापट करणें, भाडणें, स्पर्धा करणें, कलह, युद्ध करणें संघर्षित–धावि घामाघीस केलेलें

सघाट—पु समूह, जमाव, थवा 'चालती सघाट काटीयाचे।' –निगा ३२५ [स सघट्] संघाटण–न सघटण पहा युद्ध द्वद्व 'काल बहुत श्रमला कृष्ण। वत्सेसीं करिता सघाटण।' –निगा १६ संघाटी–स्त्री सागड, युगुल

संघात—पु १ समुदाय समूह, मेळ, जमाव 'ऋतुक्र्यात प्राप्त झाला मन्मय। सग वायु आणि दुसरा वसत। ऐसा त्रिघाचा सघात।' –कथा १६११ २ नरकाचा एक भाग ३ वध. [स सम्+हन्] संघातक–पु (नृत्य) पाच करणांचा समूह

संघारणी—स्त्री झापड; झडप, झाकणी 'वरुणावरी करी सघारणी।' –उपा ६९ [स सम्+हृ]

सघारणें—सकि मारणें. 'सघाले दळभार।' –उपा १७४७ [स. सम्+हृ]

**संग्राणी**—स्त्री सग्रहणी पहा हगवण

**सच**—वि सत्य, खरें [स सत्य, हिं सच]

**सच**—पु १ साधन, सामुग्री, जोड, साहित्य, उपकरण सग्रह २ सग्रह साठा, ढीग, रास ३ आकार, बाधा, ठेवण 'मग शरीरसचु पार्था। अशेषहि सर्वथा।' –ज्ञा ६ १९८ ४ (ल) मेळ, सगति एकवाक्यता 'बोलण्यांत कांहीं सच नाहीं' [स सचय] **संचक**-वि सग्रही, लोभी, कृपण 'ना तरी उदासीन दैवें। सचकाचीं वैभवें।' –ज्ञा ११ ४१२. २ सचित कर्ते, साठविणारे 'ऐस परमार्थु सचकु। जे नव्हेति आत्मवचकु।' –ऋ १९

**सचकार**—पु १ विसार, बयाणा, आगाऊ घेतलेली रक्कम २ वकिलाचा बयाणा [स सत्यकार] **सचकारणें**-क्रि स्वीकारणें

**सचकित**—वि आश्चर्यचकित, विस्मित, चकित [स+ चकित]

**सचणी**—स्त्री १ (रत्ना सावतवाडी) कुळांस लागवड करण्यास वतेजन देण्याकरिता खोतानें द्यावयाची रकम २ (कों) गवत, गोवऱ्या, नवळ वगैरे गोळा करण्याची खोता कडून सुरवात [स सचयन]

**संचणी**—स्त्री (कों) जमीनीची तरमवदी, सान्याचा ठराव [स सचयन]

**सचणें**—उक्रि साठणें, भरून राहणें, एकत्र होणें, जमा होणें 'तोचि परमात्मा सचला। आधींचि आहे।' –ज्ञा ६ ८४ 'सिद्धचि अतरीं सचली। चतुर्विधा प्रकारें।' –दा १ २ १३ [स सम्+ची] **सचय**-पु साठा, सग्रह, जमाव रास ढीग 'हा कर्मसचया।' –ज्ञा १८ ५१२ **संचयन**-न साठ वणी सग्रहण, जमवणूक **सचयी**-वि सग्रही, साठा करणारा

**सचंतर-सचत्र**—वि (अप) स्वतत्र, मुक्त, मोकळा [स स्वतत्र]

**सचत-ती**—स्त्री (गो) (अप) सतति [स सतति]

**सचरणें**—अक्रि १ प्रवेश करणें शिरणें, रिघाव करणें २ भिजणें, मुरणें, आत जाणें 'कीं सचरलें हलाहल। हृदयीं वाटे दरारया।' –रावि ४ ५० ३ व्यापणें शिरून राहणें, भुताखेतादि काचा शरीरात प्रवेश होणें, अगात येणें 'काम संचरलें नेणों देहीं।' –दावि ३४ 'ते योगनिद्रा न सचरे।' –विपु १ १०४ ४ संचार करणें, फिरणें ५ चुकणें, भलतीकडे जाणें, स्खलन होणें, मार्ग भ्रष्ट होणें [स सम्+चर] **संचरित**-धावि शिरलेला व्यापलेला प्रवेश केलेला

**सचवटी**—स्त्री सचोटी पहा प्रामाणिकपणा, नेकी

**सचळ, संचळखार**—नपु पादलोण [स सौवर्चल]

**संचा**—पु साचा, यत्र

**सचाड**—वि इच्छायुक्त, कामयुक्त, सकाम 'कामिनी चरणालागीं सचाडें।' –शिशु २९४ 'आणि सचाडाचिये परी।' –ज्ञा १३ ५२४ [स+चाड]

**संचार**—पु १ हिंडणें, फिरणें, भ्रमण, वापर 'जेथें सचार राक्षसाचा।' –शुच २९ ८ २ अगांत येणें, भूतपिशा च्यादिकानीं व्यापणें 'भूतसचार विषयसचार, वातसचार' 'भूद समर्थी सचार क्षमीं वसे।' –दा २ ३ २४ 'देखा मनज्ञ वरलु जाय। मग तेथ का तैसा संचारु होय।' –ज्ञा १ १५० ३ प्रवेश रिघाव, गति 'म्हणोनि वर्तता तेथ पापा। सचारु नाहीं।' –ज्ञा ३ ८१ ४ दुरान्वय, स्खलन दोष, विस्तार, विषयातर 'आत्मस्तुती होता। सचार असे।' –ज्ञा १२ २१७ ५ पाठातरातील चूक, दोष (क्रि० जाणें) [स सचर्] **सचारणें**-उक्रि प्रवेश करविणें, शिरकावणें, घुसविणें –अक्रि सचरणें पहा **सचारलेखन**-न मध्यस्थाकडून आपोआप केलेलें लेखन (इ) ऑटोमॅटिक राइटिंग **संचारिका**-स्त्री मध्यस्थ स्त्री, दूती **सचारित**-धावि गति दिलेलें, भ्रमित, व्यापिलेलें, घुसलेलें **संचारी** पु (सगीत) चीजेचा तिसरा भाग **सचारी वर्ण**-पु (सगीत) स्थायी, आरोही व अव रोही यांच्या मिश्रणानें झालेला वर्ण

**सचिणें**—उक्रि साठणें जमणें, गोळा होणें, एकत्र होणें [स स+ची] **सचित**-न पूर्वजन्मार्जित पाप-पुण्य, एकदर कर्मांचा साठा, अदृष्ट, अपूर्व 'सचित म्हणजे एकदर कर्मांचा जो साठा' –गीर २६८ 'तिचीं ठवुनी हरी सचितें।' –कका १०५ 'मना त्वाचि रे पूर्वसचीत केलें।' –राम –धावि साचलेलें साठविलेलें **संचितोदक**-न साचवणी, साचलेलें पाणी **सचेय**-वि साठविण्यास योग्य शक्य, पात्र

**सचित**—वि चिंतायुक्त काळजीनें व्याप्त, काळजींत असलेला 'परम सचित द्विपवदन।' –रावि

**सचिल, सचील**—न सचैल स्नान 'न फिटे कलया सचिल।' –गीता २ १५८९ –वि (अप) सचैल, सवस्त्र, अगावरील वस्त्रासह (स्नान) [स स+चैल=वस्त्र]

**सचिव**—पु १ प्रधान मत्री, सल्लागार 'वती सुखा सचिव नीति' –मोवन १३ ८९ २ अष्टप्रधानांतील एक अधि कारी, सुरनीस ३ सहचर सोबती, मित्र [स]

**सची**—स्त्री (प्र) चवी, पानसुपारी ठेवण्याची कप्प्यांची, विशिष्ट पिशवी

**सचून**—न रेशमाची एक जात

**सचेतन**—न चित्त, आत्मस्वरूप 'सचेतनी याणे पणें। वहासकट आटणें।' –ज्ञा १३ ५०९ –वि सजीव जीवत, चेतनायुक्त 'लोहो करी सचेतन।' –ज्ञा ११ १३९ [स]

**सचेल, सचैल**—वि पोषाख केलेला -क्रिवि अंगावरील वस्त्रासह, पोशाखासुद्धा -न सवस्त्र स्नान 'मुख देखोन विरचाचें। सचैल करी।' -ज्ञा १३ ७०५ [स स+चैल]

**सचेष्ट**—वि सजीव, जीवत, चेतनायुक्त [स स+चेष्टा]

**सचोटी**—स्त्री प्रामाणिकपणा, इमान, नेकी, खरेपणा, चोखपणा [स सत्य]

**सच्चर्या**—स्त्री चांगली वर्तणूक, वागणूक [स सत्+चर्या]

**सच्चा**—वि खरा, प्रामाणिक, विश्वासु, खात्रीचा [स सत्य, प्रा सच्च, हिं सच्चा]

**सच्चिदंश**—वि प्राण्यातील चेतना, बौद्धिक, तात्त्विक भाग, जीवांश [स सत्+चित्+अंश]

**सच्चिदानंद**—पु सर्व विश्वव्यापी पुरुष, त्रिकालीं असणारा, सत्यज्ञान व आनंदयुक्त परमेश्वररूप, ईश्वराचें निर्गुण रूप, परमात्मा [स सत्+चित्+आनंद]

**सच्चिद्घन**—पु जीवात्मा -वि खऱ्या ज्ञानानें, बुद्धिनें, अस्तित्वानें परिपूर्ण [स सत्+चित्+घन]

**सच्छिद्र**—वि छिद्रमय, भोकें असलेलें (इ) पोरस [सं स+छिद्र]

**सज**—पु १ साज, सच, सरंजाम, सामुग्री, समूह 'झळकति सज जेथें गोठ हे सोनियाचे।' -सारुह ८ ७५ २ डौल, ढब, शोभा उदा० सजदार, सजधज [साज]

**सज**—क्रिवि (अप) सहज 'अवो या चौघांच्या सज अनुमतें चालसि जयीं।' -सारुह ७ १४८

**सज**—वि सज्ज पहा 'देवा सज करीती रथ। -उषा २०

**सजगणी, सजगाणी**—स्त्री १ दुडा पैसा, ढबू पैसा, सहा रुके २ जमीनीचें एक प्रमाण, सहा रुके किंवा तीस विघे ३ कसबीण -महिकावती बखर १२

**सजगुरा**—पु बाजरी, एक धान्य 'समर्थे सजगुऱ्याचें धोपट।' -सप्र ८.१८ [का छज्जे=बाजरी]

**सज्जड**—वि मजबूत, घट्ट [स+जड]

**सजण-णा, सजन**—पु १ प्रियकर, सखा, वल्लभ, मित्र, प्यार; नायक 'आईकता गुण तुझे सजणा न धाले।' -सारुह ५ ९२ २ सोयरा, नातलग 'सोयरा सजण हाच असावा।' -सारुह ४ १०६ [स स्वजन] **सजणी-नी** नस्त्री १ सखी, मैत्रीण, विश्वासु स्त्री २ नायिका, प्रिया, वल्लभा 'तुवा सजणे हा समाचार घेतां।' -र ५२ [स स्वजनी]

**सजणी**—स्त्री तयारी, नटापटा, पोशाख वगैरे, थाट, विभूषण [सजणें]

**सजणें**—अक्रि १ तयार होणें, सज्ज होणें, सर्व सामुग्रीसह सिद्ध होणें, सर्व पोशाख वगैरे ठाकठीक करून असणें 'सजली त्या यावया स्वगृहाचाहि वली।' -विक ६०, २ योग्य, व्यवस्थित, बरोबर, दुरुस्त होणें, असणें ३ शोभणें, सुलणें, अलंकृत होणें, नटणें, शृंगारणें 'केवल्यहि तैसें न सजे।' -ज्ञा १५ १३ 'असेल सजली यथारुचि तरीं स्वयोषा करें।' -केका ३६ ४ अनुकूल होणें, जमणें, योग्य होणें 'पदातु सघात तुझें सजेना।' -सारुह १ २४ 'म्हणौनि केलें तें सजेना।' -दा १२ २ ६ वरील सर्व अर्थी सकर्मक रूपातहि वापरतात [स सज्ज] **सजदार**-वि शोभिवंत, थाटामाटाचा, शृंगारलेला 'स्वरूप सजदार लक्षतें येकचि नामी।' -होला १२२ **सजविणें**-सक्रि १ तयारी करणें २ शृंगारणें **सजाई, सजावट**-स्त्री थाट, शृंगार, शोभा, व्यवस्था, रचना

**सजल-ळ**—वि पाण्यानें युक्त, जलयुक्त 'जैसें चद्रा आड आभाळ। सदट दाटे सजळ।' -ज्ञा ८ २२९ [स स+जल]

**सजल**—स्त्री १ व्यवस्था, रचना, जुळणी (क्रि० करणें, लावणें, बसविणें, होणें, लागणें, बसणें) २ युक्ति, योजना, कल्पना, पद्धति (क्रि० काढणें, योजणें, रचणें, पाडणें) [अर]

**सजहुमा**—पु एक अलंकार 'सर्जे तोडर पाखरा सजहुमे कडे पटे चांगले।' -सारुह ३ ४५

**सजा**—पु (विरू) सज्जा पहा

**सजा-झा**—स्त्री शिक्षा, पारिपत्य, दंड, ताडन, कैद (क्रि० देणें) 'ही गोष्ट लटकी जाली तरी पातशा मज सजा पोचविते' -रा १५४ [फा सज़ा]

**सजावार**—क्रिवि योग्य रीतीनें, पद्धतशीर -मराचीथोरा ६४ [फा सज़ावार] **सजावल-पु** वसूल, तगादा करणारा, दालाईत 'प्रस्तुत नबाबाचे सजावल येऊन त्याची सुटका होईल तर करणें।' -खरे १ ४१९

**सजाइती-ईत**—वि किंमत न ठरविता पसंत न झाल्या वर परत करण्याच्या बोलीनें आणलेला (जिन्नस), जागड

**सजात**—धावि चांगला झालेला, उत्पन्न केलेला, प्रेरलेला 'जे मी सजात अपर्णों देख। आचार्ये कीं।' -ज्ञा १८ १७६९ [स]

**सजाति-तीय**—वि एकाच जातीचा, प्रकाराचा, तऱ्हेचा, कुळाचा, वंशाचा [स स+जन्]

**सजाप-फ-व**—पु १ वस्त्राचा रंगीत काठ, किनारी, मगजी, नक्षीदार पट्टी 'सजाप सोडुनि पगडी बनावी।'

**संग्राणी**—स्त्री मग्रहणी पहा दगवण

**सच**—वि सत्य, खरें [स सत्य, हिं सच]

**सच**—पु १ साधन, सामुग्री, जोड, साहित्य, उपकरण समूह २ संग्रह साग, ढीग, रास ३ आकार, बांधा, ठेवण 'मग शरीरगतु पार्था। ऊरोपदि सर्वेया।' —ज्ञा ६ १९८ ४ (ल) मेळ, सगति, एकवाक्यता 'याच्यांत काही सच नाहीं' [स सचय] **संचश**—वि सग्रही, लोभी, कृपण 'ना तरी उदासीनें देवें। संचकाचीं वैभवें।' —ज्ञा ११ ४१२. २ सचित करते, साठविणार 'ऐसे परमार्थु संचकु। जे नव्हति आत्मवचकु।' —ऋ १६

**सचकार**—पु १ विसार, बयाणा, आगाऊ पतलेली रक्कम २ वकिलाचा बयाणा [स सत्यकार] **सचकारणें**—क्रि स्वीकारणें

**सचकित**—वि आश्चर्यचकित, विस्मित, चकित [स+ चकित]

**सचणी**—स्त्री १ (रत्ना सावतवाडी) कुळांस सागवड करण्यास उत्तेजन देण्याकरितां खोतानें द्यावयाची रक्कम २ (वों) गवत, गोवऱ्या, कवळ वगैरे गोळा करण्याची खोता कडून सुरुवात [स सचयन]

**सचणी**—स्त्री (वों) जमीनीची तरमबदी, सा याचा ठराव [स सचयन]

**सचणें**—उक्रि साठणें, भरून राहणें, एकत्र होणें, जमा होणें 'तोचि परमात्मा सचला। आधींचि आहे।' —ज्ञा ६ ८४ 'सिद्धचि अतरीं सचली। चतुर्विधा प्रकारें।' —दा १ ३ १३ [स सम्+ची] **सचय**—पु साठा, समूह, जमाव रास, ढीग 'हा कर्मसचया।' —ज्ञा १८ ५१२ **सचयन**—न साठ वणी सग्रहण, जमवणूक **संचयी**—वि सग्रही, साठा करणारा

**सचतर-सचत्र**—वि (अप) स्वतत्र मुक्त, मोकळा [स स्वतत्र]

**सचत-ती**—स्त्री (गो) (अप) सतति [स सतति]

**सचरणें**—अक्रि १ प्रवेश करणें शिरणें, रिघाव करणें २ भिजणें, मुरणें, आत जाणें 'कीं सचरलें हलाहल। हृदयीं वाटे दगरया।' —रावि ४ ५० ३ व्यापणें शिरून राहणें, भुताखेतादि कांचा शरीरात प्रवेश होणें अगात येणें 'काम संचरलें नेणों दईं।' —दावि ३४ 'त योगनिद्रा न सचरे।' —विपू १ १०४ ४ सचार करणें; फिरणें ५ चुकणें भलतीकडे जाणें, स्खलन होणें, मार्ग भ्रष्ट होणें [स सम्+चर] **संचरित**—धावि शिरलेला व्यापलेला प्रवेश केलेला

**सचवटी**—स्त्री सचोटी पहा प्रामाणिकपणा, नेकी

**सचळ, संचळखार**—नपु पादेलोण [स सौवर्चल]

**संचा**—पु साचा, यत्र

**सचाड**—वि इच्छायुक्त, कामयुक्त, सकाम 'कामिनी चरणांलागीं सचाडें।' —शिशु २९४ 'आणि सचाडाचिये परी।' —ज्ञा १३ ५२८ [स+चाड]

**संचार**—पु १ हिंडणें, फिरणें, भ्रमण, वापर 'जेथें सचार राक्षसाचा।' —गुच २९ ८ २ अंगांत येणें, भूतविद्या क्वादिकांनी व्यापणें 'भूतसचार, विषयसचार, वातसचार'' भूत समर्थी संचार अंगीं वसे।' —दा ३ ३ २४ 'हसा मनउ परतु जाय। मग तप का तैसा संचार होय।' —ज्ञा १ १९० ३ प्रवेश, रिघाव, गति 'म्हणोनि वर्तता तथ पापा। संचार नाहीं।' —ज्ञा ३ ८१ ४ दुरान्वय, स्खलन दोष, विस्तार, विषयांतर 'आत्मस्तुती होतां। संचार असे।' —ज्ञा १२ २१७ ५ पाठांतरातील चूक, दोष (क्रि० जाणें) [स सचर्]

**सचारणें**—उक्रि प्रवेश करविणें, शिरकावणें, घुमविणें —अक्रि सचरणें पहा **संचारलेखन**—न मध्यस्थाकडून आपोआप करलेलें लेखन (इ) ऑटोमॅटिक राइटिंग **संचारिका**—स्त्री मध्यस्थ स्त्री, दूती **सचारित**—धावि गति दिलेलें, भ्रामित, व्यापिलेलें, घुसलेलें **संचारी** पु (सगीत) चीजेचा तिसरा भाग **सचारी वर्ण**—पु (संगीत) स्थायी, आरोही व अव रोही यांच्या मिश्रणानें झालेला वर्ण

**सचिणें**—उक्रि साठणें, जमणें, गोळा होणें, एकत्र होणें [स सम्+ची] **सचित**—न पूर्वज-मार्जित पाप-पुण्य एकदर कर्मांचा साठा, अदृष्ट, अपूर्व 'सचित म्हणज एकदर कर्मांचा जो सांठा' —गीर २६८ 'तिचीं ठकवुनी हरी सचितें।' —कका १०५ 'मना त्वाचि रे पूर्वसचीत केलें।' —राम —धावि साचलेलें सांठविलेलें **संचितोदक** न साचवणी, साचलेलें पाणी **संचय**—वि साठविण्यास योग्य शक्य, पात्र

**सचिंत**—वि चिंतायुक्त काळजीनें व्याप्त काळजींत असलेला 'परम सचित द्विपवदन।' —रावि

**सचिल, सचील**—न सचैल स्नान 'न फिटे केलया सचिल।' —नीगा २ १५८९ —वि (अप) सचैल, सवस्त्र अगावरील वस्त्रासह (स्नान) [स स+चैल=वस्त्र]

**सचिव**—पु १ प्रधान मंत्री, सल्लागार 'देती सुखा सचिव नीति' —मोवन १३ ८६ २ अष्टप्रधानातील एक अधि कारी सुरनीस ३ सहचर, सोबती, मित्र [स]

**सची**—स्त्री (प्र) चंची, पानसुपारी ठेवण्याची कप्प्यांची विशिष्ट पिशवी

**सचून**—न रेशमाची एक जात

**सचेतन**—न चित्त, आत्मस्वरूप 'सचेतनी वाणे घर्णे। देहासकट आटणें।' —ज्ञा १३ ५०६ —वि सजीव जीवत चेतनायुक्त 'लोहो करी सचेतन।' —ज्ञा १३ ११९ [स]

**सचेल, सचैल**—वि पोशाख केलेला –क्रिवि अंगावरील वस्त्रासह, पोशाखासुद्धा –न सवस्त्र स्नान 'मुख देखोन निरुकाचें। सचैल करी।' –ज्ञा १३ ७०५ [स स+चैल]

**सचेष्ट**—वि सजीव, जीवंत, चेतनायुक्त [स स+चेष्टा]

**सचोटी**—स्त्री प्रामाणिकपणा, इमान, नेकी, खरेपणा, चोखपणा [स सत्य]

**सच्चर्या**—स्त्री चांगली वर्तणूक, वागणूक [स सत्+चर्या]

**सच्चा**—वि खरा, प्रामाणिक, विश्वासु, खात्रीचा [स सत्य, प्रा सच्च, हिं सच्चा]

**सच्चिदंश**—वि प्राण्यातील चेतना, बौद्धिक, तात्त्विक भाग, जीवांश [स सत्+चित्+अंश]

**सच्चिदानंद**—पु सर्व विश्वव्यापी पुरुष त्रिकालीं असणारा, सत्यज्ञान व आनंदयुक्त परमेश्वररूप, ईश्वराचें निर्गुण रूप, परमात्मा [स सत्+चित्+आनंद]

**सच्चिद्घन**—पु जीवात्मा –वि खऱ्या ज्ञानानें, बुद्धिनें, अस्तित्वानें परिपूर्ण [स सत्+चित्+घन]

**सच्छिद्र**—वि छिद्रमय, भोकें असलेलें (इ) पोरस [स स+छिद्र]

**सज**—पु १ साज, सच, सरंजाम, सामुग्री, समूह 'झळकति सज जेथें गोठ हे सोनियाचे।' –सारुह ८ ७५ २ डौल, ढब, शोभा उदा० सजदार, सजधज [साज]

**सज**—क्रिवि (अप) सहज 'अवो या चौघाच्या सज अनुमतें चालसि जयीं।' –सारुह ७ १४८

**संज**—वि सज्ज पहा 'देया सज करीती रथ। –उपा २०

**सजगणी, सजगाणी**—स्त्री १ दुडा पैसा, ढबू पैसा, सव्वा रुके २ जमीनीचें एक प्रमाण, सव्वा रुके किंवा तीस बिघे ३ कसबीण –महिकावती बखर १२

**सजगुरा**—पु बाजरी, एक धान्य 'समर्थें सजगुऱ्याचें धोपट।' –सप्र ८.१८ [का छज्जे=बाजरी]

**सज्जड**—वि मजबूत, घट्ट [स+जड]

**सजण-णा, सजन**—पु १ प्रियकर, सखा, वल्लभ, मित्र, प्यार, नायक 'आईकता गुण तुझे सजणा न धाले।' –सारुह ५ ९२ २ सोयरा, नातलग 'सोयरा सजण हाच असावा।' –सारुह ४ १०६ [स स्वजन] **सजणी-नी** नस्त्री १ सखी, मैत्रीण, विश्वासु स्त्री २ नायिका, प्रिया, वल्लभा 'तुवा सजणे हा समाचार घेता।' –र ५२ [स स्वजनी]

**सजणी**—स्त्री तयारी, नटापटा, पोशाख वगैरे, थाट विभूषण [सजणें]

**सजणें**—अक्रि १ तयार होणें, सज्ज होणें, सर्व सामुग्रीसह सिद्ध होणें, सर्व पोशाख वगैरे टाकठीक करून असणें 'सजली त्या यावया स्वसुताचाहि बली।' –विक ६०. २ योग्य, व्यवस्थित, बरोबर, दुरुस्त होणें, असणें ३ शोभणें, खुलणें, अलंकृत होणें, नटणें, शृंगारणें 'कैवल्यहि तैसें न सजे।' –ज्ञा १५ १३ 'असेल सजली यथारुचि तयीं स्वयोषा करें।' –केका ३६ ४ अनुकूल होणें, जमणें, योग्य होणें 'पदातु सघात तुझ सजेना।' –सारुह १ २४ 'म्हणौनि केलें तें सजेना।' –दा १२ २ ६ वरील सर्व अर्थी सकर्मक रूपातहि वापरतात. [स सज्ज] **सजदार**–वि शोभिवंत, थाटामाटाचा, शृंगारलेला 'स्वरूप सजदार लक्षतें येकचि नामी।' –होला १२२ **सजविणें**–सक्रि १ तयारी करणें २ शृंगारणें **सजाई, सजावट**–स्त्री थाट, शृंगार, शोभा, व्यवस्था, रचना

**सजल-ळ**—वि पाण्यानें युक्त, जलयुक्त 'जैसें चंद्रा आड आभाळ। सदट दाटे सजळ।' –ज्ञा ८ २२९ [स स+जल]

**सजल**—स्त्री १ व्यवस्था, रचना, जुळणी (क्रि० करणें, लावणें, बसविणें, होणें, लागणें, बसणें) २ युक्ति, योजना, कल्पना, पद्धति (क्रि० काढणें, योजणें, रचणें, पाडणें) [अर]

**सजहुमा**—पु एक अलंकार 'सजें तोडर पाखरा सजहुमे कडे पत्रे चांगले।' –सारुह ३ ४५

**सजा**—पु (विरू) सज्जा पहा

**सजा-झा**—स्त्री शिक्षा, पारिपत्य, दंड, ताडन, कैद (क्रि० देणें) 'ही गोष्ट लष्करी जाली तरी पातशा मज सजा पोचविते' –रा १५४ [फा सझा]

**सजावार**—क्रिवि योग्य रीतीनें, पद्धतशीर –मराचीयोरा ६४ [फा सझावार] **सजावल**–पु वसूल, तगादा करणारा, ढालाईत 'प्रस्तुत नबाबाचे सजावल येऊन त्याची सुटका होईल तर करणें।' –खरे १ ४१९

**सजाइती-ईत**—वि किंमत न ठरविता पसंत न झाल्या वर परत करण्याच्या बोलीनें आणलेला (जिन्नस), जागद

**सजात**—धावि चांगला झालेला, उत्पन्न केलेला, ... 'जे मी सजात भयलों देख। आचार्ये कीं।' –ज्ञा १८ १७६९ [स]

**सजाति-तीय**—वि एकाच जातीचा, प्रकारचा, तऱ्हेचा, कुळाचा, वंशाचा [स स+जन्]

**सजाप-फ-च**—पु १ वस्त्राचा रंगीत काठ, किनारी, मगजी, नक्षीदार पट्टी 'सजाप सोडुनि पगडी बनारसी।'

–अमृत १२३ ७८ २ (ल) शेंडीभोंवतालचा घेरा ३ (ल) पुरण न भरलेला पोळीचा, साटोरीचा काठ [फा सजाफ] **सजाव(व)दार-संजापी-फी-ची-वि** १ काठ असलेलें, किनारीदार 'भजेरी झूल हत्तीला सजाऽदार।' –होपो ६ २ घेरेदार **सजाची विडा पु** सर्भोवती केळीच्या पानाचा घेर असणारा एक प्रकारचा दरबारी विडा

**सजायत-ती सजायीत**—सजाइती पहा

**सजावचें**—सक्रि (गो) खात्री पटविणें [सजविणें]

**सजिद**—वि गंभीर, जड, वजनदार [फा सजीदा=वजनदार, जड] **संजिदगी**-स्त्री गांभीर्य, वजन, दाब

**सजीखार**—पु (विरू) सज्जीखार पहा

**सजीव**—वि जिवंत, सचेतन, सप्राण [स स+जीव्] ०कोटी-स्त्री प्राणिवर्ग ०ता-स्त्री टवटवी, तजेला, जीवंतपणा –एभा ८ १७८

**सजीवन**—न १ पुनरुज्जीवन, मृताचें पुनरुत्थापन २ मृतास जीवंत करण्याचें मंत्र, तंत्र अमृत वगैरे साधन. ३ (ल) पुन्हां ऊर्जित दशेस आणणें [स सम्+जीव्] ०विद्या-स्त्री मृत मनुष्यास जिवंत करण्याचा मंत्र, युक्ति 'प्रेमाचा सन्मान होत नाहीं तर्वे सजीवन विद्या नांदत नाहीं।' –विग्राहरण ४९ ०होणें-सजीव होणें, जिवंत होणें, प्राणलाभ होणें **संजीवनी**-स्त्री १ मृतास जीवंत करण्याची विद्या, युक्ति, मंत्र 'तुका म्हणे माझ्या विठोबाचे पाय। सजीवनी आहे हृदया माजी।' –तुगा ८१० २ मृतास जिवंत करण्याचा गुण असलेली एक वेल, औषधी, अमृतवल्ली 'जरी परमाणु एवढें। सजीवनी मूळ जोडे।' –ज्ञा १४ ८३६ ३ (सांकेतिक) अमृतवल्ली यावरून अमृतराव पेशवे यास हा शब्द योजीत 'सजीवनी व बायका (शिंद्याच्या) एक आहेत।' –ख ५४५३ ०गुटिका-स्त्री वावडिंग सुंठ वगैरेंचें मिश्रण करलेलें एक औषध, गोळी ०मणी-पु मृतास जिवंत करण्याचें सामर्थ्य असलेला एक काल्पनिक मणी, रत्न ०मंत्र-पु मृतास जिवंत करण्याचें सामर्थ्य असलेला एक मंत्र **संजीविनी**-स्त्री सजीवनी

**सजुकता सजुगता**—वि १ योग्य व्यवस्थित बरोबर, जुळणारा, शिस्तवार, पद्धतशीर (राज्य, सहयान, कारभार) २ आटोपशीर, आटोक्यांतील प्रमाणशीर, नमस्त (काम, धंदा, व्यवसाय) [स सम्+युज्] **सजुगणें**-क्रि (माप) असल त्यांत चालविणें, समाधान मानणें, प्रमाणात, व्यवस्थित रीतीनें काम करून घेणें

**सजुगाई**—स्त्री एक ग्रामदेवता 'बहजाई, वाघजाई सजुगाई इत्यादि देवनाच्या बाबतींत .' –खया

**सजुतपत्र**—न परस्पर विरुद्ध पक्षांत समेट झाल्याबद्दलचा लेख, कागद [स सम्+युति]

**सजुदा**—वि तयार, जय्यत, पूर्ण, सज्ज 'परंतु माहाड जागा जाण्याचा शामल सजुदा व इंग्रेजांची मदत' –पेद ३ १२८ [स सम्+युज्] **सजूद**-वि सज्ज, तयार 'सिलेभार सजूद ते राउताचे।' –राक १ २ १५

**संजोक-ग**—पु साठा, संचय, संच [स सयोग]

**संजोगणी**—स्त्री १ तयारी, तरतूद, जोडणी, पुरवठा, पर्याप्ति, संचय, सिद्धता, सामुग्री २ सपादणी 'आता असो हे सजोगणी। प्रभावतीसी सांग हरिणी।' –कथा १ ७ २३२. [स सम्+युज्] **संजोगणें**-उक्रि सिद्ध करणें, सज्ज करणें, तयारी, तरतूद करणें 'पाखरिले वारू रथ। सजोगिले गुढरीले हस्ती।' –आद्य मराठी कवयित्री–उ ४८ २ 'त वेळीं रथ सजोगिला। अक्रूर मथुरेयाहेर निघाला।' –कथा ४ ६ ६५ 'रथ शिबिका सजोगून। तत्क्षणीं निघाले।' –मारा किष्किंधा ८ ९६ –अक्रि १ सपादणें, पुरवून घेणें, पुरवठ्यास येणें २ (बा) घुमणपणानें करणें, टापटीपीनें वस्तु पुरवठ्यास आणणें **संजोगी**-पु यतिधर्म न पाळणारा साधु घरमारी गोसावी

**संजोग**—पु परिस्थिति बनाव, घटना 'अशा संजोगात शहरचा बंदोबस्त पोलिसाकडून होणें शक्य नाहीं' –नानासाहेब दिवे यांचें आत्मवृत्त २६७

**सजोडा**—वि जोडलेला, जुंपलेला 'चतुरंग परिवारा। सजोडिया रहवरा।' –ज्ञा ११ ३९७

**सज्ज, सज्जित, सज्य**—वि १ तयार, सिद्ध तत्पर शृंगारलेला, भूषविलेला, सजविलेला, साधनयुक्त, पोषाख केलेला 'आयताही व्यापारीं। सज्ज न होय।' –ज्ञा १३ १११७ २ जोडलेला, जोडून तयार (रथ, धनुष्य, वगैरे) [स षस्ज्-जाणें] **सज्जणें**-उक्रि १ सज्ज करणें तयार करणें होणें 'घलें सज्जतां अगतज। निरंतर झालें त काळीं।' –मुआदि ४१ ५२ २ जोडणें, सिद्ध करणें 'भ्रूचाप सज्जूनि आकर्णे।' –मुआदि ४ १३७ **सज्जात**-स्त्री तयारी, साज शोभा पोषाख, साधनसामुग्री

**सज्जदनिशान**—वि गादीवरील मठाधिपति खानकामधील व्यवस्थापक –धका ८२

**सज्जन**—पु १ शीलवान्, सात्त्विक, गुणी मनुष्य 'आतां नमू सत सज्जन' –शनि २ सखा मित्र 'तू माझा सज्जन मी तुझी सांगाती।' –व ५२५ ३ रामदास समर्थ 'हें असो नाशिकीं असतां सज्जन।' –दावि ८२ [स सत्+जन] ०गिरि-पु सज्जनगड परळीचा किल्ला 'सज्जन गिरिवरि मोक्ष प्रदानी।' –स ६ ९

**सज्जा**—पु १ घराच्या सर्वांत वरील मजल्यावर केलेली हवाशीर खोली, बंदिस्त जागा, चंद्रशाला २ खिडकीपुढें काढलेली उघडी जागा; गॅलरी ३ नाट्यगृहांतील दुसऱ्या मजल्यावरील कठड्याजवळील जागा, गॅलरी ४ लागवडीखालीं असलेल्या शेतजमीनीचा लांबलचक पट्टा ५ जकातीकरितां पाडलेले प्रांत, विभाग उदा० पुणें सज्जा, नगर सज्जा [ हिं छज्जा स छाया ? ]

**सज्जाखार, सज्जीखार**—पु एक प्रकारचा क्षार, सिंधु घटनेनेत्रित, एक अलकली, टांकणखार [ स सजिकाक्षार, प्रा सज्जिआखार, हिं साजीखार ]

**सज्जाद**—पु १ मुसलमानाचा प्रार्थनेकरिता बसावयाचा गालिचा, चटई २ गादीवर बसणारा हक्कदार –आदिलशाही फर्मानें [ अर सज्जादह् ]

**सज्गुरा**—पु बाजरी, सजगुरा पहा 'कोणी घाटीं सज्गुऱ्यात सोडून चारीत बसले ' –भाव १२५

**सट**—स्त्री १ शुद्ध व वद्य पक्षांतील सहावा दिवस, षष्ठी (व) विशेषत मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी हा खंडोबाचा दिवस, चंपाषष्ठी २ एक देवता, सटी, दुर्गा देवता ३ या देवतेची उपासना, पूजा ४ षष्ठिपूजा ही बाळंतिणीच्या सहाव्या दिवशीं करतात [ स षष्ठी ] **सटवणी**–न मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी अथवा चंपाषष्ठीच्या सुमारास पडणारा पाऊस **सटवणें, सटावणें**–अक्रि १ षष्ठी देवतेची बाधा होणें, मूल जन्मल्यापासून सहाव्या दिवशीं मृत होणें, अगर, आजारी पडून त्या योगानें पुढें मरणें ' अहारे अर्जुना सटवलें याळा।' –ह ३६ १३३ २ (ल) नाश पावणें, क्षय पावणें ' गुरु भक्ति ते सटवली। एकाएकीं। ' –दा ५ २ ६० ३ गर्भपात होणें नासावणें ' वंध्यागर्भ सटवे सपूर्ण। तैं जन्ममरण मुक्तांसि।' –एभा २२ ४०८ **सटवला**–वि सटवीनें मारलेला, जन्माच्या सहाव्या दिवशीं मेलेला, बाधा झालेला 'सटवल्याचें बारसें। कोणी न करितीचि उल्हासें।' –एभा २८ ११४ **सटवा**–वि वाईट **सटवाई, सटवी**–स्त्री १ षष्ठी देवता, सटी, एक क्षुद्र देवता, ही लहान मुलास उपद्रव देते हिची मूल जन्मल्यानंतर सहावे दिवशीं पूजा करतात ' यक म्हणती सटवाई।' –दा १३ ८ १२ 'तेवींचि सटवीचिये रातीं। न विसंबिजे जेवीं वाती।' –ज्ञा १८ ८३७ २ (ल) कुत्राळ, दुष्ट स्त्री एक स्त्रियांस उद्देशून वापरावयाचा अपशब्द 'माझ्या पायीं काम म्हणून सटवे ? ' –बाव २ २ ३ (ल) (व) सटवीची बाधा **सटवीचीं अक्षरें, सटवाचें लिहिणें**–नअव ब्रह्मलिखित, सटवीनें मुलाच्या कपाळावर लिहिलेला लेख प्रारब्ध **सटवीपूजन**–पु षष्ठी देवतेचें मुलाच्या सहाव्या दिवशीं करावयाचें पूजन **सटवामदहारी**–पु अर्धवट, बावळट मनुष्य **सटावणी, सटावणें**–सटवणी–णें पहा **सटी**–स्त्री सट पहा षष्ठी देवता ' आणी वाचून जावें सटी।' –दा १० ६ ३४

**सटक**—स्त्री सुताची दोरी –चित्त्याची माहिती २३

**सट-कण-कन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि १ त्वरेनें, एकदम, झटकन, पटकन २ फळांतून बी उडते त्याप्रमाणें आवाज करून [ ध्व ]

**सटकणें**—अक्रि झपाट्यानें बाजूला होणें, चटकन दूर होणें, निसटणें, सुरुवात करून मधूनच नाहींसें होणें, वचनांतून मुक्त होणें [ ध्व सट् ] **सटकपावली**–स्त्री झटकन् निघणें, चालू लागणें, निसटून जाणें (क्रि० करणें)

**सटका**—पु १ झटका, हिसका (क्रि० मारणें, देणें, बसणें) २ जोराचा धक्का, फटका, तडाखा ३ (बडोदें) चित्त्याच्या कवरपट्यास बांधलेली दोरी –चित्त्याची माहिती ३२

**सटकावणें**—सक्रि झटकणें, ठोकणें; खरडपट्टी काढणें

**सटक्याबटक्या**—वि क्षुल्लक, फडतूस (मनुष्य), असातसा, कोणी तरी ' अग हा सटक्या बटक्या लटक्याच गोष्टी करी। भात भुजाया खापर मिळेना पहा तयाच्या घरीं।' –पला ११ २५

**सटणें**—उक्रि मावणें, साठणें, साठविणें, आवरणें 'एकोनि रमेच्या वचना। हर्ष न सटे शक्रमना' –सुरुघ १ ' देहबुद्धीची अगळा। स्वरूपीं न सटे। ' –अमृ ८ ४

**सटपट, सटफट**—स्त्री जळफळाट, जोराची शिव्याबाजी, खरडपट्टी **सटपट-टां, सटफट-टां**–क्रिवि झटपट, जलदीनें, लवकर, गडबडीनें (क्रि० करणें, बोलणें) [ध्व–सट+फट]

**सटपट्या-फट्या**—वि जोरजोरानें, मोठमोठ्यानें तावातावानें शिवीगाळ करणारा

**सटवट**—स्त्री (व) खटपट, व्यापार, उद्योग 'कहीं तरी सटवट चालू असते ' [ ध्व ]

**सटर**—न घोटा (इ) शाङ्ग

**सटरफटर**—न विरंगोळ; बारिकसारिक, राहिलें साहिलेलें लहान जिन्नस वस्तु सामान

**सटल-ळी**—स्त्री १ सटकणें, झुकांडी, झटकन निघून जाणें, वचन किंवा करारातून निसटणें (क्रि० खाणें) २ सत्यापासून ढळणें, थापा, बाता, गप्पा (क्रि० मारणें, झोकणें) ३ (व) हयगय 'जरा सटली केली कीं काम बिघडलें ' **सटलीत्या**–वि १ निसटणारा, झटकणारा २ सत्यापासून ढळणारा, थापाड्या

**सटसट-टां, सटाटां सटासट**—क्रिवि १ झटपट, जलदीनें. २ पावसाच्या वगैरे आवाजासारखा आवाज करून [ ध्व ]

**सटसटीत**—वि फळफळीत, रक्ष, फडफडीत, टणक, कडक (भात, डाळ वगैरे)

**सटा**—स्त्री केसाचे सड, जटा, घोड्याची आयाळ 'नृसिंहाच्या दीर्घा पिंवळट सटा पिंगट विशा '—नृहरिदर्पण 'वर्णाया योग्य कशा होती जयाच्या सटा सुराभ्रांम कशा ।'—मोकृष्ण ३७ २

**सटारणा, सटारा**—वि अवाढव्य, अचाट, भव्य, प्रचंड, विशाल, मोठा

**सटाळणें**—अक्रि निसटणें, झटकणें

**सटाळी-ल्या**—सटली-ल्या पहा

**सटी**—स्त्री सट, सटवी पहा 'ब्रह्मा लिहितो अक्षरीं । आणि वाचून जाते सटी ।'—दा १० ६ ३४

**सटीक**—वि व्याख्येसहित, टीका, भाष्य, व्याख्या, विवरण जोडलेलें [स+टीका]

**सटीप**—वि टीपा जोडलेलें

**सटीसामाशीं**—क्रिवि १ कधीं तरी, केव्हां तरी २ प्रसंगानें, क्वचित् प्रसंगीं [स षष्ट+षण्मास]

**सटीसावत्र**—न मत्सर, हेवा, द्वेष (विशेषत स्त्रियांचा) [सटी+सापत्न]

**सटेगोपाळ**—पु लबाड, धूर्त, फसव्या, केव्हांहि हातावर तुरी देऊन निसटून जाणारा [सं शठ+गोपाळ] **सटेगोपाळी**—स्त्री लबाडी, दगलबाजी, फसवणूक

**सटेल**—न (विणकाम) धोटा (इ) शटल

**सटोल**—वि अडमुठ्या, आडदांड [शठ]

**सट्टक**—स्त्री (व) खरडपट्टी, तासडपट्टी [सटकणी]

**सट्टक**—पु एक नाटिकेचा प्रकार 'जो नाटिका समानचि सट्टक बहुधा तयास बुध म्हणती ।'—कर्पूरमंजरी १५

**सट्टल-ली**—स्त्री सटल पहा

**सट्टा**—पु १ सौदा, व्यवहार, विनिमय २ जोखमीचा व्यापार, व्यवहार, पुढें मालाची किंमत चढेल किंवा उतरेल याचा अदाज बांधून आगाऊ केलेला व्यवहार ३ मक्ता, कराट, ठेका. [वेप्रा सट्ट=विनिमय, हिं सट्टा] **सट्टावट्टा**—पु व्यापारी व्यवहार, देवघेव विनिमय, अदलाबदल, सराफी **सट्टेबाजी**—स्त्री. सट्टा करण्याचा नाद, खोड, व्यसन **सट्टी**—स्त्री. (व.) वशिला, शिफारस, संधान 'त्यानें कोणीकडून सट्टी लावली कळलें नाहीं पण नोकरी मात्र झामदार पटकावली'

**सट्टूवट्टू**—पुअव (तिरस्कारार्थी) स्नेहीमंडळ, स्नेही सोबती, मित्र [स वेट्टु द्वि]

**सट्या**—पु (ना) सडा, नि सग

**सट्यागट्या**—पु (ना) चीजवस्त, पसारा 'त्यानें सट्यागट्या गुंडाळला व पळून गेला.'

**सठ**—स्त्री. सट पहा [स. षष्ठी] **सठवणें, सठावणें, सठळणें, सठवाई, सठवी, सठधीपूजन**-सटवणें, सटवाई वगैरे पहा

**सठवा**—पु (गु) साठ दिवसांत तयार होणारा, गुजराथमधील एक ज्वारीचा प्रकार —केसरी १२ १० ३६

**सठी**—स्त्री सट पहा **सठीसामाशीं**-सटीसामाशी पहा

**सठी**—स्त्री कचोरा

**सड**—पु १ धस, ठोंब, बुंध, ज्वारी वगैरे कापल्यानतर शेतात राहणारा बुडखा, खुटारा, धसाडी, शल्य २ (ल) (अश्लील) जननेंद्रिय, (बैल किंवा रेडा यांचें) लिंग ३ (ल) आचळ, स्तन, आसड, थान ४ (डुकराचा किंवा इतर प्राण्याचा) राठ केस **सड आवळणें**—शेळीचे स्तन कोकरान दूध पिऊ नये म्हणून बांधून ठेवणें

**सड**—स्त्री १ पद्धत, तऱ्हा, वहिवाट, रूढ गोष्ट (क्रि॰ येणें, चालत येणें, चालणें, पडणें) 'ही सड कारकुनानीं मुसलमान अंमलदारापासुन घेतली आहे'—विवि १८९६ ८ १४८ २ साक्षीदाराची तोंडी अगर लेखी जबानी, पुरावा, दस्तऐवज, कागदपत्र, जुना पुरावा 'कसबे पैठण येथील सड आली'—चाहसमारो ९ ३२५ ८३ (कु) खोवण, खाच, खचरा, कातरा, खाप [फा]

**सड**—स्त्री तांदुळ काढण्याची क्रिया [सडणें]

**सड**—वि सडा, बोजा नसलेला 'माऊचे घोडे सडवेधड गारदी पुढें बिनी धरती ।'—ऐपो १८४

**सडक**—स्त्री १ रस्ता, तयार केलेला रस्ता २ दोर, लांब व जाड दोर (गाडीवर ओझें वगैरे बांधण्याचा); मोजण्याचा, पाणी शेंदण्याचा लांब दोर, सखलादीची पट्टी. ३ जुगदान, बटवा, वगैरेस लावलेली दोरी ४ रेशमी गोफ, रेशमी गोंड्यासकट दोरी (तरवार, खजीर वगैरेस लावलेली, पागोट्याची शिरींद) चवरी 'ढळतु फारे पताका । मिळतु चवरें सडका ।'—शिशु १०१७ 'कडावतुच्या सडका'—पुरवणी ऐरापुप्र ९ ५०५ ५ लांब व सरळ तरवार, 'चाळीस हजार सडक करनाटकची चमकली ।'—ऐपो १०७ 'सडका पाश भिंडिमाळा थोर । घेऊन पुढें धांवती ।'—ह २२ ३१. ६ (ल) उंच, सडपातळ मनुष्य ७ पदराच्या दशा 'घोसाळपणें झळकती । चालव सडका ।'—ज्ञा १९ ८ केसाच्या जटा, बटा, केसांची वेणी 'धन नाहीं करीं सडका । जरेनें कच होतील सडका ।'—राला ११५ ९९ 'सडकेला कलगीवर जडल्या तारा ।'—होना ८१ ११९.—वि १ सरळ, थेट, सीधा (रस्ता, पवित, रांग, ओळ) २ राठ, उभा (मनुष्य, झाड,

स्तम्भ) ३ धोपट, उघडउघड, स्पष्ट, खणखणीत, रास्त ( उत्तर आरोप, शिवी वगैरे ) ४-क्रिविवि बेधडक, एकदम, धडाक्यानें, बेपर्वाईनें, सुद्दाम, धूम, (पिणें, सेवन करणें, जुगार खेळणें वगैरे व्यसनासारख्या गोष्टी करणें ) [ स सरल=सरळ ] म्ह० त्याला भाई सुरमा आणि दोटजी सडक **साती सडका**-सर्व जरूर त्या गोष्टी, सर्व गोष्टी ' साती सडका मक्ता केला ' **सडकपातळ**-वि सडपातळ, सडसडीत

**सडकणी**—स्त्री जोरजोरानें चोप देणें, मारणें, दणकावणी, धपकावणी, घाव घालणें, कुटणें ( धान्य वगैरे ) [ सडकणें ]

**सडकणें**—उक्रि १ गारा, पावसाचे मोठे थेंब, खडे वगैरेंनीं मारणें २ दोरी, छडी वगैरेंनीं ताडण करणें ३ लाथ, दुगाणी वगैरे झाडणें ४ लाकूड, दगड वगैरे साफ न करता सुमाराचा आकार येईल असें कुऱ्हाड किंवा सुतकी वगैरेंनीं सरासरी तासणें ५ धुवावयाचें वस्त्र दगडावर जोरजोरानें आपटणें ६ मळ, कीट निघून जावें म्हणून धातूचा तुकडा ऐरणीवर घणानें जोरानें ठोकणें ७ सरासरी बारीक अंश वेगळा होईल असें मोठ्यानें पाखडणें, उभळणें सामान्यत कोणतीहि गोष्ट सरासरी घाईघाईनें जोर जोरानें, निष्काळजीपणानें करणें [ ध्व ? ]

**सडकणें**—अक्रि निसटणें, पळ काढणें, पळून जाणें, माहीतसे होणें सटकणें पहा

**सडका**—पु (पावसाच्या मोठ्या सरीचा होणारा ) सड्सड् असा आवाज [ ध्व ]

**सडका**—वि नासका, कुजका, सडलेला, बिघडलेला [सडणें] **सडका पाय**-पु सडलेला, विघडलेला पाय ज्यामुळें सर्व पदार्थ नासण्याचा, बिघडण्याचा संभव असतो असा वेगळा काढलेला त्याचा सडलेला, बिघडलेला भाग ( क्रि० ठेवणें, राखणें, राहाणें, तोडणें, काढणें, कापून टाकणें ) **सडका बोंबील**-सडेल बोंबील पहा

**सडकाशी**—स्त्री जमीनीच्या मशागतीचा एक प्रकार —केसरी ४ १२ ३६ [ सड+काशी, काशा ? ]

**सडकीव**—वि अर्धवट, साधारण सरासरी घडलेला ( दगड, दगडकाम, लाकूड, लाकूडकाम ) ' कमानीचे दर्शनी दगड सडकीव असाव ' —मेरट ८१४ **सडकीव जोतें**-न टाकी न लाविलेल्या, माटीव नसलेल्या दगडाचें जोतें

**सडकून**—क्रिवि रगडून, सपाटून, अतिशय, पुष्कळ हें अव्यय क्रियापदाबरोबर जोर, तीव्रता, आवेश, अतिशयता, वगैरे दाखविण्याकरिता जोडतात याच अर्थी कचकावून, कचकून, खसाटून, दपटून, रपाटून वगैरे अव्ययेंहि जोडण्याचा प्रघात आहे [ सडकणें ]

**सडकोळा**—वि ( राजा कों ) काटकोळा, रोडका, कृश सको ७ ११

**सडगर**—पु ( कर ) कष्ट, श्रम, त्रास ' किती करावेत तुझे सडगर ? '

**सडगल**—स्त्री नवे लावणीची पानवेल

**सडगळ**—वि पु ( व ) मोठाधाटा

**सडगा**—पु सोटा, टोणपा, सोडगा, काठी [ सोटगा अल्पार्थी ]

**सडगाण**—स्त्री ( ना ) सडा ' आवराईत कालच्या वादळानें आंब्याची सडगाण पडली होती ' [ सडघाण ? ]

**सडघाण**—स्त्री सडलेली, नासकी, कुजकी स्थिति ( अन्न, फळें, वस्तू वगैरेंची ) [ सडणें+घाण ]

**सडण**—न १ कांडण, कुटणें, मुसळानें घाव घालणें २ कांडण्यासाठीं, घाव घालण्यासाठीं घेतलेलें धान्य ( तांदूळ, डाळ, वऱ्या इ० ) [ सडणें ] **सडणावळ**-स्त्री सडण्याची, कांडण्याची मजूरी, मोल **सडणी**-स्त्री कांडण, कुटण्याची क्रिया **सडणें**-उक्रि धान्यावरील तुस, फोलकट कोंडा वगैरे काढून टाकण्यासाठीं, कांडणें, कुटणें, मुसळ वगैरेनें घाव घालणें [ स सद् ]

**सडणें**—अक्रि कुजणें, नासणें, बिघडणें, खराब होणें [ स. शद्; प्रा सड, हिं गु सडना ]

**सडणें**—सक्रि सोडणें, टाकणें, त्याग करणें ' अद्यापि वेधली पृथ्वी । न सडी गधु हे ।' —ऋ २२ ' परी नेणिवेतें नसडिसी ।' —ज्ञा २ १० ३० [ साडणें ]

**सडताळा**—पु दोर, काढणी, सडक —चित्त्याची माहीती २२

**सडधोपट**—क्रिवि ( विरू ) सरधोपट पहा

**सडपडणें**—अक्रि ( व ) लुब्ध होणें —वक्षाप ८ ५१ २४५

**सडपातळ, सडंबला**—वि किरकोळ अंगाचा, काटकोळा, रोडका, कृश

**सडमिसळ**—वि ( विरू ) सरमिसळ पहा

**सडशिंग**—पु सडा मनुष्य, फटिंग, सडेसोट, अविवाहित मनुष्याबद्दल विनोदानें योजतात

**सडसड-डा**—क्रिवि पावसाच्या आवाजाप्रमाणें आवाज करून ( छडी वगैरेंनीं मारणें, झोडणें ) [ ध्व ]

**सडसडणें**—अक्रि सडसड आवाज करून पडणें, तडतडा मारणें झोडणें [ ध्व ]

**सडसडीत**—वि १ फडफडीत, रुक्ष, मोकळा व फळफळीत ( भात वगैरे ) २ उंच व सडपातळ, अंगासरसा व पीळदार ( मनुष्य ), सरळ व न विस्तारलेला म्हणून दिसावयास चांगला ( वृक्ष ),

**सडसाक्ष-क्षी**—स्त्री लेखी किंवा तोंडी पुरावा, दस्तऐवज, दाखले, प्रतिज्ञालेख, जबान्या, वगैरेस व्यापक संज्ञा सड पहा [ सड+साक्षी ]

**सडा**—पु १ शेणमाती, रंग वगैरेचा दाट वर्षाव (क्रि० घालणें, टाकणें, देणें, शिंपणें) 'घोसाळा कांकणाचा हातीं। नारी सडे घालीताती।'—शिशु ५९० 'सदा सेंड समार्जनें। घरीं तुळशीचीं वृंदावनें।'—कथा २ ४ १२२ 'वदनि सडा समार्जन गोपी कुंभ घेउनि कुशी'—घनश्यामाची भूपाळी २ (ल) पसरण, विसरण उधळणी (फुलें, पानें, रुपये, नाणीं वगैरेची—देवतेवर, माणसाच्या गर्दीत वगैरे) 'जा प्रय हातीं घ्यावा त्याच्या पृष्ठी पृष्ठीं हा सडा सांपडेल'—नि १९२ 'दिव्य सुमनाचा सडा तो विराजे चहूंकडा।'—भारा बाल ११ २९१ 'होता सडा फुलांचा पडला।'—निकु १०० ३ शेणसडा. **सडासंमार्जन, सडा सारवण**—न केर काढणें, सडा टाकणें वगैरे, झाडसारव, झाड-लोट; सकाळचें गुदीच काम

**सडा**—पु डोंगरपठार डोंगरसपाटी, डोंगराच्या माथ्या वरील सपाट जमीन 'तालुकियांत सडा आहे त्ये जागा वाहेरून माती आणून ...'—वाडसमारो ६ २४६ 'सडे पगारीं राहिले स्वस्थ।'—दावि ६२ ३५

**सडा**—पु नाडा, रस्सी; वळलेली सुताची दोरी, सुनळी 'मी वावडी तू एक सडा नको मारू आढा'—सला २ 'वावडीला जसा सडा मागें खेंचीत असतो'—सास २ ४१८. **सडघा**-पु (कों) पाणी काढण्याची दोरी

**सडा**—वि एकटा, मोकळा, वेगळा; स्वतंत्र कांहीं एक मागें व्याद नसलेला; फटिंग रिकामा, कामांत न गुंतलेला, उपयोगात नसलेला, ओझें नसलेला, भाड्यानें न दिलेला (गाडा, जनावर वगैरे) 'आत कानडा लोक फाकडा, शिपाई सडे तलवार'—ऐपो १८३ ०**कारभार**-पु मोकळा, सरळ, उघड व्यवहार, विन घोटाळ्याचा व्यवसाय धंदा, धोपट मार्गी काम, देवघेव, व्यवहार वगैरे ०**धस**-वि पु १ धसक्नदन, धसकटराव, एकदम पुढें घुसणारा, अविचारी, उतावीळ (मनुष्य) २ सडा फटिंग सडेसोट आगापिछा नसलेला, मागें कोणताहि व्याप, घरवद नसलेला (मनुष्य) ०**फटिंग**-पु बायकापोरें, लागाबाधा, इ० कांहींएक व्याप पाश नसलेल्या मनुष्यास विनोदानें म्हणतात ०**फोक** वि सरळ व तरतरित सडपातळ व देखणा अंगा सरसा व नीटस (मनुष्य) ०**मफलीस** वि अविवाहित एकटा व गरीबीतील मनुष्य काबाडकष्ट करून एकटा राहणारा [सडा+अर मफ्लीस-गरीब] ०**साटा-साट्टा साठ-सोट**-वि १ निःसंग बायकापोरें नसलेला एकटा २ फांद्या नसलेला (वृक्ष) **सडी** स्त्री १ एकटी 'मोठे श्रीमत बाईसाहेब सडी पाहिली।'—ऐपो ११५ **सडी आयती**-स्त्री निःसंगपणा, संगराहित्य 'ऐसा शरिरास संभोगाचिये राती। माजीं धावता सडिया आयती। तव कर्मक्षयाची पाहाती। पाहांट जाली।'—ज्ञा ७ १३० **सडी फौज**-स्त्री तोफखाना बुणगें वगैरे रस्टावर बरोबर नसलेली, लढाईच्या तयारीनें निघालेली फौज, हलकीं हत्यारें घेऊन जाणारी फौज **सडी बायको**-स्त्री मूल नसलेली स्त्री, अंगा वरील मूल नसलेली स्त्री **सडीसाट-साट-साट**-स्त्री १ मूल नसलेली स्त्री, वांझ स्त्री 'सडीसाट नयन किती थाट पडाति पन दाट अजुनि तरि हाट धरुनि शिपबदल'—राग ६७ ५७ २ एकटी स्त्री, जिला कोणी नातवाईक नाहीं अशी स्त्री **सडीसाक्ष-क्षी**-स्त्री मुखजबानीचा पुरावा सडसाक्ष पहा 'बायाकडे घालविल्यास सडीसाक्ष पडणार नाहीं'—वाडबावा २ ३६ **सडीस्वारी-सडेस्वारी**-स्त्री बरोबर लवाजमा न घेतां निघालेली स्वारी 'केलें सैन्य तयार सडीस्वारी सगें घेऊन।'—ऐपो ४४५ 'फौजेत केली ताकीद सडेस्वारीला।'—ऐपो २८३ **सडेलडधु सडे साठ-ट**-वि सडागोट फटिंग, अविवाहित, स्त्रीपुत्रादि परिवार नसलेला **सडेसोट**-पु सडासाट एकटा, फटिंग **सडेसोटपणा**-पु वसुर्वतखोरपणा; रोखठोकपणा **सडेहुपट-हुप्या**-पु १ ज्यांत मादी व पिलें नसतात अशा वानराच्या टोळीचा मुख्य नायक २ अविवाहित मंडळींतला, ब्रह्मचारी

**सडा**—वि उंच व बळकट धिप्पाड, दांडगा

**सडाई**—स्त्री सडणावळ, फाडणावळ

**सडाका**—पु. सडसड आवाज होई असा दोरी वगैरेचा फटकारा, पाऊस वगैरेचा वर्षाव तडाका, ठिकाव [ध्व]

**सडाडा सडसड-डा**—क्रिवि सडसड असा आवाज करून (पाऊस, छडी, चाबूक याच्याप्रमाणें) [ध्व]

**सडास**—पु पायखाना शौचकूप, शतखाना [हि स]

**सडिव**—वि सडिक, काढलेलें, कुटलेलें 'नानापरीच्या आवडी। सडिवा सोलिवा परवडी।'—एभा २५ ३७४

**सडिवा**—पु विकार, रोग, सडी पहा 'विषयाचे या पासा रवा। सवें लाग शृंगाराचा सडिवा।'—भाए १८० [सडणें]

**सडी**—स्त्री १ मनुष्य व पशू यास होणारा एक रोग, क्षय २ जखमेवर माशा बसून टाकतात तो पांढरा निर्यास, असडी [सडणें]

**सडी**—स्त्री धन्नूचें कुसळ धसडी खुर सड पहा

**सडी**—स्त्री पुराव्याकरिता घेतलेली लेखी किंवा तोंडी जबानी सड पहा प्रथम्रोंकारें सडया लिहून घ्याव्या'—वाडसमारो ७ २०४ ०**पत्र**-न दाखला साक्षीपत्र 'दाखला लेहून आणलें तें सडीपत्र'—भाअ १८३४

**सडी**—स्त्री (कों) (खडसा व दमणी यात बसविलेलें) इसाड घट्ट राहण्याकरितां इसाडा बरोबर खालच्या बाजूनें मारलेली खुंटी

**सडीक**—वि १ कांडलेले सडलेले (तांदूळ डाळ वगैरे) २ गोवारीची जात —कृषि ६१४ कांडलेल्या बियापासून उत्पन्न

झालेल्या गोवारीच्या शेंगा (या लवकर शिजतात) ३ सालासुद्धा शिजणारी (वाल्पापडी, मेहदळ वगैरेची शेंग) ४ भीड, मुरवत ठेवण्या करिता पडदा ठवून, संकेतानें बोलावें तसें न करता स्पष्ट, शिवी, उत्तर, प्रत्युत्तर वगैरे करून

**सडीव**—वि सडीक अर्थ १ पहा.

**सडेतोड**—वि १ जियल्यातियें, तावडतोब, तडकाफडकी निकाल देण्यासारखा, फटकळ, कामाचा उरक असणारा २ निराळा, एकटा, सुटा, नि सग, नि स्पृह [ सडा+तोडणें ]

**सडेमुंडली**—स्त्री एक औषधी मुळी, कद

**सडेल**—वि सडलेलें, कुजलेलें, नासकें, कुजकें ०**चोंबील**–पु अत्यंत कृश, कुरुप (मनुष्य) ०**भात**–पु १ विघडलेली, पुवळलेली जखम २ रक्तपित्तामुळें विघडलेला मासल भाग ३ (ल) घाणेरडा, ओंगळ मनुष्य ०**मदार**–पु सडेल चोंबील पहा

**सडोळ**—वि डोळस ' ते तेथींचें सडोळपण। ' -गीता २ ६६०. [ स+डोळा ]

**सडया**—वि १ क्षीण होत जाणारा, क्षयी, झिजत जाणारा २ खपल्या पडणारी (जखम, क्षत) [ सडणें ]

**सडथा**—पु (सुतार) किंकोरें, विझणें, सुताराचें एक हत्यार [ सडा ]

**सढळ**—वि उदार, अघळपघळ, घळमळीत, सैल, मोकळा-चाकळा ' बोलुनचालुन हाताचा सढळ ' [ स शिथिल, प्रा. सिढिल, हिं ढिला स श्रद्धावत्-सड्डाल-सढाल-भाभ १८३२ ]

**संढाल**—पु सरकारी सारा, दड वगैरे कोणताहि बोजा योग्य प्रमाणात नसुन दर्णे अवश्य अशा वेळीं लोकानीं तो आप सात प्रमाणशीर वाटून घेऊन तयार केलेलें खाजगी पत्रक

**सढील**—वि शिथिल, सईल, ढिलें ' सेनास्त्रियेचें धैर्यवस्त्र। सढील झालें झगडता। -मुआदि २३ १४१ [ स शिथिल ]

**सण**—पु १ उत्सवप्रसग उत्सवदिवस, आनदाचा दिवस २ उत्सवप्रसगीं केलेली चैन, मौज, जेवणावळ वगैरे. ' रीण काढून सण करणें ३ सणाच्या दिवशीं विशेषत दसरा, दिवाळी वगैरे प्रसगीं आश्रिताना वाढून द्यावयाचें जेवण, शिधा वगैरे ४ विवाहोत्तर जावई वगैरेस किंवा इतर नातेवाईकास दिवाळी, शिमगा वगैरे प्रसगीं द्यावयाच्या मेजवान्या भेटी, देणग्या, पोषाख वगैरे [ स क्षण ] ०**करी**–पु कारू, बलुतेदार, आश्रित वगैरे सणाच्या दिवशीं ज्यास वाढणें शिधा वगैरे द्यावयाचा असतो ते ०**वई**–स्त्री सणाच्या दिवशीं शेतक याकडून वलुतेदारास मिळावयाचें धान्य (क्रि० देणें, मागणें, घालणें) ०**वार**–पु १ सणाचा दिवस २ सणाच्या दिवशीं वधूवराकडे परस्पर पाठवावयाचे अहेर, देणग्यावगैरे (क्रि० करणें, देणें) ०**सुदी-सुदीस-सूद**–स्त्रीपुपु सणवार, सणाचा दिवस **सणु-नू**–पु सण, उत्सव

**सण**—पु ताग ' भक्षितो सण कमा कडवा हो। ' -किंगवि २२ [ सं शण ] ०**काडी-कांडी**–स्त्री १ तागावरील साल काढून घेतल्यावर राहणारी काडी २ अयाडी भेंडी यावरील दोर काढून घेतल्यावर राहणारी काडी ३ (ल) आगकाडी **सणाकी**–स्त्री (गो) तागाची वस्तु

**सणई**—स्त्री एक अलगुजासारखें पोकळ नळीचें केलेलें वाद्य

**सणक**—स्त्री कळ, वेदना, तिडीक शिणीक पहा (क्रि० निघणें, उठणें, चालणें) [ध्व सण] **सणका**–पु १ चमक, वेदना, तिडीक, ठणका चमक पहा (क्रि० निघणें, उठणें, चालणें) २ गोळी बाण वगैरेचा शिळीसारखा आवाज [ ध्व ]

**सणक**—स्त्री (ना) लहर, हुक्की. **सणकी**–वि लहरी

**सण-कण-कन-कर-दिर्नी-दिशीं**—क्रिवि वेगानें जाणारी बदुकीची गोळी, बाण, छडी किंवा चाबकाचा मार, दु खाचा वेग, तिडीक कळ वगैरेचा उद्रेक याच्या प्रमाणें आवाज करून [ ध्व ] **सणकणें**–अक्रि. सणकन् आवाज करून जाणें, शीळ घालणें, गाणें, तिडीक निघणें [ ध्व ]

**सणकी**—स्त्री (माण) चारी पाय पाढरी असलेली मेंढी.

**सणग, सणंग सनग**—न विणलेलें वस्त्र, वस्त्राचा तागा, नग, उंची वस्त्र ' हें गीतारूपी सणग अव्वलपासुन अखेरीपर्यंत अत्यत योगयुक्त चित्तानें सलग विणलेलें आहे ' -गीर ४६२. [ नग ] **सणगावर**–क्रिवि मुद्देमालासह ' सणगावरी मुकुदा। धरूनि एकदा आणावे। ' -ह ८ १६१

**सणगर**—पु घोंगड्या विणणारी एक विणकर जात [ सं शण+कृ ]

**सणगारणें**—सक्रि (कुण अप) शृंगारणें. ' वधूला सणगारतात ' -मसाप ४ २५५

**सणण-सणणणा**—क्रिवि बाण, बंदुकीची गोळी, शीळ, गाणें, वगैरेच्या आवाजासारखा आवाज करीत [ ध्व ]

**सणतिवार**—पु सणाचा, उत्सवाचा, आनंदाचा दिवस. [ सण+तिथिवार ]

**सणव**—पु (गो) सण, ताग [ स शण ]

**सणविया**—स्त्री अव (गो) अळशी, जवस ' सणीबियाची पापा ' अळशीचें पोटीस

**सणसण-णां**—क्रिवि सणकन-कर वगैरे पहा

**सणसण**—स्त्री गाणें, शीळ घालणें, बाण जाणें, गोळी जाणें वगैरेचा आवाज **सणसणणें**–अक्रि १ सणसण असा आवाज करणें २ हातास वगैरे झिणझिण्या, स्फुरण येणें (कठिण पदार्थावर आघात करताना, टोला मारताना) [ ध्व ]

**सणसणाट**–पु सणसण असा अतिशय आवाज, सणकारा, झणकारा **सणसणीत**–वि १ सणसण आवाज होईतर्के ताप लेलें, उकळतें (पाणी, दूध, तेल वगैरे) २ झणझणीत, अति शय तिखट (भाजी, पदार्थ) ३ घट्ट, दाट; भक्कम, दणगट, पीळदार (कापडाची वीण, बांधलेला गट्ठा, दोरा, मनुष्य, जना वर वगैरे) ढिलें, सैल, गबाळ नव्हे असें ४ स्पष्ट, खडखडीत, साफ, सडेतोड, खणखणीत (नकार उत्तर, जबाब, भाषण, जावमाल वगैरे) ५ खडखडीत, चुरचुरीत (वाळलेलें वस्त्र वगैरे) ६ खणखणीत, स्पष्ट आवाज करणारें, चोख (नाणें, भांडें वगैरे) **सणसर**–वि १ कणखर, मजबूत, भक्कम; ताठ, पीळदार (दोरा, वस्त्र, मनुष्य, जनावर, गट्ठा, ओझें वगैरे) 'त्याचा प्रत्येक अवयव सणसर होता'–वज्राघात १०८ २ खडखडीत, स्पष्ट, सडेतोड, साफ (भाषण उत्तर वगैरे) ३ जोरदार, भरींव, सुब लक (पाऊस, पीक वगैरे) **सणसरून**-क्रिवि (माण) सड कून **सणाटा** पु सनाटा पहा **सणाण**-पु बाण, बंदुकीची गोळी, गाणें, शीळ वगैरेचा सीत्कार, आवाज **सणाणणें**–अक्रि सणसण आवाज करणें **सणाणा, सणाणें**–वि तीक्ष्ण, तीव्र, 'काट देखोनि सणाणे।'–ज्ञा ७ १७२ 'शस्त्र केलें जो सणाणें।' –एभा १२ ५८६ 'नखें देखोनि सणाणीं'–मुआदि ६ ३७ **सणासणी**–स्त्री शस्त्रांची खणाखणी; बाण, गोळ्या वगैरेंचा भडिमार 'मारामारी, हणाहणी, सणासणी झाली तों अताजी पतास सहेनासें जालें'–भाव ३३ **सण्णाटणें**–अक्रि (ना) १ ताप चढणें २ चोपणें

**सणी**—स्त्री १ ढबू पैसा, दोन पैसे, पैशाची दुकल सहा रुक्याचें नाणें 'भणाण सारा दणाण जाला कणा पावती सणी।' –ऐपो ३७० २ जमीन मोजणीचें एक माप-सहा रुके सजगणी पहा

**सत्**—पु साधु पवित्र पुरुष —न १ त्रिकालाबाधित अस्ति रूपी तत्त्व, ब्रह्म —वि १ वास्तविक, यथातथ्य, खरें, यथा-स्थित २ योग्य; रास्त, उत्तम, गुणवान्, खरें, चांगलें; ऋजु; (हा शब्द बहुधा समासात येतो उदा० सत्कर्म, सत्कल्पना, सत्कृत्य, सत्पुरुष, सद्गुण सद्विद्या, सद्वासना, सत्सेवा, सदाचार, सद्गति, सद्गुरु वगैरे) [स] **सत्कर्म**–न चांगलें काम, पुण्यकृत्य **सत्कवन, सत्कविता**–नस्त्री चांगलें काव्य, धार्मिक काव्य, पवित्र गीत **सत्कवि**–पु चांगला कवि सत-कवि; प्रतिभावान कवि **सत्काल**–पु योग्य काल, पुण्यकर्मात घालविलेला काळ **सत्कालक्षेप**–पु पुण्यकृत्यात वेळ घाल विणें, सत्कृत्यात खर्च केलेला वेळ **सत्काव्य**–न चांगलें काव्य, धार्मिक, नीतिपर काव्य, उत्तम प्रतीची कविता **सत्कीर्तन**–न उत्तम पुरुषाचें गुणगान, सज्जनाची स्तुति **सत्कृति**–स्त्री पुण्यकृत्य, चांगलें काम, योग्य काम, धार्मिक कार्य **सत्क्रिय**–वि चांगल्या कृतीचें, वर्तनाचें **सत्क्रिया**–स्त्री १ चांगलें कर्म, चांगली कृति 'हे सत्क्रियाचि आच-रवी।'–ज्ञा ३ २६६ २ आदर सन्मान **सत्ख्याति**–स्त्री ख्याति पहा **सच्चर्चा**–स्त्री धार्मिक बाबींसबंधीं खल, पुण्यकारक वादविवाद, चांगल्या प्रकारचा वाद, खल **सत्तम**–वि सर्वश्रेष्ठ, सर्वोत्तम; सर्वोत्कृष्ट 'शबरास म्हणे नृपसत्तम।' **सत्तीर्थ**–न १ विशेष पुण्यदायक क्षेत्र, यात्रेचें ठिकाण, पुण्य-भूमि २ आदराचें भाव असलेलें ठिकाण, जागा, व्यक्ति **सत्पथ**–पु चांगला, योग्य, सरळ, पुण्यकारक मार्ग, सन्मार्ग **सत्पात्र**–वि योग्य, लायख, कोणतेंहि दान करण्यास, मान देण्यास, सन्मान करण्यास योग्य (मनुष्य) **सत्पात्रीं दान**–न योग्य, पुण्यशील पुरुषास दिलेली देणगी **सत्पाळ**–वि (राजा) कसदार दुधाची; चांगलें लोणी येणारें दूध देणारी (गाय, म्हैस वगैरे) **सत्पुत्र**–पु १ गुणी, कर्तव्यदक्ष मुलगा २ त्रैवर्णिक स्त्रीपासून झालेला मुलगा **सत्पुरुष**–पु पुण्यवान्, उदार, धार्मिक मनुष्य, साधु सत **सत्प्रचीत, प्रचीति**–ती–स्त्री वास्तविक, चांगला अनुभव **सत्प्रिय**–वि १ सत्पुरु षास, साधुसतास, चांगल्या लोकांस आवडणारा २ साधुसता बद्दल, चांगल्या गोष्टींबद्दल, व्यक्तींबद्दल आवड असणारा **सच्छिष्य**–पु निष्ठावान, श्रद्धावान् शिष्य **सत्शूद्र**–पु १ आपल्या धर्माप्रमाणें योग्य तो आचार पाळणारा शूद्र जातीं तील मनुष्य २ गवळी व न्हावी यांचे आचार इतर शूद्रांपेक्षा चांगले असतात म्हणून त्यास म्हणतात **सत्सग-सत्संगति**–पुस्त्री साधुसताशीं, पुण्यवान् पुरुषाशीं, सद्गुणी माणसाशीं सहवास, मैत्री, संबंध वगैरे 'सत्सगति सत्फळदा सुज्ञासि पचे पचे न येरा हं।'–मोवन ८ ७ 'सत्सगें देव सांपडला।' –दा १८ ८ १३

**सत**—न सत्त्व याचें संक्षिप्त रूप सार, सद्गुण, तत्त्व, बल सामर्थ्य, तेज (बाप्र) **सत धेणें, सोडणें, सतास जागणें**–सत्त्व पहा

**सत**—न (राजा) सत्य, देवाशपथ, देवापरचें फूल घेऊन सागणें [सत्य] **सतनागत**–निरुपाय, नाइलाज, दुसरा मार्ग नसणें, काहीं इलाज न चालणें 'नवऱ्याला नवरीवांचून सतना-गत' **सतपत**–स्त्री (व्यापार) साख व पत, चांगला लौकिक, सचोटी व पत, विश्वासूपणा [सत+पत] **सतीपतीचा**–वि नेकीचा, सचोटीचा, विश्वासू **सतीपतीनें**–क्रिवि नेकीनें, सचोटीनें

**सत**—अ साताची पट द्यूतविद्याकरितां योजितात तीन सर्ते एकवीस [स सप्त]

**सत**—पु १ साधु पुण्यपुरुष, सत्पुरुष, सज्जन 'जो जाणेल भगवंत। तया नांव बोलिजे संत।' –दा ६ १ १६ २ सामान्यत धार्मिक आचारविचार पाळणारा सदाचारी मनुष्य; शुद्धाचरणी व्यक्ति –न ३ मन 'सदा संत आनंतरूपी भरावें।' राक १ ११ ३ –वि नित्य, शाश्वत, स्थिर, अक्षय, टिकाऊ, त्रिकालाबाधित 'असत नव्हे तें सत।' –दा१७ २ २ [स सत्]

**सत**—वि स्थिर, शांत, सौम्य, गंभीर, मृदु नरम 'तें असतचि असिजे जगें। मानिजे संत।' –ज्ञा १५ १३३ 'तसेंच सत वायूतल्यापेक्षा बाहेरच्या वायूत पाणी जलद सुकतें।' –मराठी सहावें पुस्तक पृ १६० [सं शांत]

**सत असत संतासंत**—वि बरेवाईट, सत्यमिथ्या, खरें खोटें 'सत असत कर्मे अर्जुनी।' –विपू ६ ३ ऐसेंनि सतासतें। कर्मे प्रवृत्तिमत्व होत।' –ज्ञा १३ ९७५ 'शिष्य पाहिजे सतासत। विचार घेता।' –दा ५ ३ २७ **सतकी**–स्त्री साधुत्व, साधुपणा **संतचार**–पु संताचा आचार, व गणूक, सतपणा 'वेदशास्त्र संतचार कल्पना घेती साधुजन।' –ऐपो ३८९ **सतडा**–पु (तिरस्कारवाचक) सत **संतमंडळी**–स्त्री वारकरी पंथ, विष्णुदास **संतमार्ग**–पु सज्जनाचा आचारक्रम, वागणूक, साधु लोकाची रीत, पद्धति, मार्ग **सतमालिका**–स्त्री गुरुशिष्यपरंपरेनें चालत आलेल्या साधुपुरुषाची परंपरा; सताचा संघ, संतांची वंशावळ **संतसज्जन**–पु अव (व्यापक अर्थानें) साधुपुरुष, सद्गुणी लोक, पुण्यपुरुष, साधुमंडळी **सतावलि**–स्त्री साधुसंताच्या नावाची पद्यमय यादी, साधु संताची नावें असलेलें काव्य [स] **सती**–वि सतासंबंधी, साधुविषयक (रीति, वेष, पोशाख, राहणी वगैरे)

**सतका, सरका, सदका**—पु ओंवाळून टाकलेली वस्तु, कुरवंडी करून टाकलेली वस्तु द्रव्य 'जिवाचा सतका माल व इजतीचा सतका जीव ऐसे आहे' –पद ३ १३५ 'सतका रुपये पाच केला' –पेद १८ ३३ 'कित्येक तयें सतखे करीती।' –सारुह ७ ५५ [अर सदका=अर्पण केलेली वस्तु] **॰मतका**–पु अमावस्येस अनिष्ट निवारणार्थ उडदाची डाळ, पीठ, मीठ तेल मिरच्या वगैरे जिन्नस मागास देतात तें

**सतजय**—पु एखादा मनुष्य शिंकला वगैरे म्हणजे हा वाक्प्रचार वापरतात याचा अर्थ खरें आहे, सत्य आहे, खरें होवो, खरोखर रास्तपणें असा होतो [सत्य+जय किंवा शतायुषी हो चिरंजीव हो असाहि होतो शतजीव सत्यजो असाहि एक याचा पर्याय आहे]

**सतत सतत**—वि नित्याचा नेहमीचा, शाश्वत, कायमचा, टिकाऊ –क्रिवि नेहमीं, नित्य, एकसारखें निरंतर, अखंड 'तयासि सुलभ मी सतत। म्हणऊनि वेदांतीं निश्चित।' –ज्ञा ८ १३९ [स सतत] **सततज्वर**–पु घडउनार होणारा ताप, सारखा मधूनमधून येणारा ताप, विषम **संततज्वर**–पु अंगात सारखा राहणारा ताप, कमिजास्त न होणारा ताप **सततधार**–स्त्री १ एकसारखा चालू राहणारा प्रवाह, पावसाची सारखी झड २ देवावर अखंड अभिषेकाची धार धरतात ती ३ (ल) एकसारखी चालत आलेली रूढी, आचार, कल्पना. **संततस्मरण**–न चिरकालीन स्मृति; कायमची आठवण, नेहमीं वरचेवर होणारी कधीं न बुजणारी आठवण **संतताभ्यास**–पु खंड न पडता चालविलेलें अध्ययन, कायमची सवय

**संतत**—स्त्री अपत्य; वंश, कुल, मुलेंबाळें, परंपरा, गोत्र [स सतति] **॰संपत**–स्त्री अपत्यें व धन, मुलेंबाळें व द्रव्यादि अभिवृद्धि 'आमचे लोक सुधारतील तर संततसंपत याचा विरोध जो आमच्यात वाटतो तो नाहींसा होईल' –नि ६१ [सतति+संपत्ती]

**संतत, सतंत**—वि स्वतंत्र, पृथक् निराळा; अलग 'म्हणोनि शुद्ध ज्ञान त सतत।' –दा ५ ६ ९ 'कोणी सुना कोणी लेंकी। कोणी एकी सतता।' –तुगा १५१ [स स्वतंत्र]

**संतति-ती**—स्त्री १ अपत्यें, पुत्रपौत्रादि विस्तार, वंश; मुलेंबाळें 'का वासेची सतती। वानणें जैसी।' –ज्ञा १५ ८० २ (ल) परंपरा; विस्तार, माळ, रांग, ओळ 'मग कोरडियेचि आशेची सतती। वाढऊ वाढऊ होती। कोरा क्रिडे।' –ज्ञा १६ ३३८ [व सम्+तन्]

**सततीस**—वि सदतीस, तीस व सात ही संख्या [स सप्तत्रिंशत्] **सततिसावें**–न (साक) छत्तीस तत्त्वापलीकडील ब्रह्म 'छत्तीस सततिसावें। चोविसा पचविसावें। तिन्ही गुरोनि स्वभावें। चतुर्थ जें।' –ज्ञा १४ २२४

**संतप्त**—धावि १ अतिशय तापविलेलें, उष्ण केलेलें २ (ल) संताप आलेला, अतिशय रागावलेला, त्रासलेला जळफळणारा, क्षुब्ध ३ अतिशय पीडलेला, त्रासलेला, गांजलेला, दु खी, कष्टी, शोकग्रस्त 'पैं हरूनि कफवात। जैं देहीं आटोप पित्त। तें करी संतप्त। देह जेवीं।' –ज्ञा १४ १९६ [स सम्+तप्] **संतप्त सोनें**–वि तापलेलें सोनें लाल व सुंदर दिसतें म्हणून त्याची गौर, सतेज अंगकांतीला नेहमीं उपमा देतात 'संतप्त सोनें जसी। जोतिदाची सीता।'

**सतफळ**—न (कु) समुद्रफळ (लहान मुलाच्या बाळकडूत वापरतात)

**सतम**—पुन १ कहर, जुलूम, धुमाकूळ, धागडधिंगा, जबरदस्ती, धडपड 'शिपाई दिवाणासारखा दिसतो पण वाघावर सतम केलें' –ऐस्फुलें २४ 'बाहेर पडण्यासाठीं सतम केला' २ रेलचेल, लयलूट, पराकाष्ठा, अनर्थ, अतिरेक [फा सितम्]

**सतमी**—स्त्री १ गलबतावरील मालाची नोंद केलेला अधि कान्याचा दाखला, परवाना 'सतमी न दाखवील तर ते जिन्नस धारदार व गलबत जप्त होईल'—न्यायाधिसंग्र २३७ २ जाहिर नामा, पत्रक [फा ?]

**सतरंग, सतरंज**—पु बुद्धिबळाचा खेळ 'गंजीफा सत रंज चोपट नव ते नरेंही खाग अ।'—सादह २ ४६ [स चतुरंग, फा शतरंज सदरच]

**सतरंजी, सत्रंजी**—स्त्री १ बिछायतीचें जाड, रंगीबेरंगी पट्टेदार कापड २ (मल्लविद्या) एक कुस्तीतील डाव; हरणफास, जोडी दाराच्या शिरीवरून आपला एक पाय घालून दुसरा त्याच्या मानेवरून आणून दोन्ही पायांस तिढा देऊन त्यास चीत करणें [फा शत्रंजी]

**सतरा**—वि दहा अधिक सात ही संख्या १७ [स सप्तदश प्रा सत्तरह, हिं सत्रह; प सतारां; सिं सत्रहं गु सत्तर उरिगत्तर, ब सेतेर] **सतरा पंधरा गोष्टी सांगणें**–त्रिमगत असंबद्ध, बोलणें धरपकड, भाकड कथा सांगणें **सतरा गुणाचा खंडोबा** अनेक रोग किंवा दुर्गुण असलेला **सतरा जणाच्या डोक्यास पाणी लावून ठेवणें**–(न्हावी हजामत करण्यापूर्वी पाणी लावतो यावरून) अनेकांची खुशामत करणें **सतरा फणगाटे फोडणारा**–अनेक आक्षेप घेणारा, कज्जादखोर. **सतरावा**—स्त्री चंद्रबिंब, ज्या मूळ चंद्रबिंबावर त्याच्या सोळा कला अधिष्ठित होतात ती मूळचंद्राची आकृति, बिंब 'आंवसेचिये दिवसीं। सतरावियें अंशीं।'—अमृ ७ १५३, –ज्ञा १५ २७२

**संतर्पण**—न १ इच्छातृप्ति, समाधान, इच्छितप्राप्ति अन्ना दिक देऊन तृप्त करणें 'ब्राह्मण संतर्पण। स्वस्ति वाचन विधीचें।' —एभा ५ २१ २ एक खाद्य पदार्थ, डाळिंब, द्राक्षें, खजूर, साखरसह पाण्यात कुसकरून भाताच्या लाह्यांचें पीठ व मध घालून करतात —योग ११७३ [स सम्+तृप्] **संतर्पणें**–उक्रि तृप्त करणें; इच्छापूर्ति करणें संतुष्ट करणें **संतर्पित**–वि तुष्ट; तृप्त इच्छापूर्त

**सतल हें**—न धातूचें मोठें भांडें सतल पहा

**सतवटा**—स्त्री खरेपणा; नक्की, प्रामाणिकपणा, सचोटी, इमान [सत्य]

**सतवा**—पु सातूचें पीठ [स सक्तु]

**सतविणें**—सतावणें पहा

**सतशील**—वि सत्यशील प्रामाणिक सद्वर्तनी

**सतसय**—क्रिवि (कों) सारखा, ओळीनें रांगेनें न तुटता अखंड 'या वेशीपासून त्या वेशीपावेतों सतसय घरें लागत गेलीं आहेत'

**सतसल**—वि (विरू) सपसळ पहा

**सतस्मर**—वि सतुगर पहा साठ अधिक सात ही संख्या.

**सता**—पु सती या शब्दाचें पुंलिंगी रूप 'खोटा निघत काय सता पाळणा घेत येनगी प्रेनकळा। तेव्हां तो निजला झोंपू लागला नार उघडून पाहे डोळा।'—पया ८ १७ [सं सत्]

**संता**—स्त्री प्र साथा पहा —नि ८४५

**संताई**—स्त्री एक क्षुद्र देवता 'संताई देवी म्हणे सत महता।'—सप्र ६ २५ [संत+आई]

**सताड**—वि (राजा) ताठ, सरळ, उभें, अगदीं सरळ. –क्रिवि अगदीं, साफ, पूर्णपणें 'दार सताड उघडें टाकलें' [स+ताड]

**संतान**—न १ संतति, मुलेबाळें, लेकरूं; वंशवृद्धि 'नको देऊं देवा पोटीं हें संतान।'—तुगा ११०९ २ उत्पत्ति 'तरी कोणाचें न संतानें। निफजती या उन्मळणें। काय फुटलिया गगनें। जाईजैल गा।'—ज्ञा १५ २२० [स सम्+तन्] **॰काम**–पु पुत्रेच्छा, संततीची इच्छा —वि संततीची इच्छा असणारा **॰गोपाल**–पु पुत्रप्राप्तीकरितां जपावयाच्या एका मंत्राचें नांव **॰धन**–न संततीरूपी द्रव्य, संपत्ति **॰बीज**–न १ वंशाचा मूळ पुरुष २ अनेक वर्षे संततीशिवाय गेल्यावर झालेलें प्रथम अपत्य ३ दत्तक पुत्र ४ वीर्य रेत, **॰मार्ग**–पु १ पुत्रप्राप्तीकरितां योजावयाचा उपाय (देवधर्म, देवतेस प्रद क्षिणा घालणें वगैरे) २ (उप) व्यभिचार, जारकर्म **॰वृद्धि**–स्त्री अपत्यांची वाढ, मुलाबाळांचा परिवार वाढणें कुटुंबाची वाढ **संतानोपचार संतानोपाय**–पु संतानमार्ग पहा

**संतानु**—पु वृक्ष, पसरलेलें झाड 'तूं पांथ तापस छाया घनु। होसि परमार्गिंचा संतानु।'—ऋ ५० [स सम्+तन्]

**संताप संतापाचें झाड**—पुन एक औषधी वनस्पती याचा पाला खोकल्यावर देतात

**संताप**—पु १ अतिशय आग अत्यंत उष्णता, ताप, दाह, (अग्नि ज्वर, क्रोध, तृष्णा, वगैरेमुळें होणारा) 'हें असो संतापु कैसा। चंद्र न स्मरे जैसा।'—ज्ञा ५ ९२ २ क्रोध, राग, द्वेष आवेश ३ त्रास, यातना दुःख शोक मनाची अस्व स्थता; उद्वेग 'सर्वांगा कांटाळा आला। अति संतापु उपनला।' —ज्ञा ११९७ [स सम्+तप्] **॰ज्वर**–पु द्वेष, आवेश, क्रोध मनाचा उद्रेक अस्वस्थता इत्यादिमुळें येणारा ताप **॰दुखणें**–न अतिशय राग द्वेष, मनोविकाराची प्रबलता यामुळें होणारी पीडा व्याधि **संतापणें**–अक्रि १ आग, दाह, होणें रागानें जळणें क्षुब्ध होणें, क्रोधाविष्ट होणें संतप्त होणें, कातावणें २ त्रासणें कंटाळणें अस्वस्थ होणें, दगदग होणें 'पश्चात्तापामुळें राजा। संतापला बहुसाल।'—मुआदि ७ ११९ **संतापन**–न १ संतापयुक्त होणें, आग, दाह होणें,

जळणें २ त्रास, पीडा; क्षुब्धता संतापविणें-उक्रि त्रास देणें, करणें, दु ख देणें, कष्टविणें, क्षोभविणें, राग आणणें ' संतापित-धावि १ त्रासलेला, तापलेला, चावलेला २ कामादि मनोविकारानीं पीडलेला संतापी-वि त्रासिक, चिडखोर, रागीट, तामसी

सतार—वि १ सरळ 'दोहीं भुर्ने सरिसे सतार। जैसे अमृताचे परांकुर।' –ऋ ८० २ उज्ज्वल 'तिक्ष्ण सतार तरळ नएन।' –आद्यमराठी कवयित्री उ २११ [स सत्+तारा]

सतार—स्त्री एक ततवाद्य, तारा ७, तीन तांब्याच्या चार पोलादी, पहिल्या दोन षड्ज स्वरात, पुढील मुख्य तार (कोमल) मध्यमात चवथी पचमात, पांचवी खरज पचमात, सहावी षड्ज स्वरात, सातवी तारसप्तकांतील षड्ज स्वरांत पडदे १८ अगर २४ १८ पडद्याचा चलथाट, २४ पडद्याचा अचल थाट, यांशि वाय तरफेच्या तारा ११ पडद्याखालीं लावतात [फा सितारा= तीन तारांचें वाद्य, यास पूर्वी तीनच तारा असत]

सताल-लें—न पसरट तोंडाचें मोठें भांडें सतेल पहा

संताव-स्त्री (व) बागायती झाडांस फळें येण्याकरिता पाणी बद करून ऊन लाऊ देतात ती क्रिया [सताप]

सताव(वि)णें—उक्रि त्रासविणें, दु ख देणें, पीडा देणें, गाजणें, छळणें, त्रास देणें, चेष्टा करणें, उद्वेग आणणें [सं सम्+त्रस्]

संताविणें—उक्रि शात करणें; स्थिर करणें शातवन करणें, सघ करणें [शात]

सतावें-ळें—न १ सतगिरी, महतगिरी, बुवाबाजी, साधु पणा, ससाराकडे दुर्लक्ष करून सतपणाकडे लक्ष देणें २ साधूचा मेळा, सताचा सघ ३ ऐहिक गोष्टींच्या प्रामाणिकपणाबद्दल विव चन; ससाराच्या क्षणभगुरत्वाबद्दल प्रवचन, व्याख्यान

सतिकें—क्रिवि वास्तविकत, खरें पाहू जाता, खरेपणानें 'म्हणौन ससाररूख सतिकें। बावोचिगा।' –ज्ञा १५ २२३ 'नव्हेचि सतिकें वाचिक।' –अपरोक्षानुभव [स सत्य]

सतिसप्तमी—स्त्री अमुक गोष्ट असताना असा धातुसाधि तानें बोध होतो त्यावेळीं हा भाषाप्रयोग होतो हा प्रयोग सस्कृत भाषेंत विशेष रूढ आहे 'मृतेभर्तरि' [स सति+सप्तमी]

सती—स्त्री १ पतिव्रता, साध्वी, तपस्विनी 'सती आणि सत्पुरुख। दानशील याज्ञिक।' –ज्ञा १६ ४०२ 'सतीला नाहीं बती हत्ती आहे शिदळीच्या वरीं।' –पत्रा १२ २८ २ पति मृत झाला असता त्याच्या प्रेताबरोबर सहगमन करणारी स्त्री ३ पार्वती ४ स्त्री, पत्नी 'पशी नल्मतीच होय दमयती।' –र २ सती जागविणें–सती गेलेल्या स्त्रीच्या चितेवर पहारा करणें सती जाणें–मृतपतीबरोबर सहगमन करणें; सतीचा लाल–पु १ शब्दश पतिव्रतेचा पुत्र २ (ल) सत्पुरुष; पवित्र मनुष्य सतीचा लाल या हिंदी वाक्प्रचारावरून सुचलें सतीचें वाण–न सती जाणाऱ्या स्त्रीनें त्या प्रसगीं दिलेलें वाण यावरून कधीं न मोडतां यणारें वचन, दृढ प्रतिज्ञा, प्राणावर बेतली असताहि न मोडणारा निश्चय 'सतीचें तें घेतां वाण। बहु कठिण परिणामीं।' –तुगा ३४१९ 'लाविला जिव्हारीं बाण, घेऊन सतीवाण प्राण दतें' –प्रला १०८ सतीचें वाण घेणें–उचलणें–स्वीकारणें–अंगीकारणें–वरील प्रमाणें दृढप्रतिज्ञा करणें, एखादी गोष्ट पतकरणें 'वा नि शक सतीचें घेवूनि सनीच हर्षेती वाण' –मोमल्य २ ३५ सतीचें वाण ठेवणें–मांडणें–वरील प्रमाणें प्रतिज्ञा करावयास सागणें, पैजेचा विडा मांडणें [स]

सतीर्थ, सतीर्थ्य—पु गुरुबधु, सहाध्यायी

सतुक—विविवि सत्य, खरोखरीचें 'तैसी तियें सतुकें। आ नी काई।' –अमृ ७ २०७ 'तेवीं अविद्याकाळीं सतुकें। अविद्या नाहीं।' –अमृ ६ ३१ [स सत्य]

संतुना—स्त्री साध्वी; सतीण 'बहिणी म्हणे पुढें चाल्वी तेथुनी। पायवा सतुनी महादव।' –ब ७ १०. [सत]

सतुरा—पु सातूच पीठ [स सक्तु]

सतुप—वि कोंडा असलेलें, असडी, साल्पासह (धान्य). [स स+तुप]

सतुपष्ट, सतपष्ट, सतुसष्ट-ष्ठ—वि सदुसष्ट, साठ व सात ही सख्या ६७ [स सप्तषष्टि]

संतुष्ट—वि तृप्त, समाधानी, आनदित, खूष [स सम्+तुष्] संतुष्टणें–अक्रि तृप्त होणें, समाधान पावणें, सतोषणें संतुष्टाई, सतुष्टी–स्त्री तृप्ति, समाधान, आनद, खुषी, सतोष 'मग सतुष्टीच्या ठायीं। कुठें सहजें।' –ज्ञा ३ ४९

सतूप—न चेहरा तुळतुळीत दिसावा म्हणून नट वगैरे लोक लावतात तो स्निग्ध पदार्थ मवारी [स+तूप]

संतृप्त—वि १ पूर्णपणें समाधान पावलेला, धालेला तृप्त झालेला, सतुष्ट, आनदी २ (शाप) एखाद्या द्रावणात एखादा पदार्थ शक्य तितका पूर्णपणें विद्रुत केलेला आहे असा (इ) सॅच्युरेटेड [स स+तृप्] संतृप्ति–स्त्री पूर्ण समाधान, तुष्टि

सतेज—वि तेजस्वी, चकचकीत, टवटवीत, तजलेदार [स स+तिज्=तीक्ष्ण करणें] सतेजस्क–वि सतेज पहा

सतेल-लें—न रुद तोंडाचें व खोलगट मोठें भाडें, गिंडी 'चररगाचें सतेल।' –वाडसमारो ३ १६०

संतोख—पु तृप्ति, आनद, सतोष [सतोष]

सतोटी—स्त्री सचोटी पहा नेकी; प्रामाणिकपणा

**सतोया**—पु सत्यवक्ता, सत्यभाषी, खरें बोलणाऱ्या मनुष्यास म्हणतात [ सत्य+बावा ]

**संतोल**—पु वजन उचलण्याचा अभ्यास करण्याकरितां वापरावयाचें मुद्गलासारखें लाकडी साधन [ सम+तोल ]

**संतोष**—पु १ तुष्टि, आनंद, आल्हाद सुख २ तृप्ति, समाधान ( योगधर्म ) ३ आनंदी वृत्ति, प्रसन्नता [ सं सम्+तुष् ] **संतोषण**-न संतोष 'वायसा न होय संतोषण '–सिस ५.५८ **संतोषणें**-अक्रि संतोष पावणें, समाधान होणें **संतोषदान**-न चिरिमिरी, दणगी 'रेल्वेच्या सेवाचाकरीचा उपयोग करून घेणाऱ्या सर्वसामान्य जनतेकडून संतोषदान मागण्याची व स्वीकारण्याची रेल्वेच्या नोकरवर्गास मनाई आहे ' **संतोषपट्टी**-स्त्री पुत्रजन्मादि उत्सवानिमित्त राजानें शेतकऱ्यावर बसविलेला कर **संतोषविणें**-उक्रि तुष्ट करणें, संतोष देणें **संतोषाच्या कोटी**-स्त्रीअव अतिशय आनंद 'तें श्रवण करून संतोषाच्या कोटी जाहल्या '–दम २०० **संतोषित**-वि तृप्त संतुष्ट **संतोषी**-वि समाधानी, आनंदी वृत्तीचा, तृप्त, प्रसन्न

**सत्कण्या**—स्त्रीअव भात कांडतांना पिठून अतिशय कण्या झाल्या असतांना त्यास म्हणतात [ सात+कणी ]

**सत्का**—पु सतका पहा ओंवाळणी, ओंवाळून टाकलेली वस्तु 'सत्के व खैरात बहुत झाली '–दम १७९ 'पुतळाबाई वरुनि। सत्का उतरून नाव दिलें।' –गापो ११९ [ अर सदका ] **सत्कामत्का**-पु माग लोकांस अमावस्येच्या दिवशीं सढदाची डाळ, राळे किंवा इतर धान्य, पीठ मीठ, मिरच्या तेल वगैरे जिनस देतात ते –गागा १०४

**सत्कार**—पु १ आदरातिथ्य, मानसन्मान, मानमरातब, बहुमान २ आदर पूज्यता [ सं सत्+कृ ] **सत्कारणें**-उक्रि मानपान करणें, आदरातिथ्य करणें **सत्कारित सत्कृत**-वि आदरसत्कार केलेला, मान दिलेला, पूज्य मानलेला

**सत्कार**—पु सत् हा शब्द, अस्तित्ववाचक शब्द 'तो प्रणवो आदिवर्णुजा। आणि तत्कारु जो दुजा। तिजा सत्कारु।' –ज्ञा १७ ३४२ [ स ] **सत्कारवाद, सत्कार्यवाद**-पु कार्य प्रकट होण्याच्या पूर्वी त्याचें कारणामध्यें अस्तित्व मानणारें निरीश्वर सांख्य मत 'मग सहजें सत्कारवादु। तो पद्मकरु वरदु। धर्मप्रतिष्ठा तो सिध्दु। अभय हस्तु।' –ज्ञा १ १३; –गीर १५३ [ स ]

**सत्तर**—वि ७० ही संख्या [ स सप्तति, प्रा सत्तरी ]

**सत्ता**—पु १ फाशावरील साताचें दान २ पत्त्यातील सात ठिपके असलेलें पान [ सात ]

**सत्ता**—स्त्री १ अस्तित्व, असणेंपणा स्थिति, सत्तत्व 'तरी केवळ ज सत्ता। ते पुरुष गा पाडुसुता।' –ज्ञा १३ ९६५ 'स्वयें तीस नाहीं सत्ता।' –वामन निगमसार २ ९४ (प्रथ भाग ४) 'सत्ता प्रकाश सुख। या तिन्ही तिहीं उणें केख।' –अमृ ५ १ २ अधिकार, प्रभुत्व, मालकी, अमल 'मज मागें राज्य करा दोघे, कोणास हो नको सत्ता।' –मोसभा ३ ४६ ३ शक्ति, सामर्थ्य, प्रभाव ( समासांत ) कालसत्ता, प्रभुसत्ता, ईश्वरसत्ता ४ जुलूम, करडा अमल 'देवीं ब्राह्मणीं सत्ता करी।' –दा २ १ ६८. म्ह० १ काडीची सत्ता लाखाची मत्ता बरोबर नाहीं २ सत्तेपुढें शहाणपण चालत नाहीं ' **सत्ता करणें**-न १ हक्क सांगणें, अधिकारानें सांगणें २ अंमल, अधिकार गाजविणें **०धारक-धारी-धिकारी**-धाना १ अधिकार, प्रभुत्व, मालकी वगैरे असलेला मनुष्य, सत्ताधीश २ हक्क बजावणारा, अधिकारास चिकटून राहाणारा **०धारण** न मालकी, प्रभुत्व गाजविणें, हक्काची बजावणी करणें, अधिकाराचा स्वीकार करणें **०धीश**-पु प्रभु, राजा, अधिकारी, अमलदार, अधिकारास्थित, पदाधिष्ठित **०निवृत्ति**-स्त्री अधिकाराचा त्याग, हक्क, पदवी, उच्च पद सोडून देणें, स्वत्वनिवृत्ति **०पुरुष**-पु प्रभु राजा स्वामी, मालक, सत्ताधीश, धनी **०प्रकाश**-पु अस्तित्व व भास, सत्त्व आणि चेतना 'तेवीं सत्ताप्रकाशु जगा। आपणचि जो।' –ज्ञा १५ ५५२ **०मत्ता**-स्त्री हक्क व पदवी, अधिकार, मालकी, प्रभुत्व [ सत्ता द्वि ] **०वान्-वंत**-वि प्रभुत्व मालकी, अधिकार असलेला **०सामान्यत्व**-न सर्वत्र अस्तित्व, सर्वत्र स्थिति 'सर्व पदार्थांत याप्रमाणें नित्यरूपानें सदैव असणें यासच संस्कृतांत सत्तासामान्यत्व असें म्हणतात ' –गीर २१३ **०साहेबी**-स्त्री अधिकार व प्रभुत्व, हक्क व स्वामित्व, अमल व मालकी [ स सत्ता+फा साहेबी ] **सत्तेचा**-वि १ मालकीचा, हक्काचा, अधिकारातील धनीपणाचा 'हें घर माझें सत्तेचें आहे ' २ ( उप ) हक्कानें असणारा, अधिकारानुरूप 'हा कामाला नसून जेवणाला तेवढा मात्र सत्तेचा असतो'. **सत्तेवाईक**-वि १ मालकीचें, स्वतःचें 'आपला जो सत्तेवाईक पदार्थ तोच दुसऱ्यास द्यावा ' २ अधिकारातील कार्यक्षेत्रातील अमलाखालील 'हें घर तुमचें सत्तेवाईक आहे कीं भाड्याचें '

**सत्तावन**—वि ५७ ही संख्या [ स सप्तपञ्चाशत् ]

**सत्तावीस**—वि २७ ही संख्या [ स सप्तविंशति ]

**सत्तीस**—वि छत्तीस पहा 'अभिनवी सत्तीस दृष्टी। तरि सर्वांगें येऊनि आटी।' –भाए ४५३

**सत्तु**—पु १ सातु जव २ सातूचें पीठ, गहू हरभरे, सातु यांचें भाजून केलेलें पीठ [ स सक्तु ]

**सत्तूर**—पु दोहीं बाजूंस धार असलेला कोयता

**सत्तेचाळ-चाळीस, सत्तेताळ-ताळीस, सत्ये ताळ-ताळीस**—वि ४७ ही सख्या [ स सप्तचत्वारिंशत् ]

**सत्तोबा-पंत**—पु ( उप ) खरेपणाचा आव आणणारा, प्रामाणिकपणाचें ढोंग करणारा [ सत्य ]

**सतनामी**—पु उत्तरहिंदुस्थानातील एक पथ

**सत्पंथ**—पु एक महाराष्ट्रातील पथ इमामशहानें स्थापन केलेला **सत्पथी भावसार**-पु भावसार जातींतील सत्पथाचे अनुयायी

**सत्य**—न १ खरेपणा, सचोटी, प्रामाणिकपणा, नेकी, इमान 'विपत्तीतहि सत्पुरुष आपलें सत्य सोडीत नाहींत' २ वास्तविकता, वस्तुस्थिति, अस्तिभाव ३ प्रतिज्ञा, शपथ; दिव्य ४ चार युगातील पहिलें युग याची वर्षसख्या १७२८००० वर्षे आहे ५ अस्तिपक्षी, होकारार्थी, उद्गार (खरोखर, खरेंच, अवश्य होय याप्रमाणें) -वि १ खरें, वास्तविक, ऋत, अनृत, खोटें नव्हे तें, काल्पनिक तार्किक नव्हे असें २ प्रत्यक्ष, हयात, जिवत, अस्तित्व, चेतना असलेलें ३ अस्सल, मूळ, नकली नव्हे तें ४ खरा, खरें बोलणारा ५ सचोटीचा, प्रामाणिक; कपटी, लबाड नव्हे असा, विश्वासु नेकीचा **सत्य उपाय**-वि सत्यसध, नेकीनें चालणारा 'परम गहन, अति सुशील, सत्यउपाय, सत्य अतरीं।' -ऐपो ३१९ **सत्यंकार**-पु १ सत्यप्रस्थापन, खरें करणें, स्वीकार, मान्यता, रुजू करणें २ सचकार, विसार -शर **सत्यजय**-सतजय पहा **सत्यत्वग्रह**-पु खरेपणानें घेणें, खरें मानणें, विश्वास ठेवणें याच उलट मिथ्यात्वग्रह **सत्यदर्शी**-पु ब्रह्मज्ञान झालेला, ब्रह्मतत्त्व स्वात्मत्वें अवलोकन करणारा **०धूत**-वि सत्यानें पवित्र झालेलें 'सत्यधूत बोलिजे। देखावें तें देखिजे।' -ज्ञा ६ ४४५ **०नारायण**-पु एक देवता, या देवतेस नवस केला असतां तो फेडण्याकरिता या दवतेचें करावयाचें पूजन **०नाश-नास**-पु सर्वनाश, सर्वस्वी हानि उच्छेद, समूळ नाश, विनाश, प्रलय, नि पात, निधन **०निष्ठ**-वि सत्यास न सोडणारा, सत्यास धरून राहणारा **०प**-पु ब्रह्मदेव, सत्यलोकाधिपति **०पाड**-न ब्रह्माड 'वेढा धनजयाला आत्मयशें सत्यपाडवेष्टाया।' -मोद्रोण २ २० [ सत्यप+अण्ड ] **०प्रतिज्ञ**-वि वचन पाळणारा, शब्द खरा करणारा, करारास अनुसरणारा, न मोडणारा 'सत्यप्रतिज्ञ पाडव लागू देती न आपणा शब्द।' -मोविराट ४ ६३ **०युग** न चार युगातील पहिलें युग वर्षसख्या १७२८००० **०रूपी-स्वरूपी**-वि सत्य हेंच ज्याचें शरीर आहे असा ( परमेश्वर देव देवता ) **०लोक**-पु ब्रह्मलोक, ब्रह्मदेवाचें वसतिस्थान 'झळवती सत्यलोकींचे हुडे। घाये गड वहती घोंडे।' -ज्ञा ७ ८० 'मशक त्यापुढें सत्यलोक।' -एरुस्व शको ७ १८ ३ १४ **०लोक-नायक-नाथ**-पु ब्रह्मदेव 'ऐसें सत्यनायकु। बोलता जाहला।' -ज्ञा ३ ९३ **०लोकेशबाळा**-स्त्री सरस्वती, ब्रह्मदेवाची कुमारी 'ऋषी पातला तेथ सतोपकाळा। सुखें शातवी सत्यलोकेशबाळा।' -सुरामायणबाल **०वक्ता-वचा-वादी-भाषी**-वि खरें बोलणारा, सत्यवचनी **०व्रत**-वि सत्यास धरून राहणारा, खरें न सोडणारा; खऱ्यापासून न ढळणारा **०शील**-वि खरेपणानें वागणारा, सत्याची चाड बाळगणारा **०संकल्प**-पु अढळविचार, सत्यमार्गानें चालण्याचा निश्चय 'मना सत्य सकल्प जीवीं धरावा।' -राम 'सत्यसकल्पाचा दाता भगवान।' -वि खरेपणानें वागण्याचा निश्चय केलेला, सत्यास धरून वागण्याचा निश्चय असणारा **०सध**-वि सत्यप्रतिज्ञ, सत्यव्रत; खऱ्यास अनुसरणारा; सत्यापासुन न ढळणारा **०सेतु**-पु ज्याच्याकडे जाण्यास सत्य हाच पूल, मार्ग आहे असा ( परमेश्वर ) 'प्रेमळ जन प्राजळु। सत्यसेतु सरळु। कलानिधि।' -ज्ञा १२ २४३ **सत्या**-स्त्री शपथ **सत्याग्रह**-पु आत्मिक बलानें अन्यायाशीं झगडून सत्याची बाजू संभाळणें, सत्य गोष्टीबद्दल कोणत्याहि विरोधास न जुमानता सर्व मर्यादा सभाळून, सविनय मार्गानें झुजत राहणें, **सत्यानाश**-पु सत्यनाश पहा **सत्यानृत** न खरेंखोटें, सामान्यत जगातील व्यवहारात जो बरावाईट प्रकार चालतो त्यास अनुसरून हा शब्द वापरतात [ सत्य+अनृत=खोटें ] **सत्यापलाप**-पु सत्याचा अभाव, खरेपणा नसणें, खरें लपविणें 'परतु त्याच्या सिद्धान्तात सत्यापलाप बराच आहे' -इ रा ६ मूळतत्त्वें फाळके ३१० [ सत्य+अपलाप ] **सत्योत्तर**-न सरळ खरें बोलणें, सत्यास स्मरून सागणें, देवास स्मरून सागणें, दिव्य २ -क्रिवि शपथेवर, प्रतिज्ञापूर्वक, सत्यास स्मरून, खरोखर 'असो वस्तुत्वाचा अधिकार। अल्पास न घडे सत्योत्तर।' -दा ४ २ २४ [ सत्य+उत्तर ] **सत्योत्तरें**-क्रिवि शपथवर, प्रतिज्ञापूर्वक, सत्यास स्मरून

**सत्या**—पु पत्त्यामध्यें सात ठिपके असलेलें पान [ सात ]

**सत्या**—स्त्री सत्यभामा ( संक्षिप्त ) **सत्यापति**-पु श्रीकृष्ण

**सत्या**—पु एक प्राणि -अभ्र २ ५.

**सत्याण्णव**—वि ९७ ही सख्या [ स सप्तनवति ]

**सत्यात्तर**—वि ७७ ही सख्या [ स सप्तसप्तति ]

**सत्यायशीं-सत्यायंशीं**—वि ८७ ही सख्या [ स सप्ताशीति ]

**सत्याल**—न सेतल पहा

**सत्याहत्तर-सत्याहात्तर**—वि ७७ ही सख्या [ स सप्तसप्तति ]

**सत्येचाळ-चाळीस-ताळ-ताळीस**—वि ४७ ही संख्या [स सप्तचत्वारिंशत्]

**सत्र**—न १ अनेक दिवस चालणारा यज्ञ २ नामसंकीर्तन, भजन, नाम सप्ताह, ईश्वराचे गुणसंकीर्तन वगैरे. ३ अन्नछत्र, ब्राह्मण, वाटसरू वगैरेस अन्नदान व असे अन्नदान करण्याची जागा 'जैसें सत्रीं अन्न झालें। कीं सामान्या वीक आलें।' –ज्ञा १३ ७०० ४ दानधर्म, भिक्षा वाटणें वगैरे ५ (ल) यज्ञ या अर्था वरून मारामारी, कापाकापी, कत्तल [सं सत्र=विस्तार करणें] **०प-पु** यज्ञकर्ता 'श्रीरामासि विलोकितां बहुसुखी होती मुनी सत्रप।' –मोकृष्ण १४ ७८ **०शाला-स्त्री** अन्नछत्र

**सत्रंग**—सतरंग पहा बुद्धिबळांचा खेळ [स चतुरंग, सिं सत्रज, फा शत्रज] **सत्रंजी, शत्रंज**-सतरंजी पहा 'त्याजवरी खून न जाहले, मग शत्रंज केली' –बाइसनद ७०

**सत्रप**—पु सुभेदार, महालाधिकारी

**सत्रा**—वि १७ ही संख्या [स सप्तदश] **सत्रागुरू-पु** गुरु, मंत्रगुरु, यंत्रगुरु तंत्रगुरू, देवगुरु, जगद्गुरु, कुलगुरु, वस्तादगुरु, राजगुरू, मालिकागुरु, विद्यागुरु, कुविद्यागुरु, असद्गुरु, यातिगुरु, मातागुरु, पितागुरु राजागुरु **सत्रा चवकशा-**(ग्राम्र) फाजील चवकशी विनाकारण माजवीपेक्षां जास्त माहितीची विचारपूस

**सत्राजित**—पु स्यमंतक मणि ज्यास प्रथम मिळाला तो मनुष्य सत्यभामेचा पिता 'सर परता आता वो हरि। म्हणे सत्राजिताची कुमारी।' –तुगा १४२ [स]

**सत्रावी**—स्त्री जीवनकला; चंद्राच्या सोळा कला जीवर अधिष्ठित असतात ती मूळची कला, चंद्रबिंब, अकुल, ब्रह्मस्थानचें अमृतसरोवर, अमृतकला, कुंडलिनी 'जे मोक्षश्रिया महामंगळा। जे सत्रावी जीवन कळा' –दा १ ३ १० 'कां सत्रावीचें स्वानंदनीर। सेविती जैसे योगेश्वर।' –ह ६ ८५ 'सत्रावीचा पाजुनि पान्हा।' –बयाबाई –राजवाडे ९० [सत्रा]

**संत्रा**—पु नारिंग [फा हिं संगतरा, सिं संत्रितरो]

**सत्राण**—पु अवशिष्ट त्राण, जोर बल, शक्ति दणकटपणा, घट्टपणा, कस, सत्त्व, मजबुती, रग, धमक, दम (जीर्णवस्त्रांतील, उपयोगलेल्या वस्तूंतील, वयातीत मनुष्यांतील वगैरे) [स स+त्राण] **सत्राण-णें**-क्रिवि आवेशानें, जोराच्या प्रयत्नानं, एकवटलेल्या शक्तीनें, सर्व बळ वेंचून, मोठ्या दमानें 'सत्वाची सुरे सत्राण। बाहुल्ली।' –ज्ञा १५ १८३ 'सत्राणें उड्डाणें हुंकार फर्डी।' –मारुतीची आरती 'वृक्षा भोवडून सत्राणें। भीमा उजू टाकिला।' –मुआदि ३७ ३० 'ढसढेरे वरे सत्राणें।' –ऐपो २६७

**सत्री**—स्त्री (गो) छत्री [स छत्र] **सत्रीसूर्यपान**–न (गो) चवरी, अबदागीर

**संत्री**—पु इत्यादवत् पाहारेकरी 'माजिस्ट्रेटनें पुष्कळ सत्री लोक आणवून.. उभे केले' –तीप्र ११२ [इ सेंट्री]

**सत्त्व**—न १ प्रत्येक वस्तुजातात असलेल्या तीन गुण किंवा धर्म यापैकीं (सत्त्व, रज, तम) पहिला हा सर्व सद्गुणाचा द्योतक आहे 'सत्त्वाधिलियां आंतु। मत्त्व मी म्हणे अनतु।' –ज्ञा १० २८७ २ अस्तित्व, स्थिति, भाव, अर्थत्व ३ पदार्थ, वस्तु. द्रव्य (ज्याविषयीं कांहीं गुणधर्मांचें विधान करता येईल असें द्रव्य, वस्तु) ४ कस; सार, अर्क, सारभूत अंश, तत्त्वांश 'नराच्या ठायीं नरत्व। जें महाभारिये सत्त्व।' –ज्ञा ७ ३५ 'गुळवेलीचें सत्त्व' ५ बल, तेज, अभिमान, शक्ति, तत्त्व, जीवंतपणा, पाणी. 'दिसतें सत्त्व असें कीं पडता न चढेल हेमनगहि वर।' –मोवन ४ २६० ६ स्वभाव, स्वभाविक गुण धर्म 'सत्त्व टाकिती भाग्यवंत सकळ। थोर पुष्कळ सुग्ले।' –ह २९ ३२ ७ खरेपणा; सद्गुण, थोरपणा 'आलिया अतिता म्हणतसा पुढें। आपुलें रोकडें सत्त्व जाय।' –तुगा१२४८ 'याचें स्थिर असो सदा सत्त्व।' –मोसभा ६ ४२ [स अस्] **सत्त्व घेणें-पाहणें**–वस्तुन परीक्षा घेणें, प्रचीति घणें एखाद्याचा बाणा किंवा अभिमान किती टिकतो याची परीक्षा पाहणें **सत्त्व सोडणें**–बल, कस जोर, सरीवपणा, स्वाभाविक गुणधर्म नाहींसे होणें (जमीन, औषध, मंत्र, देव, मूर्ति वगैरे संबधीं योजतात) **सत्त्वास जागणें**-सत्त्व राखणें, अडचणीच्या प्रसंगींहि आपला मूळ स्वभाव, सद्गुण, अभिमान, नीतिधैर्य, वर्तन त्यापासून न ढळणें 'सत्परिचयेंच जडही समयीं सत्त्वास जागलें हो तें।' –मो **०गुण-पु** पदार्थमात्रांतील तीन गुणांपैकीं पहिला गुण 'शुद्ध नेणीव तमोगुण। शुद्ध जाणीव सत्त्व गुण।' –दा २० ३ ७ **०गुणी**–वि सत्त्वगुण ज्यात विशेष आहे असा **०धीर**–वि. सत्य, इमान, औदार्य, पातिव्रत्य इत्यादि सद्गुण निश्चयानें राखणारा, सत्त्व कधींहि न सोडणारा, सद्गुणी, धैर्यशील, दृढनिश्चयी **०निष्ठ**–वि सत्त्व न सोडणारा, सद्गुणी, सचोटीचा, प्रमाणिक वगैरे **०पर**-वि सत्त्वास जागणारे 'जो जे असा सत्त्वपर।' –उपा ६२ **०मूर्ति**–स्त्री सत्त्वशील, सत्त्वनिष्ठ सद्गुणी, प्रामाणिक असा मनुष्य **०रक्षण**–न सद्गुण, सत्य मान, इत्यादि गुणांचें परिपालन, अडचणींतहि सत्त्व न सोडणें **०वान्-वत**–वि सत्त्वगुणी, बल धैर्य, कस, सार, तत्त्व असलेला **०शील सीळ**–वि १ सद्गुणी, प्रामाणिक, नीतिनियमानें वागणारा, सत्प्रवृत्त 'पवित्र आणि सत्त्वसीळ।' –दा १ ८ १९ २ ज्यातील कस, किंवा गुणधर्म दीर्घ कालपर्यंत टिकतात असा (पदार्थ, वस्तु) **०शुद्ध**–वि शुद्ध केलेले, आतील निकस भाग

काढून सतेज केलेलें ( औषध वगैरे ) ०शुद्धि-शोधन-स्त्रीन औषधी, अथवा वनस्पती वगैरेंची विशुद्धि, स्वच्छ करणें, निकस भाग काढून टाकून सतेज करणें 'तैसी ते सत्त्वशुद्धि। आगळी ज्ञानेंसी शुद्धि।' -ज्ञा १४ २२२ २ अंत करणशुद्धि 'आता सत्त्व शुद्धि म्हणिजे। ते ऐशा चिन्हीं जाणिजे। तरी जळे ना विझे। राखोडी जैसी।' -ज्ञा १६ ७४ ०संपन्न-वि सद्गुणी, सद्वृत्तीनी यत्युक्त, सत्त्वांशानें परिपूर्ण ०स्थ-वि १ सद्गुणी, नीतिमान् सदाचारसपन्न २ पथ्यकर, पुष्टिकारक, हितकर शक्तिवर्धक (अन्न, पदार्थ वगैरे) ०हरण-न (शब्दश व ल) सद्गुण, उत्कृष्टपणा, शील, कीर्ति, मान वगैरेंची नागवणूक, हिरावून घेणें, त्याचा त्याग करणें, सदाचाराविषयीं लौकिकाची हानि ०हानि-स्त्री (शब्द व ल) सद्गुण सत्यनिष्ठा, निष्कर्ष, सार वगैरेंचा नाश ०हीन-वि निकृष्ट, निकस; गुण, तेज, बल रहित, निःसत्त्व, तेजोहीन, तत्त्वभ्रष्ट 'सत्त्वहीन मी बहुतापरी। बुद्धि अघोर असे, माझी।' ०क्ष(क्षे)मु-वि सत्वगुणसपन्न 'देहीं सत्त्वक्षेमु। आरु जैसा।'-भाए ३३० **सत्त्वागळा**-वि सात्त्विक 'सत्त्वधीर सत्त्वागळी।' -दा १८ २२ **सत्त्वाथिला**-वि. सत्त्वस्थ, सद्गुणी, सत्त्वगुणयुक्त, सात्त्विक 'सत्त्वाथिलिया आतु। सत्त्व मी म्हणे अनतु।' -ज्ञा १० २८७ 'सत्त्वाथिला शिबिनृपाळा।' -आशिवि ६६ ४ 'त्यागुणें विष्णुभक्त सत्त्वाथिला' -ह ३४ १० **सत्त्वान्न**-न पथ्यकर व पौष्टिक खाद्य **सत्त्वापत्ति**-स्त्री ज्ञानी जीवाच्या सप्तभूमिकातील चौथी भूमिका -हको **सत्त्वाशुंठी**-स्त्री १ निरनिराळीं औषधी द्रव्यें घेउन तयार केलेली एक प्रकारची सुठ २ आतील सर्व कस कायम राहील अशा प्रकारें आल्याची वनविलेली सुठ ३ ज्यास नेहमीं औषधें द्यावीं लागतात असें रोगट मूल (विशेषणाप्रमाणें उपयोग) **सत्त्वाश्रित**-वि सुद्गुणी व सचोटीचा; प्रामाणिक, विश्वासु, नीतिमान, शुद्ध वर्तनाचा **सत्त्वाची चांगुणा**-स्त्री साध्वी, सद्गुणी स्त्री [श्रियाळश्री चांगुणा या विशेषनामावरून] **सत्त्वाची सावित्री**-स्त्री पतिव्रता व सद्गुणी स्त्री. [सावित्री या प्रसिद्ध पतिव्रता स्त्रीवरून]

**सत्वर**—वि चपल, चलाख, तडफदार, वेगवान, जलद -क्रिवि जल्दीनें, लौकर, तावडतोव, शीघ्र [स स+त्वरा] **सत्वर होऊन**-क्रिवि उत्सुकतेनं, तडफेनें, तावाडतोव, जल्दीनें, चपलतेनें, उतावीळपणें **सत्वरी**-क्रिवि जलदीनें, तावडतोव, लवकर

**सत्सष्ट**—वि सतसष्ट, सदुसष्ट, ६७ ही सख्या [स सप्तषष्टि]

**सत्ळी**—पुस्त्री सळई, शलाका, शल्य, 'तो सुरणातु सत्ळी घालावा' -वैद्यक बाड ८१ ८८

**संथ**—वि मद, सावकाश चालणारा, धिमा, थड [स. शम्-शात-संथ] **सथावणें**-उक्रि १ शात, स्थिर करणें, शातवन करणें, २ संथ, थड, मद होणें, अतिशय सावकाश चालणें

**संथळ**—न सपाट जमीन, मैदान, पठार, एका पातळीतील जागा, जमीन [स सम+तल, स्थल-स्थळ]

**संथा**—स्त्री पाठ, रोजचा अध्ययन करावयाचा थोडा थोडा भाग, पठनक्रिया, घोकंपट्टी (क्रि० देणें, घेणें, पाठ केलेला विषय) 'वक्ता सभास्थानीं उभा राहिला कीं तो आपल्या सथेस आरभ करतो' -नि ३२५ [सं सम्+स्था]

**सथाउं, सथावां**—वि आवेशयुक्त, जोरदार, जलद, चपल. 'तो सथाउ घोडा। न साहे आगा सानडा।' -शिशु ७७२. 'नीगतां सथावा गतीं,। आसुडिता दोहो हातीं।' -शिशु ५३३. [?]

**सद**—स्त्री सभा, समुदाय 'सावित्रीनें कथिलें तें वृत्त अशेष साधुसद नमुनीं।' -मोवन १३ १०२ [स] **सदस्य**-पु. १ सभासद, मडळींतील, सभेंतील व्यक्ति २ यज्ञातील एक ऋत्विज

**सद**—वि शमर -आदिलशाही फर्मानें [फा]

**संद**—स्त्री साधा, फट, चीर 'जे मग पाळुन सद भरिजे' -वैद्यक बाड १० ८२. [सं सम्+धा]

**संदक, संदूक**—स्त्री पेटी. 'नररत्नाचे संदक' -वेसीस्व ९.५५

**सदका**—पु दानधर्म, ओंवाळून टाकलेली वस्तु सत्का पहा **गाढवाचा सदका-शाहण्याचा सदका**-कुचकामी, निरुपयोगी, क्षुल्लक वस्तु, क्षुल्लक, क्षुद्र, कुचकामी मनुष्य अशा अर्थीहि हा शब्द वापरतात उदा० मोठा शहा देणाऱ्याचा सदका मला ठाऊक आहे? [अर सदका]

**सदगरम**—वि (ना) (प्र) सरदगरम, समशीतोष्ण, सौम्य; कोंवट [सर्द+गरम]

**सदट**—वि १ सघट, बळकट, घट, सुदृढ 'वोलखी होता सदट। सुटोनि गेला अत पट।' -कथा ६ १४ ६१ 'जैसें चढ़ा आड आभाळ। सदट दाटे सजळ।' -ज्ञा ८.२२९. २ मोठा, भारी, जड [स सदृढ]

**सदंड**—वि दड हातात असलेला. 'तशी न इतरास भी जरि सदंडही हाक्तिी।' -केका ५४. [सं]

**सदतीस**—वि सततीस पहा. ३७ ही सख्या [स सप्तत्रिंशत्]

**सदन**—न घर, वसतिस्थान, निवासस्थान, गृह 'मातें भजता सदना। माझिया येती।' -ज्ञा ९ ४७४ [स]

**सदन्न-न**—न चागलें अन्न, पौष्टिक अन्न 'ऐसेनि कहीं विपायें। सदन्ना वरपडा होये। तरी घाणी सुटे तव राहे। व्याधु

जैसा।' –ज्ञा १७१५८. 'न म्हणे तिळें उन्द। सदन की कदन।' –भाए ७७७ [स सत्+अश]

संदपद्ध, सदपद्दीत—वि भीन सनवदपद्दीत, रानवात पद्दीत पहा

सदंभ—वि दांभिक, ढोंगी, पोकळ डौल आणणारा [सं स+दंभ]

सदभ्यास—पु चांगली सवय, चांगला अभ्यास, सदाचार 'तैसि सदभ्यासें निरंतर। चिंतामणि परमपुरुषाची मोहर।' –ज्ञा ८८२ [स सत्+अभ्यास]

सदमा, सधमा—पु अनर्थ, धक्का 'त्याचे चालीचा बोध पडावा होंच जो सदमा गुजरला हा जाहीरच आहे' –ऐटि ३ १७ [अर सदमा]

सदमुख, सद्मुख—क्रिवि सन्मुख; समोर. 'वैसला ईश्वरा सदमुख।' –उषा १७ [स सत्+मुख]

सदय—वि दयाळु कृपाळु [स स+दया] सदयता—स्त्री कृपाळुपणा, दयाळुपणा 'वैगी नेणो सदयता। उपनली तेथें चित्ता।' –ज्ञा १२०५

सदर—स्त्री १ मुख्य सभा; राजसभा, राजसभास्थान; मुख्य कचेरी 'दुसरे दिवशीं राजे सदरेंत बैसले' –सभा १२ २ मुख्य, वरिष्ठ, श्रेष्ठ कचेरी, न्यायासन उदा० सदर अदालत, सदर निजामत –न १ रकाना, कलम (हिशोबांतील) २ बाब, विल्हा, प्रकरण, खातें –क्रिवि सर्वसाधारण, सामान्यपणें, कोण तीहि मर्यादा न घालतां, पूर्णपणें, सरसकट उदा० सदरपरवानगी, सदररजा, सदरताकीद, सदरहुकूम, सदरमाफी –वि मुख्य; वरिष्ठ, श्रेष्ठ (समासांत) उदा० सदरहवालदार, सदरअमल, सदरजमादार [अर सद्र] सदरेस असणें–नोकरीस असणें, दिमतीस असणें ०अदालत–स्त्री दिवाणी कोर्ट ०अमीन–पु दिवाणी कोर्टाचा न्यायाधीश (सध्याच्या सबजज्जाच्या हुद्याचा) ०असामी–स्त्री ऐपतदार, वजनदार गृहस्थ ०कमज्यास्ती–स्त्री हिशोबांतील, दोन सदरांतील फरक, अंतर ०घडणी–स्त्री जमाखर्चाची सदरवार खातेवार मांडणी ०जुमला–पु खात्याची, सदराची एकुणात वट बेरीज ०ताळा–पु सर्व खात्यांच्या रकमांचा मेळ सर्व खात्यांची एकुणात ०प्रमाणें–क्रिवि वर दिलेल्या प्रमाणें, वर उल्लिखित पद्धतीनें, रीतीनें ०बजार–बाजार–पु ब्रिटिश लष्करी छावणींतील बाजारास सामान्यतः म्हणतात ०बारगीर–पु १ न्यायकचेरींतील पहारेकरी, कचेरींतील पाहऱ्यावरील घोडेस्वार २ (ल) निरुपयोगी, बेकामी इसम; शोभेकरितां बाळगलेला मनुष्य ०भेट–स्त्री सरकारी अधिकाऱ्यास देणगी म्हणून गावच्या साऱ्यावर अधिक घ्यावयाचा एक कर ०मुखी–अप सदमुखी पहा ०रकम–स्त्री खात्याची, रकान्याची एकुणात, एखाद्या मुख्य बाबीची एकूण रकम ०वार–क्रिवि कलमवार, खातेवार, बाबवारीनें ०हजारी–पु हजार लोकांवरचा अधिकारी. सदरेची सोपी–स्त्री दिवाणखान्याच्या पुढील सोपी, उपसभागृह, सभासीमगृह सभागृहाजवळील लहान दालन सदरेवर–क्रिवि उघड्यावर, मोकळ्या जागीं, पटांगणावर 'घोंगावा सदरेवर सरजाम पाठऊन ..' –वाड दुवा ५९३ सदरेस–क्रिवि कचेरीत, दरबारात, सभेस.' अमृतसिद्धि योगाचे मुहूर्ते सदरेस येऊन बैसले ' –वाडसारा १३७

सदर—स्त्री सरहद्दबद्दल युद्धीनें उपयोग होय, सीमा, दिशा –पया १९२, –शिंदे २८५

सदर—वि (व) सर्व, सगळें [अर सद्र]

सदरहू—क्रिवि प्रत्येक कलमाप्रमाणें, कलमावरहुकूम, निर्देशिल्याप्रमाणें, वरच्याप्रमाणें, उपरि निर्दिष्ट कल्याप्रमाणें, पूर्वप्रमाण, उपर्युक्त [अर सद्र या सदई] सदरहू प्रमाणें–क्रिवि सदरप्रमाणें, कलमवार दर्शविल्याप्रमाणें, वरीलप्रमाणें

सदरा—पु अंगरखा, कोट, याच्या आंत घालावयाचा कपडा, पातळ पैरण [अर सुद्रा]

संदर्भ—पु १ (कथानक, कथाभाग, व्यक्ति, वाक्यातील भाग यांचा) संबंध, अनुसंधान, संगति २ योजना, बेत, कल्पना, संधान (विवाहसंबंध घडवून आणण्यासंबंधीं) ३ सूत्र, शिलशिला, बोलाचाली, मसलत (तह वगैरेसंबंधीं) ४ गुंफण, जोडणी, रचना, ग्रथन [स सम्+दृभ्=रचणें] ०विरुद्ध–वि विसंगत, असंबद्ध, विजोड, न जुळणारें ०शुद्ध–वि सुसंगत, संबद्ध सद्रम, सजोड, सहज जुळणारें, मिळणारें ०शुद्धि–स्त्री सुसंगति, योग्य जोड, मिलाफ, सरळ, योग्य, जुळणारा संबंध

सदल—न एक विशिष्ट प्रकारचें भाडें [सं सम्+दल]

सदल—न चंदन [अर सदल] संदली–स्त्री एक तऱ्हेची खुर्ची –पु खोजा, पढ –वि, चंदनी रंगाचा (घोडा) –अश्वप १२८

सदल—पु (व) पीराचा उरूस, उत्सव [अर सदल]

संदला—पु (प्र) सधला १ दरजा वगैरे भरण्यासाठीं, मिलावा साफ करण्यासाठीं मुद्दाम घासून व घोटून तयार केलेला चुना २ अशा चुन्याचा लेप [स सम्+धा]

सदलाबदल—स्त्री (प्र) अदलाबदल पहा

संदंश (हस्त)—पु (नृत्य) आंगठा व तर्जनी यांचीं अग्रे जवळ आणणें व बाकीचीं बोटें उभीं पसरून तळहात खोलगट करणें [स]

संदष्टक (अधर)—पु (नृत्य) अधर चावणें [स]

संदष्टत्व—न (संगीत) गाताना दात खाणें [स]

**सदसत्**—वि १ खरेंखोटें २ वास्तविक किंवा अवास्तविक, अस्तित्वात असलेलें किंवा नसलेलें, वास्तव अथवा अवास्तव [स] **सदसद्विचार-सदसद्विवेक**-पु बरें कोणतें, वाईट कोणतें, खरें कोणतें, खोटें कोणतें यासबधीं विचार [स] **सदसद्विचारशक्ति**-स्त्री खरें कोणतें खोटें कोणतें यासबधीं विचार करण्याची मानसिक शक्ति, मनोदेवता (इं) कॉनशन्स [स] **सदसन्निर्णय**-पु योग्यायोग्य यासबधीं निश्चय, बरें वाईट कोणतें याची निवड 'त्या ठिकाणीं सदसन्निर्णय व विचारशक्ति याची प्रतिष्ठा व मातब्बरी ती काय राहिली' -पार्लमेंट १८०

**सदसद**—वि (व) नरम, लिबलिबित

**सद्सष्ट**—वि सतसष्ट, ६७ ही सख्या [स सप्तपष्टि]

**सदसी**—पुस्त्री तलवार 'नाहीं अद्यापि झळकला सदसी।' -मोविराट ३ ३७. [स सद्+असि]

**सदळ**—वि दाट, जाड, ठोसर 'सपुर स्वोजिएचें चोखट। फेडुनि सदळ काठ।' -ॠ ८० [स स+दल]

**सदा-दा**—क्रिवि नेहमीं, सदोदित, निरंतर, सतत 'हा सदा पाणिबुडा। युधिष्ठिर सावडा।' -शिशु ८९४ 'सदा सर्वदा योग तुझा घडावा।' -राम सदाकष्टी, सदादुःखी, सदाभोगी, सदारडया, सदारोगी, सदानंदी, सदाशुचि, सदासुखी असे याचे समासहि होतात म्ह० १ सदा पीक सदा भीक = कुणब्याचें कितीहि पीक आलें तरी दारिद्य जात नाहीं २ सदा मर त्याला कोण रडे = दुःखाची काहीं काळानें सवय होते या अर्थी **सदा त्रिकाळ**-नेहमीं, सतत, निरंतर, तिन्ही त्रिकाळ, सकाळ, दुपार, सध्याकाळ (विशेष जोर दाखविण्याकरिता योजतात) **सदाकदा, सदाकाळ, सदाकाळ**-क्रिवि नेहमीं, निरंतर, सतत, सदोदित **सदावक**-वि नेहमीं वाकडा, दुर्मुखलेला, रुसलेला, हट्टी, कष्टी, उदास **सदा खाटलेश्वरी**-वि बिछान्यास खिळलेला **सदागति**-वि नेहमीं भ्रमण करणारा, सारखा गतिमान असणारा (हवा, वारा) **सदातन**-वि चिरतन, शाश्वत, निरंतरचा, कायमचा. **सदाफळ**-वि नेहमीं फळें देणारें 'जोडती दाटें झाडें। सदाफळ तीं।' -ज्ञा ६ १७३ **सदासर्वदा**-क्रिवि नेहमीं, सतत **सदासिद्ध**-वि शाश्वत, चिरतन (परमेश्वर)

**सदाकत**—स्त्री प्रामाणिकपणा, विश्वास [अर] **सदाकत्-दस्त-गाहू**-वि विश्वासपात्र, प्रामाणिकपणाचा निधि, (एक पदवी) 'सदाकत् दस्तगाहू नरसिंगराव तमाजी' -पया ४६७

**सदागुलाब**—पु एक प्रकारचें गुलाबाचें झाड व फूल [स सदा+फा गुलाब]

**सदाचरण**—न योग्य वर्तन, चागली वागणूक, नैतिक वागणूक, शिष्टाचार [स सत्+आचरण] **सदाचरण-णी**-वि. योग्य वर्तन करणारा **सदाचार**-पु १ योग्य, नीतिपर, शिष्टपणाची वर्तणूक, वागणूक २ चागली पद्धति, वहिवाट, रूढि, शास्त्रसमत, शिष्टसमत वागण्याची रीत, पद्धति, चाल ३ (मनु) सरस्वती व दृषद्वती या दोन नद्यांच्या मध्यें राहणाऱ्या लोकाची जी आचारपद्धति, वागण्याची रीत, रूढि, चाली वगैरे ती [स सत्+आचार] **सदाचार-री**-वि सद्वर्तनी, चागली वागणूक असणारा

**संदाणी, संदान**—स्त्रीन लोहाराची मायणी, विंडी, कडया वगैरे करण्याची ल्हान ऐरण शिंगाडा व सामान्य ऐरणीहून भिन्न सघन पट्टा [फा. सन्दान, स सम्+धा]

**सदाफुली**—स्त्री एक वेल व फुलझाड, हीं नेहमीं फुलें देतात

**सदार**—वि ऐपतदार, देण्यालायक, नादार याच्या उलट **सदारी**-स्त्री ऐपत, देण्यास लायक असण्याची स्थिति, सपन्नता [फा दार्]

**सदारत्**—स्त्री मुख्य प्रधानकी, मुख्य प्रधानपद [अर सदारत्]

**सदावर**—वि (व) योग्य, ठीक 'याचें बोलणें सदावर दिसतें'

**सदावर्त**—न अन्नछत्र, अनसत्र आल्यागेल्यास अन्न देणारी सस्था 'म्हणे जीव गेला मीन नाथ। तरी याचें घाले सदावर्त।' -नव २२१३९ [स सदा+व्रत किंवा वृत्ति] **सदावर्ती**-वि सदावर्तासबधीं

**सदावीळ**—क्रिवि नेहमीं, सदोदित [सदा+वेळ]

**सदाशिव**—पु शकर, शिव, महादेव [स]

**सदाळणें**—उक्रि घट बाधणें, घट्ट ठेंचून पुरणें, रोवणें, भोंवतीं दगड, माती घालून ठोकून घट्ट बसविणें [स सम्+धा]

**संदिग्ध**—वि संशयित, अस्पष्ट, अनिश्चित [स] ०**मति**-वि १ संशयित बुद्धीचा, संशयात्मा, नास्तीक २ साशक मनाचा, अनिश्चित बुद्धीचा, विकल्पी ०**लेख्य-लेख**-नपु (कायदा) संशयित अर्थाचें लिखाण, दस्तैवज **संदिग्धार्थ**-पु १ शकास्पद स्पष्टीकरण, विवेचन, अनिश्चित विवरण, दुस्पष्ट नव्हे असें भाष्य, टीका २ संशयित कर्ज, विवादित कर्ज

**संदिष्ट**—धावि सागितलेलें, निवेदिलेलें, निर्दिष्ट केलेलें; आज्ञापिलेला (सदश, माहिती, बातमी)

**संदिसा-सें**—क्रिवि त्याच यावेळीं, याक्षणीं, तुरंतच 'बापपण सदिसें गेलें।' -दा ३३ ३९ [स सद्य; सद्यः]

सदी—स्त्री शतक 'यारावी सदी आजच भरली म्हणून महुत साद कला' –चित्रगुप्त १०६ [फा सदी; मुल स शतम्]
सदी-द्दी—स्त्री भरभराट, अनुकूल काल, संपन्नता, सुदैव यशाहिवता [अर]
सदीं—क्रिवि नेहमीं; नित्य, सतत, सदा [स]
संदी—वि (प्र) सनदी पहा
सदी—स्त्री साद, कोनकोपरा, अडचणीची जागा, सांध्याची जागा 'दोहो देवळाचिए संदी।' –ऋ ११५ [स संधि]
सदीकळासु—स्त्री सांध्याची कळाशी, सांध्याचीं हाडें 'संदी कळासु गडबडी।' –माए २०४
सदीपनी—स्त्री (संगीत) १ सोळाव्या श्रुतीचें नांव –पु २ श्रीकृष्णाच्या गुरूचें नाव [स सम्+दीप्]
सदीवाल—पु एक हुद्दा, अधिकार 'हजारी संदीवाल व जमातदार दहा पधरा याच यावे' –वाड्याचा ३ ७७ [अर]
सदीस—क्रिवि दिवसभर, सतत, नेहमीं [स+दिवस]
सदु—पु (अप) छद, नाद 'नाहीं आर्ति निर्वेदु। न सडी विषयसदु।' –ऋ ७ [स छद]
सदुक-दूक—स्त्री पेटी 'संदुक मातुसा अलकार।' –वसीस्व ७ ६ [अर सदूक]
सदुक्ति—स्त्री चागलें भाषण –एभा ३१ २५० [स]
सदुर्ते—वि सिद्ध, तयार 'बदुका दारुगोळा आदिकरून आरमारी प्रयोजनी सामान यथेष्ट व सदुर्ते करावें' –मराआ ३४ [स सिद्ध फा इस्तेदाद]
सदुसष्ट—वि ६७ ही सख्या [स सत+षष्टि]
सदृढ—वि बळकट, मजबूद, भरीव, गच्च, घट्ट [स सु+दृढ]
सदृश—वि सारखा, सम तुल्य (समासात) एत त्सदृश तत्सदृश; पितृसदृश [स]
सदे—क्रिवि शेकडा, दरसदे=दरशेकडयाव [फा सदि=शभर]
सदेठ—क्रिवि देंठासह, देंखासकट 'मिथ्या वादाचीं अपक फळें। सदेठीं झड पूर्वकाळें।' –एभा १० २२३ ११ ६६९
सदेव-वा—क्रिवि नहमीं सतत सदैव 'त्या गोपि काही असती सदेवा।' –साह्द ४ २१ [स सदा+एव]
सदेव—वि, दैववान्, भाग्यशाली 'आता ऐका सदेव लक्षण। सौख्यदायक।' –दा १९ ४ १ २ उत्तम ब्राह्मण 'ऐक सदेवपणाचें लक्षण।' –दा ११ ३ २४ [स+दैव]
सदेश—वि एकाच देशाचा, तद्देशीय [स+देश]

संदेश-सा—पु निरोप, बातमी वृत्त वार्ता आज्ञा 'यक दिवशीं संदेश कला।' –गम्र ७ २८ [स सम्+दिश] ०हर—पु वार्ताहर, बातमीदार, निरोप्या, जासूद
संदेसा—संदेश पहा
संदेह—पु संशय, शंका, अनिश्चितपणा माघावता 'तैसें तोडावया संदेह। तीख जैसें का लोह।' –ज्ञा १६ ११८ [स]
संदेही—वि संशयी; गोंधळलेला, शकेखोर
सदैव—क्रिवि नेहमीं, सतत, नित्य, सर्वकाळ, सदोदित [स सदा+एव]
सदैव—वि दैववान् नशीबवान भाग्यशाली 'परी फळला मनोधर्म। सदैवाचा।' –विपू ७ १५४ [स स+दैव] म्ह० सदैवाची दशी नरदेवाचा पाल्य (लागावा)
सदोदि(दो)त—क्रिवि नेहमीं, सतत सदा 'तेणें अक्षरसे राजमठ। देखों सदोदीतु।' –ऋ ८३ [स सदा+उदित]
संदोर—पु (व) मोटा दोर परित्यावर धरलेलें तागाचें माटें धाहार सोंदर [सोंड+दोर]
संदोली—स्त्री पेटी, संदूक
सदोष—वि १ दोषयुक्त; अपुरा, उणीव, कमीपणा, न्यून असलेला २ चुकीचें, सापराध, गुन्हेगारीचें [स स+दोष]
संदोह—पु समुदाय, समूह जमाव रास; ढीग, निधि साठा उदा० आनदसदोह दु खसंदोह [स]
सद्गत—स्त्री (सद्गति याचा सक्षेप) उपाय, मार्ग, तर णोपाय गत्यतर, इलाज सोडवणूक, सोय, आश्रयस्थान 'कारकुनास चाकरी केल्याशिवाय सद्गत नाहीं' सतनागत या वाक्प्रचाराचाहि हाच अर्थ आहे [सद्गति]
सद्गति—स्त्री चागली गति मरणोत्तर सुखावह अवस्था, मोक्षप्राप्ति, स्वर्गप्राप्ति सुस्थितींत, उच्च जातींत पुनर्जन्म पर लोकप्राप्ति, मरणोत्तर कोणतीहि चांगली दशा 'होता वृथा प्रतिज्ञा सद्गति न घडो मला घडो पतन।' –मोकर्ण ३५ ४६ [स सत्+गति]
सद्गद—वि अवरुद्ध सद्गदित कठ दाटून आल्यामुळें अडखळलेली (स्थिति) 'मग म्हणतसे प्रसीद प्रसीद। वाचा होतसे सद्गद।' –ज्ञा ११ ५६८ [स सत्+गद]
सद्गदित—वि दु ख, शोक वगैरेमुळें कठ दाटून आलेला, कठ भरून आलेला दु खाकुल, शोकाकुल बाष्पसयुत [स]
सद्गीत—न आध्यात्मिक पवित्र, देवादिकासबधीं गाणें, स्तोत्र सूक्त, भजन [स]
सद्गुण—पु विद्या, कला, शौर्य सहिष्णुता, उपकारक्ता इत्यादिसारखा उत्तम गुण चागला गुणधर्म, चागलें तत्त्व [स सत्+गुण=मोजणें]

**सद्गुरु**—पु आध्यात्मिक ज्ञानाची प्राप्ति करून देणारा, ईश्वरप्राप्तीचा मार्गदर्शक, अज्ञान नाहींसें करणारा उपदेशक, चांगलें ज्ञान, विद्या, उपदेश देणारा गुरु [स सद्+गुरु]

**सद्गृहस्थ**—पु प्रतिष्ठित, भला, प्रामाणिक, विश्वासु सन्मान्य, सद्वर्तनी, प्रेमळ, सौम्य मनुष्य [स सत्+गृहस्थ]

**सतत्तवाब**—पु (कायदा) उत्तरपक्ष, वैफियत, सयुक्तिक प्रत्युत्तर [स सत्+फा जबाब]

**सद्ट**—वि सदट, सघट पहा घट, मजबूत 'दंत शुभ्र सद्ट। रत्नखचित हेमवट।' –दा १ २ १५

**सद्दर**—वि (खा) सदर पहा सर्व, परिपूर्ण

**सद्दा**—पु मोहरमात ताबुताच्या पुढें नतात तीं निशाणें [अर शद्दा]

**सद्दी**—स्त्री शतक, शेंकडा [फा सदि=शतक, तुल स शतम्] **दरसद्दे**-क्रिवि दरशेंकडा 'वसूल देत आहेत त्यापैकी दरसद्दे चाळीस' –वसईची मोहीम

**सद्दी**—स्त्री चलती, भरभराट, भाग्यकाल, अनुकूल परिस्थिति, सुदैव, सद्भाग्य वैभवकाल, उत्कर्षकाल 'रोमन लोकांनीहि दीड हजार वर्षे राज्य भोगल्यावर त्याची सद्दी सपली' –नि ६६ 'होते शिपाई जबर सद्दी फैकानीं पाहिली।' –ऐपो ४२३ [अर सअद=चलती, ग्रहाची शुभदृष्टि, शुभवेळा]

**सध्दर्म**—पु १ चागला गुणधर्म, सुलक्षण २ चागला धर्म, चागला नियम, वृत्ति विधि ३ सदाचार, चागली वागणूक, सदाचरण, न्याय्य वर्तन [स] **सद्धर्म बाळगणें-संभाळणें-राखणें**-धार्मिक विधि नियम, मत वगैरे आचरणें **सद्धर्म सोडणें-टाकणें**-धार्मिक विधि, रूढी, मतें, नियम याचा त्याग करणें **सद्धर्मानें वागणें-चालणें-राहणें-असणें**-न्याय, योग्य, रास्त वर्तन करणें, सदाचारी होणें **सध्दर्माला जागणें**-योग्य, प्रामाणिक, नैतिक आचरण ठेवणें **सद्धर्मास येणें**-नैतिक, धार्मिक, प्रामाणिक वर्तनाच्या कसोटीस उतरणें, योग्य, रास्त दिसणें वाटणें **सध्दर्मावर टाकणें-घालणें-लोटणें-सोडणें**-एखाद्याच्या सदसद्विवेकबुद्धीवर अवलंबून ठेवणें, सदसद्विवेकबुद्धीचा आश्रय घेणें, सद्बुद्धीवर सोंपविणें **सध्दर्मी**-वि सद्गुणी, न्यायी, नीतिमान, योग्य वर्तनाचा

**सध्द्या सध्द्या**—क्रिवि आताच, या क्षणीं या घटकेस, यावेळीं, साप्रत [स सद्य]

**सद्बुद्धि**—स्त्री १ चागली, शुद्ध बुद्धि मन, विचार २ सत्प्रवृत्ति, नीतिपरायणता, न्यायपरायणता, योग्य दिशेकडे कल –वि चागली बुद्धि, प्रवृत्ति, विचार, मन असलेला [स. सत्+बुद्धि]

**सद्भक्त**—पु चांगला भक्त, शुद्ध अंतःकरणानें, अनन्य, एकनिष्ठपणें भक्ति करणारा, मनापासून स्नेह, मैत्री करणारा. [स] **सद्भक्ति**-स्त्री अन्तःकरणापासून, अनन्य भक्ति, भाव, प्रेमळपणा, लोभ –वि अन्तःकरणपूर्वक लोभ, प्रेम करणारा, भाव ठेवणारा

**सद्भाव**—पु १ अस्तित्व, स्थिति 'म्हणोनि अज्ञान सद्भावो। कोणे परी न लाहो।' –अमृ ७ २९३ २ साधुत्व, सद्गुणीपणा, सुस्वभाव, सुशीलता ३ चांगली मनोवृत्ति, श्रद्धा, सद्वृत्ति 'जे इय स्वप्नींहूनि सद्भावा। नेदावें निघों।' –ज्ञा ११ ६३७ ४ सत्य, योग्य अनुभव, प्रतीति 'हें आलें मज सद्भावा। आता तृप्ति सर्व।' –ज्ञा ११ ५३६ [स सत्+भाव]

**सद्म**—न गृह, घर, सदन 'धरी सद्म मानी जया नित्य पद्मा।' –वामन, भरतभाव [सं]

**सद्य, सद्य**—क्रिवि १ तात्काल, त्वरित, क्षणात, तावडतोब, साप्रत, या क्षणीं 'अपूर्व फळें अर्पी सद्य। तो सत्त्वगुण।' –दा २ ७ २९ 'न ववे जाहिल सद्य पापा।' –वामन, वामनावतार १५ २ (क्वचित्) साजुक, ताजें, अलीकडील, नुकतेंच [स सद्य] **सद्यःपक्ष**-पु (विधिसबधीं) १ मुख्य कर्माची उपागें आधीं किंवा मागाहून न करतां तत्तत्प्रसगीं करावीं असें मानणारा पक्ष २ अशा तऱ्हेनें कर्मांचा अपकर्ष किंवा एखादें कर्म मुख्य कर्मापूर्वी करण्याची क्रिया –वि ताजें, अलीकडील, नवें, साजूक **सद्य प्रतीति**-स्त्री मरणानतर मोक्ष अथवा स्वर्गप्राप्ति मिळण्याऐवजीं याच देहात, याच जन्मीं तिचा अनुभव मिळणें **सद्यस्क, सद्यस्काल, सद्यस्कालीन**-वि साप्रतचें, ताजें, नवें, आजकालचें **सद्यस्तप्त-प्त**-वि अगदीं ताजें, गरमागरम, नुकतेंच केलेलें (पदार्थ वगैरे), नवीनच बाहर पडलेलें (काव्य ग्रंथ वगैरे) **सद्या**-वि प्र सद्यस्क ताजा, सांप्रतचा, नवीन, अर्वाचीन **सद्या-द्यां**-क्रिवि तात्काळ, त्याच क्षणीं, क्षणात, याच क्षणीं, तावडतोब, तेव्हाच 'चक्रानें भस्मसद्या करुनि उडविना त्या महापापिणीचें।' –मो अबरीष (नवनीत पृ २६३) **सद्योव्रण**-पु ताजी जखम, नुकतेंच पडलेलें क्षत, व्रण

**सद्र**—सदर पहा

**सद्रव**—वि आर्द्रतायुक्त, ओलसर, ओलावा असणारा

**सद्री**—स्त्री (गो) सूत व लोंकर यानीं विणलेलें कापड, अर्धसुती, अर्ध लोंकरी कापड

**सद्वंश**—पु चागलें घराणें, उत्तम कुल –वि चागल्या कुलांतील, वंशातील

**सद्वस्तु**—न (चागली वस्तु) १ (ल) परमेश्वर, परब्रह्म 'सद्वस्तु दाखवी सद्गुरु।' –दा ४/४५ २ –स्त्रीन चागला मनुष्य, पदार्थ

सदी—स्त्री शतक 'बारावी सदी आजच भरली म्हणून बहुत खेद केला' -चित्रगुप्त १०९ [फा सदी, तुल स शतम्]
सदी-ही—स्त्री भरभराट, अनुकूल काल, संपन्नता, सुदैव, दशाद्विता [अर]
सदीं—क्रिवि नेहमीं, नित्य, सतत, सदा [स]
संदी—वि (ग्र) सनदी पहा
संदी—स्त्री साद, कोनकोपरा; अडचणीची जागा, सांध्याची जागा 'दोहो देवळाचिए संदी।' -ऋ ११५ [स संधि]
संदीकळासु-स्त्री साध्याची कळाशी, सांध्याचीं हाडें 'संदी कळासु गडबडी।' -माए २०४
सदीपनी—स्त्री (संगीत) १ सोळाव्या श्रुतीचें नाव -पु २ श्रीकृष्णाच्या गुरूचें नाव. [स सम्+दीप्]
सदीवाल—पु एक हुद्दा, अधिकार 'हजारी सदीवाल व जमातदार दहा पधरा यास वर्षे' -भाइबावा ३ ७७. [अर]
सदीस—क्रिवि दिवसभर, सतत, नेहमीं [स+दिवस]
सदु—पु (अप) छद, नाद 'नाहीं आर्ति निर्वेदु। न सडी विषयसदु।' -ऋ ७ [स छद]
सदुक-दूक—स्त्री पेटी 'सदुक मानुसा अलकार।' -वेसीस्व ७ ६ [अर सदूक]
सदुक्ति—स्त्री चागलें भाषण -एभा ३१ २५० [स]
सदुर्ते—वि सिद्ध, तयार. 'बदुका दारुगोळा आदिकरून भारमारी प्रयोजनी सामान यथेष्ट व सदुर्ते करावें' -मराभा ३४. [स सिद्ध, फा इस्तेदाद]
सदुसष्ट—वि ६७ ही सख्या [स सप्त+षष्टि]
सदृढ—वि बळकट, मजबूद, भरीव, गच्च, घट्ट [स सु+दृढ]
सदृश—वि सारखा सम, तुल्य (समासात) एत त्सदृश, तत्सदृश; पितृसदृश [स]
सदे—क्रिवि शेकडा, दरसदे=दरशेकड्यास [फा सदि=शभर]
सदेठ—क्रिवि देंठासह, हेंखासकट 'मिथ्या वादाचीं अपक फळें। सदेठीं क्षड पूर्वकाळें।' -एभा १० २२३ ११ ६६९
सदेव-वा—क्रिवि नेहमीं सतत, सदैव 'त्या गोपि काहीं असती सदवा।' -साहह ४ २१ [स सदा+एव]
सदेव—वि, दैववान्, भाग्यशाली 'आता ऐका सदेव लक्षण। सौख्यदायक।' -दा १९ ४ १ २ उत्तम शाहणा 'ऐक सदेवपणाचें लक्षण।' -दा ११ ३ २४ [स+दैव]
सदेश—वि एकाच देशाचा, तद्देशीय [स+देश]
संदेश-सा—पु निरोप, बातमी, वृत्त वार्ता, आज्ञा 'एक दिवशीं संदेश कला।' -सप्र ७ ७८ [स सम्+दिश]
०हर-पु वार्ताहर, बातमीदार, निरोप्या, जासूद
संदेसा—सदिशा पहा.
संदेह—पु संशय, शंका, अनिश्चितपणा, साशंकता 'तैसें सोडवाया संदेह। तीस जैसें का लोह।' -ज्ञा १६ ११८ [स]
संदेही-वि संशयी; गोंधळलेला, शकेखोर
सदैव—क्रिवि नेहमीं, सतत, नित्य, सर्वकाळ, सदोदित [स सदा+एव]
सदैव—वि दैववान्, नशीबवान, भाग्यशाली 'परी फळला मनोधर्म। सदैवाचा।' -विपू ७ १५४ [स स+दैव]
म्ह० सदैवाची दशी नरदेवाचा पाल्व (लागावा)
सदोदि(दी)त—क्रिवि नेहमीं, सतत, सदा 'तेणें प्रज्ञरसे राजमठ। देखों सदोदीतु।' -ऋ ४३ [स सदा+उदित]
संदोर—पु (व) मोठा दोर घरित्यावर घातलेलें ताणाचें मोठें चव्हाट सोंदर [सोंड+दोर]
संदोली—स्त्री पेटी, सदूक
सदोष—वि १ दोषयुक्त, अपुरा, उणीव, कमीपणा, न्यून असलेला २ चुकीचें, सापराध, गुन्हेगारीचें [स स+दोष]
संदोह—पु समुदाय, समूह जमाव, रास; ढीग, निधि, साठा उदा० भानदसदोह दु खसदोह [स]
सद्गत—स्त्री (सद्गति याचा सक्षेप) उपाय, मार्ग, तर णोपाय, गत्यतर, इलाज, सोडवणूक, सोय, आश्रयस्थान 'कारकुनास चाकरी केल्याशिवाय सद्गत नाहीं' सननागत या वाक्प्रचाराचाहि हाच अर्थ आहे [सद्गति]
सद्गति—स्त्री चांगली गति, मरणोत्तर सुखावह अवस्था, मोक्षप्राप्ति, स्वर्गप्राप्ति, सुस्थितींत, उच्च जातींत पुनर्जन्म, पर लोकप्राप्ति, मरणोत्तर कोणतीहि चागली दशा. 'होतो वृथा प्रतिज्ञा सद्गति न घडो मला घडो वचन।' -मोकर्ण ३५ ४६ [स सत्+गति]
सद्गद—वि अवरुद्ध सद्गदित कठ दाटून आल्यामुळें अडखळलेली (स्थिति) 'मग म्हणतसे प्रसीद प्रसीद। वाचा होतसे सद्गद।' -ज्ञा ११ ५६८ [स सत्+गद]
सद्गदित—वि दु ख, शोक वगैरेमुळें कठ दाटून आलेला, कठ भरून आलेला, दु खाकुल, शोकाकुल, बाष्पसयुत [स]
सद्गीत—न आध्यात्मिक, पवित्र, देवादिकासबधीं गाणें, स्तोत्र सूक्त, भजन [स]
सद्गुण—पु विद्या, कला, शौर्य, सहिष्णुता, उपकारकता इत्यादिसारखा उत्तम गुण चांगला गुणधर्म, चागलें तत्त्व [स सत्+गुण=सोजणें]

**सद्गुरु**—पु आध्यात्मिक ज्ञानाची प्राप्ति करून देणारा, ईश्वरप्राप्तीचा मार्गदर्शक, अज्ञान नाहींसें करणारा उपदेशक, चागलें ज्ञान, विद्या, उपदेश देणारा गुरु [स सद्+गुरु]

**सद्गृहस्थ**—पु प्रतिष्ठित, भला, प्रामाणिक, विश्वासु, सन्मान्य, सद्वर्तनी, प्रेमळ, सौम्य मनुष्य [स सत्+गृहस्थ]

**सतजवाब**—पु (कायदा) उत्तरपक्ष, कैफियत, सयुक्तिक प्रत्युत्तर [स सत्+फा जबाब]

**सद्ट**—वि सदट, सघट पहा घट्ट, मजबूत 'दंत शुभ्र सद्ट। रत्नखचित हेमकट।' –दा १ २ १५

**सद्र**—वि (ग्वा) सदर पहा सर्व, परिपूर्ण

**सद्दा**—पु मोहरमात ताबुताच्या पुढें नेतात तीं निशाणें [अर शद्दा]

**सद्दी**—स्त्री शतक, शेंकडा [फा सदि=शतक, तुल सं शतम्] **दरसद्दे**-क्रिवि दरशेंकडा 'वसूल देत आहेत त्यापैकीं दरसद्दे चाळीस' –वसईची मोहीम

**सद्दी**—स्त्री चलती, भरभराट, भाग्यकाल, अनुकूल परिस्थिति, सुदैव, सद्भाग्य, वैभवकाल, उत्कर्षकाल 'रोमन लोकांनींहि दीड हजार वर्षे राज्य भोगल्यावर त्यांची सद्दी सपली' –नि ६६ 'होते शिपाई जबर सद्दी कैकानीं पाहिली।' –ऐपो ४२३ [अर सअ्द=चलती, ग्रहाची शुभदृष्टि, शुभवेळा]

**सध्दर्म**—पु १ चागला गुणधर्म, सुलक्षण २ चागला धर्म, चागला नियम, वृत्ति, विधि ३ सदाचार, चागली वागणूक, सदाचरण, न्याय्य वर्तन [स] **सद्धर्म बाळगणें-संभाळणें-राखणें**-धार्मिक विधि, नियम, व्रत वगैरे आचरणें **सद्धर्म सोडणें-टाकणें**-धार्मिक विधि, रूढी, व्रतें, नियम याचा त्याग करणें **सद्धर्मानें वागणें-चालणें-राहणें-असणें**-न्याय, योग्य, रास्त वर्तन करणें, सदाचारी होणें **सध्दर्माला जागणें**-योग्य, प्रामाणिक, नैतिक आचरण ठेवणें **सद्धर्मास येणें**-नैतिक, धार्मिक, प्रामाणिक वर्तनाच्या कसोटीस उतरणें, योग्य, रास्त दिसणें वाटणें **सध्दर्मावर टाकणें-घालणें-लोटणें-सोडणें**-एखाद्याच्या सदसद्विवेकबुद्धीवर अवलबून ठेवणें, सदसद्विवेकबुद्धीचा आश्रय घेणें, सद्बुद्धीवर सोंपविणें **सध्दर्मी**-वि सद्गुणी, न्यायी, नीतिमान, योग्य वर्तनाचा

**सध्द्या, सध्द्यां**—क्रिवि आताच, या क्षणीं या घटकेस, यावेळीं, साप्रत [स सद्य]

**सद्बुद्धि**—स्त्री १ चागली, शुद्ध बुद्धि, मन, विचार २ सत्प्रवृत्ति, नीतिपरायणता, न्यायपरायणता, योग्य दिशेकडे कल –वि चांगली बुद्धि, प्रवृत्ति, विचार, मन असलेला [स. सत्+बुद्धि]

**सद्भक्त**—पु चागला भक्त, शुद्ध अंत करणानें, अनन्य, एकनिष्ठपणें भक्ति करणारा, मनापासुन स्नेह, मैत्री करणारा. [स] **सद्भक्ति**-स्त्री अन्त करणापासुन, अनन्य भक्ति, भाव, प्रेमळपणा, लोभ –वि अन्त करणपूर्वक लोभ, प्रेम करणारा, भाव ठेवणारा

**सद्भाव**—पु १ अस्तित्व, स्थिति 'म्हणोनि अज्ञान सद्भावो। कोणे परी न लाहो।' –अमृ ७ २९३ २ साधुत्व, सद्गुणीपणा, सुस्वभाव, सुशीलता ३ चागली मनोवृत्ति, श्रद्धा, सद्वृत्ति 'जे इये स्वप्नींहूनि सद्भावा। नेदावें निघों।' –ज्ञा ११ ६३७ ४ सत्य, योग्य अनुभव, प्रतीति 'हें आलें मज सद्भावा। आता तूंचि सवै।' –ज्ञा ११ ५३६ [स सत्+भाव]

**सद्म**—न गृह, घर, सदन 'धरी सद्म मानी जया नित्य पद्मा।' –वामन, भरतभाव [सं]

**सद्य, सद्य.**—क्रिवि १ तात्काल, त्वरित, क्षणात, तानडतोब, साप्रत, या क्षणीं 'अपूर्व फळें अर्पी सद्य। तो सत्त्वगुण।' –दा २ ७ २९ 'न देववे जाळिल सद्य पापा।' –वामन, वामनावतार १५ २ (कुणबी) साजुक, ताजें, अलीकडील, नुकतेंच [स सद्य] **सद्य'पक्ष**-पु (विधिसबधीं) १ मुख्य कर्माचीं उपागें आधीं किंवा मागाहून न करता तत्तत्प्रसगीं करावीं असें मानणारा पक्ष २ अशा तऱ्हेनें कर्माचा अपकर्ष किंवा एखादें कर्म मुख्य कर्मापूर्वी करण्याची क्रिया –वि ताजें, अलीकडील, नवें, साजूक **सद्य प्रतीति**-स्त्री मरणानतर मोक्ष अथवा स्वर्गप्राप्ति मिळण्याऐवजीं याच देहात, याच जन्मीं तिचा अनुभव मिळणें **सद्यस्क, सद्यस्काल, सद्यस्कालीन**-वि साप्रतचें, ताजें, नवें, आजकालचें **सद्यस्तप्त-प्त**-वि अगदीं ताजें, गरमागरम, नुकतेंच केलेलें (पदार्थ वगैरे), नवीनच बाहेर पडलेलें (काव्य ग्रथ वगैरे) **सद्या**-वि प्र सद्यस्क ताजा, सांप्रतचा, नवीन, अर्वाचीन **सद्या-द्यां**-क्रिवि तात्काल, त्याच क्षणीं, क्षणात, याच क्षणीं, ताबडतोब, तेव्हाच 'चक्रानें भस्मसद्या करूनि उडविता त्या महापापिणीचें।' –मो अबरीष (नवनीत पृ २६३) **सद्योव्रण**-पु ताजी जखम, नुकतेंच पडलेलें क्षत, व्रण

**सद्र**—सदर पहा

**सद्रव**—वि आर्द्रतायुक्त, ओलसर, आलावा धमणारा

**सद्री**—स्त्री (गो) सुत व लोकर यांनीं विणलेलें कापड, अर्धसुती, अर्ध लोकरी कापड

**सद्वंश**—पु चागलें घराणें, उत्तम कुल –वि चागल्या कुळातील, वशातील

**सद्वस्तु**—न (चागली वस्तु) १ (ल) परमेश्वर, परब्रह्म 'सद्वस्तु शाश्वती सद्गुरु।' –दा ४ ४५ २ –स्त्रीन चांगला मनुष्य, पदार्थ

**सद्वासना**—स्त्री चांगली इच्छा, सत्प्रवृत्ति, चांगल्या गोष्टी-कडे कल [ स ]

**सद्विद्या**—स्त्री चांगली विद्या, ज्ञान 'अमृत मुखात मायसी ओती। ती सद्विद्या '-मोउद्योग ३ ५४. [ स ]

**सद्विनियोग**—पु (चुकीनें) चांगला उपयोग, योग्य विनियोग 'उमरावत गीर गोसावी येथें असता त्याचा सद्विनियोग होऊ नये हें चांगलें नाहीं ' -भाव ६९ [ स सद्व्यय, किंवा सद्विनियोग बद्दल ]

**सद्विवेक**—पु १ सारासार विचार, न्यायबुद्धि 'विरक्तास भूषण सद्विवेक ' २ तारतम्य योग्यायोग्य निवड करण्याची शक्ति 'वीं क्रोध ऊर्मि दारुण सद्विवेकें आवरिजे।' **सद्विवेकी**-वि न्यायी, तारतम्य जाणणारा, शुद्ध समंजस योग्यायोग्याची बरोबर निवड करणारा, विचारी

**सद्धुपासना**—स्त्री (अप) सदुपासना योग्यत हेची भक्ति 'सद्धुपासना सत्कर्म।'-दा ५ ३ १२ [ स सत्+उपासना ]

**सद्वृत्त**—न चांगली वागणूक -वि १ सदाचरणी, सत्प्रवृत्तीचा सद्वृत्तेनी, चांगली वागणूक आहे असा २ गोल, वाटोळा, सुंदर, गोल आकाराचा [ स सत्+वृत्त+वृत्ति ]

**सद्वैद्य**—पु चांगला वैद्य, योग्य औषधोपचार करणारा, मर्मज्ञ भिषक् 'सद्वैद्यें जैसें दोषा। अगलीना।' -ज्ञा १६ ४२.

**सद्व्यय**—पु योग्य खर्च उपयुक्त विनियोग, चांगला उपयोग, फायदेशीर खर्च [ स ]

**सध**—स्त्री १ ऐक्य, मिलाफ, सयोग २ सांधा, जोड, शिवण ३ फट चीर, भेग ४ अवधि, मधला वेळ ५ गाठ पेर सांधा ६ (ल) योग्य वेळ, आणीबाणीची वेळ, ऐन प्रसंग 'ढकून देताक्षणीं साधली सध शिपायाला।'-ऐपो ३१५ ७ मैत्री जुळणें, सबंध दृढ होणें तह, समेट तडजोड, पुनर्मीलन [ स सम्+धा ] -वि धारण करणारा, युक्त तद्विशिष्ट, रुळलेला, निगडित, सबद्ध उदा० कपटसध, वरसध, अनृतसध सत्यसध

**सघट**—वि १ सबंध पूर्ण, सगळा, अच्छिन्न असलेला (वस्त्र, काष्ठ, दगड, वस्तु शेत, मार्ग) 'त धार रुतले सघट। रावणहि सोडी धार तिखट।'-रावि ३२ १०१ २ (ल) सरळ, अचूक, निर्दोष (भाषण, वर्तन योजना, काम) ३ क्रिविवि सरळ, समोर सीधा थेट ४ -क्रिविवि स्पष्ट, रोकडा रोख ठोक साफ, निक्षून (उद्दामपणें, उद्धटपणें) ५ -क्रिविवि घट, मजबूत, दाट [ स+घट ]

**सधन**—वि सपन्न, श्रीमंत, द्रव्यवान [ स. स+धन ]
**सधनता**-स्त्री श्रीमंती

**सधन**—स्त्री एक प्रकारची ऐरण सैदान पहा सधन, बटांगण व सुरा ही ऐरणीचींच नांवें आहेत यांपैकीं सधन ही जिनगर, बगेंग व सरा ही नालबद वापरतात [ स. सम्+धा ]

**सधर**—वि बळकट, न हालणारा, आश्रययुक्त, स्थिर 'म्हणोनि बुद्धियोगु सधरु। तेथ अर्जुना होई स्थिरु।'-ज्ञा २ ७२६ -एमा ३ ८९, ५ ३६१ [ स ]

**सधर**—सदर पहा 'सांगू सधरीचा समाचार।'-दावि ७२१

**सधर्म**—वि १ एकाच धर्माचे, एकाच पथांतील सप्रदायातील २ एकच गुणधर्म असलेले, एकाच लक्षणाचे [ स+धर्म ]

**सधर्मिणी**—स्त्री विवाहित स्त्री, पत्नी

**संधला**—पु १ दरजा भरणें, गिलावा करणें वगैरेकरितां चांगला गाळून व घोटून तयार केलेला चुना २ अशा चुन्याचें काम गिलावा, अस्तर [ स सम्+धा ]

**सधवा**—स्त्री सुवासिनी, सौभाग्यवती, पति जिवंत असलेली स्त्री [ स स+धव ]

**सधान**—न उपाययोजना, शक्ति युक्ति, साधनें यांची योग्य तरतूद व योजना, एखादें कार्य घडवून आणण्याच्या कामीं प्रयत्न, बुद्धि व शक्ति यांचा योग्य मिलाफ करून योजना २ योग्य रीति, मार्ग, पद्धति (एखाद्या कार्याच्या सिद्ध्यर्थ) ३ नेम, निशाण, लक्ष्य 'शिपुकर्ठी हा शर लागेल या म सधानें।' -मोकर्ण ४७ ७० ४ कल, प्रवृत्ति, रोख (मन इच्छा, डोळा वगैरेचा) ५ मनाची धारणा, लक्ष्य, अवधान, ध्यान 'मूळ प्रथाचें सधान राखून मग आपलें राखायचें'-नि १९६ ६ कावा, कपट, युक्ति 'चोर नाक होती गिलचांची नाहीं कळलें सधान।' -ऐपो ११८ 'करिता जाहला घोर सधान।'-रावि ३२ ११ ७ पवाड, डबोलें, ठेवा 'आम्हांस मार्गांत कांहीं चांगलेंसें मोठें सधान साधेना '-विवि ८ ८ १५४ ८ सुमार, समय सधि 'दसऱ्याच्या सधानास मी तुमचे गांवीं येईन ' ९ वग वशिला, सूत्र [ स सम्+धा ] **संधानी**-वि हुशार, धूर्त, युक्तिबाज, कावेबाज, सधान लावणारा बांधणारा

**सधान**—स्त्री (कुलाबा) बैलगाडीची शिवळ

**सधि-धी**—पुस्त्री १ जोडणी, ऐक्य, मिलाफ २ सांधा, जोड, शिवण, सांध्यांची रेषा, बिंदु 'अस्ति यत्र कीडिकीडी। सधि कळासु कडकडी।' -भाए २०४ 'बैसलो सधि मार्गीं तुज धरूनि चित्तीं '-तुगा ३२० ३ चीर, भेग, फट, खांच, खड 'मर्यें दडताती सधींत '-नव २४ १३४ ४ अवधि, मधील काल, अवसर अवकाश ५ गांठ पेर, कांडें, जोड ६ वर्णांचा योग, स्वर किंवा व्यजनें यांचा जोड, मीलन सामासिक शब्दाच्या अंत्य व आरंभीच्या वर्णांचें मेलन ७ लक्ष्य, दृष्टि, डोळा, इच्छा, उद्देश 'भिक्षुक पैक्यावर सधि ठेवून यजमानाचें आर्जव करितो ' 'करून आले दक्षिण सधी।'-ऐपो २६७ ८ युग, मन्वतर, कल्प वगैरेपैकीं एक सपूर्ण होऊन दुसरें लागण्याच्या

मध्यतरींचा काल, सधिकाल ९ चोरानें भितीस पाडलेलें भोंक, बीळ, विवर, भुयार, खिंड, भगदाड १० योग्य वेळ, योग्य समय, ऐन वेळ, आणिबाणीची वेळ, अनुकूल वेळ ' यास्तव मोठ्या सधीस सुज्ञानीं दोहोंच्या स्थितीकडे लक्ष्य द्यावें '–नि १ ११ (ल ) समेट, तह, सलाह, ऐक्य, मिलाफ, तडजोड (मैत्री, नातें, सख्य वगैरेची ) ' मज बरोवर सधि करावयास आली होती ' -कम २ -एमा १९ १५६ [स सम्-धा=ठेवणें] ०काल पु दोन कालाच्या मधील अवधि ' आयुष्याच्या अशा सधिकालावर तुम्ही उभे आहात '–कले १ ३७३ ०ग–वि प्रत्येक साध्यातून जाणारें, भिनणारें ( रोग विष, औषध वगैरे ) ०गत वि साध्यात असलेला, शिरलेला ( वायु वात रोग वगैरे ) ०पाद्–पु ज्याच्या पायास साधे असतात असे प्राणी उदा० झास, ढेंकूण उवा, पिसवा, मुग्या, खेकडा वगैरे ( इ ) ऑर्थ्रोपोडा ०प्रकाश–पु सूर्योदयापूर्वी व सूर्यास्तानतर बराच वेळ जो प्रकाश दिसतो तो ०प्रकाशराग–पु (सगीत) सधि प्रकाशाच्या वेळीं गाइला जाणारा राग यात ऋषभ कोमल व गाधार, निषाद हे स्वर तीव्र असतात ०फुटणी–स्त्री १ सधि वाताचा रोग कळा २ (सढळपणें ) साध्याल झालेलें गळू उठाणू ०वंध–वंधन–पुन स्नायुरश्मि; साध्याना बाधणार स्नायूचे दोर ( इ ) लिगॅमेंट ०भग–पु १ सधिवातामुळें साधे धरणें, दुखणें २ साधा मोडण, निखळणें ०वात–वायु–पु ज्यामुळें शरीराचे साधे धरतात, दुखतात असा रोग ( इ ) ऱ्हुमॅटिझम् ०विग्रह–पु तह किंवा युद्ध, मैत्री किंवा कलह मिलाफ अथवा बिघाड, जोड किंवा तोड ०वेला–स्त्री सधिकाल, दिवस व रात्र याच्या मधील काल, कोणत्याहि दोन कालावधींमधील अवकाश उदा० पौर्णिमा, अमावास्या, कालाचा कोणताहि अवधिदर्शक शब्द उदा० सकाळ, दुपार, सध्याकाळ ०सकोच–पु साधे धरण्याचा रोग, सधिवात ०स्फोट–पु १ साध्यास फूट, कळ लागणें २ साध्याच्या ठिकाणीं फोड, सुज आवाद होणें

**सधिन**—न (व ) दूध –वशाप ९ ५१ २९८

**संधिनी**—स्त्री गभिणी गाय –धर्मसिंधु १३० [ स ]

**सधी**—सधि पहा

**सधीर**—वि धीरयुक्त गभीर, धैर्याचा 'तैसें सधीरपरी विरमलें। हृदय तयाचें।' –ज्ञा २ ३ [स+धीर]

**सधेव**—पु (गो ) सदेह; सशय मनाचा गोंधळ [ म सदह ]

**संधेवीं, सधेवींसा**—क्रिवि आतां साप्रत, नुकताच, आतां ( यणें आगमन, गमन ) [ सद्य ? ]

**सध्या-ध्या**—क्रिवि याक्षणीं; तात्काळ, आताच त्वरित 'साधुसीं गाजिता झालें सध्या फळ ' –मोभभग (नवनीत पृ २५७) दाखें ७ १९ ' पाहें माची सध्या प्रतीती।' –मुआदि १६ १८६ [ स सद्य ] म्ह० सध्याच साळी पिकवी दुकाळी=रोज प्रथम अन्न मिळ विणें व नतर खाणें या अर्थी, उत्पन्नमक्षी गौतमऋषि एका दुष्का-ळात रोज धान्य पिकवीत व भक्षण करीत अशा कथेवरून

**संध्या**—स्त्री १ दिवस व रात्र यामधील सधिकाल २ त्रैवर्णि कानीं प्रात काळीं, माध्यान्हीं व सायकाळीं करावयाची दैनिक प्रार्थना उपासना ' हल्लीं सध्या करणें हें ब्राह्मणाना नावच नाहीं ' –टिले ४ १४१ ३ दोन युगामधील सधिकाल ४ सधि प्रकाश, तिन्हिसाजा, उप काल ' सुदती दिती कामार्ता गार्ही सध्येंत काश्यपा. ' –मोमत्र ३ ५९ ५ कालावधि, अवकाश उदा० सकाळ, दुपार, सायकाळ, तिसरा प्रहर [स सध्या] ०काल–काळ–पु सायकाळ, सूर्यास्तसमय ०काळचा तारा–पु शुक्र ज्यावेळीं सूर्यास्तानतर पश्चिमेकडे दिसतो त्यावेळीं त्यास म्हणतात ०काळीं–क्रिवि सायकाळीं, सूर्यास्तानतर ०काळी–स्त्री एक फुलझाड व त्याचें फूल, गुलवाशी ०पात्र न ताम्हन; सध्या करताना पाणी साडावयाचें भाडें ०भट–पु न्यायशास्त्राचा मुताल्लिक –शिदि ४३७ ०मठ–पु सध्या करण्याकरिता बाध लेली जागा, इमारत घर ' सध्यामठ मुरेरी। पायरिया नदी तीरीं।' –दा २ ७ २२ ०राग–पु १ सायकाळच्या वेळीं आकाशात दिसणारा तांबूस रग 'नातरी सध्यारागींचे रग।'–ज्ञा ६ २५८ ' कीं सध्यारागें गवसलें। निवविते पूर्णचद्र प्रकाले।' –ऋ २१ २ (सगीत) सध्याकाळच्या वेळीं गावयाचा राग ०वंदन–न त्रैवर्णिकानीं करावयाची सध्योपासना

**सध्यान्न**—न (अप ) सिद्ध न शिजविलेलें अन्न 'सध्यान्न पात्रें दखिलीं।' –सप्र १५ १७ [ स सिद्धान्न ]

**सन**—पु वर्ष शक साल 'सन १८५२ सालीं ' [ अर सना ] ०वात–क्रिवि सालवार अनेक वर्षे थकलेला ' सनवात बाकी सन तीसापैकीं ' –वाडवावा ३ २२८ [ अर ] ०वदबाकी–वातवाकी वादवाकी–स्त्री अनेक वर्षे थकलेली सरकार देण्याची बाकी विरशेष ०वदपडीत–वातपडीत–वाद् पडीत–वि अनेक वर्षे पडीत राहिलेली (जमीन )

**सनई**—स्त्री पिपाणीसारखें एक मधुर वाद्य, नागस्वर तुतारी सारखें वाद्य सनया नफेरिया बुरगें। –मुवन १२ ५९ [ स स्वन सुनादा फा सुर्ना, व सुर्नाय् ]

**सनक**—स्त्री लहर [ शिणका ] **सनकी**–वि लहरी

**सन-कन-कर-दिशीं-सनकणें-सनका**—सणकन, सणकणें वगैरे पहा

**सनकाडी-वाडी**—स्त्री सणकाडी पहा अबाडी, साग यांवरील साल सोलून काढल्यावर राहिलेली काडी ' मग मुनी म्हणे या ऐक। राळ सनकाडिया स्तभ।' –कथा ५.१२ २.

**सनकादिक**—पुअव सनक, सनंदन, सनत्सुजात व सनत्कुमार हे ब्रह्मदेवाचे चार मानसपुत्र 'जे सनकादिकीं सेविजे। आदरेंसीं।' –ज्ञा १ ५५ [सं]

**सनंग**—न सणग पहा १ कापडाचा तागा, ठाण, नग २ (कशिद) विक्रेयवस्तु, जिन्नस, माल, नग (स्त्री, जनावरवगैरे)

**सनगार**—श्रीपु कारटकातील' चोंगड्या, कांबळी विणणारी एक जात व तींतील व्यक्ति [दे हाण-सण+कार]

**संनत(करण)**—न (नृत्य) उडी मारून व पायांच्या पुढच्या बाजूस स्वस्तिक करून हात थोडे बांकविणें [स]

**सनत्कुमार**—पु सनकादिक पहा

**सनद**—स्त्री अधिकारपत्र; प्रमाणपत्र, राजपत्र, शासनपत्र; परवाना, मुखत्यारनामा [अर सनद्] ०अस्नाद–स्त्री अव सनदा वगैरे 'फिरंगमध्यें सनद अस्नाद जळोन गेली' –गोडसा १२ 'त मोजीब सनदअस्नाद '–बाबयोमारो ९ ६५ [अर सनद्+सनद्चें अनेकवचन] ०मुताबिक–क्रिवि सनदेप्रमाणें ०शीर–वि क्रिवि सनदी, कायदास धरून; नियमबद्ध, पद्धतशीर 'गव्हर्नर आणि सनदशीर राज्यकर्ता या दोहोंत पूर्ण साम्य आहे काय?' –मसव ९२ सनदापत्र–न राजपत्र, शासापत्र, अधिकारपत्र सनदा पाहणी–स्त्री राजपत्रांची तपासणी सनदी–वि १ सनदप्रमाणें; सनदशीर, राजपत्राप्रमाणें अस्तित्वात आलेला 'हे मोख्तसर जमीनदार व पातशाही सनदी जमीदार आहेत '–रा १५ १०० २ लेखाचा आधार असलेलें, सरकारनें नेमलेलें, खरे हकदार 'आरब लोक हबशी ऐका शिपाय सनदी न्यार।'–ऐपो ३४१ 'सनदी तेथें कोण वदा।'–केक १०७ ०इनामदार–पु ज्यास सनद, राजपत्र आहे, राजानें नेमलेला आहे असा इनामदार, याच्या उलट जारी इनामदार

**संनद्ध**—वि सज्ज बांधलेलें, सत्प्त, तयार [स]

**सनपणें**—क्रि उपमेस येणें

**सनपात**—पु सन्निपात 'सनपातें बरळतसे।' –दा ९ ३ ३८ [स सन्निपात]

**सनम्र**—वि सविनय सविनीत, विनयशील [स]

**सनय-यी**—स्त्री १ सनई पहा २ घोड्याच्या दातास सनया म्हणतात –अश्वप १ ११८

**सनर**—स्त्री (व) वाट रस्ता

**सनला**—पु सदला, सधला पहा

**सनागर**—वि सुंदर, चांगला 'कीं निराळीं बोल देखसी सनागर।' –ज्ञा ५ १४१ 'सर्वांगीं अळंकार। शोभले सनागर।' –स्वादि ७ ५ १७ [स+नागर]

**सनाटा-ट**—पु १ शणाटा सपाटा सोसाटा, जोराचा आवाज (वारा, पाऊस, गोरा यणवा, धपाटा, उफळी वगैरेच्या आवाजाचा) (क्रि० पसरणें, लागणें, वगणें, लावणें, मारणें) २ आवेश, जोर, सपाटा, तडाखा, (लिहिणें, पाठ म्हणणें, गाणें, वाद करणें, वगैरेचा) ३ सणसणाट, दणदणाट, टणत्कार, दणका (बंदुकीची गोळी, बाण, दगड, धनुष्यें वगैरेच्या आवाजाचा) ४ याच अर्थी जोर, आवेश, तीव्र वेग वगैरे दाखविणारे तडाखा सपाटा, मारा, मरका वगैरे सर्व शब्द सशब्दित ध्वनीवरून बनलेले आहेत –पु किंवा वि १ फार मोठा, जबर राक्षसी, अवाढव्य; अफाट, बेफाम विस्तीर्ण, दारुण, प्रचंड (पर्वत, रडक वृक्ष हमला गल्बत, हत्ती, नाग, मनुष्य वगैरे) उदा० सनाटा बाजार, वश, शेत, रान, गांव, व्यापार, सावकारी वगैरे) २ भरपूर, मुबलक रेलचेल पीक, बहार रागाचा सनाटा–पु रागाचा सपाटा, आवेश, उमाळा वगैरे (क्रि० येणें) (ध्व) सनाटून–क्रिवि सपाटून, जोरानें, तीव्रतेनें, सपाट्यानें, आवेशानें; दणकून, सणसणून, सणसणून

**सनातन**—वि शाश्वत, चिरकाल, अव्याहत, अबाधित, पुरातन कालाचें, अनादिसिद्ध [सं] ०धर्म–पु अनादिकाल पासून चालत आलेला परंपरागत धर्म

**सनाथ**—वि ज्यास प्रभु मालक आश्रय, संरक्षक, मित्र आहे असा, धन्य 'मज बोळगे पसायदान। दीजो जी सनाथु होईन।' –ज्ञा १६ ४७१ [स स+नाथ] सनाथा–स्त्री सुवासिनी स्त्री, सौभाग्यवती, पति जीवत असलेली स्त्री

**सनाद**—वि १ नादयुक्त आवाज करणारें, स्वभावत आवाज उत्पन्न करणारें उदा० बायाची तार धातूची तब कडी वगैरे २ वाजणारा आवाज काढणारा [स नद्=आवाज करणें]

**सनाना**—न (कु) भाताची एक जात

**सनाभ**—वि ज्याच्या उजव्या व डाव्या दोन्ही समासावर भाष्य, टीका लिहिल्या आहेत असा (ग्रंथ) [स स+नाभि]

**सनाभि**—पु १ नातलाईक, भाऊबंद सपिंड २ सहोदर, सख्खा भाऊ एकाच आईपासून झालेला [स स+नाभि]

**सनाह**—सन्नाह पहा

**संनिकर्ष**—पु सान्निध्य समीपता; सामीप्य, शेजार, जवळ असणें [स] संनिकर्षण–न जवळ ओढणें, करणें, आणणें संनिकृष्ट–वि जवळचा; सनिध असलेलें 'कार्य कारणाचे परंपरेंत अखेरचें जें कार्य त्याच्या संबधानें उत्पत्त्यास सनिकृष्टकारण असें म्हणतात'–न्यायपद्धति १२७

**सनिध, सन्निध सनीध**—क्रिवि शेजारीं, जवळ, समीप 'सन्निध बैसोनि आपण। दिधलें भोजन यथा रुची।' –एरुस्व ३ २५ [स]

**संनिधान सन्निधान**—न सानिध्य, सामीप्य, शेजार, जवळीक 'तया सनिधानाची वेडी । जया नव्हेचि वरिपडी ।' —भाए ५० 'यासी करावें सनिधान । निहाळावें सुदर वदन ।' —रासप १ ५५९ [ स सम्+नि+धा ]

**सनीज**—स्त्री नवारीची बाधणी, पट्टा, बद 'सनीजा, चापी वदुखाच्या '—वाहसमा ४.२८ [ फा ]

**सनीन**—पु घोडयाच्या डोक्यावरील तुरा, अश्वशृग [फा]

**सनीन**—स्त्री ( प्र ) सगीन पहा बदुकीच्या शेवटीं जोडावयाचें अणीदार शस्त्र

**सनेधान**—न सनिधान पहा 'चढत वाढते सनेधान ।' —दा १२ २ २७

**सनोळख**—वि आळखीचा, माहितीचा, परिचित 'जें जगचि सनोळख । जगेंसीं जुनाट सोयरीक ।' —ज्ञा १३ ३५७ [ स+ओळख ]

**सन्नटा, सन्नाटा**—वि सनाटा पहा **सन्नाट्टन**—सनाट्टन पहा **सन्नावणें**—अकि तडाखा मारणें

**सन्नति**—स्त्री आदरपूर्वक नमस्कार, नमन [ स ]

**'सन्नद्ध, सन्नध**—वि सज्ज, तयार सिद्ध; सायुध 'सनद्ध करता दळभार । येथें लागल उशीर ।' —एरुस्व ५ १ [ स सत्+णह्—बाधणें ]

**सन्नाह**—पु ( तंजा ) साहित्य, सामानसुमान, सरजाम 'वर लिहिल्याप्रमाणें सनाहद्दी बरोबरी घेऊन युद्धास आला ' —मऐशि १५०७ [ स ]

**सन्नाह**—पु चिलखत, ढाल [ स ]

**सन्निपात**—पु १ मिश्रण, मिसळण, एककाग २ एकत्र होणें, मिळणें, जमा होणें, गोळा होणें, समाज समूह, समुच्चय ३ जोडणी, जुळणी, सबध, मिलाफ ४ पतन, आगमन, अवतरण ५ एक रोग, कफ वात पित्त याचा एकत्र जोर 'तेवी परमार्थे जिही दुरावला । तयालागीं झाला सन्निपात ।' —तुगा ३११० [ स ]

**सन्निभ**—पु गोभेद —पदाव ७८. [ स ]

**सन्निविष्ट**—धावि १ पूर्णपणें प्रविष्ट झालेला, आत बसलेला २ ( ल ) मग्न गुग गुगलेला, गढलेला, व्यग्र ( अभ्यास, काम वगैरमध्यें ) ३ निष्णात निपुण, पारगत [ स ]

**सन्निवेश**—पु १ अत प्रवश पूर्ण शिरकाव २ पूर्ण व्यग्रता, मग्नता ३ नैपुण्य, कौशल्य; पूर्ण ज्ञान [ स ]

**सन्निहित**—धावि !जवळ, शेजारीं, समिप, आसपास [ स ]

**सन्मति**—स्त्री चागली बुद्धी, सुविचार, योग्य प्रवृति —वि सुविचारी, चागल्या मनाचा, बुद्धीचा, नीतिमान, समजदार [स]

**सन्मात्र**—न ब्रह्म [ स ]

**सन्मान**—पु आदर, सत्कार, मान, पूज्यता. **सन्मानणें**—उकि मान देणें, आदर करणें, सत्कार करणें **सन्मानदार**—पु. आदरणीय मनुष्य, अधिकारी मनुष्य 'नेघेचि तो मद विलासु। मुलोनि सन्मानदाराच्या सुवासु।'—व ३९१ **सन्मानित, सन्मानी**—वि मान्यता पावलेला, ज्याचा आदर झाला आहे असा, पूज्य समजलेला, सत्कारित **सन्मान्य, सन्माननीय**—कि आदरणीय, पूज्य, मान करण्यायोग्य, पूजार्ह [ स ]

**सन्मार्ग**—पु चागला, योग्य मार्ग, रस्ता, रीत, पथ [स ]

**सन्मुख**—पु ( साके करवीर ) न्हावी, हजाम ( हा नेहमीं पुढें असतो म्हणून ) —विकिवि समुख, समोर, पुढें 'जेथ भीष्मद्रोणादिक । जवळिकेचि सन्मुख ।' —ज्ञा १ १७५ 'सन्मुखें विमुख जगेंसीं । न घडे तुला ।' —ज्ञा ११ ५३१ [स ] ०काल—पु अनुकूल शुभ काल, वेळ, प्रसग, उत्कर्षाचा समय

**सन्यपात**—पु ( प्र ) सन्निपात पहा 'सन्यपाताचेनि दुखें ।' —दा ५ ६ ६४.

**सन्या**—पु ( व ) अर्धा आणा

**सन्या**—क्रिवि ( व. ) शानि पहा 'जाऊनसन्या उपयोग काय '

**. सन्याव**—पु योग्य न्याय, रास्त गोष्ट 'अन्यावो तो सन्यावो करुनि दाखविला ' —पच ३ १८ [ स सत्+न्याय ]

**संन्यास**—पु १ सर्वस्वाचा त्याग, सर्व त्याग 'माझ्या स्वरूपीं धनजया । सन्यासु कीजे।'—ज्ञा १८ १२६० २ चतुर्थाश्रम **संन्यासिणें**—कि टाकणें, त्याग करणें 'हे सैन्यासिले अवगुण। जिया वाचा ।' —ज्ञा १३ २७१ म्ह० सन्यास घेऊन आईचा उतराई होणें—पुत्रानें सन्यास घेतल्यास आईस सद्गति मिळते अशी समजूत आहे या वरून **संन्यस्त**—वि १ त्यक्त, सोडलेला, टाकलेला २ सन्यासी सन्यास घेतलेला **सन्यासी**—पु १ सर्वस्वाचा त्याग केलेला २ यति, चतुर्थाश्रमी

**सन्देव**—पु ( राजा कुग अप ) सशय पहा —मसाप २ १०६

**सनसनणें, सनसनाट, सनसनीत, सनसर, सनानणें**—सणसणणें वगैरे पहा 'एणें बोलें सनानली ।' —शिशु १८६

**सन्सरणें**—अकि ( माण अप ) सचरणें, सचार होणें

**सप**—पु पूर्ण नाश. सप्पा पहा

**संप**—पु एकजूट, सपण्ण, सघ; एकोपा, एकमत्य 'वेढयाच्या लोकानीं आणाशपथा घेऊन असा सप करून गेल्यास

खरोखर मारपीट चुकली जाणार आहे ' -विदिप्त १ १०९ [स घपू-समवाये] संग करणें, सपादर जाणें-कामगारांनीं एकमत करून काम बंद पाडणें हरताळ पाडण

**सपक**—वि अळणी, बचर, नीरस, पाणचट ' उपशम परम मधुर परि त्याग केवळ तिला सपक राया ' -माउदोग ११ १८२ ' एक ऋतूतील फळें दुसऱ्या ऋतूत सपक लागतात ' -नि ९३१ [ह्रा चप्पग] सपक पिठलें-न १ (तजा) दोडक व पडवळ याचे वजन घालून कलेली मुगाची आमटी २ अळणी, कमी मीठ तिखट असलेले पिठलें

**सपका**—पु दबका, जाराचा तितोडा, तिरकाव ' नाना फडणविसांनीं वोव ऱ्या तोंडावर सपका मारला '-लेलेप्रेममाला [ध्व]

**सपकल-पाल**—वि सवखल घवखल पहा

**सपच्छ(त्श)नवार**—पु श्रावणातील शनिवार [स रात्र+शनिवार]

**सपन्जु(त्शु)क्रवार**—पु श्रावणातील शुक्रवार

**सपट-टें**—न (ना) सपीठ [स सम्+पिष्ट]

**सपटोळी**—स्त्री सापगोळी पहा

**सपडप**—विक्रिवि सुशोभित सुभूषित, सवस्त्रभूषण ' तैसीं निरर्थकें ऊटें । होऊनिया सपडपें।'-अमृ ६ १०० [स+पडप]

**सपणें**—अकि १ खर्च होणें; नि शेष होणें, व्यतीत होणें, खलास होणें, सरणें २ शेवट होणें अतास, ढवगास जाणें, समाप्त होणें ' जें सपता श्लोकीं देवो । बोलिले ऐसें।'-ज्ञा १८ ६० ३ (ल) मरण निकाल होणें निकालात निघणें [स समापन]

**सपत सपत्ति**—स्त्री १ धन, सपदा, श्रीमती, मालमत्ता, २ सपादणी, प्राप्ति कमाई, लाभ फायदा मिळकत ' तुमचे योगानं आम्हाला इष्टसंपत्ति झाली ' ३ ऐश्वर्य उत्कर्ष, 'भा, अभ्युदय, वैभव [स] संपत्तिमान्-वान्-वि श्रीमंत, सधन, ऐश्वर्ययुक्त, धनिक, सपन्न

**सपत्-शनवार सपत् शुक्रवार**—सपच्छनवार, सप च्छुकवार पहा

**सपत्न**—पु १ सावत्र २ (ल) शत्रु वैरी, विरुद्ध पक्षाचा मनुष्य ' भनुसपर्श केला सपत्नीं कुभावीं '-मुरामायण, बालकांड [स]

**सपत्नी**—स्त्री सवत [स समान+पति]

**सपत्नीक**—वि स्त्रीसह बायकोसह सभार्या [स]

**सपदा**—स्त्री १ धन दौलत पैसा द्रव्य ' सपदा बहु आलियावरी । सोयरे जमा होति त्या घरीं । ' २ ऐश्वर्य, वैभव, श्रीमती, उत्कर्ष [स]

**सपन, सप्न**—न (अप) स्वप्न पहा ' सपन झाले सार। -ऐपो १३१

**सपन्न**—धावि १ युक्त, मंडित (समासांत) विद्या-धन-शास्त्र-ज्ञान-धन-गुण-पुण्य-सपन्न ' अहो संपन्न गर्ते गुणें।' -तुगा ७१४ २ श्रीमंत; ऐश्वर्ययुक्त वैभववान् उत्कर्षयुक्त ३ अर्जित, मिळविलेले, सपादिलेलें, कमावलेले ' आतां देह वाचा चित्तें। यथासपन्नें वित्तें।'-ज्ञा १६ ८५

**सपर-सपरि-री**—स्त्री (व) छप्पर, छपरी, आच्छाद लेली पडवी छपरी पहा

**सपरिकर**—वि परिवारासह ' स्नान भोजन अलंकार। सांग पूजा सपरिकर। ' -एभा २७ १३३.

**सपरिवार**—वि स्वजनासह, इतमामासह, नोकर चाकरासह, आप्त, इष्ट, मित्र यासह

**सपर्क**—पु १ स्पर्श, ससर्ग, सबध ' मग ज्ञानाग्निसपर्कें। कडसिलें विवेकें। '-ज्ञा १५२ २ सयोग, मिश्रण, सहवास, एकत्रितपणा [स सम्+पृच्=स्पर्श करणें]

**सपर्यंत**—वि सपूर्ण, साग, शेवटपर्यंत, सान्त ' इयेत करणासचि ठावा तयोग जो सपर्यंत। ' -मोकृष्ण ८६ ७ [स सं+परि+अंत]

**सपर्या**—स्त्री पूजा, उपचार ' न ना पुष्पें फळें सपर्या श्रीगुरु राया। '-सप्र १५ २३ [स]

**सपल**—पु १ (जरतार) (मर्सराइज सिल्कचा) कृत्रिम रेशमाचा चौकोनी विणलेला गोफ २ नमुना (इ) सँपल

**सपल्लव**—वि १ पानासहित, पानाचे झुबके असलेला २ सविस्तर, सभाष्य ' तेय विधिनिषेधीं सपल्लव। वेदवाक्यांचें अभिनव। '-ज्ञा १५ १५७ [स स+पल्लव]

**संपविणें**—उकि १ खर्चून टाकणें नि शेष करणें, सरविणें, खलास करणें २ शेवट करणें, पूर्णतेस नेणें, समाप्त करणें, उर कणें, सिद्धीस नेणें [सपणें प्रयोजक] सपविणें-सोपविणें याबद्द लहि चुकीनें हा शब्द वापरतात ' आज दूर्वा आणण्याचें काम तुजकडे सपविलें आहे ' -रत्नकांता ३ ३

*सपशेल-ला, सपशैल-ला, सपसल-ला सपसेल-ला, सपसैल-ला*—क्रिवि १ विस्कळितपणें अव्यवस्थित पणें (क्रि० पडणें, कलडणें, निजणें अंग टाकणें, भार टाकणें; बसणें) २ अस्ताव्यस्त पसरलेला, (पडलेला, विखुरलेला), विस्कळितपणें उडालेला (एखादी पडलेली इमारत, वगैरे) ३ पूर्णपणें, निखालस

**सपसप-पा**—क्रिवि १ भरभर झपझप, झपाट्यानें, पटा पटां (क्रि० करणें बोलणें देणें, मारणें) २ मर्दीनें, निडळाळ धीपणानें, हलगर्जीपणानें ३ तडाक्यानें, चपळाईनें, झटक्यासरसें

**सपस्कर**—पु सोपस्कार पहा.

**सपळ**—पु (वे) आवाज [का सप्पळ=आवाज]

**सपक्ष**—वि १ पख किंवा पिसें असलेला २ एकाच बाजूस, फळीस असणारा, एकाच पक्षातील, ३ (न्यायशास्त्र) नद्धर्मी अस्तित्पर्शी, समवायी असणारा उदा० महानस हें अभियुक्त सदोदित असतें म्हणून सपक्ष तर त्याच्या उलट नदीचा डोह कधींच अभियुक्त नसतो म्हणून तो विप.र ३ साधार, मयप्रति पादित, मागें आश्रय आहे असें (तरव, व्यक्ति वगैरे) [स+पक्ष]

**सपा**—पु छापा पहा 'तिनदा गेला सपा घालाया भाऊ साहेबावर।'-ऐपो ३४३

**सपा**—क्रिवि पूर्णपणें, सपाइ पहा 'तव कृपेची दृष्टी असतां। सपा मिरवू सवे क्षमिता।'-नव २३ १११

**सपाइनि**—क्रिवि पूर्णपणें, सर्वस्वीं 'कैसी वो मातुसे। सपाइनि परवसें।'-शिशु २१६

**सपाई-ई-यी**—विक्रिवि यच्चयावत्, सपूर्ण, सर्वैथैव, साफ, सपशेल 'तया देहा म्हणती भेरी। ह सपायी निर्जिव गोष्टी।'-ज्ञा १३ १०९७ -एभा २३ ३१६ [स स+पाद]

**संपाक**—पु स्वयपाक, अन्न शिजविणें, उकडणें, राधणें [स्वयपाक]

**सपाखर**—वि कृपाळु सदय 'ह नि:शकपणें सपाखरे। पचानन।'-ज्ञा ९ २०५ [स+पाखर]

**सपाट**—वि १ समतल, एका पातळींत असलेलें, गुळगुळीत, खाच खळगे, उचवटे नसलेलें, समान, सारखें २ काठाबरोबर सारखें केलेलें, शीगलोट, शीग मारलेलें (धान्याचें माप वगैरे) ३ स्थिर, शात, समपातळींत 'आणि उदक सहज सपाट जाहलें।'-ज्ञा २ १०७ ४ नष्ट, नाहींसें 'हाक मारिताचि भीमें। कपट होय सपाट।'-मु सभा १४ ३६ 'मतें मतातरें सगट। प्रत्ययें बोलोन करी सपाट।'-दा १५ २ १७ [स स+पृष्ठ] **सपाट करणें**-नाश करणें, नायनाट करणें, धुळीस मिळविणें 'वाट न द्विज, करितो, विश्वासि सपाट अधकारातीं।' -मोकर्ण ३५ २६ 'ममश्रोती आलिया नीट। त्याचें करीन सपाट। यम लोकीं मिरवीन।'-नव १४ १८१ **सपाट होणें**-साफ होणें, नाहींसा होणें 'जेणें होती सपाट सदाय।'-एभा २९ ५१९ **सपाट सुपली**-चपटया नाकास विनोदानें म्हणतात नकटया नाकाचा, बसकट नाकाचा **सपाटी**-स्त्री १ समपातळी, सपाटपणा, सरळपणा, समपृष्ठत्व २ सपाट मैदान, एका पातळींतील जमीन, पठार, ओटा

**सपाटणें**—झपाटणें पहा

**सपाटा**—पु १ झपाटा पहा. -वि (वस्तूच्या पूर्वी) अवाढव्य, अगडबब, फार मोठा 'सपाटा डोंगर, सपाटा घोडा, सपाटा वाडा, इमारत, घर, सपाटा साप' 'एका सपाटया पेटा न्यांत तो बसला'-नि ३३८ 'मोठा सपाटा शुद्ध बनणार' -नि ३७१ २ जोरदार, रेलचेल, भरपूर 'सपाटा पाऊस, सपाटा पीक, सपाटा क्रम' **सपाटा(टे)नंद**-क्रिवि जोरानें, सपाटयानें; एकदम **सपाटया**-वि सपाटा पहा **सपाटून**-क्रिवि झपाटयाचा, जोराचा, आवेश युक्त 'सपाटून पाऊस पडणें'

**सपात**—वि (राजा) सलग

**सपातजाडा**—पु (चांभारी) एक प्रकारचा साधा मारवाडी पद्धतीचा जोडा हा स्त्रिया वापरतात

**संपात**—पु १ सयोग, समीलन, भेट, सगम (रस्ते, नद्या वगैरेचा) २ टक्कर, तडाखा, धडाका, प्रहार ३ विषुववृत्त क्रातिवृत्तास ज्या ठिकाणीं छेदितें ते बिंदू प्रत्येकी ४ सुयाचें या छेद बिंदूशीं गमन 'मेषसपात, तुला सपात' ५ हुतशेष, अग्नीस आहुति दिल्यानतर हवनीय पात्रात राहणारा अवशेष [स सम्+पत्] **०चलन**-न अयनचलन, सपातबिंदूचे हद्द हद्द स्वस्थानापासून दूर सरकणें, मागें जाणें **०बिंदू**-पु सपात अर्थ ३ पहा **०रेषा-रेखा**-स्त्री १ स्पर्शरेषा, वर्तुळास चाटून जाणारी रेषा २ क्रातिवृत्ताच्या पातळीस विषुवाची पातळी ज्या रेषेंत छेदिते ती रेषा -सूर्यमाला १२.

**सपातळ**—वि पातळ, झिरझिरीत 'म्हणोनि तें तैसें पोलणें। नव्हे सपातळ आड लावणें।'-ज्ञा ६ ११४

**संपादक**—पु १ वर्तमानपत्र, मासिक, मोठा ग्रथ याची मांडणी, जुळणी करणारा जबाबदार लेखक २ एखादा जुना ग्रथ प्रती तपासून टीपा वगैरे देऊन तयार करणारा -वि १ मिळविणारा, कमावणारा, अर्जन करणारा २ वतन, जहागीर, हक्क, मालमत्ता वगैरे प्रथम मिळविणारा, सपादन करणारा ३ विवाहादि समारभाचा मुख्य शासक, व्यवस्थापक, कार्यकर्ता, कारभारी. [स पादणें]

**संपादणी, सपादणूक**—स्त्री १ अर्जन, मिळविणें, पैदास, कमाई, साधना, सिद्धि २ वतावणी, निवाह, निभावणूक, वेळ मारून नेणें, पुढें केलेली सबब, सोंग पार पाडून नेणें, निभावणें. 'आपुलेचि बोल बाउगे। त्याची सपादणी करणें लाग।'-दा १ ६ २१ 'तुम्ही लटक्याच वार्ता सागोन। सपादणी करता गे।' -ह २७ १८ 'समर्थपणें हे करा सपादणी। नसतेंचि मनीं धरिल्याची।'-तुगा १२९९ ३ नक्कल, सजावट (हरिदास एखाद्या गोष्टीची करतो तशी), योग्य तऱ्हेनें उभारणी ४ पात्राचें सोंग, सोंगाची वतावणी, हुबेहुब नक्कल, सोंगास अनुसरून हावभाव 'नट जेवीं करी जाया वेषें सपादणी।'-सिम ५ १४३ ५ व्यवस्था, समारभाची साधना, सिद्धि, योग्य तऱ्हेनें कार्याची उठावणी, पार पाडणें [स सम्+पद्] **संपादणें**-उक्रि १ अर्जन करणें, मिळविणें, प्राप्त करून घेणें २ सिद्धि करणें, तडीस

नेणें, पार पाडणें, उरकणें २ बनावणी करणें 'नट नाट्य मी संपादूं जाणती यो।' –तुगा १४२ संपादन–न १ २ पादणें, मिळविणें, जोडणें, प्राप्ति २ सिद्धि, साधना, कार्यपूर्ति ३ बतावणी, निभावणी संपादनी–संपादनूक–वि संपादणी, संपादनूक पहा संपादित–वि मिळविलें; प्राप्त, सिद्ध

सपासप–पां—क्रिवि झपाझप, चपाचप सरसरा; जोरानें, त्वरेनें, झपाटानें (क्रि० मारणें, तोडणें, तासणें) [ध्व]
सपासपी–स्त्री झपाझपी, सपासपी, जोराची, त्वरेची, झपाट्याची क्रिया (मारणी, तोडणी, तासणी वगैरे)

सपाळ—वि (राजा) उत्तम व पुष्कळ दूध देणारी (गाय वगैरे)

सपिंठी—स्त्री सपीठ पहा

सपिंड—पु १ श्राद्धामध्यें ज्यास पिंड मिळण्याचा किंवा देण्याचा अधिकार आहे असा आप्त, नातेवाईक, सवधी आपल्यापासून पितृद्वारा वरील सातपिढ्यापर्यंत पूर्वज व त्या प्रत्येकाची ७ पिढ्यापर्यंत संतति [सपिंड नातेवाईक हे तीन प्रकारचे असतात– १ ज्याचें अशौच धरावें लागतें असे २ ज्याच्याशीं विवाह वर्ज्य आहे असे व ३ जे दायभागांत अशभाक् असतात असे अशौच सपिंड–पित्यापासून सात पिढ्यापर्यंत जे पुरुष त्यांचे सगोत्र वंशज व तसेच ज्यास पिंड देण्याचा किंवा घेण्याचा अधिकार आहे असे पुरुष विवाहसपिण्ड–पित्यापासून सात पिढ्यापर्यंतचे व मातेपासून पांच पिढ्यापर्यंतचे पुरुष दायसपिण्ड–१ पिता, पितामह प्रपितामह व पुत्र, पौत्र, प्रपौत्र व दौहित्र, मातामह प्रमातामह वृद्धमातामह व त्याचे पुत्र पौत्र व प्रपौत्र ] २ खडा, ढेप 'तयाचे सपिंड काढावे चिरें। पुरुष प्रमाणें।' –एभा १६ १८, –शिशु ७९७ [स स+पिंड=गोळा करणें] सपिंडी–स्त्री मृतमनुष्या सबधीं बाराव्या दिवशीं करावयाचें श्राद्धकर्म

सपिती सपीति सपीती—स्त्री सहपान, एकत्र पान करणें 'दहाव्या दिवशीं आपल्या धर्मादिकाऱ्यासह सर्व जात सपितीसाठीं प्रेताच्या घरीं जमते' –आगर ३ १५८ [स स+पा=पिणें]

सपिली—क्रिवि पोराबाळासह समूळ, अजीवात 'तेव्हां प्रत्याहारें खाती केली। विकाराची सपिली बोहली। इंद्रियें बांधोनि आणिलीं। हृदयाआंतु।' –ज्ञा ६ २१५ [स+पिलु]

सपीट ठ—न गव्हाचें बारीक पीठ गहू ओल्लून दळून करतात तें बारीक पीठ [स सपिष्ट सपिष्ट]

सपील—स्त्री (व) गांवाभोंवतालची भिंत, तट, परकोट सफेली पहा

सपील—वि (गो) गाय किंवा म्हैस यांचें सर्व दूध पिणारें (वासरूं), जिचें दूध मालक काढीत नाहीं, सर्व वासरास पाजतो अशा गाईचें (वासरूं) –क्रिवि सर्व दूध पिण्याकरितां 'वासरूं सपील सोडलें, प्यालें' [सं स–सर्व+पा–पील]

सपुट—वि (को) १ निरंत, मजबूत, भरदार (लिंग वगैरे.) यांच्या उलट पोली, पोकळ, निर्जीव २ भरदार, भरलेली (शेंग वगैरे) [स स+पुट]

संपुट—न १ पुड, करंडा, शेवळी, दोन्ही तोंडें एकावर एक ठेवून मिटावयाची करंडी आदि, शिंपला निढाराचेनि वोंदाटें। मोतिय नावरती संपुटें।' –ज्ञा ६ २६६ 'ज्ञानवैराग्य शुक्ति संपुटी' –एहंभ १४० २ मिटलेली ओंजळ, एक उताणा व त्यावर एक उपडा हात ठेवून केलेली पोकळ मूठ 'ठेविती त्यां दावरी करवें। करसंपुटें।' –ज्ञा ११ ३३६ ३ (व) उभा जाय, प्याला 'पाणी प्यावयास तेवढें संपुट आण' ४ (खा) पाणी भरण्याचें पक्वान्न [स] संपुटीकरण–न दोन पदार्थांच्या पोकळींत बंद करणें, पकडणें

सपुत, सपूत—पु १ सुपुत्र, चांगला मुलगा। २ परिपूर्ण, भरीव 'सपुत वाश्यापरी सुरकनी।' –ऐपो २२३ –वि पुत्र असलेला, सपुत्र [स स+पुत्र]

सपु(पु)दा—वि (कर) आधार, पाठिंबा, पुरवठा 'मागें कोणी तरी सपुदा असल्याशिवाय मोठीं कामें पार पडत नाहींत' [स. स+पुर्]

सपु(पू)र—वि बारीक; सूक्ष्म, निमूळता 'ये ह्वीं सपुरपण तयाचें पाहावें।' –ज्ञा ८ १६ 'रेखिलीं परिकरें। सपुरें सैंनेभारें।' –ऋ ७३ 'जेथ साहित्य वाणें सपूर। उन्हाळाचें' –ज्ञा १ ६०

सपुरता—वि पूर्ण, सपन्न, पुरेसा, भरपूर 'सर्वांगुणीं सपुरता। ऐसा पिता असानि।' –तुगा १४११ 'तेंहीं केलिया आदर। आमचा मनोरथ सपुर।' –निमा १ १०२ [स स+पुर्]

सपुष्ट—न देव ठेवण्याचें पात्र बगी सपुट पहा 'न माय ब्रह्मांडीं तो सपुष्टासनीं।' –तुगा ४७८ [स सपुट]

सपुष्टांत येणें–१ (ल) सकोच पावणें, आखडणें, कमी होणें २ मुठींत सापडणें, कबज्यांत येणें

संपूर्ण—न एखाद्या विधीची समाप्ति व त्या कालचा समारंभ, ब्राह्मण भोजन वगैरे, उद्यापन –वि १ सर्व, सगळें, प्रत्येक, एकूणएक सकल २ पूर्ण, अख्खें, सर्वच्या सर्व, समग्र ३ समाप्त, पूर्ण झालेलें संपलेलें संपूर्ण कलावतीची खाण–स्त्री सर्वगुणसंपन्न मनुष्य, सर्वकलाकुशल इसम संपूर्णता–स्त्री १ समाप्ति, सिद्धि शेवट, पूर्णपणा २ उद्यापन, सांगता संपूर्ण तान–स्त्री (संगीत) सात स्वरांची तान संपूर्ण राग–पु ज्या रागास सात स्वर लागतात व कोणताहि स्वर वर्ज्य नसतो असा राग

**संपृक्त**—वि (शाप) ज्या द्रवामध्यें एखादा पदार्थ शक्य तितका पूर्णपणें विद्रावित केला आहे असा (द्रव) (इं) सॅच्युरेटेड

**सपृष्ठवंश**—वि (शाप) ज्याच्या पाठीला कणा आहे असा (प्राणि) (इं) व्हर्टिब्रेट [स]

**सपेली**—स्त्री सफेली पहा

**सपोट, सपोटी**—क्रिवि जेवणखाण सुद्धा, खाऊनपिऊन याचे उलट कोरडा (नोकर ठेवावयाचे वेळीं कोरडा किंवा जेव णासह पगार ठरवितात) **सपोटी**-वि जेवणासह, खाऊनपि ऊन याचे उलट निपोटी म्हणजे कोरडा, जेवण वगैरे न धरता पगार वगैरे)

**सपोत**—वि चांगल्या, बारीक पोताचें (कापड) 'ऐसीं भीतभगा नेहटी। सपोतें माजिठीं।'—ऋ ६९

**सपोल**—वि पोकळ, निष्फळ, व्यर्थ

**सपोश-प-स**—वि पुष्ट, लठ्ठ, पोसलेला 'जो गुरुप्रेमें सपोषु'।—ज्ञा १३ ४४२ 'सरळ बाहू सपोश।'—एरुस्व १५ ५३ [स सं+पोष]

**सपोळा**—पु एक प्रकारची बावडी, पतग

**सप्टेंबर**—पु इग्रजी वर्षाचा नववा महिना [इं.]

**सप्त**—वि सात ही संख्या [स] **०ऋषि**-पुअव १ प्रत्येक मन्वतरातील सात ब्रह्मर्षि याच्या नावाबद्दल एकवाक्यता नाहीं सध्याच्या मन्वतरातील सप्तर्षि-कश्यप, अत्रि, भरद्वाज, विश्वा मित्र, गौतम, जमदग्नि व वसिष्ठ अन्यत्र मरीचि अत्रि अगि रस पुलस्ति-स्त्य पुलह, क्रतु व वसिष्ठ अशीं नावें आढळतात सप्तर्षि अथवा ऋक्ष नक्षत्रातील ह सात तारे आहेत कश्य पादि प्रसिद्ध। सप्तऋषी।'—ज्ञा १० ९२ २ (साकेतिक) सातारा शहर 'पानगावचा राजा सप्तऋषीस येत आहे'—रा ८ १८३. 'सप्तऋषि गिरिवरी माझी प्रतिज्ञा—सप्र ५ १३ **०क**-न १ साताचा समुदाय २ -वि सातवा **०कंचुक**-वि (पचमहा भूतें अहकार व महत्तत्त्व हीं) सात आवरणें, वेष्टणें असलेला 'त्यामध्य सप्तकंचुक पिंड।'—दा १६ ७ १५ 'सप्तकंचुक ब्रह्माड।'—दा १५ ८ २९ **०कर**-पु अग्नि **०करनेत्र**-पु शिव अग्निनेत्र **०करणें** नअव (ज्यो) बव, बालव, कौलव, तैतिल गर, वणिज व विष्टि हीं सात करणें **०कुलाचल** पुअव सात मोठे पर्वत महेन्द्र मलय, सह्य शुक्तिमान्, गधमादन, विंध्य पारियात्र **०कोण**-पु सात कोन असणारी सरळ रेषांनीं मर्यादित आकृति **०क्या**-वि सात, सात दिवसाची कगर वर्षाची मर्यादा धरून तप करणारा 'नव नाडी, बावन आड तेथें एक सप्तक्या ब्राह्मण तप करीत आहे'—काहणी निष्णूची **०खणी**-पु स्त्री सात खणाचा महाल 'तया मागें सप्तखणी। शोभे कनक वाळुवर्णी।'—कथा १ ६ १५६ **०गणी-गाणी**-स्त्री दुहा पैसा, दबू पैसा **०गोदावरी तीर**-न गोदावरी ज्या प्रदेशात सप्तधा होऊन समुद्रास मिळते तो प्रदेश **०ग्रही**-स्त्री सात ग्रहाची एका राशींत युति **०चिरंजीव**-पुअव अश्वत्थामा, बलि, व्यास, हनुमान, बिभीषण, कृप व परशुराम हे सात पुरुष मरणा तीत आहेत अशी समजूत आहे **०चैतन्य**-न मुख्य, शाश्वत अथवा ब्रह्मचैतन्य व इतर सहा मायिक चैतन्यें तीं—ईश, जीव, प्रमाण प्रमातृ प्रमेय, फल **०जिह्व**-पु अग्नि **०ति**-वि ७० ही सख्या **०दंती**-वि सात दात असलेला (घोडा) (कुलक्षणी) **०दश**-वि १७ ही सख्या **०द्वीप**-पुअव पृथ्वीचे सात मोठाले विभाग जबु, कुश, प्लक्ष, शाल्मली, क्रौंच, शाक व पुष्कर 'नव खडें सप्तद्वीपें। छपन देशींच्या रायाचीं स्वरूपें।'—ह २८ ६४ **०द्वीपवती-द्वीपा**-स्त्री पृथ्वी 'आले सप्त ही सागर। सहित सप्तद्वीपवती।'—मूपळी विष्णूची **०धा**-क्रिवि सात प्रकारचा, सात ठिकाणीं, सात प्रकारानीं **०धातु**-पुअव शरीरातील सात रस रस, रक्त, मास, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र अन्यत्र—वसा, रुधिर, मास, मेद, मज्जा, अस्थि व स्नायु अन्यत्र—अस्थि, नाडी, मज्जा, मास त्वचा, रक्त व नख आणि केश मिळून 'मग सप्त धातूंच्या सागरीं। तहानेला घोंट भरी।'—ज्ञा ६ २३५ या सप्तधातूंचे मल अथवा उपधातु रस-कफ, रक्त-पित्त, मास-नाक, कान, डोळे याचा स्राव, मेद-घाम, अस्थि-केश व नखें, मज्जा-स्निग्धता, शुक्र-ओज २ सोनें, रुपें, तांबें कथिल, नाग, तीक्ष्ण व कासें अन्यत्र—सोनें, रुपें, तांबें, शिसें, जस्त पितळ, लोखंड **०धान्यें**-नअव सात् गहू, साळ, तीळ, राळे, सातु, हरभरे **०नद**-पुअव शोण सिंधु, हिरण्यवाह, कोक, घर्घर, लोहित व शतद्रु यापैकीं दोहोंबद्दल ब्रह्मपुत्र व शिवनद धरतात **०पदार्थ**-पुअव न्यायशास्त्रातील सात पदार्थ—द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय व अभाव **०पदी-पदीक्रमण**-स्त्रीन विवाह विधीमध्यें लाजाहोमानतर वधूवरानीं समागमें सात पावलें जाण्याचा विधि 'विवाह होम झाला सपूर्ण। सप्तपदी पाणिग्रहण।'—एरुस्व १६ २६ **०पर्ण**-पु एक वृक्ष —न एक खाद्य द्राक्षें, डाळिंब खजूर याचा रस व साखर मध व तूप व इतर मसाला घालून केलेलें —वि सात पानाचें (झाड) **०पर्वत**-पुअव सप्त कुलाचल पहा **०पाताल**-नअव अतल, वितल, सुतल, तलातल, महातल रसातल व पाताल 'अतळ वितळ, सुतळ महातल आणि तळातळ। रसातळ आणि पाताळ। सातवें त।'—कथा ६ ४ ७९ **सप्तपाताळीं घालणें-पडणें-जाणें**-पुन्हा केव्हांही डोकें वर काढता येऊ नये अशी अवस्था होणें **०पुऱ्या**-स्त्रीअव अयोध्या, मथुरा, माया (हरिद्वार), काशी, कांची, अवंतिका (उज्जयिनी), व द्वारावती—एभा १८

१५०. 'सप्तपुऱ्या तीर्थें अगाधें। जेथें वसती प्रज्ञपुरें।'–ह. ३३.१०१. ॰पुंजा–स्त्रीअव. विवाहविधीमध्यें सप्तपदीसाठीं घातलेल्या तांदुळाच्या सात राशी. 'सप्तपुंजा मोंवती बाळें।'–वसा ५१. ॰प्रकृति–धाप्रकृति–विधा प्रकृति–स्त्रीअव. प्रकृति पहा. १ सात स्वभावधर्म. २ राज्याचे मुख्य सात आधार–राजा, मंत्रि, नगर, भूमि, कोश, सेना, मित्र. ॰भूमिका–स्त्रीअव. १ ज्ञानी जीवाच्या सात भूमिका–शुभेच्छा, विचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ति, असंसक्ति, पदार्थाभाविनी व सुर्यागाहिनी. २ भक्ति, ज्ञान, वैराग्य व सलोकता, समीपता, सरुपता व सायुज्यता. 'सप्तभूमिका परब्रह्मीं'–सप्र ७४२. ॰भूषणें–नअव. पुरुषाचीं सात भूषणें. 'पुरुषालागीं सप्त भूषणें। तिन्हीं वस्रें कनकवर्णें। द्वादशांगीं अलंकार केणें। स्त्रियांस देणें तैसेंचि।'–ह ३४.६२. ॰म–वि. सातवा ॰मातृका–स्त्रीअव. ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, इंद्राणी व चामुंडा. ॰मी–वि. १ पंधरा तिथींपैकीं सातवी तिथि. २ सातवी विभक्ति. ॰मृत्तिका–स्त्रीअव. गज, अश्व, रथ, चतुष्पथ, गोष्ठ, वल्मीक व हाट अथवा संगम या सात ठिकाणची विधीकरितां लागणारी माती. ॰रंग–पुअव. तांबडा, नारिंगी, पिंवळा, हिरवा, निळा, पारवा, जांभळा हे सुर्यकिरणाच्या पृथक्करणानें किंवा इन्द्रधनुष्यांत दिसणारे रंग. ॰रात्र–न. सात रात्रींचा काल ॰राशिक–न. त्रैराशिकाप्रमाणें सात राशींचें गणित. सप्तर्षि–पुअव. सप्तऋषि पहा. ॰वारा–पु. (नाविक) सप्तऋर्षीकडून वाहणारा वारा. ॰लोक–पुअव. भूलोक (पृथ्वी); भुवर्लोक (पृथ्वी व सूर्य यांमधील), स्वर्लोक (सूर्य व ध्रुव यामधील इंद्रादि देवतांचा), महर्लोक (सूर्य व नक्षत्रांचा), तपोलोक (तपस्वी लोकांचा), जनलोक (ब्रह्मदेवाच्या मानसपुत्रांचा) व सत्यलोक (ब्रह्मदेवाचा) ॰विध लक्षण–व्यसनें–नअव मारण, मारण, विध्वंसन, स्तंभन, मोहन, वशीकरण व उच्चाटण. 'मारण मारण विध्वंसन। स्तंभन मोहन, वशीकरण। उच्चाटण हें सप्तलक्षण।'–विपू १.५३. 'सप्तवेसनीं जयाचें मन। तो एक मूर्ख।'–दा २.१.१६ ॰शती–स्त्री. १ मार्कंडेय पुराणांतील सातशें श्लोकांची देवीची स्तुति, चंडीपाठ. २ सातशें श्लोकांचा ग्रंथ; भगवद्गीता. 'मी गीता हे सप्तशती। मंत्रप्रतिपाद्य भगवती।'–ज्ञा १८.१६६६. ३ हालाची गाथासप्तशती. ॰शैल, सप्ताद्रि–पुअव. सप्तकुलाचल पहा. ॰समुद्र–सागर–पुअव. क्षार, इक्षुरस, सुरा, घृत, क्षीर, दधि व शुद्धोदक समुद्र. 'इयेवरी सप्तसागर। मध्यें मेरु महा थोर।'–दा ४.१०.१४. ॰सुर–पुअव. षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत व निषाद हे संगीतांतील सात सूर. ॰स्कंध–पुअव वायुमंडलाचे सात भाग. आवह अथवा अवाह (भूमिपासून मेघमंडलापर्यंत), प्रवह अथवा प्रवाह (मेघमंडलापासून सूर्यमंडलापर्यंत), उद्वह (तिमच्या मंडलांतील), संवह (चंद्रमंडलापासुन नक्षत्रमंडलापर्यंत), विवह अथवा वैवह (नक्षत्रमंडलापर्यंत), परावह (शनिमंडलापासुन सप्तर्षिपर्यंत), परिवाह (सप्तर्षिपासुन ध्रुवापर्यंत). ॰स्वर–पुअव. सप्तसुर पहा. ॰स्वर्ग–पुअव सप्तलोक पहा. ॰हरीतकी–स्त्री. अव हरड्याच्या सात जाती. विजया, रोहिणी, पूतना, अमृता, चेतकी, अभया व जीवंती; अन्यत्र–अभया, चेतकी, पथ्या, पूतना, हरीतकी, जया व हैमावती. ॰क्षार–पुअव. (सात औषधी क्षार) तिल, अपामार्ग, करंज, पलाश, अर्क, यव, चिंचा. यावद्दल पाठभेदहि आढळतात, अष्टक्षार पहा. सप्ताद्रि–पुअव. सप्तकुलाचल पहा. सप्तावस्था–स्त्रीअव. अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्षज्ञान, अपरोक्षज्ञान, शोकभंग व निरंकुशा तृप्ति. सप्ताश्व–पु ज्याचे रथास सात घोडे आहेत असा; सुर्य. सप्तास्त्र–पु. सप्तकोन. –वि. सप्तकोनी. सप्ताह–पु १ सात दिवसांचा काल; आठवडा. २ सप्ताह पारायण–न. सात दिवसांत एखाद्या ग्रंथाचें वाचन. सप्तोपचार–पुअव. वैद्यक शास्त्रांतील सात निरनिराळे उपचाराचे प्रकार. पाचन, रेचन, क्लेदन (स्वेदन), शमन, मोहन, स्तम्भन, वर्द्धन.

सप्ता—वि. लिखित; निश्चित. 'हा अहदनामा सप्ता जाहला आहे.'–पे ६१. [अर. सब्त्=स्थैर्य] सप्तसुद–वि. शाबित झालेलें. [अर सबूत=कायमपणा, स्थैर्य]

सप्ताल–ल्ह–ळ–ळ्ह—न. एक विशिष्ट फळ. (इं.) पीच. 'सप्ताळें ऊंस पुंडे कवित कमरखें बाळकें सुक्ष्म बोरें।'–सारुह ३.४९. [फा. शफ्तालू=एक फळ]

सप्र—न. स्वप्न पहा.

संप्र—संपन्न पहा. 'संप्राचा घरीं न बसावें।'–सूत्रपाठ १६२.

सप्पक—वि. (वे.) सपक पहा.

सप्पर—न. (व.) (प्र.) छप्पर पहा.

सप्पा, सप्फा—पु १ सपाटा; तडाखा; चप्पड; चपराक. (क्रि॰ मारणें, देणें) २ पूर्णनाश, उध्वस्तता; ओसाडी; दाणादाण, रुक्षता; वैराणपणा (आळपोळ, वेबाळी इ॰ मुळें प्रदेशाचा). निकाल; पूर्णक्षय; समूळ नाश (लोकवस्ती, वंश, कुल, गुरेंढोरें वगैरेचा सांथ, रोग वगैरेमुळें), पार सेपणें; खपून जाणें; सरणें (एखादापदार्थ, संपत्ति, जिंदगी खाण्यामुळें, उधळपट्टीमुळें वगैरे). (क्रि॰ सळणें; उडणें; होणें; वाजवणें; उडवणें; करणें). [अर. सफ्फ=रांग, ओळ; ध्व.] –क्रिवि. अगदीं; समूळ; पूर्णपणें, मुळींच. 'तो तर माझें बोलणें सप्फा ऐकत नाहीं.'

सप्रचीत, संप्रचीत—वि. अनुभविक; अनुभवसिद्ध; अनुभवाचें, प्रचीतीस आलेलें. [स+प्रचीति]

**संप्रति**—क्रिवि. सांप्रत; सध्यां [ सं ]

**सप्रतिबंध**—वि. अडथळा, हरकत, बंधन, मर्यादा असलेला ०दाय-पु मुलगा, नातू, किंवा पणतू नसल्यास मालमत्तेचा वारसा इतर वारसाकडे जावयाचा तो ०व्यापार-पु. संरक्षित व्यापार.

**संप्रदान**—न १ अर्पण करणें, प्रीत्यर्थ करणें, स्वाधीन करणें. २ कर्ता स्वनिष्ठ क्रियेच्या कर्मानें किंवा स्वनिष्ठ क्रियेनें ज्या कारकरूप अर्थातें अभिमवध करतो असें जें कारण तें, चतुर्थी विभक्तीचा अर्थ 'ब्राह्मणास गाय दिली, मुलासाठीं रडतो.' येथें ब्राह्मण व मूल हीं संप्रदानें [ सं. सम्+प्र+दा=देणें ]

**संप्रदाय**—पु १ चाल, रीत; वहिवाट; शिरस्ता, प्रघात २ प्रचार, वाक्प्रचार, बोलण्याची रूढी, म्हण ३ परंपरागत अथवा प्रमाणभूत तत्त्व. ४ (धर्म, तत्त्वज्ञान) मार्ग, पंथ, मत. 'गुरु संप्र दाय धर्म। तेचि जयाचे वर्णाश्रम।' –ज्ञा १३.४४४. [सं सम्+प्र+दा ] ०शुध्द-वि १ रीतीस, वहिवाटीस, रूढीस धरून असलेलें, रीतसर, प्रघातानुरूप २ रास्त, योग्य, तत्त्वाप्रमाणें, पायाशुद्ध ( कार्य, चाल ) संप्रदायी-वि विशिष्टपथाग अनुसरणारा, विशिष्टमताभिमानी, विशिष्ट मार्गाचा अवलंब करणारा संप्र दायीक-वि (प्र.) सांप्रदायिक संप्रदायास, पंथ, मार्ग, रूढी वगैरेस अनुसरून असलेलें.

**संप्रधार**—पु विचार, निश्चय, निर्णय. 'ऐसा करूनि संप्रधारू। मानसी आला विचारू।' –कालिका १०१५. [सं. सम्+प्र+धृ ] संप्रधारणा-स्त्री विचार.

**सप्रभ**—वि तेजस्वी, प्रभायुक्त 'तेणें घनश्यामता शोभ। अति सप्रभ साजिरी।' –एभा ३०१९३ [ सं स+प्रभा]

**सप्रभव**—वि सामर्थ्यासह, शक्तीसहित; पराक्रमी. 'संपा दिलें सप्रभव। श्री गहिनीनाथा।' –ज्ञा १८ १७५६. [स स+प्रभव ]

**सप्रयुक्त**—क्रिवि युक्तीनें, बऱ्याबोलानें, नीटपणें. 'सप्र युक्त राऊत हातीं न देत तरी हल्ला... ' –इमं १७१ [ स+प्र+युक्ति ]

**सप्रयोजन**—वि. सकारण, आवश्यक, जरूरीचें; योग्य. [ सं स+प्रयोजन ]

**सप्रवर, संप्रवर**—वि दोन अधिक घराण्यांतील प्रवर ( मूळ पुरुष, कुळांतील श्रेष्ठ पुरुष ) एक असणें, दोघांचे प्रवर समान असणें –वि ज्याच्या प्रवरामध्यें एखादा प्रवर सामान्य आहे अशीं ( कुळें )

**संप्रसारण**—न ( व्या ) य, व, र, ल, याचे जागीं इ, उ, ऋ, लृ या स्वराचा आदेश होणें ही क्रिया [ सं ]

**संप्रज्ञात**—वि सविकल्प ०समाधि-पु सविकल्प समाधि, ज्यामध्यें प्रपचाचें भान राहतें असा समाधि 'जेथ उल्हासें विगुंतलें मन। ते संप्रज्ञात समाधि जाण।' –एभा १.१४९. [ सं. ] शाको. ७ ३०

**संप्राती**—पु ( तंजा. ) जमीनदाराच्या पदरीं असलेला हिशेबनीस व मुखत्यार ( चोळ, पांड्य राज्यांतील ) [ सं प्रम्+प्रति ]

**संप्राप्त**—वि. १ पूर्णपणें मिळविलेलें; स्वाधीन झालेलें, पूर्ण केलेलें, पार पाडलेलें, सिद्ध २ जवळ आलेला; प्राप्त झालेला, भरलेला ( ज्वर, आजार, झटका वगैरे ). [ सं. सम्+प्र+आप्] संप्राप्ति-स्त्री १ पूर्ण प्राप्ति, सिद्धता; पूर्णता, स्वाधीनता. २ ( रोगाचें वगैरे ) आगमन, भर.

**संपु(पू)ण**—वि. ( अप. प्र. ) संपूर्ण. 'संपुणाच्या दिवनीं नव्हते का आलें.' –मोर १५. 'पाचा उतरीं सुफळ संपूण.' –कहाण्या.

**सप्रेम**—वि. प्रेमयुक्त, स्नेहयुक्त, स्नेहभरित, प्रेमपूर्ण. 'सप्रेम नृत्य करिताता।' सप्रेमकीर्तन-भक्ति-भाव-स्तवन-भजन-नामोच्चरण-दान-दर्शन-चुंबन-आलिंगन-अश्रुपात-पान्हा-हृदय-अंत:करण-भाषण-कवन वगैरे. अशा अनेक वाक्प्रचारात हा शब्द आढळतो. –क्रिवि प्रेमपूर्वक, प्रेमानें, स्नेहानें.

**सफ**—पु कतल, मारामारी; विध्वंस, नाश [ अर सफ्फ़=ओळ, रांग ] सफा पहा. ०जंग-पु निकराचा हल्ला. 'इकडून चढून सफजंग घेऊन. ...' –पेद २१.२७.

**सफई**—स्त्री. सफाई पहा

**सफर**—न मुसुलमानी वर्षांतील दुसरा महिना. [ अर. ]

**सफर**—स्त्री १ प्रवास, जलपर्यटण, गलबतावरील फेरी, खेप २ खलाशाचा धंदा, दर्यावर्दी ३ दर्यावरील फेरीबद्दल मजूरी, वेतन [ अर. सफर् ] सफर साधणें-प्रवासाचा हेतु साध्य होणें, कार्यसिद्धि होणें; शिकार साधणें सफरनामा-पु प्रवासवर्णन सफरी-पु दर्यावर्दी, गलबतावरील नोकर, खलाशी, जलपर्यटन करणारा.

**सफरचंद-जंग**—न एक गोड नारिंगासारखें फळ, सेव

**सफरजंगी**—स्त्री ( प्र ) सफेजंगी तुंबळ युद्ध, भयंकर, निकराची लढाई ( क्रि० झडणें, उडणें, होणें, चालणें ) [ फा. सफ+जंग ]

**सफरदायी**—पु नायकिणीच्या मागें सारंगी वाजविणारा

**सफरा**—पु घोड्याचा एक त्वग्रोग –अश्वप २ २३४.

**सफरिन**—न सुमारें आठ आणे किंमतीचें नाणें [ पोर्तु ]

**सफल-ळ**—वि १ फलयुक्त, फळें येणारा ( वृक्ष वगैरे ). 'सफळ देखोनि दिव्य द्रुम। बहु धावति जेवीं विहंगम।' २ ( ल ) लाभदायक, फलदायी, फायदेशीर, यशस्वी, फलद्रूप, प्राप्ति देणारा ( धंदा, व्यवसाय, काम ) 'केले उद्यम सदा सफल।' –ज्ञा १०.१६८. [ स. स+फल्=उत्पन्न होणें ] सफळ

अंडें—न कोंबड्यातील नरमादी याच्या सबघापासुन मिळणारें अडें हेंच उबविण्यास योग्य असतें सफलित–भावि फलद्रूप, यशस्वी –एमा २३ ३१७

सफा—स्त्री १ राग, ओळ २ कत्तल, सफ पहा [ अर सफ=राग, ओळ ]

सफा—वि शुद्ध साफ, छान, सुदर ' दरखणास मेहेरप। काम काय सफा। गजिफा दुपारवर खेळली। ' –प्रला २२९ [ अर सफा=स्वच्छता ] सफाचट–वि क्रिवि १ साफ, गुळ गुळीत ( हजामत ) २ अजीबात

सफाई—स्त्री १ तजेला, जिल्हई, तकाकी, चकाकी (घासुन आणलेली ) २ ( ल ) स्वच्छता, शुद्धता, व्यवस्थितपणा, नीट नेटकपणा ३ कौशल्य, चलाखी, हातोटी ४ समेट, दिलजमाई, अत करणशुद्धि ( बाधा, सशय, हवादावा काढून टाकलेली ), जुळणी, व्यवस्थित माडणी, दुरुस्ती (हिशेब वगैरेची, परस्परांची समजूत, भटीबद्दलची वगैरे ) –क्रिवि पूर्णपणें, सपशेल, अगदीं, समूळ, अजीबात, साफ ( क्रि० बुडणें, नाश होणें, जाळणें, वगैरे) [ अर सफाई ] सफाईदार–वि स्वच्छ, गुळगुळीत, ल्खलखीत, सुदर सफाईगिरी–दारी–स्त्री स्वच्छता, चकाकी, गुळगुळीतपणा, जिल्हई सफाईवद–क्रिवि साफ समूळ, निर्मूळ, अगदीं अजीबात ' जमीनीबरोबर कलमास जे फाटे फुटतील ते सफाईवद काढून काढून टाकिले पाहिजेत ' –कृपि ६८९

सफाप—स्त्री कांच स्फटिक [ फा ]

सफार—वि ( व ) सपाट, समातर

सफासी—वि फासा असलेलें नर्दे असलेलें ( पुतळी, पदक, नाणें ) [ स+फासा ]

सफील—स्त्री सफेली पहा

सफेजंग–गी—स्त्री १ सैन्य, फौज सज्ज सेना २ निक राची लढाई दारुण युद्ध, खडाजगी, घोर युद्ध ' सफेजग होऊन गेली ' –भाव ६४ उभयता चिरजिवानी सफेजगी केली ' –ख १ १२८ ३ उध्वस्तता, सत्यनास [ अर सफ+जग पहा ]

सफेजंगबहाद्दर वि रणशूर शौर्यधुरधर ( एक किताब ) तुकोजी आटोळ यास ही पदवी होती –पया ९८ मराचियोरा ५२

सफेत—वि पांढरा, शुभ्र श्वेत विशेषत पाढरा या शब्दास जोडून येतो उदा० पांढरा सफेत 'सफेतकलदर फकीर !' –अज ४६ [ फा सफेद्; स श्वेत ] ०मुसळी–स्त्री एक औषधी जिनस पांढरी मुसळी ०मोरचूद पु पाढरा मोरचूत सफेता–पु पाढरा रंग, शिशाचें कर्बनेत्रित सफेती–स्त्री १ शुभ्रता, पाढरे पणा, श्वेतता धवलिमा २ पाढऱ्या रगाचा हात ' पाचव्या मजल्यावरती सफेतीचा थाट ग ।' –प्रला ९४

सफेद, सफेद मुसळी, सफेदा, सफेदी—सफेत वगैरे पहा

सफेल–ली—स्त्री १ तटाची भित, परकोट ' इकडील भलग फोडून पलीकडील सफेल फोडून गोळा पार झाला '–होके २० ' सफेलीचें काम चालीस लावणें म्हणोन आज्ञा '–पेद १ ७, २ घराच्या पुढील किंवा वरील धुनेगच्ची, ओटा वगैरे ' सफेलीचे वाड्यांतील जो पोर आहे त्यानें ती फुंक लावून नेली ' –बाळ २ १० [ अर फसील् ]

सफै—क्रिवि ( व ) सफाई पहा

सफोल—वि निष्फळ, व्यर्थ, पोकळ ' सागताचि सफोल। होतसे वाचा। ' –ज्ञा १६ ३१३ [ स+फोल ]

सफ्फर–री—सफर–री पहा

सब–व—वि सर्व, समस्त, सगळें [ फा स सर्व ] म्ह० १ सब सोनारकी एक लोहारकी २ सब घाडे बारा टक्के सबदस्त–वि समस्त, सर्व सबकहीं–क्रिवि चोहोंकडे, सर्वत्र,जूनीं सब हाल–पु वित्तवातमी

सबकल–खल—वि क्रिवि बरोबर, ठीक, बताचें, जोगतें जुळेसें, नियमित, परिमित सपखल चबखल पहा

सबज—वि हिरवा सबजासारखा रग ' सबज पोशाख ' –पेद ६ ५८ ' दरोबस्त काम एकरगी सबज रगाचेंच जालें आहे '–ऐतिप्र ६२ [ फा सब्ज् ]

सबजा—पु १ एक तुळशीसारखें रोप ' तुळशीपत्रें सुकलीं सबजा ये सकलां वरती। ' –विक ९० २ घोड्याचा रग [ फा सब्जा ] सबजाजार–पु कुरण, गायरान

सबजी—स्त्री १ हिरवेपणा, हिरवळ, टवटवी २ भाजी, भाजीपाला, पालेभाजी ३ भाजीपाला, फळफळावळ वगैरेवरील कर ' शेवसबजी व वाणगी दशमुखाच निमे करार केली असे ' –वाडबाबा ३ ३ ४ भांग ( पाला किंवा पेय ) [ फा सब्जी ] ०फरोष–पु भाजीविक्या ०मडी स्त्री भाजीबाजार

सबजा—वि काळ पाढरे ठिपके असलेला ( घोडा )

सबत—स्त्री सिद्धता –आदिलशाही फर्मानें [ फा सबूद= टोपली ]

सबतुटी—स्त्री ( सोंगट्याचा खेळ ) सर्व मरून एकटीच राहिलेली सोंगटी म्ह० सबतुटी आणि भलनाच कुटी

सबद्ध—वि १ बाधलेलें, बधन, वठन यांमध्ये दोरी वगैरेंनीं आवळलेलें २ ( ल ) पूर्ण सर्व सपूर्ण, अविभक्त, सगळा, सलग ' गुळाची ढेप सबद्ध वजन करी तर अधिक भरेल ' [ स स+बध ] म्ह० सबध गल्बतांत सुपारी=एखाद्या मोठ्या कामांत अत्यत अल्प भाग घेऊन श्रेय मिळविणें ०वहीत–वि सर्वच्या सर्व लागवड केलेली कोणताहि भाग न वगळतां कसलेली ( जमीन ) याच्या उलट पोटवहीत

सवद्ध—घाति जोडलेलें, निगडित, नातें असलेलें, तद्युक्त
संबंध—पु १ सयोग, ससर्ग, नातें, योग, धागादोरा २ (ल) विवाह, लग्न 'रेवतीबाई रामरावाच्या द्वितीयसंब धाच्या पत्नी होत्या' -कोरकि ४२९ ३ मृत ब्राह्मणाचें पिशाच्च [स सम्+बध्=बांधणें] संबंधन-न जोडणें, सयोजन, सयोग, परस्परास निगडित करणें संबंधम्-पु मलबारात नायर लोकात प्रथम विवाहविधीनतरचा जो स्त्रीपुरुष व्यवहार होतो तो संबंधी-पु आप्त, नातेवाईक, नातलग 'मुसें म्याच बुडविले सबधी बधु आप्त घोकात।' -मोभीष्म ११२ -वि सबधाचा, नात्याचा, सबध असलेला; सयोजित, निगडित, युक्त तद्विषयक उदा० ग्राम-पुण्य-सुख-पाप-गृह-सबधी संबंधीक-वि १ सबधाचा, विषयींचा, सयोजित २ राक्षसी स्वभावाचा ३ पिशाच्च, सबध विषयक संबंधी सर्वनाम-न सर्वनामाचा एक प्रकार, दुसऱ्या नामाशीं अथवा सर्वनामाशीं सबध असणारें किंवा दाखविणारें सर्वनाम

सबनीस—पु दरकदाराचा मुख्य कारकून, शिबंदी व सरकारी नोकर यास पगार वाटून त्याचा हिशेब व लिहिणें करणें, दफ्तरदार, सेनालेखक 'सबनिसानीं लष्करची जमा, सुदती, तैनात हजीरगणती करणें ते सरदार, मुजुमदार, कारभारी यास बसवून त्याचे विचारें करावी' -वाडसनदा २६ [फा सफ्नवीस्] सबनिशी-स्त्री सबनिसाचें काम व हुद्दा 'किले मजकूर येथील सबनिशी पेशजीपासुन आपल्याकडे आहे' -समारो ६ १५३

सबब—स्त्री कारण, निमित्त, प्रयोजन, हेतु 'ऐशा तीन सबबीनें बायका आपला दिल सक्त करून सती जातात' -ऐटि १ ३३ -क्रिवि कारणानें, म्हणून, मुळें 'त्यानें शिव्या दिल्या सबब म्या तोंडात मारली' [अर सबब्]

सबर—वि सगर्भ, गाभण (घोडी किंवा गाढवी) [सभर]
सबर—पु धीर, सबुरी 'सबर व विवेक करावा' -पया ४६७ [अर सब्र्]
सबर—स्त्री कोरफडीची एक जात [अर सब्र्]
सबर—वि श्रीमत, थोर [सभर]
सबरनिबर—वि चागलें-वाईट, निवडक नव्हें असें, सरमिसळ -पया ८०
सबराभरित—वि सर्वव्यापक, सबाह्य अभ्यतरित -ना ९८४ -ए २१०५ सभराभरित पहा
सबराह्—पु (ब) सोस, हव्यास
सबल-ळ—वि १ सशक्त, सामर्थ्यवान बलवान, जोमदार, बळकट, मजबूत २ सैन्यासह 'सबल सचिव तो नृपति मृगया करिता वनीं बहु श्रमला।' -मोआदि ३२ ३ ३ पुष्कळ, अमित 'किंवा धन वेचूनि सबळ।' -कथासा ७५९ [स स+बल]

सबलस—वि सपशेल लोटांगण घातलेला, दडवत घातलेला. 'सबलस गोळणी गान्धारी देती हरीचें।' -भज ८
सबसणीस—क्रिवि (राजा) घ", मजबूत, न हालेसा, पक्का, न उलटेसा (क्रि० बसवणें, ठेवणें; बसणें-एखादी वस्तु)
सबसब-बां—सपसप पहा.
सबसल-लां, सबसेल-ला, सबसैल-लां—सपसल पहा
सबळ, संबळ—स्त्री शिदोरी; अन्नसामुग्री 'आणि प्रिय आलिया स्वभावें। सबळ उरे वेंचे ठाउवें नव्हे।' -ज्ञा १८. ५९१
सब(ब्ब)ल-ळ-सबळ-संबळ—पुस्त्री १ तोंडाशीं दुभागलेली मोठी पहार, सामान्यत पहार २ तोमर, छेळणें, भाल्यासारखें एक शस्त्र काहींच्या मतें सबळ हा शब्द पुल्लिंगी असुन फक्त मोठी पहार हा अर्थ दाखवितो व सबळ हा स्त्रीलिंगी असुन दुधारी पहार किंवा छेळणें दाखवितो. 'कौतुकें जें जें जल्पे। तें सबळाहूनि तीख रुपे।' -ज्ञा १३ ६६२ [स+बल]
सबळ—वि बलयुक्त सबल पहा
सबळ—वि (प्र) शबल औपाधिक, मायिक, मिश्र, गढूळ 'त्यातही शुद्ध आणि सबळ।' -दा २ ५ ३ [स शबल]
संबळ—पु गोंधळी वगैरेंचें एक मृदगासारखें वाद्य याचे दोन भाग असतात-एक पडगा किंवा पडगी अथवा झील हें लहान असुन उच्च स्वर काढतें व दुसरें घब, धुम किंवा घम हें मोठें असुन खालचा स्वर काढतें संबळ्या-पु सबळ वाजविणारा
सबळी—वि (बुद्धिबळें) ज्यात जोर असलेलींहि मोहरीं मारलेलीं चालतात असा बुद्धिबळें खेळण्याचा प्रकार, निजोरी, जोरी डावाच्या उलट
संबळी—स्त्री दव व देवाचीं उपकरणीं ठेवावयाची वेताची करडी, पेटी 'पिंड ब्रह्माडाची उघडूनि सबळी रे। देव न पूजी त्याची जननी सुबळी रे।' -मध्व १७९
सबळें—क्रिवि १ सरेंच, लागलीच २ बळें करून, जोरानें [स+बळ]
सबा—वि सात मुसलमानी वर्षगणनेंत योजतात [अर सबा]
सबाध—वि दोषयुक्त, सदोष, उणीव, न्यून, कमतरता, अपुरेपणा असलेलें (म्हणणें, पद्धति वगैरे) 'ससारमये सबाध। जिवा यया।' -ज्ञा १८ ६९८ [स स+बाधा]

**सबाय**—स्त्री (नाविक) शिडाची काठी सरू नये म्हणून बांधलेली दोरी

**सबार**—पु (खा) चटणी [स सभार]

**संवाहणें**—उक्रि सवाहणें, चोळणें, मर्दन करणें 'परिमार्जुनी वेश वसनी। सवाहिले सुरनद्दें।' –मुसभा ६ १६ [स सवाहनम्]

**सबाह्य**—वि कायिक व मानसिक –क्रिवि अंतर्बाह्य, आंतून व बाहेरून 'जैसे सबाह्य जळडोहीं बुडालिया घटा।' –ज्ञा ७ १३३ [स स+बाह्य]

**सबाह्याभ्यंतर**—न आंतील व बाहेरील भाग, अतस्थ हेतु व बाहेरील क्रिया, वागणूक 'या पुरुषाचें सबाह्याभ्यंतर मला कळलें आहे' –क्रिवि १ बाहेरून व आतून 'सबाह्याभ्यंतर समदृष्टि।' –एरुस्व १ ५९, 'तैसें म्या जग धरिलें। सबाह्याभ्यंतरीं।' –ज्ञा ७ ३२ २ प्रत्यक्ष व मनापासून, अंतःकरणपूर्वक व बाह्यतः, उघड व मनापासून [स स+बाह्य+अभ्यंतर]

**सबिना**—पु छबिना पहा. 'राजे सर्व सबिन्यासहित तानाशा पातशहाचे शादमहालास दाखल जहाले' –मदरु १ ९५

**सबील**—स्त्री रस्ता, मार्ग, पद्धति [अर सबील] **सबील करणें**–वर्गणी वगैरे करून, भीक मागून अगर उसने घेऊन पैसा उभा करणें; द्रव्य गोळा करणें 'खर्च तोडून अदवानीवर सबील करावी' –रा ५ १८७

**सबुडबुडीं**—क्रिवि समूळ, संपूर्ण, सद्रूज 'देइक सर्पचिया तोंडीं। जातसे सबुडबुडीं।' –ज्ञा १३ ७३०

**सबुदा**—पु (अर) वगैरे, पुरवठा, साठा 'यंदा धान्याचा सबुदा चांगला केला पाहिजे' [स सुपूर्ति, सुवत्ता? फा सबूद=टोपली]

**सबुद्धि**—स्त्री पूर्ण जाणीव, ज्ञान, समज [स]

**संबुद्धि**—स्त्री ऐकमत्य सद्‌मत 'सबुद्धि घेता समान श्रीहरि। शमदम वैरी हरि झाला।' [स]

**सबुरी, सबूर**—स्त्री शांति, धीर, दम, सहनशीलता, सहिष्णुता, सुलाहिजा, तहकुबी 'परंतु ते दिवशीं सबूर करविली' –ख ६ ३१ [फा सबूरी] **सबूर**–वि सधीर –ऐटि ५ १ –उद्गा थांब, धीर धर. [अर सबूर] **सबुऱ्या**–वि धीराचा, दमदार, सहनशील –क्रिवि अवसान धरून, दम खाऊन जोरानें, सर्व सामर्थ्य एकवटून (क्रि० हसणें, दम मारणें, फेंकणें, मारणें)

**सबुली**—स्त्री (व) पुरावा [सबल]

**सबे(वे)रे**—क्रिवि सकाळीं, प्रातःकाळीं [स सुप्रहरे]

**सबैन**—वि सत्तर अरबी वर्णगणनेत योजनात [अर सब्‌ईन]

**संबोखणें**—अक्रि १ हाक मारणें, पुकारणें 'मग श्रीकृष्णें सबोखून। सावध केलें पार्थासी।' –पांप्र २ समजूत करणें, सांतवन करणें, आश्वासन देणें 'येणें परी जननी जनका। सबोखीत पुत्र निका।' –मुच ३० ५६ 'मग ते रावणें सबोखिली।' –रावि १४.१३७ [स सम्+बुध्]

**संबोधणें**—उक्रि हाक मारणें, उद्देशून बोलणें, बोलावणें [स सम्+बुध्] **संबोधन**–न १ हाक मारणें, उद्देशून भाषण, आमंत्रण २ (व्या) आठवी विभक्ति; संबोधन विभक्तीचा अर्थ–हे, अरे, अहो ३ विशेषण, उपपद, पदवी 'तो सुज्ञ आहे, थोर आहे धीट आहे एवढीं संबोधनें कशाला!' ४ (चुकीनें) उदाहरण **संबोधित**–वि उद्दिष्ट, उद्देशिलेला

**सबोंब**—वि सुशोभित 'तेथ मेघाररसें सगर्भ। आल्यापर्ज्ञा सबोंब।' –ज्ञा १५ १८७

**सब्बा, सब्बैन**—सात, सत्तर, सबा, सबैन पहा [अर. सब्अ, सब्ईन]

**सब्रह्मचारी**—पु सहाध्यायी [स]

**सभय**—वि १ भ्यालेला, भयभीत, साशंक, भीतियुक्त २ भीतिदायक, भयकर, धोक्याचा [स]

**सभर**—वि सबर गभण, सगर्भ (घोडी किंवा गाढवी). –क्रिवि भारासहित, जोरानें; सपाट्यानें, अवजडपणें (पडणें, टोला बसणें, काठी मारणें)

**सभरण**—न पोषण [स]

**सभराभरित**—वि जिकडे तिकडे भरलेला, अंतर्बाह्य व्यापक, सर्वत्र पसरलेला 'नभाचे परि सभराभरित।' –स्वो ५ १८२ 'आकाश जैसें सभराभरित। –सिस ७ ४२ [स सभर+भरित]

**सभर्तृका**—स्त्री १ सुवासिनी, पति जिवंत असलेली स्त्री २ पतीबरोबर असलेली स्त्री, भर्त्यासहित पत्नी [स]

**संभव**—पु १ अस्तित्वाची शक्यता योग्यता, पात्रता, शक्यता, संभवनीयता २ अदाज धाका, म्हाय 'ही गोष्ट संभवानें लिहिली आहे –मराठी सहावें पुस्तक (१८७४) पृ १६ 'तू तिकडे रहावयास जाणार असा मला संभव यतो' ३ अनुमान, धोरण धरबंध, सुमार ४ जन्म; उत्पत्ति, निपज, अस्तित्वांत येणें 'हेचि हेतु संभवा। कर्माचिया।' –ज्ञा १३ ९६७ 'शिवसंभव '(समासांत) गर्भसंभव, रोगसंभव कफसंभव इ० हे तत्पुरुष समास व पद्मसंभव, योनिसंभव सूर्यसंभव, काष्ठसंभव, मृत्संभव हे बहुव्रीहि समास ५ मिश्रण, समेलन, समाहार, एकीकरण [स सम्+भू=होणें] **संभवणें**–अक्रि १ शक्यता असणें, असण्याचें सामर्थ्य, पात्रता, योग्यता असणें 'म्हणौनी नैष्कर्म्य होआवें। तरी एथ तें न संभवे।' –ज्ञा ३ ७७ २ अनुरूप, अनुयोगी असणें ३

उत्पन्न होणें, प्रसवणें, जन्म होणें; अस्तित्वांत येणें, असणें 'वरि ज्ञानकर्में संभवे। ऐसेंकें जोडे।' –ज्ञा १३ ४७२ **संभवयुक्तिक**–वि शक्य म्हणण्यासारखी 'पिशाच कोणाच्या स्वाधीन असणें संभवत नाहीं व तें दृष्टीस पाडावयाचें कोणांत सामर्थ्य असेल ही गोष्ट संभवयुक्तिक म्हणता येणार नाहीं' –नि २१२ **संभवनीय**–वि होण्यासारखें, घडण्यासारखें, शक्य **संभवसारस**–पु उत्तराधिकारी (६) रिव्हर्शनर **संभवि, संभाव्य**–वि शक्य, होण्यासारखें 'आमचें म्हणणें अधिक संभवि दिसतें' –विवि १८७६ २ २४. **संभवी**–वि उत्पन्न करणारी 'ते दैवी सुरा संभवी।' –ज्ञा १६ ६७

**संभवता, संभवताला, संभवती**–क्रिवि भोंवतीं, सर्व बाजूनीं; सभोंवार, सगळीकडे, चोहोंकडे 'तो संभवता दरुनी रणरंग।' –मीनाचंद्रिका २०

**संभहु**–पु संभव, साठा, भर 'हा तवचि आदर बहु। जव सुकृतांचा संभहु।' –ऋ २९ [स संभव]

**संभळ**–न सबल पहा सबळी पहा

**सभा**–स्त्री १ ज्या ठिकाणीं विद्वान्, पंडित, गुणीजन, राजे लोक वगैरे जमतात, बसतात अशी जागा; दरबार, मजगृह, 'राजसभा, ब्रह्मसभा' 'सभे शिशुपाळ घतला प्राणें।' –मुसभा १२ १४४ २ समाज, मंडळी, जमाव, समुदाय, बैठक, आखाडा, मेळा ३ सभेसंबंधी गाणें 'तंचि सभा गातों सभेमधि तंचि सभा गातो' –पग २०४० ४ शाळा, धर्मशाळा, दालन 'एका सभेंत रात्रीं निजला...।' –मोवन ४ १११ **सभा जिंकणें**–वादविवादात यश मिळवणें, पक्ष मारून नेणें, आपलें म्हणणें खरें करणें **सभाकंप**–पु सभेमध्यें भरणारें कापरें, लाजाळूपणा, संकोच २ मन अपराधी असल्यामुळें वाटणारी भीति व त्यामुळें होणारा थरकाप, गोंधळ **सभांगण**–न १ सभेची जागा २ रंगण, चौक मोकळी जागा 'सजूनि वर वल्मी तव सभांगणीं नाचतो' –कका ११४ **सभांगना**–स्त्री वारांगना, कलावंतीण, नायकीण 'तत्काळ चिलेवत नाचती सभांगना आनंदात' –ऐपो १९९ **सभागृह**–न कचेरी दिवाणखाना; सभेची जागा, दरबारची जागा **सभाचातुर्य–कौशल्य–पाटव**–न शिष्टाचार सभ्यता, रीतरिवाज, चार मंडळींत वागण्याची योग्य पद्धति व त्यात दिसून येणारी चांगली बुद्धि **सभाजन**–पु १ सभेंतील सदस्य, मंडळी समाज लोक समुदाय २ सभासद, सभेंत बसणारा गृहस्थ **सभादीप–दा।पत–दिवा**–वि १ श्रावणीच्या दिवशीं ब्राह्मणास अग्निसमक्ष सुवासिनी दान करतात तो दिवा २ सभादीप दान करण्याचा विधि ३ (ल) सभाभूषण, सभेचा अलंकार **सभाधिकारी**–पु सभेचा नेता, अध्यक्ष **सभाधीट**–वि सभेमध्यें न भितां, न गोंधळता भाषण करणारा **सभाधूर्त**–वि सभेमध्यें, दरबारात वाद, मसलत, मध्यस्थी वगैरे कामांत प्रवीण, वाक्‌पटु, हुशार, सभाकुशल–चतुर–पटु हे पर्याय शब्द आहेत. **०धैर्य**–न सभेंतील धीटपणा, आत्मविश्वास, धिटाई **०धौर्त्य**–न सभेंतील धूर्तता, चातुर्य, कौशल्य **सभाध्यक्ष सभानायक, सभापति**–पु सभेचा प्रमुख, मुख्य, नेता, पुढारी, अध्यक्ष, मुखर उपद्रष्टा **०नियम**–पु सभेसंबंधीं कायदा, निर्बंध, काम चालविण्याविषयीं पद्धति **०नीति**–स्त्री सभेसंबंधी नियम, निर्बंध, कायदा, पद्धति **०पांडित्य**–न तादृश अर्थी विद्यादि असो नसो पण सभादिकामध्यें भाषणादि करण्याचें सामर्थ्य केवळ सभेमध्यें ज्ञानाचें प्रदर्शन, वक्तृत्वाची दाखविण्याची विद्वत्ता **०प्रवेश**–पु १ सभेच्या कामास आरंभ, सुरुवात २ सभासदाचा सभेमध्यें येण्याचा पहिला प्रसंग; नवीन सभासदास सभेंत दाखल करून घेणें **०भीत**–वि सभेमध्यें लाजणारा, संकोच वाटणारा, धीटपणा नसणारा **०भीति**–स्त्री सभाजनाची, मंडळींची भीति, भीड, लाज, संकोच सभेमध्यें घाबरण्याची सवय **०भीरू**–वि सभेमध्यें लाजणारा, सत्राची **०भूषण**–न सभेचा अलंकार, पंडित, विद्वान मनुष्य, सभेमध्यें शोभणारा **०मंडन**–न १ सभेची शोभणाई, सभास्थानाचा अलंकरण २ सभेचा अलंकार, पंडित, विद्वान मनुष्य, सभेला शोभा आणणारा विद्वान. **०मंडप**–पु १ सभास्थान, सभेची जागा, मजगृह दिवाणखाना २ मंदिराच्या गाभाऱ्यापुढें कीर्तन–पुराणादिकांकरिता बांधलेली आच्छादित जागा ३ गाभाऱ्यापुढील मोकळी जागा **०मोहन**–न नजरबंदी, सभेस चकविण्याची, भुलविण्याची विद्या 'सभामोहन भुररी चेटकें। सावरी मंत्र कौटकें अनेकें।' –दा ५ २ ७. **०रंजन**–न सभेची करमणूक मंडळीचें मनोरंजन **०रत्न**–न सभाभूषण, सभेचा अलंकार **०लंकार**–पु सभारत्न **०व्यवस्थापक**–वि सभेची व्यवस्था ठेवणारा, शिस्त राखणारा, सभा व्यवस्थितपणें चालविणारा **०व्यवस्थापन**–न सभेची व्यवस्था, व्यवस्थित मांडणी, व्यवस्थित कार्य, शिस्त, देखरेख **०शूर**–वि सभेंत किंवा मंडळींत धीट, आत्मविश्वासी, सभेमध्यें पराक्रम गाजविणारा **०संकेत**–पु सभेचे नियम, पद्धति रूढि **सभासद**–पु १ सदस्य, सभेचा प्रत्येक घटक, सभेमध्यें बसलेला प्रत्येक इसम २ (ल) लोकांच्या फिर्यादी दाखल करून घेणारा कचेरींतील कामगार ३ सभास्थान, सभामंडप, सभामंडळ, बैठक 'तूं या विश्वाची अनादि आदी। बैसलीं जिये सभासदीं। तेथें सोयरिकीचिया संबंधीं। रळी बोलों।' –ज्ञा ११ ५४४ ४ पंच न्यायदानाच्या कामीं मदत करणारा अधिकारी 'सभासद भलेलोकीं सांगितलें कीं' –भाइसम २ ६३ **०स्थान**–न सभेची जागा, सभागृह, मंडप,

०स्फूर्ति-स्त्री सभेमध्यें प्रगावधान, सभेमध्यें भाषण करताना येणारे अवधान, स्फुरण ०क्षोभ-पु सभेमध्यें गोंगाट करणें, सभेमध्यें धावणें, घोंटाळणें 'किंवा राणाक्षोभ तयास झाला।' -साह ६ ९५ सभोचित-वि सभेमध्यें करावयाचा, मध्ळींत करण्यास योग्य, बैठकींत करण्यासारखें सभ्य-पु १ सभासद, प्रेक्षक समेंतील योग्य मनुष्य 'तें गुणदोष सांगितलें। सभ्यं जैसा।' -ज्ञा १४ ३४३ 'भरत कुरु धर्म न युद्धो सभ्याला पुस एकदा ज गा।' -मोसभा ४ १०३ 'न वदति सभ्य न पांडव।' -मोमभा ५ ५८ २ पत्नीऐवजीं एका अग्नीचें नांव -वि सभावित, प्रतिष्ठित, शिष्ट, सज्जन

सभागती—क्रिवि (ना) सहज 'मी सभागती तेथें गेलों.' [स्वभाव+गती]

सभागी-ग्य—वि १ भाग्यवान यशस्वी, दैववान् 'सभाग्य साधूनि जाय निधि आणि अभाग्य मार्गे मृत्तिका शोधी' -भाव १६ -एभा १८ २५ २ शुभ, लाभदायक [स स+भाग्य]

समागी-गीं—वि १ (व) रास्त, योग्य, बरोबर, ठीक 'तुमचें म्हणणें समागी आहे २ क्रिवि (व) उताराने, सरळ मार्गानें 'समागीं पाणी उतरून गेलें' [स सम+भाग]

समाजन—न १ पारितोषिक, देणगी, काम-चाकरीबद्दल बक्षिस उपाहार २ पूजन, सत्कार 'विश्वामित्र सभाजन करी।' -मोरामायण १ २३८ सभाजित-धावि सत्कारित पूजित सभाजणें-उक्रि सन्मान करणें, पूजणें, आदरसत्कार करणें 'प्रकटुनि साधूत जपा घेतो अभ्यात्मनु सभाजून।' -मोभीष्म ११ ९० [स स+भाज्]

सभार—पु १ सामग्री साहित्य 'तिये कुडमडपवेदी। आणिकहि सभारसमृद्धि -ज्ञा १७ १७९ २ समूह, राशी, समुदाय तैसें सर्व भावसभारें। न धरत प्रेम एकसरें।' -ज्ञा ११ ६८८ 'कादानि पुस्तकाचा सभार।' -शनि १० (समासात) अश्वसभार, गजसभार शस्त्राअस्त्रसभार ३ (व) कोथिंबीर ४ लोणच्याचा वगैरे मसाला [स सम्+भृ]

सभावना—स्त्री १ संभव शक्यता, साहजिकता २ धोरण, समज, शक्यतेसंबंधी अनुमान, कल्पना ३ अदाज अनुमान, तर्क, कल्पना अटकळ ४ समज गृहीतार्थ ५ वतावणी, आव ६ आदरसत्कार बहुमानपुरस्कर वागणूक; बिदागी, देणगी दक्षिणा गौरव, प्रतिष्ठा 'तरी सभावने जिये। जो मानाची वाट पाहे। -ज्ञा १३ ६५६ ७ औचित्य सुसंगतता, योग्यपणा, सुसंबद्धता ८ (ज्या) शक्यार्थ [स सम्+भू=होणें] सभावनीय-वि १ होण्यासारखें शक्य २ आदरणीय, सत्कारार्ह सन्मान्य सभावणें-उक्रि सभावना करणें, आदर करणें सत्कारणें, मान देणें सभावित-वि १ शक्य, संभवनीय, होण्यासारखें २ सुसंगत, सुसंबद्ध, योग्य; युक्त ३ सभ्य, पतीचा सन्मान्य, वजनदार, कीर्तिमान, प्रतिष्ठित; 'रूपमा उदयलें पुष्ट। संभाविता कुटीचें थोट।' -ज्ञा १६ १७८ सभाव्य-वि. शक्य, होण्यासारखें, संभवनीय संभाव्यमान-वि ज्याच्या शक्यता शक्यतेबद्दल विचार चालू आहे अग, ज्याच्याबद्दल भवतिनभवति चालू आहे असें, सामान्यत शक्य

सभावी—क्रिवि सहज, स्वाभाविक 'तरि सभावीं होईल मेलबर्नें। या कळेवरासि।' -भाग ८० [स्वभाव]

संभाषण—न सवाद, बोलाचाली, परस्पर बोलणें, वचन प्रतिवचन, खलबत, चर्चा, बोलणें [स]

समाळ—पु रक्षण, प्रतिपाळ, पालन सगोपन [स संभार] सभाळीं करणें-हवालीं करणें, स्वाधीन, सुपूर्त करणें संभाळणें-उक्रि १ रक्षण करणें, पाळण, पासणें, सगोपन करणें, आश्रय देणें, काळजी घेणें २ धारण करणें, सोसणें, रहन करणें, वाहणें (भार, कार्याचा बोजा ओझें) ३ -अक्रि जपणें काळजी घेणें, सावध राहणें 'सभाळ, अपथ्य करशील तर दुखणें वाढेल' ४ जाणीव असणें वाटणें, समजणें 'डाग दिला तरी समाळत नाहीं मग चिमटा कोठला समाळावयाला' संभाळून घेणें-वागवून घेणें, चालवून घेणें, सोसणें, खपवून घेणें, काणा डोळा करणें

संभाळू—स्त्री निरगुडी 'काळे दाणे, काळेंजी सभाळूचीं पानें एरडलात यावीं' -अश्व २ १०४

सभीत—क्रिवि (कर्मो) पुरतेपणीं भिजलेलें, थबथबलेलें, चिंब भिजलेलें (क्रि० भिजणें, होणें, असणें)

सभूत—वि १ सुसबद्ध, योग्य; सुसंगत, सयुक्तिक, (यावरून शक्य) २ उत्पादित, जन्मलेलें [स सम्+भू] सभूत-ति-संभूतवार्ता-पुस्त्री १ संभव, शक्यता यत्किंचित् सुगावा, माहिती, दखलगिरी, काहीं तरी बोलणी वगैरे वरून शक्यता वाटण्यासारखी स्थिति 'त्यास या गोष्टीच्या हुजूर संभूत नाहीं' -दुवा २ ८२ बेफाम होतें लष्कर मध्ये काहीं वार्ता सभूत।' -ऐपो ४०१ 'श्रीमताच लग्नाची सभूत देखील आम्हांस दखल नाहीं' -ख ४२२ 'तें उत्पन्न खाणाऱ्या मनुष्यास इन्साफ होण्याच्या वेळाची सभूत वार्तादि ठाऊक नसती' -इनाम ७२ संभूति-स्त्री १ शक्यता, होण्यासारखी स्थिति संभव २ सुसंगतता; सयुक्तिकता सुसंबद्धता, जुळणी ३ जन्म, उत्पत्ति, पैदास, निपज

सभूयसमुत्थान—न पातीदारीचा धंदा भागीदारी, सयुक्त भांडवलाचा व्यापार [स]

संभाखणें—संबोखणें पहा शांतवन करणें 'तव योसे मधुरांवचनीं। स्वामिणीनें संबोखुनी।' -शिपु २ १२ ५३

**संभोग**—पु १ उपभोग, विषयोपभोग, रतिसुख, मैथुन 'सितेसुदरी लागी सभोग यावा'—राक ४२ २ उपयोग, वापर, सेवन 'जो श्रद्धेचेनि सभोगें। सुखिया झाला।'—ज्ञा ४ १८८ ३ शृंगाररसाचा एक प्रकार, सभोगशृंगाराचे उलट विप्रलभ शृंगार. [स सम्+भुज्] **संभोगणें**-उक्रि उपभोगणें, सेवन करणें (विशेषत स्त्रीसुख) **संभोगी**-वि १ उपभोक्ता, भोक्ता, सेवन करणारा, उपयोग करणारा, वापरणारा २ विषयी, लपट, चैनी, रगेल

**सभोंवता सभोंवताला, सभोंवती, सभोंवर सभों घार**—क्रिवि शअ सर्वबाजूनीं, सगळीकडे, चोहींकडे सर्व दिशानीं, सगळीकडून

**सभ्रम**—वि भ्रांतिष्ट, वेडा 'जे मासिया मूली सभ्रम। नेणती लोक।'—ज्ञा ९ ३६३ [स+भ्रम]

**संभ्रम**—पु १ भ्रांति, गोंधळ, घोटाळा, गडबड, मोह 'ना तरी महासिद्धिसभ्रम। जिंतला तापवु भ्रमें।'—ज्ञा १ २७१ 'मग लोपिला अद्भुतु। संभ्रमु तो।'—ज्ञा १ १५१. २ औत्सुक्य, तीव्र इच्छा, आकांक्षा उत्कंठा 'मग सभ्रमें दिठीसेने। घालितसे।'—ज्ञा १ १६७ ३ आदर, सन्मान, स्तुती 'अथवा सभ्रमाचिया आयती। स्नेहे जैसा ये व्यक्ति।'—ज्ञा १३ १८१ 'नावडे लौकिक सभ्रम।' यावरून डौल, नगपट्टा, ऐट ४ भ्रमण, गरगर फिरणें, भोंवरा, चक्राकार गति 'ससारसभ्रमें आशा लागे पाठीं। तेणें जीवा साठी होईल तुझ्या।'—तुगा २७१३ ५ पसारा, अवडबर 'आणिकही न ना सभ्रम। व्रताचे ते।'—ज्ञा १८ ९९ ६ चूक, हयगय, गोंधळ, गैरसमज [स सम्+भ्रम्] **संभ्रमी**-वि सन्मान्य, सत्कारित, आदर केलेला **सभ्रांत**-वि १ गोंधळलेला, गडबडलेला, घोटाळा उडालेला, भ्रांतिष्ट 'येनुलेया सर्ली। सभ्रांताच्या पोटीं।'—ज्ञा १३ ९०६ २ व्यग्र, उत्कंठित, आवेशपूर्ण, त्रस्त

**सभ्रम**—पु (प्र) समारभ हाचि हवन सपदेचा सभ्रमु।'—ज्ञा ८५१ 'होतें श्रीकृष्णविंदान। जे सभ्रम पर्णावी रुक्मिणी।'—एरुस्व १४ ३०.

**संभ्रांतअहंकार**—पु (नृत्य) विक्षिप्तकरण पुढच्या बाजूस हात फेकून करणें मग डावा पाय सुची करून डावा हात विक्षिप्त करणें, व मक्ष स्थलावर ठेवणें नतर त्रिक फिरवून नूपुर, आक्षिप्त, अर्धस्वस्तिक, नितब, कटिछिन्न व कटिच्छिन्न हीं करणें क्रमानें करणें. **संभ्रांतकरण**-न (नृत्य) माडीच्या मागें हात वळवून ठेवणें, नतर त्याच हातानें माडीस विळखा घालणें

**सम्**—सस्कृत उपसर्ग याचे अर्थ १ सयोग, मिलाफ, युक्तता, सहवास उदा० सयोग समेलन २ जमाव, समूह, सधान उदा० समह, सभार ३ सौंदर्य, शोभन, उत्कृष्टता, ऋजुता उदा० समार्जन ४ प्रकृष्टता, आतिशय्य, प्राशस्त्य, प्राचुर्य उदा० समाराधन, सदीपन ५ साहचर्य, एकसमयत्व उदा० सगति, समति

**सम**—स्त्री तालाची पहिली टाळी, तालाच्या प्रारभींचें मुख्य ठिकाण, गायनवादनाचें महत्त्वाचें स्थान —न १ एक अर्थालकार, यामध्यें दोन समान वस्तूची तुलना केलेली असते २कोण-त्यादि आकाशस्थ उभ्या वर्तुळाचा ज्या बिंदूत क्षितिजाशीं छेद होतो तो बिंदु ३ (भूमिति) मध्यमप्रमाण ४ साम्य, सारखेपणा 'ऐसें बोधा आलें जया सम। तया कर्तव्य तें नैष्कर्म्य।'—ज्ञा ४. १२१. ५ ब्रह्म —ज्ञा ६ ४३ —वि १ सारखा, तुल्य, समान, सदृश उदा० समकाल, समदेश, सम-गति-क्रांति-गुण-गोत्र-जाति-धन-विभाग-शील-बल वगैरे 'सकळकाळीं समा। सर्वरूपा।'—ज्ञा११ ५३३ 'तुळे घालिता वो नये कनकरासी। सम तुके एक पान तुळसी वो।'—तुगा १२१ २ एका पातळींतील, सपाट, सरळ, नीट, थेट, एकरूप ३ दोन या सख्येनें विभाज्य (सख्या) ४ नि पक्षपाती, समदृष्टि, समान अधिकारी ५ तटस्थ, मित्रत्व अगर शत्रुत्व नसलेला ६ शांत 'तैसा आत्मबोधीं उत्तमु। करिता होय जो श्रमु। तोही जेथें समु। होउनि जाय।'—ज्ञा १८. १०९४ [स] ०**उदर**-न (नृत्य) नृत्यप्रसगीं श्वासोच्छ्वास अजिबात बद ठेवणें ०**कपोल**-पु (नृत्य) गालाची स्वाभाविक स्थिति ०**ग्रह**-पु (ताल) गाण्यास व ताल देण्यास जेथें एकदम सुरवात होते तें ठिकाण ०**चिबुक**-पु (नृत्य) खालचे-वरचे दात मागें पुढें न होतील, हनुवटी सारखी राहील असे ठेवणें. ०**दर्शन**-न (नृत्य) दोन्ही डोळ्यांचीं बुबुळें एका रेषेंत ठेवणें ०**पाद**-न (नृत्य) पायाची स्वाभाविक ठेवण, जुळलेले पाय. ०**पुट**-न (नृत्य) पापण्याची स्वाभाविक स्थिति ०**मान**-स्त्री. स्वाभाविक स्थितींत मान ठेवणें ०**यति**-पु (ताल) गायनाचा प्रारभ, मध्य व अत या तीन ठिकाणीं लयीची गति सारखी ठेवणें ०**वक्ष स्थल**-न (नृत्य) उरोभागाची स्वाभाविक स्थिति ०**अपूर्णांक**-पु (गणित) छेदापेक्षा अश लहान असतो असा अपूर्णांक ०**कर्णतुल्य चतुर्भुज**-पु ज्याचे कर्ण व बाजू सारख्या असतात असा चौकोन, समचतुष्कोण, इ =ऱ्हॉबस ०**कर्णायत**-पु दीर्घचतुरस्र, दीर्घ चौकोन ०**कक्ष**-वि समान, बरोबरीचें, सारखे, जोडीचे ०**कालीन-क**-वि एकाच काळचे, एकाच वेळचे, एककालीन ०**केंद्र**-वि ज्याचा मध्यबिंदु एक आहे अशीं (वर्तुळें) ०**कोण**-पु काटकोन, ९० अशाचा कोन ०**खात**-पु (भूमिति) चौरस घन पदार्थ विटेसारख्या आकाराची आकृति ०**गुणन**-न एका सख्येस त्याच सख्येनें गुणण्याचा प्रकार, सख्येचा वर्ग करणें ०**घटक**-पु (शाप) सारख्या आकाराचे पदार्थ, (इ) आयसोमेरॉइड —वि सारख्या आकाराचे, रूपाचे (इ) आयसोमेरिक ०**घटकत्व**-न समरूपता. (इं) आयसोमेरिसम,

०घर-न माजघर, मध्यगृह, मधलें दालन, वटार ०चतुरस्र-वि (रूढ) समचौरस, चौकोनी, चारी कोन सारखे असलेला -नपु चारी कोन सारखे असलेली आकृति [स सम+चतुर्+अस्र] ०चित्त-वि १ समतोल स्वभावाचा, समदृष्टि, मनाचा कल ढळू न देणारा २ तटस्थ, कोणत्याहि विशिष्ट बाजूस मनाचा ओढा नसलेला, उदासीन ०चौरस-समचतुरस्र पहा ०च्छेद-पु (गणित) सारखा छेद, सामान्य छेद -वि ज्यांचे छेद सारखे आहेत असे (अपूर्णांक) ०च्छेदरूप-न ज्या सर्व अपूर्णांकांस सामान्य असा एकच अंक छेदस्थानीं असतो असे अपूर्णांक ०तळणें-अक्रि (सोनारी) सारखी तोलून मग यावर रूण करणें (सोन्याची काब वगैरे) [सम+तोलणें] ०ता-स्त्री १ सारखेपणा; बरोबरी २ अभेदबुद्धि; समबुद्धि; तुल्य मानणें 'पैं भय आणि निर्भयता। अहिंसा आणि समता। तुष्टि तप पाडुरंगा। दान जे गा।' -ज्ञा १० ८५ ३ निःपक्षपातपणा ४ ब्रह्मरूपता, तादात्म्य ०तुक-वि समतोल, सारख्या वजनाचें, सारख्या महत्त्वाचें, सारखें 'तुका म्हणे तुजमध्यें एक भाव। समतुके भार घेऊं पावो ढच ठाव।' -भज ११ ०तुक भाव-पु बरोबरी, समतोलपणा 'घ्या समादून समतुकभावें। आपणहि त्यावें त्याच तुकें द्यावें।' ०तोल-वि १ सारख्या वजनाचा, समभार २ सारखा, सम, जोडीचा, बरोबरीचा, सारख्या गुणाचा, मोलाचा, रंगाचा, दर्जाचा ३ शांत, सौम्य, न क्षोभ पावणारा (स्वभाव, प्रकृति) समाधान (प्रकृति) ४ सारख्या शक्तीच्या (प्रेरणा) -क्रिवि दोहींकडे सारखा भार, वजन असलेला 'होडीमध्यें समतोल बसावें' ०पणा-अवस्था-स्थिति-पुस्त्री एखाद्या पदार्थावर सर्व बाजूनीं कार्य करणाऱ्या प्रेरणा जेव्हा परस्पर समान असतात अशी स्थिति, तुल्यबलता (इ) इक्विलिब्रिअम ०त्रिभुज-पु ज्याच्या तिन्ही बाजू सारख्या लांबीच्या आहेत असा त्रिकोण ०त्रैराशिक-पुन ०त्रैराशि-स्त्री (गणित) ज्यामध्यें सम प्रमाणें असतात असें त्रैराशिक याच्या उलट व्यस्त त्रैराशिक ०त्व-न समता पहा ०स्थळ-न सपाट जागा, मैदान सपाटी [स. सम+तल] ०दर्शी-वि निःपक्षपाती, तटस्थ कोणत्याहि एका बाजूस मनाचा कल नसलेला ०दुःख-समदुःखी-वि ज्यांस एकाच प्रकारची पीडा, त्रास वगैरे आहे असा, दुःखाचा भागीदार, वाटेकरी ०दृष्टि-स्त्री समानवृत्ति, निःपक्षपातीपणा, निःस्पृहवृत्ति तटस्थता -वि मध्यस्थ, तटस्थ, त्रयस्थ, समवृत्ति निःस्पृह उदासीन ०द्विभुज त्रिकोण-पु ज्याच्या दोन बाजू सारख्या आहेत असा त्रिकोण ०धात-समधातु-वि समशीतोष्ण फार थंड नाहीं व उष्ण नाहीं अशी, निरोगी 'तशी काया समधात सुगंधिक अमोल पुढाची।' -प्रला ९० [सं सम+धातु] ०नख(करण)-न (नृत्य) पाय जोडून नखें एका रेषेंत ठेवणें ०नर-समशंकु पहा ०पाद(स्थान)-न (नृत्य) सर्व अंग सरळ, सारखें व सौष्ठवांत ठेवून दोन्ही पाय एक तल अंतरावर व एकाच रेषेंत ठेवणें ०पाद भौमि चारी-स्त्री (नृत्य) दोन्ही पावलांत अंतर न ठेवतां तीं एक मेकांस चिकटून जमीनीवर एकाच रेषेंत ठेवणें ०पादी-वि (प्राणि) दोन्ही पाय दोहीं बाजूस सारखे असणारा (प्राणि) ०प्रमाण-वि (गणित) सारख्या प्रमाणात वाढणारा अथवा कमी होणारा -छअ १८ ०फळि-ळी-स्त्री बरोबरी, स्पर्धा 'तयासि माडितां समफळी। न दिसे दुजा।' -कथा ४ १४ ५. -वि समबल, समतोल 'त्यासि युध्यचि समफळि। करणें आगळि। काय मूर्खा।' -ज्ञाप्र २७५ ०बुद्धि-स्त्री सारखे विचार, सारख्या भावना -वि १ सारख्या मताचे, कलाचे वृत्तीचे २ सर्वांबद्दल सारखीच वृत्ति असणारा, समदृष्टि; कोणासहि कमी अधिक, जवळचा दूरचा वगैरे न मानणारा ०भाग-पु सारखा वाटा, हिस्सा, पाती ०भाग-समभागी-वि १ सारखा हिस्सा, वांटा, भाग असणारा, सारखा पातीदार २ सारख्या प्रमाणाचे, आकाराचे, वजनाचे ०भाव-पु १ सारखेपणा, समरूपता, साम्य, एकरूपता २ बरोबरी; समता ३ सारखा स्वभाव, वृत्ति मनोधर्म, प्रकृति, घटना असलेला, साधर्म्य, प्रकृति-प्रवृत्तिसाम्य -वि १ सारखा, एकरूप, समवृत्ति, सारख्या स्वभावाचा २ सहमत सहकारी, सहोद्देशी ०भाररेषा-स्त्री ज्या ठिकाणीं वातावरणाचा दाब सारखा असतो अशीं पृथ्वीवरील ठिकाणें दाखविणारी रेषा ०भुज चौकोन-पु ज्या चौकोनाच्या सर्व बाजू सारख्या असतात असा चौकोन ०भुजत्रिकोण-पु ज्या त्रिकोणाच्या सर्व बाजू सारख्या असतात असा त्रिकोण ०मडल-न (ज्यो) समवृत्त, खस्वस्तिक व पूर्व-पश्चिम बिंदू यामधून जाणारें वृत्त ०मात्र-वि सारख्या वजनाचा, आकाराचा, मापाचा ०मिति-स्त्री १ मध्यम माप दोन मापामधील काढलेले मध्यम माप २ मापाचा सारखेपणा ०मूल्यत्व-न (रसा) मूल द्रव्याचा इतर मूलद्रव्याशीं संयोग होण्याच्या प्रमाणातील सारखेपणा (इ) ईक्वलव्हॅलन्सी ०योग-पु उत्तम योग, चांगला जुळून आलेला प्रसंग 'ऐशिया समयोगाची निरुती।' -ज्ञा ८ २२१ ०रस-पु ऐक्य, तादात्म्य एकरूपता, ब्रह्मसारूप्य 'म्हणे तुका समरसी मिळाला जर। तरी कोणासीं उत्तर बोलावें।' 'तेथ अवघृत समरसीं। सहजें जहालें।' -ज्ञा ४ १३८ -वि १ समतोल वृत्तीचा, प्रकृतीचा स्वभावाचा, शांत; गंभीर, सुमनस्क २ समानधर्मी; सारख्या स्वभावाचा, गुणधर्मांचा, वृत्तीचा ०रसणें-अक्रि १ ऐक्य पावणें, तादात्म्य

पावणें, विलीन होणें, तल्लीन होणें 'तदा महासुखासी सम रसे तो।' २ एक होणें, मिसळणें, विरून जाणें, पूर्णपणें एक रूप होणें 'जैसा लवणाचा॰पुतळा। समुद्रामाजीं समरसे।' –ह २१२७ 'अलकारीं हेम समरसे।' –यथादी २१२५६ ॰रस्य–न ऐक्यभाव 'चित्तगुणी प्रवेशे। चित्तीं असती समरस्यें।' –भाए ६८२ ॰रास–स्त्री शेतातील पिकाची अविभक्त रास, एकत्रित संपत्ति, एकत्र मालमत्ता, पिंडगी ॰रूप–वि सारख्या आकाराचे, आकृतीचे, रूपाचे ॰रूप्य न आकारसादृश्य, आकृतीचा, ठेवणीचा सारखेपणा. ॰लंबचतुर्भुज–पु ज्याच्या दोन बाजू समांतर आहेत असा चौकोन ॰वय-वयी-वयस्क–वि सारख्या वयाचे, उमरीचे ॰वर्ति–वि समतेनें वागणारा, असणारा ॰विषम–न विसंगति, अप्रयोजकता 'जो नावरे समें विषमें। चर्मचक्षूचेनि चामें।'–ज्ञा १८. ४०१ 'तेय समविषम न दिसे कांहीं।'–ज्ञा ८ १७० –वि वेडें वांकडें, अनियमित, योग्यायोग्य, सदोष ॰वीर्य–वि १ सारख्या गुणाचें, सारख्या तीमतेचें (औषध, वगैरे) २ सारखे परा क्रमी, प्रभावी, शूर ॰वृत्त–न (ज्यो) सममंडल, खस्वस्तिक व पूर्व-पश्चिम बिंदू यामधून जाणारें वृत्त (इ) प्राइम व्हर्टिकल ॰शंकु–पु (ज्योति) समवृत्तावर सूर्य असता पडणारी शंकुच्छाया किंवा त्याच्या अक्षांशत्रिज्या ॰शीतोष्ण –वि जेथें हवामानात थंडी व उष्णता यांचें प्रमाण बहुधा सारखें असतें असा (प्रदेश) ॰शीतोष्णकटिबंध–पु अयनवृत्त व ध्रुववृत्त यामधील उत्तरेकडील व दक्षिणेकडील त्रेचाळीस अंशाचा पृथ्वीचा भाग ॰शील–वि सारख्या स्वभावाचे, प्रवृत्तीचे, वृत्तीचे, एकमेकाम अनुकूल ॰समान–वि १ अगदीं सारखा, तुल्य 'तुकयाची समता जाण। शत्रुमित्र समसमान।' २ हुबेहुब, एकरूप ३ सपाट, सारखी, समतल 'समसमान साधुनि भुई।' –दावि २४५० ॰सरी–वि सारखे 'राव प्रधान समसरी। दोन पुत्र दोघांसी।' –शनि २८६ 'प्रपंच परमार्थ समसरी। होय श्रीहरिरूपें।' –ह २४७६ [सम + सर] ॰सीम–वि ज्याची सीमा, मर्यादा सारखी आहे असें, एकाच ठिकाणीं संपणारें [सम+सीमा] ॰सूत्र–न (ज्यो) समवृत्ताच्या ध्रुवबिंदूमधून जाणारें महावृत्त, क्षितिज ॰स्थल–न पटांगण, मैदान, सपाट जमीन, माळ ॰स्थान–न क्षितिजाचा उत्तर किंवा दक्षिण ध्रुवबिंदु ॰स्वभाव–वि सारख्या वृत्तीचा, सारख्या प्रकृतीचा, सजातीय, सारख्या घटनेचा, समान गुणधर्मांचा

**समई-य**–स्त्री धातूचा उभा दिवा, खालीं बैठक, वर चाडें व मध्यें नक्षीदार खांब असा दिवा, शणवई [स सदीपिका, अर शमूअ=दिवा]

शवो ७, २१

**समई**–स्त्री (ना) रम.

**समई**–क्रिवि. वेळेवर, समयास, वेळेस 'समई यावा चुकों नये। सत्वगुण साडों नये।' –दा २ ? ३१ [समय]

**समईक**–वि (निरू) समाईक अनेकसत्ताक बहुसाधारण, ज्यावर अनेकांचा हक्क, स्वत्व आहे असा, पातीचा, (धंदा, दुकान, व्यवहार), अनेकाच्या वहिवाटीचें (घर, जमीन)

**समकणें**–अकि (रूढ) सवकणें पहा सोकावणें, चटावणें, गोडी लागणें, सवयीचा होणें

**समग्र**–वि १ सर्व, प्रत्येकीं सर्व २ सगळा, संपूर्ण, सर्व, साम, सबंध [स]

**समज**–पु समुदाय, साठा, समूह, लोंढा 'चित्त समजीं बुडौनि ठेलें। विस्मयाचा।' –ज्ञा ११ १८६

**समज**–पु १ बोध, ज्ञान, आकलन, उमज, अवगमन (क्रि॰ घेणें, धरणें) २ ग्रहणशक्ति, आकलनशक्ति. ३ जाणीव, खातरी, समाधान, बरोबर आकलन, परिज्ञान ४ ताकीद, माहिती ५ शहाणपणा, हुशारी, अक्कल, बुद्धि 'वरहि वरायास पाहिजे समज।' –मोउद्योग १४१. ६ (ल) धाक, दपटशा, मारठोक [स सम्+मज्ज्, हिं समझ] ॰उमज–पु पूर्ण जाणीव, पूर्ण ज्ञान, वास्तविक बोध **समजणें**–सकि १ जाणणें, बोध, आकलन होणें २ माहीत होणें, ठाऊक होणें, उघड होणें, स्पष्ट दिसणें ३ –अकि पटणें, खात्री होणें, समाधान होणें, शंकानिरसन होणें ४ सारख्या सारख्या दिसणाऱ्या गोष्टीमधील सारखेपणा व फरक कोणता हें नक्की आणि पक्केपणानें सागता येणें **समजूं लागणें**–सज्ञान होणें, कळू लागणें, कळण्यासारख्या वयात येणें **समजदार**–वि १ सुज्ञ, विचारी, शहाणा, हुशार २ चलाख, चांगली ग्रहण शक्ति असलेला **समजपत्र**–न वाद न करता समजूत झाल्याचें वादी–प्रतिवादी याचें समतिपत्र **समजवाली**–वि समजूतदार, शहाणी 'तुं समजवाली साऱ्यानीं जुट बांधावी।' –राला ७३ **समजविणें**–उक्रि स्पष्ट करून सांगणें, समजाविणें पहा **समंजस**–वि १ समजूतदार, सुजाण, विवेकी, शहाणा, जाणता २ बुद्धिवान, हुशार, तीव्र बुद्धीचा ३ सद्गुणी, सज्जन, भला ४ योग्य, लायख, बरोबर, शोभेसा **समजस**–वि समंजसचा अपभ्रंश प्रयमार्थी **समजावण-णी**–स्त्रीन १ समजूत, स्पष्ट करून सांगणें २ मन वळविणें, समाधान करणें, समजूत पाडणें, खात्री करणें (क्रि॰ करणें, होणें) 'कर उनि स्तन्यपान। स्वशाळाचें समजावण।' –रास १५७७ **समजावशी, समजाविशी, समजावीस, समजी**–स्त्री योग्य प्रकारें समजूत पाडणें, वळणावर, ताळ्यावर आणणें, मनवळवणी, समाधान, खात्री करणें, शंका निरसन करणें, एखाद्यासंबंधीं

मन ताळ्यावर आणणें (क्रि॰ करणें, पाडणें, काढणें) 'समजाविशीस अर्धे मारवाड काबीज केलें होतें तें दरोबस्त त्यांजकडे दिलें' -भाव १८ 'पडेल समजाविशी तशी करीत का लाजशी।' -केका १५ 'बसल्या रुसून समजाविसी करिसी वरी' -होला ५८ 'त्यासाठीं माझी समजी व्हावी' -बाळ २ ६८ 'पदर पसरून उभी समजीला।'-प्रला १०० समजा विणें-उक्रि १ समजूत घालणें, स्पष्ट करणें, फोड करून सांगणें, पटविणें २ खातरी, समाधान करणें, मन वळविणें, ताळ्यावर आणणें समजीक, समजीस-समजस पहा. समजीपत्र-समजपत्र पहा समजूत-स्त्री. १ ग्राहक शक्ति, बुद्धि, आकलन शक्ति २ पूर्णज्ञान, जाणीव; बोध, आकलन 'लोकांत समजूत व उपयुक्त ज्ञान याचा बराच प्रसार झाला' -नि ८ ३ खातरी, समाधान, मनवळवणी समजाविशी पहा ४ हुकूम; ताकीद, आज्ञा 'सरकारचे सल्ल्यानें काम करण्यास त्यास समजूत दिली' -टिळे १ १ १६० ॰पाडणें-तडजोड, एकमत, संधि करणें, समाधान करणें, खातरी करणें, पटविणें ॰दार-वि समज दार, समजस पहा ॰पत्र-न १ आपसांत तडजोड झाल्याबद्दल संमतिपत्र, करारनामा, यादी २ फिर्याद काढून घेण्याबद्दल पत्र, कागद, खत समजून उमजून-क्रिवि जाणून बुजून, मुद्दाम, बुद्ध्या, हेतुपुरस्सर, बुद्धिपुर सर समजोती-स्त्री समजूत 'मायबापाला करून समजोती।' -दावि ३५०

समडी—स्त्री (खा) शमीचें झाड, सौंदड

संमत, सम्मत—स्त्री तरफ, दिशा, बाजू 'कमळनैन मेकिन सम्मत निव' -रा १५ १७२ 'छोटे महाजन समता निदाय' -रा १५ १८९ [अर सम्त्]

समत सम्मत—वि अभिमत मान्य, पसंत, कबूल 'तुम्ही समत जाला तेंच पुरे' -प्रथमाला लक्ष्मीकल्याण १३ [स सम्+मन्] संमत-संमति, सम्मत-सम्मति-स्त्री १ मान्यता कबुली पसती २ ऐकमत्य सद्मत, अनुमति, रुकार समतिपत्र-क सम्मतिपत्र-क-न १ अनुमतिदर्शक लेख २ पंचाच्या निवाड्याची मान्यता असल्याबद्दल लेख

समतत, समंतात्—क्रिवि सर्भोंवतीं, सभोंवार, भोंव तालीं, आसमतात् [स सम+तत्]

समत्र-क—वि मत्र म्हणून केलेला, मन्त्रोच्चारसहित (विधि मत कर्म) समत्रक दाह-पु मत्राग्नि देऊन केलेलें प्रेतदहन

समंद-समंद—पु समध पहा

समंद-समदा—वि १ सर्व, एकूणएक. २ संपूर्ण, सगळें [स समस्त] समदार-क्रिवि सगळीकडे

समंद अयलख—वि सर्वांग पांढरें व त्यांत जर्दा रंग व पांढरे पट असलेला (घोड्याचा रंग) समंद काळा-वि सर्वांग काळें व लाल समंद बदामी शिनाजानू-वि सर्वांग बदामी, आयाळ, दुम, टांडी हात पाय काळे समद शियाजानू-वि सर्वांग पिंवळें, आयाळ, दुम, टांडी, कानाचीं टोकें व पाय काळे, दुगणावर पांढरे ठिपके (असा घोडा)

समदासी—स्त्री (तजा) समजाविशी; समजूत [सम जणें]

• समदुर—पु (ना) मोटेचा खालचा नाडा, दोर, सोंड दोर पहा

समदुरी—न (व) मीठ, लवण [स सामुद्रम्]

समंध, समंध—पु १ संबंध, नातें, आप्तपणा, सोयरीक, निकटपणा 'समध पडतां सोडून जावें।' -दा ११ ५ ११ 'दोघाम पडिला समध।'-दा ३ ५ २६ २ ब्राह्मणांचें पिशाच्च [स सबध] समधी, समंधीक-वि १ नातलग, आप्त, निकट असलेला २ पिशाच्चासारखा स्वभाव असलेला ३ समधा सबधी, समधाच्या जातीचा समंधकी-स्त्री पिशाच्चवृत्ति -धांमु

समना—पु सामना; युद्ध 'युद्धात निश्चल मना समना कराया' -वामनविराट ७ १६६ [सामना]

समनाबीर—पु शमनावीर पहा

समनामीर—पु शमनावीर पहा 'ग्रामदेवता समनामीर, पीर, पांढरीचीं दैवतें' -गोपाळ गोविंद पटवर्धन चरित्र

समन्वय—पु स्वाभाविक क्रम, एकसारखा व्यवस्थित क्रम; सुयुक्तक्रम जुळणी, जोड, योग मिलाफ [स] समन्वित-वि स्वाभाविक क्रमप्राप्त, सगतवार, सयुक्तिक, योग्य क्रमाप्रमाणें असलेलें जुळलेलें, युक्त, सबद्ध

समन्स—न आव्हानपत्र, सरकारी बोलावणें, कोर्टाचें बोलावणें [इ समन्स] ॰खटला-पु ज्या गुन्ह्यास सहा महिने पर्यंत कैद किंवा दड आहे असा खटला

समभिव्याहार—पु सहोल्लेख, एकत्र उल्लेख [स] सम भिव्याहृत-वि सहोल्लिखित, एकत्र दिलेलें बोललेलें, लिहिलेलें [स]

समय-यी—स्त्री सगई

समय—पु १ वेळ, काळ प्रसग, संधि; महत्वाची, आणि बाणीची वेळ; हंगाम; मोसम 'नणोनि या खेळा समय सम याच्या वेळा' -तुगा २३१ 'भोगोनि ऐश्वर्य कर्से समयीं दुर्यो धनासि सोडावें।'-मोभीष्म १२ ४८ २ (ल) संकट, कठिण वेळ, प्रसग 'जो पावे समयीं विशेष गणिका' -र १६ ३ प्रतिज्ञा शपथ, करार, ठराव 'शांतनवें समय असा कला की करिन युद्ध

कुरुपार्था । ' –मोभीष्म ११ २४. [स सम्+अय्=जाणें] (एकाद्या)वर समय पडणें, येणें–कठिण प्रसग येणें, सकट यणें, अडचणींत सापडणें समयविशेषीं–विशेष प्रसगीं, योग्यवेळीं समयाचे शिरीं–समयास–समयीं–उपयोगी पडणें–वेळे वर कामास येणें, योग्य प्रसगीं साह्य होणें समय चुकणें–सधि गमविणें 'जरि काय मजकडे तू आजि न येतास समय चुकतास।' –मोभीष्म १२ ३६ समय साधणें–वेळ साधणें, योग्य सधीचा फायदा घेणें, शत्रूशीं गाठ घालणें ' रणागणाचा समय साधिति।' –ऐपो ११७ ०भाषण–न प्रासगिक चोलणें, प्रसगास अनुरूप बोल ०भाषी–पु योग्य प्रसगीं बोलणारा, वेळेवर योग्य तें सागणारा, बोलणारा ०रक्षण–न वेळ साधणें, योग्य वेळीं काम करणें, वेळ सभाळणें ०वेत्ता–पु प्रसग ओळखणारा, आणीबाणीची वेळ ओळखून वागणारा, योग्य वेळ, सधि जाण ण्यास समर्थ, समयज्ञ ०शीर–क्रिवि वेळेवर, योग्य प्रसगीं, योग्यवेळीं, वेळींच, वक्तशीर ०सूचक–वि १ योग्य वेळीं मनात येणारे, सुचणारे, आठवणारे २ हजरजबाबी, तावडतोब योग्य उत्तर सुचणारा, देणारा, रोखठोक ०सूचकता–स्त्री योग्य प्रसगीं योग्य गोष्ट सुचण्याचा गुण, हजरजबाबीपणा ०स्फूर्ति–स्त्री योग्य प्रसगीं योग्य गोष्ट आठवण्याचें, सुचण्याचें सामर्थ्य; प्रसग पडेल त्यावेळीं योग्य ज्ञान प्रकट होणें, योग्य वळीं उपाय, ज्ञान वगैरे सुचण्याचें सामर्थ्य ०ज्ञ–वि. काळ, वेळ ओळखणारा, प्रसगानुसार योग्य वर्तन करणारा समयातीत–वि योग्य वळ टळली आहे असा, सधि, प्रसग निघून गेलेला

**समयानसार, समयानुसार**—क्रिवि प्रसगानुसार, प्रस गोपात्त, वेळेस सानेसें, प्रसगास योग्य, इष्ट असें समया–पु समय 'कोण समयो येईल कैसा।' –दा ३ १० ३९ सम योचित–वि प्रसगास योग्य, वळस अनुरूप, प्रसगास अनुसरून, शोभणारें, प्रासगिक

**समर**—पुन युद्ध, सग्राम, लढाई 'अर्जुन बोलिला समरीं।' –ज्ञा १ २६८ [स] समरग–न समरागण 'भुजत प्रप चेंशीं समरगीं।' –ज्ञा ६ ४७५ समर(रां)गण–न युद्धभूमि, लढाईची जागा 'समरगणा आला। रामें रावण देखिला।' –तुगा ३९३ समरधीर वि युद्धामध्यें धीट शूर समर भूमि–स्त्री रणागण युद्धभूमि रणक्षेत्र समरविजयी–वि युद्धात जय मिळालेला, विजेता, जेता

**समरासमोर**—क्रिवि (ग्र) समोरासमोर पहा परस्प राउुदे

**समर्घ**—वि स्वस्त सवग, सोईस्कर किंमतीचें 'का सम र्घीचि विकणें। महर्घी वस्तु।' –ज्ञा १८ ८८१ [स सम्यक्+ अर्घ]

**समर्थ**—वि १ सशक्त, बलवान, कार्यक्षम, लायख, पात्र, श्रीमत, धनवान, ऐश्वर्यवान 'ऐसी हे समर्थ पदवी।' –दा १८ १०.४६ २ समानार्थ, सारख्या अर्थाचें [स सम्+ अर्थ] म्ह० १ समर्थाची पाळीं उघडत तों दुर्बळाचे प्राण जातात २ समर्थाच्या घरचें श्वान, त्यासि सर्वही देती मान ०स्पर्धा–स्त्री मोठ्याशीं, बलवानाशीं, ऐश्वर्यवानाशीं चुरस, चढाओढ, झुज, द्वद्व

**समर्थणें**—सक्रि प्रतिपादणें, बोलणें, सिद्ध करणें, बाजू घेणें 'आता मातें पावती हे कवण। समर्थणें।' –ज्ञा ९ ४८३ समर्थन–न प्रतिपादन, पुष्टि देणें, पक्ष, बाजू घेणें, सिद्धता, व्यवस्थापन समर्थनीय–वि प्रतिपाद्य निर्वाह्य, पोषणीय, प्रमाणानीं सिद्ध करण्याजोगें, प्रतिपादनीय, स्थापनीय सम र्थित–धावि सिद्ध, स्थापित, प्रतिपादित

**समर्द, सम्मर्द**—पु गर्दी, दाटी, तुडवातुडव, चेंगरा चेंगरी, घर्षण [स सम्+मृद्]

**समर्पक**—वि योग्य, बरोबर, उचित, शोभेसें, जुळण्या सारखें, यथास्थित, चोख –उत्तर, निकाल, कारण, सबब, शोध, प्रमेय, पद्धत, रीत, कल्पना, वाद, न्याय, युक्ति, तोड, भाषण, प्रश्न, वाक्य इ शब्दाबरोबर उपयोग होतो 'समर्पक वाणी। नाहीं ऐकिजेसी कानीं।' –तुगा ५५९ [स]

**समर्पण**—न देणें, दान, बक्षीस करणें, अर्पण, वाहणें [स सम्+अर्प्] समर्प(र्पि)णें–उक्रि १ देणें, दान करणें, बक्षीस देणें, अर्पण करणें, वाहणें 'आता ओंकारें आदरिलें। तत्कारें समर्पिलें।' –ज्ञा १७ ३७३ 'समर्पूं शरीरें स्वहस्तें।'. २ दडून टाकणें, सढळपणें देणें, ओपणें 'हृदयीं समर्पिली बज्रमुष्टी।' समर्पित–धावि वाहिलेला, दत्त, अर्पिलेला, देऊन टाकलेला

**समर्याद**—वि १ मर्यादित, ठराविक, निश्चित, प्रमाणबद्ध २ सविनय, अदबशीर शिस्तवार [स स+मर्यादा]

**समला**—पु पागोट्याचा, फेट्याचा, डोकीच्या रुमा लाचा, कमरबदाचा पाठीवर लोंबणारा पदर, घोस 'शिरिं समले लाउन निकरानें।' –ऐपो १०८. 'शिलेपोस पल्टणें लाविती पठाण जरिचे समले।' –प्रला ४७ [फा शम्ला] समलेदार–वि शमला आहे असा (फेटा)

**समलातीपत्र**—न मदतीस बोलावण्याकरिता लिहिलेलें पत्र [अर शामिलात]

**समवाय**—पु १ समुदाय, जमाव, समूह 'तरी तया त्रिया समवाया। अनुरूप धनजया।' –ज्ञा १८ १२९० २ (न्याय) नित्यसबध, निकट सबध, सतत सबध, संयोग 'तय तत्तु समवाय पटीं।' –ज्ञा ९ १०६ ३ समष्टिरूप,

व्यापकत्व 'घरी मातें नेणती समवायें।' -ज्ञा ९ ३४४ [स] समवायिकारण-न (न्याय) उत्पत्तिमुलक, निकट, नित्य संबंध असणारें कारण, उदा० माती हें घटाचें, तंतु हें पटाचें

समवाय—पु समवाय पहा समुदाय 'ऐसा सावध हा समवावो।' -ज्ञा ८ २११

समवेत—शअ सह, सहित, बरोबर 'बहुत ऋषि सम वेत।' -रावि 'रखुमाई आपणसमवेत।' -तुगा ४६६ -धावि १ समवाय संबंधानें अन्वित, संबद्ध, आनुषंगी; संदस्थित २ जमलेलें, एकत्रित, मीलित, मिश्रित, युक्त

समशेर—स्त्री १ तलवार, खड्ग, कृपाण, एक शस्त्र २ गंजिफाचनी गंजिफातील आठवा रंग [फा समशेर] ०बहादुर-पुवि १ तलवार बहादूर, तरवार वापरण्यांत पटाईत, शूर, परा क्रमी २ मस्तानीच्या मुलाचें नाव ३ गायकवाडांचा किताब समशेरा-समशेरी-स्त्री तरवारीची काटाकाटी, खणाखणी 'लढाई बर बजेनें समशेरासमशेरी जाहली' -रा १ २४४ समशेर करणें-तरवार गाजविणें, पराक्रम करणें 'ज्यांनीं ज्यांनीं समशेर केली।' -ऐपो २३७ समशेरी-वि १ गंज फाचनी गंजीफातील समशेर रंगाचें, बाजूचें २ पुतळीचा एक प्रकार या पुतळीच्या दोन्ही बाजूवरील बाहुल्यांचीं डोकीं एकाच दिशेस असतात

समश्या—स्त्री समस्या, अर्थ, आकांक्षा, हेतु 'परश रामाची पुरविली समश्या पूर्ण।' -स्वादि १ २ ६२ [स समस्या]

समश्रुकीत—वि धड, चांगला, सुरेख 'समश्रुकीत असता वाचा। घोष न करिसी का मामाचा।' -तुगा ४३८९

समष्टि—स्त्री १ ०यष्टींचा समूह, सामग्र्य, समुदाय, अनेक घटकांनीं संपूर्ण संगृहीत, समाविष्ट स्थिति 'ईश्वरोपाधि समष्टि जीवोपाधि व्यष्टि' २ ब्रह्मांड ०ग्रह-पु संपूर्णत्वानें, एकत्वानें जाणीव ज्ञान, समूह रूपानें ज्ञान याच्या उलट पृथक्त्वानें जाणीव म्हणजे व्यष्टिग्रह

सम(मा)सकी—स्त्री सदा सदैवच दूध देणारी, दरवर्षी विणारी (गाय म्हैस, वगैरे) [सदा+माह]

समसम—स्त्री १ कटकट, रखरख, निकडीचा त्रास, काळजी (क्रि० लागणें, सुरूं होणें, टळणें, सुटणें, जाणें, तुटणें, सरणें) २ व्यग्रता, अस्वस्थता, उद्वेग चिंता 'कदा समसम नाहीं पोटीं। यथालाभ संतुष्टि या नाव।' -एभा १९ ४१० [समसम अनुकरण] समसमि(मी)त-वि खरमरीत, कडक; तीक्ष्ण 'कैसी समसमित नवाई। भुकेलेपणाची।' -ज्ञा ११ ४२९ 'एक वरा आणिया दोन्ही। तैसें पञ्चु समसमीत।' -मुआदि ६ ३७

समसा—वि सरळ, सम, सारखा 'परि समसा उद। जेय कामु न लाहे किया करू।' -ऋ ८८.

समसाळी—स्त्री (वे) गाताचा एक प्रकार.

समस्त—वि १ सर्व, सगळे; सर्वनाम 'तो दळभार समस्तु। सप्रमेरीं।' -ज्ञा १ १७६ २ सामासिक, अनेक पदांचा समास होऊन झालेला (शब्द) ३ संपूर्ण, सबंध; सगळा, अख्खा ४ युक्त, मिश्र, समाविष्ट; अंतर्भूत, संगृहीत ०राशिक-राशिगणित-न (गणित) बहुराशिक

समस्या—स्त्री १ आकांक्षा, अंदाज, अपेक्षा 'न साम्रा ळवे समस्या आपुली।' -ज्ञा ११ ९२. २ पूर्ण करावयास दिलेल्या श्लोकाचा अपेक्षित किंवा दिलेला भाग ३ शंका 'ऐसी केली द्विजाची पूर्ण। समस्या देवें।' -कथा ६ २० ९८. ४ कूट, कोडें, सांकडें, कठिण प्रश्न (क्रि० घालणें, पुरवणें) 'गणपतिपूजना वाचून लग्न होत नाहीं तर महादेवाचे लग्नात कसें केलें अशी त्यानें मग समस्या घातली' [स] ०पूरण-पूर्ती-स्त्री समस्या पुरी करणें, दिलेला अर्धा श्लोक पूर्ण करणें, कोडें सोडवणें

समळ—वि मळकट, घाणेरडें -एभा ७ १२७,२५ ४०८

समळ-समळी-समळ्या संयळ—सवळी, सवळ्या पहा

समळट—वि सपाट, समपृष्ठ सारखा 'तळीं पडती पर्वत गिरि। अवघ समळट होईल वसुधरीं।' -स्त्रिपु १ ३६ ३३ [स समतल]

समक्ष—शअ प्रत्यक्ष, देखत; समोर -क्रिवि समोरा समोर 'त्याची माझी समक्ष गाठ पडेल तेव्हां सांग' [स सम्+अक्षिन्] समक्षता-स्त्री १ प्रत्यक्षता समोरील स्थिति, दृष्टि समोर असणें, उपस्थिति, हजेरी 'पत्रावर समक्षतेच्या सह्या कराव्या' -ऐरापुग्र ३ २ भेट; प्रत्यक्ष भेट 'बापू मानाची समक्षता झाली यावर परस्परें बोलण्यांत येईल' -इऐ ६ ३

समक्षासमक्ष-शअ देखत, समोरासमोर, तोंडवर 'तुम्ही तिलाच समक्षासमक्ष विचारून टाका' -भाव १३ -स्त्री प्रत्य क्षता; उपस्थिति हजेरी

समक्षा—स्त्री १ समस्या या अर्थी त्या शब्दाचा अप भ्रंश २ साक्षात्कार देवाचें प्रकटीभवन, प्रत्यक्ष देखावा, दृश्य भास प्रचीति

समा—पु (कों) १ एक विशाच्चदेवता, समंध २ पूर्ण भरतीची वेळ, जेव्हां मध्यान्हीं आला असता भरती पूर्ण होऊन १२ मिनिटें पाणी तसेंच राहतें त्यास म्हणतात ३ (ल)

मर, मध्य, हगाम, मोसम, शिखर, पराकाष्ठा ४ मतैक्य, एकोपा, मेळ [ स ]

**समा**—पु गानानद, गायन ऐकणें; गानामुळें लागणारी तद्री ( दरवेशी वगैरे लोकाची ) [ अर समा ]

**समा**—स्त्री वर्ष, सवत्सर [ स ]

**समा**—स्त्री १ आकाश –आदिलशाही फर्मानें २ लगा माचा एक प्रकार [ अर समा ]

**समाइणें**—अक्रि मावणें, एकत्र येणें 'दाटोवाटी समा इले।'–उषा ११ [ स सम्+मा ]

**समाईक**—वि १ अविभक्त, अनेकस्वामिक, अनेकाच्या मालकीचा, ( माल, जमीन, वतन, हक्क ) २ पातीचा, भागी दारीचा ( धदा, व्यापार ) [ स सम्+ई=जाणें ] ०**कुटुंब**-न ज्याची सर्व जिंदगी एकत्र असुन वाटे झाले नाहींत असें कुटुब, अविभक्त कुल

**समाकुल-ळ**—वि समस्त, सर्व, सगळा, सबध 'अथवा दशदिशा समाकुळ। दिशाचक्र।'–ज्ञा ११ ३१५ विशेषत एखादा समाज, जात, राष्ट्र लोक, गाव यासबधीं हा शब्द याजतात उदा० समाकुल पाढर सर्व गाव, ल्हानापासून थोरापर्यंत सर्व तसेंच समाकुळ देश, प्रात, परगणा, कसबा, गाव, फौज, सभा, मडळी, पचाईत जमात, जथा, वगैरे याप्रमाणेंच समाकुळ असाम्या, शिपाई, कारकून वगैरे 'त्या निकालपत्रावर दफातदार व समाकुळ पाढरीच्या साक्षी झाल्या'–पेशवेकालीन महाराष्ट्र ४७६ [ स सम्+आकुल ]

**समाकुळ-कूळ**—वि व्याकुल, व्यग्र, हैराण [ स सम्+आकुल ]

**समाक्रांत**—धावि व्यापलेलें, आक्रमण केलेलें, पादाक्रात केलेलें, पराभून व्याप्त [ स सम्+अ+क्रम् ]

**समागत**—धावि प्राप्त, आलेला, येऊन पोहोंचलेला, जवळ आलेला [ सं सम्+आ+गम् ]

**समागम**—पु १ सहवास, सगत, सयोग, सपर्क सहस्थिति २ अनुगमन, सती जाणें ३ सभोग, मैथुन [ स सम्+आ+गम् ]

**समाचरण, समाचार**—नपु सद्वर्तन, चागली वागणूक, वर्तणूक [ स सम्+आ+चर् ]

**समाचार**—पु १ चौकशी, परामर्श, विचारपूस काळजी देखरेख वगैरे २ बातमी, वार्ता, हकीकत, वृत्त ०**घेणें**-१ चौकशी, विचारपूस करणें २ ( ल ) मारणें, टोकणें, खरडपट्टी काढणें

**समाज**—पु १ सभा, समूह जमाव मडळी 'तु त्रैलोक्याधीश सुरराणा। देवसमाजा सुखी करी।'–भारावाल ११ २२८ २ समुदाय, साठा, सग्रह, गर्दी 'चित्त समाजीं बुडोनि गेलें। विस्मयाचिया।'–ज्ञा ११ १८६ [ स ] ०**धारणा**-स्त्री लोकाचें स्वास्थ्य, लोकसमूहाचें पोषण, रक्षण वगैरे ०**वाद**-पु सपत्तीचें उत्पादन व विभजन समाजाच्या मालकीचें ठेवणें'–केसरी २१ ५ ३७ ०**शासन**-न १ समाजाचें नियत्रण, नियमन २ समाजाकडून होणारी शिक्षा –गागा २४७ ०**शास्त्र**-न समाजाची उत्पत्ति, सुधारणा, परिस्थिति, इतिहास वगैरे विषयाचें विवचन करणार शास्त्र –ज्ञाको स ६६ ०**सत्तावाद**-पु सपत्तीच्या उत्पन्नाच्या साधनाची मालकी लोकशाहीच्या तत्त्वानुसार बनलेल्या सरकारच्या हातीं देऊन त्या साधनाच्या सर्वांच्या न्याय्य फायद्याकरिता सहकारितेनें उपयोग करावा असें प्रतिपादन करणारें मत, समाजाचें राज्यतत्रावरील वर्चस्व प्रतिपादणारें मत **समाजिक**-वि ( प्र ) सामाजिक १ समाजासबधीं, लोकसमुदायविषयक, २ समाईक, अनेकसत्ताक सयुक्त अधिकारातील

**समाटणें-समाटून घेणें**—अक्रि ( माण ) परका व आपण एक समजणें, दुसऱ्याशीं मिळतें घेऊन कामें करणें [ सम ]

**समांतर**—वि परस्परापासुन सारख्या अंतरावर असलेला, दोन रेषाच्या समोरासमोरच्या कोणत्याहि भागात सारखें अतर असता त्यास समातर म्हणतात ( इ ) पॅरलल [ स सम+अतर ] ०**द्विभुजचौकोन**-पु ज्या चौकोनाच्या दोनच बाजू समातर असतात असा चौकोन ( इ ) ट्रॅपिझॉइड–महमा ०**प्रेरणा**-स्त्री समातर रेषानीं गमन करणाऱ्या प्रेरणा, शक्ती ( इ ) पॅरलल फोर्सेस ०**बाजूचौकोन-भुजचौकोन** पु ज्या चौकोनाच्या समोरासमोरच्या बाजू समातर असतात असा चौकोन ( इ ) पॅरलेलोग्राम [ स ] ०**रेषा**-स्त्री ज्या दोन सरळ रेषा एकाच पातळींत असतात व कितीहि वाढविल्या तरी परस्परास मिळत नाहींत त्यास म्हणतात ०**सस्था**-स्त्री पृथ्वीची सुर्याभोंवतीं आपला अक्ष नेहमीं समातर ठेवून फिरण्याची स्थिति

**समाधान**—न १ मनाची शाति तृप्ति, मनाचा सतोष २ विश्राति, स्वास्थ्य आराम दु खनिवृत्ति चिताहरण ३ ( न्याय ) शकानिरसन, आक्षेपखडन समजूत ४ ( वेदात ) एकाकारवृत्ति मनाचें बाह्यगोष्टींपासुन परावर्तन, ध्यानावस्था, चित्तैकाग्र्य [ स सम्+आ+धा ] ०**पत्र**-न आप्तनिधनानतर पाठवावयाचें सात्वनपर पत्र 'शाहु छत्रपतींनीं दमाजीस समाधानपत्र लिहिलें आहे'–शारो ८० **समाधानी**-वि १ थोड क्यात तृप्त होणारा सतोष पावणारा २ शात, सतोषीवृत्तीचा, तृप्त

**समाधि समाध**—स्त्री १ चित्तैकाग्र्य इद्रियाचें दमन करून आत्मस्वरूपात लीन होणें, एकतानता, तद्री इद्रियवृत्ति निरोध, योगातील आठवें व शेवटचें अग 'ऐसिये सरिसिये

मुमिक । समाधि राह ।'–ज्ञा६ ६ 'समाध उम्याने लागली लग्या' –दावि ४५७ २ सन्याशानें स्वत स मिवतपणी जत त पुरून घेणें, किंवा पुरून घेणें ३ मृत सन्याशास जमीत पुरण्याचा किंवा मातीने पुरण्याचा विधि, संस्कार ४ सन्याशास पुरलेल्या भूमावर बांधलेलें तें वृंदावन, घडगे [स] ०सुख–न समाधिमध्ये होणारा आनंद समाधिस्त–स्थ–वि १ समाधि लावलेला, ध्यानमग्न, आत्मचिंतनांत मग्न, गढलेला 'दृढ केला भाव समाधिस्थ ।'–तुगा ७७१ 'वेदस्वरूपीं होय समाधिस्त ।' २ समाधि घेतलेला; मृत, पुरलेला

समान—पु पचप्राणांपैकी एक वायु, नाभिस्थ असून अन्नरसाचा सर्व शरीरांत प्रसार करणारा वायु 'सर्वांगीं व्यान नाभीं समान ।'–दा १७ ८ १२. [सं]

समान—वि १ सारखें तुल्य, बरोबरीचें, जोडीचें, एकाच योग्यतेचें (समासात) समान–गात्र–जाति–धर्म–दु ख–सुख–बल–सामर्थ्य–विभव–विक्रम–व्यसन समानोद्देश, समानोद्योग इ० २ सपाट एका पातळींतील, गुळगुळीत –एभा १४ ४०६ ३ एकरूप हुबेहुब प्रकारसें, तुल्यरूप, तसेंच [स सम, मा=मोजणें] ०कक्ष वि बरोबरीचे, एकाच दर्जाचे, तुल्य, सारखे, जोडीदार ०काला–कालीन–वि समकालीन पहा एकाच कालचे ०वयस्क–वि समवयस्क पहा एकाच वयाचे ०वृत्ति–स्त्री १ समतोल वृत्ति, शांत वृत्ति, नि पक्षपातीपणा, अचल मन स्थिति, समभाव २ दुसऱ्यांशीं मनैक्य, समतावुद्धि सर्वांठायीं एकबुद्धि –वि सारख्या स्वभावाचा; सारख्या कलाचा सहमत ०शील–वि सारख्या मनोवृत्तींचे, स्वभावाचे, प्रवृत्तीचे, समस्वभावी 'समान शील०यसनेषु सख्यम्।' ०स्कंध–वि सारख्या खांद्याचे सारख्या उंचीचे (ओझें ओढणारे बैल वगैरे) समानांतर–वि १ समांतर सारख्या अंतरावरील, ज्यामध्यें सारखेंच फरक आहे असे समानांतर रेषा–समांतररेषा पहा समानाधिकरण–वि १ ज्याचा आधार विषय स्थान वगैरे एकच आहेत असे २ (व्या) एकाच विभक्तींतील ३ (ल) ज्याचा आधार, पाया एकच आहे असे, सुसगत, परस्परांशीं जुळणारे, सयुक्तिक ०बहुव्रीहि–पु ज्या बहुव्रीहि समासातील दोन्ही पदांस विग्रहवाक्यांत एकच विभक्ति असते तो समास समानार्थक–वि एकाच अर्थाचे, सारख्याच अर्थाचे, त्याच अर्थी समानोदक–वि सपिंडाहून दूरचा पण ज्याला तर्पणाचा अधिकार आहे असा (नातलग) याचा सबध सातव्या पिढीनंतर चौदा पिढ्यांपर्यंत पोंचतो समानोदर–वि एकाच आईपासून जन्मलेले, सोदर, सख्खे

समान सम्मान, समान—वि आठ अरबी वर्षगणनेंत वापरतात [अर सामान]

संमान, सम्मान—न शेर्टाच बोलावणें (इ) ममन्स

संमान, सम्मान, सम्मानन—पु सन्मान, आदर सत्कार; पूजन [स सम्+मन्] संमानित–वि आदरसत्कार केलेला, बहुमानित, पूजिलेला

समानीन, सम्मानीन—वि ऐशीं अरबी वर्षगणनेसंबंधीं योजनेंत [अर समानीन्]

समापन्न—न १ समतिपत्र, मान्यतालेख, अनुज्ञापत्र 'सर्वां ही मिळोन समापत्र केलें'–खाडवाभार ३१ 'तुम्हांसि समापत्र द्यावयाची चिठ्ठी म्हणोन केलें'–समरो ३ ६५ २ कबुली लेख [स समतिपत्र]

समापन—न पूर्णता, समाप्ति, शेवट, अखेर [स सम्+आप्]

समापन्न, समापित—वि समाप्त, संपूर्ण, शेवटास गेलेलें, पूर्ण झालेलें [स]

समाप्त—वि संपलेलें, पूर्ण झालेलें, उरकलेलें, शेवटास गेलेलें [स]

समाप्ति, समाप्त—स्त्री १ पूर्णता, शेवट, अखेर, संपलेली स्थिति 'भयाची समाप्त त्याचे हातें'–रामदासी २ १५ २ (ल) मरण [स]

समायिक—वि सामायिक पहा

समायिक, सामायिक—वि प्रासगिक प्रसगोचित, प्रसंगप्राप्त नैमित्तिक; कालानुकूल, कालसदृश [स समय]

समायिणें—अक्रि मावणें व्यापणें, प्रवेश होणें समाविष्ट होणें 'हृदयीं हांवि न समाये । बुद्धीचें गिंवसुनि ठाय ।'–ज्ञा ४ २०६ 'प्रतिध्वनि न समातु । उपजत असे ।'–ज्ञा ११२६ 'मनामध्यें न समाये ।'–दा ७ ७ २५ [स सम्+मा]

समार—पु (खा) संभार पहा १ मसाला २ एक औत, हत्यार –कृपि २५७

समारंभ—पु १ उत्सव, सोहळा, (एखाद्या कार्याची, सार्वजनिक, प्रसंग मेजवानी, मिरवणूक, वगैरेंची) व्यवस्था, उद्योग, खटपट, झुळणी, योजना, रचना, मांडणी उदा० लग्नसमारंभ, मुंजीचा समारंभ ब्राह्मणभोजन, यज्ञ, युद्ध याचा समारंभ २ (ल) अशा प्रसगास लागणारी सामुग्री, तयारी, साधनसमुच्चय 'आमच्या येथील विवाहाकरिता आपणाकडील सर्व समारंभ आम्हांस द्या' ३ आदर, सत्कार, मान (क्रि० राखणें, ठेवणें) ४ खटाटोप आटाआट, आवेश 'तैसा समारंभु सुणा। गलाचि तो ।'–ज्ञा १७ ४१८ 'मग क्षोभला समारंभें। घाली तेथ ।'–ज्ञा १५ ४८७ [स सम्+आ+रभ्]

समाराधन–ना—नस्त्री १ मन, उत्सव, सोहळा वगैरे प्रसंगींचें ब्राह्मणभोजन, मुक्तद्वार, भंडारा 'समाराधनेसी जाऊ

नये।' –दा १९ २ १४ याचीं समारत्ना, समाराद्मा अशीं अपभ्रष्ट रूपें प्रचारात आहेत 'त्याच्या दुसऱ्या दिवशीं आप त्याकडची समारत्ना झाली' –मुदे ९२ 'काहीं समाराद्मा का आहे इथें' –पकोवे २ मनधरणी, संतोषविणें [स सम्+आराधन]

**समारोप**—नपुन १ अग्निहोत्री कांहीं निघीसह आपल्या अग्नीवर अरणी शेकून अग्निहोत्र बंद ठेवतो त्यास म्हणतात २ उपसंहार, शेवट, समाप्ति [स ]

**संमार्ग**—पु दर्वी, स्रुवा इत्यादि यज्ञिय पात्रें दर्भाग्रानीं साफ करणें [स सम्+मृज्]

**संमार्जन**—न १ स्वच्छ करणें, साफ करणें, झाडणें, पुसणें २ पोतेरें, सडा, सारवण करणें, धुणें 'अहा थोर वाउगें जाहलें। अमृतें समार्जन म्या केलें।' –ज्ञा ११ ५३८ 'निज भाग्यें अमृत मिळता समार्जन त्याचें केलें।' –कीर्तन १ २६ [सं सम्+मृज्–मार्जन] **समार्जनी**–स्त्री केरसुणी, खराटा, झाडू 'समार्जनाचा गुण हा पहावा।' –सारुह ८ ९३

**समालोचन-ना**—नस्त्री निरीक्षण, परीक्षण, सर्वांगाचें अवलोकन, विवरण 'तुलसीदासाच्या चरित्रावर विस्तृत समालोचना या अंकात आली आहे' –मनोरंजन १७ ३ [स ]

**समावणें**—अक्रि १ मावणें, आत राहणें 'वीं श्रीमत रुप या दृष्टीमाजीं समावलें।' –ऐपो २७१ २ प्रविष्ट होणें, अंतर्भूत होणें, सुखानें प्रवेश करणें, शिरणें 'शेर दुधात पावशेर पाणी समावेल' 'शंभर पानांच्या सैपाकात पांच पात्र समावतील' 'पाणी पाण्यात समावतें, तेल तळात समावतें' [स सम्+आ+इ सम्+आप्]

**समावर्तन**—न सोडमुंज ब्रह्मचर्याश्रमाच्या समाप्तीच्या वेळीं करावयाचा विधि [स ]

**समावा**—पु भांडें, पात्र 'या चहाच्या समाव्यात उंदीर पडून मेला आहे' –चहापान नाटक

**समाविष्ट**—धावि १ मावलेला, अंतर्भूत अंगभूत २ प्रवेश केलेला, व्यापलेला, आत राहिलेला (घर वगैरे) ३ शिरलेला, व्याप्त, ग्रस्त (राग, विकार वगैरेंनीं)

**समावेश**—पु १ मावणें, अंतर्भाव, अंगभूतता संग्रह (व्यक्ति वस्तु कामें, गोष्टी यांचा) शंभर ब्राह्मणात या एकाचा समावेश करा' २ प्रवेश, रिघाव, शिरकाव 'या ल्हानशा खोलींत पन्नास मनुष्यांचा समावेश कसा होईल'

**समाश**—पु मध्यान्ह अथवा स्वस्वस्तिकापासुन क्षितिजापर्यंतचा वस समत्व [स ]

**समाशी**—पु भागीदार पातीदार, समान वाटेकरी [स सम्+अंश]

**समाश्रय**—पु आधार आसरा, थारा, ठाव [स सम्+आश्रय] **समाश्रित**–धावि आधार, आसरा मिळालेला

**समास**—पु १ शब्दाची जोडणी, शब्दसंयोग, शब्दाचें संयुक्तीकरण 'पैं गा समासा माझारीं। द्वंद्व तो मी अवधारी।' –ज्ञा १० २७० २ संयुक्त शब्द, जोड शब्द, सामासिक शब्द ३ (चुकीनें) संयुक्त शब्दाचें स्पष्टीकरण, विग्रह ४ लेखाच्या बाजूस कागदावर सोडतात ती कोरी जागा, कडा, कूस, मोकळी जागा (इं) मार्जिन ५ संक्षेप ६ (गणित) बेरीज ७ अध्याय, प्रकरण 'प्रसंग मानें समास पोथी। बहुधा नामें।' –दा १२ ५४ [स सम्+अस्=टाकणें, फेकणें] ०**भावना**–स्त्री (गणित) गुणाकाराची बेरीज करून केलेली रचना, पदयोजना ०**रेषा**–स्त्री पोथीच्या पृष्ठावर दोहों बाजूस कोरी जागा असते त्या ठिकाणीं मारलेल्या रेषा

**समासमीना**—स्त्री सदा महिने दूध देणारी गाय किंवा म्हैस, दरवर्षी गाभण राहणारी व विणारी गाय किंवा म्हैस –मोल समसकी, सामासकी पहा

**समाहरण**—न एकत्र आणणें, मिसळणें, जोडणें, गोळा करणें [स सम्+आ+हृ]

**समाहार**—पु १ एकत्र जमाव समूह, समुदाय, मिश्रण, जुळणी २ अक्षरसमाहार, वर्णसमाहार, वर्णमाला, अक्षरमाला ३ संक्षेप साराश ४ (व्या) समास, शब्दाची जोडणी ५ शब्दांची अथवा वाक्याची जोडणी, जुळणी, 'आणि' या उभयान्वयी अव्ययाचा अर्थ ६ द्वंद्व समासाचा एक प्रकार ७ सारखाच, एकाच प्रमाणात असलेला आहार ८ निरोध 'किंजैल इंद्रियाचा मारू। प्राणापानाचा समाहारू।' –भाए २३२ [स सम्+आ+हृ] ०**द्वंद्व**–पु द्वंद्व समासाचा एक प्रकार या प्रकारात समस्त पदाच्या अर्थाशिवाय आणखी तशाच प्रकारच्या पदार्थांचा अंतर्भाव होतो उदा० भाजीपाला, चणेकुरमुरे **समाहारी**–वि एकाद्याच्या बरोबरीनें आहार असणारा, बरोबरीनें खाणारा

**समाहित**—धावि १ एकाग्र, समाधिस्थ, ध्यानस्थ, ध्याननिमग्न २ इंद्रियें ताब्यात असलेला जितेंद्रिय ३ एकत्र जुळविलेला जोडलेला ४ व्यवस्थित नीटनेटका ठेवलेला, मांडणी केलेला ५ पूर्ण केलेला, शेवटास नेलेला ६ गोळा केलेला, जमा केलेला ७ विचारासाठीं घेतलेला [स सम्+आ+धा–हित]

**समिठी**—स्त्री (महानु) बुक्काबुक्की, हाताहाती, मारामारी वज्राग्नी वज्रमुठी निहनत समिठी होतसे।' –गस्तो ५९ [स+मिठी]

**समिति-ती**—स्त्री १ युद्ध, लढाई 'त्याहीं गुरू जिंकाया केली ती प्रणतिमिष महासमिती।' –मोभीष्म ११२४ २

मंडळी, पोटमंडळ, (६) कमिटी 'समितीच्या बैठकीच्या वेळीं हजर राहून ।' -ऐरापु ३७८ **समितिंजय**-वि युद्धांत जय मिळविणारा

**समिंदर**—पु समुद्र, सागर. 'समिंदरांत मासे कसे जगत्यात जी?' -मुअन्वा १८ [समुद्र]

**समिध, समित्-द्, समीध**—स्त्री होमास उपयोगी उंबर, पिंपळ, खैर वगैरे लाकडाचा तुकडा 'मग वासना तराचिया समिधा।' -ज्ञा ४ १३६ 'होते यदश शपथास ज्वलनात हे समिद्धरणी।' -मोविराट ५ ३ [स सम्+इन्ध्= पेटणें] **समिध शेकणें**-(स्मार्ताग्नीचा समारोप करताना त्यावर समिध तापवून ठेवतात त्यावरून) नांवाला करणें, विधिनिषेध न मानणें, बंद ठेवणें 'तेव्हा काहीं वर्षें या सभेची समिध शेकण्यास हरकत नाहीं' -आगरकर ३ १२०

**समिद्ध**—धावि पेटलेला 'होय खल शलभ तया समिद्ध रणीं।' -मोविराट ५ २ [स]

**समिना**—पु चांदवा, वितान, अस्मानगिरि [फा शामियाना]

**समिश्र**—वि मिसळलेलें, मिश्रित [स] **समिश्रण**-न भेसळ, मिसळ, मिश्रण

**समी**—स्त्री (तजा) समयी, समई.

**समीकरण**—न १ सारखें, समान, सपाट करणें, बरोबर करणें, तुल्य करणें २ बरीज, एकत्रीकरण ३ (बीजगणित) दोन समान किंमतींचीं पदें समोरासमोर मांडणें, तुल्य पदें **०घालणें**-दोन तुल्यपदसंख्या दिलेलें उदाहरण करावयास सांगणें **०बसविणें**-दोन तुल्य गोष्टींची सांगड घालणें, दोन गोष्टींची एकवाक्यता आहे असें सिद्ध करणें **०सोडणें-सोडविणें**-दोन तुल्य पदसंख्या असलेल्या उदाहरणांतील अव्यक्ताची किंमत काढणें **समीकृत**-धावि १ बरोबर, सारखें, समान केलेलें २ बेरीज केलेलें ३ बीजगणितांत समीकरण रूपानें मांडलेलें

**समीचीन**—वि १ *वास्तविक, सत्य, प्रत्यक्ष* २ योग्य, न्याय युक्त उत्तम ३ विपुल, भरपूर, परिपूर्ण, रेलचेल [स]

**समीननिमीन**—वि समविषम, कमीअधिक 'तेथ सत्त्वें आपुल्या मार्गीं। समीननिमीन भार्गीं।' -ज्ञा १८ ८२८ [स]

**समीप**—वि जवळचा, निकटचा, लगतचा, अलीकडचा -क्रिविशअ जवळ, निकट, सनिध, लगत, शेजारीं 'हें निद्रिता समीप। चेतो दुरी।' -ज्ञा १४ ८८ [स] **समीपता**-स्त्री १ जवळिक, निकटता, नैकट्य, आनंतर्य, ससक्ति सान्निध्य २ चार प्रकारच्या मुक्तींपैकीं एक (देवाशीं सान्निध्य, जवळ असणें) 'सलोकता समीपता। ते तव पिलें सांडी सर्वथा।' -ज्ञा १ ६६ 'समीप असावें हे समीपता।' -दा ४ १० २४

**समीर-ण**—पु वारा, वायु, हवा 'तंववरी तो समीरु।' -ज्ञा ८ ११६ 'कां अफाटा समीरणा।' -ज्ञा, १८ १६९८ 'सहाय तूं समीरण हो।' -मोविराट ३ ७८ [स सम्+ईर्= जाणें]

**संमीलन**—न एकत्र मिळणें, एकत्र होणें, येणें [स सम्+मील्]

**समीक्षण, समीक्षा**—नस्त्री १ सूक्ष्म शोध तपास, छाननी, बारीक परीक्षा, तपासणी, अवलोकन, न्याहाळणें २ आत्मविद्या, बुद्धि, सांख्यशास्त्र

**संमुख, सम्मुख**—वि अभिमुख, समोर, पुढें, तोंडासमोर [स सम्+मुख] **संमुखीन**-वि समोरचा, समोरासमोरचा

**समुचित**—वि योग्य, रास्त, न्याय्य, उचित, युक्त 'गुरुसुत० मारुनि केला कलहहि होय प्रकार समुचितसा।' -मोभीष्म ९ ३५ [स]

**समुच्चय**—पु १ साठा, समूह समुदाय, जमाव, ढीग, 'म्हणती तुवा मांडवा। हा चिन्ह समुच्चयो आघवा।' -ज्ञा १३ ८६० २ सभेनें दिलेला निकाल, केलेला ठराव, निश्चय. ३ (व्या) शब्दसमूह, समास, वाक्यांचें किंवा शब्दांचें एकीकरण व, आणि, तसेंच या उभयान्वयी अव्ययाचा अर्थ [स सम्+उद्+चि=गोळा करणें]

**समुच्छेद**—पु समूळ नाश, पूर्ण नाश, उच्चाटण [स]

**समुत्कट**—वि अतिशय [स]

**समुत्कर्ष**—पु श्रेष्ठत्व, उत्कर्ष, भरभराट [स]

**समुत्थान**—न १ उठणें, उभें रहाणें २ धंदा, उद्योग **संभूयसमुत्थान**-पु भागीचा धंदा [स]

**समुत्पादन**—न संपादन, उद्योग, उत्पन्न करणें [स]

**समुद, समुदाय-समुदाव**—पु १ जमाव, समूह, वर्ग, संघ अनुयायी वर्ग, शिष्यवर्ग 'बैसला मंत्रीसमुदाव।' -वेणा सीता ११८ 'बरेंवाईट सोसावें समुदायाचें' -दा ११ ५ १४ 'देखिला इत्यादि विचित्र समुद' -दावि १२ ३२ २ समुच्चय, समूह, [स]

**समुदा**—वि सर्व, सगळें 'धैर्य वीर्य समुदें विरलेंसे।' -किंगवि ४० ६२ 'ते होतील हतप्रभाव समुदे तुझ्या प्रतापानळीं।' -निमा ११ 'समाचार घेऊनि त्याचा समुदा।' -दावि १२५ [स. समुदित]

**समुदायी-ई**—पु शिष्य, अनुयायी 'समुदायी मग गुप्त झाला।' -देस सप्र ३ ७७ [स]

**समुदित**—धावि १ जमलेलें, एकत्र केलेलें, जुळलेलें [स]

**समुदित**—धावि आनंदित, संतुष्ट [स+मुदित]

**समुद्र (अधर)**—पु (नृत्य) ओंठ वर उचलणें

समुद्धर्ता—पु उद्धार करणारा, मोक्षदाता 'म्हणोनि मा भक्तां। नाहीं एकहि चिंता। तयांतें समुद्धर्ता। आथि मी सदा।' –ज्ञा १२ ९४ [म]

समुद्वृत्त तारा—स्त्री (नृत्य) डोळे उचलणें, (वीर व रौद्र रसाचा अभिनय) [स]

समुद्भव—पु उत्पत्ति –एभा १० ६९ [स]

समुद्र—वि मोहरबंद, शिक्का असलेलें, मुद्रा असलेलें [स स+मुद्रा]

समुद्र—पु १ सागर, दर्या, अर्णव, उदकराशि, उदधि, जलधि २ (ल) अमर्याद सांठा, विस्तीर्ण, अफाट, अगणित असा समुद्र पदार्थ वगैरे (उदा० देव, मानवी जीवित, भाषा, शास्त्र, शक्ति सद्गुण) या कल्पनेवरून भवसमुद्र गुणसमुद्र असे अनेक सामासिक शब्द बनतात म्ह० समुद्रास दुखणें शिंपींत औषध (वाग्र) समुद्रापालचा–समुद्रकाठचा, किनाऱ्या वरील समुद्राचें अर्घ्य समुद्रास–ज्या वेळीं मिळालेल्या देणगीपैकींच कांहीं परत देतात तेव्हां योजतात समुद्राचें मीठ डोंगराचे आवळे(मिळणें)–परस्पर विरुद्ध किंवा परस्परा पासून फार दूरच्या वस्तू एकत्र आल्या असता म्हणतात सातासमुद्रां पलीकडे–अतिशय दूर, दुर्गमस्थळीं साता समुद्रापलीकडे ठेवणें–अतिशय जतन करणें, दुष्प्राप्य स्थळीं ठेवणें, बहुमोल मानणें समुद्रात जाऊन–पडून कोरडा–सुका–१ अमूल्य संधि मिळूनहि ज्यास फायदा झाला नाहीं असा दुर्दैवी २ दुष्कर्मांत पडून पुन्हा उजळ माथ्यानें हिंडणारा किंवा नीतीची वढाई मारणारा समुद्रांत सुई पाहणें शोधणें–अशक्य किंवा अप्राप्य गोष्टीसाठीं निष्फळ प्रयत्न करणें सामाशब्द–०कफ–पु समुद्रफेस, एका माशाचें हाड समुद्रमाणकी, सिंधुकफ, सुफेन ०कमळ–न एक प्राणि, हा वेळी सारखा असतो –प्राणिमो १४५ ०कर्कटी–स्त्री एक प्राणि –प्राणिमो १३९ ०काठ–कांठा किनारा–तीर–पु समुद्राच्या काठचा, किनाऱ्याचा प्रदेश ०गृह–न समुद्रकाठीं, किंवा खाडींत वगैरे बांधलेला बंगला, जलम दिर, ग्रीष्मगृह ०चतुष्टय–न चार समुद्र, पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर समुद्र ०नारिंग–न एक प्राणि –प्राणिमो १३९ ०पुष्प–न फुलासारखा एक प्राणि समुद्रकमळ –भूवर्णन बाबा मराठे ८३ ०फळ–ल–न एक औषधी फळ याचें झाड समुद्रकिनारीं असून पानें बदामाच्या पानासारखीं असतात ०फेण–फेन फेस–माणकी–पुस्त्री एक माशाचें हाड, पाठ एक औषधी पदार्थ –प्राणिमो ९५ ०मेखला–स्त्री पृथ्वी, वसुंधरा भू (सभोंवती समुद्राचें कडें आहे म्हणून) ०वलयांकित वि समुद्रानें वेढ लेली (पृथ्वी) 'समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान। करिता समान नव्हे नामा।' –तुगा २४९४ ०शोक–शोफ–शोष–सोक–सोख–पु एक औषधी वेल [स समुद्रशोष] ०स्नान–न समुद्राच्या पाण्यात केलेली आंघोळ समुद्राची दांडी–स्त्री समुद्रकिनाऱ्यावर जेथें लाटा फुटतात ती जागा, समुद्रकिनाऱ्या जवळ जो वाळूचा बांध तयार होतो तो समुद्रिय–वि समुद्रा संबंधीं, समुद्रविषयक, समुद्रोद्भव

शब्दो ७ २२

समुरी—वि शिमरी, नक्षी

समुन—वि उंच –आदिलशाही फर्मानें [फा]

समुवाय—पु (अप) समुदाय [स समुदाय]

समूर—क्रिवि समोर पहा

समूल–ळ—वि क्रिवि १ मुळासहित 'तेथ समूळ उपडती जातिधर्म' –ज्ञा १ २५० 'चडवातें जैसी कर्दळी। उन्मळों पाहे समूळीं।' –एरुस्व १६ ११४ २ (ल) पाया, आधार, उगम, मूळ असलेलें (ग्रंथ, वाक्य वगैरे) [स स+मूल]

समूह—पु जमाव, समुदाय, कळप टोळी 'जेथ पावका दिक पाव। समूह वस्तूचे।' –ज्ञा ११ १४२ [स सम्+ऊह्]

समृद्ध—वि १ परिपूर्ण, भरलेला २ सधन, भरभराटलेला 'तेंगें साटुकपणें ज्वाळा समृद्धा। मग वासनांतराचिया समिधा।' –ज्ञा ४ १३६ ३ वाढलेला, अधिक झालेला [स सम्+ऋध्]

समृद्धि—स्त्री. १ परिपूर्णता, चंगळ, वैपुल्य, रेलचेल २ ऐश्वर्य, भरभराट, सधनता, सुकाळ 'मग समृद्धिजात आपैसें। घर रिघे।' –ज्ञा ६ ३५४ [स]

समे—शअ समयीं 'भक्तिभावाचेनि प्रेमें। द्वारपाळ जाहला समे।' –एकनाथ गाथा ५४० [समय]

समेट—पु सलोखा, ऐक्य तडजोड, मेळ, भांडण, विरोध वगैरेचा शेवट, समजूत [स सम्+इ] समेटणें–उक्रि १ तड जोड करणें, भांडणतंटा मिटविणें, आवरणें, समजूत करणें, संधि करणें, सलोखा करणें २ एकत्र करणें, जमविणें, गोळा करणें –अक्रि १ संपणें, थारणें, पुरें होणें, निवृत्ति होणें, अखेर होणें, मिटणें (भांडण, तंटा, प्रकरण) २ एकत्र येणें, एकमत होणें, एकी होणें (विरुद्ध पक्षाची) ३ गोळा होणें, एकत्र जमणें, गर्दी होणें

समेत—वि जुळलेला संलग्न संबद्ध (विषय, गुण क्रिया, कारक वगैरे) –शअ सह बरोबर, सहित समवेत युक्त 'निज सैन्य समेत शल्य जो मामा।' –माकर्ण ७ ४५ [स सम्+इ= जाणें] समेतबावती–क्रिवि बाबतीसह (परगण्याच्या अधिकाऱ्याच्या हक्कासह ते हक्क धरून) त्या शेतास समेतबावती पाच मण भात पडतें 'समेत जवाहिर–क्रिवि जवाहिरासह –पेद २० २

समेलन—न १ मेळा, एकत्र जमणें, जमाव 'शाळेचें समेलन' २ मिश्रण, भेसळ, मिलाफ 'जातींचें समेलन' [म]

**समेसमान**—वि (प्र) समसमान; अगदी सारखें, एका सारखे एकरूप, हुबेहुब, थेट सारखे

**समेळ**—न (रूढ) सबळ, एक पाय **समेळ्या**-पु समेळ धाजविणारा [स सम्+भीरु]

**समेळ**—पु समूह जमाव, एकमताची, विचाराची मडळी 'सत मडळी, प्रेमसमेळीं, देती आरोळी ।'–अकक २ शिवराम, रामजन्म २ [स+मेळ]

**समो**—पु १ समता, मेळ, सारखेपणा, ऐक्य 'शिष्यां देला वटि। अद्वैताचा समो फुटे।'–अमृ ९ ७० २ समय, वेळ 'पाठीं रात्रीचा समो पावे। आणि आपैसाचि हाठवे।'–ज्ञा ८ १६८ ३ समूह, समुदाय 'तें सुकृत ऐसें म्हणे। श्रोत समो।'–ज्ञा १४.२६० [स समय]

**समोखणें, सबोखणें**—सक्रि १ सात्वन करणें, समजावणें 'येऊनी वेव्हा भेटी घाल। समोखाल मज आता।'–निगा २१६ 'राधा सबोखिली प्रीति आलगून।'–तुगा १२१ २ हाक मारणें [स सम्+बुध्]

**समोर**—क्रिविशेष १ पुढें, पुढल्याबाजूस, जागीं, अग्र भागीं २ प्रत्यक्ष, देखत, समक्ष ३ सरळ, थेट, नीट, उजू (रस्ता, नदी, झाडें, घरें याची राग–याचे अर्थ सरळ रेषेंत किंवा बोलणाऱ्यापासून सरळ लव रेषेंत असे दोन संभवतात ते बोल णाऱ्याच्या अगविक्षेपावरून किंवा सदर्भावरून ओळखू येतात) 'ही समोर चालली,' 'हा मार्ग समोर आहे' 'ती वृक्षपक्ति समोर लावली' 'रेघ समोर आहे' (वो) सरळ उच, थेट वर, सरळ उभा (खाब काठी, खिळा) 'हा खिळा समोर मार' [स सम्मुख प्रा सामु–मो प मुहेरहे] **समोरचा, समोरला, समोरील**-वि पुढचा, अग्रभागीं असलेला, प्रत्यक्ष पुढील 'समोरिला घोंड। मजशीं झुजतील काई।'–शिशु ८९७ **समोरासमोर**-क्रिवि एकमेकांपुढें तोंडें करून असलेले, परस्पर सन्मुख **समोरी**-स्त्री समुखता, विरुद्धता, समोरील स्थिति, प्रत्यक्षता समोरपणा **समोरून**-क्रिवि पुढून, देखत समक्ष

**समोरी**—स्त्री (सोनारी) सिंहाच्या तोंडाचा ठसा

**समोष्णतावृत्त**—न ज्या ठिकाणाचें उष्णतामान सारखें असतें अशा स्थळाचा पट्टा [स]

**समासरितपल्ली भौमिचारी**—स्त्री (नृत्य) स्व मचर पाय कमानें आतल्या बाजूनें वर्तुळाकार फिरवून मार्गे टाकणें [स]

**समोह**—पु भ्रम भ्राति, अविवेक अज्ञान मूर्च्छा 'समोह विभ्रम मारे। मिळित धैर्याचीं आविसें।'–ज्ञा ७ ७७ [स सम्+मुह्]

**सम्त**—पु १ भाग २ मार्ग, दिशा –आदिलशाही फर्मानें [अर समृत]

**सम्नाचीर**—समनाचीर पहा

**सम्मत, सम्मतिपत्र, सम्मर्द, सम्मान, सम्मतित सम्मार्जन, सम्मार्जनी, सम्मिश्र, सम्मिश्रण, सम्मुख, सम्मुखीन, सम्मेलन**—समत, सम्मतिपत्र, समर्द वगैरे पहा

**सम्यक्**—वि यथार्थ, योग्य, रास्त, नीट, उत्तम, चागलें 'हा सम्यक् ज्ञानीचा रावो। उपायामाजी।'–ज्ञा १६ ५१ –क्रिवि योग्य रीतीनें, तऱ्हेनें, पद्धतीनें, नीट, बरोबर, युक्त, चागलें, यथार्थतेनें, उत्तम रीतीनें [स] ०**दंडन**–न योग्य शिक्षा, न्याय्य दड, रास्त शिक्षा, योग्य प्रायश्चित्त ०**वृत्ति**-स्त्री १ सरळ वर्तन, न्याय्य वागणूक रास्त कृत्य २ योग्य पणें बजावलेलें कर्तव्य, कर्तव्यकर्म

**सम्राट्**—पु सार्वभौम राजा, सार्वभौम अधिपति सर्वश्रेष्ठ भूपति 'देवर्षि म्हणे नृप तो सम्राट् प्रभु राजसूय मखकर्ता।'–मोसभा १४६ [स]

**सम्शान**—न (राजा) स्मशान, मसण [स स्मशान]

**सय ई**—स्त्री मैत्रीण, सखी, स्त्रीमित्र 'कटाक्षाची छाया घनतर सये ज्यास पडली।'–साहह ७ ८२ 'रहो मक्रोचि थाव सये।'–मोविराट १ १० [स सखि]

**सय-ई, से**—स्त्री स्मरण आठवण, स्मृति 'धाम मुखीचा कोण पुढिल मग सय होइल घरची।'–प्रला १२४ 'ऐसी पुढील से घेतु।'–ज्ञा १ ७९ [स स्मृति प्रा सुई]

**सय**—स्त्री (व) सवय, अभ्यास [स स्मृति]

**सय-ई**—क्रिवि सई पहा मनासारखें, पसत

**सयजन**—क्रिवि (खा) खरेंच, खरोखर 'सयजन त्याच्या घरीं चोरी झाली असेल का?' [स सत्यम् सत्येन]

**सय**—स्त्री (गो) खोबऱ्याचा बीस

**सयत**—धावि मर्यादित आवरलेला, दमन केलेला, स्वाधीन ठेवलेला; सयमित [स सम्+यम्] **सयतात्मा**-वि स्वत वर ताबा असलेला आत्मसयमन करणारा **सयति**-स्त्री इंद्रियदमन सयस नियमन एका वैराग्यरवि विरुद्धे। तव सयति विहार केले।'–ज्ञा ४ १२८ **संयतेंद्रिय**-वि जितें द्रिय इंद्रियनिग्रही

**सयतान, सैतान**—पु १ बायबलातील ईश्वरविरोधी व्यक्ति, इब्लिस २ भूत पिशाच्च वेताळ ३ (ल) भयकर, क्रूर, उग्र, दुष्कृत्य, दुष्णकृत्यें करणारा, विद्रूप, कुरूप (व्यक्ति) ४ (ल) भयकर वादळ, तुफान

**सयन**—न सैन्य (अप) 'खासखल सयन।'–ऐपो ७९

**सयनी**—स्त्री (ना) सनई (अप)

**सयंपाक, सयंपाकघर, सयंपाकी, सयंपाकीण**—स्वयपाक, स्वयपाकघर वगैरे पहा 'तिकडे झाला सिद्ध मय पाक।' –दावि ७२५५

**सयंभ**—वि (गो) स्वयमू पहा

**संयम**-न—पुन १ निर्बंध, बधन, मर्यादा २ निग्रह, दमन, आवर, आळा, दाव 'तेथ सयमाग्नीचीं कुडें।'–ज्ञा ८५० ३ व्रत, नियम ४ (योग) ध्यान, धारणा व समाधि मिळून होणारा निग्रह [स सम्+यम्] **संयमनी**-स्त्री यम पुरी, यमनगरी **संयमित**-धावि निग्रहीत, वदिस्त, मर्यादित, नियमित **सयमी**-पु निग्रही, आपले विकार ताब्यांत ठेवले आहत असा पुरुष, तपस्वी, योगी, जितेंद्रिय

**सयर**—स्त्री सहल, फेरी, चक्कर 'सलाबतजग दर्गा कुलीखानाचे बागेत सयरेबदल तिमरा प्रहरा गेले' –रा १ १७६ [अर सैर]

**सयरट, सयरावयरा, सय लावणें, सयली, सयं घर**—सैरट, सैरावैरा इ० पहा

**सयली**—स्त्री सैली, सखि, स्त्री 'सयली घेउनि सगें।' –अकक २ मृत्युंजय चरित्र २ [स सहचरी]

**सयली**—स्त्री फकीराच्या गळ्यातील दोरा, दोऱ्याची माळ, सैली 'निगुण गुणाचा येक गुण। याची सयली करूनी जाण।' –नागेशलीलामृत २३ [अर ?]

**सयसद, सतसय**—क्रिवि (राजा) सरळ ओळींत, रांगेनें, थेट, अत्रुटित [सई+शुद]

**सयसुमार**—सईसुमार पहा

**सयसुवाद**—पु (गो) ताळतंत्र, घरबंद 'तुरया बोलण्याला काहीं सयसुवाद आहे का?'–सह्याद्रि ११५ [सई+सुवाद]

**सया**—पु शिया, महमदाचा जावई अली याचा अनुयायी याच्या उलट सुनी [अर शियाह्]

**सयान**—न बरोबर जाणें, सोबतीनें जाणें, साहचर्य [स सम्+यान]

**सयार**—पु चेटूक, कुयडें, जादूटोणा, भुनाटकी **सयारीण**-स्त्री डाकीण, चेटकी, जादुगारीण 'म्हणे काम बागुल आईल। हे आता सयारी दसैल।' –माज्ञा १३ ५०५

**सयाव**—पु साजा, रवा व साखर याचा तुपात केलेला पदार्थ [स सम्+या]

**संयुक्त, संयुत**—धावि १ जोडलेलें सलग्न साधलेलें, सबद्ध २ मिश्र, मिसळलेलें, एकत्र केलेलें ३ सपन्न, सहित, युक्त [स सम्+युज्] ०**धातु-क्रियापद**-पुन जोड धातु, किंवा जोड क्रियापद, दोन शब्द मिळून होणारा क्रियादर्शक शब्द उदा० बोलून जाणें, गाऊ लागणें ०**पान**-नअव बेल, पळस, वगैरेसारखीं अनेक दलें असणारीं पानें ०**मिळकत**-स्त्री अविभक्त मालमत्ता ०**संबध-सयोग**-पु असमवाय सबध, योग, अगदीं निकटचा नव्हे पण जरा दूरचा सबध ०**स्वर**-पु ए, ऐ, ओ, औ हे स्वर

**सयुक्तिक, संयुक्तिक**—वि योग्य, सारासार विचारास पटणारें, सुसबद्ध, सुसगत, पद्धतशीर, मेळाचें [स.]

**सयुति**—स्त्री सांधा, जोड, मीलन, एकत्रीकरण २ (ज्यो) दोन ग्रह एका राशींत येणें, युति [स सम्+युति]

**संयोग**—पु १ निकट सबध, सघटन, मीलन, सगम, एकत्र होणें २ मिश्रण, एकत्रीकरण, मिसळणें, बेरीज ३ जोड, सांधा, युग, एकोपा [स सम्+युज्] **सयोगप्रीति**-स्त्री (रसा) पदार्थांतील परस्पराकर्षण, एकत्र होण्याची प्रवृत्ति, (इ) अफिनिटी **संयोगभूमि, संयोगीभूमि**—स्त्री दोन भूप्रदेश जोडणारा जमीनीचा अरुद पट्टा, **संयोगित**-धावि जोडलेलें, एकत्र केलेलें, सयुक्त, साधलेलें **सयोगी**-पु ब्रह्मचर्यव्रताचा त्याग करून ज्यानें विवाह केला आहे असा गोसावी, किंवा वैरागी, घरभारी –वि जोडलेला, जुळलेला

**संयोजक**—वि १ जोडणारा, जुळविणारा, साधणारा, योजना करणारा, नीट व्यवस्था लावणारा; व्यवस्थित घडवून करणारा २ सभेचा आमत्रक, सभेचें कार्य करणारा, कार्यवाही ३ (रसा) योग्य परिस्थिति उत्पन्न करणारा (इ) अडॉप्टर [स सम्+युज्] **सयोजन**-न १ सांधणी, जोड, मिलाफ सयोग २ जुळणें, एकत्र करणें **सयोजित**-धावि जोडलेलें, साधलेलें; एकत्र केलेलें

**सय्यद**—पु महम्मदच्या मुलीकडील वशज जो हुसेन त्याच्या वंशातील मनुष्य, महमदाची मुलगी फातमा हिच्या वशातील मनुष्य [अर सय्यिद]

**सय्या, सय्या**-पु छक्का, पत्त्यातील सहा टिपक्यांचें पान

**सर**—पु १ डोक २ (ल) मुख्य, श्रेष्ठ, वरचढ 'या सवावर हरिपत सर आहे' हुद्यापूर्वीहि मुख्य या अर्थी जोडतात उदा० सरदेशपांडे, सरदेशमुखी, सर सुभेदारी इ ३ (ल) प्रमुख, नेता, चालक (सस्था, मडळ वगैरेचा) ४ (गाय, म्हैस वगैरे शब्दानतर योजल्यास) सख्या (डोई) दाखविता उदा० गाय सर एक, म्हैस सर तीन=एक गाय, तीन म्हैसी 'बैल सर पाचशें पाठविले'–रा १२८ प्राण्यांची सख्या दाखविणेंस सर व वस्तूची सख्या दाखविण्यास सुमार शब्द योजीत उदा० उंटें सर बारा, नारळ सुमार पचवीस **सर करणें**-जिंकणें, पादाक्रांत करणें (किल्ला, प्रदेश वगैरे), फत्ते करणें, तडीस नेणें (काम, काज) [फा,

सर् ]॰कान(नू)गो-पु देशप ड्यासारखा एक अधिकारी -रा १२ २१५ [फा ] ॰कानगोपण-न सरकानगोपणाचें वतन 'सस्थान मजकूर येथील सर मडलोईपण व सरकानगोपणाचें नवीन वतन रामचद्र बल्लळ यास करून दिल्हें आहे '-वाडबावा ३ ३५ ॰कारकून-पु वरिष्ठ प्रतीचा कारकून 'फक्त अष्टप्रधान सरकारकुनास पालख्या दिल्या '-शिचप्र २२ ॰खत-न १ सरकारकडे वेळोवेळीं भरणा केलेल्या रकमाची कमान केलेली नोंद, पावती, कौलनामा २ विक्रयपत्र, सरकारनें विकत घेत लेल्या मालाची पावती ॰खवास-पु मुख्य नोकर, अनुचरा धिपति 'सरदेशमुख म्हणून दकन सरखवाशी व दहुडयाकडील चौकी पहारे व कारखाने यास '-मराचिथोशा १० ॰खेल-पु १ खास पथकाधिकारी; स्वाराच्या पथकावरील अधिकारी, ध्वजरक्षाधिकारी २ मराठेशाहींतील एक पदवी, आंग्रे सरदाराची पदवी 'तुळाजी आंग्रे सरखल याजकडून अमल दूर करून ..' -वाडबावा ३ ५३ ॰खेली-स्त्री सरखेलाचा अधिकार, हुद्दा, पदवी काम ॰खोत-पु मुख्य खोत 'सर खोत व कुट खोत पुढें सुटीचा कज्या राहिला नाहीं '-समारो १५५ ॰गावडा-पु खेड्यातील एक कामगार, अधिकारी, धनगराचा मुख्य ॰गुन्हो-रो-पु १ किल्ल्यावरील शिबंदींतील एक अधिकारी, जमादार २ पथाचा मुख्य, महत [फा ]॰चश्मा-चष्मा-पु प्रमुख, अध्यक्ष, चालक पुढारी, धुरीण, नायक (सभा, मडळ, खातें वगैरेचा) [फा] ॰तपासणी स्त्री एखाद्या साक्षीदाराची हजर करणाऱ्या पक्षानें घतलेली जबानी ॰तरम-पु मुख्य मोजणीदार, दिरस्तेदार 'हुजुर कचरी हृची दोनी तटा। सरतरम तेथींचिया महान् लाटा।' -पैमा ११९ ॰ताज-पु मुख्य, प्रमुख [फा.] ॰दप्तर-नपु सरकारी कामकाज व तें करण्याचा अधिकार भाइश १८३४ ॰देशपांडे-ड्या-पु देशपांड्यावरील मुख्य, मुख्य देशपांडे ॰देशमुख-पु देशमुखातील मुख्य, सर्व देशमुखाहून वरिष्ठ पदवीदार -वर्दे घराण्याचा इतिहास १७, -रा २१ ५९ ॰देशमुखी-स्त्री सरदेशमुखाचा हक्क, मोंगलाचे अमलातील प्रातावर मराठ्यानीं बसविलेला कर हा उत्पन्नाच्या दशाश किंवा साडेबारा टक्के असे ही बाब छत्रपतीची खासगीकडे खर्च होत असे -घोमारो २ ९१ ॰देसगत स्त्री सरदेशमुखी 'तालुके नवलगुद देखील सरदेसगत निमवत गोविंद भिकाजी '-समारो ३ २५ ॰नामा-पु पदवी किताब, पत्रारभींचा मायना, आड नाव २ प्रास्ताविक मजकूर [फा सर्नामा] ॰नोबत-नौबत-द-पु ज्यास स्वतंत्र नोबत (नगारा) मिळाली आहे असा सैन्याधिकारी; सेनापति; मनानी 'जयसिंगराव निंबाळकर सरनोबत दिमत पागा हुजूर '-समारो ४ ५१ [फा ] ॰पंत पु मुख्य न्यायाधीश 'या स्थापिलेल्या वरिष्ठ कोर्टामध्यें मुख्याधिपत्य सर पत मोरो काशीनाथ अभ्यकर याजकडे दिलें होतें '-बडोदा तील राज्यकर्ते ३३९ ॰परस्त-पु पालनकर्ता, पालक [फा] ॰परस्ती-पु पालकत्व [फा ] ॰पागा-स्त्री हुजुरपागा, मुख्य सरकारी घोडदळ ॰पागे-पाग्या-पु राज्यातील सर्व पागावरील मुख्य अमलदार ॰पाटील-पु जिल्ह्याच्या वसूलीवर देखरेख करणारा व त्याबद्दल शेंकडा कांहीं तरी रकम मिळणारा अधिकारी ॰पेच-पु शिरपेच, पगडींत खोवावयाचा तुरा [फा] ॰पोतदार-पु सर्व पोतदारावरील मुख्य, मुख्य सरकारी खजिन्यावरील अधिकारी, नाणीं पारखून घेणारा कामगार ॰पोस-पु १ आच्छादन, झाकण, वरून पसरलेलें कापड, रुमाल (अन्नाचें ताट, पगडी वगैरे वरील) 'कोणी सरपोसवरून घम रिति।-भ्रला ११३ २३२ 'सरपोस जरी, वाराचा '-समारो ४• ११९ २(ल) गुप्तपणा, गुपित 'आजवरी तो सरपोस राखिला ' -ख ९ ५०४२ [फा ] ॰बस्त-स्ता-वि १ बंद, लपविलेलें २ कांहीं ठराविक सारा देणारा, सर्व सारा न देणारा (जहागीरदार) ॰बागे-पु बागावरील देखरेख करणारा अधिकारी 'ते सरदार हमडरे याजकडे सरबागे म्हणून होत '-ह ना आपटे चरित्र ॰बांध-पु मुख्य बाघ -मसाप २.३ ७८ ॰बारगिरी-बारगी-स्त्री आधिपत्य, सैन्यातील हुद्दा 'पनास घोडि याचे सरबारगी तुम्हासी दिली आहे -रा १५ ३९८ ॰बुलद-वि प्रमुख, कीर्तिमान, उच्चपदाधिष्ठित ॰मजमु-स्त्री मुजुमदारावरील अधिकाऱ्याचें पद अधिकार 'साल मजकुरीं कमावीस तुम्हास सांगितली त्याची सरमजमु मशारनिल्हेकडे सांगितली असे '-वाडबावा ३ ७६ ॰मडलोईपण-न परगण्यावरील एका अधिकाऱ्याचें पद 'व सस्थान मजकूर येथील सर मडलोईपण व सर कानगोपणाचें नवीन वतन रामचद्र बल्लाळ यास करून दिल्हें असे '-वाडबावा ३ ३५ [सर+मडलवाही+पण] ॰मास्तर-पु हेडमास्तर, मुख्य शिक्षक 'शाळेचे सर मास्तर स्वभावानें मोठे गर्विष्ठ होते '-नि ६५८ ॰मुकादम-मोकदम-पु मुख्यातील एक अधिकारी, मुकादमावरील मुख्य -थारो १४१ ॰मुख्य-पु सस्थानचा, प्रांताचा मुख्य, होळकराचा किताब ॰लष्कर-पु सेनाकर्ते, स्वत सैन्य जमवून सेनापतीचें काम करणारा -शिचप्र ६ ॰सब्ज-वि १ ताजा, हिरवा २(ल) तेजीचा, नशीबवान् ॰सब्जी-स्त्री (ल) भरभराट, तजी 'ज्यात पातशहाची सरसब्जी ते गोष्ट पातशहास अर्ज करावी '-दिमरा १ ९२• ॰साद-पु गोंधळ, घोटाळा ॰सम्त-पु तरफेचा मुख्य सम्मतचा मुख्य ॰सुभा-सुभेदार-पु सुभेदारावरील मुख्य अमलदार, त्याची पदवी, हुद्दा, अधिकार ॰हवलदार-हवाला-पु मुख्य हवालदार, एक सैन्यातील अधिकारी 'तालुके अजनवेल येथील सर हवाला '-समारो ३ १७

**सर**—पु पैजावरील कर –बदलापूर ३६३

**सर**—पु आवाज, ध्वनि, साद 'सरींची गुतलें चित्त। म्हणौनि झुरसा जीविता।'–भाए ३७२ [स स्वर]

**सर**—पु दह्याचा वर व स्नेहयुक्त भाग –योर १ १५५ [स ]

**सर**—पु १ हार, फुलें, मणि, मोत्यें वगैरे दोरांत ओवलेली माळ, पदा २ अनेक पदरी हाराचा पदर, पळलेल्या दोराचा पदर, वादीचा पदर ३ फगाऱ्यांची माळ, लड ४ पैजाची शिंगदोरी, बैलाचा दोर, शिंगाजवळ किंवा गळ्यात अडकविलेली साखळी ५ लाकडाचा लांब सोट, वासा, लांब वांबू, मुसळाची सळई ६ (व ) फणसाचा लांब देंठ, सरगुंडे वळण्याची काडी ७ (ना ) पोटातली आतडीं ८ (व ) पाठीचा कणा, नाकाचें उभें हाड [स ] ९ भात वगैरे धान्य वाळवण्यासाठीं पसरून सोडतात ती लांब रास 'सर घालणें, टाकणें ' [स स्र]

**सर-री**—स्त्री १ एकदम जोराचा लोंढा, सोसाटा, उदा० पावसाची सर 'नगीं मेघ जरि सर घाली।'–मोकर्ण ३३ ५० वर्षेलि वारि हरि दयाळु गावु सरी।'–मोकृष्ण ८१ ८५ २ आवेश, आवेग, उकळी, हुदका उदा० रागाची सर, रडण्याची सर ३ झटका, झपाटा, फेरी उदा० तापाची सर, हिंवाची सर, पिशाचाची सर 'वस्ती विराजू न पिशाच सर।'–नव १३ १२० ४ उमाळा, उकळी, लहर 'ममतेची, आनंदाची सर, हसण्याची सर ' ५ साथ, फेरा, उदा० पटकीची, जरीमरीची, डायारोकल्याची सर ६ वाताची, भ्रमाची, वेडाची लहर [स सृ=सरणें]

**सर-री**—स्त्री १ बरोबरी, तुल्यता, योग्यता, साम्य (क्रि० येणें, पावणें) 'विष अमृत, सत्य अनृतहि तू पार्थ तया तुम्हा नसेचि सरी।'–मोकर्ण २७ १३ २ रांग, ओळ 'यावि लोनी नला सरे धरून। युद्देआमवें।'–शिपु १ ३० ९६

**सर**—वि (महानु ) योग्य 'ऐसें कादसें वो निढाळपण। सर नव्हे तुझें कारण।'–शिशु १७९

**सर**—स्त्री (गंजिफा ) तल्फ राजाकरिता किंवा इतर हुकूम पडावा म्हणून केलेली खेळी –वि (पत्त्याच्या डावात ) हात होईसें हुकुमासारखें

**सर**—न सरोवर, तळें, तडाग [स सरस्]

**सर**—पु एक पदवी [इं सर]

**सर**—अ अंश, किंचित् छटा, सादृश्य वगैरे दाखविणारा विशेषणास लागणारा प्रत्यय उदा० काळसर, पिंवळसर २ पर्यंत पुरेपूर, काठोकाठ 'नदी वरसर भरली '' भांडें तोंडसर भरलेलें 'दिवाळेगसर वायदो करून घेतों ' –मसाप २ ४ १११ ०खुश–वि पूर्ण आनंदी, सुखी, संतुष्ट [फा ] ०गरम–वि १ कोंबट, किंचित् उष्ण, सोमट २ संदिग्ध, अनिश्चित; सोपस ३ उत्सुक, मोहीमशीर 'पर्शेजे मजुरीचे आबादानीस व मामुरीस सरगरम असणें '–वाडसनदा १४० [फा ] ०गर्दन–स्त्री शिरजोरी, सरधन 'सरगर्दन व सेहदीहि निघाली "–रा ७ ५८ [फा ] ०धोपट–वि सरळ, समोर, धडक, नीट, वांकडा-तिकडा नसलेला (रस्ता नदी, भाषण, कृति, वागणूक ) –क्रिवि सरळपणें, उघडपणें, धडकपणें, खाडखाड, तडक, न अडखळता, न गुतता (लिहिणें, वाचणें वगैरे ) ०निसर–क्रिवि सरसकट, गोळाबेरीज करून, एकत्रपणें ०पाठ–वि सारखें ०पाड–स्त्री सारखी योग्यता 'तुम्हांस दोघां सरपाड आहे।'–सारुह ७ १०१ ०बसर-बासर–विक्रिवि १ कमीजास्त, थोडाफार फरक असलेला, बराबाईन, थेठकनिष्ट 'सगळीं मोतीं एकसारखीं नाहींत सरबसर आहेत ' २ मिश्र, सरमिसळ, एकवटलेलें, एकत्र केलेला 'ही चांगली साखर व ती नीरस साखर सरबसर करून वाढ ' ३ सरासरी, साधारण, मध्यमप्रतीचा 'तिजाईसुद्धा सरबसर पाहून घ्यावी '–समारो ४ १५७ ०मिसळ–स्त्री मिश्रण, एकत्रीकरण, ०मिसळणें –क्रिवि मिश्रित, एकत्र, मिसळलेलें, मिश्र गुणाचें 'दुराणी व हे सरमिसळ पळत येतात '–भाव ७१ 'जळ विष सरमिसळ सळे '–मोकृष्ण १६ २ ०रहा–क्रिवि मोकळेपणानें, अबाधितपणें, सावकाश, बिनधोक, सरळपणें (चालू केलेलें काम, पद्धति) ०रास–वि निष्णात, निपुण, तरबेज, हुशार –क्रिवि एकंदरीनें, सरसकट, सामान्यत ०शेवट–पु अखेरी, अंत शेवट, टोंक अखेरीचा भाग ०शेवटीं-टीं–क्रिवि अखेरीस; अतीं; शेवटीं, सरतेशेवटीं ०सकट-सगट–क्रिवि एकंदरीनें, गोळाबेरीज करून, निवड न करता, सरासरी, एकत्रपणें, सगळें, सर्वसामान्य ०सट्टा–क्रिवि सरसकट, मागें पुढें न पाहता, निवड न करता 'एखादा पुरुष सरसट्टा म्हणजे योग्यता न पाहता दान करू लागला –गीर ५४८० ०सपाट–वि अगदीं सरळ व एका पातळींत एकसारखें, एकरूप, अगदीं सपाट 'सर सपाट जें निघोंट। कठिनत्व खोट ज्यात नाहीं।'–ज्ञाप्र ३४ 'त्या आत्मज्ञानादि सगट। अवघें झालें सरसपाट।'–स्वादि १२ ४ ७५ ०सपाटी–स्त्री एकसारखा सपाटपणा, समपातळी; उखरवाखर, उचसखल नसलेली स्थिति विस्तीर्ण सपाट मैदान ०सलूख–पु विजय व तह, काबीज करून केलेला तह शांतता वगैरे 'नेमाड माळवा मुलूख, करून सरसलूख मोडिले वीर।'–ऐपा ४१६ ०सहा–क्रिवि एकसारखा, भेद न करिता, सरसकट बिनधोक ०साल–न चालू सर्व वर्ष, सबंध वर्ष ०साल-साला-सालीना-सालें–क्रिवि सर्व वर्षभर, चालू सालीं, वर्षी 'चौकशीनें सरसालें खर्च करणें '–थोमारो ९ ३ ०सिधा-शिधा–पु कच्चाशिधा धान्य शेर 'सरकारातून शिपाई येईल त्यास खोत सरशिधा देईल '–मसाप २ २ ७० ०सुमार–पु

(प्र) सोईमुमार, सोईमुमार, सरासरी ०हद्द-स्त्री सीमा, मर्यादा, शेवट

**सरई**—स्त्री. जहाजाचा एक प्रकार, जन्द चालणारें जहाज 'फिरंगी गोवेकर याची सरई सरकारांत पाडाव आली आहे' —समारो ६ ७८ [ध्व]

**सरई**—स्त्री लांकडाचा चौकोनी तुकडा [सर]

**सरई, सराई**—स्त्री धर्मशाळा, उतरण्याची जागा [फा सरा]

**सरई, सराई**—स्त्री सुगी, हंगाम, धान्याचा मोसम [स शरद्]

**सरक**—पु फांस, पाश —राम्य ९ ४०

**सरकट**—स्त्री पावसाची ल्हान सर, पावसाची भुरभुर, भुरभुर, थोडीशी झड (क्रि० पडणें; येणें) [ध्व स]

**सरकटणें**—अक्रि १ सरकणें, घसरणें, निसरणें २ वस्त्राचे दोर वगैर सुटून विरविरीत होणें; विसकटणें, उसकटणें [स सु-सरणें] **सरकटा**-वि निसरडा, घसरडा. **सरकटें**-न निसरडेपणा

**सरकटणें**—सक्रि १ सरसकट कोणतीहि गोष्ट करणें, एकत्र करणें, मिसळणें, गोलाकार करणें 'तैसें कृत्याकृत्य सरकटित। आपपर तुरंगित। कर्म होय तें निश्चित। तामस जाणा।' —माहा १८ ६२६ २ एकदम, एकत्र रगडणें, नाश करणें, सरसकट मारणें 'आले दशोदशींच राये। तयाचें ताणावया जावों नल हे। ऐसें सरकटित।' —ज्ञा ११ ३९३ ३ गिरविडणें, लडबडणें 'तैसें पिचडीं तोंड। सरकटिजेल।' —ज्ञा १३ ५६१

**सरकणें**—अक्रि १ घसरणें, घरगळणें; निसरणें २ मागें पुढें होणें; हलणें, सरण, दूर होणें, बाजूला होणें; स्थानभ्रष्ट होणें; आजूबाजूस होणें 'अमळ सरकून बसा' ३ सरसावणें, पुढें जाणें, चालून जाणें, चाल करणें 'दांडियाचां सरकौनि धारिक आवरी।' —शिशु ५५२ [स सृ-सर] 'सरकीमिरकी चिभटा गणेशाची आडी' सागरगोटे खेळताना हलू नये म्हणून घालावयाची आण **सरकगाठ**-स्त्री मागेंपुढें करून सैलआवळ करता येईल अशी गाठ, निसरगाठ 'या गळफासाची सरकगाठ ओढून मीं आपला गळा आवळलाच' —माच १४३ ०पडदा-पु मागेंपुढें सरकावतां येणारा पडदा 'नाटकाचे सुरवातीचा सरकपडदा उघडला' —क १० ६ ३० ०पूल-पु पुढेंमागें ओढून काढता घालता येण्यासारखा खदक वगैरेवरील पूल 'त्यावेळीं सरकपूल मोडून ठेवल्याप्रमाणें बाजूस सरकला असल्याकारणानें' —सास २ ४२ ०फास-पु गाठ मागेंपुढें ओढून घट्ट-सैल करता येण्यासारखा फास, निसरफास ०शेंडा-पु (ना) झाडाचा सर्वांत उंच शेंडा

**सरकत**—स्त्री पत्ती, भागी, भागीदारी, वाटणी, हिस्सा 'टिपु सुलतानावर स्वारी कंपनी सरकार, नबाब, पेशवे या तिन्ही सरकारांनीं शरकतीनें केली' —रा ७ १८ [अर. शिरकत] ०दार-पु पातीदार; भागीदार, वांटेकरी ०नामा-पु भागीदारीच्या व्यवहाराबद्दलचा करारनामा, वांटणीपत्र; भागीपत्रक ०घांटणी-स्त्री १ हिस्सा, भाग, भागीदारातील हिस्सेरशी 'टरीव व्याज किंवा सरकत वांटणीनें येईल तो नफा मिळेल' —आगर १ ८५ २ (गणित) हिस्सेरशी, पातीच्या व्यवहारासंबंधीं उदाहरणें **सरकती-त्या, सरकती**-पु पातीदार, भागीदार, वांटेकरी **सरकती-सरिकनी**-वि भागीदारीचा, ज्यांत अनेकांचे हिस्से आहेत असा 'ना कीं समाप्त सरिकतीचा।' —प्रपराज २८

**सर-कन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि सरकण्याचा, निसरण्याचा, घसरण्याचा, सर असा आवाज करून [ध्व]

**सरक(का)विणें**—सक्रि पुढें, मागें करणें; बाजूस करणें, हलविणें, ढकलणें [सरकणें प्रयोजक]

**सरकश**—वि बहशोर, अपराधी, आज्ञाभंजक [फा सरकश]

**सरकस**—स्त्री घोडे, सिंह, वाघ व कसरती लोक वगैरेचा खेळ [इं सर्कस=वर्तुळ]

**सरका**—क्रिवि (व) सरळ, थेट, नीट, पुढें [सरणें]

**सरका, सिरका**—पु. एक आंबट पातळ रस (इ) सिरकिगर [फा सिरका]

**सरकाडी**—स्त्री (प्र) सणकाडी पहा

**सरकार**—नस्त्री १ शासनसंस्था, राज्यसंस्था, देश, प्रांत, संस्थान वगैरेचा राज्यकारभार चालविणारी सत्ता २ राजा, राज्यप्रतिनिधि, राज्याधिकारी, शासनसंस्थेचा प्रमुख, सत्ताधिष्ठित व्यक्ति ३ (व्यापक) कोणतीहि कचेरी, जिल्हा, प्रांत, तालुका वगैरेची कचेरी, न्यायाधीश व त्याची कचेरी, तसेंच इतर कोणत्याहि खात्याच्या अधिकाऱ्यास व त्याच्या कचेरीस हा शब्द सामान्यतः लावतात अमलदार, अधिकारी वर्ग 'सरकार म्हणजे येथील अधिकारी वर्ग, इंग्लंडचे लोक नव्हेत' —टिम्या ४ मालक, धनि, वरिष्ठ अधिकारी, व्यक्ति 'सरकारचे घोड्यावर मजसारख्यानें कसें बसावें' 'सरकारस्वारी येत आहे' —रत्नप्रभा २२ ५ प्रांत, देशविभाग 'उत्तर सरकार' 'कोठें कोठें सरकार हा सुभ्याचा किंवा प्रांताचा पोटविभाग आहे।' —गांगा ४२ 'सरकार जुन्नर' —समारो १ ६५ ६ (बंगाल) हिशेबनीस घरचा कारभारी [फा] म्ह० सरकारचें तेल पदरात घ्यावें (वाप्र) सरकारकामास येणें-

ल्याईत मर्गे सामादार- ०अमल-असामी-पु सरकारी अमल, सत्ता, सरकारी मनुष्य ०अमली-स्त्री सरकारावर अवलंबून, सरकारच्या आश्रित ताब्यातील, अधिकारातील याचे उलट परभारा अमली म्हणजे इतर सत्तेखालील ०खराब-स्त्री सरकारी पडीत जमीन ०गुजश्तन-स्त्री. गोष्ट, हकीकत, इतिहास, परिस्थितीचा आढावा ०जमा-वि खालसा, सरकारात सामील केलेलें, जसें 'मोरोपंतांना पन्हाळगडचें आपलें घर सरकारजमा करून पन्हाळगड सोडण्याची पाळी आली' -भक्तमयूरकेका ६ 'पुस्तकें सरकारजमा करण्यांत आलीं असतीं.' -केले १ ३७ ०धारा-पु जमीन महसूल, सरकारी दर, चावडी ०मशहूर-वि १ सुप्रसिद्ध सर्वांस माहीत झालेलें, लहानापासून थोरास ठाऊक असलेलें २ सार्वजनिक, सर्वश्रुत, सर्वज्ञात ०वाडा-पु राजप्रासाद, राजवाडा, राजमंदिर, राजाचें किंवा सरकारी अंमलदाराचें निवासस्थान, सरकारी कचेरी ०स्वारी-स्त्री राजा, धनी, मालक, वरिष्ठ अधिकारी सरकारी-वि शासनसंस्थेसंबंधीं, राज्यासंबंधीं, राज्याच्या मालकीचें, राज्यव्यवस्थेसंबंधीचें, राज्यकचेरीसंबंधी सरकारी अमल-पु १ राज्यसत्तेचा अधिकार, हुकमत २ शासनसंस्थेतील अधिकार, पद, स्थान ०असामी-स्त्री १ सरकारातील अधिकाराचें स्थान, नोकरी २ सरकारी अमलदार, अधिकारी ०चिन्ह-न सरकारी निशाणी, शिक्का, खूण, मुद्रा ०जाहिरात-स्त्री सरकारनें काढलेला जाहीरनामा, प्रसिद्धिपत्रक ०तोहमत-स्त्री सरकारचा दोषारोप, किटाळ, आरोप, बद्दिम, धोरपड ०नोकरी-स्त्री सरकारातील चाकरी, हुद्दा, अधिकार ०पाहुणा-पु (ल) कैदी 'सरकारी पाहुण्याची बडदास्त सरकार नीट ठेवीत नाहीं' -के १२ ७ ३०. ०बोली-स्त्री सरकारमार्फत लिलाव चालला असता सरकारतर्फे आरंभीं पुकारण्यांत येणारा किंमतीचा आकडा ०रोखा-पु सरकारनें आपल्या हमीवर काढलेल्या कर्जाचा दस्तऐवज, सरकारी कर्जपत्र, ऋणपत्र

सरकाळ-ळी-ळें-पुस्त्रीन १ जोंधळा किंवा बाजरीच्या कणसाचा दांडा, कडब्याच्या ताटाचा अग्रभाग 'नागदेव मुमट माथाया सरकाळाचे गाडे।' -अकक २ उद्धवचिद्घन, नागनाथ चरित्र ४४ २ (विणकाम) काडी, सुतकाडी ३ बोथट बाण [सर+काडें]

सरकी-स्त्री कापसाची बी सरक्या-स्त्रीअव (ल) कापसाच्या बियांप्रमाणें झालेलें वुसलेलें धान्य, वृद्धपणामुळें बुबुळावर पांढरेपणा आलेले डोळे 'डोळे किरवे चागले। वृद्धपणें सरक्या झाले।' 'डोळे सरक्या झाले।' -दावि १० ४ सरकळा-वि सरकीसारखा, बुरा आलेला, पांढरेपणा आलेला 'डोळे होती सरकळे। तोंडींहूनि लाळ गळे। उरावरी।' -भारा बाल ९ ७६

सरक्या-पु सुतळी, दोरा, पतंगाचा गड्डा, नागसूत्र, तागाची दोरी [सह, सर]

सरग-न धान्याच्या राशींतील गाळसाळ राहिलेलें असे स्वच्छ बारीक धान्य [सरणें-सपणें]

सरगड-पुन मुद्दाम लावलेला पानमळा, लावल्या नंतर एक वर्ष लोटलें आहे असा पानमळा

सरगम-पु (संगीत) रागास लागणाऱ्या स्वरांची रागवाचक सनाल रचना [सा, रे, ग, म]

सरगा, सरंगा-पु एक समुद्रात आढळणारा मासा 'सरगो फुल्प '=(गो) नटणें थटणें

सरंगा-गी-पुस्त्री पतंग, विमान, वावडी

सरगांठ-स्त्री सुरगांठ; खेचली असता सहज सुटणारी गांठ, निसरगांठ -स्त्रियांची माहिती १२

सरगु-पु वस्त्राचें टोंक, ओचा, पदर 'रुक्मा वालिपेचा सरगु दाटिला। मालगटीवरी।' -शिशु ६२०

सरगुंदलो-पु एक मासाचें पकान 'सगित सरगुंदलो बाई' -संगीत घोंटाळा ६

सरगुंडे-पुअव (व) सपोटाच्या बोटण्याचा, गुल्हल्याचा एक प्रकार [सर+गुंडा=गोळी]

सरगोड-पु (व) महत्पणा, हाव, फुशारकी, बडेजाव 'त्याला आपलाच मोठा सरगोड, मग लोकाला काय वाटल तें पहावयाचेंच नाहीं'

सरघा सरघाली-स्त्री मधमाशी 'तो भीष्मावरि कोपे रसमधुराउपरि जेविं सरघाली।' -मोभीष्म ४ ३७ [स सरघा+अलि]

सरजा-पु १ नथीच्या टीकेभोंवतीं कलिकाकार जो मोत्याचा घेर बसविलेला असतो तो 'नय नाकातील उडे तुरे सरज फुकरानें।' -प्रला ११२ 'वर्तुळचमचमाट सरजे चार।' -पला३० ५४ 'सरजीनथ शोभतसे।' -नव २० ११३ २ तोडयाच्या बंदुकीचा तोंडा ठेवावयाचा लोखंडी आकडा ३ (ल) बैलाच्या दावणींतील मुख्य बैल, म्होरक्या बैल [फा सराजद्] सरजेदार-वि १ मोत्याचा घेरा असलेली, सरजा असलेली (नथ) २ जकातदार कर वसूल करणाऱ्याचा मुख्य

सरजा-पु सिंह 'भोंसल्या सरजा दलभंजन।' -ऐपो ७ 'वाघनख सरजाच्या पंजाला।' -ऐपो १९ [फा]

सरंजाम-पु. १ सामानसुमान, साधनसामुग्री, हत्यारें पात्यारें, उपकरणें 'पोक्त सरंजाम मापिक ठेवावा' -बादशाह २७१ २ सैन्य, किल्ल्याचा बंदोबस्त वगैरे राखण्याकरिता दिलेली

इनामी जमीन, पालखी वगैरे मान मरातब दिला असल्यास त्याच्या खर्चाकरितां दिलेलें इनाम याचे पोतसरंजाम, आततारंजाम व फौजसरंजाम असे तीन प्रकार असत 'इलोज मुबादलि याचा सरंजाम जाला नाहीं ' –इम ६५ 'सरंजामपट्टी सरकारांतून आहली ' –भाव २ ३ जुळवाजुळव, तयारी, सिद्धता 'सरंजाम करून हर राहुरया बाहेर दिले ।' –ऐपो १९९. [फा ] ०दार–पु ज्याच्याकडे सरंजामी इनाम आहे असा मनुष्य ०पट–पु सरंजामासंबंधीं पत्रक **सरंजामी**–वि १ सरंजाम म्हणून दिलेलें २ सरंजाम धारण करणारा **सरंजामी पद्धति**–स्त्री १ फौजेच्या अधिकाऱ्यांस नक्त पगार वगैरे न देतां फौजेच्या खर्चाकरितां जहागीर देण्याची पद्धति २ इंग्रज सरकारनें येथील दस्य राजास कांहीं मुलूख अगर पैसा घेऊन फौज पुरविण्याची पद्धति **सरंजामी फौज**–स्त्री इनाम जमीन, जहागीर वगैरे घेऊन सरकारकरितां लष्करी अधिकाऱ्यानें ठेवलेलें सैन्य

**सरट, सरड–डा–डूच–डोका, सरढा**—पु १ एक पालीसारखा प्राणी 'जैसें बाभुळीचें खोड । गिरवइूनि आसी सरड ।' –ज्ञा १२ ५११ [स सरट] म्ह० १ सरड्याची धांव कुंपणापर्यंत २ सरड्याप्रमाणें रंग पालटणें–आपलें स्वरूप, वागणूक वारंवार बदलणें,

**सरड**—पु (गो कु )गुरमाळाचा तंतु, दोर, गिरमाळाचा तंतु [सर]

**सरड्या देवमण**—पु घोड्याच्या अंगावरील एक शुभ लक्षणी भोंवरा

**सरण**—न चिता, मृत मनुष्यास जाळण्याकरितां केलेली काष्ठादि रचना 'गांवाबाहेर सरण रचिलें । बहुत काष्ठें आणुनी ।' –ह ५ १० [स शरण ?]

**सरणि–णी**—स्त्री १ मार्ग रस्ता, वाट 'रश्मि छेदुनि दाविति अश्वांला पाथेशर कशा सरणी ।' –मोकर्ण २९ २८ २ सरळ रेषा, अखंडीत नीट रेघ, रांग, ओळ, सांखळी, मालिका 'तथापि त्या विचाराची सरणी शब्दांच्या रूपानें यावयाची ' –कोरकि ४५५ ३ (ल ) पद्धति रीत, चाल, रिवाज, रूढी, शैली, धाटणी (बोलण्याची लिहिण्याची ) 'दिसे सृष्टिची ही सरणी ।' –विक २९ 'ज भाषांतरादि भय भाषेच्या सरणीला अगदीं बरोबर उतरून ' –नि ७ ४ एक कंठ रोग [स. सृ–सरणें ]

**सरणें**—अक्रि १ हलणें चळणें पुढें मागें होणें, बाजूला होणें, चालणें जाणें, दूर होणें, निघणें, माघार घेणें हटणें, जागा सोडून देणें 'तव भीमसी वदे आवेशीं । सर तूं हीं एकी धापसी ।' –शिशु २२१ 'प्रासु सरली उदधि जळें ।' –उषा १७३७ म्ह० सर घोड्या पाणी खोल २ सरकणें, घसरणें, निसरणें, चळणें 'वाट सरणें ' 'पाय सरणें ' ३ सपणें, खलास होणें, खर्च होणें, कमी होणें, नाहींसें होणें 'कृपाचि सरली असेहि न घडे अगस्ता यश्वीं ।' –केका ४ 'हारसेंदावुनि अंगा । आयु गेरे चोरविलासा ।' –ज्ञा १५ ५८९ ४ चालणें, पुढें पडणें, प्रगति होणें, चालू राहणें 'तैसें लक्ष्मियेचें थोरपण न सरे ।' –ज्ञा ९ ३८०. 'पैक्यावांचून कोणाचें सरत नाहीं ' 'शेंभीवांचून सरेना आणि घडीभर पडेना.' ५ शोभणें, योग्य दिसणें, साजेलसें असणें 'कीं एइहि न गेरे तया माझी ।' –भाए ६३०. 'हे पुढें न सरती बोल । साचाच्या गांवीं ।' –अमृ ६ २१ ६ सरसावणें, उत्सुक होणें 'न म्हणों सरली सीता ।' –विउ ७ ९९ ७ कार्यभाग होणें, चालणें, पटणें, मान्य होणें 'सांगें बातचें आतां घरे । ऐसें अध्यक्षाचि अरीसे । तरी निमाळिवें धवळारें । करावीं का ।' –ज्ञा ५ ११४ [स सृ–सरणें] (ठाव) सरणें–मरणें, आगें पणें 'ऐसा दोघांचा सरला ठावो ' –उषा १६०३

**सरत सरता, सरतें सरोट, सरत्**—नपु (व ना ) मरकी पेरण्याची पांभूची नळी, मोघण

**सरत**—स्त्री शर्यत, चढाओढ, पैज, घोडदौड [अर शर्त]

**सरता**—वि १ पात्र, श्रेष्ठ, मान्य, कृतार्थ्य 'वाचा अनासुफळ करावें । तिहीं लोकीं सरतेंआं होआवें ।' –दाव ४६ 'रामानंद स्मरण करितां । केला सरता ससात ।'–दव सतमालिका १० २ ग्राह्य, चालेलसें 'जातींत सरता केला ' –महि बखर ५८. तुका म्हणे माती । केली कस्तुरीनें सरती ।' –तुगा ३ पूर्ण, योग्य, पुरेसें 'म्हणे माझे सेवेप्रती । लक्ष्मीहि नव्हे सरती ।' –रास १ ८९२ 'तरीं तुम्हीं आपले कृपादानें करून । सरतीं वचनें करावीं ।' –भवि १ ७ 'वैसा सरता होईन मी ।' –रावि १ ४ शेवटचा, अखेरचा शेवटला 'हे पहिली ना सरती ।' –ज्ञा १८ १११३ ५ सपणारा, खर्च होणारा, आटोपणारा 'जें सरतें जीवितवारी । तया औषधातें वैरी । काय जिव्हा न म्हणे ।' –ज्ञा ६ ३६८ 'प्राणी हे करितात आयु सरतें हें नेणवे अंतरीं ।' –नवनीत पृ १४१ **सरता पालव**–पु अखेरीची स्थिति, शेवटची पाळी, शेवट, अखेर शेवटचा भाग, हंगामाचा अखेर, –ह्रास काल 'तुम्हीं त्याचे सरत्यापालवी आला ' **सरता पुरता**–वि पूर्ण, पुरा झालेला, सपलेला, सगळा, पुरा, भरपूर, पुरून उरण्याजोगा 'तेचि भाग्यवंत । सरत पुरते धनवंत ।' **सरतोंपुरतों, सरतेंपुरतें सरतासरतों**–क्रिवि १ पूर्णपणें, भरपूर २ अखेरीस, सरतेशेवटीं 'तरी आतां सरतेंपुरतें । आपुल्या समान करा मातें ।' –नव १७ ८० 'जे सावध होते परंतु सर्व न केली सरतासरती ।' –ऐपो ३५८ **सरतेरात–त्र सरतीरात–त्र**–क्रिवि रात्र संपेपर्यंत, सारीरात, रात्रभर **सरतेशेवट**–क्रिवि

अंगेरीग; शेवटीं, संपतांना, अखेरच्या वेळीं, प्रसंगीं; अंतीं. **सरतेशेवटीं, सरत्याशेवटीं**–क्रिवि. १ अंगेरीग, शेवटीं; अंतीं. २ शेवटच्या जागीं, अखेरीच्या भागास; शेवटल्या भागीं, स्थळीं; कडेला; टोंकाला.

**सरद्**—स्त्री. १ सरहद्द, मर्यादा; सीमा. २ (ल.) दिशा; बाजू, प्रदेश. 'यंदा दक्षिणेचे सरदेस पर्जन्य पडला नाहीं.' 'राजापुरी पावेतों सरद दर्याकिनारा मोकळा केला.' –सभासद ५२. ३ (ल) सान्यांतील प्रदेश, हद्दींतील प्रदेश, मर्यादित प्रदेश 'अदास त्याचे सरदेंत त्याचा कौल व तुमचे सरदेंत तुमचा कौल' –बाडशाह १.१०६. ४ (ल) रांग, ओळ (झाडें, टेकड्या, घरें वगैरेची) [फा. सरहद्द]

**सरद्**—वि १ थंड; गार; ओलसर; आर्द्र, दमट, सर्द; शीत (हवा, जागा, भागा वगैरे) २ शीतल, थंडावा आणणारें, ज्यापासून थंडी होईल असें, दाहनाशक (औषध, खाद्य, पदार्थ) [सं. शरद्, फा. सर्द] **सरद होणें, (मनांत) सरद होणें**–एखाद्याबद्दल कष्ट होणें, नाखूष होणें, खट्टू होणें, खप्पा मर्जी होणें, थंड पडणें, वरमणें. **सरदणें**–अक्रि १ दमट, ओलसर, थंड होणें, ओल येणें, (जागा, वस्तु). २ गारठणें, थिजणें, हार मणें. 'इंग्रजी सैन्य पार सरदून गेलें' –इंर १८३ **सरदावणें–सरदेणें**–अक्रि. (राजा.) दमट, ओलसर होणें; सर्द होणें **सरदगरमी**–स्त्री १ सर्दीनें मिश्र उष्णता; मध्यम उष्णता, थंडाव्यानें कमी उग्र भासणारी उष्णता (हवेंतील, पाण्यांतील वगैरे). २ प्रकृतींतील थंड उष्ण असा होणारा फरक, एक व्याधि. **सरदभात**–न भाताची एक जात, एक जातीची साळ. सर्द पहा. **सरदी**–स्त्री १ थंडी, ओलावा; आर्द्रता, दमटपणा; ओलसरपणा, ओल २ शैत्य, थंडावा; सर्दी (प्रकृतींत थंडीचा प्रादुर्भाव, प्रकृति थंड असणें) ३ थंडी, शैत्य, सर्दी (प्रकृतींत शैत्याचा विशेष जोर होऊन ती नादुरुस्त होणें)

**सरदा-धा**—स्त्री (अ) श्रद्धा १ भाव, पूज्यता, विश्वास. २ आवड, लालसा, गोडी, इच्छा [सं श्रद्धा]

**सरन्दाज**—वि हुशार; बुद्धिमान, डोक्याचा, धूर्त 'अंताजी काली उमर वरसे दहावर त्यास शाहाणा लिहिणार सरन्दाज होता' –माद्विरंतं ५२. [फा]

**सरदार**—पु १ वडा अधिकारी, मुख्य अधिकारी, प्रमुख, श्रीमंत व मातबर मनुष्य, पुढारी, मनसबदार, मानकरी, नेता 'सरदारानीं कारभार बिघडून दिल्यामुळें' –समारो २ १०४ २ (ल) (काशी) उपाध्याय ३ घराच्या कामावरील मुख्य गवंडी [फा सरदार] **सरदारकी, सरदारी**–स्त्री. १ सरदाराचा हुद्दा, पदवी, मान, अधिकार 'सुरतेची सरदारकी
घाको. ७. २३

करावी ऐसी आज्ञा.' –पदमव ११. २ मुत्सद्देगिरी, मसलत. 'शिपाईगिरीची रीत केली सरदारगिरीचा प्रकार न केला.' –पया ३७०. **सरदारी**–स्त्री. घोड्याच्या तोंडापासून डोक्यापर्यंतचा लगामाचा भाग. –वि. सरदारासंबंधीं; सरदारविषयक

**सरदावरदी**—स्त्री १ सरासरी, स्थूलमान, टोकळमान; अनेक घटकांच्या मिश्रणामुळें उत्पन्न होणारे सामान्य गुणधर्म. २ सरदावरदी पहा. [फा. सर+आवर्द]

**सरप**—न रत्न.

**सरप**—पु. (प्र.) सर्प पहा. साप °टोळी–स्त्री (कु) सापसुरळी, चोंचीसारखें तोंड असलेला साप

**सरपट**—स्त्री. साप गेल्यामुळें जमीनीवर उठलेला परफटा, सापाची फरफट, एखादा पदार्थ ओढला असतां उठणारा फराटा, ओरखडा, ओढून नेलेल्या वस्तूचा मागें राहिलेला माग, चिन्ह, खूण [सं सृप्-सर्प]

**सरपटणें**—अक्रि. १ पोटानें पुढें सरणें, पोटानें फरपटणें; जमीनीशीपर सरकत जाणें, घुरडणें. २ (पदार्थाच्या पृष्ठभागावरून) घसरणें, निसरणें, हळू हळू सरकत जाणें, अलगत घसरत जाणें. ३ निसरणें, घसरणें; सरणें, घसरडणें. ४ रांगणानें पुढें सरणें; गुडघ्यांनीं सरकत जाणें. [सं सृप्] **सरपटत्यां**–क्रिवि सरपटत; घुरडत; रांगत, घसरत, निसरत.

**सरपण**—न जळण, इन्धन, जळाऊ लांकडें; वयतन

**सरपोळी**—स्त्री (गो) सरी, साखळी [सर्प]

**सरफ**—पु खर्च, वाटखर्च [अर सर्फ=खर्च]

**सरफ-इ-खास, सरफ-खास**—पु एस राजाच्या आतखर्चासाठीं तोडून घेतलेला प्रांत 'त्यानीं खालशातून व सरफखासांतून हात उचलावा' –रा ५ ५५७. [अर सर्फ=खर्च+खास]

**सरफखाना**—पु विड्याचें साहित्य ठेवण्याचें स्थान, तांबूलागार. 'आबदारखाना चिटणीस याजकडे सरफखानासुद्धा अधिकार सांगितला.' –इमं ८८ [फा]

**सरफमईशात**—स्त्री पोटखर्च 'तेथील महसूल बमय औलाद अहफाद सरफमईशात करोन दुवागोई दवाम दौलत अबद पैवद मदगूल रहातील' –रा २० २८६ [अर सर्फ+मईशत्=चरितार्थ]

**सरफराज-जी**—स्त्री. बढती, वाढ, शिफारस, स्तुति, प्रशंसा 'कृपावंत होऊन तुम्हास सरफराज केलें जाईल..' –वाडसमा १ १३४ 'जो जसा भार धरील तशी त्याची सरफराजी करावी' –मराआ १० [फा]

**सरफळी**—स्त्री १ मुलाच्या कमरेंत घालावयाची एक प्रकारची सर्पाकृति साखळी २ गळ्यात घालावयाची एक प्रकारची सांखळी. [सर्प]

**सरफा**—पु लाभ फायदा, नफा प्राप्ति हित 'यण करून तुमचा काय सफा आहे' –रा १५ ३६७ [अर सरफ= खर्च] **सरफेदाईक सरफेदार**-वि फायदेशीर, लाभ दायक हितकर

**सरफास**—पु सरणारा फांस निसरफांस सरकफांस, निसरगांठ [सरणें+फास]

**सरफर्णे**—क्रि थरथरणें शिरशिरणें 'घाणि सर्व वदन सरफरुनि।' –मोमभा ३ ४९

**सरबडणें**—क्रि फरफरणें सरफरणें सरकत जाणें घसरत जाणें पादून जाणें **सरबरता गोळा** पु टप सात जाणारा, भुइसरपट जाणारा तोफेचा गोळा या-या उलट अधांतरी गोळा दूरवरून जाणारा गोळा

**सरबत**—न लिंबु आवळा विस साखरवगैरेपासून बनविलेलें मधुर पेय (कानी) साखरपाणी [अर शरबत] ०खाना–पु सर बतें तयार करण्याची व ठेवण्याची जागा मारावर्धी सात फार खाना

**सरबता**—वि गव्हाची एक जात

**सरबत्ती**—स्त्री १ (तोफा, बंदुका सुरुंग, फटाके वगैरेंस बरोबर) बत्ती लावून पेटवून केलेला धूम धडाका बरोबर पेट विणें (क्रि० देणें) २ (यावरून ल) जोराचा भडिमार धूमधडाका मारा झड ताशेरा (क्रि० होणें, झडणें उडणें, करणें झाडणें उडवणें) ३ (ल) भाडणाचा तंटयाचा स्फोट कल्ह भाजणें जोराची बोलाचाली होणें (क्रि० झडणें उडणें) ४ (विनोदानें) (पानसुपारी देताना तूप वगैरे वाढताना उडणारी) धादल, धावपळ गडबड [सर+बत्ती–बात]

**सरबर** रा—स्त्री बरोबरी, स्पर्धा [फा सरबर=प्रमुख पुढारी]

**सरबरा**—ई–स्त्री व्यवस्था तरतूद बंदोबस्त पाहुणचार (धंदा वगैरे) चालू करणें गरजाची भागवणूक व्यवस्था लावणें, मिळा सावलें आवरण चालविणें सरभरा पहा ज काम साधाल त्याची सरबरा करू –रा ६ ५६४ [फा सरबराह् सामुग्री प्रवासखर्च]

**सरबरीत**—वि पातळसर घळमळित फार दाट नव्हे फार पातळ नव्हे असा (आवरस पिठलें कालविलेला भात भाजी, चुना चिखल वगैरे) [ध्व सर]

**सरबसर सरबासर**—वि क्रिवि १ सरासरी मिश्रित एकदर बिजोड लहान मोठे एकत्र केलेलें सगळीं मोत्यें सारखीं नाहींत सरबसर आहेत तिजाई सूट सरबसर पाहून द्यावी –धाडसमा १ २५७ २ मध्यम सरासरी

**सरभंगी**—पु जेवतांना पुढें मागें न पाहतां तूप खाणारा वैरागी एक पंथ

**सरभरा**—स्त्री सरबरा पहा चालविणें, व्यवस्था मदत मिळा (धंदा वगैरेचा) रुपये पाठविणें म्हणाज सरभरा होईल' –रा १६ २६६ **सरभरा**-वि उपयोगी मदत करणारा साहाय्यक बापु धौंडिया गुण प्रगल्भपणीं करुन सरभरी।' –दोंग ७७ ११२

**सरम**—पु एक मासा

**सरम**—स्त्री (प्र) शरम पहा लाज लज्जा

**सरम सरमट सरमड सरमाड**—न बाजरीचें कोड तार, कडबा 'कोणापासुन कडबा कोणापासुन सरमड दर कोणापासुन बांस –खरादेश २८० –कृषि १७७ **सरमाडी**–वि सरमड काढून शाल्यादारचें शेत किंवा अशा शेतांतील 'सर माडी जमीन शेत, बावर 'सरमाडी हरभरा'

**सरमणें**—क्रि विवेचन करणें, व्याख्यान करणें विवरणें 'जे ऐकतां सुख तुम्हा। तें सरमतां सनोवु आम्हा।'–शिशु ११ १६८ [इ समेन]

**सरमस**—स्त्री गर्दी, गडबड दाटी सरमस वनितांची जाणि त्या हो गांची। –माधवरामायण बालकांड ४५ अंक ५१ [हि सरघम ?]

**सरमाळ**—स्त्री (गो) समयांची दिव्याची माळ

**सरमो(मी)य**—क्रिवि यत्किंचितहि बालाग्रहि आ. दा सरमोय वगळेपण दिसत नाहीं'–रा १० २७८ [अर सरिमूय]

**सरय**—पु (व) गझल नांवर

**सरया**—वि शुद्ध –मनका

**सरर**—क्रिवि बाण तीर गोळी वगैरे सोडली असता होणाऱ्या आवाजाप्रमाणें [ध्व]

**सररास**—सरसकट पहा

**सरल**—न (कु) चोंडा दुध भातावरचें सालपट **सरला**–ल–पु भाताचा पेंढा भात झोडल्यावर मळावयाचा पेंढा

**सरल**—पु देवदारा-या जातीचें एक झाड सरल कुटजवट वृक्ष सातवण क्षुप दाडिमी चाफा –नगारत्नमाला नवनीत पृ ४३२ [स] ०द्रव पु सरल झाडाचा सुवासिक पाझर साव चीक

**सरल-ळ**—वि १ समोर उजू नीट वांकडातिकडा, तिरपा नव्हे असा येष २ (ल) निष्कपट प्रामाणिक नकीचा छक्केपंजे नसलेला (मनुष्य) ३ स्पष्ट उघड आडपडदा नसलेलें निखालस (भाषण शब्द) ४ सोपी साधी सुबोध (भाषा सरणी लेखनपद्धति व्याख्यानपद्धति काव्य वगैरे) 'आर्यकथा छंदानें आर्या छंदचि जन्मली सरलें। –नवनीत पृ २५४ [स]

०रेषा–स्त्री एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत दिशा न बदल णारी रेषा ०रेषाकृति–स्त्री जी आकृति सरल रेषांनीं मर्यादित असते ती ०रेषाकोण–पु दोन भिन्न दिशांनीं येणाऱ्या सरल रेषा एकमेकींस मिळाल्या म्हणजे होणारा कोन **सरलता**–स्त्री ऋजुता, सरळपणा, निष्कपटता, निर्व्याजता

**सरली**—स्त्री सर्डी, चिरफळी, चिरी, लांबट तुकडा ( काग दाचा ) –देशी नाममाला

**सरवजा**—पु सरवदा, सरोदा पहा

**सरवट**—पु १ सरवा करावयाच्या उपयोगी जमीनीचा तुकडा २ एक जातीचें भात ( हें तांबडें असतें व उपटून न लावता केवळ पेरून करतात ) ' सरवट भात हिरव्या जमीनीवर पेरतात ' [ सरवा ] **सरवट पटणी**–स्त्री एक जातीचें पटणीचें भात

**सरवट**—न १ पावसाची मोठी सर २ ( काहीं ठिकाणीं ) पावसाची ल्हानशी सर [ सर ]

**सरव( वि )णें**—सक्रि ( कु ) सपविणें [ सरणें प्रयोजक ]

**सरवदा-दा-सरवजा-सरोदा**—पु ( राजा ) सर्वदा पहा डाकोता, भविष्य सांगणारा 'जैताचिया चाडा सरव देया हात वसु नये।' –भाए २४० 'ऐकागा ए भाई। सरवदा सांगतो काई।' –तुगा ३२७ 'दिवटा सरवदा भाकूनि गेला।' –दा ३ ७ २९

**सरवर**–न ( प्र ) सरोवर पहा तळें 'जे राजहंस सर-वरीचे निवासी।' –वयाबाई रामदासी ९

**सरवळा**—पु सारोळा पहा बेरजेचा ताळा पाहण्याची एक रीत

**सरवळा**—पु वोटवा, गव्हल्याचा एक प्रकार ' ते वोटवे सरवळ आणि मालत्याला।' –साहद ६ ७७

**सरवा**—पु १ नुक्तीच पिकाची कापणी केली आहे अशी जमीन, शेतांतील कणसें गोळा केल्यानंतर मधून मधून चुकून राहतात तीं फळें भाजीपाला वगैरे काढून घेतल्यानंतर जो पाठीमागें तुरळक अवशेष भाग राहतो तो ( क्रि० वेचणें ) २ वरीलप्रमाणे राहिलेला अवशेष भाग गोळा करून ठेवतात तो ( क्रि० भरणें उरकणें, सपविणें ) [ सरणें+उरणें सरून उरलेला ] **सरव्याची तमाखू**–स्त्री तमाखूचें मुख्य पीक काढल्यानंतर फुटलेलीं तमाखूचीं पानें, यासच खोडव्याची किंवा पागशीची तमाखू म्हणतात

**सरवा**—पु झाडें, झुडपें काढून साफ करून लागवडीस आणलेला जमीनीचा भाग अशा तऱ्हेनें नवीन लागवडीस आणलेल्या जमीनीस दुसऱ्या व तिसऱ्या वर्षी सरवा शब्द लावतात, चवथ्या व पाचव्या वर्षी पडण शब्द लावतात नंतर अजीबात पड टाकतात **सरवेंभात**–न सरव्यांत केलेलें भाताचें पीक

**सरवा**—पु पावसाची सर

**सरशी, सरशी बाजू**—स्त्री १ वरचढपणा, श्रेष्ठता, जय, वर्चस्व ( क्रि० येणें, होणें, करणें ) २ भरभराट, प्रगति, उत्कर्ष ( क्रि० येणें ) [ सरस=अधिक, श्रेष्ठ ]

**सरशीं**—शअ सह, बरोबर, सहित, जवळ, पाशीं, सन्निध 'वना आलीस सरशी।' –वसा ६२ 'गुढ्या तोरणें उभवून केली मुज प्रथम सरशीं।' –ऐपो ३०४ [ सरसा=जवळ ]

**सरशी**—पु ताऱ्यासारखा मध्यें तोंड व सभोंवार फांटे असलेला प्राणी –प्राणिमो ११६

**सरस**—पु प्राण्याचीं शिंगें, नखें वगैरेच्या राळ्यापासून बनलेला एक चिकट पदार्थ [ फा सरेश ]

**सरस-सा**—वि १ श्रेष्ठ, वरिष्ठ, उत्कृष्ट, उत्तम, सुरेख, चांगला 'सरस वासन वजनदार पाहुणे मेले बहुत फार।' –ऐपो १८५ 'हौदे अवाऱ्या सरशा निरदया।' –ऐपो २४०. २ वरचढ, वरच्या दर्जाचा, अधिक मोठा, जाडा, आकार, गुण, संख्या वगैरेंनीं अधिक [ स श्रेयस् ] **सरसता-सरसाई**–स्त्री १ श्रेष्ठपणा, उत्कृष्टता २ वरचढपणा, आधिक्य

**सरसगिरी**—स्त्री बरसात, पावसाची सर येणें, वळि-वाचा पाऊस पडणें 'उष्ण काळात सरसगिरी झाल्यास पाऊस पडों लागल्यास पाणी धरावें लागतें यास्तव गवडे अलिकडे उष्ण काळातच पाटवावे' –बर्ड्डेची मोहीम

**सरसण**—न सौरस्य, मैत्री 'त्याचा तुमचा विवेक होऊन सरसण चाले तोच अर्थ केला जाईल' –शाछ १ २४

**सरसणें**—सक्रि करणें, कृतींत आणणें, रचणें 'कथा ऐक त तू नवल ऋषिशृंगें सरसिलें।' –माधव-रामायण बाल कांड ५

**सरसंदा**—वि सरसुदा पहा

**सरसर-रा**—क्रिवि १ सर्प वगैरे प्राणी सरपटत जातांना होणाऱ्या आवाजाप्रमाणें आवाज करून, निसरतांना, घसरतांना होणाऱ्या आवाजाचें अनुकरण करून २ झरझर, त्वरेनें, झटपट सरसर गोविंदा यतो। मजवर गुलाल फेकितो।' [ ध्व सरणें ]

**सरसरणें**—अक्रि सरसर आवाज करून पुढ जाणें, घसरणें, निसरणें सरकनू, त्वरेनें पुढें जाणें 'स्वामी वचनें सरसरला।' –सग्रामगीतें [ ध्व सरसर ]

**सरसव, सरसु**—स्त्री मोहरीसारखें एक धान्य, शिरस शिरशी –ऐराप ३२४, –कृषि ३५४

**सरसा**—वि सरस पहा

**सरसा, सरिसा**—वि १ सारखा, समान, तुल्य 'देखे सतासती कर्मी। हें जें सरिसेपण मनोधर्मी।' –ज्ञा २ २७२ 'नावासरशी करणी असावी' –शअ १ सनिध जवळ, समीप 'घरासरशीं घरें लागलेलीं आहेत' २ (वेग, सपाटा, आवेश इ०क) याच्यासह बरोबर 'हाकेसरशी घाली उडी। स्तंभामाजी कडाडी।' 'वाऱ्यासरसा, हातासरसा झपाट्यासरसा तडाक्यासरसा, उठण्यासरसा, बोलण्यासरसा' –क्रिवि १ बरोबर सह सविधभागीं, जवळपास 'सऱ्या दोन्ही भागीं वसति सरसा सावधपणें।' –सारुह ६ ८९ 'तुका म्हणे सरशी असों यणें बोधें।' –तुगा १९३ २ बाजूला, एकीकडे, मार्गांतून दूर (क्रि० काढणें, करणें, घालणें निघणें होणें, जाणें) ३ तात्काल लागलीच, झपाट्यानें 'सत्य बोले व भक्तिभाव जैसा। अनुभव सरसा आणूनियां।' –तुगा १८ 'मुलें मिळालीं सरशीं। क्रीडताती हरिसवें।' –द ७ ११९ 'नाम जपे सरसे।' –दप ६७ ४ नीट, व्यवस्थित, सर सावून 'पान खाऊन रंगेल अधर। पदर च सरसा लाजून जरा।' –पला ३६ ५ पुढें, अग्रभागीं 'या दो या चवदा वयास सरसे दृ॰ा मेळवा वाढवा।' –केक ५३ [स सदृश]

**सरसून**–शअ बरोबर, जवळून, सह, लगटून; लागुन (क्रि० जाणें, चालणें, वसणें)

**सरसाव(वि)णें**—अक्रि १ बाजूला होणें, निसटणें, सरकणें २ पुढें जाणें, चालून जाणें धिटाईनें चाल करणें 'झाला जो सरसावला नवरसामाजारि शृंगारसा।' –र १७ ३ वाढणें उभें होणें अंगात भरणें, जोमानें वर यणें 'मदें मासें सरसाविला। सांदी सादी भरोनि।' –दा ३ १ १६ 'एका वर्षात ही पद्दा कशी सरसावली, आता मोठी बायको दिसते' ४ उद्युक्त होणें तयार होणें, करावयास उठणें, आवेशानें पुढें होणें –सक्रि १ जवळ करणें, जवळ घेणें, सनिध आणणें २ बाजूला करणें दूर करणें, सरकविणें ३ पुढें करणें, सारणें 'घरोघरीं दीप अखंड त्याच्या सरसावुनि वाती।' –घन श्यामाची भूपाळी ४ तयार करणें ऊर्जित दशेस आणणें 'पुण्यक्षेत्र सरसाविलें।' –रावि [सरसा]

**सरसिज**—न कमल [स] **सरसिजोद्भव** पु. ब्रह्मदेव **सरसिजोद्भवकुमारी**–स्त्री सरस्वती

**सरसी सरसी बाजु**—सरशी पहा

**सरसुदा-सोदा**—वि जाणता, वयात आलेला, सज्ञान 'येईन बरोबर म्हणाले राहु घरीं बशी सरसुदी।' –पग १८ ४३ [सरस + स्क ? ]

**सरसोवरदा सरसोवर्पी**—क्रिवि चढाई करून कुरापत काढून, चाल करून, धिटाईनें, आगळीक करून पुढील वाक्प्रचारांत जोडून योजतात –कज्जया करणें, जराब देणें, शिव्या देणें, चालून यणें, अंगावर पडणें

**सरस्वती**—स्त्री १ ब्रह्मदेवाची पत्नी २ ब्रह्मदेवाची कन्या, गणपतीची बायको ३ वाग्देवता, गायन, कला वगैरेंची अधिष्ठात्री देवता 'जरी प्रकट सिद्ध सरस्वती। तरी मुकया आथी भरती।' –ज्ञा १ ७८ ४ वेद शास्त्रें, वगैरे ग्रंथ, विद्या ५ वाणी, वाचा, भाषा ६ वर्षप्रतिपदा, दसरा वगैरे दिवशीं पाटीपूजनाकरिता मुलें पाटीवर रेषांची काढतात ती आकृति ७ एक नदी, ही पजा बात आहे, तसेंच प्रयाग येथील त्रिवेणीसंगमामध्येंहि गुप्तरूपानें येऊन मिळत असी समजूत आहे असी समजूत अनेक ठिकाणीं आढळून येते उदा० महाबळेश्वर 'भाजीं गीता सरस्वती गुप्त' –ज्ञा ११ ७ ८ सुंदर व अस्खलित, मधुरभाषिणी स्त्रीस म्हणतात ९ (सांकेतिक) गुप्तपत्र [स] ०**अनध्याय**–पु आश्विन शुद्धपक्षात मूळ नक्षत्र असतां सरस्वतीचें आवाहन, पूजन वगैरे श्रवण नक्षत्रापर्यंत करतात तो काल ०**दान**–न १ लेखी वचन, लेखी करार, लिहून दिलेला लेख (क्रि० देणें, लिहून देणें) २ तोंडी वचन, करार (क्रि० देणें) ०**पूजन**–न १ आश्विन महिन्यांत मूळ नक्षत्र असता सरस्वतीचें आवाहन करून पूजा वगैरे करतात तें २ दिवाळींतील वहीपूजन

**सरहंग**—पु सेनापति देखरेख करणारा, मुख्य [फा]

**सरहद-द्द**—स्त्री सीमा, मर्यादा शेवट [फा]

**सरळ**—पु (महानु) एक भूषण, भागातील मोत्याचा सर 'मोतियाचे दुसरें। सरळाचेनि घसरें' –शिशु ४०४ [स सरल]

**सरळ**—स्त्री (को) भाताचा पेंढा, भात्याण, भाताचें काड सरल पहा

**सरळ**—वि सरल पहा [स] ०**व्याज**–न साधें व्याज, केवळ मुद्दलावर घेतलेलें व्याज, याच्या उलट चक्रवाढ व्याज **सरळणें**–अक्रि १ सरसावणें, धिटाईनें पुढें येणें तडकपणें पुढें जाणें २ वाढीला लागणें, जोमानें वाढणें (मूल, रोप) **सरळ सोडणें**–क्रि (गाई) गाईस खोंड झाला असतां तो चालता सशक्त होण्यासाठीं गाईची धार न काढतां सर्व दूध खोंडास पाजणें **सरळी**–स्त्री १ पाण्यांत समोर मारलेली डुबकी, पाण्यात जोरानें सरळ जाणें २ मोकळीक, स्वातंत्र्य 'मग मुलें तुज सरळी। दिधली आहे।' –ज्ञा १३ ११६

**संरक्षण**—न सांभाळ, रक्षण राखण, निगा, जपणूक काळजी घेणें [स सम्+रक्ष्] **संरक्षक**–वि काळजी घेणारा, रक्षणकर्ता, सांभाळणारा, रखवालदार, पहारेकरी ०**जकात**–स्त्री स्वदेशातील उद्योगधंद्याची वाढ व्हावी म्हणून आयात मालावर बसविलेली जकात, पट्टी, कर **संरक्षणीय**–वि रक्षण करण्याय

योग्य, राखण्याजोगें, जपण्यासारखें, साभाळण्यासारखें **संरक्षिणें**—उक्रि राखणें, काळजी घेणें, जपणें, साभाळणें, निगा राखणें **संरक्षित**—धावि रक्षण केलेला, साभाळलेला **संरक्ष्य**—वि राखण्यास योग्य, शक्य, अवश्य

**सरा-सर**—पु १ लाब सरळ वाबू अथवा लाकूड, वासा, तुळई, लांब सरळ सोट २ गाडयाच्या साटीच्या बाजूची वरची आडवी लाब लाकडें (खाल्च्यास घोडे म्हणतात) ३ (विणकाम) वस्त्रांतील विरळ विणीची रेषा [स सृ]

**सरा**—पु १ (वों) मद्य, दारू, मदिरा 'स्त्रिया पुजुनि सरे दती। मल्ते स्त्रियेसी भलते जाती।' –तुगा ४२७७ 'सिंदी सरा तमाखू आफ भागी।'–स्वादि २ ४ ३१ [स सुरा]

**सरा**—पु (खा) सरवा पहा अखेरची वेंचणी.

**सरा**—स्त्री नदी 'समुद्र होऊनि ओघु। सरे दाऊनि मागु। राहे जैसा।'–अमृ ५ २१ [स सृ=सरणें]

**सराईंदा**—पु गायक, गवयी [फा सराइदन्=गाणें, सर'इंदा=गायक]

**सराई**—स्त्री धर्मशाळा, मुशाफरखाना, विश्रांतिस्थान [फा सराय्]

**सराइ-सराई**—स्त्री सुगीचा काळ, हगाम, मोसम; पिकें गोळा करावयाचा पर्जन्यानतरचा काळ, दिवाळा 'सराई सर्व काळ। वाया न वजे घटिकापळ।'–तुगा ३६० [स शरद्–शारदी]

**सराई(इ)त**—वि निष्णात, पटाईत, कुशल, सुप्रण, पटु, तरबेज दक्ष, सराव असलेला, अभ्यस्त, अनुभवी 'सराइत होता बाजी ज्याचा मारा सभाळिला।'–ऐपो ७० 'मी आहे सराईत सख्यारे बाळपणाची। पुरवावी हौस मनाची।' –पला २८. [सराव]

**सराउ-ऊं सराव**—पु अभ्यास, सवय, परिपाठ 'सुग्धा गती विलासा सराऊ देती।'–शिशु ३४१ 'सराऊ न कीजे राज कुमारीं। तरि तया जैत केंवें।'–भाए ५३२ 'जैसा रणरंगीचा नटोवा। सराऊ करितुसे।'–शिशु १००४ [स सृ]

**सराए**—पु राजवाडा सराई [फा सरा]

**सराकत, सराकतदार**—स्त्रीपु शराकत, शराकतदार पहा.

**सरागणें**—अक्रि शोभणें [स स+राग–रज्जू]

**सराजमा**—पु (कर) सरन्जाम पहा

**सराञ्जामी**—स्त्री व्यवस्था –आदिलशाही फर्मानें [सर जाम]

**सराटा**—पु १ गोखरू एक औषधी वनस्पती व तिचें बीं 'पारधी जिंधी मृगा सराट जवीं महागमातें।'–ह१८ २९ 'खिरीमधे हा नसता सराटा।' –साहद ८ १४ २ माड, पोफळ वगैरेचा हीर कुसपट, अणकुचीदार ढलपा ३ आवाजातील कप, गाण्यातील लाब तान, नादातील लहरी, हेलकावा, कंपन, आदोलन, हिसका (क्रि० घेणें, वाजवणें, वाजणें) –पु १ उलथणें, कलथा २ खराटा, झाडणी, सळाथी ३ तागाचें झाड, सणकाडी, पळझाटी –कृपि ४७१ [स शर]

**सराटी-ठी**—स्त्री तीर, बाण, बाणजाल, शरजाल. 'फुलाचा सराटी। केउती जुनाची गोष्टी।' –शिशु २६७ 'यालागीं शौचबुद्धीच्या सराटी। अहकारातें त्राहटी।' [स शर]

**सराडणें**—सक्रि (व) सराटयानीं, पळझाटयानीं आच्छादणें, छपरावर गवत टाकण्याच्या आधीं तें काडया, तटया वगैरेनीं आच्छादणें [सरा]

**सराद**—न श्राद्ध 'घातलें वडलाचें सराद।' –ऐपो ८० [स श्राद्ध, अप]

**सरानसरी, सरानसरी**—क्रिवि सरासरी पहा

**सराप**—पु सर्प [म सर्प, म साप]

**सराप**—पु शाप [स शाप, म श्राप]

**सराप**—पु सराफ 'पाडुरग तेव्हा सराप होवोनी।' –रामदासी २ ११९ [सराफ]

**सरापराज**—वि सर्फराज पहा –आदिलशाही फर्मानें [फा सर्फराज]

**सरापर्दह्**—पु राजाचा तबू अत पुर –आदिलशाही फर्मानें [फा सरापर्दाह्]

**सराफ**—पु १ पैशाची देवघेव, हुडीचा व्यवहार, व्याजबट्टा, सोनें–चादीचा वगैर व्यवहार करणारा, पेढीवाला, सावकार 'चटी आणि सराफ सोनार। तेली ताबोळी आणि कासर।' –जै १० ८० २ (ल) कृपण, कजूष [अर सर्राफ्] ०कट्टा–काटा, **सराफा**–पु सराफाच्या दुकानाची राग, सराफगल्ली, सराफी, सराफ बसण्याची जागा ०खाना–पु सराफकट्टा, सराफाचें दुकान 'दवडी बरावर सराफखाना।' –ऐपो २१५ **सराफट्टा**–पु (निंदेनें) सरा फास उद्देशून निर्भर्त्सनापूर्वक योजावयाचा शब्द ०हट्टा–पु सराफ बाजार, सराफाच्या दुकानाची राग **सराफाई–सराफी**—स्त्री १ सराफाचा धदा, सराफाचें काम, सराफाचें कसब 'हो वारवेळची सराफाइला दिली।'–ऐपो ३७१ २ कजूषपणा; काटकसर 'प्रातिक सरकारानें खात्यात चागली सराफी चालविली आहे' –टिले ११५२४ 'यात सराफी करू नय' –रा ६ ५०९ –वि सराफासबधी; सराफाच्या कामा सबधीं सराफ बाजारात काहीं साकतिक शब्द प्रचारात असतात ते —रायडा = १ पैसा, रमान रायडा = दोन पैसे, एक वई रायडा = तीन पैसे, रामदाग = १ आणा, मानाजी = १

रुपया, समानी = २ रुपये एरवई = ३ रुपये, ऐरण = ४ रुपये, मुलु = ५ रुपये, चेटी = ६ रुपये, पनिशु = ७ रुपये, टाळ = ८ रुपये, घन = ९ रुपये, अवतार = १० रुपये, सागर = ११ रुपये, बाभड = १२ रुपये, टिपर = १३ रुपये, भोपडु = १४ रुपये, तळी = १५ रुपये **सराफी काया**-पु १ सराफी धंद्यातील कसब, कौशल्य, हुषारी २ मजूबपणा, काटकपणा

**सराब**—स्त्री दारु मद्य, मदिरा, सुरा [अर शराब]

**सरामद**—वि मुख्य –आदिल्शाही फर्मानें [अर सर+आमद]

**सराय**—स्त्री सराई पहा

**सरायदा**—पु गायक, गवई [फा सरायदा]

**सरायनी**—पु शरायणी गज, जमीन मोजण्याचें माप

**सरारणें**—अक्रि सरसर आवाज करून जोरानें सरकणें, घसरणें, निसरणें, सरपटणें [ध्व सरसर] **सरारां**-क्रिवि सरसर असा आवाज करून, भरभर, जोरानें, सोसाट्यानें 'ज्वाळा लागती फणिवरा। तो आडाळोन सरारा। विष वमे।' –दा १३ ४ ४

**सराव**—पु अभ्यास, सवय, रावता 'आणि जिभे सकळ शास्त्राचा सरावो।' –ज्ञा १४ २९६ [स स्व] **सरावणें**-अक्रि अभ्यास होणें, सवय होणें, रुळणें 'विठुभाऊ फजीतीस सरावलेला आहे।' –अस्तभा १९५

**सरावलें, सरायू**—नपु एक मातीचें भांडें, परळ, दद लोटाचें मृत्पात्र [स शराव]

**सरासर**—क्रिवि सावन्त, पूर्ण, तमाम, एकदर [फा सरासर्]

**सरासर-रां**—क्रिवि सरसर पहा

**सरासरी, सरासरीस, सरानसरी**—स्त्री १ सामान्य प्रमाण, सरसकट पडणारें प्रमाण सर्वांचें मिश्रण करून येणारें सामान्य गुणधर्म लक्षण (क्रि॰ करणें, बांधणें, होणें, बसणें जमणें, मिळणें) २ (गणित) अनेक सजातीय संख्यांच्या बेरजेस त्यांच्या संख्येनें भागून येणारें प्रमाण –क्रिवि १ सामान्यत साधारणत सरसकटपणें, विशेष बारकाई, चिकित्सा न करता, कसें तरी, यथाकथंचित् २ अजमासानें, कल्पनेनें, साधारण अंदाजानें ठोकळ मानानें, वरवर पाहता; बिनचूक निश्चय न करता 'या घरास सरासरी हजार रुपये खर्च येईल' ३ मध्यम मानानें, सर्वांचा सम प्रमाणानें हिशोब करून, सर्वांवर सारखें वाटून ४ सर्वस्वी, पूर्णपणें एकदरींत 'आधी तुम्हीच सरासरी हरामखोरी केलीत।' –रा १५ १७१ ५ (विशेषणाप्रमाणें) सामान्य प्रतीचें, मध्यम प्रतीचें कसेंबस चालचलाऊ म्ह॰ सरासरी गुडघाभर नदीच्या पात्राचें एकदर पाणी पाहून त्याची सरासरी काढलेली खोली अर्थात् ही व्यवहारास निरुपयोगी आहे–कारण मध्यें पाणी खोल असण्याचा

**सरोळणी**—स्त्री उगाकरितां केलेली तिमऱ्या वेळची नांगरट [सरळ]

**सराळी**—स्त्री सरळी पहा.

**सरि**—स्त्री वटेवरी सरी पहा 'रत्नखचितें रम्यें सरि न पवति मेरु सीसरें।' –आद्य मराठी कवयित्री १६ ४

**सरिखा**—वि सारखा पहा

**सरिगम**—पु स रे ग म पहा स्वरग्राम

**सरित्-ता**—स्त्री नदी 'कीं सरिता स सागरु। त्यजीं केलें।' –ज्ञा २ ६० 'न घे चातक सरिता सिंधु।' –तुगा ८५७ [सं] **सरितेश्वर**-पु समुद्र, सागर

**सरिफा**—पु लाभ, मिळकत, फायदा, नफा [अर]

**सरिफेदार**-वि लाभदायक, फायदेशीर सरफा पहा

**सरिफि**—स्त्री बदुकीचा चाप, कळ

**सरिया**—स्त्रीअव मालिका, सर 'उभिलिया बकुळ सरियाच्या गुढिया।' –भाए ४४१ 'जैसिया जर्णी काढिलिया। इंद्रनिळांचिया सरियता' –ऋ ९४ [एव सरी]

**सरिरास**—क्रिवि लागोपाठ, एकसारखें, ओळीनें, अप्रतिबंध क्रमानें, मोकळेपणीं, सुखानें [अर सरूर=सुख, आनंद]

**सरिश्ता**—पु शिरस्ता पहा **सरिश्तदार**-पु शिरस्तदार पहा

**सरिसा**—वि सारखा समान; बरोबर; तुल्य 'तथापि दोहीं ठायीं सरिसा। मोह कराल हा भरवसा' –मुआदि ३ ८८ 'तरी न एति करीं सरिसे। प्रसंगेंसी।' –शिशु १७ 'मार्गी अधासरिसा। पुढें देखणहि चाले जैसा।' –ज्ञा ३ १५६ –शअ १ सह, बरोबर 'भीमकी सरिसे भावनी।' –एरुस्व ६ ५८ 'तत्काळ आला उमेसरिसा।' –कथा १ ४ ६१. 'तिजें सरिसां भांजिती। मळयानीळु।' –शिशु ७८२ 'शिरा जालें सरिसा। गुफोनि अस्थींचा पासा।' –शिशु ७५९ २ अवळ, सनिध –क्रिवि सारखें दुरुस्त, नीट पूर्ववत्, समोर 'पडलें खचलें जयें देखें। तात्काळ सरिसें करिती तयें।' –मुसभा ३ ७८ 'उटूनि दोन्ही आरसे। चोडविलीया सरिसे।' –ज्ञा १८ १५९६ [स सदृश, सरसा पहा] **सरिसेपण**-न सादृश्य, तुल्यता, सारखेपणा 'सरिसेपणें एकवटत इम–। मस्तकावरी।' –ज्ञा १ १७

**सरी**—स्त्री १ धातूची तार २ एक स्त्रियांचा सोन्याचा दागिना 'सरीरूपी होय सरी गळ्याची।' –सारह २ ७२ 'दिसे जैशी सोनियाची सरी।' –ज्ञा ६ २८६ 'सरीचिताक भोंवरी।' –तुगा ३७७५ ३ बाबूची बारीक लांब काडी, सळ ४ बाफ्याच्या

रागेतील पाण्याचा पट, यांतील वाफयाची राग, दह ५ विणकामात दोर सरल्यामुळें पडणारी तिरळ रेषा, दुस्ता ६ भिंतीच्या माथ्यावरील रेषा, ओळ, राग ७ लग, सावावरील सरा ८ जात्याच्या वरच्या तळीवर वजन ठेवण्यासाठीं केलेला दगडाचा किंवा मातीचा वाटोळा पेंड ९ अनु, मानेचें हाड १० वाफ्यांतील मातीचा बाध वाफ्याचे भाग पाडण्याकरिता घातलेला मातीचा वळ, पाटगा, चिरा [स सृ-सर] **सरी मारणें**-(कासारी) गोल भांड्यास कड, किनार काढणें, खोदणें **सरी येणें**-(व) गळ्याच्या हाडात दुखणें, हसळी येणें, **सरीचा जोड**-पु एक मुलींचा खेळ -मुखेपु २८५

**सरी**—स्त्री बरोबरी, स्पर्धा, तुल्यता, जोड, उपमा (क्रि० घेणें)' नाहीं मजसी सरी पावे । ऐसें बोल्दी।'-ज्ञा १६ ३२९ ' शफरी ध्वज सरी न पव।'-ह २३ १२४

**सरा**—स्त्री (कर व्यापारी) दोन आणे

**सरीक**—पु सरकती, भागीदार, पातीदार, वाटेकरी शरीक पद्य तेथील आकार होईल तो सरीकास देऊन बाकी उरला '-वाडबाबा ३ २०७ 'सरीक नाहीं दुसरा।'-तुगा ३६०

**सरीक्त**—स्त्री शर्त, भट, तह -शिदि २५

**सरीसर्वेन**—क्रिवि सगळीकडे, सर्व ठिकाणीं, प्रत्येक ठिकाणीं

**सरीसुदी**—क्रिवि (ना) येट, सरळ 'सरीसुदी नागपुराहून मुंबईलाच गेलों असतों '

**सरीसा**—सरिसा पहा

**सरू**—पु (कों) घड, दांडा, मूठ [स त्सरु]

**सरू**—पु सुरूचें झाड, एक सरळ वाटणारें सदा हिरवें व शोभिवंत दिसणारें झाड 'माझा तू लावण्याचा सरू।'-पला ४११ [अर]

**सरूचा सरूदार**—वि सुरूच्या झाडाप्रमाणें सरळ, उभे 'वेलबुटी सारखी खाव सरुदार करे घडले।'-प्रला ११९

**सरूडोरू करणें**—(ना व) अनमान करणें, मागें पुढें करणें, का कू करणें 'शाळा सोडण्यास सरूडोरू करतो' [सरणें]

**सरूप**—न १ स्वरूप आकारिता सुढीनें २ सौंदर्य [स स्वरूप]

**सरूप**—वि १ सारखे, एकाच स्वरूपाचे एकाच तोंडवळ्याचे, सदृश २ (ल) अनु, नक्ष 'मग आपलें वजन सरूप याची इच्छा धरावी'-पेद ६ ५६- [स स+रूप] **सरूपता**-स्त्री १ सादृश्य, सारखेपणा २ चार प्रकारच्या मुक्तींपैकीं एक ईश्वरसादृश्य 'सलोक्ता समीपता सरूपता । ते तव पिंमें साडी सर्वथा।'-एरुस्व १ ६६ **सरूप त्रिकोण**-पु ज्या त्रिकोणाचे तीनहि कोन परस्परांशीं सारखे असतात असे त्रिकोण **सरूप प्रेरणा**-स्त्री एकदिगामी प्रेरणा [स स+रूप]

**सरेक्री, सरेकार**—पु कलाल, दारू विकणारा [सरा=मद्य]

**सरेगाऊ**—त्रि सरळ 'आलें सराटी सिंचितु । सेरगाऊ।'-शिशु ५६४

**सरेमा, सर्माय**—पुन भांडवल, ऐवज 'करार केला त्यास कसुर सरेमोमही यावयाची नाहीं '-पया ४७४ [अर सरिय]

**सरेसाल**—क्रिवि वर्षभर, सबंध वर्षांतून, वर्षामधून [सर साल पहा]

**सरोक**—वि. विनकिडीचा, चांगला 'आपपृथ्वी हे पाच फोक। महाभूताचे सरोक। सरले होती।'-ज्ञा १५ ९८

**सरोख-ष**—वि क्रोधयुक्त, सक्रोध, रागीट -क्रिवि रागानें आवेशानें, क्रोधानें 'मग सरोष बोलों आदरिलें।'-ज्ञा २ ८८,

**सरोग**—वि रुग्ण, आजारी 'तरी सरोगु वाय जाणे। निदान रोगाचें।'-ज्ञा ११ ९०

**सरोज**—न कमल [स सरस्+ज] **सरोजनी**-स्त्री कमळ समूह **सरोजिनी**-स्त्री कमलिनी

**सरोता**—पु आडकित्ता

**सरोत्तर-री**—क्रिवि बरोबरीनें, उद्धटपणें, उद्दामपणें 'हीनजनासी बराबरी । बोल बोलें सरोत्तरी।' -दा २ १ ५२ [सर+उत्तर]

**सरोद-दा**—पु एक ततुवाद्य, यास सात तारा असतात. मुख्य चार म, सा, सा, प या स्वरांत व बाकीच्या तीन सा, प व तार सा या स्वरांत मिळवितात यास स्पर्श असून हस्तिदंती तुकड्यानें हे वाजवितात [स शारदा, फा सुरोद्]

**सरोदा दी**—पु एक भविष्य सांगणारा भिक्षेकरी, डाकोत, सरवदा

**सरोध**—पु प्रतिबंध, अडथळा, अटकाव [स सम्+रुध्]

**सरोबरी सरोभरी**—स्त्री १ बरोबरी, तुल्ना, साम्य 'तै गुणागुणिया धरावी। सरोभरी कीं।'-ज्ञा १८ १९ २ स्पर्धा, चढाओढ बराबरी 'जे मीपणाचा धरूनि रोध। सरोबरी करू पाहे।' -स्वादि ३ ५ ३९ -क्रिवि १ सारखेंच, बरोबर, सारख्या प्रमाणात समानतेनें 'कीं दोहीं सिद्धी सरोभरी। निपजे यागु।'-ज्ञा १६ ९६ २ आदरानें, भरानें, आवेशानें, वेगानें भरीस पडून 'जो प्रियुचि प्राणेश्वरी। उल्थे आवडीचे सरोभरी।'-अमृ १ २ 'तो भावाचिय सरोभरी। नव्हेचि काई।' -ज्ञा १६ ३८ [सर+भर]

**सरोरुह**—न कमल, पंकज, सरसिज [स सरस्+रुह्]

**सरोवर**—न मोठें तळें, मोठा जलाशय, तडाग **सरोवर न्हाणें**-सती जावयास निघालेल्या स्त्रीनें विधिपूर्वक तळ्यात स्नान करणें

**सरोवरी**—सरोवरी-भरीपद्दा. ' आतां सरोवरी तुजमज । ' –तुगा १२१५

**सरोसर**—पु १ एक शिरोभूषण, एक दागिना २ घोड्याचा डोक्यांत घालावयाचा एक अलंकार याचे मुसपट्टा व कपाळपट्टा हे दोन भाग असतात ' स्वामीनीं जरी सरोसर विकत घेऊन देणें म्हणून लिहिलें ' –पेद ७ २१ [ फा ]

**सरोसरोसा होणें**—पुरेपुरेसा होणें; नकोसा होणें, थकून जाणें, कंटाळणें [ सरणें ]

**सरोळा**—पु १ सरवळा पहा येरजेचा ताळा पहाण्याची एक रीत २ एक तऱ्हेचा चोटवा, गव्हला [ सरणें ]

**सरोळी**—स्त्री (बे ) तांदुळाच्या पिठांत दूध, मीठ वगैरे घालून सारस्वतांत करतात तें एक पक्वान्न याप्रमाणेंच कायलोळी, दोसा, अवोळी असे अनेक प्रकार आहेत

**सर्कत सर्कती सर्कस, सर्खवास, सर्गरम, सर्गदन, सर्चश्मा, सर्ताज**—सरकत, सरकती, सरकस सरखवास, सरगरम, सरगदन, सरचश्मा, सरताज, वगैरे पहा

**सर्पील, सर्खेल**—पु सरखेल पहा

**सर्ग**—पु १ उत्पत्ति; जन्म, सृष्टि ' सर्गस्थितिलयकर्ता ज्याचें घेताचि नांव भव नाशी । ' –नरहरि गंगारत्नमाला २ अध्याय, खंड, प्रकरण ' आपण रघूचे सर्ग वाचण्याऐवजीं स्वभाव शास्त्राचा अभ्यास केला असता तर बरें झालें असतें ' ३ स्वभाव ४ त्याग [ स सृज् ] ०बंध-पु खंडकाव्य, अनेक प्रकरणें अस लेलें काव्य

**सर्ज**—पु शाल नावाचें झाड ०रस-पु शाल झाडाचा चीक

**सर्जा**—सरजा पहा १ एक दागिना, अलंकार, भूषण ' सर्जे तोडर पाखरा सजतुमे कडे पटे चागले ' –साइइ ३ ४४. २ सिंह [ फा शर्जा=गर्जणारा, उग्र (सिंह) ] ०राव, सर्जेराव-पु एक पदवी, किताब

**सर्जि, सर्जिकर, सर्जिकाक्षार, सर्जिक्षार, सर्जे-खार**—पु सज्जीखार, एक प्रकारचा खार याचा साबणा-प्रमाणें उपयोग करतात **सर्जीभवन**-न सानुमध्यें रूपांतर होणें

**सर्डी**—स्त्री कागद कागदाचें पान ' रामा, खोलींतील पातळ सर्डी फाडून एक तुकडा आण पाहू ' –सोमणकृत खेड्यां तील स्वभावचित्रें १५९

**सर्त**—स्त्री शर्त पहा ' बडेखान पठाण भलामर्द सर्तीनसी भाडला । ' –ऐपो ८०

**सर्द, सर्दई, सर्दगर्मी, सर्दार, सर्दारी, सर्दी, सर्द्दी**—सरद, सरदार, सरदी वगैरे पहा

**सर्द**—न (गो ) खाजणांतील पावसाळी भाताचें पीक ' वर्षाच्या कांहीं सर्दाचें व बायगणाचें मिळून हजार भर्‍याचें पीक दणारें भलें मोठें अफाट खाजण दिसलें ' –सह्याद्रीच्या पायथ्याशीं १२. [ स शारद ]

**सर्नाट**—वि (व ) सन्नाट, खूप जोराचा **सर्नाटून**-क्रिवि सन्नाटून, खूपजोरानें.

**सर्प**—पु साप, नाग; सरपटणारा प्राणि [ स सृप् ] ०कंकाळी-स्त्री एक वनस्पती [ सं ] ०टोळी-स्त्री साप टोळी, एक विषारी जनावर, हें झाडावर बसून मनुष्यावर उडी मारतें ०त्वचा-स्त्री सापाची कात, मेंग ०दृष्टि-दंश-स्त्रीपु सापाचा दंश, साप चावणें ' सर्पदृष्टि जालियावरी । तीन दिवसां उठवी । ' –दा ९ ८ ७ ०मणि-पु सापाच्या डोक्यांत एक मणि असतो असा समज आहे तो हा विषमारक आहे अशी समजूत आहे ०शीर्ष(हस्त)-पु (नृत्य ) हाताचीं सर्व बोटें एकमेकास जोडून अंगठा तर्जनीस जोडणें व सर्व बोटें उभीं करून थोडीं वाकवून हात उभा करणें ०सत्र-न जनमेजयानें केलेला सर्पांचा यज्ञ **सर्पारी**-पु नकुल, मुंगुस **सर्पासन**-न हठाभ्यासनाप्रमाणें जमीनीवर साफ निजून दोन्हीहात छातीचे बाजूला टकलेले आहेत व डोकें वर केलें आहे असें आसन –सयोग ३५३ **सर्पित (करण)**-न (नृत्य ) पाय अंचित करून मागचे बाजूस ठेवणें, हात रेचित करणें, डोकें एकदा या बाजूस व एकदा त्या बाजूस वळविणें **सर्पीण**-स्त्री १ सापाची मादी २ घोड्यास जीभ काढावयाची खोड ' लगाम घेता जीभ काढतो ती सर्पीण ' –अश्वप १ ९५

**सर्पटणें, सर्पट्यां**—सरपटणें, सरपट्यां पहा

**सर्पण**—न १ जळण, जळाऊ लाकडें सरपण पहा ' आंगें होऊनि सत्तपोद्भववह्नी तो सर्वदा सर्पण । ' –मो अंबरीषाख्यान (नवनीत पृ ३६० ) [ स श्रपण=शिजविणें ]

**सर्पेळी**—स्त्री (गो ) सांखळी [ सर्प ]

**सर्पिल**—वि वाटोळी, चक्राकार, मळसूत्रासारखी. [ सर्प ]

**सर्पोस, सर्फराजी, सर्फा, सर्फेवार, सर्वत**—सरपोस, सरफराजी वगैरे पहा

**सर्बमोहर**—वि मोहरबंद, लाखबंद, सीलबंद ' त्यात कित्येक दफ्तरें सर्बमोहर व कित्येक बे मोहरेचीं याप्रमाणें लिहिलीं ' –रा ५, खलप २ ९ [ अर सर्बमुहर् ]

**सर्बारी**—पु हमाल, भारवाहक, ओझेकरी –राज्य ९ १० [ फा ]

**सर्म**—स्त्री (गो ) बायकाची टोपी

**सर्यंत**—स्त्री शर्थ; पराकाष्ठा 'जे साधय होते परतु सर्यंत केली सरतासरती।' –ऐपो ३५८ [ शर्त ]

**सर्व**—वि १ सगळा, सगळे भाग मिळून, सारी रास, सख्या प्रमाण २ प्रत्येकमग मिळून, सगळा गण जमाव, समूह ३ सगळा काल, अवधि, विस्तार वगैरे ४ पूर्ण सपूर्ण, अवघा पुरता, परिपूर्ण, समग्र, न वगळता पूर्णांश [ स सर्व, प्रा सव्व सिं समु प सम, हि सब स पर्द=भाग ] ०**कर्ता**–वि सगळे करणारा, उत्पत्तिकर्ता, सगळे घनविणारा, अवघ्याची रचना करणारा ०**काल**–क्रिवि १ सगळा वेळभर, सर्व अवधि सपेपर्यंत, सर्व वेळी; विवक्षित सगळा कालभर २ सतत, नेहमी, सर्वदा, सदोदित ०**कालीन**–वि शाश्वत, सर्वकाल टिकणारे ०**खपी**–वि १ ज्याच्या ठिकाणी कोणत्याहि वस्तूचा उपयोगी अथवा निरुपयोगी, अवश्य अथवा अनवश्यक अशा सर्व वस्तूचा खप होतो असा २ ज्याला कोणतीहि कमलीहि वस्तु चालत असा ३ सर्वोत्तरित्या खपणारा, काम करणारा, कोणासाठीहि परिश्रम करण्यास तयार असा ०**गत**–वि सर्वव्यापक, सर्वव्यापी; सर्व ठिकाणी ज्याचे अस्तित्व, वास्तव्य आहे असा 'चैतन्य आहे सर्वगत। तें तत्त्वज्ञ मन। स्वीकारिती।' –ज्ञा २ १२६ ०**गामी**–वि सर्वव्यापक, सर्वत्र ज्याचे गमन आहे असा, सगळीकडे जाणारा ०**गुणसंपन्न**–वि सगळ्या गुणांनी युक्त सर्व तऱ्हेने पूर्ण, सर्व चागल्या गुणाचे अधिष्ठान ०**जनीन**–वि सार्वजनिक सर्व लोकाविषयी ०**जाण**–वि सर्वज्ञ, सगळे ज्ञान असणारा, सर्व जाणणारा 'काय पुजावें मी नेणें। जाणवे जी सर्व जाणें।' –तुगा ११५८ ०**जित्**–वि १ सर्व जिंकणारा, सर्वांचे दमन करणारा, सर्वांस ताब्यात ठेवणारा २ सर्वाहून श्रेष्ठ वरिष्ठ ०**त**–क्रिवि १ सर्व दिशांनी, सगळीकडे, सर्व बाजूंनी, दशदिशा २ सर्वत्र पूर्णपणे विश्वभर ०**तत्रस्वतत्र**–वि अनिर्बंध, स्वैर 'अशा अधात्री व सर्व तत्रस्वतत्र लोकांनी हिंदु महासभेच्या निर्णयाकडे पाहून नाके मुरडावी यात आश्चर्य नाही' –मास २ १६४ ०**तीर्थ**–पु समुद्र, सागर 'गगा न साहिता जैसा। सर्वतीर्थे सद्वासा। वरपडा जाला।' –ज्ञा १८ ९०९ ०**तोभद्र**–पुन १ रचना स्थापनसाठी एक विशिष्ट मडळ काढतात तें २ चारी दिशास द्वारे असलेला प्रासाद राजवाडा, मदिर 'रेखिली परिकरे। मधुरें सर्वतो भद्रे।' –ऋ ७१ ३ सैन्यरचनेचा एक प्रकार एक विशिष्ट व्यूह ४ अनेक प्रश्नास एकच उत्तर याव्य असते असे कोडे, कूट ५ एक प्रकारचे चित्रकाव्य कोणत्याहि दिशेने वाचले तरी एकच प्रकारचा अर्थ व अर्थ येईल अशी रचना ०**तोमुख**–पु एक सोम याग दक्ष –वि सर्व बाजूंनी तोंड असलेला, कोणत्याहि बाजूने पाहिले तरी समोर तोंड येईल असा ( देवता, पाणी, आकाश, गोल ) ०**त्र**–क्रिवि सर्व ठिकाणी, स्थळी, जागी, सगळीकडे, सर्व दिशास 'ईश्वर सर्वत्र आहे' –वि प्रत्येक, सगळे, सर्व 'सर्वत्रास दक्षिणा दिली' ०**था**–क्रिवि सर्व बाजूंनी, सर्व मार्गांनी दिशांनी, सर्व उपायांनी, पूर्णपणे, मुळीच, निःशेष, निश्चित खचित, कदाहि 'मज आपणपें सर्वथा नाही। मन बुद्धिठायी। स्थिर नोहे।' –ज्ञा ११९५ 'मना सर्वथा पापबुद्धी नको रे।' –राम ०**थैव**–क्रिवि केव्हाहि, सर्व प्रकारे दिशांनी, बाजूंनी ०**दर्शी**–**द्रष्टा**–वि सर्वसाक्षी, सर्व पाहणारा, ज्यास सगळे दिसते असा ०**दा**–क्रिवि नेहमी, सतत, सर्वकाळी ०**दुःखक्षय**–पु सर्व दुःखापासून मुक्तता, मोक्ष ०**घन**–न ( गणित ) श्रेढीतील सर्व पदांची बेरीज –छअ १७३ ०**नाम**–न ( व्या ) स्वत विशिष्टार्थद्योतक नसता पूर्वापरसबधाने कोणत्याहि नामाबद्दल योजता येतो असा शब्द ०**नियंता**–वि सर्वांवर ताबा चालविणारा, सर्वांचे नियमन करणारा ०**न्यास**–पु सर्वसंगपरित्याग; संपत्ति, कुटुंब आप्तेष्ट, संसार वगैरे सर्व गोष्टी सोडून देणे, सर्व ऐहिक गोष्टी टाकून देणे, त्यापासून अलिप्तता, मुक्तता ०**पाक**–पु खीर, क्षीर ०**पित्री अमावास्या**–स्त्री भाद्रपद महिन्यातील अमावास्या (या दिवशी सर्व पितरांचे श्राद्ध करितात यावरून ) ०**प्रायश्चित**–न सर्व पातकाबद्दल एकाच वेळी घ्यावयाचे प्रायश्चित सर्व पापांचे परिमार्जन, क्षालन, सर्व दोषांपासून मुक्तता 'सर्वप्रायश्चित घेण्याचा त्यांनी जो निश्चय केला' –आगर ३ १३५ ०**प्रिय** वि सर्वांचा आवडता, लोकप्रिय विश्वमित्र ०**ब्रह्मी**–वि सर्व विश्व ब्रह्मरूप आहे असे केवळ तोंडाने बोलून एकाकार करणारा आचारभ्रष्ट 'लेकुरें सर्व ब्रह्मी झालीं' –सप्र १९४० ०**भक्ष**–**भक्षक**–**भोक्ता**–वि वाटेल ते खाणारा; खाण्याच्या कामी कोणताहि निर्बंध न पाळणारा स्वच्छ अस्वच्छ, भक्ष्य, अभक्ष्य न पहाता अघोरी पणे खाणारा अग्नि, दाढी कावळा वगैरेसहि हा शब्द लावतात ०**भावे**–क्रिवि काया–वाचा–मनें करून, सर्व भावयुक्त 'तैसा श्रीदर्शी जा जीवें। पदानिया सर्वभावें।' –ज्ञा १२ ७९० 'जगी वद्य तें सर्वभावे करावे' –राम ०**भूतभूतांतर**–वि सर्व वस्तूंच्या ठिकाणी वास करणारा, सर्वव्यापी, विश्वव्यापी, विश्वव्यापक ( ईश्वर ) ०**मय**–वि सर्वव्यापी, सर्वगत ( ईश्वर ) ०**मान्य**–वि सर्वांस समत पसत कबूल ०**मान्य**–**मान्य इनाम**–न सर्व कर माफ असलेले इनाम, सर्वांना कबूल असे इनाम, गांवगवरी इनाम, याबद्दल सनद नसते ०**राष्ट्रीय कायदा**–पु राष्ट्राराष्ट्रातील व्यवहार नियमन करणारा नियम ०**रूप रूपी**–वि सर्वव्यापी, सर्वांचे स्वरूप आहे असा, विश्वरूपी ( ईश्वर ) 'अनादि अविछिन्न। सर्वरूप।' –ज्ञा २ १५० ०**लिंगी**–

पु कोणतादि विशिष्ट पथ न अनुसरणारा वैरागी ०वल्लभा-स्त्री वेश्या, वारांगना ०विध-क्रिवि सर्वप्रकारें ०वेत्ता-वेदी-वि सर्वज्ञ सर्वसाक्षी, त्रिकालज्ञ ०वेषी-वि बहुरूपी, अनेक प्रकारचे वेष धारण करणारा ०व्यापक-व्यापी-वि सर्वत्र असणारा, विश्वव्यापी, सर्वत्र भासणारा ०व्रण-पु गळू, करट ०शः-क्रिवि सर्व दिशांनीं, बाजूंनीं, मार्गांनीं, रीतींनीं; पूर्णपणें, निखालस, दरोबस्त, निःशेष ०शाक-ख-स्त्री १ अनेक प्रकारच्या भाज्या एकत्र करून केलेली भाजी २ भालें ०शास्ता-वि सर्वांवर सत्ता, अधिकार गाजविणारा ०शोधी-वि सर्वांचें निरीक्षण करणारा, सर्व वस्तूंची परीक्षा घेणारा, जिज्ञासु, चिकित्सक, परीक्षक, शोधक ०संगपरित्याग-पु सर्वसंन्यास, सर्व ऐहिक वस्तूंचा त्याग, पूर्ण वैराग्य, विरक्ति ०संग्रह-पु सर्व वस्तूंचा साठा, संचय, संकीर्ण, मिश्र संचय ०सपाट-क्रिवि अभेद, सर्वत्र सम स्थिति, मोकळें 'आत्मा नसतां सर्व सपाट चहूंकडे।' -दा १६ ८ १० ०संमत-वि सर्व मान्य, सर्वांस पसंत, कबूल असलेलें ०समर्थ-वि सर्वशक्तिमान, सर्वसत्ताधारी, सर्वाधिकारी ०सह-वि सर्व सहन करणारा, सर्व गोष्टींचा भार वाहणारा ०सहवर्तमान-वि सर्वांसह, सर्वांस बरोबर घेतलेला, सर्वांनीं युक्त ०साधन-न सर्व गोष्टींची सिद्धता, सर्व गोष्टी घडवून आणणें, सर्व कार्यें साधणें, करणें, बनाव बनविणें ०साधन-साधनी-वि सर्व गोष्टी साधणारा, सिद्ध करणारा, घडवून आणणारा ०साधारण-सामान्य-वि सर्वांस लागू होणारा, सर्वांस सम असा, सर्वांचा समावेश करणारा 'मला नाहीं तुमचे सर्वसामान्य सिद्धांत समजत.' -सुवे ३७ ०साक्षी-वि सर्व पाहणारा, सर्व भूतांच्या ठायीं असणारा, ज्यास सर्व दिसतें असा (ईश्वर) 'नसेन दिसलों कधी नयन सर्वसाक्षी रवि।' -केका ४ ०सिद्ध वि सर्व परिपूर्ण, (सर्व गुणादिकांनीं युक्त, सर्व लक्षणांनीं युक्त, संपूर्ण, सर्वांग परिपूर्ण (ईश्वर) ०सिद्धि-स्त्री सर्व इच्छांची पूर्ति, सर्वकाम पूर्ति ०सिद्धार्थ-वि सर्व इच्छापूर्ति झालेला सर्व हेतु साध्य झालेला ०सुखानंद-वि सर्व सुख व आनंद प्राप्त झालेला, सर्व सुखाचा आनंद ज्याच्या ठिकाणीं आहे असा (ईश्वर) ०सोंवळा-वि १नेहमींचा शुद्ध सोंवळा, पवित्र जन्मसोंवळा (एखादा मनुष्य स्नान न करताच सोंवळें नेसला असता त्यास उपरोधिकपणें म्हणतात) २ नेहमींच पवित्र शुद्ध, सोंवळें असलेलें (रेशमी वस्त्र, धावळी वगैरे) (हीं कधीं न धुतलीं तरी सोंवळीं मानण्यात येतात यावरून) ०स्पर्शी-वि व्यापक, सर्वांचा समावेशक 'एकदर ठराव सर्वस्पर्शी समाधानकारक केला' -केले १ ३०९ ०स्व-न १ सर्व धन, सर्वसंपत्ति, सर्व मालमत्ता, चीजवस्त वगैरे, स्वतःच्या मालकीचें सर्व 'सर्वस्व हारवावें की जिंकावें न भीउ तू पण हो' -मोसभा १ ९५ २ तन, मन, धन, 'तेणें सर्वस्वें कर्म अनुष्ठी। परि फळ न सुवे दिठी।' -ज्ञा १८ ५९० मी सर्वस्वयों तैसें। मुमक्षी।' -ज्ञा १ १११ ३ तत्त्वांश, सार; ०स्वदंड-पु सर्व संपत्ति जप्त करणें, सर्व मालमत्ता खालसा करणें, सर्व हिरावून घेणें ०स्वहर-हर्ता-हारक-हारी-पु सर्व धन हरण करणारा, घेणारा, लुबाडणारा ०स्वहरण-हार-नपु सर्व संपत्तीची लूट, सर्व धन हिरावून घेणें, सर्व नाश ०स्वामी-पु १ सर्व विश्वाचा प्रभू, सर्व सत्ताधारी, जगत्पति, सार्वभौम २ सर्वस्वाचा मालक, धनि, सर्व वस्तूंचा धनि ०स्वीं-स्वें-क्रिवि १ तनमनधनेंकरून, सर्व वस्तुमात्रासह २ पूर्णपणें, पुरतेपणीं, एकदर, अगदीं, सर्व प्रकारें, निखालस उदा० सर्वस्वीं सोदा, लुच्चा, लबाड, हरामी वगैरे ०हर-हर्ता-हारक-हारी-वि सर्व हरण करणारा, लुबाडणारा ०हरण-न संपूर्ण नागवणूक, नाडणूक ०ज्ञ-वि सर्व जाणणारा; त्रिकालज्ञ, पूर्ण ज्ञानी, सर्वसाक्षी, सर्व वेत्ता 'तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं। वेयावें अवधान हे माझी। विनवणी सलगीची।' -ज्ञा ९ २ सर्वंकष-वि सर्वांस कसोटीस लावणारा

सर्वांग-न १ सर्व शरीर, देह शरीराचे सर्व अवयव २ सांग वेद, षडंगसहित वेद सर्वांगरोग-वात-पु पक्षघाताप्रमाणें सर्व शरीरास वातविकार होतो तो -योर १ ७५५ सर्वांगासन-न साफ उताणें निजून हात जमीनीवर टेकणें व त्यावर जोर देऊन खांद्यापर्यंतचा भाग व पाय वर उचलून ताठ करून स्थिर होणें -संयो ३५० सर्वांगीण-वि सर्व शरीर व्यापणारा, सर्व अंगासंबधीं सर्वांगें-क्रिवि एकचित्तानें, एकाग्रतेनें 'जो सर्वांगें श्रोता।' -दा ७ १ २८ सर्वांची मेहुणी-स्त्री १ मुरळी, भाविण २ वेश्या स्त्री सर्वांतर-वि सर्वांच्या अंतःकरणांत राहणारा 'मज सर्वांतरानें कल्पिती। अरि मित्र गा।' -ज्ञा ९ १६६ सर्वांतोंडीं-क्रिवि सर्वांमुखीं प्रत्येकाच्या मुखांत ज्याच्या त्याच्या तोंडांतून सर्वात्मना-क्रिवि १ मनोभावें करून, अंतःकरणपूर्वक, तनमनधनें करून 'धन कामासि निजसुख। सर्वात्मना नाहीं देख।' -एभा २३ ४३५ २ पूर्णपणें सर्वस्वी; निखालस 'हा सर्वात्मना लबाड आहे' ३ मुळींच, अगदीं, कदापि, कोणत्याहि तऱ्हेनें, साफ (नाहीं-निषेधार्थक शब्दाबरोबर उपयोग) 'मजपासून ही गोष्ट सर्वात्मना घडावयाची नाहीं' -रा ३ ३०१ सर्वात्मा-पु सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणीं असलेला जीवात्मा, चैतन्य (ईश्वर) सर्वाथाई-क्रिवि सर्वथा (अपभ्रंश) 'असा पुण्यरूप नृप न सोडी भोग सर्वाथाई।' -ऐपो ४०९ सर्वाधिकार-पु पूर्ण सत्ता, सर्वांवर सत्ता, ताबा, वर्चस्व सर्वाधिकारी-पु प्रमुख, मुख्य, सर्वसत्ताधीश, (म्हैसूरच्या राजाचा हैदरपूर्वी मुख्य प्रधान) सर्वाधीश-

ति सर्व अध्ययन झालेला, सर्व विषय शिकलेला, निष्णात –शिदि ११८ **सर्वानुभूति**–स्त्री सर्व जगाचा, अनेक प्रकारचा, अनेक गोष्टींचा अनुभव **सर्वाभक्षक–भक्षी–भोजी**–वि १ वाटेल तें खाणारा, सर्व प्रकारचें अन्न ज्याला चालतें असा २ अधाशी, अघोरी **सर्वावद्ध**–वि सर्व तऱ्हेनें स्वतंत्र, मोकाट, स्वैर; पूर्ण स्वतंत्र; असंबद्ध, नियमांनीं बद्ध नव्हे असा, विसंगत (मनुष्य, चाल, वागणूक, कार्य, काव्य, भाषण वगैरे) **सर्वार्थी**–वि सर्व वस्तूंची इच्छा करणारा, लोभी महत्त्वाकांक्षी वगैरे **सर्वार्थी, सर्वार्थे**–क्रिवि सर्व प्रकारांनें, सर्वस्वी, हरतऱ्हेनें, प्रत्येक दृष्टीनें 'वैश्य व्यवसायात आण। दिसतो निपुण सर्वार्थी।' **सर्वाम्य**–वि क्रिवि सर्व प्रकारें सर्व तऱ्हेचा, सर्व कामांतील 'सर्वाम्य कारभारी' –चिम २ **सर्वारिष्ट**–न सर्व जगावरील सामान्य संकट, सर्वसामान्य पीडा, अनेक लोकांस बाधक किंवा अनेक प्रकारचें संकट, पीडा, बाधा **सर्वांशिक, सर्वांशी**–वि सर्व भागांनीं सबंध असलेलें, एकदेशीयाच्या उलट **सर्वांशीं**–क्रिवि पूर्णपणें, सर्व प्रकारें, सर्व तऱ्हेनें **सर्वांशीं संपूर्ण, सर्वावयवी संपूर्ण**–वि सर्व विभागांनीं अवयवांनीं युक्त, परिपूर्ण, सबंध **सर्वाशुद्ध**–वि अनेक अशुद्धें असलेला, सर्व प्रकारें दोषयुक्त चुक्यांनीं भरलेला (ग्रंथ वगैरे) **सर्वीय**–वि सर्वांचा, सर्वांशीं संबंध असलेला, सगळ्यांचा, विश्वाचा, जागतिक **सर्वे**–अव्य सगळीं 'दुःख भोगिले आपुलें जीवें। तवें देखिले होतीं सर्वे।' –दा ३ १० ४४ **सर्वेश, सर्वेश्वर**–पु १ परमेश्वर, जगदीश 'तया स्वधर्मी सर्वेश्वरीं। न भजेल जो।' –ज्ञा ३ १०४ २ सम्राट, सार्वभौम, सर्वाधीश **सर्वेश्वर(रो)वाद**–पु विश्वात सर्वत्र परमेश्वर भरलेला आहे असें मत (इ) पॅन थीइझम् **सर्वै**–क्रिवि सर्वेहि, पूर्णपणें, सर्वस्वीं 'अकस्मात तै राज्य सर्वै बुडालें।' –राम **सर्वो-त्कर्ष**–वि अत्यंत महत्त्वाचें सर्वोत्तम 'साप्रत हे येश आम्हास भीनें आपले पदरीं सर्वोत्कर्ष घातलें' –पेद २ १८१ **सर्वोत्कृष्ट** वि १ अत्युत्तम, सर्वोत्तम सर्वश्रेष्ठ (ईश्वर) २ रास्त न्याय्य रास्त **सर्वोपकार**–पु सर्वांचें कल्याण, सर्वांवर केलेले उपकार जगदुपकार **सर्वोपकारी**–वि जगास कल्याणकारक सर्वांस उपकारक लाभदायक **सर्वोपयोगी**–वि सर्व कार्यांस उपयुक्त, कोणत्याहि कामास उपयोगी **सर्वोपरी**–क्रिवि सर्व प्रकारांनीं, सर्व रीतींनीं, सर्व पद्धतींनीं, सर्व तऱ्हांनीं [सर्व + परी] 'समर्थ जाणोनि सर्वोपरी।' –मुआदि ३३२ **सर्वोपरी**–वि सवश्रेष्ठ वरिष्ठ उत्कृष्ट उत्तम 'शिखरायिलिया सर्वोपरी। मेरु तो मी।' –ज्ञा १० २२७ –क्रिवि श्रेष्ठपणें, वरिष्ठपणें, उत्तम रीतीनें [सर्व + उपरि] **सर्वौषधि**–स्त्री पुतावेरी, एक वनस्पति 'सर्वौषस-ला–नाम द्वि (आदिष्ट) सर्वांचा तो सर्व्यांला मुजरे करतो।' –ऐपो ४३१

**सर्वर्ण**–सरावणें पहा 'नित्य हें जेविनां तेज प्रकाशत। सर्वेति गोमटीं मन्द्वारें।' –ज्ञामा ... १

**सर्वदा**–पु एक शिकारी ज्योतिषिजाति, दाकोचा; दाकोचा सरवदा पहा 'दिवटा सर्वदा भाकून गेला।' –दा ३ ७ ५९

**सर्वरी**–स्त्री सरदारी –आदिलशाही फर्मानें [फा]

**सर्वली**–स्त्री चिलखतांचें शिरस्त्राण, शिरश्रर्म –राज्य ५१७

**सर्वा**–पु (व) सरवा पहा अखेरचा वेचा, मुख्य पीक, फळफळावळ वगैरे काढून घेतल्यावर शेतात किंवा झाडावर जो अवशेष राहतो तो –गाग १०० [सर्ण=सपर्ण]

**सर्षप**–पु १ सरसु शिरस, एक प्रकारची मोहरी, राई 'पविपदभजनें सर्षप मानी भवदु खाभिघ शैला।' –मोभवसिंप आख्यान (नवनीत पृ ३७४) २ वजन करण्याचें सूक्ष्म प्रमाण, मोहरीइतकें वजन

**सऱ्हास**–क्रिवि सरास, सरिरास पहा सर्वत्र 'सऱ्हास जनतेनें शुद्ध पचाग चालू करावें' –के १८ ८ ३६

**सल**–नपु १ शल्य, शस्त्रादिकाचें टोंक, काटा, मासात रुतलेला अणकुचीदार पदार्थ, कुस 'सल सिलका आणि सराटें।' –दा ३ ७ ४ २ पोटात न वाढता राहिलेला गर्भ, गर्भाशयात राहिलेला मृत गर्भ 'सल आडवें गर्भपात।' –दा ३ ६ ४७ ३ (ल) मनात खुपत असलेलें अपमान वगैरेचें दुःख, दुःखकारक स्मृति, त्रासदायक गोष्ट; पीडाकारक निमित्त 'सलें गेलीं चित्तीं भय दशमुखाच्याहि घपलें।' –मोरामायणें १ ४१० ४ वठलेलें झाड शाखा 'विसर विजती सलें। सलतीं तियें।' –ज्ञा १६ १४६ ५ वीं पेरलें असता उगवलेला कोंवळा अंकुर हा विषारी असतो व जनावरानें खाल्ला असता त्यास रोग होतो किरळ पहा 'सल खाऊन गुरें मेलीं' ६ साल, त्वचा 'कलियुगात कोरडीं। चहुयुगाचीं सलें साडी।' –ज्ञा १५ १२९ ७ –स्त्री (कों) उसण, सलक [स शल्य प्रा साल] **सल चढणें**–विषाद वाटणें **सलीं लागणें**– पोटात सल वाढल्यामुळें झिजून आजारी पडणें **सलणें**–अक्रि १ बोचणें, टोंचणें, खुपणें 'मार्गी वेढाची लुनी जिनी। जेणें जाली ते चित्तीं। सलेना जवा।' –ज्ञा १३ ७३१ २ (ल) न खपणें, सहन न होणें, डोळ्यात खुपणें मनाला टोंचून लागून राहणें, रुखरुख लागणें (केलेल्या चुकीची, दोषाची) 'आचरणें खोटीं। अपराधाची वेळीं सलताहे पोटीं।' –तुगा १८८५

**सल**—पु कमरपट्टा, तरवारीच्या म्यानाची दोरी, कात इयाचा दोरा, वादी –बदलापूर १८७ [फा हिं सल्ल]

**सलक**—स्त्री उसण, शिलका, शिनक, कळ

**सलक-का**—स्त्री १ सरबत्ती, फैर; शिलग (तोफा, बंदुका वगैरेची) ' जवळ येताच तोफाची व गाडदी याची सलक केली ' –ख ७ ३४८० २ पावसाची जोराची सर [अर शल्क]

**सलकडें**—न १ सल अथवा उसण उतरावी म्हणून धातुचें केलेलें मंतरलेलें कडें २ पुरुषाच्या हातात घालावयाचें सोन्याचें कडें [सल+कडें]

**सलकी**—स्त्री (का) खोरें; फावडें

**सलग-गी**—स्त्री १ दाट मैत्री, संगति, विशेष परिचय २ एकसारखी रांग, ओळ ' घराची सलग लागत गेली ' [स सल्म]

**सलग, सलंग**—वि एकसंधि, विनजोड, विनसांध्याचा, अखंड ' सुंदरपणाचा सलग बाण असावा लागतो ' –भाव २३

**सलगम**—न तांबडा मुळा, मुळ्याच्या आकाराचें तांबड्या रंगाचें एक भाजीचें मूळ

**सलगी**—स्त्री सलग पहा १ मैत्री, दाट परिचय ' मग अर्जुन म्हणे सलगी। देवा इयें सतन्हिं हन आर्गी। ' –ज्ञा ६ १३९ २ लडिवाळपणा ' पायाशीं देवा सलगी केली। ' –तुगा २६८ **सलगीचा**-दाट मैत्री असलेला, विशेष परिचित, घरोब्याचा

**सलग्न सल्लग्न सलग्न**—वि लागलेलें, अखंड, चिकटलेलें ' अति सलग्न अवस्था तुर्या। ' –दा १ ३ ८ [स सम्+लग्न]

**सलछ**—वि लांछनास्पद, लज्जास्पद, लाजिरवाणें ' जरी आवडी आथी साच। तरी जीवितहि सलछ। ' –ज्ञा १८ ६४२ [स स+लांछना]

**सलज्ज**—वि लज्जायुक्त, लज्जाशील, विनयशील, नम्र, लाजरा [स स+लज्ज्=लाजणें]

**सलतन सलतनत सलतान, सल्तना**—स्त्रीस्त्रीनपु १ चतुरंग सैन्य सर्व साधनासह सैन्य ' बुणगे व सल्तनत दोन कोशावर उतरले ' –ख ९ ४७९५ ' महाडिक सर्व सल्तनत घेऊन येऊन महाराजाचें दर्शन घेऊन ' –थोरलेराजाराम चरित्र ४० २ राज्य राजसत्ता, पातशाही, सुलतानी ' सारी सल्तनत मराठियाच्या घरात घातली ' –पेद २१ ९६ ३ पसारा, सामान सुमान, रगाडा, बुणगें ' बुणग्याचें सल्तान भारी आटोपून राहावयाची बरचेवर ताकद करितो ' –पेद १ ४० [अर सल्तनत, सल्तान] **सल्त(ता)नगार**-पु घामडें कमविणारी जात, चर्मकार ' जीनगर सल्तानगर चर्मक। होहर भाट बुरड रजक। ' –स्वादि ६ ५ ३८

**सलद**—पुन संदूक, पेटी, तिजोरी, शवपेटिका ' फोडलीं सलदें मोडलीं कुलुपें आत तुरे मोत्याचे रुपये पोशाग सोन ] ' –ऐपो ३३८

**सलद सलदें सळदें**—न (को) ताटी, शिर्गे वगैरेची ताटी, काटक्याचें झडप (कुंपणाकरिता, फाटकाकरिता केलेले)

**सलबतखाना**—पु सरनतखाना पहा

**सलम**—वि १ पूर्ण, सगळें, अखंड, विनजोड, निर्दोष २ ढिला, सैल, शिथिल [अर सल्म]

**सलमा**—पु १ मखमल, उंची कापड २ मऊ जरतार ' मखमली सलम्याचें काम केलेला जोडाचा जोड ' –ऐरापुप्र १२ ६४८ [अर सलीमी]

**सलवडी**—स्त्री एक खेळ

**सलह, सला, सल्ला ह्**—पुस्त्री १ समेट, संधि, तह एकोपा ' आजवर चालत आला सला। ' –रला ३ २ उपदेश, मसलत, विचार, हितवाद ' पुरंदरास तीन हजारानिशीं रवाना करणें सला नाहीं ' –रा १० ७६ ' हे सलाह, उत्तम लिहिली ' –वाडदुवा ५०८२ –क्रिवि बरें तर, तस होऊ द्या, ठीक ' सला, तुमचें का होईना ' [अर सल्ह्] ०अंदीस-पु उत्तम विचार करणारा ०ऐन-स्त्री योग्य व इष्ट गोष्ट, ऐनसलाह् ' नवाब साहेब खेमेदाखल जाले ह सलाह ऐन पडली ' –रा १९ १०४ ०कार-गार-पु सल्लागार; मसलत देणारा, दिलाची गोष्ट सांगणारा –जोरा २९ ०तदबीर-स्त्री सलामसलत ' जें होणें तें तर्फेनच्या इतल्यानें व सलाहतद्बिरीनें व्हावें ' –रा १० १६७ ०दौलत-वि राज्यास इष्ट, दौलतीस हितावह ' दोघेहि फंदी व मकरी त्याची उपेक्षा करणें सलाह दौलत नाहीं ' –रा १९ १००. ०नेक-वि हितावह, इष्ट, उपयुक्त योग्य ' सलाहनेक असेल त्याची आपण आज्ञा करावी ' –रा ५ २०५ ०मामला-पु सलामसलत, तहाची वाटाघाट ' लढाई करावी, सलूयामामल्याची गोष्ट करावयाची नाहीं ' –ख ४४१२ ०वक्त-वि समयोचित, प्रसंगास योग्य ' आता रहावें हें सलाहवक्त नाहीं ' –खरे ८ ४३५१ ०सैल-पु फेरफटका, प्रवास वगैरे, मुशाफरी; स्वारी ' तो दूर देश बगाऊ मुलुख तलग गेले सलासैल आलो करून। ' –पला ४ १८ [सला+सहल]

**सला, सल्ला**—पु बोटातील वेढें वळें, आंगठी

**सला**—वि (सांकेतिक भाजीबाजार) दहा

**सलाट**—वि भरपूर, लयदार, समृद्ध ' नारगी सलाट लागल्या। डाळिंबी सुफल चांगल्या। ' –प्रला १५४

**सलातीन**—पुअव राजपुत्र ' पातशाही सलातीन आहेत त्यास उपोषणें पडतात ' –रा १० २७४ [अर सुल्तानचें अनेक वचन]

संलाप—पु भाषण, संभाषण, संवाद [ सं ]

सलावत—स्त्री १ छाप, वचक, दरारा, धाक, धास्ती, मजबुती, जरब, 'दत्ताजी शिंदे याची दुराणीस सलावत होती' –भाव ६२ २ वर्चस्व, प्राबल्य, उत्कर्ष, दैवानुकूल्य –वि. मजबूत, सुरक्षित 'तो दुर्ग असाध्य सलावत'–भाव ३ [ अर सलावत् ] ०कुचा–पु एक प्रकारचा चर, खदक 'सलावत कुचे खणावयास वेलदार लाविले आहेत'–पेद १० ४३ ०पणा–पु १ हुकमत, वर्चस्व, छाप पाडण्याचा गुण २ उत्कर्ष; भरभराट, यशस्विता, सुदैवीपणा

सलाम—पु मुसलमान लोकात नमस्कार, रामराम या अर्थी अभिवादनार्थ योजतात तो शब्द 'सलाम् अलय् कुम्'=तुम्हास शांति असो [ अर सलाम् ] ०वादज सलाम–उक्त अनेक नमस्कार, वन्दनापासून वदन सलामत–क्रिवि शांततेनें, सुखरूपपणें सुरक्षितपणें –स्त्री सुरक्षितपणा, 'श्रीमंत साहबास सलामत असावी म्हणजे बाकी फिकीर करीत नाहीं'–खर ६ ३१७७ म्ह० १ शीर सलामत तो पगडी पचास २ कीरमोर खाई तारू सलामत जाइ ०बेसलामत–वि क्रिवि विशेष सुरक्षित, सुखरूप 'ईश्वर त्यास सलामत वसलामत राखो' –रा १२ ३४

सलामाल्की–स्त्री १ औपचारिक परिचय, नमस्कार चमत्कारादतकी ओळख, साधारण ओळख, सुमाराचा सख्यभाव २ नमस्कार चमत्कार, कुशल प्रश्न, रामरामी सलामी–स्त्री १ नमस्कार चमत्कार, रामरामी, परस्पर कुशल प्रश्न २ साधारण ओळख, नमस्कारापुरती ओळख ३ नाममात्र कर, सलाम करण्यापुरता कर, धारा, वसूल, मुजरा घेण्याइतका कर ४ प्रथम सामना ५ भेटीच्या वेळचा बहुमान, 'गायकवाड सरकारास एक्वीस तोफांची सलामी आहे' ६ कुस्ती खेळताना, दाडपट्टा वगैरे खेळताना प्रथम मंगलार्थ करावयाचा हात –वि खाली तोंड कलेली (तोफ); (यावरून) वाकलेली, कललेली (भिंत वगैरे) सलामीचा हात–सलामी अर्थ ६ पहा

सलाघनी—स्त्री (व) पुटकुळी, ल्हान फोड [ सलूं ]

सलास—वि तीन [ अर ]

सलासीन, सल्लासीन सल्लासेन—वि तीस [ अर ]

सलिता-दा—पु उंटावरची गोणी, उंटाचें ओझ्याचें खोगीर; उंटावरील ओझ्याची पिशवी, भारवेष्टन 'उंटाचे सलित शिवावयाबद्दल सुतळी'–भाडबाबा ३ १६ 'दोर सलित सहित उतारा त्या उंटाच्या करारल्या।'–होला १५२ [ हि शलिता ]

सलिल—न पाणी; जल उदक 'सलिलीं पय जैसें। एक होऊनि मीनलें असे।'–ज्ञा २ १२७ [ सं ] ०राशी–पु समुद्र

सलीद—वि (व) पातळ, सदैल 'सलीदसें पीठ भिजव' [ सं शिथिल ]

सलीपा—पु (नाविक होडकरी) गलबतातील पाणी (घमत) बाहेर उपसून टाकण्यासाठीं केलेली पेटीसारखी जागा

सलील—वि खेळकर, गमती, चेष्टेखोर [ सं स+लीला ]

सलील—वि सोपें, सुलभ [ अर ]

सलींव— वि सैलसर, ढिलें, शिथिल

सलीस—वि हलका, वेताचा, सहज सोसण्यासारखा, झेपण्यासारखा, पेलण्यासारखा २ सोपा, सुलभ [ अर सलीस ]

सलूक-ख, सलोक-ख, सलुका-खा, सलोका-खा –पु. १ सभेट, मैत्री, सख्य, सरळ भाव २ तह, शांतता, युद्ध तहकुबी 'मोंगलाचा तूर्तच सलुका जाला'–भाडबाबा ३ ६५ 'नजीबखान रोहिल्याचें हातें सलुका करून'–रा ६ ३३० [ अर सुलुक् ] सलुकी-खी–वि शांतताप्रिय 'नारो आपाजी शहाणे माणूस सलुखी, म्हणून त्यांणीं हें कार्य केलें'–ख १ ४५१

सलून—पुन १ आगगाडीचा मोठा डबा 'दुसरा सलून पाठविला महाराजा कारण।–गापो २६ २ हजामतीचें दुकान [ इ सलून ]

सलेप—वि सदोष, मलिन, विकृत, बिघडलेला 'आमुचि याचि दिठी सलेपा। जे सामान्यत्वें देखती।'–ज्ञा ११ २९१ [ सं स+लेप ]

सलो—पु द्वेष, छळ [ सं छल ]

सलोकता—स्त्री चतुर्विध मुक्तींतील एक मुक्ति, देवलोकीं वास्तव्य 'लोकीं रहावें ते सलोकता'।–दा ४ १० २४ [ सं ]

सलोखा-गा–पु सलूक पहा

सल्ल—न सल पहा 'तें जीवित सल्ल मीं मानी। पळपत विरहाग्नी।'–ऋ ६५ [ सं. शल्य ]

सल्लग्न—धावि सलग्न पहा

सल्ला—पुस्त्री सला पहा १ सभेट, तह, युद्धतहकुबी 'सल्ला ममता राजयाशीं करून'–चित्र ७९ २ उपदेश, हितवाद; मसलत 'सल्ला ऐकना झाला विघोड।–ऐपो १२६ –क्रिवि बरें तर [ अर सल्ह् ] ०गार–वि हितवाद सांगणारा, मंत्री, सचिव ०गारमंडळ–न सल्ला देणारी मंडळी ०मसलत–स्त्री विचारविनिमय, सल्लत, हितवाद उपदेश (क्रि० देणें सांगणें शिकवणें)

सल्लास—वि तीन [ अर सलास् ] सल्लासीन-सल्लासेन–वि तीस अरबी वर्षगणनेंत योजतात

सव—पु क्रतु यज्ञ, याग [ सं ] सवाग–वि यज्ञांगभूत; यज्ञाच उपयोगी 'शुद्ध सवाग कुशानळ, परि उपभोगोचितत्व नलहासी।'–मोवन ४ ७५

सव—स्त्री (अर) चव, रुचि, स्वाद चव पहा

सय—स्त्री. उत्तरदिशा. [सं. सव्य=डावा] सयचा सयेचा-वि. उत्तरेकडील; उत्तरदिशेचा.

सयई, संयई, सयंय—स्त्री. १ अभ्यास; परिपाठ; राबता २ आसक्ति; चट; लालसा. ३ सवारी; लायकी; नैपुण्य; प्रावीण्य. (क्रि० पडणें; लागणें; पाडणें; लावणें). [सं. समय; सव्य; सु= आनंद होणें]

सयकणें, संयकणें, सयकावणें—अक्रि. गोडी लागणें; चट लागणें; संवय होणें; आसक्ति उत्पन्न होणें; अभ्यास होणें; राबता पडणें.

सयका—वि. (व.) संपूर्ण; पुरा. 'सवका रुपया झाला.' [सं. सर्व ! ]

सयखण—वि. (व.) सबंध; संपूर्ण. 'सवखण पोथी वाढ.' 'सवखण जागा सांपडली.'

सयंग—वि. स्वस्त; अल्पमोली; थोड्या किंमतीचें. 'सवंग झालें सवंग झालें। धरा आलें वंदरीचें।' —तुगा ३६४६. 'तयाचें वाक्य सवंग। केलें मज ब्यानें।' —ज्ञा १८.१६१०. [सं.समर्घ] म्ह० सवंग सवदा हागवण लावी. सयंगणें-अक्रि. स्वस्त होणें. सयंगाई-स्त्री. स्वस्ताई. 'तांदूळ कमोदी तीस बत्तीस शेर याप्रमाणें सवंगाई त्यांजकडे होती.' —भाव ५६.

सयंगडी-डा संवगडी—पु. सेंवगडी; सोबती; सहचर; सांगाती. 'तो मदनाचा जाण सवंगडा.' —कथा १.३.६७. 'लाविलें पिसें संवगडिया।' —तुगा २६२. [सर्व+गडी]

संयगण-णी, संवगणणी-णी—स्त्री. पिकाची कापणी, काढणी; लाणी. सोंगणी पहा. 'न घेरितां होती जे की संवगणिया जाती।' —अमृ ६.५८ 'एक्लें तम करी। संवगणी।' —ज्ञा १३.३८. संयगणें, सयंगणें-उक्रि. पिकाची कापणी करणें, शेतांतून पीक काढून आणून साठवणें. [सं. सम्+ग्रह्]

सयघड—वि. सोपें, सहज होण्यासारखें, सुलभ; सुसाध्य; अवघड नव्हे तें. [सं सु+घट्]

सयच, सयंच—क्रिवि सवेंच; तावडतोब; लागलीच.

संयचोर—वि दिसावयास साव परंतु चोर; सभ्य दिसणारा चोर; सावचोर 'परी तो संवचोराचा सागातु। जैसा नावेक स्वस्थु।' —ज्ञा ३ २११. 'संवचोर लागले आणेंसीं। इंद्रियें पै।' —माए ५०६. [सर्व+चोर, साव+चोर]

संयछरे—(अप.) संवत्सरे. संवत्सर पहा.

सयड, संयड—स्त्री १ फुरसत, मोकळा वेळ; मोकळीक. 'मला येण्यास कामातून सवड झाली तर येईन.' २ अवकाश; मोकळी जागा; रिक्त स्थान. 'चक्रधारेचिया सवडी। माजी चंचरला तातडी।' —मुआदि ६ ८०. 'एक मनुष्य बसावयास देखील सवड नाहीं.' ३ जागा, स्थल; छिद्र; संधि; फट. 'धन्याची आज्ञा ऐकण्यास येईन अशी नाहीं म्हणावयास सवड देव.' ४ (बाळबोध) जागा; प्रदेश; क्षेत्र; बाजू 'निज वृत्ति काढी। सर्व माया तोडी। इंद्रियां सवडी। लपूं नको।' ५ (-स्त्री. सांकेतिक) सल. [सं. सु+वेला] सयड, सयडे, सयडया-शभ. (राजा.) समोर; पुढें; समक्ष.-क्रिवि. १ सवड; तोंडासमोर, समक्ष; अपरोक्ष. २ (व.) तावडतोब; लागलीच; तेव्हांच. सयडणें, सयणणें-उक्रि. १ उरकणें; कबन टाकणें; आटोपणें (कामधाम), असविणें. २ येणें; पडणें. 'आंतुची परी बाहेर सवडे।' —अमृ ७.११६. सयडी-स्त्री. शेवट; अंत. 'म्हणोनि तृप्तीची सवडी। बोलतां न पडे।' —ज्ञा १०.६०.

संयणी—न. (गो.) पांसळं. 'संवणेआं पाराळ्यांचा स्वर। पुरवला कर्णी।' —सिपु १.१७.४०. [स्वन!] सयणीं पडप-(गो.) पांसरांची किलबिल होणें.

सयणें—उक्रि. (कु.) सवाणणें पहा. देणें; पडणें. 'शि या सवणें.' —शिव्या देणें. [सं. सु; स्रु]

सयत-ती—स्त्री. १ सपत्नी; एकाच नवऱ्याची दुसरी बायको. २ (ल.) प्रतिस्पर्धी. 'वेदांतें म्हणे मज हे। सवती जाली।' —ज्ञा १६ २२५. [सं.सपत्नी; प्रा. सवत्ती; हिं. सौती] ०मत्सर, सयतीमत्सर-पु. १ एकाच नवऱ्याच्या दोन बायका असतां त्यास परस्परांबद्दल वाटणारा हेवा, द्वेष. 'म्हणे रावणपत्न्यांनीं मारली। सवती मत्सर करोनियां।' २ (सामान्यत-) स्पर्धा; हेवा; मत्सर (दोन अनुयायी, सेवक, भृत्य वगैरेमधील). सयतयळा-पु. सवतीसवती; एका नवऱ्याच्या अनेक बायका समुच्चयानें. सयतळा-सयताळा-पु. १ एकाच स्त्रीशीं लग्न करूं इच्छिणारे दोन अथवा अधिक गृहस्थ परस्पर. २ जार; यार; प्रियकर. (गो.) सवतो. सयतीचें भांडण-न एक मुलींचा खेळ. —मखेपु २९२.

सयतयणी माघयणी—न. पावसाची लहानशी सर, पाव साचा शितोडा; सुरसुर. [सटवणी+माघवणी].

सयता—वि. वेगळा; निराळा, अलग; तुटक, स्वतंत्र 'तेंनी धरला सवता घोर।' —ऐपो ३५२. 'मी एकाकी लहान परि सवतें।' —मोविराट ३.७. 'करावें आपणा सवतें।' —रास ४.६. 'तें भातांचि अवघें। सवतें केलें।' —ज्ञा १३.५८२. [सं स्वत.]

सयतां—क्रिवि. स्वतः, खुद्द; आपणच. [सं. स्वत]

संयतुकी—वि. सारख्या वजनाचें; समतोल. 'संवतुकी काटाळें। माझें जालें।' —ज्ञा १४.५१. [सम+तुक]

संयत्—पु १ वर्ष, साल; अब्द. २ विक्रमादित्य राजानें स्थापन केलेला शक. हा नर्मदेच्या उत्तरेस चालतो. [सं.]

संयत्सर—पु साठ वर्षांच्या कालचक्रातील वर्षास संज्ञा. या साठ वर्षांचीं नावें.-प्रभव, विभव, शुक्ल, प्रमोद, प्रजापति, अंगिरा,

श्रीमुख, भाव, युवा, धाता, ईश्वर, बहुधान्य, प्रमाथी, विक्रम, वृष, चित्रभानु, सुभानु, तारण, पार्थिव, अव्यय, सर्वजित्, सर्व धारी, विरोधी, विकृति खर, नदन, विजय, जय, मन्मथ, दुर्मुख, हेमलंबी, विलंबी, विकारी, शार्वरी, प्लव, शुभकृत्, शोभन, क्रोधी, विश्वावसु, पराभव, प्लवग, कीलक, सौम्य, साधारण, विरोधकृत्, परिध वी, प्रमादी, आनद, राक्षस, नल, पिंगल, कालयुक्त, सिद्धार्थी, रौद्र, दुर्मति, दुदुभि, रुधिरोद्गारी, रक्ताक्षी, क्रोधन, क्षय २ वर्ष, साल, अब्द विक्रमाचा शक [स] ०प्रतिपदा–स्त्री वर्षप्रतिपदा, चैत्र शुद्ध प्रतिपदा, वर्षारंभाचा दिवस, पाडवा ०वृद्धि–स्त्री वर्षवृद्धि पहा

**सवथळ**—न (राजा) सपाट जागा, समपातळींतील जागा [स सम+स्थल]

**संवदड, सौंदड**—स्त्री शमीवृक्ष 'सवदड आपटा रान चारा। हा तो दम्याचा तुरा।' –तुगा ४३७७

**संवदण, सौंदण, संवदणी, सौंदणी**—स्त्री परटाचें कपडे धुण्याचे भांडें 'मळ खाय सवदणी। करी माणिकाची उजळणी।' तुगा २४०१ 'मोरी सवदणी तेही आप।' –दा १३ १० १५ 'तरी सवदणी न मानावी। मलिन जैसी।' –ज्ञा १८ १४१ [स शोधनी ?]

**सवदर, सौंदर**—पु सोंडदोर, मोटच्या सोंडेला बांधावयाचा दोर. [सोंड+दोर]

**सवदर**—वि सुदर, देखणा [स सुदर]

**संवदरफळ**—न (राजा) समुद्रफळ

**सवदा, सवदागर, सवदागरी, सवदागिरी सवदागीर, सवदासूत**—पु सौदा सौदागर वगैरे पहा 'सवदा सुत घेऊ नेणें।' –दा १९ २ ६ 'मळवाया तो कपाळ का सवद।' –मोमभा २ ६३ [फा]

**सवंदा**—पु शेतीचें एकत्र काम 'ढोल व याळा वाजवून गवत काढण्याचें काम चालतें यास सवदा म्हणतात' –खेया [स सम+धा]

**सवंधा**—पु सकेत

**संवधुर**—स्त्री समतोल, समानता 'सवधुर बिघडली परब्रह्माची।' –भाए ९० [स सम+धुर्]

**सवन**—पु सूर्य –नवी स्वर, ध्वनीची तीव्रता, आवाजाची उच्चता, तारत्व याचे तीन प्रकार असतात उच्च, मध्य व नीच; किंवा तृतीय, मध्य व प्रात, किंवा प्रथम, द्वितीय व तृतीय [स]

**सवन**—न स्खलन, सवणें 'वारवार करी मैथुन। विलवें प वर्ती सवन।' –रास १ १२३०. [स स्नु-स्रुद्]

**संवफळ-फळी-फळें**—पुढील स्पर्धा, टक्कर; धडक, उडी 'दतवक्रू सवफळेयासी आला। तो हिरवाची धरिला।' –शिशु ९८३ 'किंवा सरिसेपणें सूर्य मडळीं। खद्योत घेऊ पाहे सवफळी।' –स्वादि ६ १ २१ [स सम+फल]

**सवय**—स्त्री (खा) गाडीची दिवल

**सवय, संवय**—स्त्री सवई पहा स्वाभाविक वृत्ति, सराव, राबता; चाल [स समय] **सवया**–क्रिवि (महानु) सव यीनें, सहज 'तव तुज सवया थोर आला भ्रिमाद।' –गस्तो ३३

**सवया**—स्त्री समता, बरोबरी, तुलना 'उपमा देता सवया हीणा।' –उपा ७ 'सवया दीसे कारीसवार्णे।' –उपा ६८ [स समता]

**सवरणें, संवरणें**—उक्रि या धातूची यावत्धातुमात्राच्या रूपापुढें तत्सदृशरूपें होऊन उपशब्दासारखीं लागतात यामुळें त्या क्रियापदाचा अर्थ अधिक स्पष्ट किंवा पूर्ण होतो अथवा अधिक जोरदार होतो याचा स्वतत्र अर्थ होत नाहीं 'मी देऊन सवरून वीहो चोर झालों!', 'झालें सवरलें आता त्याची गोष्ट कशास?' 'मारूनसवरून' 'खाऊनसवरून' इ० [स सम्+वृ स्वरयति-सवरतो –भाअ १८३५]

**सवरणें, संवरणें**—उक्रि सांवरणें, आटोपणें, आवरणें, आटोक्यात आणणें 'सभ्रमें ज्वाला हृदयस्फोट। न सवरे करुणाजळाचा लोट।' –कृ २८ 'गहिवरूव न सवरेचि मज।' –उपा ८३ 'मृणाळसुताचिये वागुरे। प्रळयानिळु का सवरे।' –भाए २१६ [स सम्+वृ]

**सवरणें**—सक्रि शृगारणें 'सवरित बान्छाई सरदार।' –ऐपो १८. [स सम्+वृ, हिं सवारना]

**सवरा**—वि स्वैर, स्वतत्र, उनाड, आटोक्याबाहेरचा 'सदा चौघाचे ववनें रिझलें म्हणून जीव झाला सवरा।' –पला १३ [स स्वैर]

**सवरात-थ, सवराती-थी**—पु वि (अप) स्वार्थ–स्वार्थी (व) सोस; हव्यास 'बायकाना दागिन्यांचा फार सवरात' 'त्याला फार सवरात सुटला?' –मसाप १ २ १० [स स्वार्थ]

**सवरी**—वि स्वैरिणी, उडगी, सौरी, नि सग, उनाड निसग झालें सवरीव्यवरी अक्षदा वळवडी।' –पला १३ 'राडभाड ही सवरी झाली।' –पला ८३ [स स्वैरिणी]

**संवरीत**—भावि आच्छादिलेला; वेढिलेला [स सवृत]

**सवर्ण**—वि एकरंगी, समरंगी, एकाच रंगाचे, वर्णाचे, जातीचे, वर्गाचे, सजातीय [स स+वर्ण]

**सवर्णन**—न (गणित) निरनिराळया जातीच्या पदास एका रूपात आणणें; चढती किंवा उतरती भाजणी [ स ] **सवर्णित**-वि एकरूप दिलेला

**संवर्त-क**—पु १ मेघ, ढग २ प्रलयमेघ, जगाच्या अंताच्या वळीं भयकर वृष्टि करणारा ढग, जलप्रलय, महापूर 'पाचारुनी सवर्तका।' –निगा ४८ [ स ] **सवर्ताग्नि**-पु प्रलयकालचा अग्नि सवर्ताग्नि जटामाळा।' –गुच २९ १४२

**संवर्धक**—वि वाढणारें, उत्कर्ष पावणारें, वाढविणारें, उत्कर्षास नणारें, पोषक, वृद्धिकारक [ स सम्+वृध् ] **सवर्धन**–न वाढ, सुधारणा, उत्कर्ष भरभराट, पोषण **संवर्धित**-धावि वाढलेलें, भरभराटलेलें, पोषण कलेलें

**सवर्म**—वि मर्मयुक्त 'सवर्म हृदय कल्हारीं। तेय कारुण्य वेळेच्या भरीं।' –ज्ञा २ ७१ [ स ]

**सवलत**—स्त्री सोहल्त, सौल्त पहा सूट, सवड, मेळ, मान्यता

**संवशय**—पु सशय पहा 'नाहीं तर राजियासीं काहीं सवशये धरीत नाहीं ' –पेद १० ७३

**सवशान**—न स्मशान पहा [ स. शवशयन ]

**संवसरिसी**—स्त्री बरोबर चालणारी, सहचरी 'सव सरिसी दिवो राती। दोनी जैसी।' –ज्ञा १३ ९५९ [ स सम्+ सृ-सर् ]

**सवसा**—पु १ साढू, बायकोच्या बहिणीचा नवरा –मसाप २ ३ ४८ २ मेहुणा, नवऱ्यामुलाच्या बहिणीचा नवरा –मसाप २ ३ ४९ [ स स्वसा=बहीण ]

**सवसाज**—स्त्री सायकाळ, सध्याकाळ [ समय+साज ] **सवसाजचा**-क्रिवि सायकाळचा

**संवसाटी**—स्त्री बरोबरी, साम्य, तुल्यता, अदलाबदल 'शुद्धसत्व कैंचा गाठी। जेणें सवसाटी तुम्हासी।' –निगा २११ 'अर्धोन्मीलित निजदृष्टि। होत लयोद्भवाची सवसाटी।' –स्वादि १ ३ २० –क्रिवि बदलीं, ऐवजीं 'पागोट्या सवसाटी। दिली रगटयाची गांठी।' –तुगा १३५१ 'त्यासी आपुलिये सव साटी। विकत घेईन उठाउठी।' –एभा ८ २४९ [ स सम+ सत्व ? ]

**सवसाया**—स्त्री (महानु) प्रतिचिन्ह 'तयाची सव साया। साधैन तुज।' –भाए २०१ [ स शव+च्छाया ]

**सवसार**—पु ससार पहा 'रूपें लावण्यें तिया। जितला संवसारु।' –धवळे २ २

**संवसारणें**—अक्रि सरसावणें पुढें सरणें 'बाणासुरु सव सारला।' –उषा १६२३ [ स सम्+सृ ]

**संवसारें**—क्रिवि बरोबर, समागमें [ स सम्+सृ ]

**संवस्थान, सवस्थापन**—सस्थान, सस्थापन पहा

**सवळ**—स्त्री प्रात काल; प्रभात पहाट 'तो सूर्यें उदयो देखोनि सवळे। पापिया पुटती डोळे। हुडुळाचे।' –ज्ञा १६ २३९ [ स सु+वेला ] –क्रिवि तात्काल, तावडतोब 'तव जाला हाहाकार। देव मिळाले सवळ ' –ब ४६५

**सवळ, सौळ**—वि. (बे) १ पाणचट, बेचव 'कष सौळ आहे ' २ खारें, मचूळ 'पाणी सौळ आहे ' [ स शबल ? ]

**सवळ**—पु फासा 'म्हणे माझीं लुगडीं हिरवलीं। आप णेआ माझी वांटिली। आणि सवळ घालोनिया नेली। आणी माजी।' –सिपु २ ४९ ५१

**सवळा, सवळें**-पुन (गो ) सोवळा-ळें पहा सवळ्यात उदिर मरप ' भ्रष्ट सोवळें असणें

**सवा**—वि पावपटीनें अधिक, चतुर्थांशानें अधिक; एक पूर्णांक एक चतुर्थांश उदा० सवाचार=म्हणजे चारपूर्णांक एकचतु र्थांश, सवाशें=एकशेंपचवीस; सवालाख=एकलक्ष पचवीस हजार [ स सपाद ] **सवाई**-स्त्री १ सवापट, एकचतुर्थांशानें अधिक २ एक वृत्त, छद याचे अनेक प्रकार आहेत उदा० एक गजा वरि एक हयावरि एक रथावरि बैसुनि आले। –वि सवापट, चतु र्थांशानें अधिक 'कोंकणचे मापापेक्षा देशचें माप सवाई आहे ' 'सवाई माधवराव ' **सवाईची मिती**-स्त्री दरमहा दरशेंकडा सवारुपयाप्रमाणें व्याजाचा करार 'सवाईच्या मितीनें कर्जे काढून देतात '–व्यनि ४० **सवाईजमा** स्त्री अवांतर जमा, शेतकरी व इतर गावकरी यावरील एक साल्पट्टी अथवा जास्त पट्टी –गांगा ५६ **सवाईसूट-वजा-बाद**-स्त्री साऱ्याच्या पचमांशाची सूट **सवाकी**-स्त्री सवाचे पाढे एक उजळणीचा प्रकार, एकसवा सवा, दोसवा अडीच याप्रमाणें **सवाहाती**-स्त्री (खाटिक) मेंढीचें आतडें, (दें सवा हात लाब असतें यावरून )

**सवा**—स्त्री १ बाजू कड, 'उभी ठाके जयासवा। तिकडे मुखें दावी देवा।' –मु आदि 'नाना पर्ने वृक्षविस्तार। दिसे दाही सवा।' –दा ६ ८ २० 'तेय बैसला होता जियासवा। तियाचिकडे मस्तक खालविला देवा '–ज्ञा ११ २५४ २ प्रकार, पद्धति परी, तऱ्हा 'यदू पुसिले ऐसिया सवा ' –भाए २६४ 'मोडोनि मागाराचा रवा। लेणें घडिलें आपलिया सवा, –ज्ञा ११ ६४४ –क्रिवि बरोबर 'स्वयें दर्शनाचिया सवां। अवधियाची जाती सवा।' –अमृ ७ २५५ 'सामाळून ध्यावें देवा। आपणा सवा यावरि।' –तुगा १२१०

**सवाई**—स्त्री सवई, सवय पहा

**सवाईगवत**—न एक प्रकारचें गवत यापासून कागद तयार करतात –केसरी ११ ९ ३६

**सवाईची दोरी**—स्त्री तवूच्या मधील खांबाच्या माथ्यास बांधून दोन अथवा चार दिशांस मेखांना ताणून बांधलेली दोरी
**सवागी**—स्त्री एक क्षार, सुहागी, टाकणखार
**सवागी**—पु कलंदरांचा गुरु (सौभाग्य देणारा) एक फकीर 'सवागी फकीर आपले हातात हिरव्या बांगड्या घालून ' –गाथा २०८ [स सौभाग्य]
**सवाड**—वि (व) पातळ, विरळ
**सवाण**—न (माण) झरोके [साणें]
**सवाण**—वि (ना) सपाट, समपातळींतील [स समान]
**सवाणणें**—उक्रि (राजा) चेंदणें, ठासणें, ठोकणें, खाबाचें नेम, बंदूक यांत माती, दारू वगैरे ठासणें
**सवाणा**—पु (सोनार) एक प्रकारचा चिमटा, बारीक चिमटा
**सवाद**—पु चव, रुचि, स्वाद पहा 'लटिक्याची वाणी चवी ना सवाद।'–तुगा ३०७८ [स स्वाद]
**सवाद**—स्त्री शिवार, काळी गावांभोंवतालची शेतकी जमीन 'दर सवाद कसबे मजकूर'–रा १५ १३१ [अर सवाद्]
**संवाद**—पु १ प्रश्नोत्तररूप समाषण, चर्चा, समाषण, परस्पर भाषण २ मेळ, जुळणी, अनुरूपता [स सम्+वद्]
**सवादणें**—उक्रि १ सांगणें, विवेचन करणें, समाषण करणें 'जो सवादला श्रीरंगु। अर्जुनेसी।–ज्ञा १ ५० 'तिहीं आऊनि सिंहा पासि सवादिलें।'–पच ४२ २ समाषण करणें, परस्पर बोलणें
**संवादी**–वि १ वादविवादकुशल, समाषणनिपुण 'संवाद रहित सवादी। संग रहित निरोपाधी।'–दा २ ८ २३ 'प्रेमळु संवादिया होय।'–ज्ञा १२ १६१ २ जुळता, जुळणारा, अनुरूप
**०स्वर**–पु (संगीत) रागातील महत्त्वानें दुसरा स्वर, वादी स्वराशीं जुळणारा स्वर या दोन स्वरांत आठ किंवा बारा श्रुतींचें अंतर असतें वादीपासून संवादी स्वर चौथा किंवा पांचवा असतो यांच्या जोड्या अशा– आरोहक्रम सा– पम, रे– ध, प, ग– निध, म– सा (तार) अवरोहक्रम सा(तार)– प, म, नि– ग, ध– ग, रे, प– रे, सा, म– सा
**सवान**—वि (व) सपाट, साफ, एका पातळींतील (जमीन) [स समान]
**सवाय**—वि (गो) (ल) स्वस्त म्ह सवाय खाण पोट फुगे [सवाई, सवंग]
**सवाय, सवायकी, सवायी**—सवा सवाकी, सवाई पहा
**सवार**—पु स्वार, अश्वारोही, अश्वारूढ, घोड्यावर बसलेला मनुष्य –वि अश्वावर बसलेला, चढलेला (गाडीत, घोड्यावर वगैरे) [स अश्वारोही, फा सवार]
घाधे ७ २५
**सवारणें**—सक्रि शृंगारणें, शोभिवंत करणें, नीट रचना करणें 'सवारिल्या राजसभा प्रशस्ता।'–सारुह ३ ३२ 'बार भोयांची पालखी सवारिली।–ऐपो १४ [स सम्+वृ–संवरण, सम्+आरच्–समारचयति–समारयति–समारई, सम्+मृज्–समार्जन –भाम १८३४]
**संवार**—पु १ दाटणी, आकर्षण, संकलन २ आकुंचन, (उच्चार करताना ओठांचें, बाह्य प्रयत्न पहा) [स सम्+वृ]
**सवारी**—स्त्री १ स्वारी पहा 'सवाई माधवराव सवारी निघाली नवाबावरती'–ऐपो २४९ २ एक कुस्तीचा डाव
**सवार, सवारी, संवारी**—स्त्री सभा, भरतीची पूर्णावस्था [सं सम्+वृ]
**सवारी**—पु १ गायनाचा एक प्रकार २ एक तालाचा प्रकार यांत पधरा मात्रा व चार विभाग असतात –वि सवारी तालासबधीं
**सवाल**—पु १ प्रश्न, चौकशी, वादपृच्छा २ खड्या सुरांत म्हटलेला उर्दू भाषेंतील दोहरा, श्लोक 'हेल काढून खोल आवाजानें सवाल म्हणतात , –गुजा ३३ [अर सुआल्]
**सवाल**—पु अरबी वर्षाचा दहावा महिना [अर शव्वाल्]
**सवाव**—वि सवा, सव्वा 'सवाव लक्ष नव कोडि वीया' –चक्रधर सिद्धांतसूत्रें १०४ [स सपाद]
**सवाशा-शे**—पु ब्राह्मणांतील एक पोटजात, सहवासी ब्राह्मण
**सवाशीण, सवाष्ट, सवाष्ण, सवाष्णी**—स्त्री सुवासिनी पहा सौभाग्यवती स्त्री 'घराबाहेर पडताच सवाष्ण बायका कडेवर पाण्यानें भरलेली घागर '–नि २२३ [स सुवासिनी]
**सवाशीण ब्राह्मण, सवाष्ण ब्राह्मण**–पु १ सुवासिनी व ब्राह्मण, पति जिवंत असलेली एक ब्राह्मण स्त्री व एक पुरुष (जेवावयास बोलावावयाचें झाल्यास योजतात) गण सवाशीण २ अशा तऱ्हेनें ब्राह्मण व सुवासिनी जेवावयास बोलावण्याचा विधि (क्रि० घालणें, करणें, सांगणें)
**सवास**—पु सहवास पहा 'नागातीर्थ सवासा। मरिपदा झाला।'–माज्ञा १८ ९०९ [सहवास]
**सवासन**—क्रिवि वासनासहित 'तैसीं चोखविलीं सवासन। इंद्रियें विषयीं।'–माज्ञा १८ १०१६ [स+वासना]
**सवासा**—पु १ सपत्नीक, सुवासिनीचा नवरा २ मेहुणा –बदलापूर २६९
**सवासा**—वि १ सरळ, सोईचा, सुरक्षित 'भांडें पालथें पडलें आहे तें सवासें कर' २ अनुकूल, सोईवा 'सवासा फांसा पडला व आपल्या मनाजोगें काम झालें' ३ सव्य, उजवा [स सव्य+सा]

**सवासुंठ**—स्त्री एक औषधी 'सवासुंठ चार टाक' -(बडोदे) प्रसुतिकृत्यादर्श ५

**संवाहन**—न १ वाहून नेणें, आणणें, नेणें, आरोहण 'ना आगें करी सवाहन। कर्म मिद्धीचें।' -ज्ञा १८ ३०६ २ साध्य, साधन 'उजू नोहेचि प्राचीन। नेदेचि प्रज्ञा सवाहन।' -ज्ञा १७ ३८ ३ अंगमर्दन; रगडणें; चेपणें 'सकळतीर्थी अधिष्ठान। करी लक्ष्मी सवाहन।' -तुगा २०८० 'अंगसवाहन, पादसवाहन, हस्तसवाहन इ०' [स सम्+वह्]

**सविकार**—वि परिणाम, प्रकार, विकार यासह 'क्षेत्र तव सविस्तर। सांगितलें सविकार।' -ज्ञा १३ १६१

**सविता**—पु सूर्य, रवि [सं सु=प्रसवणें, सवितृ]

**संविति, संविती-संविति**—स्त्री १ पूर्ण ज्ञान, योग्य समज, जाणीव 'आणि परमार्थसविती।' -विपू १ १८ २ स्नेह; मैत्री, मित्रासबधीं चांगली वृत्ति, ओळख [स सम्+विद्-संवित्ति]

**सविध**—वि सजातीय, सधर्मीय, सवर्ण, एकाच जातीचा, प्रकारचा [स]

**संविधान**—न १ संदर्भ, अनुसधान, धागादोरा (इतिहास, कथा वगैरेचा); सबध, जुळणी (क्रि० लावणें, बांधणें, घालणें, रचणें, जमवणें) 'सविधान लवकर ध्यानात येईना' -कम८ २ व्यवस्था, तयारी, तजवीज 'सपूर्ण नानाविध सविधानीं।' -साबद ६ ३ [स सम्+वि+धा]

**संविधानक**—न कथासूत्र कथानक, गोष्ट कथानकाची रचना 'तसें नाटकास किंवा कादबरीस सविधानक होय' -नि ५३६ [स सम्+वि+धा]

**सविनय**—वि विनयशील, नेमस्त, नम्र [स+विनय] **सविनय कायदेभग**-पु स्वत अनत्याचारी राहून व प्रतिकार न करता सरकारचे जुलमी कायदे मोडण्याची क्रिया

**सविभाग**—पु विभागणी, वाटणी [सं सम्+वि+भज्]

**सविया**—क्रिवि १ सहज, सहजीं, साहजिकपणें 'तये काशीपुरी जावया। तीन मार्ग योजिले सविया।' -स्वादि १० ४५८ -अमृ ६ ७५ २ आपोआप तत्काल 'कल्पना निमे प्रवृत्ति शमे। माग मन विरमे। सवियाची।' -ज्ञा ६ २१२ [स स्वयम्]

**सविला**—वि सवयीचा, ओळखीचा [सवय]

**सविवळ**—वि क्रिवि सविस्तर, स्पष्ट, विस्तारपूर्वक खुलासा सह; विवरणपूर्वक 'आणि आधींचीं हीं मूळें। उपपत्ती परि सविली सविवळें।' -ज्ञा १५ २०९ [स स+वि+वृ]

**सविशेष**—वि क्रिवि सविस्तर 'तें सविशेषें विणविजे।' -शिशु ११८ [स+विशेष]

**सविष**—वि विषारी [स+विष]

**सविस्तर**—वि क्रिवि १ विस्तारासह, विस्तृत 'सविस्तर वटत्व जैसें। बीजकणिकेमाजी असे।' -ज्ञा ९ ४१० २ तप शिलासह, विस्तृतपणें, बारीकसारीक माहितीसह [स स+विस्तर]

**सविस्मय**—वि आश्चर्यपूर्वक, आश्चर्यचकित, विस्मित, चकित [स+विस्मय]

**सवीळ**—स्त्री (वों. कु) शिवळ पड़ा

**सवृत्तिक**—वि हक्कदार, वतनदार, वृत्तिवान [स+वृत्ति]

**संवृद्धि**—स्त्री १ वाढ, विस्तार. २ सुबत्ता, विपुलता, समृद्धि रेलचेल ३ अभ्युदय उत्कर्ष भरभराट [स सम्+वृध्]

**सवे, संवे**—स्त्री सवई सवय पड़ा 'सवे लाविता सवे पडे।' -दा ७ ७ १५ 'टाकि टाकि अशी सव सगुणमदिरा।' -होला १८ २४ 'ऐसेनि स्थैर्याची होईल। सवे यथा।' -ज्ञा ६ ३८२

**सवे**—पु समय, वेळ, काल 'सवे सारीतु पातीनिले। दड नायकापासीं।' -शिशु ५०४ [स समय]

**सवें**—शअ बरोबर सह, समागमें 'सवें सेना भूपाळ निघालाहे।' -र ३१ 'तयाचि तुलगासवें। वीरवृत्तीचेनि यावें।' -ज्ञा १ १२७ [स सम, समेत, सहित]

**सवेंच, सवेंच, सवेंचि**—क्रिवि आपण होऊन स्वत च आपोआप लागलीच, तावडतोब, तात्काळ तत्क्षणीं 'शब्द बोलता सवेंच नासे। -दा ९ २ २७ 'जो मेरुर्यिाचि सव। पुरती उपायाचे धावे।' -अमृ २ ८ 'सवेंच गाडर पुढेंच सरला।' -ऐपो २१० 'पाहतो भीतरीं सवेंचि तो।' -तुगा १६ [स स्वयम् स्वयम्+एव समेव]

**सवेंच**—वि खर्च होणारें झिजणारें, नाशवत 'रूप सवेंच नाम निर्वेच। रूप क्षणिक नाम साच।' -राबि १६ ९९ [स+वेंच=खर्च]

**सवेण्या**—स्त्रीअ (वों) राजन्हाणी लग्नसमारंभात विहिणी बरोबर वराकडील स्त्रियांस वधूकडील स्त्रिया न्हाण घालतात तो समारंभ [स+विहीण]

**सवेदक**—वि ज्ञान देणारें कळविणारें बोध करणारें [स सम्+विद] **संवेदना**-स्त्री ज्ञान जाणीव बोध **सवेद्य**-वि स्वत स कळणारें, स्वत स जाणता येणारें (पण दुसऱ्यास सांगतां न येण्यासारखें, आत्मानुभव दु ख फळ ह्ळ इ०)

**सवेशा सा**—स्त्री स्वइच्छा; स्वत ची इच्छा 'तरी आपु लिया सवेसा। का न मगावारी परेशा।' -ज्ञा १ २६ [सं स्व+इच्छा]

**सवेसाजचा**—क्रिवि ऐन सायकाळचा, अगदीं सध्याकाळीं; तिनीसांजा [स समय+साज]

**सवेळ, सवळ**—स्त्री प्रात काळ, सकाळ, प्रभात 'न पडता सवेळे। मानससरोवरींचीं कमळें।' -शिशु ७८६ -क्रिवि तत्क्षणीं, तात्काल 'सवळैचि वियोग पडेल।' -ज्ञा १७ ७७० [स सु+वेला]

**सवैल**—पु सहचर, सोबती, शेजारी 'सवैल गोवळे नाना परी।'-दाव ८३ 'सवैलाचा गुणदोष तुकणें।'-ज्ञाप्र २८२

**सवो**—पु (गो) बोहलें, वधुवरास बसण्याकरिता केलेली सुशोभित जागा म्ह० १ सव्यार धोव मरप' =बोहल्यावर नवरा मरणें २ सव्यार न्हाउक लागप =बोहल्यावरच ऋतु प्राप्त होणें

**सव्य**—पु १ डावा हात २ (चुकीनें) उजवा हात वि १ डावा, उजवा नव्हे तो २ उलट, विरुद्ध मागचा ३ दक्षिणेकडील ४ (चुकीनें रूढ) उजवा, दक्षिण 'प्रचड डावा भुज दंड भारी। सव्यें करें वाजवि कैटभारी।'-वामन, कालियामर्दन १४६ 'वामसव्य दोन भाग। परी दा नामीं एकचि अग।' -एभा १९६ 'सव्य ते तळीं ठेविते। तेणें सिवणी मव्यु पीडिजे। वरी वैसे तो सहजें। वाम चरणु।'-ज्ञा ६ १९४ **सव्य घालणें**—प्रदक्षिणा घालणें, उजवीकडे ठेवून फिरणें 'घालोनि सव्यें मग अनिकला।'-सारुह ७ ८१ **सव्यअपसव्य, सव्यापसव्य**—वि डावा उजवा, उलटसुलट, शुद्ध अशुद्ध बरोबर व चुकीचे 'सव्यअपसव्य भोवडी गदा।'-एरुस्व ९४८ 'पक्तवेगें रथ फिरविती। कावे देती सव्यअपसव्य।'-ह २६ १५५ -न (श्राद्धाचे वेळीं उलटसुलट जानवें करावें लागतें यावरून) यातायात, खटपट, उपद्व्याप **सव्यगत**-क्रिवि स्पष्टपणें, उघडणें, स्वच्छपणें (दिसणारा) ०**साची**-पु अर्जुन 'सव्यसाची सारखे लागले मार्ग पहायाला।'-ऐपो ३९२ 'परिस पा सव्यसाची।'-ज्ञा ३ १४५ -वि डाव्या व उजव्या दोन्ही हातानी काम करणारा, युद्ध करणारा

**सव्यय**—वि (व्या) विकरण पावणारा, ज्यास विभक्त्यादि प्रत्यय लागतात असा (शब्द) याच्या उलट अव्यय [स]

**सव्याज**—वि व्याजासह, मुद्दलाहून अधिक

**सव्वा, सव्वाइकी, सव्वाई, सव्वाल**-सवा, सवाई ६० पहा

**सव्वाल**—पु परशुप्रमाणें एक हत्यार (हें कुऱ्हाडीप्रमाणें मारतात) [हिं सवल?]

**सव्वीस**—वि वीस अधिक सहा ही सख्या [स षट्+विंशति]

**सव्हार सव्हारणें**—सहार, सहारणें पहा 'आता ऐका सव्हारणी।'-दा ११ ११११

**सशंक**—वि १ शंका असलेला, साशकित, सदेहयुक्त २ भीतियुक्त, भिडस्त, भित्रा धास्तीयुक्त [स स+शका]

**सशक्त**—वि बलवान्, बलिष्ठ, मजबूत, समर्थ, बळकट, जोरदार [स स+शक्ति]

**संशय**—पु १ शका, सदेह, मनाचा डळमळितपणा, मनाचा अनिश्चय २ वहीम, अदेशा, विकल्प, अविश्वास, विपरीत भाव ३ भय, भीति, धास्ती [स सम्+शी=निजणें] ०**खोर-थाईक**-वि सशयी, शकेखोर, अदेशा घेणारा, अविश्वासी ०**ग्रस्त**-वि सशयानें व्यापलेला, अनिश्चित मन स्थितींत असलेला, विकल्पानें भरलेला, सदेहविशिष्ट. ०**निवृत्ति**-स्त्री सशयाचा निरास, शंकेचें निवारण, निर्मूलन, शकापहार ०**पिशाचिका**-स्त्री शकारूपी भूत 'स्वत ज्या सशयपिशाचिकेस अग्रस्थान देणाऱ्या लोकाची विचारसरणी आमच्या मतें अगदीं अग्राह्य -गीर ५१८ ०**वाद**-पु परस्पर विरोधी दोन मतांपैकीं सत्य कोणतें याचा निर्णय करता येत नाहीं अशी मनस्थिति, जगाच्या उत्पत्तिलयासबधी वगैरे अनिश्चितता प्रतिपादन करणारें मत 'सोफिस्ट बहुताशीं सशयवादी असत' ज्ञानकोश, स ११३. **सशयात्मक**-वि शकायुक्त, सशयी, अनिश्चित, सदिग्ध, गोंधळलेलें, दिक्कतखोर **संशयार्थ**-पु (व्याक) ज्या क्रियापदाच्या रूपावरून सदेहात्मक बोध होतो त्या रूपास असलेली सज्ञा **संशयालु**-वि नेहमीं शका काढणारा, सशयी वृत्तीचा **सशयी**-वि शकेखोर, अनिश्चित मनाचा, भ्रांतिग्रस्त, घोटाळलेला [स]

**सशास्त्र**—वि शास्त्रास अनुसरून केलेलें, बोललेलें, लिहिलेलें, असलेलें [स]

**संशुद्धि**—स्त्री स्वच्छता, शुद्धता, निर्मलता, शुद्ध व पवित्र स्थिति, साफसफाई

**संश्रृत, संश्रित**—धावि आधार दिलेलें, आश्रयाखालील, आश्रय असलेलें, आश्रित, रक्षित [स सम्+श्री]

**सशेमिरा**—पु हक -गागा २५४

**संशोधक**—पु १ शोध लावणारा, शोध करणारा, नवीन गोष्टी शोधून काढणारा २ शुद्ध करणारा, दुरुस्त करणारा, पवित्र करणारा [स सम्+शुध्] **सशोधन**-न १ नवीन शोध लावण्याची क्रिया २ शुद्धि, तपासणी, चौकशी **संशोधित**-धावि शोधलेलें, शुद्ध केलेलें, तपासलेलें

**सश्रय, सश्रृति**—पु आधार, आश्रय, आसरा [स सम्+श्री]

**सश्रीकता**—स्त्री शोभा, सुवक्ता, तेजस्वीपणा 'तिच्या रगाची सश्रीकता किंवा तिच्या आकाराचा चारुलपणा…' -सॉक्रेटीससवाद २७७ [स+श्रीकता]

**सश्लिपता**—स्त्री सलग्नता, सयोग, चिकटून असणें. अभ्यासाच्या चार भूमिकातील तिसरी भूमिका [स]

**सश्लिष्ट**—धावि चिकटलेला कवटाळलेला, संलग्न

**सश्लेष**—पु आलिंगन, मिठी; कवटाळणें, संलग्नता [स सम्+श्लिष्]

**सषड्भ क्रांतिपात**—पु शारत्संपात [स]

**सषड्भपात**—पु ग्रहाच्या कक्षेतील क्रतुबिंदु

**सष्टम**—वि मोठा, सुदर, सुरेख, ठळक (दागिना, भांडें, वस्तु) धड मजबूत, बळकट (कापड, कागद अथवा इतर वस्तु) -क्रिवि (व) यथेच्छ, खूप दोन्ही कुशी ताणेपर्यंत [स सत्+तम]

**ससकर**—पु १ रेंव वाळू खडे (धान्य, वगैरेमध्यें मिसळलेलें गदळ) २ मिसळलेलें धान्य, गदळ असलेलें धान्य -वि मिसळलेलें, गदळ असलेलें, कंकरमिश्रित [स+शर्करा]

**ससकार**—पु सचकार पहा धयाळा

**ससक्त**—धावि १ संबद्ध जोडलेला, चिकटलेला; संलग्न, बद्ध २ आसक्त तत्पर पाठीमागें लागलेला; अनुरक्त, चिकटलेला अतिशय प्रवृत्त ३ निकटचा, सुपरिचित घनिष्ठ संबंध असलेला [स सम्+सिच्] **ससक्ति**-स्त्री १ संबंध निकटपणा २ आसक्ति अतिशय प्रवृत्ति दृढ व्यासंग ३ दाट परिचय घसट

**ससगाणी-गाणी**—स्त्री १ सगणी पहा दुडा पैसा, ढबू पैसा २ सहा रुके, जमीनीचें एक माप 'महाराजांनीं जमीन सजगाणी इनाम दिली' -शिवसाप्ते १०४

**ससद्**—स्त्री सभा [स षद्=बसणें]

**ससत**—पु (गो) वश **ससतीक**-वि (गो) वशाला

**ससतणें**—अक्रि बोलणें -मनवो

**ससप्तक**—पुअव भारतीय युद्धांत सामील झालेले त्रिगर्त पुत्र सत्यप्रतिज्ञ [स]

**ससबधिक ससबधी**—वि सापेक्ष, परस्पर संबंध असलेलें संबद्ध परस्पराशीं निगडित 'सव्य आणि सेवक लघुत्व आणि गुरुत्व हे शब्द ससबधिक आहेत' [स+संबंध]

**ससर**—पु १ संचार गमन येजा वावर २ पसारा संगति ३ चूक च्युति प्रमाद तैसे दुर्भेद जे अभिप्राय। का गुरुगम्य हन ठाय। तय ससरेवीण जाय। बुद्धि तयाची।' -ज्ञा ६ ४५९ [स सम्+सृ] **ससरण**-न १ गमन जाणें, पुढें सरणें, संचार २ जन्म स्थिति लय वगैरे, जगातील अस्तित्व; आयुष्यांतील व्यापार ३ आत्म्याचें आगमन बहिर्गमन जीवाचा फेरा जन्ममरणाचा फेरा 'तरी जिवाच संगरग। ठा न पुकिजे।' **ससरणें**-अक्रि १ जाणें व मरणें जन्म, स्थिति, लय यांतून जाणें ससारचक्रांतुन जाणें, भ्रमणें २ सावरणें, आटोपणें 'म्हणोनि असो हें यापरी। तो देखे ज्ञानाची वाखारी। सर्वे ससरले निकरी। आपु विश्व।' -ज्ञा १३५ ३ सरसावणें, उद्युक्त होणें, प्रवृत्त होणें 'वागोरे सावरा यया गोविंदा। ससरलिया।' -ज्ञा ११ २९६ [स सम्+सृ=सरणें] **ससरा, संसारा**-पु १ स्थिति, उद्भव प्रादुर्भाव 'मोक्षाचा ससारा। उणा नोहे।' -ज्ञा १४ २८४ 'श्रीरामा आणि दिनकरा। वेगळिकेचा ससरा। क्षीरसागरा आणि क्षीरा। जेणे रीती।' -स्वादि १२ ९० २ पसारा, विस्तार 'कैसा वासनेचा ससरा। देहा हों नेदी उजगरा।' -ज्ञा ५५४ 'नामरूपाचा ससारा। होय जयातें।' -ज्ञा १५ ७६ ३ लाग सगति जोड 'का स्नेहा सुत्रा, वैश्वानरा। जालियाहि ससारा।' -ज्ञा १७ ३५१ 'बोधाचा हा ससारा। जाला जो आमुतें।' -ज्ञा १८ १७५८ **ससरिसु**-क्रिवि एकदम तात्काळ 'वीं अमी घातला पोतासु। ऐसें नव्हे ससरिसु। वच झाग।' -अमृ ७ १७७

**ससरा**—पु सासरा श्वशुर 'मूर्तिमंत ससरा अभिमाना। -भकक २ मगीश राधाविलास 'पितर मातुळपुत्र ससरे ते पितामह शाळ जातू सोयरे।' -शिवराम, गीताचंद्रिका ४४

**ससर्ग**—पु १ संबंध संयोग, संगति 'कीं लवणेंचि जळ विरे। ससर्गें काळकूट मरे।' -ज्ञा २ १५ २ संघटन, परिचय, दळणवळण, व्यवहार ३ स्पर्श सानिध्य, निकटपणा [स सम्+सृज्] **ससर्गाभाव**-पु (तर्क) अभाव, विनाश याचे तीन प्रकार आहेत प्राक् नैमित्तिक व अत्य, जन्म अथवा उत्पत्तीचा अभाव, नाश किंवा लय **ससर्गित**-धावि संबद्ध, युक्त **ससर्गी**-वि १ संबद्ध, निगडित, निकटचा; जवळचा २ परिचित, संगत, ओळखीचा वगैरे

**ससर्प**—पु १ ज्यावर्षी क्षयमास असतो त्यावर्षी येणारा अधिकमास २ सौम्यगति हळूच सरणें, हलणें (साप इत्यादि वगैरे प्रमाणें) [स सम्+सृप्]

**ससा**—पु १ एक फार भित्रा प्राणि, शश खरगोष २ ससाणा याबद्दल संक्षेपानें वापरतात (गो) सशो [स शश] **ससाकुश्रा**-पु एक मुलांचा खेळ -बाळमित्र १ ७० **ससे धार्वे** न सशासारखी एकसारखी धास्ती, भीति वाटणें (क्रि० बाळगणें, करणें, लागणें) **ससेहोलपट**-स्त्री गडबड धांदल मारामार खेचाखेच सगळीकडून एकदम होणारा मारा (सशास सर्वांनीं मिळून एकदम होलपटावें त्याप्रमाणें) 'मारा मारा, अर्से होऊन ससेहोलपट होऊन एक ठार झाला' -भाव १५ मग धोंकडून दत्ताजीनिंवे यास ससेहोलपट करावी -भाव १२

**ससा**—पु (व) सांचा (शव पुरण्या वगैरेचा) -वशाप ८ ५१

संसाटी—स्त्री संवसाटी पहा वरोबरी 'मग मासिया संसाटी। सुकी जर्ही।' –ज्ञा १८ १५०९

ससाणा—पु एक मांसाहारी, शिकारी पक्षी; श्येन, बहिरी ससाणा [ सं श्येन ]

संसार—पु १ जग, विश्व, सृष्टि, इहलोक, सृति, मानवी जीवित, अस्तित्व, जगाची स्थिति 'संसार म्हणजे डोळ्यापुढे दिसणारें सर्व जग किंवा दृश्य सृष्टि असा अर्थ आहे' –गीर८०१ 'शिवशिव कदनाची विवसी संसारी। कवणु नेघे।' –माए२२९ २ प्रपंच, व्यवहार, कुटुंबपोषणादि कार्य, गृहकृत्य, घरकाम ३ विस्तार, पसारा 'नवल ऐके धनुर्धरा। जैसा वासनेचा संसारा। वेद्दा होऊ नेदी उजगरा। परी सुखदु खें भोगी।' –ज्ञा ५ ५४ [ सं सम्+सृ ] संसार उभारणें–गृहस्थाश्रम चालविणें गृह व्यवस्था पाहणें 'मुक्ताबाईनें एखादाचा संसार नसता का उभारला' –नामना २१ संसार करणें– १ गृहकृत्य करणें, घरातील सर्व कामधाम, व्यवहार पाहणें २ ( वे ) ताडाचें पान कापून ताडी मोघ्यात पाडणें संसार मांडणें–संसारास सुरवात करणें संसारास–संसारावर पाणी घालणें–संसाराचा नाश करणें 'म्हणती आता संसारा घालु पाणी। परी अन्न दऊ चक्रपाणी।' –ह१६ ११६ संसार वृथा करणें,जाणें–संसाराचा नाश करणें 'सुदयाची ज्येष्ठ कांता। मेली अन्न अन्न करितां। येणें लज्जा वाटे चित्ता। संसार वृथा गेला कीं।' संसार हाकणें–संसार चालविणें, प्रपंच योग्य रीतीनें करणें संसाराची माना करणें–सर्व प्रपंचाचा नाश करणें, विघाड करणें, सर्व आशाचा मोड करणें सामासिक शब्द– ०ओझें–न प्रपंचाचा भार, जबावदारी, संसाराची काळजी 'म्हणे संसारओझें माझें शिरीं। कैसी परी होईल।' ०कष्ट–पुअव प्रपंचातील दु खें, त्रास, मेहनत, जवाबदारी ०चक्र–न प्रपंचाचा गाडा; संसारयात्रा, नेहमीं संसारात येणार निरनिराळे प्रसंग, अनुभव वगैरे ०ताप –दु ख –यातना–पुन प्रपंचातील दु खें, त्रास, कष्ट श्रम 'आधींच संसार तापें सतप्त। तो हा सत्समागमें निवत।' ०धंदा–पु प्रपंचातील कामें, व्यवहार, उद्योग 'नेणें उकले आपसा संसारधंदा' ०भान–न प्रपंचातील लक्ष्य ऐहिक गोष्टींबद्दल वाटणारा आपलेपणा, प्रेम, आदर ०भार–पु संसाराचें ओझें ०भ्रम–पु संसारांतील माया पाश, प्रापंचिक गुंतागुंत, ऐहिक गोष्टींसबंधीं वाटणारें प्रेम व त्यात गुरफटून राहण्याची बुद्धि ०माया–स्त्री प्रापंचिक गोष्टींसबंधीं वाटणारा भ्रम, ऐहिक गोष्टींत असणारी क्षणभंगुरता क्षणिकत्व परंतु त्याविषयीं सत्त्याचा होणारा भास 'संसारमाया सांडानि। दशरथ पावला स्वर्गभुवनीं।' –रावि ११ १४५ ०मार्ग पु जग विश्व सृष्टि ऐहिक व्यापार व्यवहार यांच्या उलट पर मार्थमार्ग ०यात्रा–स्त्री, प्रपंचाचा रोजचा क्रम, ऐहिक दिनचर्या, संसारातील अनेक घरेवाईट प्रसंग, आयुष्यक्रम ०रहाटी–स्त्री जगाचा क्रम, विश्वांत चालललेल्या अनेक घडामोडी, जीवितचक्र ०सागर–पु प्रपंचाचा, सृष्टीचा अफाट विस्तार ०सात–स्त्री. संसाररूपी बाजार, प्रपंचाचा बाजार 'तवि संसारसातेसी येउन। जो न करील ईश्वरभजन।' –सिद्दि कथा १६ ५ ०साक्षी–वि ज्याला सर्व जगातील व्यापार दिसतात असा ( परमेश्वर ) ०सुख–न प्रपंचातील आनंद, सुखोपभोग, ऐहिक सुखोपभोग संसाराचा गाडा–पु संसारचक्र, प्रपंच, व्यवहार, जगातील दिनक्रम संसाराचें जोखड–न प्रपंचाची जबावदारी, संसाराचें ओझें संसारिक–वि १ संसारात दक्ष, आपले रोजचे व्यवहार योग्य तऱ्हेनें करणारा, व्यवहारज्ञ, प्रापंचिक २ संसारासबधीं, संसारातील 'जव तुझें रूप नोह दिठे। तव जगासि संसारिक गोमटें।' –ज्ञा ११ ३२१ 'संसारिक ह तुटना।' –दा ७ ५ ३५ ३ संसारात, प्रपंचात गढलेला, आपल्या आयुष्यातील गोष्टींचाच केवळ विचार करणारा, संसारी 'मार्गे बोलिला संसारिक। त्यागेंविण नव्हे कीं साधक।' –दा ५ १० १ संसारिया–पु संसारी, प्रापंचिक आत्मा गुणसंगें। संसारिया।' –ज्ञा १४ ३३ संसारी–वि १ प्रापंचिक, संसारात गढलेला, गृहस्थाश्रमी स्त्रीपुत्र वगैरे असलेला २ ऐहिक, जगासबधीं.

संसारणें—अक्रि सरसावणें, पुढें होणें, उत्सुक होणें 'होर हो जालें। तव पारकें संसारलें।' –शिशु ८७१ 'तव देओ संसारला।' –शिशु ६६० [ सं सृ ]

संसारा—पु १ संसार पहा २ संयोग 'का स्नेहा सूना वैश्वानरा। जालियाही संसारा।' –ज्ञा १७ ३५१

ससाक्ष ससाक्षिक, ससाक्षी—वि साक्षीदार किंवा पुरावा असलेला, साक्षीसह ( दस्तऐवज वगैरे ) [ स+साक्षी ]

संसिद्धि—स्त्री १ नैसर्गिक स्थिति स्वाभाविक स्थिति, सहजगुण, स्वाभाविक गुणधर्म, जातिस्वभाव २ पूर्णता, पुरतपणा, साध्यता, समाप्ति, पूर्णदशा, फलप्राप्ति इष्टप्राप्ति ३ वैराग्य, विरक्ति पूर्णज्ञान, आत्मज्ञान, यौगिक सिद्धि 'जिये वैराग्य येणें वोळे। मागा संसिद्धिरूप केलें।' –ज्ञा १८ ९५४ [ सं सम्+सिध्–सिद्धि ]

संसु—पु श्वास दम 'चरणीं चाले भला संसु।' –उषा १८४५ [ श्वास ]

संसृति—स्त्री १ सृष्टि, जग, विश्व, मानवी जीवित, सृष्टीची घडामोड विश्वपरंपरा, संसार संसरण पहा 'नेदिजेचि संसृति। माथा उचलं।' –ज्ञा १४ ४९ २ प्रवाह, ओघ [ सं सम्+सृ ] ०पंथ–पु संसारक्रम, जीवनमार्ग, जन्ममरणादि परंपरा 'जव न होसी लिंगदेहातीत तू। तर न चुके संसृति पंथु।' संसृष्ट–धावि संयुक्त, निगडीत, सांधलेलें, जोडलेल

संसृष्टत्व–न १ (कायदा) एकत्रपणा, अविभक्तता, विभक्त झाल्यानंतरचा पितापुत्र, अगर भाऊ वगैरेंचा एकत्रपणा २ एकी, मिलाफ संयोग, जोड, संगति संसृष्टि–स्त्री १ जुळणी, जोड, मिलाफ, संयोग, एकी २ एकत्र संग्रह; जमवाजमव, गोळा होणें ३ विभक्त मालमत्तेचे निरनिराळे भाग पुन्हां एकत्र आणणें, विभक्त मालमत्ता एकत्र करणें ४ (अलं) रूपकांचें मिश्रण, मिश्र रूपक संसृष्टी–पु एकदा विभक्त झालेला, पण पुन्हा आपला पिता, भाऊ किंवा चुलता वगैरेंबरोबर एकत्र राहणारा समायिक कुटुंबातील भागीदार

**ससेटा**—पु लोट, प्रवाह 'जेथें बैसे तेथें धसे। नीर ससेट वाहती नेत्रास।' –नव १५.१७ [ध्व]

**ससेमिरा**—पु एक प्रकारचें वेड माझ्या शापानें तुला ससेमिरा या अक्षरांनीं वेड लागेल' –सिंहासनबत्तिशी [स, से, मि, रा हीं चार अक्षरें चार श्लोकांचीं आद्याक्षरें असून त्या श्लोकांत एकानें आपल्या मित्राचा विश्वासघात केल्याची कथा आहे ही कथा सिंहासनबत्तिशींत आहे]

**ससोरा**—पु घसा, गळा, मानगुटी (क्रि० धरणें) [स श्वस्]

**संस्करण**—न संस्काराची क्रिया [स सम्+कृ]

**संस्कार**—पु १ हिंदु धर्मांतील कांहीं विशिष्ट आवश्यक विधि हे त्रैवर्णिकांकरितां आवश्यक मानतात हे सोळा प्रमुख मानतात पण त्यांचीं नांवें निरनिराळीं आढळतात उदा० गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, विष्णुबलि, सीमंतोन्नयन, जात कर्म, नामकरण, निष्क्रमण, सूर्यावलोकन, अन्नप्राशन, चूडाकर्म, उपनयन, महानाम्नी, समावर्तन, विवाह, और्ध्वदेहिक 'विदेशी मेले मरणें। तयास संस्कार देणें।' –दा २.७.७७ २ शुद्धि करण, पवित्र करणें, कोणत्याहि गोष्टीच्या शुद्धीकरतां कराव याचा विधि; दोषापकर्ष व गुणजनन. –केसरी २४.१.३६. ३ तयार करण्याची कृति, क्रिया, परिपाक (स्वयंपाक, औषधि, रसायन वगैरे पचन, आर्णे, चूर्ण करणें, पुट देणें, भावना देणें वगैरे क्रियांनीं) ४ उजळा देणें, पूर्ण करणें, साफ करणें, विशदीकरण करण (क्रिया, वस्तु वगैरे) ५ रूपांतर, बदल नवीन विशेष गुण उत्पन्न करणें, कोणतेंहि कार्य करणें ६ एखाद्या गोष्टीचा छाप ठसा (उठणें), कार्य, परिणाम (दिसणें) [स सम्+कृ] ०रहित-विरहित–वि ज्याचे संस्कार झाले नाहींत असा संस्कारणें–क्रि संस्कार करणें, क्रिया, कार्य करणें संस्कर्ता–पु संस्कार करणारा संस्कार्य–वि ज्याचा संस्कार करावयाचा आहे तो, संस्कार करण्या योग्य संस्कारित–धावि संस्कार झालेला संस्कृत–स्त्रीन गीर्वाण भाषा, व्याकरणनियमानीं बद्ध अशी भाषा –धावि १ ज्यावर संस्कार, कृति, क्रिया घडली आहे असा २ शुद्धीकृत, पवित्र ३ अलंकृत, व्याकरणशुद्ध, उजळा दिलेले, विद्वत्तापूर्ण संस्कृति–स्त्री १ संस्कार, क्रिया, पूर्णत्व २ मनुष्यांचे जाति अथवा राष्ट्रस्वरूपी जे संघ त्यांचें भाषा, शास्त्रज्ञानादि रूपानें व्यक्त होणारें चरित्र 'ज्ञातिराष्ट्रादि संघानां साकल्यं चरितम्।' मानवी जातीची बौद्धिक, धार्मिक, नैतिक, सामाजिक, सुधारलेली स्थिति

**सस्त, सस्ता**—वि स्वस्त, सवंग, अल्पमोली, सुलभ [स स्वस्थ] सस्तावणें–अक्रि स्वस्त होणें –सक्रि स्वस्त करणें, सवंग करणें. सस्ताई–स्त्री. सवंगाई, सवंगपणा, स्वस्ताई, स्वस्त असल्याची स्थिति सस्तासुकाळ–पु अत्यंत विपुलता, रेलचेल

**सस्तन**—वि स्तनयुक्त, ज्यास आंचूळ आहेत असे (प्राणि) (इं) मॅमल [स]

**सस्त्र**—न शस्त्र, अस्त्र 'अग्नी सस्त्र सुमरिलें।' –उषा १७२५ [शस्त्र]

**संस्थ**—वि १ राहणारें, थांबणारें, वास करणारें, अधिष्ठित उदा० जलसंस्थ=पाण्यांत राहणारा, वृक्षसंस्थ=झाडांत राहणारा, स्वर्गसंस्थ=स्वर्गांत राहणारा २ कडे शेवट होणारें, पसरणार, बाजूला, दिशेकडे असणारें उदा० दक्षिणसंस्थ, प्राक्संस्थ, उदक्संस्थ [स सम्+स्था]

**संस्था**—स्त्री १ यथास्थित स्थिति, स्वास्थ्य, सुखावह स्थिति, स्थिति, स्थान 'पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत असल्याहि तिची आकाशांतील संस्था बदललेली दिसत नाहीं' –मराठी सहावें पुस्तक पृ ३१९ २ शेवट, अंत, अखेरी, समाप्ति ३ थांबणें, राहणें, वास ४ ऋजुमार्गानें गमन, सुरळीत चालणें, सरळपणाचा व्यवसाय, सुयंत्र चालणें ५ रचना, घडामोड, व्यवस्था 'जैं सृष्ट्यादि संस्था। ब्रह्म्यानें केली।' –ज्ञा ३.८५ 'तें साम्य कर्मसंस्था। जाणती वेंवी।' –ज्ञा ५.२६ ६ घटना, योजना, कार्यनियुक्त मंडळी, कार्यार्थ केलेली मंडळी, उद्योग, सभा (इं) कॉर्पोरेशन [स सम्+स्था] संस्थापक–वि स्थापना करणारा, योजक, सुरू करणारा, प्रवर्तक संस्थापणें–उक्रि १ स्थापना करणें, योजणें, सुरू करणें, घटना करणें, घडवून आणणें २ निश्चित करून स्थापन करणें, ठरविणें (धर्म, विधि) ३ अधिष्ठित, स्थाननिष्ठ करणें, मांडणें (राजा, मूर्ति) [स सम्+स्था] संस्थापन–ना–न्ना योजना, निश्चिति, प्रतिष्ठा, मांडणी, थमविणें, स्थानापन्न करणें, सुरू, चालू करणें (राजा, मूर्ति, धर्म, विधि वगैरेचें) संस्थापित–धावि योजलेलें, निश्चित केलेलें, ठरविलेलें, स्थापन केलेलें, दृढ केलेलें मान्य करून घेतलेलें संस्थित–धावि १ निश्चित, स्थापित, समाप्त, पूर्णतया नेलेलें,

प्रतिष्ठित, निर्णीत २ राहिलेलें, निविष्ट आलेलें, आश्रित ( सह, मात, युक्त वगैरे) **संस्थिति**-स्त्री १ पूर्णावस्था, शेवट, अखर, पूर्णता, निर्णय २ वास, कायमस्थान, युक्तता ३ टिकाव, स्थिरता, एकाग्रता

**संस्थान**—न १ राजाचा गाव, राजरस्तीचा गाव, शहर, लहानसें राज्य, मांडलिक राजाचें राज्य २ देवता, साधुसंत पंडित वगैरेस नेमून दिलेलें स्थान, देऊळ, मठ वगैरे सारखी ज्यास सरकारातून उत्पन्न वगैरे मिळतें अशी जागा, देवाकडे, मठाकडे वगैरे नेमणूक असलेला गाव वगैरे ३ देवता, साधुसंत याच्याकरिता केलेली नेमणूक [ स सम्+स्था ] **संस्थानिक**-पु सस्थानाचा मालक, मांडलिक राजा, ज्याच्या चरितार्था करितां एखादें गाव वगैरे नेमून दिलें आहे अशी व्यक्ति **संस्थानिक-संस्थानी**-वि १ सस्थानासबधी, सस्थानातील ( उद्योग, चाकरी, व्यवसाय ) २ राजकीय, राजसदनसबधी 'प्रस्तुतच्या अपुऱ्या इग्रजी इतिहासात सस्थानिक वृत्ताखरीज आमच्या विद्या कला, स्थितिरीती वगैरे बद्दल एक अक्षरहि नाहीं' –नि १०५

**संस्पर्श**—पु सबध, स्पर्श, शिवाशिव, ससर्ग, योग [ स सम्+स्पृश्] **संस्पृश्य**-वि स्पर्शसुलभ, स्पर्श करण्यासारखा योग्य, स्पर्श करण्यास शक्य, स्पर्शार्ह, स्पर्शवेद्य **संस्पृष्ट**-धावि सबद्ध स्पर्श केलेला, योग आलेला, एकत्र आलेला, निगडित, युक्त

**सस्मित**—न. हास्य, किंचित हसणें **सस्मित**-वि १ हर्षित, हास्ययुक्त, हसरा २ ( ल ) विकासित

**सस्य**—न १ सामान्यत वृक्षाच फल पण विशेष रूढ धान्य, पीक 'ऐसेनि सस्यादि सकळा। करी धान्यजाती सुकाळा।' –ज्ञा १५४०५ २ धान्याचें रोप 'का फळीं सरे वाढणें। सस्याचें जैसीं।'–ज्ञा १८४७१ [ स घस्=निद्रा घेणें ] **सस्यात**-पु धान्य कापण्याचा काल सुगी, हगाम; लाणीच दिवस 'सस्यांतीं निवडिलें। बीज जैसे।' –ज्ञा १४ ३५२

**सस्यू**—पु वर्णाश्रम –मनको

**सस्वर**—स्त्री ( कु ) सुसर पद्दा

**सह**—वि तीन –आदिलशाही फर्मानें [ फा ]

**सह**—वि ( समासाच्या उत्तरपदीं ) सोसणारा सहन कर णारा उदा० दु सह, सुसह प्रसह निस्सह [ स सह् ]

**सह**—उपसर्ग याचा अर्थ १ सगति, सबध साहचर्य २ जोड, सयोग, योग ३ वाढ, आधिक्य ४ पूर्णता, पुरतेपणा, सपू र्णता –क्रिवि बरोबर सगतीनें, जोडीनें **०कार-कारिता**-पुस्त्री साहाय्य, मदत भागीदारी ( काम करण्यात, क्रिया करण्यात ) **०कारी**-पु सहाय्यक मदतनीस, सोबती भागीदार, जोडीदार **०कारी पतपेढी**-स्त्री अनेक लोकांनीं सयुक्त जबाबदारीवर व पतीवर कर्ज काढून परस्परास साह्य करण्याकरिता चालविलेली पेढी **०कारी-मडळ-मडळी-संस्था**-स्त्री अनेक लोकांनीं मिळून एकत्र सामुच्चयिक जबाबदारीवर कार्य करण्याकरितां चालविलेली सस्था, **०गमन**-न १ सती जाणें, पतीबरोबर स्त्रीनें त्याच्या चितेवर स्वत स जाळून घेणें, पती दूर मरण पावला असल्यास पळसाच्या पानाच्या वगैरे त्याच्या प्रतिमे बरोबर चितारोहण करणें २ ( सामान्यत ) बरोबर जाणें, सग तीनें जाणें, सोबतीनें जाणें **०चर**-पु सागाती, सोबती, मित्र. 'सहचरु मनोधर्मु। देवाचा जो।' –ज्ञा १७ ३३ –वि बरो बर जाणारा **०चरी**-स्त्री १ पत्नी, लग्नाची बायको, २ मैत्रीण, सखी, सोबतीण **०चारिणी**-स्त्री धर्मपत्नी, स्त्री, ( लग्नाची ) बायको **०धर्मचरिणी**-स्त्री पत्नी, विवाहित स्त्री, लग्नाची बायको **०धर्मिणी**-स्त्री पत्नी, विवाहित स्त्री **०पान**-न एकत्र पिणें, एकत्र पान करणें **०भागीदार**-पु एकत्र कुटुंबातील भागीदार, पातीदार, वाटेकरी **०भोजन**-न पक्तिव्यवहार, एकत्र भोजन, एका पक्तींत अन्नग्रहण करणें **०मरण**-न सहगमन, सती जाणें **०यात्रा**-स्त्री सहगमन 'साध्वीची सहयात्रा म्हणती।'–मोमभा १६८ **०वर्तमान**-शअ बरोबर, सहित, सगतीनें, जोडीनें **०वास**-पु १ एकत्र राहणें, साहचर्य, एक ठिकाणीं राहणें २ परिचय, मैत्री, ओळख, सगत **०वासणें**-उक्रि १ एकत्र राहणें, सगत सोबत असणें, उपयोगात, असणें, नोकरी, चाकरी निमित्त जवळ राहणें २ परिचय, सराव सवय होणें, निकट सहवास, उपयोग इत्यादी मुळें स्वभाव, गुणधर्म, गुणदोष इ० माहीत होणें, अनुभव येणें **०वासी**-वि १ निकट राहणारा २ एक आश्रम पोटाजात **०सपादक**-पु दुय्यम सपादक, सपादकाचा मदतनीस, सहायक 'विवेकर हे मराठा पत्राचे सहसंपादक आहेत' –के २७ ५ ३० **०सवेदन**-न एकदम ज्ञान, जाणीव होणें, दूर अतरावर असलेल्या दोन व्यक्तींच्या मनात एकच विचार येणें, एकाच प्रका रची स्फूर्ति होणें, विचाराची देवाण घेवाण होणें ( इ ) टेलीपथी –साक्रेटीस सवाद १६३ **०हिस्सेदार**-पु समाईक कुटुंबातील भागीदार **सहाध्यायी**-पु बरोबर अध्ययन करणारा, सम कालीन विद्यार्थी, गुरुबधु **सहानुभाव, सहानुभूति**-पुस्त्री वर्ण्यवस्तूशीं तद्रूपता, वर्ण्य वस्तुस होणारे भाव स्वत स होणें **सहोक्ति**-स्त्री एक अलकार, मुख्य गोष्टीबरोबर आनुषगिक गोष्टीचा चमत्कारजनक उल्लेख **सहोढ**-पु विवाहाबरोबर येणारा मुलगा, विवाह करतेसमयीं पूर्वपतीचा किंवा उदरात असणारा मुलगा, द्वादशविध पुत्रापैकीं एक **सहोदर**-वि एकाच आईच्या पोटीं जन्मलेला, एकोदर, समानोदर, सरखा ( भाऊ ) 'माय बाप तुका म्हणे सहोदर। तोंवरीच तीर न पावता।' –तुगा ४६ 'जें काळकूटाचें सहोदर।'–ज्ञा १० १९२

**सहज**—वि १ बरोबर झालेला, बरोबर निपजलेला, उत्पन्न झालेला, सहजात, बरोबर जन्मलेला, एकाच वेळीं असलेला २ भाऊ, सहोदर, एकाच मातेच्या उदरीं जन्मलेला ३ स्वाभाविक, जन्मजात, जन्मापासून असलेला, निसर्गसिद्ध, नैसर्गिक, स्वभावज ४ सुगम, सोपें 'कादीस जाणें पैशावाचून सहज नव्हे.' —क्रिवि १ कोणताहि उद्देश मनात न धरिता, निर्हेतुक, उगीच, निष्कारण, स्वाभाविकत, आपोआप २ विशेष प्रयत्न न करतां, सुलभतेनें, लीलेनें, साहजिकतेनें, विनाप्रयत्न ३ विशेष कारण नसतां, निमित्त, प्रसंग, जागा वगैरे कांहीं नसता याच शब्दाचे सहजगतीनें, सहजगत्या, सहजरीतीनें, सहजरीत्या, सहजा खालीं, सहजासहजीं, सहजावारी, सहजास्त्या, सहजावृत्तीनें, सहजामहज, सहजात, सहजानसार इत्यादि पर्यायशब्द होतात ०कला-ळा—स्त्री स्वाभाविक शक्ति ०गुण—पु निसर्गसिद्ध स्वभाव, स्वाभाविक गुणधर्म, उपजत गुण, जन्मजात स्वभावधर्म, देहस्वभाव 'सहजगुणास न चले उपाय।' —दा २४ ८ ३१ 'सहजगुण लोकीं न अन्यथा कोणी।' —मोभादि २ ९७ ०ता—स्त्री स्वाभाविकता, सहजपणा ०तां—क्रिवि स्वभावत. 'आपण सहजता पूर्णकाम।'—तुगा ६२०. ०प्रेरणा—स्त्री स्वाभाविक प्रवृत्ति; नैसर्गिक ओढ ३ (इं) इंन्स्टिंक्ट 'त्यांच्या अपत्यप्रेमाला सहजप्रेरणा या सदरात घालणारे' —विचारविलासित ०मित्र—पु जन्मजातमित्र, जन्मापासून सहचर, मामेभाऊ, आतभाऊ, मावसभाऊ ०शत्रु—पु जन्मापासूनचा वैरी, चुलत भाऊ, सापत्न भाऊ, सावत्रभाऊ ०समाधि—स्त्री मनाची समाधानी वृत्ति, सविकल्प अगर निर्विकल्प कोणत्याहि वृत्तींत स्वाभाविक आनंदी, समतोल मनोवृत्ति, मायिक उपाधींतहि स्वस्वरूपी लीन असणें 'असोन मायिक उपाधि। तेचि सहज समाधी।' —दा ११ १ ४४ ०सिद्ध वि १ सुलभतेनें झालेलें, सहज उत्पन्न होणारें सहज साध्य झालेलें २ सहोत्पन्न, स्वाभाविक, नैसर्गिक जन्मजात ०स्थिति—स्त्री १ नैसर्गिक स्वभाव, गुणधर्म २ सरलमार्ग स्वाभाविक स्थिति सहजारी—पु सहजशत्रु पहा

**सहजोदासीन**—वि नात्याचा नव्हे असा, जन्मानें नातें नसलेला; स्वाभाविकत मित्र किंवा शत्रु नसलेला

**सहणें**—अक्रि सहन करणें, सोसणें 'जें जें अरि करिल तु सहा सति तें।'—मोसभा ५ २० 'देतों मीं सकला दिशास बलि हें मत्कर्म आतां सहा।'—वेणीसहार [स सह्] सहन—न सोसणें, साहणें, सहन करणें, धीर काढणें —क्रिवि सोपें, सुलभ, सहज होणारें ०ता—स्त्री सहनशीलता, सोशिकपणा 'धन्य विवेकी सहनता दृढ।'—दावि ४३५ ०शक्ति—स्त्री सोसण्याचें सामर्थ्य, सहन करण्याचें बल, सोशिकपणा ०शील—वि सोशिक स्वभावाचा, धीराचा, सोसणारा, सहिष्णु

**सहनीय**—वि सहन करण्यासारखें, सहन करण्यास शक्य, योग्य, युक्त सह्य—वि सहन करण्यासारखा, सोसेसें, सोसण्यास योग्य, शक्य, सुलभ, अवश्य

**संहत**—धावि १ घपटित, गुफलेला, सांधलेला, जोडलेला २ एकत्र केलेला, एकवटलेला, गोळा केलेला [स सम्+हन्–हत] ०जानु—जानुक—वि गुडघे जुळलेला; ढोंपरें एकत्र केलेला, संहति—स्त्री १ सघ, समुच्चय, एकत्रितता २ जोड, मिलाफ, जूट

**सहद्**—पुन मध [फा.शहद]

**सहदेवमत**—न सहदेव नावाच्या ज्योतिष्याची ज्योतिष शास्त्रातील पद्धति सहदेवाचे ठोके—पुअव सहदेवाचे भविष्य विषयक अदाखे सहदेवी—वि सहदेवाच्या ज्योतिषपद्धती सबधी, तीस अनुसरून असलेलें

**सहदेवी**—स्त्री एक औषधी वनस्पती

**सहनाई-नै**—स्त्री सनई पहा एक सुषिरवाद्य 'खालु कर्णे सहनै मृदग। ढोल नद्दचे गिडबिडे चांग।'—स्वादि १० २ ४६

**संहरणें**—उक्रि नाश पावणें, नष्ट होणें, नाश करणें, लय करणें, पावणें 'महाप्रलय अवसरें। हें त्रैलोक्य ही संहरे।' —ज्ञा २ १६१ [स सम्+हृ] संहर्ता—पु नाशकरणारा. —एभा ११ ६०७

**संहर्ष, संहर्षण**—पुन सघर्षण, एकत्र घासणें, घासाघीस, उगाळणी, घोटणी [स]

**सहल**—स्त्री १ रपेट, फेरफटका; मोकळ्या हवेंतील मजेनें फिरण्याचा व्यापार, मौजेनें फिरणें २ फेरी, चक्कर, दौड (घोडा वगैरेस दिलेली) [अर सैर्] ०शिकार—स्त्री मर्दानी खेळ, शिकार वगैरे सहलणें—सहल करणें

**सहल**—वि क्रिवि सहज, सुलभ, सोपें, सोईस्कर, छुट्टी 'गाजदीखान आलिया सहल पडेल'—पया १३७ [अर सहल]

**सहलावणें**—अक्रि ढिलावणें, सैल होणें [स शिथिल]

**सहली**—स्त्री दासी, सखी, सहचरी [स सहचरी]

**सहवाणु**—न संवाहन, पाय दाबणें, चेपणें, रगडणें 'वीडा देऊनि श्रीचरण सहवाणु। करतातीं['—दाव ३०१ [स संवाहन]

**सहविकार**—पु (न्याय) विगमनाचा एक प्रकार, एका वृत्तांतील विकारावर दुसऱ्या वृत्तातील विकार अवलबून असणें (इं) कॉकॉमिटट व्हेरिएशन [स]

**सहसा**—क्रिवि १ एकाएकीं, घाईनें, अविचारानें 'ऐसें बोलौनि सहसा। जाळेयांतु रीगे भवैसा।—माए ३२९ 'तें

सहसा कैसें काई। सागा म्हणों।' –ज्ञा ११ ३१ २ बहुश, बहुत करून, बहुधा, हजार हिश्यानीं, कदापि, किमपि, कधीं, सर्वात्मना 'हें काम मीं सहसा करणार नाहीं' 'तो सहसा तुझ्या घरीं यावयाचा नाहीं' 'नरदेह हा स्वाधेन। सहसा नव्हे पराधेन।' –दा १ १० २५ 'त्याच्या हातून हें काम सहसा होणार नाहीं'

**सहस्कंध**—पु ज्याची मर्यादा चद्रमडलापर्यंत आहे असा सप्तस्कंधातील चौथा स्कंध [स]

**सहस्र**—वि एक हजार [स] ०कर–पु सूर्य ०किरण न सूर्य ०धृत–न हजार वेळां धुतलेलें औषधोपयोगी तूप ०दल–न १ कमल २ ब्रह्मरंध्र, ब्रह्मदल 'सहस्र दलाचा मेघु। पीयूषें वर्षोनि चाशु।'–ज्ञा १८ १०३९ ०धा–क्रिवि हजारतऱ्हांनीं प्रकारानीं ०नयन–न इंद्र ०नाम–न १ हजार नावाचा समूह यादी (विष्णु, शिव वगैरे दवतांचीं हजार नावें ग्रथित केलेला श्लोक समूह) २ विष्णु, शिव वगैरे देवतस तुलसी बेल, दूवा वगैरे वरीलपैकीं एकएक नाव घेऊन हजार नावागणिक वाहण्याचा प्रकार ३ (ल) अपशब्द, शिव्या 'तुम्हास सहस्रनामें वाहतात' –ख २७११ ०फडी–वि १ हजार फडया असलेला (नाग, शेष) २ फडया निवडुंग ०फळ–न एक दोडक्यासारखें भाजीचें फळ व वेल ०भोजन–न एक हजार ब्राह्मणास अन्नदान दणें, जेवण घालणें ०मुख–पु शेष 'न वर्णवनी सहस्रमुखा। ब्रह्मादिका अलक्ष्य।'–एरुस्व १ २२ ०रश्मि–पु सूर्य ०श: सहस्रावधि–क्रिवि हजारानीं, हजारों ०शीर्ष–वि हजार डोकीं असलेला (विराट् पुरुष), हजार मस्तकाचा फणांचा (शेष) जी सहस्रशीर्ष याचे दाखले कोडी वरी होताति एकि वेळे।' –ज्ञा ११ २६९ सहस्राक्ष–वि १ हजार डोळ्याचा २ सर्व पाहणारा (विराट्पुरुष) –पु इंद्र

**सहा**—स्त्री (वायकी) साय पहा

**सहा**—वि ६ ही संख्या [स षट्] –नअव (ल) सहा शास्त्रें 'साहीसहित वोडंगा। वाहिला वर्दी।' –ज्ञा ११ ६८२ 'तो हा पडरीचा राणा। पुसा सहा चौं अठराजणां।' –तुगा २५२९ ०कमळें–नअव षट्चक्र पहा ०गुण–पुअव षड्गुण, सहा चांगल्या वृत्ती, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य, ख्याति, यशश्री औदार्य 'ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ख्याति। यशश्री औदार्य स्थिति। हे साही गुण वसिष्टसी असती। –भारा बाल १५७५ ०नकार–पुअव मौन, विलंब, भ्रूभंग, अधोवदन, नमन, विषयांतर ०मुखाचा–पु कार्तिकस्वामी 'सहा मुखाचा दवाला। दयासागराजी।' –ह ३ ७ ०सुभे–दक्षिणेंतील औरंगाबाद (अहमदनगर) वऱ्हाड, खानदेश, विजापूर, गोवळकोंडें (हैदराबाद) व बेदर (कर्नाटक) हे मोंगलाचे सहासुभे 'सहासुभे दख्खन' साडेसहासुभे– १ विजापूर, १दौलताबाद, १ अहमदावाद–गुजराथ, १बऱ्हाणपूर–खानदेश, १ हैदराबाद–भागानगर, १ औरंगाबाद व अर्धा नागपूर –शिदि २० साडेसहा सुभे दक्षिण सहा महिन्याची आमई–अतिशय विलंब लागणारी गोष्ट 'या सोनाराजवळ दागिना करावयास दिला म्हणजे सहा महिन्याची आमई' ०सुभे 'सहा सुभे' –शिदि

**सहाकार, सहाकारी**—सहकार, सहकारी पहा

**सहासष्ठ**—वि ६६ ही संख्या साठ व सहा [स षट्षष्टि]

**सहाजणें-नें**—नअव शहाजानें, मोठे नगारे, जयवाद्यें 'याणी ती जागा फत्ते करून सहाजनें वाजवीत खेतीवर उभे राहिले' –भाच ११ [फा शादयान]

**सहाण**—स्त्री १ गध वगैरे उगाळण्याचा कुरुंदाचा दगड २ शस्त्रास धार लावावयाचा दगड [स शाण, प्रा सण्ण]

**सहाण**—वि (व) सपाट, सपाट (जमीन) [स समान]

**सहाण**—न (व) गाय, म्हैस वगैरे पशूचें जननेंद्रिय [सं सु=प्रसवणें]

**सहाण**—वि लहान, सान पहा

**सहाण्यात घालणें**—(वाप्र) सहादेवीनत करणें –मसाप ४ ४ २५९

**सहानक-की**—सानक–की पहा

**सहानुभूति**—स्त्री समदु:खित्व, सहसंवेदन, दु:खाची दु:खित व्यक्तीवरोवर जाणीव [स सह+अनुभूति]

**सहामासकी-सहामास्की**—स्त्री १ सहा महिने टिकणारी माठ भाजीची एक जात २ वर्षांतून सहा महिने दूध देणारी म्हैस [सहा+मास]

**सहाय-य्य**—न मदत, साह्य, हातभार [स सह+अय्]

**सहाय-यी**—पु मित्र, सोबती, मदतगार, मदतनीस, जोडीदार [स सह्+अय्=गमन करणें, सह्+इ=गमन]

**सहार**—पु १ नाश, लय, क्षय, विनाश, प्रलय २ निःपात, विध्वंस मोडतोड, लोप (आकार रूप स्थिति वगैरेचा), उच्छेद 'दैत्यांचा संहार करावया।' –तुगा ११ ३ गोळा करणें, जमवाजमव एकत्र करणें ४ संक्षेप ५ सकोच, आकुंचन [स सम्+हृ] सहारक–वि नाश क्षय उच्छेद, प्रलय करणारा सहारण–न संहार पहा नाश विनाश, प्रलय संहारणें–उक्रि संहार करणें सहारिता–वि सहारक

**सहित**—वि १ बरोबर असलेलें, जोडून असलेलें, मगलींत असलेलें, युक्त, सहवर्तमान २ मदत केलेलें, सोसलेलें, साहिलेलें –शअ सह, बरोबर, सगती

**संहित**—धावि १ जोडलेलें, सांधलेलें, निगडित, युक्त २ एकत्रित, जमविलेलें, गोळा केलेलें ३ संक्षिप्त, आकुंचित, सको चित [स सम्+धा]

**संहिता**—स्त्री १ (व्या) सान्निध्य, सन्निहितत्व, अनु बंध, योग (दोन वर्णांचा संधि होण्यापूर्वीची स्थिति) २ वेदाची एका ठिकाणीं मांडणी, वेदाचें प्रथन, वेदांची विशिष्ट शाखा, ऋग्वेद संहिता, यजु संहिता, मैत्रायणी संहिता वगैरे ३ विशिष्ट प्रथाची रचना, मांडणी, एकत्रीकरण, शास्त्रादिकांचे मूल ग्रंथ, पुराणादि ग्रंथ उदा० सूतसंहिता, वाराहसंहिता, गर्गसंहिता, महाभारत 'सांगे मुनीश्वराला एकशत सहस्र संहिता सौती ।' –मोभादि १ २२ ४ संग्रह, एकत्रग्रथन, रचना, मांडणी

**सहिलावणें**—उक्रि (राजा) सईल होणें, ढिलें पडणें, सैलावणें [स शिथिलीभवन] **सहील**–वि (राजा) सैल, ढिला, पोकळ [स शिथिल]

**सहिष्ण, सहिष्णु**—वि सहनशील, सोशिक, सोसणारा 'उष्ण आणि सहिष्ण। तोचि आत्मा।' –दा १२ १ १७ [स सहिष्णु] **सहिष्णुता**–स्त्री सहनशीलता, सोशिकपणा

**सही**—स्त्री सखि, मैत्रीण 'तयें येऊनि नारदें शिकविली चाळासि पाळी सही' ९० अकक २ –कृष्णकौतुक [स सखिन्]

**सही**—स्त्री स्वाक्षरी, स्वतःच्या हातानें लिहिलेलें स्वतःचें नांव, बरोबर असल्याबद्दलची निशाणी, दस्कत 'त्यावरी आप णही सही घातली '–भाव ४२ –वि योग्य, मान्य, खरें, बरोबर, पूर्ववत, बहाल, अचूक सहि पहा 'मग सही तू थोर ब्राह्मण।'–दावि ३१८ 'ती याद सही व मान्य असे '–रा ७ २२ –क्रिवि (व) पुरेसें, रास्त 'एकला वाटतोच सही ' [अर सहीह्] **सही करणें**–नक्की करणें 'एवढें शिक्का दयण्यास ग्रंथ कातवाल यानीं सही केला असता .' –घाको ७१ **सही सलामत**–वि सुखरूप, सुरक्षित 'ती वापडी आजतागाईत सही सलामत आहे ' –भाव ५ **सही सही**–क्रिवि १ ततोतंत, हुबेहुब, बरोबर ' केंव्हां केंव्हां तर सही सही अगदीं मालेच प्रवेश मी पहातों आहे असें मला आढळून आलें ' –सुदर्शन ११ २ हळू हळू, हलकें हलकें 'नातवानें मद मदखाचें कपट ओळखून चिडून जाऊन सही सही, तान घेतली –ल द जोशीकृत सगीत शास्त्रकार व कलावताचा इतिहास ६०

**सहीसाक्ष सहीसुद**–सईसाक्ष सईसुद पहा

**सही**—स्त्री गोट्याच्या खेळात केलेला खड्डा, बदा या खड्यात गोटी टाकण्याची क्रिया

**सहृत**—धावि १ नष्ट, उच्छेदित, विनाशित, विलीन २ ग्रथित, एकत्र केलेलें, गोळा केलेलें सहार पहा ३ संक्षिप्त, आकुंचित [स सम्+हृ]

**सहृदय**—वि १ हृदय असलेला, दयाळु, प्रेमळ, सहानु भूतिक २ आवड असलेला, प्रवृत्ति असलेला, मन घालणारा, गोडी असणारा

**सहेतु, सहेतुक**—वि हेतुपुरःसर केलेलें, सकारण, साधार [स+हेतु]

**सहेली**—पु सहल पहा, रपेट, व्यायाम [अर सैर]

**सहेली**—स्त्री फकीराच्या गळ्यातील माळ, सेली

**सहेली**—स्त्री सखी, मैत्रीण, सहचरी 'पठाण मोंगल सहिल सहेल्या।' –ऐपो २११ [स सहचरी]

**सह्य**—वि सहन करण्यास योग्य [स]

**सह्य**—पु एका पर्वताचें नाव, सह्याद्रि, पश्चिमेकडील कोंकण व देश यामधील एक पर्वत 'गेलें रामासह तें सागरतीरामि उतरनी सह्य।' –मोरामायण १ ६० ३४

**सळ**—पु १ अभिमान, आग्रह, हट्ट, ईर्षा 'म्हणौनि कामाचेनि बळें। जो विषय सेऊं पाहे सळें।' –ज्ञा १६ ४५४ 'अहंकारें साहिलें सळ। वियोगु देखोनिया।' –ऋ १०१ 'बळियाचीं आम्ही बाळें। असों निर्भर या सळें।' –तुगा १८१८ २ बळ, झपाटा, उसळी, ऊर्मी, आवेश 'तैसा सुटी जया सळ। कामार्मीचा।' –ज्ञा १५ ३०२ 'हाणित थाप मुखांत सळानें।' –भा नवरस चरित्र ११७ [स शल्य]

**सळ**—पु भग, मोड, न्यूनता 'योगनिद्रा तरी न मोडे अकर्तेपणा सळु न पडे।' –ज्ञा ५ ७८

**सळ**—न १ छळ, संकट, पीडा, गांजणूक 'समुद्र लघनाचें सळ। तुम्हावरी केवळ नय घालू।'–भा रा किष्किंधा १७ ४० २ पडामोड, कष्ट, सुखदु ख 'गेलें तारुण्य गेलें बळ। गेलें ससारीचें सळ।'–दा ३ ५ ४५ [स छल] **सळणें**–अक्रि १ छळणें, गांजणें, त्रास देणें 'ज बुद्धीतें सळी। निश्चयातें टाळी।' –ज्ञा ६ ४१४ 'उपाधीच्या योगें सळिसी तू आम्हा।' –मध्व ७२ २ भिणें, भयभीत होणें 'जयाचेनि नावें सळे। महाभय।' –ज्ञा १६ ४१८ 'ईस देखोनि सळसी।' –आपुतना वध ३७८ 'त्यास देखतांचि सळिजे। वा उठोन तात्काळ पळिजे।' –ह ६ १९ **सळणूक**–स्त्री छळणूक

**सळ**—न द्वेष, वैर, दावा, वाकडेपणा 'पनगु जैसा सळें। दीपाचेनि।' –ज्ञा १८ ६१८ [स शल्य]

**सळ सल**—न बाणाग्र, टोंचणी, लोखंड लांकूड वगैरेंचा अणीदार बोंचणारा तुकडा 'हृदयीं तप्तलोहाचें सळ। सार्दो घेईल चिरकाळ। परी दुष्ट शब्दाची जळजळ। मरणान्तींहि शमेना।' –मुआदि १८ ४१ [स शल्य]

**सळ**—न २ पीक कापल्यावर उरणारा घस, सड, कापलेल्या बुडखा किंवा त्यास फुटलेला अंकुर [स शल्य]

**सळ**—पु १ तरवारीची मूठ म्यानास बांधावयाची दोरी, पद 'स्वार भाले वाहवर सळ सोडिले फिरंगीचे।' -ऐपो ५७ २ (सामान्य) बारीक वादी (कातडें शिवण्याची) [स शलाका]

**सळ**—पुस्त्री घडीची दुमड, मोड, रेषा [स शलाका]

**सळ**—स्त्री (सोनारी) सोन्याची लगड [स शलाका]

**सळई**—स्त्री १ सुई, बारीक तार, लोखंडाची वगैरे बारीक काडी, ताडी, टोचणी, भोंसकणी २ मुसळाचें गोल लांब लाकूड, लोखंडी गज, पहार ३ मुगटपातील विणीच्या रेषा ४ कडधा, गरम, फळें वगैरे मोजताना दर शेंकडा वगैरे ठराविक झाल्यावर बाजूस काढून ठेवलेली पेंढी वगैरे (यावरून एकंदर माप किती झालें तें ठरविता येतें), भात मोजताना आठवणी करितां, सुणेकरिता पुंजी करून ठेवतात ती [स. शलाका, प्रा सलाया] **सळईचा मुगटा**-पु ज्या मुगटयाच्या विणींत लहान लहान चौकटी न दिसता पट्टे पट्टे किंवा रेषा दिसतात असा मुकटा याचे उलट मुगवा मुगटा (लहान लहान चौकडींचा) **सळय-यी**-सळई पहा **सळी**-स्त्री सळई

**सळक**—स्त्री १ पावसाची सर सळकधार असाहि वाकप्रचार आहे २ तोफाची सरवत्ती, बंदुकांची फैर, शिलग 'सळका सुद्ध लागल्या।' -ख ४२ ८९ [ध्व सळ]

**सळक**—स्त्री शिलका, कळ, उसण

**सळक**—स्त्री हद्द, मर्यादा, रेषा 'पर्वता भोवत्या सळक घालिजे। तिया उल्लुसु न आईजे।' -ज्ञिपु ११८२९ [स शलाका]

**सळकण-कन-कर्र-दिन-दिर्नी-दिशीं**—क्रिवि सळ सळ असा आवाज करून [ध्व]

**सळकणें**—अक्रि १ सळसळ आवाज करणें, सर्कन निघून जाणें (सापाप्रमाणें) २ घसरणें, निसरणें ३ गुपचुप निघून जाणें, सटकणें, निसटणें [ध्व]

**सळका**—पु १ सणका, शिवशिव, खरख, खवखव, कड्ड, खाज (दातास चावण्याची इच्छा, अतिशय खाजविण्याची वगैरे इच्छा होऊन सुरणारी) (क्रि० सुरणें, येणें, लागणें, जाणें, जिरणें) २ जोराची पावसाची सर (क्रि० येणें) [ध्व सळा, सळा]

**सळडण**—न (व) घरावरील कुजकें गवत

**सळणें**—अक्रि १ सळसळणें, उसळी फुटणें, खतखतु लागणें २ सळक लागणें, खवखवणें, खवखवणें, शिणक लागणें 'जयातें बहु सुधा सळे।' -प्रथराज ७, महाराष्ट्र सारस्वत [ध्व]

**सळदें**—न (कों) शिन्याचा झाप, कुंपणाकरिता काटया कुड्या बांधून तयार केलेलें झडप

**सळनळीत, सळनळ**—वि १ सरळ, थेट, ताठ, सीधा, प्रधिरहित २ अगदीं, नि शेष उदा० सळनळीत उभा=थेट उभा, किंचितहि वाक नसलेला 'सळनळीत नागवा'=अगदीं नग्न, निर्वस्त्र

**सळप, सळंप**—नस्त्री (राजा) लाकडाची धलपी, ढिल्पी, चीप, कुळपटा [स कपाल] **सळपा, उसळपा**-पु. (राजा.) लाकडाचा ठोकळा, मोठा ढलपा

**सळमेसळ**—स्त्री मिसळ, मिश्रण, सरमेसळ, एकत्र. 'अशी सळमेसळ करून आपणास कोठेंच यारा नाहीं' -भागर ३ १४३ [भेसळ द्वि]

**सळमिसळ**—स्त्री मिश्रण, पचमेळ, खिचडी. -क्रिवि. एकत्र, मिश्र 'सळमिसळ करीना सर्वथा क्षीरतारीं।' -र २९ 'सखेही सागातें सळमिसळ झाले सकळ ते।' -र २१ [मिसळ द्वि]

**सळवंगी**—वि कपटी, लबाड 'सळवंगेआ देवाचा जग धापु।' -शिशु १५४ [स छल+अंगी]

**सळरठा**—पु (कों) सराटा, सळाथी पहा

**सळसळ**—स्त्री १ सळ असा आवाज, उकळी, खदखदणें (क्रि० करणें, वाजणें) २ शिवशिव, खरख, कड्ड (जखम, गळू वगैरेची), ठसठस, मुसमुस (भरलेले स्तन वगैरेची), धुरधुर, खवखव, शिवशिव (दात, जीभ वगैरेची) (क्रि० सुरणें) [ध्व]

**सळसळ-ळां, सळाळां**-क्रिवि १ सळसळणारा आवाज करून (आधण वगैरे) (क्रि० वाजणें, करणें) २ थरथर, धडधड, वगैरे आवाजासारखें **सळसळणें**-अक्रि १ उकळणें, खदखदणें, उसळणें (पाणी वगैरे सळसळ आवाज करीत, रक्त वगैरे) 'सळसळणाऱ्या रक्ताला।' -सप्रीमगीतें १०३ २ शिवशिवणें, खरखरणें, कड्ड सुटणें (खरूज गळू वगैरे) ३ तटतटणें, हुळहुळणें, मुसमुसणें (भरलेले आचुळ, स्तन, स्तनाग्रें वगैरे) ४ शिवशिवणें, खवखवणें (दात, हात, पाय, जीभ-खाण्याकरिता, चावण्याकरिता, मारण्याकरिता) ५ कुडकुडणें, थरथरणें, शिवशिवणें (थंडी, आंबट पदार्थ वगैरेमुळें-दात वगैरे) ६ सळसळ असा आवाज करीत जाणें (सर्प वगैरे) [ध्व] **सळसळीत**-वि गुळगुळीत तुळतुळीत, तकतकीत

**सळसळा**—पु (राजा) शिरीषाचें झाड (याच्या शेंगांचा आवाज होतो त्यावरून)

**सळा**—स्त्री तारेची सळई, भोंसकणी, लोखंडाची काडी, ताडी, बळकाची वगैरे अणकुचीदार काडी, ढल्पी [स शलाका]

**सळा**—पु छल [स छल]

**सळाक-का**—स्त्री सळई, गज [स शलाका]

**सळाथी**—स्त्री (कों) हिराची फेरणुणी, झाडू [ राड+आधी ]

**सळासळा-ळा, सळाळा**—क्रिवि सळसळ पहा. 'झाडाची पानें सुळासळा वाजत होतीं ' —कोरकि ४११

**सळाळ**—पु १द्रवपदार्थ उकळतांना होणारा सळसळ आवाज २ सरपटण्याचा आवाज ३ फूत्कार, फुरकण्याचा वगैरे आवाज [ध्व] **सळाळणें**—अक्रि सळसळणें पेक्षां अधिक तीव्र १ उकळत ना वगैरे सळसळ आवाज करणें २ जोरानें, मोठयानें फूत्कार टाकणें (सर्प वगैरेंनीं) ३ मोठयानें फुरकणी फोडून, गर्जना करून अंगावर चाल करून जाणें ४ जोरानें म्यानांतून काढणें (तरवार वगैरे), जोरानें सरपटत जाणें, जोरानें निसटून जाणें

**सळी**—स्त्री सळई पहा

**सळी**—स्त्री कळी, कुचाळी; कुभांड. 'जें सळी लाविली व्रा.येंचीं। आपणेंभा आपणु।' —शिशु २०० [स छल=कपट]

**सळी**—स्त्री द्वेष, ईर्षा 'अचळटिरा म्हणता सळी अधिक ' —दावि ६१

**सळिवें**—न सरवळा, शवई, गव्हला यासारखें खाद्यविशेष ' नाखिवा माळतिया सळिवें। इत्यादि वळिवट्‌ करवें।' —ऋ८२

**सळु**—स्त्री सळ पहा रेषा, घडी, दुमड ' लिंबुची सीव न मोडे। पाणीपणा सळु न पडे।' —अमृ ७ २६१

**सळु**—पु सळ पहा आग्रह बल, न्यून इत्यादि

**सळे, सळा**—स्त्री १ वादी, शिवावयाची तात २ मापाची पट्टी, वादी ' माप टाकी सळे धरिली विट्ठलें। यापटोनी केलें समाधान।' —तुगा ४९० [स शलाका]

**सळें**—क्रिवि सत्वर त्वरित; एकदम ' पायेंधूळि रगडे। तरि सळें मायेभा चढे।' —शिशु ४७२ 'तें वचन तोडावें स्वामि सळें ' —विपू १९३

**सळो कां पळो करणें**—अतिशय त्रासून सोडणें 'इंग्रजास सळोका पळो करून सोडल्याखेरीज ते कांहीं देणार नाहींत ' —केले २ २४७

**संक्षय**—पु १ विनाश, विलय, प्रलय, विश्लय २ (सामान्यत) नाश नायनाट, मोडतोड [स सम्+क्षी]

**संक्षिप्त**—धावि संक्षेप केलेलें, ल्हान, अ रूढ केलेलें, थोडक्यात आणलेलें; सारांशरूपानें मांडलेलें [स सम्+क्षिप्]

**सक्षुर**—वि खूर असलेले (प्राणी), प्राण्याचा एक वर्ग —प्राणिमो ३७ [स]

**सक्षेप**—पु १ सारांश निष्कर्ष, समाहृति थोडक्यात मांडणी २ (गणित) अंश व छेद यातून साधारण गुणक कमी करणें [स सम्+क्षिप्=फेंकणें] **सक्षेपें**-क्रिवि थोडक्यांत, सारांशरूपानें ' ऐसी हे आदि परंपरा। सक्षेपें तुज धनुर्धरा।' —ज्ञा ३ ११८ **संक्षेपण**-न एकत्र आणणें, थोडक्यांत मांडणी, सारांश; संकोचन **सक्षेपणें**-उक्रि संकोचन करणें, अ कुंचन करणें, एकत्र आणणें, ओढणें, खेचणें, आकर्षण करणें **संक्षेपत**.-क्रिवि थोडक्य त, साररूपानें **संक्षेपिक**-वि संक्षिप्त, निष्कर्षित; संक्षेपासंबधीं, सारभूत **संक्षेपोक्ति**-स्त्री. सारभूत भाषण, थोडक्यात बोलणें, मांडणें, सारांशकथन

**सक्षौर**—वि क्षौरासुद्धां, दाढीमिशांसुद्धां सर्व हजामत करून घेतलेलें (प्रायश्चित्त) ' माधवरावजींनीं इतरांसाठीं हें प्रायश्चित घेतलें नसतें तर त्यांना सक्षौर प्रायश्चित घ्यावें लागलें असतें ' —आगर ३ १३५ [स स+क्षौर]

**संज्ञक**—वि संज्ञा असलेला, नावाचा, नामेंकरून उदा० गुणसंज्ञक, विष्णुसंज्ञक, तत्रत्यसंज्ञक [स]

**संज्ञा**—स्त्री १ नाव, अभिधान, आख्या, संकेतशब्द २ संकेत, खूण, इशारा, चिन्ह ' आणि आर्गी शुद्धाप्यतेची। संज्ञा य मणाची।' —ज्ञा ११ ७६१ ' संज्ञा करोनि मातेसी।' —गुच ११६१ ३ गायत्री ४ (व्या) पारिभाषिक नाव, शास्त्रीय नाव ५ शुद्धि, चेतना, ज्ञान, बुद्धि [स सम्+ज्ञा=जाणणें] ०पत्र-न मुखपृष्ठ, नामपत्र ' या ग्रंथाच्या संज्ञापत्रावरून तीन ग्रंथाचीं यांत नावें आलीं आहेत ' —नि ४४४ ०वान्-वि १ प्राज्ञ, जाणता, विद्वान २ शुद्धींत असलेला, सावध.

**संज्ञान**—वि १ शहाणा; हुशार, बुद्धिवान, विद्वान; जाणता २ (कायदा) वयांत आलेला, जाणता, समजूं लागलेला अज्ञानाचे उलट [स]

**संज्ञी**—वि संज्ञा असलेला, नाव असलेला, त्या नावाचा [स]

**संज्ञेय**—वि (सांकेतिक) विशिष्ट चिन्हांनीं दर्शित, विशिष्ट खुणांनीं, हावभावांनीं वगैरे दिग्दर्शित, विशिष्ट संकेत, टराविक चिन्हें यांच्या योगानें जाणावयाचा [स]

**संज्ञु**—वि चालतांना गुडघ्यास गुडघा लागणारा; ढोपरघाट्या [स]

**सा**—वि १ सहा, ६ संख्या ' पांचाहूनि अतिरिक्त। होय विधिता सा वाणी।' —एरुस्व १० १८ २ (सांकेतिक) सहा शास्त्रें ' सा चहू वेगळा अठरा निराळा।' —तुगा २४७ [स षष्-८ म सहा]

**सा**—असा याचें संक्षिप्त रूप, सारखा, सदृश याअर्थीं विशेषणें, क्रियापदें इ० ना हा प्रत्यय लागतो उदा० बरासा, मोठासा, जाईसा, चेहेसा इ० नामांना लावतांना कांहीं विकृती होतात उदा० आज मला निराशी वाटली —जेवणसें वाटलें-उपोषणसें वाटलें पाऊससा-वारासा वाटला ऊन्हसें वाटलें इ० ' जो धैर्ये धरसा सद्यकरसा तेजें तमा दूर-सा ' —र ४ कधीं तुसता

विधानाला जोर येण्यासाठीं वापरतात 'अरे, मीच सा काय' –मोर ६ [असा]

सा—स्त्री १ लक्ष्मी, पार्वती, देवी २ (महानु) नावा पुढें लावतात उदा० कामाइसा, बाईसा [स]

सा—सावकार याअर्थी नावापुढें लावतात उदा० पाडुसा, रेणुसा [स साधु, शहा–साहु–शा–सा]

सा—(संक्षेप) साष्टांग

साअत, साईत—स्त्री घटिका, मुहूर्त, क्षण 'नजुमि यास बोलावून साअत पाच घटका रात्रीची ठरली'–रा ५ २७ [अर साअत्]

साइख(क)डें—न कळसूत्री बाहुली 'साइखडियानें काइ प्रार्थावें। सूत्रधारातें।' [सुनट्ट प्रा सुत्तवट्ट?]

साइपण—स्वत, खुद अमृ ७ ७९ [स स्वयम्, प्रा सय, सइ] साई पहा

साइला—पु (को) दवासाठीं मारलेलें जनावर 'गावात देवस्कीचा साइला पडेल त्याचे फर खोताला देतात [का साय =मरणें]

साइ(ई)ली—स्त्री सावली पहा 'सर्व सुखाची साइली मोडली। आनंदाची खुलौरी हारपली।–भाए ९०

साई—स्त्री १ छाया, सावली 'जेथें सुशीतळ महीतळ साद साई।–नल ८८ २ (ल) आश्रय, छत्र 'बहिण बधु, बाप, आई। सकळ गोताचिच साई।'–तुगा ६९३ –वि खिन्न 'जरि तुझें हें चित्त साई।'–शिगीता ६९ [स छाया]

साई—स्त्री स्वाती नक्षत्र [स स्वाती, प्रा साइ]
साईचा पाऊस–पु (कुण) स्वाती नक्षत्रात पडणारा पाऊस –मसाप २ ३ ६५

साई—पु १ कर्नाटकात धनी, मालक, मोठा माणूस इ० स आदरार्थी संबोधन, स्वामी (अप) २ गोसावी, साधु. [स स्वामी, हिं साई]

साई—स्त्री १ साय, मलई २ साईसारखा थर, पापुद्रा

साईत—न (प्र) साहित्य पहा ०सुईत–न (व्यापक) साहित्य, सामान वगैरे 'साईतसुईत काय लागावयाचें तें तयार कर, जा'–याळ ? १०६

साईर—स्त्री १ ओळ, रांग (मुंग्या इ० ची) २ थवा, झुंड, दाट (पक्ष्यांची) 'एथें दाणे घाल म्हणजे आतां पार ब्यांची साईर येईल' ३ घोळका, घोंगाट, घोळ (माशा इ० चा) ४ कळप, झुंड (गुराची) ५ टोळकें, समुदाय, यूथ (वानर व इतर जनावरें याचा) [म दौर? अर साइर=फर?]

साईर, साईरवाब–सादर सादरबाब पहा

साइल—साइला पहा

साईल–स्त्री (महानु) मैत्रीण 'मग सेजीया साइलीया असति तीया म्हणेति।'–दृष्टांतपाठ ४४ [सखि]

साईली—वि सावली पहा. –वाडमा १ १६१

साईस—पु मोतद्दार, घोडेवाला सईस पहा [अर साईस्]

साउजी—वि सालस, गरीब 'भावूजी, महा साउजी।' –अमृत २४ [सं साधु, हिं साउ+जी]

साउट—सावट पहा

साउपा—वि शुद्धीवर आलेला, सावपा पहा 'त्यातें मेघवृष्टीच्या आपें। शिंपोनि केलें साउपें।'–मुआदि ४ १०४

साउंबरा—वि डवरलेला, विस्तारलेला 'नवरत्नाचा चौबारा पद्मरागाचा ल्योदरा। बाटारभी साउंबरा। नाचतु दिसे।' –शिशु ३३५ [साउंबर (स+आडंबर) मूळ शब्द असेल]

साउमा–मों–में–मेयां—वि क्रिवि १ समोर, पुढें, सामोरा सन्मुख –ज्ञा १४ २८५ 'साउमा येऊनि आपण। वसुदेवादि उग्र सेन। नमस्कारूनी सर्कपण।'–एरुस्व १५ ३९, 'नागाबा साउमीं येति।'–पूजावसर, 'मग बोले ऋषिनंदन। साउमें याजी या आलिंगन।'–कथा ३ ३ २७, 'तयें बहुतें हवाळें। पाडवू साउ मेया आलें।'–शिशु ५७९ २ प्रत्यक्ष, साक्षात् 'तंव साउमा पयावा त्वावो। तंव बोडवला आन प्रस्तावो।'–ज्ञा १६ ६२, –शिशु ३०९ [स सन्मुख]

साउली—स्त्री छाया, सावली पहा 'साउलीवरी न मचवे। भवितें जैसें।'–अमृ ५ २९

साउलें—न एक प्रकारचें वस्त्र, लुगडें 'काळें सावलें नेमली। –कथा ६ १० ६१, –भाए ९५ सावलें पहा [देश्य साउली]

साउळ—स्त्री पाडरेपणा 'दाढी साऊळ धरी। मान हालौनि वारी।'–ज्ञा १३ ७०७

सा(सा)उळा—वि सावळा पहा

साऊ—पु सावकार, साव पहा 'रामकृष्ण साऊ देवगिरी स्थानीं।'–मप्र ११ ७ [साधु, साहु]

साऊळ—स्त्रीन साह पोफळी इ० चीं झावळी सावळी पहा ०शीर–वि चागली वाढलेली, झुपकेदार 'जाई, जुई, मरव, साऊळशिरे।'–कथा ८ १८ १०८

साक—स्त्री पसा एका हाताची ओंजळ (पाणी, धान्य इ० घेण्यासाठीं केलेली) साकेनें पाणी पिणें–हातानें पाणी पिणें

साक—स्त्री १ साक्ष, पुरावा 'कर्जे देण्यादेण्याच्या बाबीची राजानें पियाद घऊ नये, एकमेकांची साक्ष ठेवून एक-मेकांनीं देणेंघेणें करावें'–व्यदोपधर्मप्रकाश २ नेहळणी, पहारा, डाव, यासाठीं बसविलेला माणूस, माणसें (क्रि० बस विणें, ठेवणें, राखणें) [स साक्ष्य प्रा सक्ख]

साद—स्त्री १ व्यापारी पत, अब्रू 'सावकारांना साळसूद पणा दाखवून त आपली साक वाढवितात '–गुजा १५० २ (रामा) नको दील साख पहा ०दाणी–वि अनूचा, लौकि कवान कुलवान वित्तवान। साक्षाणी पहिल्वान।'–नर ११ ६८ ०पाक–साकदि साकीपाकीचा वि १ पतीचा, अनूचा. २ नकीचा, चोगचा ०सुरत्त–वि नीटनेटका, व्यवस्थित (लेख, मापण इ०) साससुरत पहा –क्रिवि उघडपणें, राज रोस, सादेखत साका–स्त्री माक पहा

साकटण णें साकटा—न पु ठाकहाचा टोकाळा (यावर पदार्थ ठेवून ताडण्यासाठीं) साकटणें–उक्रि १ सोकटणावर ठऊन तुकडे करणें तोडणें २ (ल) नाश करणें, धुव्वा उडविणें (सैन्य इ० चा)

साकटा—स्त्री कळकाची काटी, शकाटी –कृषि ४९४

साकड–डा—वि १ अडद आकुचित स्थानचा (जागा, भाडें इ०) 'ऐसें श्रीहि साकड। गर्मी लाग।'–ज्ञा १४ १६१ २ घट आवळ ३ आखुड, योग्य (वस्त्र पादत्राण, इ०) ४ कठीण तैसीं स्वधर्मु साकडु। देखोनि केला जरी कडु।–ज्ञा १८ ९०६ म्ह०घर साकड बाईल माकड साकडें–क्लीन १ अड चण, सकट जी विनामणी हाता चढे। तरी वांछेचें कवण साकडें।–ज्ञा ३ २३ २ खड्डा गर्ता नद्या पर्वतीहूनि कोसळल्या। नाना साकडीमधे रिचवल्या।'–दा १६ ४४ ३ कोडें विचार ४ ओझें भार [स सकट] साकडणें–क्रि सकटात सापडणें अवघडणें अडचणणें 'स्वर्ग साकडलें। दोन्हा मार्गी। ज्ञा ११ ३२९ ६ २१४ साकडी–स्त्री साकड

साकडा—पु गाडीची बैठक [सांगाडा]

सा–(सा)कण—स्त्रीन गाडीची आख व आखरी, धुर व जू याना एकत्र बाधणारी दोरी

सा(सा)क(ख)णें—अक्रि गोटणें, बोळणें घट्ट होणें थिजणें साकविणें–प्रयोजक क्रि गोटविणें घट्ट करणें [स सच्]

साकणें—क्रि (खा) चाखणें 'रामा है थोरें मायुक पयलें मांझा हार दातावीं साकी विहेनें '–शिशु २७

साकर—स्त्री साखर पहा साकरेची कीज कुराडी। कवितालतमी। –शिशु १८

साकर—पु पान मोरी इ० मधील प्रवाह अडविणारा केर, पातरा काटक्या वगैरे जमतो तो गाळ २ गातेगोलसे वेळेस शब्द नीट उमटविण्यास प्रतिबध करणारा गळ्यातील कफ श, वेडका खाकरा [सं सकल्]

साकरू—न (खा) रताळें कद [शर्करा]

साकल्पिक—वि सकल्पिलेलें योजलेलें, टरविलेलें

साकल्य—न १ सकलता, सपूर्णता नि शयता २ सर्व समुदाय एकदर आकार जमा गोष्ट (समासात) साकल्य वर्तमान वृत्त–अर्थ [स]

साकव—पु (राजा) तात्पुरता पूल साकू पहा

साकशा—पु कासाराचें एक हत्यार –बदगापूर ९६ [साइस]

साक(ग)शी—स्त्री वरडी, रावळी हिला बन्दरीं आंकण नसून नीणहि घट नसते

सा(सा)कळ—स्त्री १ साखळी, शृंखला साखळ पहा २ बडी 'त्यावरी पवनास साकळा।'–उषा ६९ ३ बाध, कुपण, सींव –शिशु १८३५ [स शृखला प्रा सकल] ०कर–पु भिक्षेकऱ्याचा एक पथ व त्यातील व्यक्ति याच्या जवळ एक साखळी असून ती त आपल्याला मारून घेतात साकळण–स्त्री प्रतिबध, मना करणें (क्रि० करणें) 'भेजी होती रुक्मिणी। तीसही साकळण कल्लीं।'–व ४६६ साक ळणें–उक्रि १ सांखळीनें बाधणें २ नियत्रण करणें साकळ दड–पु मोठी जाड साखळी साकळराशि–स्त्री (गणित) त्रैराशिकाची एक रीत साकळी–स्त्री (साकळचें अल्प रूप) साखळी पहा साकळी व्यायाम–पु व्यायामाचा एक प्रकार

साकळणें—अक्रि १ गोठणें घट होणें, बोळणें साकणें पहा २ बद्धकोष्टानें युक्त असणें (आतडीं मागुस) सा–(सा)कळा–पु १ घट्टपणा, घनता (क्रि० धरणें) रक्तानें साकळा धरला' २ गोळा गाठ ३ बद्धकोष्टता मलावष्टभ (क्रि० करणें) 'पोटानें साकळा धरला' ४ खडा (परसाकडेचा) [स सम्+कल्]

सा(सा)कळी—स्त्री पुराचा पाट लोंढा (नाल्यात, खाड्यांत घुसणारा) (क्रि० फुटणें, पडणें भरणें)

साकळी—स्त्री (गो) गळ्याची लोंबती कातडी, पोळी

सा(सा)का—पु १ दागिन्याला डाक लावण्यासाठीं केलेलें मिश्रण (तांबें व चांदी किंवा सोनें यांचें) २ सोन्याच्या दागि न्यात स्वार्थानें घातलेली दुसरी हिणकस धातु किंवा एखादें मिश्रण ३ पाण्याच्या प्रवाहातून वाहून आलेला गाळसाळ पुलीन ४ साकळ पहा ५ खाली बसलेला पदार्थ (न विरघळणारा) अवि द्राव्य पदार्थ ६ (शिवणकाम) उरलेलें कापड जाकीट साक्यात बसविलें '

साकाटा—पु १ मागाडा पहा २ सापडा पहा

साकागे—पु (गो) गोणपाटाचा तुकडा [इं स्वकिएट]

साकार—वि आकार असलेलें, आकारयुक्त निश्चित आकृति आकार देह असणारा याच्या उलट निराकार –अमृ १४ [स+आकार] साकारणें–अक्रि आकार, देह धारण करणें,

मूर्तिमान होणें –एभा ६ ५६, 'आदि पुरुष हा साकारला।' –राधि १.

**साकांक्ष**—वि १ उत्सुक, इच्छा असलेला, कामनायुक्त 'योगादिकें साधनें। साकांक्ष आराधनें।'–ज्ञा ३ ९० २ श्रद्धालु 'राजा परमार्थे साकांक्ष। देखोनि सार्थक वयेचें लक्ष।' –एभा ३ ३१ ३ सदायुक्त 'तुम्हा बोलु आम्हा। साकांक्षु पैं जी।'–ज्ञा १७ ३४ [स+आकाङ्क्षा] **साकांक्षित**-वि चुकीचा प्रयोग आहे उदा० साकांक्षित स्नेह काक्षायुक्त, सशययुक्त.

**साकी**—स्त्री पत, साक-ख पहा

**साकी**—स्त्री एक मराठी वृत्त यात दोन चरण असून शेवटीं यमक असतें प्रत्येकात चार मात्राचा एक असे सात गण असतात उदा० 'जनकमखातें मुनिसह जाता, प्रभुनें गौतम भार्या।'

**साकी**—वि (जुनरी) मागचे दोन पाय घोट्याखालीं पाढरे असणारी (मेंढी)

**साकी**—पु दारूचा पेला भरून देणारा (गुत्त्यातील) पोऱ्या [अर]

**साकीबाकी**—स्त्री बाकी शिल्लक बाकीसाकी पहा [बाकी द्वि]

**साकीन**—वि पु राहणारा, रहिवासी 'मधुकीर गोसावी साकीन अबोर्ड'–रा १५ १३८ [अर साकिन्]

**सांकुव**—न अडें 'मग विष्णु कोपौनु समुद्राकरि साकुवें आणविलिं।'–पव १ ४१. [साकू]

**सांकुळणें**—अकि गोठणें, थिजणें, साखळणें पहा

**साकू**—पु तात्पुरता, सरासरी केलेला पूल 'मध्यें साकूतर हिलाल लाविले'–ख ४०७१ [१ स शकु-सकू-साकू-राज वाड, हिं साखू]

**सांकू**—न (कातकाडी) कोंबडीचें अडें –बदलापूर १२८ साकुव पहा

**सांकूळ**—न मोरी, पाट, इ० त अडकलेलें गवत, काटक्या, केर इ० गाळसाळ साकळ पहा

**साकू(खु)ळ**—स्त्री १ (शेतकी) (राजा कुण) भाजा वळ करण्यावर न जळलेला अर्धवट राहिलेला राब, केरकचरा २ चेंदामेंदा ०**काढणें**—अर्धवट जळलेला राब पुन्हा जाळणें

**सा(सां)कें**—न डाक, साका पहा 'परि पधर किडाळा मिळत। तें काय सांकें नोह।'–ज्ञा ८ ३८

**सांकेतिक**—वि १ सकेतासबधी सकेत पहा २ विशिष्ट खुणा, चिन्ह हावभाव इ० नें युक्त, दर्शित केलेलें ३ पारिभाषिक, सांज्ञिक 'हें भूमिनिशास्त्रानलें साकेतिक पद होय'–सुत्री ३९ [स] ०**लेखन**–न एखाद्या शास्त्रातील विशिष्ट चिन्हें वापरून केलेलें लिखाण (इ) नोटेशन 'गवयास गायनाची शास्त्रोक्त माहिती व सदरहूचें साकेतिकलेखनही अवगत असावें'–कला ८

**सांके(को)रा**—साकर पहा

**साकेवप, साकेणें**—क्रि (गो) थिजणें, साकणें पहा

**साको(कु)ली**—स्त्री (कर) पाणथळ दलदलीची जागा.

**सांक्रामिक**—वि सासर्गिक [स]

**साख**—स्त्री १ पत (व्यापारी), साक, अब्रू (क्रि० वाढणें) २ लौकिक, अब्रू [स साक्ष्य?] ०**बाज**-वि पतीचा, अब्रूचा ०**बाजी**–स्त्री (व्यापारात) पत, अब्रू असणें **साखी**–स्त्री १ पत, अब्रू २ सचोटी, प्रमाणिकपणा साकी पहा 'तुम्ही चागली साखीचीं माणस' –ख २९५ ३ प्रमाण, साक्ष्य 'मंत्रतत्र नहिं मानत साखी। प्रेमभाव नहि अतरराखी।'–तुगा ४३२ **साखसुरत**-वि १ दुमदार, प्रमाणशीर २ सुरेख, नीटनेटकें 'साखसुरत पोशाख विद्यार्थ केला की मोठा सभावित दिसतो' –विवि ८ ८ १५५ ३ पद्धतशीर, सशास्त्र, योग्य ४ पटेल असें तयार केलेलें, बाधलेलें, रगविलेलें (जागा, भाषण, लेखन, इ०) साखसुरत पहा –क्रिवि १ उघडपणें, राजरोस 'सहज साखसुरत जनाना चालला असता'–सुर्यप्र ११ २ प्रत्यक्ष, साक्षात् –खिपु १ १५ [साख+सुरत]

**साखणें**—अक्रि थिजणें, घट्ट होणें, गोठणें साकणें पहा

**साखर**—स्त्री इतर पदार्थ गोड करण्यासाठीं वापरण्यात येणारा एक पीठ, रेती यासारखा गोड पदार्थ, शर्करा, खाड ऊस, बीट इ० पासून ही तयार होते 'साखर वाढिली रायपुरी।' –मसाप २ १ [स शर्करा, प्रा सक्करा, फा शकर्, तुल० फ्रें स्युक, सॅकरीन, इ शुगर] म्ह० १ साखर (साखरेचा) खाणार त्यास देव देणार २ साखर खाईल तर ढेकर देईल ३ ह्रातावर साखर आणि मानेवर कातर (=मनात कपट पण बाहेर वर्तन गोड) (वाप्र) **साखर खावप**-(गो) साखरपुडा करणें, लग्न ठरविणें **साखर पेरणें-पसरणें**- १ गोड गोड बोलून वश करण्याचा प्रयत्न करणें २ तोंड देखल्या गोड बोलणें **साखरेची साल काढणें**-अतिशय सूक्ष्म व बारीक परीक्षा, छाननी करणें, नसता कीस काढणें (निंदार्थी वापरतात) 'पारिभाषिक शब्दाच्या बाबतींत इतकी घासाघीस करणें हें साखरेची साल काढण्यासारखें वेडेपणाचें आहे'–(पावशे) मराठींतील अजागलांचें उच्चाटन **साखरेची साल काढणारा**-अतिशय कडक, खाष्ट, बारकाव्याच्या दोषैकदृष्टि माणसाबद्दल निंदार्थी वापरतात **साखरेनें तोंड भरणें, तोंड भरून साखर घालणें**-चागले गोड बक्षीस देणें, तोंड गोड करणें सामाशब्द- ०**किडा**-पु १ मुंगळ्या साखरेवर उपजीविका करणारा एक किडा २ (ल) ज्यास साखर फार आवडते असा माणूस ०**गोटी**-स्त्री एक लहान पण

गोड आंब्याची जात. ०गोळा-पु. लाडू; पक्वान्न 'इंग्रजी झाल्यापासून दारूगोळा तर गेलाच पण साखरगोळाही दुर्मिळ झाला.' –टि १.४००. ०चुंबा-पु. चुंबन; गोड पापा. 'अरुणानें नभश्रीचा साखरचुंबा घेतला.' –विविधवृत्त रासअंक (स्त्री हृदय) १९२८. ०चौथ-स्त्री. (महारी) भाद्रपद वद्य ४. –बदलापूर १७४. या दिवशीं चतुर्थीचा उपास पाळतात. ०जांब-पु गुलाबी जाब. ०झोंप-पु. अरुणोदयाच्या वेळची झोंप (ही फार सुखकर वाटते म्हणून नांव). 'लग्न म्हणजे संसाराचा सुर्योदय होण्याच्या आधींची ही साखरझोंप होय.' –रंकाचें राज्य ७. ०नातें-सक्करनातें पहा. ०निंबी-लिंबी-स्त्री गोड लिंबाचें झाड. ०निंबू-लिंबू-न. गोड लिंबू. हें फळ नारिंगाएवढें असून औषधी आहे. ०निंबोळी-स्त्री. एक लहान फळ. 'वरि मंडप साखरनिंबोळ्याचे घोंस पोसले।'–अमृत ३४. ०पाडव्या-पु. एक मुलाचा खेळ. 'विटीदांडू, चेंडूलगोऱ्या, लपंडाव, कावडी। साखरपाडव्या, भोंवरे, चक्रगोट्या परवडी।' –होला ५४. साखर पेंडयां. ०पाणी-न. साखर व पाणी. हें पाहुण्यास आतिथ्य म्हणून देत १ लिंबाचें सरवत. २ (व्यापक) फराळाचे पदार्थ. ०पारा-पु. दुधसाखर व रवा यांच्या वड्या. [फा. शक्र्–पारा] ०पुडा-पु १ विवाहनिश्चयाच्या प्रसंगीं वधूच्या हातांत साखरेचा पुडा देऊन इतरांस पानसुपारी वाटतात तो समारंभ, औपचारिक वाङ्‌निश्चय. 'तिच्या सासरच्या मंडळींनीं मुलीला घरीं नेऊन साखरपुडाहि केला.' —स्वप ६५. २ अशा वेळीं देतात तो साखरेचा पुडा. ०पुरी-स्त्री. भेजवानींत मुख्य पक्वान्न पुरी असेल तेव्हां योजतात (कारण तीबरोबर साखर वाढतात.) ०पेंढ्या-भाद्रपद–आश्विन महिन्यांतील गवताच्या पेंढ्यानीं खेळावयाचा एक खेळ. ०पोळी-स्त्री. पुरणासारखी साखर घालून तयार केलेली पोळी –गृशि ३८५ ०फुटाणा-पु वेलदोड्याचा दाणा-फुटाणा इ० वर साखरेचा पाक चढवून करवंदाएवढी करतात ती गोळी, एक मिठाईचा पदार्थ ०फेणी—स्त्री. साखरेचा मोठा बत्तासा. 'साखरफेणी वाटिली।' –मसाप २१. ०बोंड-न. पिठात साखर घालून तळलेलें भजें. ०भात-पु साखर व केशर घालून केलेला भात, केशरी भात 'साखरभात वाढला बरा।' –मसाप २.१. ०मांडा-(कर्ना) मांडा (हा साखरेशीं खातात यावरून). ०रंगी-वि गुळी साखरेच्या रंगाचें (वस्त्र). ०लाडू-पु वरीचशी साखर घालून तयार केलेला पिठाचा लाडू ०वडी-ळी-स्त्री एक गोड पक्वान्न. ०सुपारी-स्त्री साखरपुडा पहा. 'साखरसुपारी वाटिती सुंदर नारी।' –वसा ४६. **साखरी गोडांबी**-स्त्री. साखरेच्या पाकानें मढवून फुटाण्याप्रमाणें केलेली काजूची बी. **साखरेचा**-पु (सांकेतिक) मुका, चुंबन. **साखरेची सुरी**-स्त्री. (ल) वरून गोड पण मर्मभेदी भाषण, असें भाषण करणारा, गोड बोलून मान कापणारा मनुष्य. 'या चांडाळाच्या हातांत साखरेची सुरी भोंसकून केंमानेंच मान कापली पाहिजे.' –संभाजी **साखरोळी**-स्त्री. मोहन घालून केलेलें रवा किंवा तांदुळाच्या पिठाचें पुरीसारखें पक्वान्न. –गृशि ३९३. [साखर+पोळी]

**साखरशेला**—पु आखूड, लहान शेला. सांकड पहा. 'आजि तुम्ही बसा। साखर शेले नेसा।' –मसाप २.३५६. (विहिणीच्या गाण्यांत शब्द येतो). घट्ट विणीचा शेला.? [सांकड= आंखूड, लहान+शेला]

**सा(सां)खळ**—स्त्री. १ मोठी सांखळी. २ रांग; ओळ; पंक्ति उदा० दांतांची सांखळी. ३ बेडी; बंधन. 'नियमांचिया सांखळ। वाहणें सदा।' –१८.६३७ ४ संबंध, जोड. 'प्रजेचे हक व राजाचे हक यांचा एकमेकांस कोणते रीतीनें सांखळ आहे...' इनाम ८०. ५ (खा.) कडी (दाराची). साखळ-वर, सांखळणें, साखळदंड इ० समासासाठीं सांकळ पहा. [सं. शृंखला; प्रा. संखळ] **सा(सां)खळी**-स्त्री. १ अनेक कड्या एकमेकांत अडकावुन केलेली एक दोरीसारखी रचना. ही बांधण्याच्या उपयोगी. २ चांदी–सोन्याच्या कड्याचा एक दागिना (पायांत किंवा कमरेंत घालण्याचा). 'पदकयुत गळ्याच्या सांखळ्याही विशेषा।' –सारुह ३.३८. ३ (व.) दाराची कडी. ४ मुलींचा एक खेळ. ५ (पैमाप) जमिनीची मोजणी करण्याचें ६६ फूट लांबीचें व शंभर कड्यांचें एक माप. **सांखळें**-न. (महानु.) १ सांखळी; माळ. 'कंठीं शब्दवेधाचें सांखळें।' –शिशु १११. २ साखळी.

**सा(सां)खळणें, साखुळणें**—अक्रि. १ गोठणें, थिजणें; घट्ट होणें; खडा होणें. २ (शेत) राबातील गाळसाळ काढणें. [सं. संकलन] **सा(सां)खळा**-पु १ घट्ट झालेली अवस्था; साकळा. २ मलावरोध, बद्धकोष्ठता. (क्रि०धरणें) ३ तुंबणें; तुंबारा. **सा(सां)खळी**-स्त्री. १ नदीला पाणी चढलें असता तिला फुटणारा पाट. २ नदीला घातलेला बांध; नदी अडविणें (उतारासाठीं).

**सांखारा**—पु. १ केळीच्या सोपाचें पाणी, आल्याचा रस, भिजलेले गहूं, रताळीं इ० वाटून त्याचें पाणी यासारखे पदार्थ भाड्यात घालून ठेवले असता त्यात खालीं जमतो जो घनांश तो; सांका. २ पाण्याचा प्रवाह अडविणारा गाळसाळ, केरकचरा इ०. [सं. संकलन]

**साखाळा**—स्त्री. (महानु.) शाळा. 'साखाळाचिया उंचिया। पाता दृष्टी टाचिया।' –ऋ १६.

**साखेय**—वि. स्नेहशील, मित्रभावाचा. [सं]

**साख्त**—स्त्री. १ संबंध, सख्य. 'कोणाचें म्हणणें रावे शिंदे यांसी साख्त आहे.' –रा ७ १९५. २ बजावणी. 'आपला

जिम्मा साख्त करीत जाईल.' –रा ८.२१७. [फा साख्तन्= करणें]

**साखता**—पु चिलखताचें जयनपत्रक. –राव्य ५.१५ [फा. साख्त]

**साख्य**—न. मैत्री; सहवास. [सं.]

**सांख्य**—नपु १ ज्ञान, तत्त्वज्ञान. २ एक दर्शन (षड्दर्शनांपैकीं). 'वेदरायाचिया राजधानीं। सांख्यवेदांताच्या भुवनीं।' –ज्ञा १८.२७९ ३ विचार, मत. 'मग उघड करूनि पोढवा। जें हें आणिमीत सांख्याचिया गावा।–ज्ञा ७.४३. ४ विशिष्ट संन्यास मार्ग. –पु ज्ञानी लोक सांख्यशास्त्रास अनुसरणारा 'एकु ज्ञानयोगु म्हणिजे। जो सांख्यीं अनुष्ठिजे।'–ज्ञा ३.२६. [सं] ०योग–मार्ग–निष्ठा–चित्तशुद्ध्यर्थ कर्मे करून ज्ञानप्राप्ती नंतरकर्म त्यागपूर्वक घेतलेला संन्यासमार्ग. –गीर १०१.**सांख्यो**–वि १ सांख्य मतानुयायी २ सज्ञानी –हंको

**साग**—पु एक झाड, याचें लाकूड इमारतीच्या कामीं फार उपयोगी आहे; सागवान. [सं शाक, प्रा साग] ०**वान**–पु साग २ (न) सागवृक्षाचें जंगल ३ सागाचें लाकूड (बांधकामासाठीं रचून ठेवलेलें) ०**वानी**–वि. सागासंबंधीं, सागाचें, सागली. **सागली**–वि. सागाचें; सागवानी.

**सांग**—स्त्री. एक प्रकारचा सबंध लोखंडी भाला. हा लोखंडी गजासारखा असून टोंकास भाल्याप्रमाणें टोंक असतें. 'देती यापरी हृदयांत नव्या सांगा।'–मोउद्योग १२ ७९. [हिं. सांग, सिं सांगि] **सांगुणी**–स्त्री अव शस्त्रविशेष. 'रीसौनि वैराग्य वळनी। भेळोनि विवेक सांगुणी।'–ऋ ५६.

**सांग**—वि १ सर्व अंगासहित, एकुणएक गोष्टींसह –एभा ७६३८ २ समग्र, संपूर्ण 'केली यात्रा सांग निघाले तेथोन।' –रामदासी २.६१. ३ यथास्थित; पुरेपूर. 'भोगितांही सांग। कांटाळे मन।'–ज्ञा ६.४४२. ४ अव्यंग, निर्दोष. –ऐपो १०९ [स+अंग] ०**ता**–स्त्री १ पूर्तता; संपूर्णता, यथास्थितपणा (सर्व साधनें जमून, सर्व संस्कार होऊन–विवाहादि कर्माची) २ (ल) कर्माची पूर्ति करण्यासाठीं घातलेलें ब्राह्मणभोजन व दिलेली दक्षणा ०**संपूर्ण**–वि. पूर्ण आणि समग्र सांग पहा ०**सरभरा**–स्त्री सर्व प्रकारची, संपूर्ण मदत, एकंदर मदत. **सांगोपांग**–वि सर्व अंगें, उपांगें, भाग, ल्हानमोठ्या, प्रधान गौण गोष्टी यांसह. यथासांग (विवाह, यज्ञ, इ० विधि) 'तैसा सांगोपांगु। निपजे जो योगु।'–ज्ञा १७ १८२. [स+अंग+उपांग]

**सांग**—स्त्री धा नाम. १ सांगणें, सांगणी, निरोप (क्रि० सांगणें) 'प्रियवधुसि वराला सांगतां सांग झाला.'–आमा ९. २ आज्ञा, हुकूम [सांगणें] ०**कामी–म्या**–वि १ स्वतःची बुद्धी न चालवितां नुसतें सांगितलेलें काम करणारा; वेळेप्रमाणें वागण्याची अक्कल नसणारा (निंदाव्यंजक उपयोग). २ ज्यानें नुसतें सांगितलेलें काम करावयाचें आहे असा; नुसता तंतोतंत हुकूम पाळला पाहिजे असा. (वाप्र) **सांगीतल्या कामाचा दिल्या भाकरीचा**–केवळ सांगितलेलेंच काम करणारा व मिळेल तें खाणारा. ०**सरभरा**–स्त्री. १ बोलण्यानें, (एखाद्याबद्दल) गौरवानें सांगून, शिफारस करून मदत करणें. 'त्यानें स्वतः कांहीं दिलें नाहीं पण माझी सांगसरभरा अशी केली कीं माझें लग्न झालें' २ मदतीच्या थापा देणें; शाब्दिक मदत 'होय, हा माझा मायबाप खरा. त्यानें असें करीन तसें करीन, हें देईन तें देईन म्हणतां माझी सांगसरभरा केली.' ०**सुगरण–सुग्रण**–वि नुसती बोलण्यांत हुषार; तोंडपाटिलकी करणारी स्त्री. 'मावशी म्हणजे सांगसुग्रण, चुलीजवळच्या नुसत्या गप्पा.' ०**सुगराई–सुग्राई**–स्त्री. बोलण्यांत शहाणपणा. **सांगणा**–वि निरोप्या, बोलावणेकरी. –खिपु २.४ १२. [सांगणें] **सांगणी**–क्रि १ शिकवण; आदेश, सूचना २ सांगणें; बोलणें, निरोप (क्रि० सांगणें) ३ शिकविण्याची, समजूत देण्याची पद्धत **सांगणीचा**–वि. १ वधूपक्षीयांनीं वधूकरितां द्रव्य किंवा कांहीं मोबदला न घेतां तिचा केलेला (वाङ्निश्चय, विवाह) २ अशाप्रकारें विवाहित। (कन्या). **सांगणें**–सक्रि १ कळविणें; कथणें. २ करण्याविषयीं आज्ञापिणें, सुचविणें (काम, मामलत, अधिकार, रोजगार, चाकरी इ०). ३ बोलावणें, निमंत्रण करणें (भोजन, समारंभ इ० स). ४ शिकविणें, समजावणें (अध्ययन, ग्रंथ, विद्या इ०). ५ म्हणून दाखविणें (विद्यार्थ्यांस शिक्षकास, धडा इ०). [प्रा संघइ–तुल० सं. सांगतिक= गोष्टी सांगणारा, मनु ३ १०३] (दुखणीं, संकटें, कुकर्में इ०नीं) (अवघड, कठीण, जड) **सांगणें**–(त्याचा) परिणाम कठीण होणें. **सांगून येणें**–विवाहासाठीं देऊं करणें (मुलगी). 'माझ्या भावास एक मुलगी सांगून आली आहे' **सांगणोवांगणी, सांगा(गी–गो)वांगी, सांगासांगी**–स्त्री. १ प्रत्यक्ष प्रमाण नसतां एकानें दुसऱ्यास, दुसऱ्यानें तिसऱ्यास सांगण्याची परंपरा, ऐकीव गोष्ट, गप्पा 'सांगणोवांगणीचें काम नव्हे। आपुल्या अनुभवें जाणावें।' –दा १०. १०.५३. २ गप्पा छाटणें, बकवा करणें. ३ एखादी गोष्ट अनेकांना सांगणें, बोभाटा करणें [सांगणें द्वि] म्ह० सांगासांगीं वडाला वांगीं **सांगता**–वि सांगणारा 'हरिकथेची महिमा कैसी। आदरें पुसतां सांगत्यासी।' –एभा ३ ५८७. **सांगावा**–पु (माण क) निरोप. 'मला तुमचा सांगावा पोंचला नाहीं' **सांगी**–स्त्री सांग पहा १ निरोप २ उपदेश, समजावणी 'दुष्टाच्या सांगीवरून आयेल्लोंची दुर्गति झाली.' –विवि ८.४ ८२ ३ आज्ञा, हुकूम. **सांगिजणें**–सांगणें, सांगि

शको. ७. २७

तलें जाणें –विपू ७ ७९ ‘कसें कार्या या तुम्हीं सांगिजे तें।’ –र ३८ ‘मग आणिकु उपचारु केला तेहीं। तो सांगिजैलु आतां।’ –शिशु ७७२

**सागटा**—पु सांगाडा सांटा

**सागठ्या**—वि (क) सहा बोटांचा [सा=सहा+अगठी]

**सागड**—सागळ पहा

**सागड-डी**—पुस्त्री १ दोन होड्या किंवा नावा एकत्र बांधून केलेलें जल्यान २ (स्त्री) दोन किंवा अधिक भोपळे, नारळ इ० फळें जनावरें, माणसें यांना एकत्र बांधून केलेली रचना ‘एवीं वेदत्रयाचिया सांगडी। घतल्या अद्वयाचिया घोंडी।’ –ज्ञा ७ ८४ ३ (सामा) तरून जाण्याचें साधन, नाव होडी ‘योगी संस्कृति सागरांत म्हणती ज्याच्या पदा सांगडी।’ –मोकृष्ण २६७ ४ जोडी सोबत मैत्री ‘शिंदे यांची जन्माची सांगड होती तों पावतों ब्राह्मणांसही आमचा वचक होता’ –भाव ३७ ५ कातान्याच्या हत्याराचा एक भाग; यानें तो कातावयाची वस्तु घट्ट बसवून ठेवतो लाकूड कातण्याची बैठक [स संघट्ट संघाटिका=युग्म] ०घालणें–संबंध जोडून देणें, मेळ घालणें ‘वरील दोन कल्पनांची सांगड घालून दिली आहे’ –टि ४ ११ **सागडीस धरणें**–निकटसंबद्ध होईं असें करणें **सागडणें**–उक्रि १ (अनेक पदार्थ) सांगड होईं असे संबद्ध करणें २ (व्यापक) सुट्ट नये इतस्तत होऊ नये म्हणून बांधून ठेवणें **सागडणी**–स्त्री एकत्र गुतविणें जोडणें **सागड बाहुली** स्त्री कळसूत्री बाहुली पुतळी **सागडा** पु सांगड भोपळ्याचें पेटें **सागडी–ड्या** वि सांगड नेणारा, नावाडी ‘सांगडिया स्त्वर यईंधा।’ –देप ४ **सागोड**–स्त्री (गो) सांगड (दोन होड्यांची) करून तीवर देवतचा रथ ठेवून तळ्यात मिरवणूक काढतात ती

**सागड तोडणें**—क्रि (राजा) ग्रामदेवतेस बलिदान करणें –आडिवऱ्याची महालक्ष्मी ८

**सागडा**—वि सारखा सदृश ‘म्हणौनि सूर्यं सूर्यांचि येवढा। चद्र चंद्राचि सांगडा।’ –अमृ ७ २८८; –शिशु ८७१

**सागडी**—स्त्री (गु) विहीर खोदण्याच्या उपयोगाची एक लोखंडी पहार हिच्या एका बाजूस अणकुचीदार टोंक व दुसऱ्या बाजूस आकडा असतो या आकड्यास दोर बांधून तो कप्पीवरून घेतलेला असून त्याचें टोंक विहिरीबाहेरील माणसांनी हातात धरून ही पहार विहिरींत सरळ जाऊन आपटेल व भोंक पाडील असें सोडावयाचें असतें

**सागाडा**—पु वस्तूच्या आकारास आधारभूत रचना (शरीर गाडा, पलग नाव छत्री इ० स दांडे, लांकडें इ० च्या आधारानें झालेली यावरून चमादि वेष्टन होऊन वस्तु पूर्ण होते) सांपळा खोका २ मोठी, अवजड वस्तु प्राणी, धूड मढें ३ विहिरींतील चौकट [स सम्+घट्] **सागाडी**–स्त्री विहिरीच्या भिंती पडू नयेत म्हणून तळाशीं दिलेली आधारचौकट

**सांगाडी**—स्त्री (घातकाम) कातण्याचें यंत्र सांगड ५ पहा

**सागर**—पु १ समुद्र ‘सगराकरितां सागर म्हणती।’ –भूपाळ्या १५ २ मोठा साठा, खाण, आगर जसें –गुणसागर, करुणासागर इ० ‘हा वेदार्थसागरु।’ –ज्ञा १ ७२ [स] **सागराम्ब**–पु एक जातीचा मासा –प्राणिमो ८७

**सागरगोटा**—पु सागरगोटी वेलीचें बी, गजगा मुली सागरगोट खेळण्यासाठीं घेतात **सागरगोटी**–स्त्री एक औषधी वेल हीस कांटे असून पिवळीं फुलें येतात हीचें बी तो सागरगोटा

**सागरा**—पु (कु) घागरीसारखें भांडें

**सागरी**—स्त्री (खा) मुळ्याची शेंग; डिंगरी

**सागलाग**—पु १ मनाचा कल लक्ष २ पाठलाग, प्रयत्न बेत, योजना ३ हेतु ध्येय उद्देश (क्रि० साधणें, लागणें बसणें बांधणें ठेवणें धरणें इ०) [लाग द्वि]

**सागवली**—स्त्री लागवडीखालची जमीन [का सागिसु–लागवड करणें]

**सागशी**—स्त्री एक प्रकारची टोपली करडी साकशी पहा

**सागळ**—स्त्री बकऱ्याचें कमावलेलें कातडें हें मऊ असून जोडा इ० ला वरच्या बाजूस लावतात [स छाग] **सागळा**–वि (महानु) कातडी, कातड्याचा ‘पखाला तथा पोहरा सागळा जे।’ –प्रमा २८ –तुग ३२१९

**सागळा**—पु पाण्याची झारी धरणारा नोकर शागीर्द ‘मीचि होईन सागळा। करू सुईन गुरुळा।’ ज्ञा १३ ४१८

**सागळ्या**—वि सहा बोटांचा; सांगठ्या [सा=सहा+अगुली]

**सागा**—पु (को) बकरी मेंढ्या इ० चा कळप

**सागा**—पु तात्पुरता पूल साकू पहा –तीप्र ४१

**सागात**—पु (गो) संगत सोबत ‘अविद्येचा आवर्तं। जेथ न बाजे त्रिवर्तं। सुरेजय पैं सांगात। गुणत्रयाचा।’ –सिस ३ [संगत] **सागातिणी–तीण**–स्त्री सखी; मैत्रीण ‘चित्ररेखा तिची सांगातिणी। प्राणाहूनि आवडे।’ –ह २८ १९ ‘विरहें व्याकूळ पडली उखा। सांगातीण धांवली चित्ररेखा।’ –कीर्तन १ ७५ **सागाती**–वि पु सोबती, मित्र ‘कैवल्य मार्गींचा अभिज्ञ। सांगाती हा।’ –ज्ञा १६ ९९ ‘इष्ट मित्र आणि सांगाती। आपुलाले घरा जाती।’ –रामदास (नवनीत पृ १५९)

सांगातीं-तें-शभ बरोबर, सह, समतीं पहा. 'काय खातों आम्ही कासया सांगातें। कैसें हें लागतें नेणों मुखीं।' -तुगा २५ सांगातें जाणें-सती जाणें

सागु(गो)ती—स्त्री खाण्यायोग्य असें प्राण्याचें मास बहुधा बकऱ्याचें मास [ स छाग, हिं सगोती ]

सांगुळणें—अक्रि (र्दो) गोठणें, साखळणें पहा

सागू—पु १ एक झाड, याचा साबूदाणा होतो २ याच्या सत्त्वाची गोळी, साबूदाणा [मलायी सागू] ०दाणा, सागूचे तांदूळ-पु सागूच्या गोळ्या, साबूदाणा

सा(सां)गूळ—स्त्री (को) १ फणसाच्या गऱ्याभोवतीं असणारा तंतु, पाती, चार २ चार अठळयासकट फणसाची भाजी, सवंध फणसाची भाजी [ सागळ ]

सागोपान—न (प्र) सगोपन पहा

साग्या—पु साथीदार, मित्र, चोरी, चहाडी इ० कुकर्मातील सोबती [सगा] ०लाग्या-पु मदतनीस, साथीदार (वाईट कामात)

साग्यालाग्या, सागालागा—वि १ एखादी योजना, घटना घडवून आणणारा, युक्तिबाज लागलाग्या पहा २ ल्याडया, कारस्थानें करण्यात ज्याची बुद्धि चालते असा. 'पाचसात सागलागे जमविले आणि दरोडा घातला' [सागलाग]

साग्र—वि १ तीक्ष्ण, अणुकुचीदार टोंक असलेला २ समग्र, सगळा [स+अग्र] ०निद्रा-झोंप-स्त्री (अशुद्ध प्रयोग) गाढ झोंप

सांग्रामिक—वि संग्रामासंबंधी, युद्धविषयक, लष्करी [सं]

साग्यात, साग्याद—स्त्री (गो) भेट, नजर -सह्याद्रि १०४ [पोर्तु साग्वात]

सांघणा-नी—स्त्री (महानु) धाड, चाल 'कामाख्या कामवाणी वृजयुवती गणी साघणी मन्मथाची।' -गस्तो २४ -ऋ ८३ [सघात]

साघणें—क्रि सागणें पहा 'तेथ चापेकळिकाची कुसरी। काई साघों।' -शिशु ६३२.

साघात—पु सयोग, मिलाफ 'ना तरी प्रलय वन्हि महावातु। या दोघा जैसा साघातु।' -ज्ञा १ ११८ २ समूह, मडळी 'सर्पसाघातु न साहे।' -एभा ९ १६० [स सघात]

साच—वि १ सत्य, खरा -ज्ञा २ १६ 'सर्व जाणे एक विष्णु साच खरा। आणिक दुसरा नाहीं नाहीं।' -तुगा ११ २ वास्तविक, खराखुरा 'ठाव नाहीं बापाचा। अकुळी साचा श्रीकृष्ण।' -एरुस्व २ ३ ३ समर्थ, बलवान 'यणें दळ भाड आघवा। साचु आमुचा।' -ज्ञा १ १२४ -न ब्रह्म 'मग साचाचेंचि रूप। होऊनि ठेलें।' -ज्ञा ५ १६० [स सत्य, प्रा सच्च] साचोकार-रें-क्रिवि खरोखर, सत्यपणें. 'लक्ष लक्षातीत आपण ब्रह्म साचोकारें।' -देप ९७ 'ऐसेंचि असेल साचोकारें। तरी मी सतुष्ट साचारें।' -मुआदि १९.३६, -ज्ञा ४ ९७ साचोकारा-वि. खरा, सत्य -एभा १ ३.

सांच—पु जागा, स्थल, अवकाश, समावेश होईल एवढी सोयीची जागा 'हें जाहाज फार ल्हान पडलें यामुळें यात इतकें खटलें रहावयाजोगा साच दिसत नाहीं' [साचणें]

सांचणें—अक्रि १ जमणें, एकत्र गोळा होणें, थोडा थोडा येत जाऊन साठा होणें (पाणी, धान्य इ० चा) 'आपुलें धन लोकावरी साचे। तें मागू जाता स्वयें बाचें।' -नव १४ १२१ २ सवर्धित, प्रज्वलित होणें. 'विपरीत ज्ञानदीपिका। साचली जे।' -ज्ञा १५ ८२ ३ साचविणें, गोळाकरणें, जमविणें, साठविणें 'कृपणा ऐसा साची अर्थ।' -दा २ १० ३५ [स सचयन] सांचवणी-स्त्री साचलेलें, साचविलेलें पाणी (तळें, हौद, डबकें इ० त विशेषत फारसा उपसा नसलेलें याच्या उलट वाहतें पाणी) 'जें साचवणी अल्पजल' -एभा २१ ११८ सांचविणें-उक्रि साठविणें, जमविणें, सग्रह करणें 'येक दोन कोटी वक्ष तुजसी। तें घेवोनि साचवीजे।' -कथा ६ १९ १४३ सांचा-पु सचय, साठा 'आला कराया बहु पाप साचा।' -मोकृष्ण ३४२ सांचा पडणें साठणें 'तिळें तिळें पुण्य साचा पडे। तरि हें बहुता जन्मीं जोडे।' -तुगा ७१२ सांचीव-वि साचलेलें (पाणी इ० वाहतें नव्हतें) सांचीव, सांचाल-वि तळें, हौद, इ० त साठविलेलें (पाणी)

साचर—स्त्री (बाधकाम) उघडी, साड पहा (इ) स्लुइस

सा (सां) चल-ळ, साचाल सां, (सा) चोल-ळ, साचोला—पुस्त्री पावलाची चाहूल (माणूस, प्राणी इ० च्या), आवाज, हालचालीचा शब्द 'साचलु न मोडितु। प्राणियाचा।' ज्ञा १३ २४५ -एभा ८ १९९ 'इतुक्यात साचळ एके। द्वारि देखा।' -कथा १ ६ १८७. 'तव साचाल जाला मार्गावरी।' -मुवन १६ १२८. 'म्हणे सखे हो एक एका। पाउलें वाजू देऊ नका। साचोळ ऐकोन गोपिका। जाग्या होतील निधारें। -ह ६ ४८ [स सचल्]

सांचा—पु १ ठसा, मुस, एकाच प्रकारचे अनेक पदार्थ तयार करण्यासाठीं केलेली विवक्षित घडण, यन्त्र 'ना तरी चतुरा ननाधिये साचे। काय आहाती स्फटिकिया अक्षराचे साचे।' -ज्ञा ११ २०८ २ एकाच जातीच्या पदार्थांचा समुदाय, जुळी (उदा० सारख्या लांबीरुंदीचे कागद, पानें, इ०) ३ नमुना, कित्ता ४ (कुंभारी) कावळे इ० करण्यासाठीं ज्यावर मातीचा गोळा घेतात

ती फळी हा शब्दावर वसविली असते ५ (मुद्रण) आठ, सोळा पानांचा एक भाग; फर्मा ६ संचय, साठा 'उपरि सक्टक साचे परतु गाचेजयात सुरसाचे।'–र ८ [साचणें]

**साचार**—वि (क्रिवि सारखा उपयोग) १ खरा, सत्य 'तैसी वोनी साचारी। अवतरो माझी माधुरी।' –ज्ञा १४ ३१ २ खरोखर –एभा ८ ५९ 'की अनेक वाद्यात साचार। यकचि नाद दुमदुमति।' ३ अकृत्रिम, खरासुरा 'मरगज स्तभी सिंहमूर्ती। साचारासारख्या हुकारती।' –मुसभा २ ३६ [साच] **साचारिव**-स्त्री खरेपणा 'जे साचारिवेचेनि विकें ब्रह्महो भेदी।' –ज्ञा १६ ११९

**साचिव्य**—न १ सचीवाचे काम, कारभार, मंत्रीपद २ मैत्री, साहचर्य [स]

**साज**—न (वॉ) एक प्रकारचें गवत, वेर ०भारा, **साजारा**-न साज गवताचा भारा, आळें **साजाची**-वि खार जमिनीचा एक प्रकार हींत साजाचें किंवा वेराचें गवत उगवतें

**साज**—पु १ लागणारें सामान साहित्य, साधनें, सरंजाम, कार्याला लागणाऱ्या सर्व गोष्टी (समुच्चयार्थी) २ नाचणारणी, गाणारणी, पोवाडेवाले तमाशेवाले, जादूगार इ० मंडळींना लाग णारीं हत्यारें पातारें, साहित्य, उपकरणें 'साज सारगी देत आणून। म्हणे नवरसे कुशलत्वपण। कळा दावी कुशळ कोणती।' –नव १९ ३८ ३ गाण्यानाचण्याच्या वेळीं पायात घुंगराचा चाळ बाधतात तो ४ पोशाख, जामानिमा, शृगार (कलावतीण, नव शिपाई इ० चा) ५ सज्ज तयार होणें, पोशाख घालणें ६ (सामा) नटण्यासजण्यासाठीं लागणारा पोशाख, वस्त्रें, इ० ७ थाटमाट शृंगारमंडण, नटणें 'बहु दिवसीं पति येता करि बहु मिथिला पतिव्रता साज।' –मोकृष्ण ८७ १५ ८ पखवाज ९ गळ्यातील एक दागिना [स सज्ज, फा साझ्] ०करी-पु वाजंत्री गवई तमासगीर, गोंधळी इ० च्या ताफ्यातील इसम ०सजागी वि साज, साजकारी 'साजसजोगी थोर प्रवीण।' –दावि३८१ ०**सरंजाम**-पु एखाद्या कार्याला लागणारें साहित्य, सामानसुमान ०**सामान**-न साधनें साहित्य साज अर्थ १ पहा 'साज सामान कूल लुग्न नलें' –ऐप २४ **साजणें**-अक्रि १ शोभणें, योग्य दिसणें 'ब्रह्मगोळकाचिया माळा। साजती जियेच्या गळा।' –शिशु ८७ २ चागलें योग्य समावणें [स सज्ज] म्ह० साजेल ते बोलावें आणि पचेल तें खावें **साजरा साजिरा**-वि १ सुशोभित, शोभिवत, अलकृत –एभा १८ तरी तो मदन तू तैच वरी। तेणें तू साजिरी। जगामाजी।' –कथा १ ३ १४० २ सुदर गोजिरवाणा, छान. 'कठीं हार साजिरा।' –भूपाळी गणपतीची म्ह० १ पुणताव्याच्या म्हशी आणि दोणगाव गाजरा २ फुल्का डोळा काजळानें साजरा

**साज(जि)रा गोजरा**-वि देखणा, सुंदर, 'पद्मावीण तळें, तिखट मुर्ती जो साजिरा गोजिरा।' –वामन स्फुटश्लोक (नवनीत पृ १३३) **साज(जि)रेपण** न सौंदर्य, शोभा, 'ऐक्याचें मुदल न ढळे। आणि साजरेपणाचा लाभ मिळे।' –अमृ १ ५९ **साजविणें**-क्रि शोभविणें 'उद्धरुनि पतित राम-प्रभु कीर्तिहुनी स्वकीर्ति साजविली।' –मो स्फुट आर्या (नवनीत पृ २५५) **साजावणें**-क्रि शोभिवत दिसणें, सुरणें 'परि तो पूर्णिमेसीच पूर्णत्वासी ये। आणि कळकें साजावला होय।' –ज्ञानु ६ १ ३२

**साजिंदा**—पु १ कलावंतिणीच्या मागें राहून नाचताना वाद्य वाजवून तिची साथ करणारा इसम २ वाजवय्या, वादन कुशल [फा साझदा] **साजिंदी**-स्त्री १ कलावंतिणीची मदत नीस स्त्री, साथीदारीण २ व्यभिचारी, वेश्या स्त्री ३ साजिंद्याचें काम, वृत्ति

**साज**—स्त्री १ नवें धान्य निघाल्यावर तें खाण्यापूर्वी बन्यावाईट देवताना अर्पण करण्याची रीत (क्रि० धरणें, असणें) २ जमिनीच्या पिकाच्या अंदाजाचा खरेपणा, अदाजाप्रमाणें पीक येण्याची खात्री, तशी जमिनीची पात्रता (क्रि० चालणें सोडणें टाकणें, बुडणें, जाणें) ३ अदाजलेलें, अपेक्षिलेलें, उत्पन्न पीक (क्रि० येणें, भरणें, उतरणें) उदा० मुर्दंची-जमिनीची-काळीची-पाढरची साज 'रचुनि महत्तत्वाचें खळें। मळी एकें काळुगेनि पाळें। तेथ अव्यक्ताची मिळे। साज भली।' –ज्ञा १३ ३९ [? साच] **साजी**-स्त्री समृद्धि वाढ (क्रि० यणें) 'रादि न सरती जाणों आली सहसा घना तदा साजी।' –मोभय ५ ७२

**साज**—स्त्री १ संध्याकाळ, अस्तमान 'तेचि सकलपाची साज जै लोपे।' –ज्ञा ९ ७३, –तुगा ४०७ २ संधिप्रकाश साय-प्रात काल 'साज खुलली पसरली पुसट लाली।' –विक १२ [स संध्या, प्रा सझा, हिं साझ गु साज] ०धरणें–साजला काढलेल्या दुधाचें तूप करून त्यात वात बुडवून देवापुढें दिवा लावणें दीपव्रत धरणें दिपत घरणें सामाशब्द– ०दिवा-पु संध्याकाळीं देवापुढें लावलेला दिवा सानवात ०वण वणी–स्त्री १ संध्याकाळ, साज 'नाना कुल्ला साजवणी। वस्तुचि पा।' –ज्ञा १८ ४८१ –सिस ७ ८२ २ संध्याकाळचें गोदोहन 'जैं जाणिजे हातवटी। साजवणीची।' –ज्ञा१८ १४८३ ३ धार काढण्याचें पात्र 'आघ वाचि विषयीं भादी। परी साजवणी टेंकों नेदी। –ज्ञा १३ ६३७ –निगा २२ ०वळ-स्त्री (म) साजवळ ०वात-स्त्री १ सांज दिवा २ (सामा) संध्याकाळीं लावण्यात येणारा दिवा दिवावत्ती ३ (ल) मद, मिणमिण ज्योतीचा दिवा (क्रि लावणें,

लागणें) ०वेळ-स्त्री सध्याकाळ -एमा२३ २७८ ०सकाळ-क्रिवि सकाळसध्याकाळ,सर्वदा नहमीं ०सोंवळें-न सायकाळीं स्नान न करता नुसतें ओंवळें वस्त्र सोडून सोंवळें वस्त्र नेसणें, असा सोंवळेंपणा साज(जा)वणें, साजळणें-अक्रि सध्याकाळ होणें 'दिवस साजावितो' 'मला साजावतें' साजे-झे-क्रिवि सध्याकाळीं 'सशतक वधुनि विनय साजे शिबिरासि यावया परते।' -मोद्रोण (नवनीत ३२५) सांजा(जो)ळ-स्त्री (गो) सध्याकाळ 'साजोळे दि०यासी तेल।' -अमृत ११३ साजेसा-क्रिवि (गो) सध्याकाळीं

साजक—वि पोटगी, ताट 'पाच महाल साजक दुवास म्हणून दिले' -मराचियोशा ५ सानक पहा ०रोटी-स्त्री धपयेचा एक प्रकार सानकरोटी पहा 'आता तुम्हीं मला आज्ञा केली तरी मजला साहची साजकरोटी द्यावी' -भाव २१ [सानक व सानकरोटीबद्दल चुकीचें वाचन]

साजक—पु एक धान्य सावा [स श्यामाक]

साजगिरी—पु (सगीत) एक राग यात षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गाधार, कोमल व तीव्र मध्यम, पचम, कोमल व तीव्र धैवत, तीव्र निषाद इ स्वर लागतात जाति सपूर्ण-सपूर्ण वादी गाधार, सवादी निषाद गानसमय सायकाळ

साजण—पु प्यार, प्रियकर, सजण पहा [स स्वजन] साजणी-नी-स्त्री १ प्रियकरीण, प्रिया, सजणी पहा २ सखी, मैत्रीण 'तुझे मनींचें साजणी। कळलें मज।' -कथा १ ३ १०१ 'तव भणे रुक्मिणी। ऐसिआ तुम्हीं साजनी।' -शिशु ८१९ साजणें-न १ मैत्री, सख्य -ज्ञा १२ ६४ 'कृपण मित्राचें साजणें। अधासगें पथ चालणें।' -मुआदि १७ १८ २ सौजन्य, प्रेम 'जीव घेतलिया उणें। चालों नेणसी साजणें।' -अमृ २ ३९, -एभा १० ४२३

साजण, साजणपात्र—सादण, सादणपात्र पहा

साजा—वि १ प्रसन्न 'म्हणियाचेनि दाटपणें। साजा होय।' -ज्ञा १३ ४३८ २ परिपूर्ण, भरलेला 'कायि जलार्णव पाउसें। साजा होय।' -ज्ञा १४ ३३३ [सज्ज]

साजा-जी-जें—वि १ नवा, नाजूक -हको २ ताजा, टवटवीत 'भूमिवगळीं झाडें। पाणी घेती कवणींवडे। न दिसती आणि अपाड। साजीं असतीं।' -अमृ ७ ९१ ३ तयार, सज्ज -ज्ञा १४ १०२ ? [स सद्य, सज्ज] साजीवंत-वि सजीव, टवटवीत साजीवता-स्त्री सजीवता, टवटवीतपणा -हको साजेपण-न टवटवीतपणा 'पै वसनाचें रिगवणें। झाडाचेनि साजपणें।' -ज्ञा १३ १७८

साजा—पु १ गहू दळले, भरडले असतां त्याच्या होणाऱ्या कण्या, जाड रवा २ कोणत्याहि धान्याच्या कण्या 'आणि सयाव शब्दें जाण। जे गोधूम खडकण। देशभाषा विशेषण। साजा ऐसें म्हणती।' -रास १ १९४ ३ या कण्याचें कल्लें गोड खाद्य, शिरा (गुळाचा) शिरा बारीक रव्याचा साखर घालून केलेला, तर साजा जाड रव्याचा गुळ घालून केलेला असतो [स सयाव] साजवरी, साजोरी-स्त्री १ साजाची पुरी, एक पक्वान 'सोज्वळ ब्रह्मतेजें। साखर साजारी। जेवितो हे गोडी। तोचि जाणे।' -ज्ञागा १५९ २ (कर्ना) सादणें, इडली

साजा—पु सजाक पहा 'खाशा पत्कीच्या मुक्तिशाच्या रागोळ्या काढणें, साजा भरणें वगैरे कामें ' -ऐरा प्रस्तावना ७७

साजात्य—न १ सावर्ण्य, साधर्म्य, सजातीयता २ कुटुंब, जात, वश इ० चा सारखेपणा, आप्तपणा -पु सजातीय व्यक्ति, वस्तु 'भणौनि जवळीक करणें। साजात्यसी।' -ऋ ९७ [स]

साजिरा—पु एक जातीचा मोठा वृक्ष याचीं लाकडें इमारतीला उपयोगी असतात

साजीखार—पु एक क्षार पापडखार सज्जीखार पहा [स सर्जिकाक्षार, प्रा सज्जिआखार]

साजीश-स—स्त्री १ सगनमत, सख्य 'किल्लेदाराशी साजीश करून सव्वीस कोठे बारूदचे किल्ल्यातील उडविले' -दिमरा २ ३६ २ फसवणूक, कपट मसलत ३ हुनर, युक्ति -रा ८ ४८ [फा साजिश्] साजीसी-स्त्री आर्जव -राव्य ८ ९१

साजुक—वि १ करून फार वेळ झाला नाहीं म्हणून जो ताजा, चवदार आहे असा (भक्ष्य, भोज्य पदार्थ) 'भीमें आणून साजुक अन्नें। भोजनीं तोपवीं पाचहीजणें।' -मुविराट २ २० २ मूलस्थानापासुन आणून फार वेळ झाला नाहीं असें (उदक, पुष्प, इ०) 'हें असो कायसीं फुलें। पानचि एक आव हलें आहलें। तें साजुकही न हो सुकलें। मलतैसें।' -ज्ञा ९ ३८५ ३ (सामा) ताजें, टवटवीत नवें 'अयर्वण गदा तीख। कमळ साजुक फरवदु।' -एभा ११ १४७७ [स सद्यस्क प्रा सज्जस्क, देप्रा सज्जोक]

साजें—न टट काढण्यासाठीं माणसावरून ओंवाळून टाकण्याचे पदार्थ (क्रि० टाकणें, उतरणें) 'टाकित होत्या उतरुनि जीवरुनि गृहागर्मीं सरया साजें।' -मोवन ४ १४६ [? साज=सध्याकाळ ? साडणें]

साजें—न १ शपथ, वचन २ मत (क्रि० धरणें) ३ पिकाऱ्या मदाजाचा खरपणा साज पहा [साच, साज]

साजें—न (महानु) देऊळ 'नांदीयाचें साजें।'

साज्ञ, साज्ञें, साज्ञळणें—साज इ० पहा

साज्ञा—पुस्त्री (ना) भागी [हिं]

साट—पु माळा, गलथा इ०कावर कामट्या, काठ्या इ० ची केलेली तक्तपोशी, आस्तरण (सामा) तक्तपोशी, जमीन (कामट्यांची) ०वंद-पु साटी धुरांडीला ज्या दोरानें बांधतात तो दोर ०पाच-स्त्री साटीची दोन्ही बाजूंचीलाकडें साटर्गा-स्त्री (साटा-टा याचें अल्प रूप) लहान चौकट साटी

साट-ठ—न १ आंबा, फणस इ० ची पोळी २ (विश पत) फणसपोळी [सांठा]

सा(सा)ट—पु १ चाबूक, कोरडा, आसूड -ज्ञा१८ ७ ३४; -एभा २९ ११२ 'तैसा तो अश्वराणो। तयावरी साजिरला यावो। साट फुरत्र पदाडे। आहणावा।' -कालिका १४ २४ २ तडाखा फटकारा 'घोडियांसाट दही सोडूनि घाल्पोरे।' -कृमुरा ९६, ५०४८ [ध्व साट् का चाटी=चाबूक, हिं, शटिका= छडी] ०मार-री-स्त्री १ एक राजेरजवाड्यांचा खेळ यात हत्ती रागांत साडून त्यांस चाबकानीं-साटयांनीं मारून पळवतात २ हत्तींची झुंज ०मा-या-पु साटमार खळासाठी योजलेला इसम

साट—पु स्त्री अवकाश, जागा, वाव सांठ पहा साटणें-उक्रि साठणें पहा 'टेसाविलया मुट। मग शुद्धनी सुजे साटी' -ज्ञा १७ १४९ साटपा-पु १ साठवण २ सामानसुमान साटव साटवण-साटवण पहा 'तापासि साठवणें। जाला दु खासि विसवणें।' -ऋ ४८ साटवणी-णूक, साटवणें, साटवासाट्य-साठ मध्यें पहा साटवा-पु सांठा 'साम्वा जाणानि सकृत अनाचा' -दावि २० साटा-पु १ साठा पहा 'श्रीराम कृपचा लाहसी साटा।' -दावि ३५१. २ करंजी इ० मध्यें भरतात तें सारण पुरण साटारा-पु रास; ढीग

साटका—स्त्री रात्रिवेप्रमाणें रावणाची एक बहीण 'जैसें साटकचे अभिस्तवनु' -दाव ३७०

साटकाविटका—वि मळलेला, खराब झालेला [विटका हि]

साटण—स्त्री १ बढाई निष्फळ बडबड २ खोटीनाटी गप्प [स शातन स छाटणें] साटणें-क्रि (क) बढाई मारणें निष्फळ बडबड करणें

साटणें—उक्रि बाजारांत आलेला माल एकदम सर्व घेणें, घाऊक माल घणें [साटें]

साटणें—क्रि भदणें छेदणें 'कृष्णाचा शर साटवू जरि दिस।-गस्तो ८१ साटू वि तोडणारा छाटणारा (समासात उपयोग) 'तव म्हणे दानवसीर साटू। उद्धव श्वा न सडी लाटु। -भाए २०९ [स शातन]

साटण्यामोटल्या—स्त्रीअव अनेक प्रकारच्या मोटल्या गठड्या, कपडे, दागदागीने गुरेंढोरें, चीजवस्त इ० बद्दल समुच्चयानें वापरतात 'तुम्ही निघून जा मी सा० आटपून येतो' [मोटली हि]

साटा-टी—पुस्त्री मोबदला, प्रतिदान -ज्ञा १० १६६ 'हरिनि जीवें करी साटी। पाहिली तुगी सकळांसी।-तुगा १२३ [वैआ मर हि साट का साटी, तुल० स सातिः देणें, देणगी] साटकोप्ट-चाट-न (व) आपली मुलगी (बहीण) दुसऱ्यास देऊन त्याची मुलगी (बहीण) आपल्या मुलास करणें साटभाऊ-पु साडू साटेलोटें-न १ आपल्या घरची मुलगी दुसऱ्याच्या घरीं व त्या घरची आपल्या घरीं आणण्याचा प्रकार, परस्पर शरीरसंबंध २ मोबदला; देवाण घेवाण 'पुण्य कोणाला कोणें द्यावें। साटेलोट देवाकडे नस।' -दावि ३८७ साटोवाटी-स्त्री अदलाबदल, मोबदला -ज्ञा ६ ४१४ 'जैसा जोहारियाच्या साटोवाटी। गारा आणिल्या उठाउठी।' -मवि ४८ १०३ [का साटी तुल० स सातिः देणें, देणगी

साटा—पु १ (प्र) छाग, सितोडा २ पक्वान्न करताना पोटांत, घड्यामध्यें लोणी, तूप, तेल इ० चोपडतात तें, मोहन (क्रि० लावणें, करणें)

साटा—पु १ सांगाडा; चौकट, साठा-ट्या पहा 'गाडीच्या साट्याबरोबर नदींत पाणी होतें' 'मोळीनि शिरा येकवटा। लींपौनि अस्तिचा साटा।' -भाए ४०२ २ (शा) शिडी साटारा-पु (क) साटा साटी-स्त्री १ गाडीची बैठक तळचा भाग २ साट, सांगाडा ३ (को) होडी झाकण्याची कामट्यांची छापरी ४ (सामा) बांबूच्या कामट्यांची जाड छापरी, पडदा साटें-न (व) साटा सांगाडा

साटा—पु (व माळवा) ऊस [हिं]

साटारणा साटारा—वि सगारणा पहा

साटि—वि साठ साटि लक्ष रथाची माहणी।' -शिशु १०३६ [स षष्टि]

साटी—स्त्री सट्टा खरेदीचा करार 'पाण्यांतील म्हैसीची साटी। करणें हेचि बुद्धि खोटी।' -दा १० ८ १० [गु साटु= खरेदीविक्रीचा करार म साटें]

साटी—स्त्री १ आश्रय; संगत -एभा २४ ७७ 'तव पुरूखें कलीचे साटीं। सर्वहि जिंकिली सृष्टी।' -कथा १ ९ १८ २ साहाय्य [स सति]

साटी—स्त्री १ बरोबरी, सारखेपणा 'उत्तमाचिया साटीं, नीच मानिजे किरीटी।' -ज्ञा १६ २ २ स्पर्धा बरोबरी 'साटी करी म्हणे होडा। महान् कविरत्नांसीं।' -मुआदि १६९ [का साटि]

**साटी**—स्त्री नाश 'जिवाची केली साटी।' –अकक २ शिवराम मुद्रिका [स साति]

**साटी**—शथ साठी पहा

**साटीण**—न एक प्रकारचें मऊ कापड 'अतलस कुतन्याही साटिण्या रुद वोली।' –सारुह ३ ४० [इ साटिन, तुल० स शाटी=कापड]

**साटीशाप**—पु (व) शाप पहा

**साटें**—न १ बाजारात विक्रयास आणलेला सर्व माल (एका व्यापान्यानें) 'तन्ही उन्मेखाचिये पेंठे। गुणा अवकणी भीन बुद्धीचि साटें।' –ऋ १४ २ माल एकदम खरेदी करण्याचा सौदा, घाऊक मालाची खरेदी, सट्टा (क्रि० घेणें, ठरणें, मारणें) ३ खरेदीचा करार, साटेंखत [? गु साटु] ०खत–न साटें ठरवन करतात जो कागद तो ठरविलेली सर्व रकम न देता काहीं थोडा विसार देऊन अमुक मुदतींत बाकीची देऊं असा करतात जो दस्तऐवज तो

**साटोप**—वि १ व्यवहारदक्ष, व्यवहार, व्यवस्था इ० चागला जाणणारा (माणूस) २ आटोपशीर, थोडक्यात माव णारें, बेतशीर (कामकाज इ०) [स+आटोप]

**साटोप**—वि अहङ्कारयुक्त 'तें तैसेंचि उचित करी। परी साटोपु नोह शरीरीं।' –ज्ञा ६ ४६ [स]

**साटोप**—पु १ अति नेट, खटपट 'मह्म साटोप जो मांडी।' –एभा ११ १११ २ चेव, आवेश 'जैसा नपुसक वांछी स्त्रीसुख। परी सग तया कैंचा देख। मुळींच नाहीं बीजा रोप। मा कैंचा कामसाटोप तयासी।' –एभा २१ ३४२ ३ उत्साह 'साधना करी साटोपें।' –मुआदि ३१ ३९ –वि १ आवेशयुक्त 'बाहुस्फुरणें आला कप। वेगें साटोप उठिला।' –एरुस्व १० ४५ २ उद्युक्त 'पुसोनिया होये। साटोप कर्मी।' –ज्ञा १८ ६२३ [स+आटोप]

**सा(सा)टोपा**—पु कोठार, साठा, साठवण 'कैसें योरिवचें मान पाह पा। तो सृष्टिबीजाचा साटोपा।' –ज्ञा ८ १६६ 'म्हणानि पद्मनाभी नावा। उदरीं त्रैलोक्याचा साटोवा।' –एरुस्व १ ३५ साटपा–वा पहा [साठा]

**साटोरी**—स्त्री एक पक्वान्न, सारण घातलेली पुरी [साटा +पुरी]

**साटया**—वि साटमाया पहा

**साट्या-ट्या करवत**—स्त्री चौकटीची करवत

**साठ**—पु चौकट, साट पहा **साठणी**–स्त्री साटी वर टेंकण्यासाठीं बसविलेलें लांकूड 'हरिपंतांनीं गाडीच्या साठणीवर हात ठेवून गाडी मागून चालत असता' –खरादे १०३ **साठयद**-पु साठी आवळून बसावी म्हणून ज दोन सुरसे घोडक्यातुन आरपार घालून दोरीनें बाधतात ते प्रत्येक **साठा-ठ्या**-पु सागाडा, चौकट (गाडी, जनावर, चित्र इ० ची) 'गजाश्वरथ पहिले खळाळा। रथ काष्ठा साठा वाहाती।' –जै १८ ११८. **साठी**–स्त्री साठ-टा पहा गाडीचा कोठा

**साठ**—वि ६० ही सख्या; षष्टि [स षष्टि, प्रा सट्टि] ०**संवत्सर**–पुअव प्रभव, विभव इ० साठ सवत्सरांची नावें (हिंदु कालगणनेंतील, सवत्सर पहा) **साठळणें**–अक्रि (वयाला साठ वर्षें होणें) म्हातारचळ लागणें, फार वय झाल्यानें बुद्धिभ्रश होणें **साठियुं**–पु (गुजरात) निळवा, लवकर तयार होणारी जोंधळ्याची जात –कृषि २६६ **साठी**–स्त्री १ साठाचा समुदाय, सच २ साठ सख्या 'नाराच साठि आधीं प्रभुतें मग तीन जिष्णुनें ओपी।' –मोकर्ण ११ १९ ३ साठ वर्षांचें वय ४ या वयात होणारी अवस्था, म्हातारचळ ५ तादूळ, नाचणी याची एक जात, साठेरा–री म्ह० साठी आणि बुद्धि नाठी ०**उलटणें**–म्हातारपण येणें ०**बुद्धि**–स्त्री म्हातार चळ, बुद्धिभ्रश **साठें**–न (कु) साठ दिवसांनीं पिकणारें भात **साठेरा-री**–वि १ साठ दिवसात तयार होणाऱ्या भाताची एक जात २ नाचणीची एक जात

**सा(सा)ठ**—पु १ मावेल इतकी जागा, पुरेशी जागा (राहाण्यास, ठेवण्यास) २ (ल) क्षमाशीलता, क्षमा ३ साठा, सचय ४ आश्रय दवा 'आम्ही मलगडचे रानात साठ म्हणजे दवा घेऊ व तेथून कार्यसिद्धि करू' –बसईची मोहीम [स सस्था, प्रा सठा] **सांठण**–न साठविण्याचें पात्र **सांठणें** अक्रि १ साचणें, जमणें, गोळा होणें २ मावणें, राहणें **साठवण**–नस्त्री १ साचविण्याचें पात्र, जागा, हौद, बरणी इ० 'व्योम साठवे सपूर्ण। ऐसी साठवण कोठून आणू।' २ सचय, सग्रह **साठवणी**–न १ (तळें, हौद, टाकें इ०त) साठवलेलें पाणी २ (खाच, खळगा डबकें इ०त) साचलेलें पाणी **साठवणी-णूक**–स्त्री साठविणें, सचय, सग्रह **सांठव(वि)णें**–उक्रि १ भरून ठेवणें, सांठवण करणें २ साचविणें, जमविणें [स सस्थापन, प्रा सटावण] **साठ्या साठव**–स्त्री १ साठविणें, सचय सग्रह करणें (अनेक वस्तू). २ घाईनें, कसें तरी साठविण्याचा व्यापार **साठा**–पु सग्रह, सचय, ढीग, रास **साठा**–स्त्री १ गोणी २ साठा **साठापा**–पु सग्रह सचय 'आला चारा खड्यात दाबून त्याचा साठापा करावा' –केसरी १८ ९ ३६ **साठयावा**–वि ठेवणीचा (सुदर पदार्थ, वस्त्रपात्र)

**साठपा, साठमार**—साटपा, साटमार पहा

**साठी**—स्त्री तुल्ना, बरोबरी, सारी पहा 'जें परब्रह्म निर्मळा। साटी न सरे।' –ज्ञा ८ २६२. [का साटि]

साटी—स्त्री सोबत, संगत साटी पहा. 'संगती स्त्रिया बाळकांची। आहे साटी जन्माची।' –दा ३ ४.४२ [स सति]

साटी—स्त्री नाश, त्याग 'करील आपुल्या जीवा साटी।' –मुआदि ११ २८. [स साति]

साटीं—शअ १ करितां, स्तव उद्देशवाचक किंवा हेतुवाचक अव्यय २ मुळें, योगानें 'लिखितासाटीं जरी मी सांपडें। तरी कां साधक शिणती गाढे।' –एरुस्व ५ ५४ ३ ऐवजीं, बदलीं 'कां विटेसाटीं परीस जोडे।' –एभा १९ ४२४

साटोरी—स्त्री सारण भरलेली पुरी साटोरी पहा

साड—पु गाभा, मर्मस्थान (लांकूड, झाड इ० चें), मार –मोमाश्रम ४ १३ [स सार]

सांड—पु १ देवाच्या, धर्माच्या नांवानें मोकळा सोडलेला बैल, पोळ २ षंढ, उत्पत्तीचा बैल ३ (ल) नुसता पोसलेला गलेलठ्ठ माणूस, उनाड, रिकामटेकडा मुलगा (निंदार्थी) 'घरोघरीं दूध लुटी। झाला सांड तुझ्या पोटीं।' –अमृत २३ [स षंढ, प्रा. संड, हिं सांड]

सांड—स्त्री उंटीण, उंटातील मादी [दे प्रा संढी] सांडण,सांडणस्वार–सांडणी, सांडणीस्वार पहा सांडणी—स्त्री उंटीण, सांड 'सांडणी दररोज ३०।४० कोस चालतात' –मराठी ३ रें पु आवृ ४ १२८ [हिं सांडनी] ०बातमी—स्त्री सांडणीस्वारानें आणलेली बातमी 'सांडणी बातमी आली।' –ऐपो २३४ ०स्वार–पु सांडणीवर बसून डाक, बातमी इ० पोंचविण्याचें काम करणारा शिपाई घोडयापेक्षां उंट, उंटापेक्षा उंटीण फार जलद चालते म्हणून पूर्वी टपालाचें-जासुदाचें काम असे स्वार करीत सांडरू–न (तिरस्कारार्थी) सांड, उंटीण

सांड—स्त्री १ जास्त झालेलें पाणी काढून देण्याचा मार्ग (बांध, भिंत इ०तून) २ पाण्याचा दरवाजा, उपडी, सांडवा ३ (राजा) बांध फुटून पडणारी फट [सांडणें] सांडवा, सांडोवा–पु १ धरणाचें दार, सांड २ पाण्याचा निकाल, जास्त पाणी काढून देण्याची वाट ३ कालवा, पाट. ४ धरणावरची वाट (यावरून पावसाळयात पाणी वाहतें), नदीवरला पायरस्ता [दे प्रा संदेह=पाण्यातील पाय ठेवण्यासाठीं असलेला दगड] सांडावा–पु सांडवा पहा

सांड—स्त्री १ उपेक्षा, विस्मरण (क्रि० करणें) 'सांड कर माझी दोन दिवस स्वस्थ निजल्यानें।' –प्रला १६३ २ सोडणें, टाकणें, त्याग (विषयीं-करणें) 'पुत्राविषयीं-संसाराविषयीं-कामाविषयीं सांड केली' ३ हरविण्याची, गमविण्याची खोड (क्रि० लागणें) 'काय हो, तुमच्या भावाला रुपयाची सांड लागली' ४ नाव सोडणें, वाटल तें करण्याची मुभा देणें ५ टाकलेली मायको ६ –न हरवलेली, सांडलेली वस्तु ७ दृष्ट, बाधा इ० साठीं ओंवाळून टाकावयाचा पदार्थ. 'म्हणती लेंकरुं आली मिमोन। सांडी ओंवाळून सांडणें।' –ह ११ १६०. –वि रस्त्यांत पडलेली, बेवारसी (वस्तु) [सं षड्-षाम? सं छर्द्, प्रा छड्ड, हिं छाड] ०जाणें–शेतांतील पाणी जाण्यासाठीं ठेवलेल्या सांडीची दिंड वाहून जाणें –कृषि २०९ ०देणें-करणें- १ (अमक्यास-ला) जाऊं देणें, जाण्यास परवानगी देणें 'मग टाकीं सांड देऊनि त्यासीं। पाठवीं मजपासीं सत्वर।' –भवि ५६,७७ २ दुर्लक्ष, कानाडोळा करणें (दोषाकडे) ३ टाकून देणें, फेंकणें 'वाप्प कुडपा करी सांड।' –सामाशब्द ०उपड-उबड–स्त्री (ना) सांडलवंड, नासधूस ०खत-चिठ्ठी-पत्र–नस्त्री सोडचिठ्ठी (बायकोस, गुलामास, धारदारास इ०) सोडचिठ्ठी पहा ०घर–रि घर सोडून जाणारी, नवरा सोडणारी (स्त्री) सांडवर पहा ०पाणी–न धुणें, भांडीं घासणें इ०केल्यामुळें सांडलेलें पाणी, मोरीचें पाणी 'सांडपाण्याचा निकाल होण्यासाठीं गटारें व मोऱ्या बांधतात' –आरोग्य ११.१ ०भोळा–वि विसरभोळा पहा ०राड–स्त्री नवऱ्यानें टाकलेली बाई, सांडरंड ०लवंड, सांडासांड–स्त्री सांडणें, पालये करणें, नासणें या अर्थी व्यापक शब्द, नासधूस, उधळमाधळ ०वर–वि नवरा टाकलेली, घर सोडून गेलेली (स्त्री) 'सांडवर कोणी न धरिती हातीं। प्रारब्धाची गति भोगू आतां।' –तुगा ३१७ [वर= नवरा] ०सूट–स्त्री कोणाकडून यावयाचा पैसा, माल इ०त दिलेली सूट सांडण-णी-णें–नस्त्री १ ओंवाळून टाकलेला जिन्नस, बळी (दृष्ट, भूतबाधा काढण्यासाठीं) (क्रि० टाकणें) 'साक्षात पिशाच येऊन। घेऊनि गेलें जैसें सांडण।' –भवि ९ १०० 'अगणित तिज हातीं सांडणी टाकवीती।' –सारुह २ ८७ –ज्ञा ८ २६० २ भूतबाधा, दृष्ट काढणें, ओंवाळणी ३ कुरवंडी, ओंवाळून टाकणें, तुच्छ, क पदार्थ असणें 'अप्रभोग मूर्तिमंत। सांडणें करीत तुजवरून नित्य।' –मुआदि १६ ३१ सांडणी–स्त्री १ सांडण्याची क्रिया, त्याग 'तेवीं अविद्या सांडणी।' –एभा १२ २२५ २ उपेक्षा 'केली प्रपंचाची सांडणी।' –एभा १० २५१ ३ विरणें, लय सांडणीस टाकणें-घालणें-पाडणें–मनातून घालविणें, विसरणें सांडणीस पडणें–विसरलें जाणें सांडणें–अक्रि १ बाहेर पडणें, पाडणें, लवंडणें उपडें होणें २ हरवणें, गहाळ करणें, होणें 'भक्ति पावलूण तें माझें सांडलें।' –नवनीतपृ १५३ ३ सोडणें, टाकणें, त्याग करणें –ज्ञा ४ १२९ 'भीम म्हणे सांडिता मूढा। शिक्षा उपटीन।' –मुसभा ९ ९० सांडरा–वि १ उधळ्या, उडव्या २ हरव्या, नेहमीं सांडणारा ३ (ल) निष्काळजी, विसरभोळा

सांडलं-वि नवऱ्यानें टाकलेली, घरदार सोडलेली (स्त्री शिवी प्रमाणें उपयोग) सांडवणें-अक्रि १ क्षीण जर्जर होणें, खगणें 'साडवला भला माणूस याची कोणी कुमक करीनात '-भाव ८३ २ मुकणें, आचवणें 'सुग्रीव स्त्रीराज्यें साडवला। वधूच्या रोपें मज शरण रिघाला।'-रमातु १० ३११ साडाव-वा-पु साडणी, साडण्याची क्रिया, साड पहा 'असे साडाव देत आले अटक उतरून नऊ कोशावर।'-ऐपो १२१ साडी-स्त्री त्याग, अव्हेर 'समर्था मनीं साडि माझी नसावी।'-राक (करुणाष्टक), -तुगा ५७३ साडी-पडणें-धरणें-हार खाणें, मागें राहणें 'पदोपदीं त्वा धरिजेत साडी।' -सारुह ७ ११९ सांडी मांडी-स्त्री १ घेण्या-टाकण्याचा व्यापार 'मग हें साडीमाडी नलगे तुज।' २ यातायात, त्रास, घरसोड 'साडीमाडी मार्गे केल्या भरोवरी। अधिकचि परी दु खाचिया।'-तुगा ३०८ सांडीविखुरीं-क्रिवि साडण्याल्वडण्यात इकडेतिकडे 'मुद्रा हूनि बीज काढिलें। मग निर्वाळलिये भूमीं परिलें। तरि तें साडी विखुरीं गेलें। म्हणों ये कायी।' -ज्ञा ९ ३९ सांडोर-वि (जुनरी) पोर न पाजणारी (मेंढी) साडोवा-पु कुरवडी साडणें; उतारा 'यालागीं शरीर साडोवा कीजे। सकळ गुणाचें लोण उतरिजे।'-ज्ञा ९ ३८१ सांडोसांड-क्रिवि काटोकाठ, भरून वाहील अशा रीतीनें

साड—स्त्री कोपरा, साध 'सागरुही सार्डी पडे।' -ज्ञा १४ २३५ साडी पडणें पहा [स सधि, म साध]

सांडई—स्त्री तादुळाच्या पिठाचें कुरडईप्रमाणें एक खाद्य (अव) साडया 'कोणी घडया घालुन माडयाच्या। नेती पराता मग साडयाच्या।' -सारुह ६ ७९ (नवरा बायकोची साड करील या भीतीनें-ध्वनिसाम्यावरून-लग्नात साडया करीत नाहींत) 'भीमकी प्रिय व्हावी श्रीपती। साडया न करीच शुद्ध मती। जाणे वृद्धाचार रीती।' -एरुस्व १४ ११७,

साडगा—पु कोहळा, भोपळा, काकडी इ० च्या फोडींत तिखट मीठ घालून, वाळवून व नतर तळून केलेलें तोंडी लावणें 'काळमुखीं व्हायाचा काय साडगासा च।' -मोउद्योग १४६ [? शाडाक -भाअ १८३४ का सडिग]

साडणी—स्त्री सोनाराचा चिमटा, साडस पहा

सांडशी—स्त्री ल्हान साडस

साडस—पु (सोनारी, लोहारी) विस्तवातील पदार्थ उच लण्यासाठीं असलेला चिमटा, (सामा) पकड, चिमटा 'का पाचूचेनि सांडस। खाडिजे पय पाणी राजहसें।'-ज्ञा ९ ४४ [स सदश; प्रा सडास; हिं सँडसी]

साडा—पु लग्नामध्यें साडे म्हणून जो सोहळा होतो त्यावेळीं वधूस द्यावयाची साडी साडी-स्त्री १ ल्हान लुगडें शको ७ २८ २ (ना) भारी वस्त्र, पैठणी 'शेले शाल साडया क्षीरोदक लाखबंद पाटावें।' -मो सभा ५ ८३ [स शाटी, प्रा साडी, हिं गु साडी] साडे-पु अव १ लग्नानतर चवथ्या दिवशीं ऐरणीपूजनाच्या प्रसगीं वधूवरास वस्त्रें अर्पण करावयाचा सोहळा 'मुहूर्ते पाहुनि लाविलें साडे झाले चौदिवशीं।' -अमृत पुरवणी २ २ या प्रसगीं देतात तीं वस्त्रें 'साडे आता जानकीसी। सम पिले पाहिजे।'-वेसीस्व १३ १ ३ (ल) समाप्ति; शेवट 'तो हा अमृत इच्छितो ससाराचे साडे।' -अमृत ११६ साडे करणें-१ खलास करणें, खातें बद करणें २ (ल) काढून लावणें, गचाडी देणें ३ खरडपट्टी काढणें साडे चालणें-हाल होणें 'महाराजाच्या हुकुमानें त्याच्या मुलाचे साडे चालले आहेत' -विक्षिप्त २ १०९

साडादिडा—वि धड एकेरी नव्हे, धड दुहेरी नव्हे, धड दिडकी नव्हे, धड तिहेरी नव्हे अशा तऱ्हेची, वेतापेक्षा कमी अधिक, वेडीवाकडी (वस्त्रादिकाची घडी, दोरी इ०) [स+ अडा (अर्धा)+दीड]

साडी—स्त्री (नाविक) काठी पारात बसविण्यासाठीं अस्त मानावरून माल आढयाच्या खालच्या अगास भिडविलेलें लाकूड

साडुस, सांडव—पु (कों) एक किडा, आळी

साडू, साडभाऊ—पु बायकोच्या बहिणीचा नवरा साट भाऊ बहिणीबहिणींचे नवरे ते परस्पर [साट=मोबदला मि सट्व, का सड्डक] म्हण० १ सोयऱ्यात साडू आणि भोजनात लाडू २ (माण) पाहुण्यात साडू आणि हत्यारात माडू (पालकी असतो)

साडे—पु अव साडा (अर्धा) याचें अनेकवचन १ आणखी अर्धा याअर्थी तीनच्या वरच्या सख्याना लावितात उदा० साडेतीन-चार २ शिवी, अपशब्द यापुढें आणखी, भरीस अर्धा या अर्थी वापरतात उदा० साडेशिनळीचा-मानागुमनी-हरामी [स+अर्ध-प्रा अड्ढ] ०तीन-वि ३॥ सख्या काहीं [illegible]ल्यात व्यक्ति व वस्तु यांचें प्रमाण-मापन दाखविणारी सख्या उदा० साडेतीन तलवार (करी)-भालेकरी-लिहणार, शहाणे इ० ०तीन पीठें-नअव (देवीचीं) १ तुळजापूरची भवानी २ कोल्हापूरची अबाबाई ३ माहूरची देवी व ३॥ सप्तशृंगीची देवी ०तीन पोशाक-ख-वस्त्रें-पु नअव पूर्वी दरबारात अधिकाऱ्याना ३॥ वस्त्रें देत असत तीं १ पागोटें २ शाल जोडी किंवा शेला ३ पाय जामा किंवा झगा करण्यासाठीं मद्रासुदी या उची वस्त्राचा तुकडा, व पटक्यासाठीं किनखापीचा अर्धा तुकडा (अर्धे ठाण) ०तीन मुहूर्त-पुनअव कोणतेंहि काम करावयास दमरा, बलिप्रतिपदा व वर्षप्रतिपदा (पाडवा) हे तीन अत्यत उत्कृष्ट मुहूर्त असून

**सातपन**—न. १ एक प्रकारची तपश्चर्या २ प्रायश्चित्ताचा प्रकार 'सांतपन, चांद्रायण किंवा ज्ञाताज्ञातदोष परिहारक- यांपैकीं कोणतेंहि प्रायश्चित्त घेण्यास तयार होण्याचा निश्चय केला' -भागर ३ १३४ [स ]

**सातपाणी**—पु भिंतीवर चेंडू मारून तो झेलण्याचा खेळ, भितपाणी -मखपु ५१

**सातबद्दी-दें**—तीन पाच किंवा जास्त गड्यांनीं चेंडूनें खेळावयाचा एक खेळ -मखपु ५८

**सातमा**—स्त्री (नाविक, हट ) गलबत हाकारणें; गलबत हाकारण्याचा परवाना सतमी पहा

**सातर**—त्रि अतरानीं युक्त, अतर असलेलें, तुटक, फुटका [स + अतर] ०स्पर्शी-पु परंपरासंबंध, अप्रत्यक्ष स्पर्श

**सातरणें**—अक्रि चहूंकडून सारखा विस्तार होणें (झाडाचा), चागलें वाढणें, फैलावणें [स+आस्तरणें] **सातारा, सातेरा**-वि सातारलेला (वृक्ष)

**सातर(रा)स, सातरवारा**—पु (नाविक, कों ) ईशान्येकडील वारा, सप्तर्षिभागाकडून येणारा वारा [स सप्तर्षि]

**सातरी साथ्री, साथरी**—स्त्री (व न ) आंथरूण बिछाना [? स सत्+आस्तृ अर सातिर्=आच्छादित]

**सातवार**—स्त्री (पु') (कों विनाऱ्यावरचा शब्द) काहीं विवक्षित लाटा येऊन गेल्यानंतरची येणारी मोठी लाट (हिंदी खलाशी ही लाट सातवी मानितात व युरोपीयन खलाशी तिसरी किंवा नववी मानितात) [सात]

**सातलणें**—क्रि सचणें -मनको

**सातली**—स्त्री (गो ) मिरल माडाच्या सावलीची इरल्यासारखी शिवलेली पण वाटोळी छत्री (गो ) सतरी [छत्री]

**सातव**—पु (सामा ) सातू

**सातवन-वीण**—नपु (प्र ) सांत्वन, शांत करणें समाधान, दुःखाचा परिहार [स सात्वन] **सातविणें**-सांत्वन करणें

**सातळणी**—स्त्री (व ना ) तळणें, फोडणी देणें

**सा(सा)तळणें**—क्रि तळणं; फोडणीस टाकणें (हरभरे, दाणे, मिरच्या इ०) 'गगा, थोडे हरबरे सातळ .वरें!' [तळणें]

**साता-ती-तें**—धावि होरसाता, कसर्ता या अर्थी 'पावला सातां सौंगु।' -गीता १ १४८३ 'जैसी हीरीं नाव न ढळे। ढळती सांती।' -ज्ञा ७४ 'जे योगु यागु न करिती चि। जन्मले साते।' -ज्ञा ४ १५४ [स सत्-साति]

**साताडें**—सातडें पहा

**सातारी**—स्त्री (कों ) १ वारळाची जागा २ या जागेवर वाढलेलें दुऊळ (नागाचें) पेव पहा

**सातारो**—पु (कों ) माशाची एक जात हे मासे आक्टोबर नोव्हेंबरमध्यें पकडतात

**सातिशय**—वि अधिकाधिक [स स+अतिशय]

**साती**—स्त्री (महानु ) छत्री, तुबका 'झळकती पालव सातीया।' -भाए ४४१ -शिशु १०१८ सातरणें पहा

**सातू**—पु १ गव्हासारखें एक धान्य २ भाजलेले सातू गहू व हरभरा यांचें पीठ [स सक्तु]

**सातेरी**—स्त्री (गो ) शांतादुर्गा देवी

**सातेरू**—न एक विशिष्ट प्रकारचें मधाचें पोळें, मोहोळ हें वारुळात असतें व याला सात तोंडें असतात [सात]

**सात्**—अ एक तद्धित प्रत्यय अर्थ- रूपांतर पावलेला, सर्वस्वीं आधीन उदा० अग्निसात् भस्मसात् [स ]

**सात्रक, सात्रक चाल**—स्त्री घोड्याची एक चाल चौपायीं हदहदू चालणें **सात्रक**-वि घोड्याची एक चाल आहे तिच्या संबंधींचा -शिदि २०७

**सात्मीकरण**—न (शाप ) परिपाक, एकरसता, एकजीवपणा, समरसता (इं ) ॲसिमिलेशन [स स+आत्मीकरण]

**सात्वत**—पु भक्त, भागवत 'तोचि चरण सात्वतीं पावावया सम विभूति।' -एभा ६ ११६ [स ] ०धर्म-पु भागवत धर्म -गीर १०

**सात्वती**—स्त्री नाटकाच्या चार मोठ्या प्रकारांपैकीं एक यांत सौम्य व सात्विक भावना दिग्दर्शित केलेल्या असतात [स]

**सात्वन-ना**—नस्त्री १ शोकक्रोधादि कारणांनीं झालेली क्षुब्ध मनःस्थिति करून पुन्हा पूर्वस्थितीवर आणणें २ समाधान करणें, शांतवन, धीर देणें ३ यामुळें आलेली स्वस्थता शांतपणा [स ] **सात्वनवाद**-पु सांत्वनपर, प्रेमळ, स्नेहपर भाषण [स ] **सांत्वित** वि १ शांत झालेला, सांत्वन पावलेला २ स्वस्थता लाभलेला शांति सुख मिळालेला [स ]

**सात्त्विक-सात्विक**—पु सात्त्विकभाव एकभाव किंवा मनाची अवस्था (काव्यनाटकांतील) ही स्थायी आणि व्यभिचारी या भावांमधील असून हिच्या ठिकाणीं सहज अकृत्रिम, सत्य असा भावना व्यक्त असतात स्वेद, स्तंभ, रोमांच स्वरभंग, वेपथु (कंप) वैवर्ण्य अश्रु आणि प्रलय हे अष्ट सात्विकभाव आहेत 'आपुलेनि शिहाणपणें। आगींचे सात्वीक रूपसी जाणें।' -शिशु १८९ [स] -वि (शुद्ध रूप सात्त्विक)

१ सत्य, पवित्र, प्रामाणिक, उत्कृष्ट; सत्त्वगुणानीं युक्त 'म्हणोनि उपनिषदादि समस्त। सात्विक ते।' -ज्ञा १ २५६ २ सौम्य, हितकर, रोगनिवारक (औषध, पथ्य, इ०) ३ अर्थ युक्त, भरींव, ससत्त्व ४ उत्साह, चैतन्य, बल, तेज इ० गुण असलेला ५ सत्; सत्य, अस्तित्व असलेला, वास्तवपूर्ण ०चांडाळ-पु सौम्य वृत्तीचा चांडाल ०प्रेम-न खरें, शुद्ध प्रेम 'निराशेंत सात्त्विक प्रेम करुणवृत्तीच रूप घेतें' -एक १०७ ०भाव-पु सुखादि भावानें भावित होणाऱ्या अंतःकरणापासून उत्पन्न होणारे भाव हे आठ आहेत सात्त्विक पहा 'म्हणोनि सात्विक भावाची मांदी। कृष्णा आगीं अर्जुना आधीं।' -ज्ञा ८ ५६

**साथ**—स्त्री १ सोबत, संगत, सहवास २ सोबती स्नेही, जोडीदार ३ मदत, टेका (गाणेंवजावणें, भापण इ० कामीं) (क्रि० करणें) [स सह+अंस, सार्थ, किंवा स स्वस्ति-सथ्यि-साथ -राजवाडे हिं साथ=बरोबर] म्ह० भात सोडावा साथ सोडू नये ०करी-पु साथ, मदत करणारा (गाण्यावजावण्यात) **साथी**-पु १ जोडीदार, सोबती २ कामात मदतनीस, दुय्यम ०दार- १ साथी, मदतगार २ (वाईट अर्थी) हस्तक, साहाय्यक

**साद**—पुस्त्री १ हाक, देण्याविषयीं बोलाविणें (क्रि० घालणें, देणें, हाकणें) 'विपायें वाढे सत्त्व शुद्ध। तेव्हा ज्ञानासी करी साद।' -ज्ञा १४ ६२ २ हाकेला उत्तर, ओ देणें 'सादु द कारे पुत्रराया।' -उषा ६४, -मोभव १ २५ ३ प्रतिध्वनि, पडसाद ४ शब्द, ध्वनि 'तव त्या बैलाचा सादु आईकोनि।' -पच ५ (ल) इच्छा 'तोचि अभेदु कैसा। हे जाणावया मानसा। साद जाली तरी परियेसा। बोलिजेल।' -ज्ञा १० १११ [स शब्द; प्रा सद्द, प सद, हिं गु साद] ०घालणें- १ हाक मारणें -कक १२८. २ (को) मागणें ०धरणें-पडल्यामुळें किंवा भीतीमुळें रडण्याचा आवाज तोंडातून न निघणें (ल्हान मुलाचा), श्वास धरणें ०परतणें-निराळा आवाज देणें, पिकलेली अवस्था-बदललेल्या आवाजावरून दाखविणें (फळानें, विशेषत फणसाच्या) -सामाशब्द ०परका-ता-वि १ बदललेल्या आवाजाचा २ (ल) पिकलेला साद परतणें पहा **सादणें**-अक्रि शब्द करणें 'भणओनि मदनु सादैजें। लेंकरूपणा लागी।' -शिशु ३७० **सादविणें, सादाविणें**-उक्रि १ साद घालणें, हाक मारणें 'वायुदेवातें सादवी। बीजमंत्रें करूनिया।' -मुआदि ७७ १७५, -तुगा ५४ 'करी घेवूनिया सादावी।' -निगा ११ २ (कर्ना) ताल धरणें टिमकी वाजवून साथ करणें **सादु**-पु साद, शब्द 'तव त्या बैलाचा सादु आईकोनि साशंकित झाला' -पच ३ **सादुकार**-वि शब्द करणारा -पच ३

**सांद-दी**—स्त्री (व) १ बोळ २ अंगण, परसु 'सादीकडे विहीर आहे' ३ आड बाजू, सांधीकोंपरा 'भट करी वटकीशी मोहबत। दप्तर पडलें सादींत।' -अफला साध पहा [स संधि]

**साद, सांदकाम, सांदणें, सांदभान्या, सांदीकोंदी**-इ० शब्द साधनें आरंभ होणाऱ्या शब्दामध्यें पहा **सांदो सादीं**-क्रिवि कोनाकोंपऱ्यात -दा ३ १ १६ 'कोणी न येती राजद्वाराकडे। जो तो दडे सादोसादीं।' **सादा**-पु साधा पहा 'वरि चर्म घातलें र कर्मकीटकाचा सादा।' -नामना ७१ **सादी**-स्त्री कोंपरा, फट, साधी पहा 'सादी माजी रगडावा। महानागें पायातळीं।' -ह १९ ९६

**सादट**—वि १ तिखट २ मळका ? -मनको

**सादण-णें**—न तादुळाचें एक पक्वान्न **सांदणपान-ताटली**-नस्त्री ज्यात सादण करतात तें पात्र

**सादण**—न (विणकाम) तातूला तातू जोडणें [साधणें] **सादणी**-स्त्री साधणूक, साधणी पहा 'चौऱ्यायशी लक्ष योनी। तिथें वाडा पेरा सादणी।' -ज्ञा १४ १०७ **सांदणें**-साधणें, जोडणें 'तरि हाक देऊनि सादिलें। शिळेतें काई।' -ज्ञा ८ ४३ [साधणें]

**सांदणें**—साधणें पहा 'तयातें साम्याचिया वाटी। एक्याची सादे कुळवाडी।' -ज्ञा ७ १७९ [साधणें]

**सादनी**—स्त्री (सोनारी) पाटलगड व वरतगड हीं एकमेकाम जोडून त्याची पेटी तयार करण्यासाठीं जी धातूच्या पन्याची अरद अशी कळी उभारतात ती साधनी पहा

**सादर**—वि १ आदरयुक्त, मान, शिष्टाचार ठेवणारा २ तत्पर, तयार, सज्ज 'तैसेचि गुरुभजनीं सादर।' -एभा १७ ३३१ 'होई शरणागत किंवा युद्धासी सादर।' -तुगा ३९२ ३ उत्सुक, आतुर 'का चन्द्रकिरणीं चकोर। नेत्रीं अत्यंत सादर।' -एभा ७ १५६ **सादर-रें**-क्रिवि १ आदरबुद्धीनें, पूज्य भावानें, नम्रतायुक्त 'सादर ऱ्हिताचि तेय। दक्षता झाला श्रीगुरुमी।' -गुच १७ २ कौतुकानें 'मैथुनभूत ज प्राणी। सादर न पहाव नयनीं।' -एभा १७ ३५० ३ विचार पूर्वक 'ता सादरें निरीक्षिता जाण। होय त्या सर्पाचें निरसन।' -एभा २० ४६ [स स+आदर]

**सादर**—धावि १ आलेला, आगत, प्रविष्ट (पाठविलेलें पत्र किंवा वस्तु) २ उद्भूत, निघालेला, पावलेला 'हुकूम सादर जाहला आहे ता पाहून मेहेरबानी सपादून घेणें' -चित्रगुप्त ८ ३ प्रकाशित सपादित (हुकूम, जाहीरनामा, शासनपत्र)

अक्षय्यतृतीया किंवा नागपंचमी हे साधारणपणे अर्धेवट उत्कृष्ट मुहूर्त समजले जातात १ चैत्र शु। १, २ आश्विन शु। १०, कार्तिक शु। १ व ३॥ अक्षय्यतृतीया किंवा नागपंचमी •तीन राव–पुअव (पेशवाईंतील) १ सुभराव पारपडे, २ भवानराव प्रतिनिधि, ३ गोपाळराव पटवर्धन व ३॥ थोरले माधवराव पेशवे •तीन शहाणे– १ (पेशवाईंतील) १ सखारामबापु बोकील, २ विठ्ठल सुंदर, ३ देवाजीपंत चोरघोडे व ३॥ नाना फडणीस २ (ल) दीडशहाणा, मूर्ख व बढाईखोर •पंधरे–पन्दरें–न (१५॥) सात अधिक उत्कृष्ट १५॥ ह भावावरून नांव पडलेसें दिसतें 'कां साडेपंधरवा रजतवर्णी। ऐसीं स्तुतीनीं बोलणीं।' –ज्ञा १० १५ 'साडे पन्दरयाचीं सरळें दवा लेइले हातीं।' –धवळे उ १९ •मायार्थी–वि (उप निंदाव्यंजक) वरून ओंगळ पण आंतून पक्का लबाड, प्रकृति माणूस •दांमर–वि (अशुद्ध, अशिष्ट प्रयोग) १००॥ •सानशी–स्त्री साडे-सात विघे जमीन •साती–सातीचा फेरा–स्त्रीपु १ एखाद्याची जन्मराशी व तिची मागची आणि पुढची राशी या तीन राशी क्रमण्याला शनिग्रहाला लागणारा साडेसात वर्षांचा काल २ (हा काळ कष्टाचा जातो यावरून ल) आपत्काल, दुर्दैवाचा फेरा (क्रि० येणें, लागणें)

**साडपामाडधा**—पु मुलींचा एक खेळ पायांवरून हात फिरवितांना पुढील गाणें म्हणतात (क्रि० करणें) 'साडपामाडधा पाडुडया। मंगळीची लेकर माकुडया। तिय होती सालुडी। सालुडीच्या पायांत दोर ग। गणीचा नवरा चोरग।'

**साढ, साढे**—साड साडे पहा

**साण**—स्त्री होळी दवसची पालखी ठेवण्याची जागा, देवता स्थापनेची जागा, कोनाडा (होळीच्या दिवशीं लागणारा) [स स्थान ?]

**साणें**—न (राजा) कोनाडा [स स्थान ?]

**साण–णा**—स्त्रीपु (प्र) सहाण १ गंध इ० उगाळण्याचा कुरकुरीत दगड २ धारेचा दगड, निसणा [स शाण, प्रा साण]

**साणपट्टी**—स्त्री १ जात्याचें पाळें २ पाळपाचा दगड **साणी लाणी**—स्त्री (कों) सीमेची खूण (दगडांत कोरलेली) [साण+लाणी=लावणी]

**साण**—वि सान, लहान 'साणा हा सत्वाचा प्रावडु।' –उषा १६ [म सान, का सण्ण]

**साणा**—पु १ तरीचें नाकें उतारजागा २ तर, नाव

**साणा**—पु १ भागीदारी जमिनींत आपल्या भागाचें, मालाचें रक्षण करण्यास ठेवलेला माणूस २ कुळावर देखरेख करण्यास जमिनीच्या मालकानें ठेवलेला माणूस [शहाणा] **साणा–ण्या बसणें**– (कों) पीक काढून होईपर्यंत मालकानें हजर राहणें (मळेकऱ्यानें पोलावित्याखेरीज मालकाला सण्णा बसता येत नाहीं) 'तुम मळा पारखा देत नसाल तर साणा बसावयाला येईन' **साणेपण**–न (कों) पिकाची हमेश राखणी मळणी

**साणें**—न धूर जावा, उजेड यावा, याकरितां भिंतींत किंवा छपरांत ठेवलेली खिडकी, गवाक्ष, धारें

**सात**—वि १ ७ संख्या, सप्त २ (ल) गहदनें मोठा परिपूर्ण; फार उदा० सातशाड उंच, सात स्याड, सात पद्यांत वगणें, इ० [स. सप्त, प्रा सत्त, हिं सात] म्ह० १ सात सुगे (गा) हरी भागुबाईचें कुले उघडें २ सात सुगरणी अन् भोपळा अळणी ३ सात पाच रंगा, पण्डाचा नाहीं ठिंगा •आश्चर्यें–नअव (बलभावा) १ आकाशाला खांब नाहीं २ तळहाताला केंस नाहीं ३ समुद्राला झांकण नाहीं ४ घोड्याला शिंग नाहीं ५ देवाला आईबाप नाहीं ६ जिभेला हाड नाहीं ७ कैमाला रक्त नाहीं •ताड उंच–अतिशय उंच •धातु–पुअव सोनें, चांदी, पितळ, तांबें, शिसें, कथील व पोलाद •पदरी मणी–पु (तंजा) स्त्रियांच्या गळ्यांतील एक दागिना •पांच–वि १ पंच्याहत्तर 'ऐसियाही सातपांचं प्रधाना। विभूती सांगितलिया तुज अर्जुना।' –ज्ञा१० १०२. २ सात (धातु) व पांच (महाभूतें) 'सातापांचांचें गाठलें। प्रारब्धें आकारलें।' –तुगा २००४ •पांच करणें–जीत पुष्कळ बिनगतपणा आहे अशी गोष्ट सांगणें, ताळमेळ नाहीं असें बोलणें •पानी–वि उगवल्यापासून सात पानें आलीं म्हणजे ज्याला फळ येतें असा (वेल दूध भोपळा, कांकडी इ० चा) •पुडी–स्त्री (सांकेतिक शब्द) आतड्याचें वेष्टन •पुडी गलाड–न सात वर्षांपू होऊन फुटणारें गळू (यास सात पापुद्रे आहेत असा समज) •पुती–स्त्री १ पहगोसाळीचा वेल २ सात मुलगे असणारी बाई, सात मुलांची आई म्ह० एकपुती रडे आणि सातपुती रडे •पुतें–न घरपासळें (फळ) •पुऱ्या–स्त्रीअव प्रसिद्ध अशीं सात पवित्र नगरें 'अयोध्या मथुरा माया। काशी कांची अवंतिका। द्वारावती आदि आल्या। सर्वही मोक्षदायिका।' –विष्णूची भूपाळी •फिरक–न एक शोभेच्या दारूचें झाड याला सात फेरीं (फिरतीं चकें) लावतात तीं पेटल्यावर फिरूं लागतात •भाई–स्त्री शेतांतील किडे वेंचून खाणारा एक प्राणी •मौक्तिक स्थानें–पुअव १ शिंप २ हत्तीचें मस्तक, ३ सर्पाचें मस्तक, ४ शंख, ५ मत्स्य ६ बेडूक, ७ हत्ती •लाजा–स्त्रीअव पुढील सात प्रकारच्या लाजा – जनलज्जा, मनोलज्जा, वयोलज्जा, धर्मलज्जा, कर्मलज्जा, जातिलज्जा कुललज्जा •लाजा पदरीं बांधणें–अतिशय निर्लज्ज असणें •वडा–पु (आठवडा, पंधरवडा याप्रमाणें बनविलेला शब्द–सुमारें ८०। ९० वर्षांपूर्वी) १ सात दिवसांचा काल २

सात दिवसाचा एकदर हिशेब ०वण-वीण-स्त्रीपुन एक झाड याच्या एका डेखास सात पानें असतात सप्तपर्णी 'सरल कुटज वट-वृक्ष सातवण प्लक्ष दाडिमी धाका।'-नरहरी-गंगारत्नमाला [स सप्तपर्ण-सत्तवण्ण- सातवाण- सातवण] ०वळा-ळी, सातोळा-वि १ सातव्या महिन्यात जन्मलेलें (मूल) २ सातव्या महिन्यात प्रसूत झालेली (स्त्री) ०वाकडी-स्त्री सात दिवस एकसारखी पावसाची झड 'अमृताची सातवाकुडी। लागो का अवुघडी।'-ज्ञा १३ ६४०, -एभा २३ ८५० ०वार-रविवारादि आठवडयाचे सात दिवस ०वेउळी-स्त्री. सात नाग्याची इगळी 'का आयुष्य जातियें वेळे। शेळियें सात-वेउळि मिळे।' -ज्ञा १६.२५१ ०सडका-स्त्री अव उष्णतेनें हत्तीच्या गडस्थळातून वाहणारा मदाचा स्राव (क्रि० सुटणें) ०सडका सुटणें- १ स्वच्छंदी, स्वैर बनणें २ माजणें, उन्मत्त होणें ०सवाई-सवाईनें-क्रिवि १ सातपटीपेक्षां आधिक्यानें (गुणादिकात) सातपट २ (ल) अतिशयो क्तीनें, अतिशय मोठ्या प्रमाणात, फारच अधिक, सरस 'तुमच्या घोडयापेक्षा आमचा घोडा सातसवाईन चागला आहे' ०सायास-साय-या-पुस्त्रीअव अतिशय, पराकाष्ठेचे परिश्रम 'सातासाय सानी' असा बहुधा प्रयोग येतो ०साया करणें-अतिशय काळजीनें, सोपस्कारानें वागविणें, फार परिश्रम घेणें [सात+सायास] सातरी-स्त्री १ सात दिवसाचा काल २ सप्तक, साताचा समुदाय सातेंरें पहा सातरें-न १ सात अहोरात्रपर्यंत पाऊस वारा इ०ची झोड 'पावसाचें वाऱ्याचें सातेंरें' २ सहा दिवस मध्यें जाऊन सातव्या दिवशीं हिंवाची येणारी पाळी ३ (ल) कधींमधीं मिळणारी इष्टानिष्ट गोष्ट सतत काहीं दिवस मिळत गेल्यास म्हणतात 'पधरा दिवस क्षीरभोजनाचें सातेंरें लागलें होतें' ४ सात दिवसाचा काल, सप्ताह -ज्ञा १७५८ 'ही माता एक सातेंरें घे' सातवी-स्त्री मूल जन्मल्याच्या सातव्या दिवशीं करावयाचा कुळाचार (नामदेव समाजात रूढ) साता काळजाच्या पलीकडे ठेवणें-फार फार जपणें साता गुणांचा खंडोबा-पु १ अनेक दुर्गुण आणि खोडी यानीं युक्त असा इसम २ अनेक व्याधी, रोग ज्याच्या मागें लागले आहेत असा इसम अठरा गुणाचा खडोबा पहा साता जन्माचा वैरी पु फार जुना, मोठा वैरी, हाडवैरी 'डोक्यात दगड घातला तर साता जन्माचा वैरीसुद्धा रडायला लागेल' -भा २७ साता नवसांचा-वि फार दिवसानीं, नवससायासानीं झालेला (बाळ), (ल) फार लाडका 'साता नवसाचें हें एकुल्तें एक लाडकें बाळ। उदण्या वागडण्यातचि बालपणीं घालवीतसे काळ।' -मोगरे. साता समुद्रांच्या पलीकडे-फार फार दूर अशा अर्थी साता समुद्राच्या पलीकडे ठेवणें-फार बदोबस्तानें, कोणास मागमूस लागू न देता ठेवणें साता सायासांनीं-क्रिवि फार परिश्रमानीं सातारें-वि सात महि न्याचें (जन्मलेलें मूल) म्ह० सातारें आणि म्हातारें, आठ आणि घाट(त) (याचा विशेषणासारखाहि उपयोग करतात) साताळ-पु (व) सात दात असलेला बैल साताळशी-वि अतिशय आळशी [सात=सातपट+आळशी] सातिच, सातेरू-न (कों) जमीनींत (वारुळात) लागणारें व सात पोवळीं असणारें मोह साती-अ. सातानें गुणून, सातपट (पाढ्यांत उपयोग) 'एक साती सात' सातेरें, सात्रें-सातेंरें पहा. सातोळा-वि सातवळा पहा सात्रूरू-न सातेंरें, सात दिवसाचा काल

सात—स्त्री १ सोबत, सगत, समागम, साहचर्य 'एन्दवी मधुकराचा साती केवि जीणवे।'-शिशु २६६, -तुगा ३०७५ २ सोबती; जोडीदार ३ तिरकमठयाला बाबूची बारीक बांध-लेली ती काब -बदलापूर १२६ [साथ] साती-पु सोबती, साथीदार

सात—स्त्री १ क्रम, आवृत्ति, सातेंरें (विशेषत साथीच्या रोगाचें) २ एकाच प्रकाराची, पद्धतीची, पदार्थाची पुनरा-वृत्ति उदा० 'भाकरीची-भाताची सात (भोजनास), मुलाची-मुलींची सात (बायकोस) ३ सतत प्रवाह, परपरा [सं. सतत]

सात-सात-ती—स्त्री साथीचा रोग, साथ

सा(सा)त—स्त्री एक विवक्षित मासा.

सात-थ—स्त्री ग्रामदेवतेपुढें नारळ फोडणें (दसऱ्यास किंवा श्रावणीपूर्वी भगतानें) -बदलापूर ३२० [? स साती= दान]

सांत—वि समग्र, सर्व 'यालागिं बोलिले सातें।' -रास २ ६३ [स+अंत]

सांत-सात—स्त्री १ बाजार, हाट -ज्ञा १३ ३२०. 'गोरस घेऊनी सातें निघाल्या गौळणी।' -तुगा १२८, दहीसात २ जत्रा, मेळा ३ (गो) आठवडयाचा बाजार साती-स्त्री (ना) लहान बाजार

सांतकें—न (नंदभाषा) (क) लुगडें.

सातडें—न १ कातडें, चामडें (माणसाचें किंवा इतर प्राण्याचें) २ कातडयाचा लोंबता पट्टा, वाभाडा (क्रि० काढणें, निघणें). ३ झाड-वनस्पतींची साल (क्रि० काढणें, निघणें) [स+आत्र ?]

सा(सां)तत्य—न सततपणा, शाश्वतता, अखडितता. [स सतत]

[अर सादिर] ०करणें-१ पाठविणें, रवाना करणें, धाडणें (सरकारास लिहिताना, किंवा पूज्य व्यक्तीस लिहितांना पत्रांतून हा प्रयोग योजतात) २ हजर करणें पावता करणें ०होणें-हजर होणें, उपस्थित असणें 'विदर्भी मेले मर्णे। तथापि सत्कार दर्णे। अथवा सादर होणें। तो सत्वगुण।' -दा २ ७ ७४. सादीर-सादर पहा 'कुमियाचे नावें सनदा सादीर केल्या असेती' -रा १५ ५५

**सादरा**—पु खयाल किंवा सुलताल ह्या तालात बनविलेलें गीत

**सादळ**—वि सर्द, ओल्सर [स स+आर्द्र] **सादळणें**—अक्रि सरदणें, ओल्सर होणें (जागा, वस्तु)

**सादावत**—न (अशिष्ट) साधनपत्र (अप)

**सादाविदा**—सानाविधा पहा

**सादिता**—स्त्री आरंभ, आरभत्व 'ऐसी सादिता बोलतां। होईल शास्त्राविरुद्ध।' -एभा १० ७४६ [स स+आदिता]

**सादिरवारिद**—व्युत्पत्तिदृष्ट्या हें शुद्ध रूप आहे पण सादिलवार शब्द रूढ आहे सादिलवार पहा

**सादिलवार-री**—स्त्री १ गावचा नैमित्तिक, आगंतुक, खर्च (उत्सव धर्मादाय भत्ता इ० साठीं) हा जादा पट्टी बसवून भागविला जाई २ आगंतुक, आकस्मिक खर्च -वि नैमित्तिक; आगंतुक (खर्च पट्टी जमा इ०) [अर सादिरवारिद]

**सादी**—वि १ बसणारा, आरोहण करणारा (समासांत) अश्व-गज-तुरग-रथ-सादी २ (गौरवार्थी) घोडेस्वार, सैनिक, योद्धा -मोकर्ण १० १८ [स सद्-सादी]

**सा(सा)दुकणें**—अक्रि पेटणें, प्रज्वलित होणें, भडकणें 'नातरी वडवानळु सादुकला। प्रलयवातें पोखला।' -ज्ञा १ ९० [स संधुक्षण] **सादुकपणा**-पु पेटवण, भडका 'तेणें सादुकपणें ज्वाला समृद्धा।' -ज्ञा ४ १२६

**सादृश्य**—न सारखेपणा, सदृशता, समानता [स]

**साद्यंत**—वि अवघा, साग्र संपूर्ण 'तरी साद्यंतुचि पाहीं। सत्राह असे।' -ज्ञा २ ३१८ -क्रिवि आरंभापासून शेवट पर्यंत साकल्यानें [स स+आदि+अंत]

**सांद्र**—वि १ अगदीं जवळ जवळ, चिकटून असलेली (झाडें, घरें, इ०) २ घट्ट विणीचें व दणकट (कापड) ३ निबिड, दाट (अंधार) ४ घट्ट, जाड, अविरल गच्च ५ मऊ, कोमल, अनुकूल 'गाढ्याळ जें हृदय सांद्र न होय ज्याचें।' -र २७ [स] ०मेह-पु १ दाट लघवी होणें २ अशी दाट लघवी **सांद्रीकरण-भवन**-न (शाप) दृढीकरण-भवन (इ कॉन्डेन्सेशन)

**साध**—स्त्री १ जोड, सांधा, सांध्याचा बिंदु, रेषा २ भेग, फट, चीर, तडा, खाच, छिद्र ३ पेरें, ग्रंथि, खीळ, सांधा ४ (विणकाम) हातमागातील ताण्याचा तिढा, वेढा, कातरा (क्रि० पडणें) [स संधि] **सांधीस बसणें, सांधीत पडणें**-१ एकांतात राहणें, पडणें (पतिमरणानंतर बारामास विधवा इ०) २ (सामा) मागें पडणें, लोकांच्या स्मरणातून जाणें सामान्यद- ०फक-वि साधकाम करणारा (शिवण इ० तील) 'सांधकाला कर्तन व सीवन या दोन्ही विषयांत गति पाहिजे' -(काकडे) शिवणकाम ०काम-न सांधण्याचें, जुळविण्याचें, योग्य रीतीनें एकत्र करण्याचें काम [सांधणें+काम] ०कोंद-स्त्री कानाकोंपरा, खाचखळगा, बीळ, फट; (सामा) सर्व आडबाजूच्या बारीक सारीक जागा 'दिवा घेऊन त्यां सांधकोंद पाहिली' (अव उप योग) ०मोड-स्त्री (बांधकाम करताना) एका थरांतील दगड, किंवा विटा यांचे सांधे वरच्या थरांतील दगडविटांच्या सांध्याशीं सरळ रेषेंत न यतील असें करणें (क्रि० करणें) 'सांधमोड रे ह्यांपेक्षा कमी नसावी' -मॅरट १५ ०रुख-पु एक झाड अस्थिभंगावर औषधी याचें लाकूड चिरलें तरी पुन्हां सांधलें जातें अशक्त प्रकारच्या झाडाला 'लवगी सांधरुख' म्हणतात ०वण-स्त्री पायतणाची दुरुस्ती -बदलापूर १८७ **सांधणी**-स्त्री. १ (विणकाम) परमणीमुळें साफ झालेलीं सुतें एकत्र वळणें, जोडणें २ मागावरील सुताशीं नवीं सुतें जोडणें ३ या कामीं वापरावयाचें हत्यार, साधन **सांधणी-णूक**-स्त्री १ जोडणी, जुळणी, एकीकरण (शिवणें, झाळणें, चिकटविणें इ० नें) २ समेट, एकी **सांधणें**-उक्रि जोडणें एकत्रित करणें, संयुक्त करणें (शिवणें, झाळणें, चिकटविणें, गाठणें इ० क्रियेनें) -अक्रि एक होणें, जडणें; जुळणें **सांधन**-न जोडणी, सांधणूक **सांधप**-न (राजा) सांधण्याचा व्यापार सांधणें पहा **सांधा**-पु १ ग्रंथि, पेरें, संधि, सांध २ जोड, संधिरेषा-बिंदु, दरज ३ जोडलेला तुकडा, जो जोडला असतां वस्तु लांब होते किंवा वाढली जाते तो तुकडा 'दोरीस दाहा हात सांधा लाविला तेव्हां पाणी काढावयास उप योगी झाली' ४ मिलाफ एकी 'आणि शुक्रशोणिताचा सांधा। मिळतां पाचांचा बांधा।' -ज्ञा १३ १०६ ५ (नाविक) सांडीतील होड्या लावण्याची सोईची जागा ६ (ढोरधंदा) दोन तुकडे एकत्र जोडणें, लाग (क्रि० शिवणें) [स. संधि] ०बसणें-जम बसणें, जुळणें, जमणें, बेतशीर, सोईचें होणें **सांधासांध**-स्त्री १ अनेक वस्तू एकत्र येणें, जुळणें अनेक लोकांनीं एकत्र करणें, जोडणें २ (ल) समेट, तडजोड ३ दुरुस्ती, सुरळीत चालणें **सांधित**०वि सांधलेलें, जोडलेलें, जुळलेलें (शिवण्यानें, झाळल्यानें इ०) **सांधी**-स्त्री १ जोड, सांधा २ चिरण, फट, भेग. सांध पहा **सांधीकोंदी**-स्त्रीअव जोड, छावे, चिरा,

फटी इ० संबधीं व्यापकार्थी शब्द, बनेकोपरे सांधी कोंदीचा-वि १ घरात कोठें तरी आडबाजूस, कोपऱ्यांत बसणारा, बिळात राहणारा २ क्षुद्र, महत्त्व नसलेला, अज्ञात, गल्लीकुचींतील सांधीकोनी-नीं-क्रिवि कोनाकोपऱ्यात, आडसधींत, आडबाजूस 'जो तो दडे साधीकोनी।' -र वि ११९७०

सांधीचा, सांधीतला-वि १ कोपऱ्यातला, आडबाजूचा २ अज्ञात, क्षुद्र, हलका ३ कोपऱ्यात, आडबाजूस, गुप्त जागीं अस ण्यास योग्य, लायक साधीचा पदार्थ पहा सांधीचा पदार्थ, सांधींतली वस्तु-स्त्री १ टाकाऊ, निरुपयोगी वस्तु २ (ल) विधवा ३ गुप्त किंवा खाजगी ठिकाणींच फक्त उपयोगी पडणारी वस्तु ४ वेगळी काढून ठेवलेली, मोठया, नैमित्तिक प्रसंगीं वापरण्यात येणारी वस्तु ( अलंकार, पागोटें, शेला इ० ) सांधींतला व्यवहार-पु कोपऱ्यात, आडबाजूस, गुप्त, स्थळीं चालणारा व्यवहार, गुप्त, खाजगी व्यवहार सांधींतली गोष्ट-स्त्री. अज्ञात, खाजगी, गुप्त व्यवहार, गोष्ट म्ह० साधींतली गोष्ट उजेडात आणू नये सांधींतली सावकारी सांधींतला व्यापार-स्त्री पु अप्रसिद्ध, लहानसा व्यापार, सावकारी, गल्लीकुचींतील धदा सांधींतलें मडकें-न (निंदाव्यजक) विधवा सांधीभानेचा-वि साधीकोंदीचा [ साध+भानवस ] सांधीव-वि १ साधलेलें, जोडलेले ( विभाग, तुकडे ) २ तुकडे जोडून केलेली, विभागाची बनलेली ( वस्तु, गोष्ट ). सांधोरी-स्त्री १ मोठा किंवा अव्यवस्थित साधा, चीर २ गल्ली, बोळ सांधोरी कोनदोरी-कोन्दोरी-साधीकोंदी पहा सांधो सांधीं-क्रिवि कोनाकोपऱ्यातून सादोसादीं पहा

साधण-णें, सांधणपात्र-ताटली-सादण इ० पहा 'तिथें साधणें वाढिलीं।' -मसाप २ १

साधक-वि १ ( कार्य इ० ) सिद्धीस नेणारा, घडवून आणणारा, पुरें करणारा ( माणूस, पदार्थ इ० ) २ कार्यसिद्धी विषयीं उपयुक्त, साधनभूत, उपकारक ( लेख, वचन, पदार्थ इ० ) ३ मोक्षसाधनासाठी जपतप, मतवैकल्यें, दंडदंड इ० करणारा (योगी, मांत्रिक), मुमुक्षु 'या विषयातें साधक। त्यजिती नियम।' -ज्ञा २ ३०३ 'उपदेशिलें आत्मज्ञान। तुटलें संसार बंधन। दृढतेकारणें करी साधन। या नाव साधक।' -दा ५ ९ ४ ४ मदतनीस, शिष्य 'जालंधर सिद्ध महाराज देख। कानिफा तयाचा साधक।' -सतलीलामृत ( नवनी २४३ ) [ स ] ०ता-स्त्री १ एखादी गोष्ट साध्य करण्याची हातोटी, सिद्धि २ प्रसंगमान जाणणें -होकै ८ ०बाधक-वि उपकारक आणि अपकारक, अनुकूल आणि प्रतिकूल २ योग्य, अयोग्य, चांगलें की वाईट 'मलत्यास पैसा देऊ नय साधकबाधक पाहून व्यवहार करावा ' साधणें-उक्रि १ ( कार्यादि ) सिद्ध होई असें करणें, सिद्धीस नेणें २ करणें, सपादणें ३ मिळविणें, जिंकणें 'मत्सकल्प असा कीं साधुनि घावीच सर्व भू पार्था।' -मोभीष्म ११.११ ४ मारणें, नाश करणें -ज्ञा ३ २१६ हें शस्त्रेंवीण साधिती।'-ज्ञा३.२५८ ५ अनुकूल करणें 'एकातें साधूनि मारिती।' -ज्ञा१६ ३४४ ६ पाळणें ( व्रत, विधि, इ० ), साजरा करणें, मानणें (सण, मुहूर्त) ७ व्याकरण करणें, सागणें ८ व्याकरणानुबधानीं, शब्दसयोगानें बनविणें ( शब्द ) -अक्रि १ सिद्ध होणें, तडीस जाणें २ यशस्वी होणें, भरभराटणें. ३ सुरळीत चालणें [ स. साधु-साधन ] साधणी, साधणूक-स्त्री १ साधण्याचा व्यापार, साध्य करून घेणें, सपादणें, मिळविणें २ सिद्धीच्या योग्य मार्ग, सधान ३ साधन, उपाय, योजना; युक्ति ( साध्य कर ण्याची ), घडविण्याचें कौशल्य 'जिहीं घडितां साधूनक सरे। विश्वकर्मेयाची।' -शिशु ३२८ साधवणें-क्रि ( व ) वश करणें साधित-वि १ साधलेला, मिळविलेला, तडीस नेलेला २ (व्या) गुणधर्मयुक्त, मूर्त ३ (व्या) उद्भूत, संभूत, प्रत्यया दिकेंकरून बनविलेला याच्या उलट सिद्ध ४ (व्या.) यौगिक, सस्कारित, घटित याच्या उलट मूळ ५ (व्या) दोन किंवा अधिक अवयव एकत्र होऊन बनलेला साधितणें-क्रि साधणें

साधन-न १ साधण्याचा व्यापार, सपादन, प्राप्ति २ करणें, बनावणें, उकरणें ३ कारणभूत अगें, पदार्थ, साहित्य, सामग्री, उपकरणें ४ अवयव, अगें, घटक ५ योजना, क्लृप्ति, उपाय 'म्हणती साधनें केलीं अनेक।' -एभा १० ११४ ६ मध्यस्थ, अडत्या, गुमास्ता ७ धार्मिक मतवैकल्यें ( मोक्षप्राप्तीसाठीं ), मत्रतत्र, दानधर्म इ०, अनुष्ठान ८ (न्याय) निर्णयाला प्रमाणभूत गोष्ट, प्रतिज्ञा ९ (कायदा) स्थापित करण, सिद्ध करणें १० ( औषधें-किमया यासाठीं ) धातूवर रासायनिक क्रिया, संस्कार ( विशेषत पाऱ्यावर ) ११ जोड, सपादणी 'आपल्याकरिता मी नरकाच साधन केलं' -इप २९ १२ नाश, पराभव 'त्रिपुर साधन करावयासी।' -गुच १९ १३ ( व ) मार [ स ] ०चतुष्टय-न ब्रह्मप्राप्तीचे चार प्रधान उपाय वस्तुविवेक, वैराग्य, शमादि षट्संपत्ति व मुमुक्षुत्व -एरुस्व ६ ५६ 'आत्मतत्त्वाचिया विद्याळ घोडी। ठाईं ठाईं ठेविल्या प्रचडी। साधनचतुष्टयादि हातगुडी। दुर्ग पावले शोभेसी।' -स्वानु १० २ १० ०द्वादशी-स्त्री सकाळीं थोडावेळ असणारी द्वादशी ( पुढें त्रयोदशी लागत असल्यान एकादशीचा उपवास थोडया वेळात सोडण्याची व्यवस्था करावी लागते ) ०निर्देश-पु १ (कायदा) पुरावा पुढें करणें, पुराव्याचा उपन्यास, निर्देश २ (न्याय) प्रमाणांची मांडणी, स्थापना ०पत्र-न पुराव्याचा कागद, लेखी पुरावा ०मार्ग-पु १ मोक्षाचा मार्ग, दिशा ०सूत्र-न कार्याचें,

सिद्धीचें, साधन, उपाय, (क्रि० करणें, लावणें) २ (इक इ०) दावीत करण्याचा पुरावा, साधन, दानपत्र, दस्तऐवज ३ कार्याचा, संपादणीचा मार्ग, पद्धत साधनिका–स्त्री १ तयार करण्याचें, कृतीचें शास्त्र, पद्धत पत्रा २ (व्या) व्याकरण करणें; वाक्य पृथक्करण [स] साधनी–वि १ सिद्धीच्या, संपादणीच्या कामीं साधनें, उपाय, योजना इ० लावण्यांत, शोधण्यांत वाकबगार, हुषार, मेहनती, संपादन करणारा, साध्य करून घेणारा २ संपादण्याच्या, तडीस नेण्याच्या कामीं योजलेलें, साहाय्यक, कारण असणारें (साधन द्रव्य, इ०) ३ सिद्ध प्रस्थापित करणारें (लिखाण, खत) साधनीय–वि १ संपादण्या–मिळविण्याजोगें, करण्यासारखें २ सिद्ध, प्रस्थापित करण्याजोगें [स] साध्य–वि साधावयास शक्य योग्य, संपाद्य, मिळण्यास शक्य योग्य 'साध्य नसे मुनिकन्या।'–शाकुंतल (सामासांत) कष्ट–आयास–श्रम–कृच्छ्र–शक्ति–बल–पराक्रम–साध्य २ प्रतिकार्य, जिंक्य, निवार्य (रोग, शत्रु, इ०) ३ सिद्ध–तयार करावयाचें 'हे मार्गु तरी दोनी। परी एकचि ती निदानीं। जैसी सिद्धसाध्य भोजनीं। तृप्ती एकी।' –ज्ञा ३ ३८ ४ (तत्त्व) अनुमान, निर्णय करण्यासारखें ५ (कायदा) सिद्ध, प्रस्थापित करावयाचें, सिद्ध करून दाखवावयाचें ६ (सुदैवानें) संपादित प्राप्त; सिद्ध –न १ प्रमेयाचा भाग २ उद्दिष्ट, हेतु –पु १ (ज्यो) बावीसावा योग २ देवांचा एक वर्ग यांत १२ देव आहेत 'हे रुद्रादित्यांच मेळावे। वसु हन साध्य आघवे।' –ज्ञा ११ ३३२ [स] ०साधन–न मिळवावयाचें तें मिळणें सिद्धि लाभणें, हेतुपूर्ति ०सिद्धि–स्त्री १ हातीं घेतलेल्या कामाची सिद्धि २ मत, भूमिका हिचें प्रस्थापन, पुरावा ३ उद्दिष्ट वस्तु प्राप्त झाल्याची स्थिति

साधन–न (व) तूप

साधनी–णी–स्त्री १ गवंडी, सुतार इ० चें जमीन एका पातळींत आहे किंवा नाहीं हें पाहण्याचें साधन, हत्यार (इं) स्पिरिटलेव्हल २ आंगठी वगैरेच्या कोंदणासभोंवतीची किनारी साधनींत येणें–असणें–समपातळींत, सरळ असणें, क्षितिजाशीं समांतर असणें

साधर्म्य–न सादृश्य सारखेपणा (स्वभाव, गुण इ० चा)

साधला–पु सचला पहा बांधकामाचा चुना 'दगड चांगल्या सांधल्यात बसवावे' –मॅरट ३७

साधलाद–स्त्री दैवगति, नशीब, योगायोग 'आम्ही दोघे सारखी चाकरी करीत असतां यजमानानें त्याला हजार रुपये बक्षीस दिले, मला काहीं नाहीं, ही साधलाद आहे' [साधणें+लाधणें]

साधा–वि १ नक्षी, जर, रेशीमकाठ इ० नसलेलें (पागोटें, धोतरजोडा, कापड इ०) २ छानछोकी, आकड, ऐट नसलेला (माणूस) ३ वक्रता, अन्योक्ति, अलंकार इ० नसलेलें (भाषण, लेखन) ४ निष्कपटी, अकृत्रिम; गैर हिकमती, सरळ वृत्तीचा, गरीब ५ मूळ रूपात, अमिश्र, निर्मळ, स्वच्छ असलेलें [फा सादा तुल० स साधु] साधें गंध–न पांढरें गंध (चंदनी, केशरी नव्हे) ०जोडा–पु साधेकांठी धोतर, साध्या उपट रेशमी जोडा ०पिंपा–वि १ साधा पहा २ (देशावर उत्तर भागांत) गुबगुबीत, लट्ठ व निरोगी (चेहरा, देह इ०) ०पोशाक–रा–पु नेहमीचा विन रंगी–रेशमी–जरीचा कपडा ०बाधा–पु साधा आकार, घडण रूप 'साधा बाधा विन अरवा' ०भोळा–वि १ प्रौढ असून साधा व सरळ, प्रौढ व पवित्र २ अगदीं साधा ०सिधा–वि सरळ, निष्कपट 'हे प्रकरण साधेसिधे नसून काहींतरी विपरीत आहे हें अनंतरावांना समजलें' –हाकांध १७ ०सैपाक–रोजचें जेवण (विन पक्वान्नांचें) साधी कैद–स्त्री (कायदा) सक्त मजुरीची नसलेली कैद साधी चाल–स्त्री नेहमीची, जन्मजात चाल (घोड्याची) साधी पोळी–स्त्री पुरण भरून केलेली नाहीं अशी पोळी साधे जिरें–जिऱ्याची एक जात साधें पान–न संयुक्त नसलेलें, अनेक दळें नसलेलें पान, एकटें पान

साधारण–वि १ सामान्य, सर्वांस लागू पडेल असें, अविशिष्ट २ समाईक, सार्वत्रिक 'पृथ्वी साधारण धन पण करुनि नव्हेचि एक हारविता।' –मोसभा ५ ५२ ३ उत्कृष्ट नव्हे व टाकाऊहि नव्हे असें मध्यम प्रतीचें –न १ सर्व सामान्य नियम, रीत २ एका वर्गातील सर्व वस्तूंना, व्यक्तींना लागू पडणारा, त्याच्या ठिकाणचा गुणधर्म –पु १ चव्वेचाळीसावा संवत्सर २ सामान्य लोक –एभा २३ ३१६ [स] ०अवयव–पु (गणित) दोन किंवा अधिक संख्यांत जो एकच अवयव असतो तो ०कार्य–न व्यक्तींचें विशेषें करून नव्हे असें कार्य ०गति–स्त्री साधी, नेहमीची, विशेष नसणारी गति (इं) सिंपल मोशन ०देश–पु ज्यात झाडी व डोंगर मध्यम प्रमाणात असून पाऊसहि मध्यम प्रमाणातच पडतो तो देश ०धर्म–पु सर्वसामान्य, सर्वांना लागू पडणारा धर्म ०पक्ष–पु उत्तम व निकृष्ट या दोन पक्षांमधील पक्ष मध्यम पक्ष ०फुलबाजी–स्त्री इंग्रजी फुलबाजीचा एक प्रकार –अभि २० ०भाजक–पु (गणित) दोन संख्यांस ज्या सामान्य अवयवानें निःशेष भाग जातो तो ०सभा–स्त्री संस्थेच्या घटनानियमाप्रमाणें सर्व सभासदांची वर्षांतून एकदा किंवा अनेकदा ठराविक वेळीं भरावयाची सभा (इं)

जनरल मीटिंग ०स्त्री–स्त्री वेश्या, हलकी स्त्री, अकुलीन, माडोत्री स्त्री साधारण्य–न साधारणपणा, सामान्यत्व, याच्या उलट वैशिष्ट्य, विशेषता

साधु–वि १ सरळ, योग्य, शुद्ध २ पवित्र, सात्त्विक, सद्वर्तनी ३ धर्मनिष्ठ, ईश्वरभक्ति-परायण ४ विवक्षित दोषरहित व गुणयुक्त (वाक्य, भाषण, ग्रंथ, कर्म इ०) ५ हितकर, भलें 'तेथा ही वैर साधु न घडे। अचेतनासी।' –शिशु ४७२ ६ चांगला, व्यवस्थित, पूर्ण 'वृषरूप दैत्य मारुनि तच्चर्मे साधु मढविले होते।' –मोसभा १९० –पु १ सज्जन माणूस, पवित्र पुरुष 'साध्वी शांति नागविली। मग माया मांगी शृंगारिली। तिये करवीं विटाळविली। साधुवृंदें।' –ज्ञा ३ २५१ २ भगवद्भक्त, संत ३ योगी, ऋषि, मुनि ४ महाराचा धर्मगुरु –उद्गा (द्विरुक्तीनें) शाबास! भले बहाद्दर! 'तों साधु! साधु! ऐसें वदले सुरनर म्हणोनि तो सवळे।' –मोभीष्म १५२ [स] ०बोध–पु सदुपदेश, चांगली, सज्जनाकडून मिळालेली शिकवण 'साधुबोध झाला नुरोनिया ठेला।' ०वाद–पु धन्यवाद, शाबास असा उद्गार 'न करि जगीं साधुवाद घुमतातें।' –मोमन ३ ३ ०वृत्त-त्ति–वि पवित्र, सद्वर्तनी मार्गाचा ०शील–वि सच्छील, धर्मशील, नीतिमान ०सज्जन–पुअव (समुदायानें) सज्जन, सद्वर्तनी, निष्कपटी लोक ०संत–पुअव १ (समुच्चयानें) साधू आणि संत 'साधुसंत येती घरा। तोचि दिवाळी दसरा।' २ साधू संत (विशु कार्थी) ०समागम–पु साधुसंताचा, सज्जनाचा सहवास, संग 'साधुसमागम अंतःकरणात विनयाचें उपधान करितो'

साध्य–वि सायंकालीन, सध्याकाळचें [स]

साध्यान, साद्यांत–वि १ साग्र, सविस्तर 'साद्यांत वाक्यार्थ गिरिधरें लिहिला।' –सप्र १५ ३८ २ सर्वत्र, सर सकट 'समर्थे साद्यंत वाटिलीं साखरपानें।' –सप्र ७ २४ [स साद्यन्त]

साध्यायी–पु (प्र) सहाध्यायी पहा

साध्वस–पु भय, भीति 'येणें प्रवर्तला साध्वसें। पार्थु बोलें।' –ज्ञा ११ ३८ 'न वदती वाणी कदापि साध्वसदा' –मोकर्ण [स]

साध्वी–स्त्री १ साधुपत्नी २ पतिव्रता, सती 'साध्वी शांति नागविली।' –ज्ञा ३ २५१ [स]

सान–वि १ लहान, बारीक, छोटें 'कटि प्रदेशें शोभत जघन। माज अतिशयेंसी सान।' –एरुस्व १५.५५ २ थोडें, अल्प 'त्याच्या त्या व्यसनहुनि भासे स्मृति दुःसही तया मानें।' –मोकर्ण ३ ३ ३ हलका, कनिष्ट 'हर विशेष विष्णु सान।' ४ लहान, अल्पवयीन 'सान थोरां साभाळितो [स सूक्ष्म; प्रा सण्ह, का सण्ण] ०थोर–वि लहानमोठा 'न म्हणती सानथोर अवघीं सकळिक।' –तुगा १९९

सानट–वि चिमुकलें, लहान, सान 'ते उदकधारा गोमटी। थोर ना सानटी।' –शिशु ७८४ सानणें–क्रि लहानावणें –मनको साना–वि लहान, सान 'सरसु आहारु न म्हणे साना थोरु।' –भाए ३३२, –एभा १४ ४९२ सानी–वि. १ सान, लहान २ धाकटा, दुसरा. 'आलमगीर सानी' –वाडयोमा २ १०६ [अर सानी=दुसरा] सानीव–न. लहानपण 'नाना पुरातिये प्रतिष्ठेलागीं। सानीव धरूनि आंगीं।' –ज्ञा १ ४६ सानुला–वि लहान 'तैसे परमाणु पाघुटले जाणूनि जीव सानुले।' –ज्ञा १३ २४८ साने–वि अव लहान 'थोरसाने भक्तजन।' –वेसीस्व १२ ६४ सानेजणें–लहान होणें 'दातही आन होती। परि अपाडें सानेजती।' –ज्ञा ६. २६३ सानेपण–न लहानपण 'सानेपण मोडू नये।' –दा १४ १३२ सानेवाणें–वि थोडें बहुत. –शर

सान–स्त्री सहाण पहा [स शाण हिं] ०पट्टी–स्त्री. रध्यास धार लावण्याचा दगड

सान-ग्न–स्त्री (गो. कारवारी) केरसुणी, झाडणी [सारण अल्प रूप]

सानक–स्त्री १ जेवणाचें लहान ताट, ताटली 'सानक वाढोनी रुमालें झाकोनी।' –रामदासी २ १२२ २ रोटी, अन्न ३ निर्वाहासाठीं दिलेली इनाम जमीन (ही परत घ्यावयाची नसते) 'मोकदमी इनाम सानक जकात येविशीं' –वाड योमा १ १२७ [अर सह्न्, सह्नक, हिं गु] ०रोटी–स्त्री शपथेचें अन्न, अन्नाची शपथ, बेलभंडारा 'तिनें तत्समयीं सानक रोटी दिली' –भाव २५ सानकी–वि सानकासवधी

सानचा-चो–वि क्रिवि (प्र) सांजचा, सध्याकाळचा, सध्याकाळीं

सानवणें-विणें–क्रि मुरणें, मुरू दणें 'शुद्ध स्वयंपाक पानें आपें आप उतरलीं। निजबोध मवामीनें सानविलीं।' –सप्र १५ ७

सानसून–स्त्री (व ना) सामसूम पहा निःशब्दता

साना–पु (कों) कोनाडा, गवाक्ष सार्णे पहा ?

सानीन हाल–क्रिवि नतर, पुढें 'सानीन हाल त्याची प्रती निघाली, कोठेंतरी चूटी गल्य असे' –रा २० ६७ [अर सानील् हाल्]

सानुकंप–वि करुणायुक्त, दयार्द्र [स+अनुकंपा]

सानुकूल–वि अनुकूल, अविरुद्ध 'जे सानुकूल श्रीगुरु ज्ञानदेवो म्हणे।' १ ७५ [स स+अनुकूल]

सानुनय–वि १ नम्र, विनीत २ सभ्य, मर्यादशील [स+अनुनय]

**सानुनासिक सानुस्वार**—वि अनुस्वार असलेला, नाकात उच्चारावयाचा (वर्ण) [स+अनुनासिक-स्वार]

**सानुराग**—वि सप्रेम, प्रेमळ -पु अनुराग, प्रेम 'परि मनीं आथी निका। सानुरागु।' -ज्ञा ४५७ [स+अनुराग]

**सान्न**—न (गो) तांदुळाच्या वड्यांचें एक पक्वान्न, सादणें (कु) सानान

**सान्निध्य**—न सन्निधता, समीपता, शेजार [स] **०विकार**-पु (रसा०) सान्निध्यामुळें घटनेंत होणारा फरक, योगक्रिया (इ) कॅटॅलिसिस

**सान्निपातिक**—वि १ सन्निपातासंबंधी २ संकीर्ण [स]

**सान्नें-न्यें**—न पिशाचबाधा झालेल्याच्या अंगावरून उतरून पिशाचाला दिलेला बळी (भात, कोंबडें, इ०) (क्रि० देणें टाकणें, उतरणें) [सान्न+अन्न]

**साप**—न १ एक सरपटणारा प्राणी, सर्प देवावर नागाखेरीज सर्व सर्पजातीच्या प्राण्यांना साप म्हणतात, सामान्य जातिनाम जिवाणू विरड अधून, फुरस, मण्यार, घोणस, शेण्या, नानेटी जोगी, धामण, आंधेला इ० विशिष्ट जातीचीं नावें कोंकणात आहेत २ (गो) घोरपड, गार [स सर्प, प्रा सप्प, प सप्प हिं गु व साप, सिंजि सप] (वाप्र) **साप खाई तोंड रितें**- (साप चावतो पण त्याच्या तोंडात कांहीं येत नाहीं) एखाद्या कृत्याचा निष्फळपणा दाखविण्यासाठीं योजतात **साप साप म्हणून भुई धोपटणें** (साप असल्याच्या खोट्या समजुतीनें भुई बडविणें) नसता दोष लावून बोभाटा, शिक्षा करणें; (कधीं सा० दोरखंड झोडपणें असाहि प्रयोग करतात 'पण उगीच साप म्हणून दोरखंड झोडपण्यात काय अर्थ' -फाल्गुनराव) म्ह० साप म्हणू नये धाकला, वामन म्हणू नये आपला (गो) दुष्ट माणसावर विश्वास कधीं ठेवू नये **०टोळी**-स्त्री एक विषारी सापाची जात **०सुरळी-सोळी**-स्त्री एक जातीचा सरडा ही दिसण्यात सरड्यासारखी तर चालण्यात सापासारखी असते, जात विषारी चोपय पहा **सापाची जीभ**-स्त्री अमर्दी ल्हान शस्त्राला म्हणतात **सापाचीमावशी**-सापसुरळी **सापाचें वारूळ**-साप राहत असलेलें पांढऱ्या मुंग्यांचें वारूळ **सापीण**-स्त्री सापाची मादी

**साप**—वि (प्र) साफ पहा

**सांपई**—वि (राजा) फुकट, बुरसलेल्या धान्याच्या घाणी प्रमाणें घाण येत असलेलें सापट पहा

**सापकंद-कांदा**—पु एक कंद, हा विषारी असतो [साप+कंद]

**सापका**—पु १ आणीबाणीची वेळ ऐन संकटाचा प्रसंग, २ भयंकर संकट, धोका 'जिवाशीं-प्राणाशीं साप पडला' [सप्प।] स्वप्न, विचाराच्या, अपेक्षेच्या तीव्रतेमुळें (स्वप्नांत किंवा जागेपणीं) होणारा भास, दृष्टांत (क्रि० पडणें) [स स्वाप+का प्रत्यय]

**सा(सां)पट**—स्त्री फट, भेग, चीर (सांधा इ० स असलेली) [संधि+फट]

**सा(सां)पट-ड**—वि कुबट, घाणीचें, बुरसट 'अन्न विरल सापडें।' -यथादी

**सांपटणें**—अक्रि सापडणें पहा

**सापटी**—स्त्री (कों० तेलीधंदा) जाळीदार दोरी ही बैलाच्या मानेखालून घेऊन जोखडाला बांधलेली असते सापड पहा

**सापटें**—न (महानु) जीर्ण वस्त्र 'कव्हणीं एकु एसणें सापटें पांगुरावेया दे।' -दृष्टांत पाठ ५३

**सांपड-डी**—स्त्री (राजा) १ बारीक, लांब लवचिक काडी, काठी (कुपण इ० बांधण्यास, कांहीं गाठण्यास उपयोगी पडणारी) (अशा कामीं उपयोगी) झाडाचा रोपटा **सापुड**-स्त्री सापड पहा [स संपुट, प्रा संपुड]

**सापड**—पु १ एकानें दुसऱ्याला गुतवून किंवा बंधन घालून पकडणें, धरून ठेवणें, गुतणी, अडकणी (क्रि० घेणें) २ शेत इ० सवरीं लावणी, वेणणी इ० काम लौकर व्हावें म्हणून पुष्कळ कामकरी एकत्र मिळून, त्यात एकानें वाद्य वाजवीत असावें व त्या नादावर इतरांनीं ईर्षेनें तें तें काम त्वरेनें करीत असावें असा शेत कामाचा प्रकार 'भलेरे दादा,' 'भलेरे भले' इ० गीतें यावेळीं ठेक्यावर म्हणतात, ताल देत सर्व काम करतात (क्रि० घालणें) [सापडणें] **सांपडणें**-अक्रि १ गवसलें जाणें, आढळणें २ ताब्यात, हातात जाणें ३ अडकणें (संकट पाश, सापळा इ० त) 'कीं वणव्यात प्राणी सापडले। त्यावरि तोडिलें तस्करानीं।, ४ लाभणें, मिळणें, आकळणें ५ येणें मिळणें (संधि फुरसत, वेळ इ०) [स संपद्-संपादन, प्रा संपाडण] **सापडविणें**-१ सापडावयास लावणें सापडलेसें करणें २ गुतवून ठेवणें, बांधणें 'दोघांसही सापडवूनि खाट। आलेंयें तुम्हां बोल खरा न वाटे।' -आकृ ३० **सापना-पु** (कों) १ काठ्या बांसें इ० चा केलेला माळा, मांडव, ताटी, खाट, साकारा २ छपर घोंपणी, गवत, पानें, इ० च्या खाली घातलेल्या कामट्या ३ सापड-डी पहा

**सापती**—स्त्री बैलगाडीस जुपताना बैलाच्या गळ्याखालून घेऊन जोखडास बांधलेल्या दोरीचा पट्टा सापटी पहा **सापता**-पु (कर्ना) सापती पहा

**सापत्न**—वि सावत्र -एमा ११ १५७ [सं] **०भाव**-पु सवती सावत्रभाऊ इ० चा परस्पर वैरभाव सावत्रपणा 'एका राष्ट्रालाही दुसऱ्या राष्ट्राविषयीं सापत्नभाव वाटत आहे'

-क १७६३० ०संबंध-पु (कायदा) एका पुरुषाच्या दोन किंवा अधिक विवाहित स्त्रियांचा व त्यांच्या मुलांचा परस्पर संबंध **सापत्नीक**-वि सपत्नीक, बायकोसह [स+पत्नी]

**सापत्न्य**-न १ सवतपणा २ (ल) मत्सर, द्वेष, स्पर्धा [स]

**सापवी**—स्त्री (वाई) एक वनस्पती -मसाप ३ ३

**सापशीण**—स्त्री (कु) एक औषधी वेल

**सापयंद-ध**—स्त्री एक औषधी वेल यात काळी व पांढरी अशा दोन जाती आहेत पूड सापाच्या तोंडात टाकल्यास तो निर्वल होतो -वगु ६ ४५ [स सप+अन्ध?]

**सापसारणी**—स्त्री (कों) सापसारण्याची क्रिया, सुधारण्याचा व्यापार **सापसारणें**-उक्रि (कों) १ साराशानें व्यवस्थित मांडणें, उपसंहार करणें, तत्त्व काढणें (चर्चा, भाषण इ० चा) २ दुरुस्त करून, जुळवून नीट करणें, साफसफाई करणें, सुधारणें (भोंगळ, अव्यवस्थित भाषण वहकलेली, घसरलेली गोष्ट इ०) ३ आवरून आटपून ठेवणें (इकडे तिकडे पडलेले पदार्थ पसारा) [स सप्रसार, प्रा सपसार=समवाय]

**सापसिंप**—स्त्री थोडा सडा वर्षाव 'माळमुरडणाचे वाव रात मात्र पूर्वीच्या नक्षत्राचे सापसिंपीनें खरिपाचे पेरे झाले होते' -शेतकी शेतकरी ३ ४ [स सिंच्-द्वि]

**सापळा**—पु (कु) १ नारळीचें सुकलेलें पान सुकीसाऊळ २ सुक्या साऊळाची खापट शाकारण्याकरिता केलेली जुडी सावळ पहा

**सापळा**—पु १ उंदीर, घूस, वाघ इ० प्राणी धरण्याकरिता केलेलें यंत्र, पिंजरा २ अस्थिपंजर, हाडांचा सांगाडा ३ किडकिडित बारीक माणूस [स सपत्, प्रा सपत्त] **सापळा धरणें-राहणें**-नुसतीं हाडें उरणें **सापळ्यात सापडणें-अडकणें-पडणें-गुंतणें**-पिंजऱ्यात, अडचणींत सापडलें जाणें (शब्दश व ल)

**सापालें**—न (राजा) निर्जन साप इ० प्राणी राहात असलेलें, रान वाढलेलें स्थळ [साप+आलय]

**सापिका**—पु १ एक ताब्याचें नाणें ॥ शिवराई २ दीड रुक्याचें जमिनीचें माप ७॥ निप

**सापिंड**—पु सपिंड (अप) पहा

**सापिंड्य**—न १ सपिंडपणा २ (कायदा) वर व वधू यांचा बाप, आजा, पणजा वगैरे एखादा सामान्य पूर्वज अथवा मूळ पुरुष असणें [स]

**सा-सापें**—क्रिवि सांप्रत हल्लीं, अलीकडे 'तो तरी आह हिजे बहुतां काळाचा। आणि तू त्व श्रीकृष्ण सापेचा। -ना ४ ३८, -एमा २२ ४४ [स सांप्रत]

**सापेजणें**—अक्रि (राजा) कुबट, कुजट वास मारणें, नासणें (धान्य, पीठ इ०) [सापई-ट]

**सापेक्ष**—वि १ अपेक्षा, गरज असलेला २ तुलना, तारतम्य, बरोबरी पाहून केलेलें, संबद्ध ३ अनुबद्ध, तत्तत्प्रमाणानुरूप, अवलंबून असलेलें जसें-अर्थ-काल-सापेक्ष 'काल्ज्ञान यत्नसापेक्ष आहे' [स स+अपेक्षा] **सापेक्षा**-स्त्री इच्छा, गरज अपेक्षा, आवश्यकता असणें [स+अपेक्षा चुकीचा प्रयोग]

**सापेक्षित**-वि १ अपेक्षा धरून असलेला, उत्सुक २ अनुबद्ध, संबद्ध

**साप्ताहिक**—वि आठवड्याचें, [सप्ताह] -न आठवड्याचें नियतकालिक वृत्तपत्र [स]

**साप्रत, साप्रतकाळीं, साप्रतीं**—क्रिवि आता, आजकाल, हल्लीं 'हो का साप्रत ऐसें जाहलें।' -ज्ञा २ ९७ 'श्रीहरी म्हणे ऐक साप्रतीं। सवड बा नसे यावयाप्रती।' -कीर्तन १ १७ [स सांप्रतम्]

**साप्रदाय-व**—पु (प्र) संप्रदाय पहा 'चरम गुरु बाप देव। म्हणोनि याचा साप्रदाव।' -निमा १ आत्मचरित्र [४ १०४ [स संप्रदाय] **साप्रदायिक**-वि १ संप्रदायासंबधी, संप्रदायातील २ परंपरागत

**साफ**—वि १ स्वच्छ, निर्मळ २ निर्दोष, पवित्र, निष्कलंक, निष्कपट ३ रोगाश, अपूर्णत्व, व्यंग इ० पासून मुक्त, अव्यंग, निरोगी (शरीर, अवयव, प्राणी, पदार्थ इ०) ४ गुळगुळीत, एकसारखा, अविषम, सरळ, नीटनेटका, व्यवस्थित (काष्ठपाषाण, बांधकाम तयार केलेली वस्तु, इ०) ५ सरळ, गूढार्थ, वक्रोक्ति, संदेह इ० दोष नसलेलें (भाषण, लेख प्रबंध) ६ उघड, स्पष्ट -क्रिवि १ निखालसपणें, बेधडक, स्वच्छपणें, उघडपणें (बोलणें, उत्तर करणें) २ पुरतेपणीं, सर्व, एकंदर, अगदीं (जळणें भिजणें, करणें) 'मी पावसानें साफ भिजलों' ३ मुळींच, बिलकूल 'मला साफ दिसत नाहीं' 'विसरुनि चोराना साफ। असेच कर तु आलाप। -टिक १६३ ४ स्वच्छ, चांगल्याप्रकारें 'तेथून समुद्रही साफ दिसतो' -पान्द ३७ [अर साफ] ०करणें-१ स्वच्छ करणें, धुणेंपुसणें २ छाटून टाकणें 'जो आढळेल त्यास पाहताच त्याचे कान व नाक साफ करीत जावें' -रा ५ ६६ ०सफा-वि १ स्वच्छ आणि निर्मळ २ गुळगुळीत आणि तजेलदार ३ नीटनेटका साफ पहा ०सफाई-स्त्री १ तजला, चकाकी, मळपणा २ साफसुफी, स्वच्छता ०सुफी-स्त्री घासूनपुसून स्वच्छ, व्यवस्थित करणें, स्वच्छता, टापटीप **साफी**-स्त्री १ स्वच्छता, पावित्र्य, निर्दोषता २ मळपणा सारखेपणा ३ सफाई पहा 'त्यांमध्यें काढण्याची कांहींच साफी दिसत नाहीं' -मराठी ६ वें पुस्तक (१८७५)

७७ ४ मांग, औषध इ० गाळण्याचें फडकें ५ चिलमीची छापी ६ कसल, नाश 'अचानक साफी करोन' -रा ३ १८५ -वि निवळ, अवयवांशिवाय, नक्त, रोख 'नॉनदिलेदारी पद्धतीत सर्वच सरकार पुरवतें, फक्त त्यास साफी पगार देण्यात येतो' -हिंल्ड ३३२

साफल्य—न १ सफलता फलद्रूपता २ फायदेशीरपणा, प्राप्ति, लाभ -वि सफल 'ते कौसल्या कामधर्मी निरीज्या। प्रज्ञानेंदें देव साफल्य वळया।' -मुराबाल ५३ [स]

सा(सा)फळा—(ग्र) सापळा पहा

साफा—पु रुमाल, फेटा, पटका (डोक्यास बांधण्याचा) [हिं]

साफोटी-डी—स्त्री सस्फोट, स्फोट 'रस मसटरीम साफोटी।' -उषा १४१ क व था [स सस्फोट]

साब—स्त्री साहेब शब्दाचा संक्षेप 'जी साब!'

साब—पु १ शिव, शंकर २ (ल) भोळा माणूस ३ (संकेत) राघोबादादा पेशवे 'साबास तिकडे घेऊन गेले' -पया १७५ ४ बिल्वाच्या मुठीस देतात ती विशिष्ट आकृति, मांडली 'बिल्वाच्या मुठीला सांब करण्याकरिता या हत्या राचा उपयोग करतात' -बदलापूर १०० [स+अंबा] साबाचा अवतार-(ल) अत्यंत भोळा माणूस साबा पुढचा-वि नदी, (ल) मूर्ख 'तू शुद्ध साबापुढचा आहेस, तुला कांहीं कळत नाहीं'

साबक, साबीक—वि किवि पूर्वी, पूर्वील, मागें, मागचा -ख ७ ३५८५ [अर साबिक्] ब-दस्तुर साबीक-पूर्वील वहिवाटीप्रमाणें 'जहाजाचे येण्याजाण्याविशीं मजकूर ब-दस्तुर साबीक लिहिणेंत न आला' -वाडसमा २ ६५

साबका—पु (कों) नाव, पत अब्रू लौकिक [साब]

साबट, साफट—स्त्री (व) बोळ, अरुद रस्ता फट [साध+फट]

साबड-डा—वि १ साधी, अलंकृत, प्रगल्भ नसलेली (कविता, इ०) 'साबड यार्चीं कवनें ही कथा।' -दावि ४०८, -इ २५ १२१ २ भोळा, गरीब, निष्कपटी 'हा सदा पाणि हुडा। युधिष्ठिर साबडा।' -शिशु ८९४ ३ एक-निष्ट अकृत्रिम 'एका पाहिजे केवळ। साबडी भक्ती।' -रा ७ ५५३ ४ सरळ शुद्ध थाटमाट नसलेलें 'मग साबडीं नामें गाउनि। हरिरंगणीं नाचतसें।' -भवि २ २३६ -इ २५ १२० [साब?] साबडाभाबडा-वि भोळा साबडा पहा [साबडा द्वि]

साबण, साबू—पु मळ धुवून काढण्याचा एक रासायनिक पदार्थ, मळ काढून टाकण्याचें साधन 'साबण सांडुनि गेहलि नाशिलें सन्यास घेतला काचारे।' -मुपदें १ 'जैशें वस्त्र स्पर्शिल्या साबणीं। सकळ मळाची होय हाणी।' -नव २४ १४८ [अर साबून] साबण माती-स्त्री कपडे स्वच्छ करण्याची खारी माती, मुलतानी माती (इं) फुल्लर्स अर्थ -पदाव ५३ साबूचें झाड-न रिठा

साबर्णी—स्त्री एक प्रकारची मिठाई, साखरेच्या पाकाची कांडी सावरी पहा

सांभ्रता—पु (ग्र) सामता पहा

साबर—न जादू, मंत्रतंत्र, चेटूक 'साबर मंत्र कौटालें अनेकें।' -दा ५ २ २ [स शाबर] साबरी-वि जादु टोण्यासबंधीं, जादुगारी -पु मांत्रिक, जादुगार 'साबरी आणोनि नसतांचि दोष। प्रायश्चित्त देताती।' -भवि १४ १३९. [स शाबरी] ०विद्या-स्त्री जादू, मंत्रविद्या

साबर, साबरकांडे-निवडुंग—स्त्री नपु एक प्रकारचा निवडुंग 'साबरी बाडिमल्या सरळा। परी फळ ना आतु पोकळा।' -ज्ञा ९ १७४ [स शबर] साबरी निवडुंग-पु साबर निवडुंग, त्रिधारी निवडुंग, याच्या उलट फडे निवडुंग

सांबर—पुन हरणासारखें पण फाटे फुटलेलीं शिंगें असणारें जनावर, एक हरण जात [स शंबर] ०भोपळी-स्त्री एक वेल हिचा पाला सांबरास पोटदुखी लागली असता चारतात ०शिंग-न साबराचें शिंग ०शिंगी-वि साबर शिंगाचा केलेला (आंकडा इ०पदार्थ) साबरी-वि १ साबरा संबंधींचें (कातडें, इ०) २ साबराच्या कातड्याचा (बूट, पिशवी, इ०) -स्त्री १ सांबराचें कातडें २ (राजा) दारू, गोळ्या, चकमक, नाचकण, इ० ठेवण्याची कातडी पिशवी (विशेषत साबराच्या कातड्याची)

सा(सा)वर मीठ, सांवरी मीठ—न साबर सरोवरापासून, खाऱ्या जमिनीपासून काढलेलें मीठ, एक क्षार [सांबर]

साबरी—स्त्री एक मिठाई, साबणी

साबरी—वि (जुन्नरी) मिश्र रंगाची (मेंढी) [स शबल]

सांवरें—न (महानु') ताटवा, कुंज, क्रीडागृह 'तैसे माझेनि वीरड्ग्वरें। नावडे भोगाचें साबरें।' -माए १७४ 'केतुकी दळाची सेजारें। पाचीचीं साबरीं परिकरें।' -शिशु ७७३ [? स शाल्मली, म साबरी?]

सा(सा)वरें—न पाणी 'मदन बोळगे शेजारें। जेथ चंद्र शिंपे साबरें।' -ज्ञा ९ ३२४ [स शबर=पाणी]

सांवरें करणें—कि (व) आजूबाजूच्या काड्या गोळा करून त्या विस्तवांत किंवा ढोरापुढें टाकणें [सांवरणें?]

**सावळा**—वि १ साधा, सौम्य, शांत, धीमा सावडा पहा २ गरीब, भोळा 'कसें वरिल लेंकरूं निष्ट हें पहा सावळें ।' -केका ७०. [ सावडा ] ०**भावळा**-सावडा भावडा पहा

**सांवळी**—स्त्री वेताची करडी-पेटी रावली पहा 'हृदय सांवळी माजी निगुती ।' -मुसभा १० १७, -ह ३४ १६८

**सावळें**—न एक शस्त्र, भाला 'साउलियेतें सावळें। हाऱ्या भोय आडळे।' -अमृ ६ ४४, -ज्ञा १७ १४३, -एरुस्व ८ १३ [दे प्रा सब्बल, हिं सब्बल, का सबळ तुल० स सुभल्ल]

**सावान**—पु (प्र) शावान, अरबी वर्षाचा आठवा महिना [अर् शअबान्]

**सावार**—पु (व) कोथिंबीर [स सभार]

**सांवार**—पु सांवारें, भाजी इ०कात घालण्यासाठीं तयार केलेला मसाला **सांवारें**-न ताकाचें पातळ कालवण, ताका तली पातळ भाजी, साभारें [स सभार]

**साबीत, सावूत-द**—शाबीत, शाबूत पहा

**साबू सायूण**—पु सावण पहा

**साबूचे तांदूळ, साबूदाणा**—पु (प्र) सागूचे तांदूळ, सागूदाणा सागूझाडाच्या सत्त्वाच्या गोळ्या उपासाचा एक पदार्थ [मलायी सागू]

**साबोटी-ट्या**—वि सदा बोटें असलेला [सा=सहा+बोटें]

**साभ्राभणी**—वि (महानु) साभ्रायण नावाच्या द्वीपा-संबधीं 'कातळें साभ्राभणीचें' -शिशु ९३६

**साभडा-ळा**—वि सावडा-ळा पहा.

**साभण, साभूण**—सावण पहा

**साभणी**—स्त्री सावणी पहा

**साभव**—वि (प्र) शाभव, शभूसबधी [स] ०**वेधु**-पु (महानु) विश्व (ईश्वर) चैतन्याची विद्या 'नाटुब्रह्माचा घडला। कीं साभववेधु मूर्तीसीं आला।' -दाव २२६ [साभव+विद्या]

**साभार-रें**—सावार-रें पहा -नव ५ ११९ **सांभार गाठा**—स्त्रीअव सांभारें करण्यासाठीं अळूच्या पानाच्या वळलेल्या गाठी

**साभारी**—पु 'आश्रयदाता, रक्षक, त्राता [स+आभृ]

**साभास**—वि भासमान, सत्य पदार्थाचा आकार, गुण इ० असणारा पण असत्य, मायिक (बाह्य विश्व व प्रत्येक पदार्थ यासदृश योजतात) याच्या उलट शब्द निराभास 'साकार साभास आभास। चौथें जागिजे निराभास।' -द २० १४५ [स+आभास]

**सांभाळ, सांभाळणें**—सभाळ, सभाळणें पहा

**साभिमान**—वि. अभिमानयुक्त, गर्विष्ठ, ताठयाचा [स+अभिमान]

**साभिलाष**—वि अभिलाषायुक्त, आशाळू, लोभी 'एकें साभिलाषें विरक्तें' -ज्ञा ११ १२८

**साम**—वि (वैद्यक) आव, अपचन यासबधी, यापासून होणारा (रोग) याच्या उलट निराम [स+आम]

**साम**—नपु १ चार वेदापैकीं तिसरा वेद, सामवेद यातील ऋचा गावयाच्या असतात 'बोल्ती निषेध नियमें। जिया ऋचा यजु सामें।' -ज्ञा ५५ १६६ २ सामवेदातील मत्र, ऋचा 'वेदराशीचिया सामा-। आंत बृहत्साम जें प्रियोत्तमा। तें मी म्हणे रमा-। प्राणेश्वरु।' -ज्ञा १० २८१ [स सामन् तुल० इ साम] ०**वेद**-पु तिसरावेद, साम पहा ०**वेदी**-वि १ साम वेद पढलेला (ब्राह्मण) २ सामवेद शाखेचा, सामवेदानुसार सस्कारादि कर्में ज्याच्या कुलात होतात असा

**साम**—न १ गोड, सामोपचारें बोलणें, सलोखा, तडजोड, समेट होईं असें भाषण, कृति 'सामेंचि कार्य होइल जरि तरि युद्धासि काय कारण हो' -मोउद्योग १३ १९ २ शत्रु, प्रति स्पर्धी याला वळविण्याच्या चार उपायांपैकीं एक साम, दाम, दंड आणि भेद हे ते उपाय होत ३ मैत्री, सख्य [स] ०**दान-म**-नपु १ एखादी गोष्ट घडवून आणण्यासाठीं, शत्रूला वश करण्यासाठीं योजावयाची शाततेची सख्याची तऱ्हा, समेटाची वागणूक २ साम आणि दान किंवा दाम ह सख्याचे उपाय योजणें, गोडी गुलीबीनें किंवा द्रव्य देऊन वश करणें -एभा २३ ७१२

**सामक**—न कर्जरकमेंतील मुद्दल, मूळ दर्णे [स]

**सामका**—शअक्रिवि (राजा) समोर, पुढें -वि (राजा कुण) सरळ, नीट, योग्य [स सन्मुख, तुल० हिं सामना]

**सामकार-कीर**-(गो) सामका पहा **सामुकें**-क्रिवि सन्मुख -मुरा ३ ९५

**सामग्री**—स्त्री सामान, साहित्य, एखाद्या कार्याला साधन भूत गोष्टी, पदार्थ याचा समुदाय; शस्त्रास्त्रें, उपकरणें 'देती सामग्री जय तरि का सद्रीतिला गुणी वरिते।' -मोविराट [स समग्र] **सामग्र्य**-न १ सर्व; एकदरी, समग्रता २ अखडता, पूर्णता [स]

**सामट**—स्त्री (व ना) बोळ, गल्ली [साध]

**सामंत**—पु माडलिक राजा, जहागीरदार, प्रांताधिपति -वि १ मर्यादा घालणारा, सीमा, हद्द ठरविणारा २ सीमेवरील, जवळचा, सनिध [स] ०**वासी**-वि सीमेवर राहणारा, शेजारी ०**सारंग**-पु (सगीत) एक राग यात षड्ज, तीव

ऋषभ कोमल मध्यम, पचम, तीव्र धैवत, कोमल व तीव्र निषाद हे स्वर ल गतात आरोहात गाधार व धैवत वर्ज्य आणि अवरोहात गाधार वर्ज्य जाति औडवषाडव, वादी ऋषभ, सवादी पचम गानसमय मध्यान्ह

**सामता**—पु (सुतारी) भोंक पाडण्याचें एक हत्यार –भाए २० [स सम्+मथ्=मथणें]

**सामदस्तक-दस्तखत-दस्कत सामादस्तक इ०**—न धनकोच्या वहीवर ऋणकोनें पैसे पावल्याची-कर्ज घेतल्या बद्दल करावयाची सही, लेख [स्व+दस्तक?] **साम(मा) दस्तकी**-वि सामदस्तक असलेली (वही, खातें, लेख, इ०)

**सामधी**—स्त्री तयारी –गीता २ २३५३ 'समस्त पारधी बोलाविले। रावो म्हणे सामधी करा वहिले।' –कालिकापुराण २२ ४ [सं सम+धा]

**सामन**—पु एक जातीचा मासा –प्राणिमो ८५ [इ]

**सामना**—पु १ समोरासमोर असणें २ विरुद्धता, प्रतिरोध ३ युद्ध, लढा ४ अनेक खेळाडूमध्यें होणारा चुरशीचा खेळ, लढत (इ) टूर्नामेंट [हिं] **सामनी**-क्रिवि (राजा कुण) समोर, देखत **सामने**-क्रिवि (व खा) पुढें, समोर **सामनेवाला**-१ शत्रु, प्रतिस्पर्धी २ खेळणारा, खेळात भाग घेणारा

**सामयिक**—वि १ समयास अनुसरून असलेलें २ समयोचित, यथाकाल ३ प्रासगिक, नियमितकालिक ४ नियुक्त, ठराव, रूढी याला अनुसरून असलेलें [स समय]

**सामर, सामरी**—सावर, सावरी पहा 'कोकिळा चितळें सामरें। देवालयीं समर्पावी।' –दा ४ ५ २६

**सामरस्य**—न १ एकजीव, समरस होणें 'हें साडुनि सकल द्वय। जिवा होए ब्रह्मेंसीं सामरस्य।' –भाए ७८१ २ ब्रह्मानद, ब्रह्ममय होणें ३ ऐक्यता –ज्ञा ५ १३७ [स]

**सामराज्य**—न (प्र) साम्राज्य पहा 'अखड भोगी पद सामराज्य।' –दावि २५६

**सामरिक**—वि युद्धविषयक, समरसबधी (शास्त्र, शस्त्र, इ०) [सं समर]

**सामर्जन**—न समार्जन पहा (अप) 'सडा सामर्जन तुळसी वृंदावन। अतीतपूजन ब्राह्मणांचें।' –तुगा ६ ३६, –सप्र १७ २

**सामर्थ्य**—न १ बल, शक्ति, जोर –एभा २१ ४१६ २ लायकी, पात्रता क्षमता ३ गुण, शक्ति 'नाना सामर्थ्यें वाढवावीं। वैराग्यबळें।' –दा १० ७ १२ ४ (व्या) शब्दप्रभाव ५ शब्दातील परस्पर सबध [स] ०वान्-वत-वि बल शक्ति, योग्यता असलेला

**सामल**—सामील पहा

**सामलात**—स्त्री १ भागी हिस्सा, वाटणी (पैसा, माल, धदा इ० त) २ सामील, सयुक्त होणें, सहाय्य भाऊसाहेबाच्या सामलातीस नबाबाकडील फौज व शिंदे याजकडील चार पलटणें तोफा सुद्धा द्यावी' –ख ११ ५९०५ ३ शत्रूशीं सख्य, कट 'जागले पाटलाची कसुर किंवा सामलात दिसुन आल्यास त्याचें इनाम काढून त्याच्या बिरादराना देण्यात येते' –गागा ५९. ४ समाईकी; सयुक्त मिळकत 'एक रुईखेडें मात्र सामलातींत आहे' –रात १० २५० [अर शामिल्‌चें अव शामिलात्]

**सामलाती**-वि सामलात, भागी सबंधी, समायकी, सयुक्त 'सामलाती मामलत-चोरी-साक्ष-न्याय इ०'

**सामवर्णे**—अक्रि. (प्र) समावर्णे, सामावर्णे, मावणें

**सामवायिक**—वि १ सघ, सभा, मडळ यातलें २ सघ, जमाव यासबधीं ३ समवाय सबध असलेलें [स]

**सामसूम**—स्त्री शातता; स्तब्धता, गडबड, हालचाल इ० चा अभाव 'तेथें कथा होऊ लागली नाहीं अजून सा० आहे' –क्रिवि मुकाट्यानें, गपचिप 'त्याचे घरीं गेलों तों सारे सा० निजले आहेत' [स शात+शून्य, श्यामा+शून्य? हिं सुनसान]

**सामक्ष**—न (दादर) प्रत्यतर, प्रचित [समक्ष]

**सामक्षा**—स्त्री दृष्टात, साक्षात्कार (देवतेचा) [समक्ष अप]

**सामा**—पु १ माल, सामान 'आर्धी घ र रामनाम। सामा भरी हा उत्तम।' –तुगा २६९४ २ (व) सामग्री, तयारी, साहित्य 'लग्नाचा सामा एका आठा दिवसात तयार करू' [फा सामान्‌ हिं]

**सामाईक**—वि सयुक्त, समाईक प०ा

**सामाजिक**—वि १ समाजासबधीं, समाजाची 'देशाची सामाजिक व सापत्तिक स्थिति राजकीय स्थितीवर अवलबून असते' –टिव्या २ सामुदायिक, सामवायिक ३ सभेंत बसणारा, सभासद समाजातील व्यक्ति 'स्वरचित कवनें जेव्हा तो म्हणे तेव्हां सामाजिकांच्या मनावर त्याचा प्रभाव होत असे' –नि ३१५ [स] ०चळवळ–स्त्री समाजसुधारणेसबधीं कार्य, प्रयत्न इ० ०दर्जा-पु समाजातील स्थान योग्यता, मान. 'कैद्याचा सामाजिक दर्जा सरकारनें पाहिला पाहिजे' –क १० ६ ३० ०बहिष्कार-पु जातींत टाकणें भोंवताल्च्या लोकांनी एखाद्याशीं असहकार करणें, त्याला अन्नपाणी, वाहनें, सुखसावनें मिळू न देणें 'सरकारी नोकरावरील सामाजिक बहिष्कार सरकार कसा बद पाडणार?' –के १७ ६ ३०

**सामान**—न १ उपकरणीं, हत्यारें साधनें २ चीजवस्तु, माल, प्रपचातील वस्तु ३ (मुद्रण) फर्मा जुळवून आवळताना सर्व पानामध्यें सारखें अतर पडण्यासाठीं भरीस घालावयाचे

लाकडी तुकडे -पु पोपाख, चिलखत 'परतु अगात सामान यामुळें चार कारेगार झाले नाहींत' -ख ५२९३६ [फा. सामान्] ०सुमान-न (व्यापकपणें) चीजवस्त, असबाब, सामग्री, साहित्य क्वचित अनेकवचनी प्रयोग 'त्यानीं आपलीं आगें हालविलीं तोंच वरचीं सामानेंसुमानें फाटरींतुटकीं होतीं त्याचे शानदार सरजाम झाले' -मराठी ६ वें, पु आ २

**सामान मोहरा**—पु सामान्य इसम (बहुधा एखाद्या अलौकिक किंवा असामान्य मनुष्यासबधीं बोलताना अकरणरूप प्रयोग योजतात [सामान्य+मोहरा]

**सामानाधिकरण्य**—न १ एकत्र वास, एकत्रता 'दोनी गुणाच सामानाधिकरण्य होण्याची योग्यता इग्रजी मार्पेत जी आली ती अकराव्या शतकात आली' -नि ५५६ २ वृत्तीची, कार्याची समानता ३ (न्याय) एकदेशीयत्व एककालिकत्व [समान+अधिकरण]

**सामानुक**—स्त्री सामावणूक, समावेश 'तेथ भीतरि भरलेल्या आनदा। सामानुक सायासु।' -ऋ ९१ [सामावणें]

**सामान्य**—न १ सर्वसाधारणपणा, समानता, अनेक व्यक्ती किंवा जाती यांशीं सबध २ जातीचा, प्रकाराचा धर्म, गुण 'आंबा, पिंपळ, ताड, माड, इत्यादि सर्व वृक्षावर वृक्षत्व म्हणून एक सामान्य राहत' ३ साहित्यातील एक अलकार एखादी वस्तु इतर तत्सदृश वस्तूच्या सान्निध्यांत असल्यानें केव्हां ओळखू येत नाहीं तेव्हा हा अलकार होतो उदा० 'तडागात जलक्रीडा करायास्तव सागन। तो गेला, परि पश्चात नोळखे अग्गनानन।' -वि १ सर्वसाधारण, सर्वांना लागू पडणारें, सर्वांचें 'सकळास जें मान्य। तेंचि होतसे सामान्य।' -दा १५६६. २ साधारण प्रतीचा मध्यम चागला आणि वाईट, उच्च आणि नीच यामधला 'जैसें सत्रीं अन्न जालें। कीं सामान्या बीक आलें।' -ज्ञा १३७०० [स] ०नाम-न (व्या) वस्तु-पदार्थमात्राचें नाव याच्या उलट विशेष नाम ०पक्ष-पु मध्यम मार्ग, मधला पक्ष, प्रकार ०रूप-न (व्या) विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागण्या पूर्वी नामाचें जें रूप बनतें तें उदा० घोडा, लाकूड, आज्ञा यांना चा, नें, स, ला, पासून, पाशीं, वर इ० लागताना घोड्या, लाकडा, आज्ञे अशी रूपें होतात ०लक्षण-न साधारण, जातिगत विशेष चिन्ह ०लिंग-न ज्या नामाचें (पुरुष किंवा स्त्री) लिंग निश्चित करता येत नाहीं तेव्हा त्याचें लिंग सामान्य समजतात उदा० मूल मी, तू इ० ०शासन-न अविशिष्ट, सर्वत्र लागू पडणारा हुकूम, कायदा, आज्ञा ०सर्वनाम-न जें सर्वनाम साधारणपणें कोणत्याहि नामाबद्दल येतें तें उदा० कोणी, कांहीं, सर्व, अमुक, इ० ०स्त्री-स्त्री वेश्या 'पात्रें भाट नागारी। सामान्य स्त्रिया कांजुवारी।' -ज्ञा १७२९६

**सामान्यत.**-क्रिवि १ साधारण प्रकारें, सामान्य रीतीनें २ सर्व जातीला धरून; व्यक्तिश नव्हे अशा प्रकारे ३ अविशिष्ट, सार्वत्रिकपणें ४ व्यापक रीतीनें, बहुसख्येला, मोठ्या भागाला धरून ५ बहुश, नेहमीं ६ एकदरीनें, एकूण **सामान्या**-स्त्री वेश्या, वटीक 'सामान्या भली आग। न लिंवे तव।' -ज्ञा १८२५०

**सामापसर्पित(करण)**—न (नृत्य) पायाचें स्वस्तिक करून त्यातून एक पाय काढून घेणें, शिर परिवाहित करणें व हात रेचित करणें [स]

**सामायणें**—क्रि (प्र) सामावणें पहा 'बीज मोडे झाड होय। झाड मोडे बीजीं सामाये।' -ज्ञा १७५९

**सामायन**—न सामान (अप) सामुग्री, सिद्धता 'सतीचें सामायन करा म्हणती।' -होला २२

**सामावणें, सामेणें**—अक्रि (राजा) १ प्रवेशून व्यापणें, मावणें, समावणें पहा 'स्त्रीशूद्रादि प्रतिभे। सामाविलें।' -ज्ञा १८१६९९ २ एकरूप होणें, ऐक्य पावणें -एभा २४५५१. [समावशन]

**सामाशी**—वि सहामासे वजनाचें [सा+मासा]

**सामाशी, सामासकी**—स्त्री १ दरसाल विणारी, म्हणून वर्षातून सहा महिनेच दूध देणारी गाय, समसकी पहा २ सामासें पहा [सा=सहा+मास] **सामासें-सें**-न मृत्यूनतर सहाव्या महिन्यात करावयाचें श्राद्ध, पाण्मासिक

**सामास**—पु १ सहा महिने, षण्मास 'आणि सामासा मार्जी मासु। उत्तरायण।' -ज्ञा ८२२० २ सठी सामास पहा 'श्राद्धपक्ष सठी सामासें।' -दा १४१५३

**सामासिक**—वि १ सयुक्त, जोडलेला २ सामुदायिक [स]

**सामिकतान**—स्त्री (सगीत) तीन स्वराची तान पूर्वी सामें तीन स्वरात म्हणत असावेत [स]

**सामिलात**—सामलात पहा

**सामीपत्र**—न स्वत ला सरकारची चाकरी करण्याचें सामर्थ्य नसलें म्हणजे त्या कामासाठीं भाऊबद उभा करून त्याजपासून लिहून घेतलेला करार -शर [स स्वामिपत्र सामील+पत्र?]

**सामीप्य**—न १ समीपता, सान्निध्य, निकटवर्तित्व २ मुक्तीच्या चार प्रकारापैकीं एक [स]

**सामील**—वि १ सहाय्यक, मदतनीस, जोडीदार २ (विशेष) समाविष्ट अतर्भूत प्रविष्ट, (क्रि०करणें) ३ (शहूला) फितूर [अर शामिल्] **सामिली**-स्त्री सहाय फूस, ऐक्य, सख्य 'एक सामिली तरी समजावी नाहींतर अधळेपणा तरी'

–सुर्येग्र ३३४ सामीलनामा–पु आपल्याला होत नाहीं म्हणून शाऊ उभा करून त्याच्याशीं कळला करार –भाअ १८३०.

**सामु(मो)ग्री**—स्त्री १ (प्र) सामग्री पहा २ (ल) सामर्थ्य, ऐश्वर्य 'तरी पुरतपण लागीं। आणिक दुसरा नाहीं जगीं। ऐसी सामुग्री माझ्या अंगीं।' –ज्ञा ३ १६२, –सुगभा २ १३

**सामुदायिक सामुदाईक**—वि समुदाय, एकंदर लोक, रास यासंबंधी २ जमाव, समाज सघ यासबधी [स समुदाय] ०चळवळ–स्त्री सर्वांनीं मिळून करावयाची चळवळ 'सामुदाईक चळवळ केल्याशिवाय पगार वाढणार नाहीं' –कक्षे १ ३५५

**सामुद्र**—वि समुद्रासबधी, उदधि, सागर याविषयींचें [स] ०क–वि १ दर्यावर्दी गलबतावरचा नाविक २ समुद्रतीरस्थ ०धुनि–स्त्री (भौगोलिक अर्वाचिन सज्ञा) दोन समुद्रांस जोडणारी पाण्याची अरुंद पट्टी, प्रवाह (इ) स्ट्रेट [स सामुद्र+धुनि=नदी] सामुद्रांड–समुद्रकांठचा एक माशासारखा प्राणी (इ) सी–अर्चिन –प्राणिमो ८ १३६ [सामुद्र+अंड] सामुद्रिक–न मीठ 'जें समुद्रीं पडलें सामुद्रिक। तें स्वयेंचि अवघा सागर एक।' –पांप्र २७ ४४७

**सामुद्र**—न शरीरावरील चिन्ह खूण [सं] **सामुद्रिक**–नें हात पाय इ० अवयवावरील शास्त्राप्रमाणें शुभाशुभ चिन्ह –ज्ञा १३ ११६७ 'ध्वजवज्रांकुश रेखा। चरणींचीं सामुद्रिकें देखा।' –एरुस्व १ २२ २ शरीरावरील चिन्हें पाहून शुभाशुभ वर्तविणें, शरीररेखादि ज्ञान ३ याचें शास्त्र, शास्त्रग्रंथ –पु हें शास्त्र जाणणारा ज्योतिषी, भविष्यवादी –वि १ शरीरावरील चिन्हांसबधी सामुद्रिक लक्षणें सकळ कळा।' –दा ४. १२१ २ या शास्त्राविषयींचें

**सामुरा**—क्रिवि सामोरा पहा अक्करी यई तू सामुरा।' –ऐपो ६९

**सामु(मो)सा**—पु पुरीचा एक प्रकार ही तिकोनी असून आत पुरण भरलें असतें –गृहि २ १९

**सामें**—न सामान सामग्री 'लिहिण्याचें सामें असावें नानाप्रकारीं।' –दा १९ १ १४ –सप्र ८ ९ [सामान]

**सामोपचार सामोपाय**—पु १ विशेष त्रास दुःख न देणारा औषधोपचार सौम्य उपचार उपायक्रिया २ सामाचा, गोडीगुलाबीचा प्रकार उपाय सौम्य शांत शब्दांनीं वळविणें सामोपचारें सामोपचारानें असाअ बहुधा प्रयोग होतो [साम+उपचार उपाय]

**सामोरा**—क्रिवि सन्मुख, पुढें (जाणें, येणें, होणें–आगत स्वागतासाठीं) –सं ७ १६ [समोर] सामोरीं **सामोरेया**–क्रिवि समोर, पुढें 'योगी सामोरीं मुक्ती काय।' –दावि १८४ 'तेवीं भ्रांता तोपौनि जाणें। सामोरेया।' –ज्ञा १६ १४८

**साम्य**—न १ सारखेपणा; सादृश्य, तुल्यता २ एकसारखेपणा, समपातळी, बरोबरी. 'तरी कवणेही विषयीं। साम्य होणें न घडे।' –ज्ञा १३ १८४ ३ समता (सर्वांची) याच्या उलट विषमता ४ भेदाभेद नसणें, समभाव तटस्थपणा 'साम्यावस्था कशी संपादन करावी हें भगवद्गीतेंत मुख्यत्वें करून सांगितलें आहे।' –गीर २८३ ५ (गणित) तुल्ता ६ ऐक्यता द्वैताचा दुकाळु पाहे। साम्याचें सुयाणें होय।' –ज्ञा १३ १७०. ७ (ल) सुख 'ऐसेनि अयाचे चित्तीं। वैषम्य साम्याची वासती।' –ज्ञा १३ ८०९ [सं] **साम्यता, साम्यत्व**–साम्य याचें अप रूप

**साम्योपचार, साम्योपाय**—सामोपचार (अप) सामोपाय (अप) पहा

**साम्राज्य**—न सार्वभौम राज्य, सम्राटाचें राज्य, सत्ता २ निष्कटक राज्य 'तिये ओळखीचीया साम्राज्यीं बैसी।' –ज्ञा ६ ३६७ ३ ज्या राज्यात चोरी, महारी, गाजणूक इ० नाहींत, प्रजा सुखी आहे असें राज्य [सं] ०सरकार–न सर्व साम्राज्यावर अधिकार असलेलें सरकार (इ) इंपीरियल गव्हर्नमेंट 'मकडूनेलें प्रधानांचा सल्ला अमान्य करण्याचें कृत्य साम्राज्य सरकारच्या आज्ञेनुसार केलें' –वसा ६३.

**साय**—स्त्री १ दुधावरची मलई दूध तापविलें असता वर येणारा स्नेहयुक्त पापुद्रा 'ऐसें काय म्हणेल साय न रुगे, शेणीच दे खावया।' –मोकृष्ण २६९ २ उकळून घट्ट होणाऱ्या उसाच्या रसावरचा वगैरे सायीसारखा पदार्थ, मळी ३ नदींतील गाळ, खळमळ, साका ४ सार सत्त्वांश ५ तात्पर्य; सारांश [स सार²] **सायटी–टें**–स्त्री न १ पाक दूध दहीं इ० वर येणारी पातळसर साय २ गुळावरचा साका, मळी [साय अल्प रूप]

**साय**—स्त्री १ सावली, छाया २ रक्षण ३ रक्षणाला उपयोगी गोष्ट आश्रय आडोसा झाडी इ० 'स्त्रियादी जावायी तनुज निज सायींच्छदती।' –गजेंद्रमोक्ष २५५ [फा साय सं छाया] **सायी–या**–स्त्री सावली 'दुपारची सायी समज अवघी संपत्ति असे।' –साह्द ७ १४१ [स छाया]

**साय**—पु १ सागाचें लाकूड [स शाक, प्रा साय] **सायल–ला**–पु सागवानी **सायली, सायवानी**–वि साग वानी **सायवान** पु साग –न सागाची लागवड रान **साया**–पु साग साय पहा म्ह० साया वृक्षाचा राया

**सायं**—स्त्री सध्याकाळ 'सायप्रातर्मध्यान्हा। या तिही काळाची गणना।'—ज्ञा १४ ३३२ [स] ०**काल-ळ**-पु १ सूर्यास्ताची वेळ २ दिनमानाच्या पाच भागातील शेवटचा काल 'ऐसें गोप जों सवादत। तों सायकाळ ओसरला।'—ह १३ ५४ ०**काळी**-स्त्री एक फुलझाड याच्या फुलास सायकाळें म्हणतात ०**काळें**-न एक फूल हें सध्याकाळच्या वेळीं फुलतें

**सायक**—पु बाण, शर 'सखि हसिंत हस्त न वृप, पाडव हृदयात सायका मारी।'—मो **सायकासन**-न धनुष्य [सायक+आसन]

**सायकल**—स्त्री पायानीं चालविण्याची एक दोन चाकी गाडी, दुचाकी [इ बायसिकल] ०**स्वार**-पु सायकलवर बसणारा इसम (इं) सायकलिस्ट

**सायकवाटी**—स्त्री (ना) कन्यानिरीक्षण विधि

**साय(यि)खडा, सायखड्याचें बाहुलें**—पु न कळ सुत्री बाहुलें 'जैशी सायिखड्यासि नाचवितस सूत्रधारक्रिया'—निमा सुभद्राचपू ७ ८८ 'सायखडियाचें बाहुलें। नाचवी त्या सूत्रें नाचलें।'—मवि २ २५० [स सूत्र+काष्ठ?]

**सायड-ळ**—पु (व) भागीदार

**सायतुळव**—स्त्री गाडीचा एक भाग तुळव पहा,

**सायन**—पु मेषसपात बिंदूपासून गणलेला ग्रहाचा रेखांश [स] ०**खेट-ग्रह**-पु सायन पहा ०**पंचांग**-न सायन पद्धतीनें तयार केलेलें पचाग ०**पद्धति**-स्त्री ग्रहाचें स्थान मोजताना अयनगति हिशेबात घेण्याची पद्धति ०**वर्ष**-न सूर्य एका सपाता पासून निघून पुन्हां त्याच सपातास यण्याचा काल सौरवर्ष ३६५ दिवस १४ घटका व ३२ पळें

**सायवाणी**—वि रेशमाची एक जात, वेंगनवाडी—मुव्या ९७

**सायवान**—न १ मडपी, सायबान पहा २ छप्पर 'बाजूच्या घराचीं सायवानें आड न येण्याची तजवीज ठेवणें'—ऐरा २ ४९

**सायर**—न १ मालावरचा कर, जकात पट्टी जमीन सोडून इतर कर सायरबाव पहा —वाडमा १ ८७ २ जकातनाकें [अर साइर] ०**बाव**-स्त्री १ (व्यापक) जकात कर व किरकोळ पट्टया २ जगममालावरील कर याच्या उलट जमीन बाव **सायेर**-सायर पहा —वाड १ ३५

**साय(यी)र**—स्त्री राग, ओल, साईर पहा

**सायरा**—पु पातळ थर पापुद्रा तरग (पाणी, डोळा इ० वर येणारा) [साय]

**सायरी**—स्त्री एक झाड **सायरेल सायन्येल**—न सायरीचें तल

घाको ७ ३०

**सायवान**—न १ छत, चांदवा, मडपी २ मडपाच्या बाजूचा पडवीसारखा भाग ३ सोपा, पडवी ४ (व) छप्पर ५ तबूच्या चांदणी सभोवतीच्या उतरत्या बाजू 'निदेस डेरा पेशजी चहू सायवानाचा होता त्याप्रमाणें करावा'—ख१०८५ [फा सायवान्] ०**दार**-वि ,मडपीसह पाखीं, छपरें असलेली 'खारव्याची राहुटी चादणी सायवानदार आहे ती लौकर आली पाहिजे'—ख ५६७४ **सायवानी**-वि ज्यास बाजूस छपरें उतरलीं आहेत असा (मडप इ०)

**सायवीण**—स्त्री (गो) देवी

**सायसंगीत**—वि १ ततोतत जुळणारें, पूर्ण ऐक्य असलेलें २ अगदीं खरें, रास्त ३ (काहींच्या मतें) सायसगीन याअर्थी [? सादि+सगत प्रा साइसगत]

**सायसंगीन**—वि १ सुसज्ज, सर्व साधनानीं युक्त, तयार, सपूर्ण साग पहा २ (काहींच्या मतें) सायसगीत याअर्थी [सगीन]

**सायल**—पु (कों) साइला पहा

**सायान्ह**—(शुद्धरूप) सायाह्न पहा

**सायारू**—पु (महानु) जाळी 'मोतियाचा सायारू बाधिला। कीं देवीं पुष्पवर्षाओ केला।'—शिशु ७१५ [साईर]

**सायास**—पु अतिशय आयास, फार कष्ट, मेहनत 'करूनी सायास मेळविलें धन। तेंही कृष्णार्पण केलें तिहीं।'—तुगा २२ [स+आयास]

**सायासी**—वि १ कष्ट करणारा, मेहनती २ साहसी

**सायासें शीं**-क्रिवि मोठ्या कष्टानें 'दोन वव रगाचे भरून ठेविले होते अति सायासीं'—ऐपो २०३

**सायाह्न**—पु सायकाळ दिवसाच्या पाच विभागापैकीं शेवटचा पराह्ण पहा [स]

**सायाळ**—स्त्री एक प्राणी याच्या अगाला लाव लाव काटे असतात, साळू 'त्यातून देती व्याघ्र आरोळया। अस्वलें दिवा भितें सायेळया।'—ढोला ११४ [स शल्य हिं सय्यल्]

**सायुज्य**—न १ चतुर्विध मुक्तींतील एक हींत ईश्वर आणि जीव यामध्यें अभेद असतो 'तैसें सायुज्य आणि पुनरावृत्ति। ये दोन्ही अवसरा आहाती।'—ज्ञा ८ २०७ २ ऐक्य समीलन [स] ०**ता**-सायुज्य मुक्तीची अवस्था (अप) 'तुका म्हणे मज न लगे सायुज्यता। राहन या सतासमागमें।'—तुगा ७९६ ०**मुक्ति**-स्त्री ईश्वरासी तादात्म्य चवथी मुक्ति 'आत्म्याला सायुज्यमुक्ति हें अतिमसाध्य होय'—गि ३ २४८ **सायोज्य-सायोज्यता-मुक्ति**-सायुज्य-मुक्ति पहा स्त्री कारणें सायो ज्यमुक्ती। तेही तुच्छ मानिली।'—दा ३ २ ५६ 'प्रबोध उपजे

धोतेयाचिया चित्ता। परब्रह्मेसीं होये सायोज्यता। म्हणे कवी भास्करू।' –भाए ८२७

**सायुध**—वि सशस्त्र, आयुधासहित 'त्रिशूल डमरू शोभाय मान। सायुध ऐसा प्रगटला।' [स+आयुध]

**सार**—न मिंच, ममसुल इ० आंबट पदार्थ पाण्यांत कोळून त्याला हिंग, मसाला इ० लावून करतात तें कालवण, एक प्रकारचें आंबट वरण 'वडे नसती बावडे, सार आवडे।' –अमृ ३५ [द्रा साऊ, स सार]

**सार-सारकाड**—न नावेचें परवाण शिडाला ज्यायोगें जोडतात तें कडें, दोरी, वादी इ०

**सार**—न सोंगट्या, द्यूत यामध्यें टार, गार, नार (घोडा, जवाहीर, स्त्री) या शब्दांबरोबर वापरतात या गोटींवर पैसा उधळला जातो टार पहा

**सार**—स्त्री (व) दुरुगाची दारू भरण्यासाठीं केलेलें छिद्र, खांच, पोकळी 'सार करून ती विहीर फोडली'

**सार**—पु कलंक, कालिमा ? 'तू रावाचा धर्मपुत्र। सुमती नामें महापवित्र। तुवा फेडावा सार। आमुचे मुखींचा।' –कथा ३ १२ ३९ [सारा ?]

**सार**—पु न १ सत्त्व, तथ्यांश २ साय; नवनीत, रस, अर्क ३ तत्त्वांश; तात्पर्य 'तेंही अति आदरें मानुनी। सार निव डूनी घेतसे।' ४ सत्य 'जरि केवळ सोडिला अहंकार। तरि होय शीघ्र सर्व व्यवहारोच्छेद हें नव्हे सार।' –मोशांति ३ ५२ ५ बल, शक्ति ६ एक अलंकार एखाद्या वस्तूचा उत्कर्ष किंवा अप कर्ष चढत्या किंवा उतरत्या पायऱ्यांनीं झाला आहे असें वर्णन असल्यास हा अलंकार होतो उदा० 'वाहे महीतें स्वशिरीं फणीन्द्र तो। पाठीवरी कूर्म तयास वाहतो। त्यालाहि घे सागर माडियेवरी। थोराचिये थोरिव जाण यापरी।' –वामन –वि १ श्रेष्ठ प्रधान मुख्य 'अमृतरसाहूनि हे कथा सारा।' –मोकर्ण २३ १ २ उत्कृष्ट, अतिशुद्ध 'सार हिन्याला गार म्हणति सोनार देत पावली' –राल ११० ३ शाश्वत, नित्य 'सार म्हणिजे शाश्वत। जयास होईल कल्पांत। तें सार नव्हे।' –दा १४ ९ ५ [स] ॰वत्ता स्त्री श्रेष्ठता, योग्यता 'आमच्या देशी भाषेचा विस्तार व तिची सारवत्ता' –भागवत–देशीभाषा ३ ॰वान्–वि तथ्य, सार असलेला, सरस भरींव **सारासार**–पु सत्या सत्य नित्यानित्य, श्रेष्ठकनिष्ठ तथ्यातथ्य चांगलेंवाईट इ० 'जे नेणती परदोषगुण। सदा सारासार विचारण।' [सार+ [असार **सारासारविचार**–पु सार किती व कोणतें तसेंच असार कोणतें याविषयीं विचार चांगल्यावाईटाचें तारतम्य ज्ञान –दा १३ १ ३१

**सार**—स्त्री साईर पहा

**सार**—पु गाभा; झाड नार (झाडाचा)

**सारक, सारूक**—न (कों) १ सुरमाडाची झावळी, फांदी २ सुरमाडाचा लोंगरासारखा अवयव याचे तंतु बाधाव याच्या उपयोगास येतात धारकाचा होला शतास पाणी देण्यासाठीं वापरतात **सारकी**–स्त्री सुरमाडाच्या फांदीचा लहान होला

**सारक**—वि १ जुलाबाचें; मलशुद्धि करण्याचा गुण ज्यांत असलेलें, रेचक (औषध) २ पुढें ढकलणारा, सारणारा

**सार करणें**—क्रि (व) घोळवण, पाठवणी करणें

**सारखूट-फोट**—न पु सारखेपणा [सारखा]

**सारखवट-टा**—स्त्री पु सादृश्य, सारखपणा [सारखा+ वत्-वट] 'गाढव आणि घोडे पशूंचा वर्ग एकच आहे व त्यांची बरीच सारखवट आहे' –मराठी –पु ३ भा ४ पृ १०८

**सारखा**—वि १ सम, सदृश, तुल्यता २ समान, एक रूप ३ सपाट, समपातळीचा, प्रकारचा, एक गुणी–वर्णी ५ सम भाव असलेला, समदृष्टींतला, आपपरभावहीन ६ योग्य, जोगता 'ही जागा घर बांधण्यासारखी आहे' 'पागोटें डोकीस राहीसारखें बांध' ७ समभाग–प्रमाण 'खनिज संपत्ति सारखी वाटलेली नसते' –मदाव १ –क्रिवि कमजास्त न होता, एकसारखें, सतत 'हें पोर चार घटका सारखें रडतें आहे' 'पाऊस दोन रोज सारखा पडतो आहे' [स सदृक्ष, प्रा सारिक्ख, हिं सरीखा]

**सारखाविणें**–उक्रि १ सारखा, सपाट, होईं असें करणें २ एक सारखा, सदृश होईं असें करणें

**सारंग**—पु १ (संगीत) एक राग 'उदासघुन सारंग ऐकतां ब्रह्मचारी वेळा चळती।' –प्रला २३६ (या शब्दाचे संस्कृतांत अनेक अर्थ आहेत त्यापैकीं जे कांहीं मराठींत येतात ते असे) २ भ्रमर –ज्ञा १८ १६३५, –एभा १ १०३ ३ हरण ४ मोर ५ सर्प ६ सिंह ७ चातक ८ हत्ती ९ हंसक १० वृक्ष ११ वस्त्र १२ कामदेव १३ मनुष्य १४ कमळ १५ रत्न १६ सोनें १७ चंदन १८ पुष्प १९ प्रकाश २० मेघ २१ कापूर इ० [स] ॰धर-पाणी–पु विष्णु कृष्ण 'भीमकी नाकींचें सुपाणी। सहज देखेल सारंगपाणी।' –एरुस्व ७ ३३ –एभा २५ ४५१

**सारंग**—पु १ खलाशी नावाडी –वाडथोमा १ ३४४ २ तांडेलावरील अधिकारी, खलाशांचा नायक ३ कोंकणांतील नावाड्यांची एक जात [फा सरंग=सैन्यांतील अधिकारी]

**सारंग**—वि चित्रविचित्र, शबल, बहुरंगी. [स] **सारंग**–पु घोड्याचा एक रंग तांबूसकाळा –वि तांबूस काळसर रंगाचा 'तेव्हां सारंगा वारू। राव आणवित।' –ज्ञानि ९६

**सारंग**—स्त्री आव्याचें मोठें जाळें, सारण पहा

**सारंगगाठ**—स्त्री एक जननेंद्रियविषयक अतगंळासारखा रोग यासाठीं कातडी पहा (ट्रस) वापरतात

**सारंगपट-पाट**—पु १ पटावर सोंगट्या फाशानीं खेळा वयाचा खेळ २ सोंगट्या आणि पट, सारीपाट

**सारंगी**—स्त्री (कोष्टी कर्ना) सूत वाळविण्याची जागा [का सार]

**सारंगी**—स्त्री (वे) खेप [का सारिगि]

**सारंगी**—स्त्री एक ततुवाद्य लाकूड कोरून कातड्यानें मढवितात सा, प, सा, म या स्वरात त्याच्या चार ताती मिळ वितात, हिला तर्फांच्या ३६ तारा असतात हें वाद्य गजानें वाज वितात [स] ०वाला, **सारग्या**-पु सारंगी वाजविणारा [हिं सारंगिया]

**सारघम, सारघुवम**—स्त्री (माण) एक जोंधळयाची जात हे काळे असतात

**सारजा**—स्त्री सरस्वती, शारदा [स शारदा, प्रा सारया]

**सारझूळ**—न एक जगली झाड

**सारडेंकर**—पु (राजा) करपट ढेंकर 'आज जडान्ना मुळें मला सारडेंकरा येतात' [सार+ढेंकर]

**सारण-णी**—स्त्री लहान जाळींतून झाडावरून उतरलेले आव साठवण्याचें मोठें जाळें

**सारण**—न १ सारणें, ढकलणें २ करजी, पुरी इ० पक्वान्नात भरावयाचा गूळखोबऱ्याचा किंवा इतर मसाला पुरण ३ भाकरी थापण्याकरिता, पोळी वगैरे लाटावयाकरिता तिच्या खालीं घालतात तें पीठ -स्त्री १ पाट, कालवा, सारणी 'पप बसविला असेल तेथून सारण चढवून त्यावरून पाणी न्यावें लागतें' -शतकी-शेतकरी ३ ५ २ कळक इ० ची बारीक काब चिपारी, सरी ३ (कों गो) केरसुणी [स सृ सरणें] ०पुरी-स्त्री (बडोदें) एक पक्वान्न -ऐरापु विवि ३०४ **सारणिक**-वि रस्ता, प्रवास यासबधी [स] **सारणा**-स्त्री १ ग्रह, पचाग इ० सिद्ध० करण्याचें गणिती कोष्टक, अडजाल उदा० ग्रह तिथि योग नक्षत्र-करण सारणी २ रीत, मांडणी विधि (इं) फॉर्म्युला 'फलित गेरणा काढण्याची एक सुलभ सारणी काढिता यते -यहिय २० ३ सूत्र सिद्धात ४ (रमा) सकत चिन्हरूपानें, सत्यप्रमाणें लिहिलेली पद्य याची घटना ५ लहान नदी, ओढा ६ पाट, नहर सुमन तैलाची सारणी।'-मुआदि ४८६ -दा ३ २३ ७ वेगाना मोट ओढतां यावी म्हणून केलेला उतार, मोटचा उतार, ८ (विणकाम) मेंडळ टाकून ठेवण्याची दोरी **सारणें**-उक्रि १ पुढें करणें, ढकलणें, दूर करणें 'दिव्याची वात सारा पाहू' २ लोटणें, पलीकडे करणें 'सागर सारुनिया बैसविले। कोंकणीं जन पाळीले।' -परशुरामाचा पाळणा -शिशु ३३८. ३ निरास करणें, घालवणें 'स्वामिनीं वधुनि तापसारिला। त्याक्षणें सकळ ताप सारिला।' -मोरा १४६३ ४ खलास करणें, शेवट करणें, सपविणें 'तेराही स्पष्ट सारिले अब्द।' -मोविराट ४६३, -ह ९४४ ५ आटोपणें, उरकणें 'प्रत्युत्तर नेदूनि सुखें। भोजन सारी यथासुखें।' -मुआदि ३८७७, -तुगा १८६ ६ काढणें, उपसणें (पाणी आघोळीस इ०) 'जळ सारिलें स्नानाला।' -रामदासी २ १७७ [स सृ-सरणें]

**सारथी-थि**—पु १ रथ हाकणारा, गाडीवान 'सारथी शार्ङ्गधरु। अर्जुनेंसीं।' -ज्ञा १ १४१ २ (ल) सूत्रधार, कार्यवाह कर्णधार, प्रमुख म्ह० तोंडासारखा सारथी जवळ असल्यावर काय कमी ३ साहाय्यक, सकटनिवारक, पाठीराखा म्ह० अहल्याचा सारथी भगवान् [स सारथी] **सारथ्य**-न १ सारथ्याचें काम, पेश, रथ चालविणें २ (ल) साहाय्य; मदत [स]

**सारद**—स्त्री (प्र) सरहद्द पहा

**सारद्र**—वि ओलें, (प्र) सार्द्र 'सार्द्र आणि सीतळा -दा ८ ५ २२ [स+आर्द्र]

**सारपुरी**—स्त्री (क) राळपिठाचें सारण व गूळ घालून केलेली पोळी [सारण+पुरी]

**सारनेटा**—क्रिवि वेगानें, त्वरेनें -शर [सारणें+नेट]

**सारनोळी**—स्त्री डाळीचें ओल पुरण घालून केलेली पुरी खान्या पुरणाच्या पुरीला कचोरी म्हणतात [सारण+पोळी]

**सारपणें**—सक्रि (ना) ओरपणें, भुरकणें

**सारपा**—पु ढलप्याचा ढीग [साल]

**सारफळी**—स्त्री एक अलकार सरफळी पहा 'कानीं नाहीं बाळया वहन सारफळया त्याला।' -ऐपो ६८

**सारफा, सारफेवार**—सरफा, सरफेवार पहा

**सारभागी**—वि शहाणा, गुणज्ञ 'म्हणसी सारभागी जे जन। माझीया गुणागुणाचें गायन। करूनिया ते शातमन। निवात होती।' -रास ३ २७८ [स सार+भज्]

**सारभुंकन-भूकण**—वि नाकपुडीच्या खालील बाजूस पाढरा ठिपका असणारा (घोडा) हें अशुभ चिन्ह मानतात

**सारभोक्ता**—वि ज्याच्याकरिता दुसऱ्यानी कष्ट केले आहत अशा चागल्या गोष्टीचा आयता उपभोग घेणारा [सार+भोक्ता]

**सारमडळ**—न एक ततुवाद्य हें लाकडी पटीसारखें असून याच्या ३६ खुटयाना तारा गुडाळलेल्या असतात यात २ ससकें असतात

सारमेय—न कुत्रा [ स ]

सारल्य—न १ सरळपणा, निढाई २ ( ल ) प्रामाणिकपणा, अकृत्रिमता, ऋजुता ३ निर्भीडपणा, स्पष्टपणा, ( बोलण्याचा ) ४ साधेपणा, स्वाभाविकता ( रचना, पद्धति इ ची ) [ स ]

सारवट-टी—स्त्री ( वों ) एक प्रकारची गाडी बैलगाव करे दोन बैलांच्या धमणीला म्हणतात

सारवण—न १ शेणखळ्यानें लेपणें, सारवणें ( जमीन, भिंत, इ० ), पोतेरें ( क्रि० घ लणें ) २ सारवण्याकरिता तयार केलेला शेणखळा, शेण ३ सारवलेली स्थिति ( जमिनीची ) ४ शेण इ० चा दिलेला थर, लेप [ सं समास्वन, प्रा सारवण तुल० का सारणें, ] सारवणें-विणें-उक्रि सारवण करणें, लिंपणें [ का सारिसु-सारवण ]

सारवत—न ( कों ) १ जून, कडकडीत अस विड्याचें पान २ विड्यान्य। पानाला होणारा रोग

सारवळा—सारोळा पहा

सारवान—पु उंटहाक्या, उंटाचा नोकर [ फा ]

सारस—पु चक्रवाक पक्षी –ज्ञा ६ १७७ 'सारसांचीं निर्शी ध्यान रवीच्या प्रकाशीं ।' –तुगा ८५७ [ स ] सारसी–स्त्री चक्रवाक पक्ष्याची मादी

सारस—न कमळ 'सेवा श्रीपतिच्या पदा अलि जसा अत्यादरें सारसा ।' –मोअवरीव [ स ] सारसाक्ष–वि कमल नयन. 'श्रीमूर्ति तुची हरि सारसाक्षी। हे जाणते सार असार साक्षी।' –वामन हरिविलास ६ २८ [ सारस+अक्ष ]

सारस, सारीस—न ( वों ) सुरमाडाच्या झावळीचा बुंध्याकडील भाग हा पन्हाळासारखा असून झाडास पाणी दडविण्याच्या उपयोगी येतो सारक पहा

सारसई—स्त्री साद नांवाचें जनावर

सारसुची—स्त्री साफसुरी –शर

सारसुसर—स्त्री १ सामान सुमान, चीजवस्त २ घरातल्या, प्रवासात लागणाऱ्या लहानसहान जिनसा, किरकोळ वस्तू

सारसे—वि यज सरसा पहा

सारसें—न एक पक्वान्न, सुधारस 'सद्दा लिंबाच सारस।' –मसाप ४ २५१ [ स+रस ]

सारस्य—न ( प्र ) स्वारस्य पहा

सारस्वत—वि १ सरस्वतीसबधी २ भाषेसबधी ३ विद्वान् अभ्यासक –ऋ ७६ 'जैसा नष्ट तो अजीगर्त। मद्यपाविया सारस्वत।' –कथा ३ ७५६ –पु १ सरस्वती नदी काठचा प्रदेश २ एक ब्राम्हण जात ३ सरस्वतीचा पुत्र 'काय पडपावी सारस्वतें। फळें मिळिजे।' –ज्ञा १ ८ –न सर्व विद्या, वाङ्मय, साहित्य 'हें सारस्वताचें गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड।' –ज्ञा ११ १९

सारळीं—क्रिवि ( ना ) नेहमीं, जेव्हां पाहावें तेव्हां. [ सर्व वेळीं ]

सारा—पु १ जमिनीवरील कर, पट्टी 'नाहीं वेगी जेवा सारा। जाहाती नाहीं म्हणियारा।' –तुगा ३६० २ खड 'हेस्टिंग्ज साहेबानें हा प्रांत साऱ्यानें तरी आपणास वहिवाटीस द्यावा म्हणून बोलणीं लाविलीं।' –विवि ८ ६ ११३ ३ भाडें [ अर सारह् ] ०दोरा–पु सार, कर पट्टया वगैरे. [सारा+दोरा आधिक्यार्थी ] ०बदी–स्त्री सरकारास सारा न देणें एक सत्याग्रह 'वाळकृष्ण मथुरादास गुजर यांनीं साराबदीचें उपदेशपर भाषण केल्यावद्दल ४ महिने कैद झाली ' –के २ १२ ३०

सारेकरी–पु सारा भरणारा इसम खडकरी

सारा—पु डोळ्याचा एक रोग, डोळ्यावरचें पटल

सारा—पु ( व ना ) केशकलाप [ स सारा=दूर्वा; गवत? ] ०उतरणें–केशवपन करणें, ( विधवा स्त्रीचें )

सारा—पु धुसार पिकाचा मोठा वाफा –इरिनिदान खातें

सारा—वि अवघा, सर्व, सगळा, एकदर (सख्या परिमाण) [ हि सर्व ] ०सुदीस–क्रिवि ( कों ) सर्व दिवसभर, सबध दिवस [ सारा+सु+दीस=दिवस ]

सारा-सारि-रे—वि (कों ) तुल्य, सारखा 'तुमाला मी भइणी सारी।' –चेत्रावळ, महाराष्ट्र शारदा, जून १९३५ 'दावी अर्जुन पराशरासारें।' –मोभीष्म १० ८१ [ स सदृश ]

सारादोरा—पु १ धागा, जोड, बंध २ स्नेहबधन 'प्रेम सारादोरा उगवेल काशानें।' –दावि २१० [ दोरा द्वि ]

साराश—पु १ सार, सत्त्व, अर्क ( लक्षणेनें व शब्दश ) 'गोगोरस मथन करिता। चोरिशी साराश नवनीता।' –एरुस्व ८ २९ २ तात्पर्य मथितार्थ, गोषवारा ३ (कायदा ) निर्णय, निकाल ( न्यायाधिशाचा, पचाचा ) ४ हुकूमनामा, निवाडपत्र

सारि-री—पु द्यूतकार, सोंगट्या फासे खेळणारा –स्त्री १ सोंगटी –एभा २९ ७७५ २ सोंगट्याचा खेळ, सारीपाट 'सारी खेळता अरकद। निकरेंही माडो।' –ज्ञा ११ ५४८ ०पाट—सारीपाट पहा, सोंगट्याचा खेळ –एभा २ २९ 'शिवा मागतें ते अवसरी। सारीपाट खेळतसे गौरी।' –कथा १ ६ ४० ०फळी–स्त्री सोंगट्याचा खेळ 'पुष्करासि म्हणे कली। तू नळासी खेळ सारीफळी।' –कथा १ ९ १०

सारि—स्त्री ( हेट गो ) चितारक्षा, तिसरे दिवशीं भरावयाची राख [ ? स क्षार ] ०धुवप–कि ( गो ) चिता शुम करणें

**सारिका-सारी**—स्त्री एक पक्षी, साळुंकी, मैना 'लील बालपर्णी हि गाय हरिच्या प्रेमें जसी सारिका।'—मोकृष्ण २४१२१३ [स]

**सारिखा**—सारखा पहा 'तेंही प्रहेसारिखें चरणीं। निवे दीन परिसिजे।'—मुभादि ४४९ [सं सदृक्ष, प्रा सारिक्ख]

**सारिगम**—स्त्री न (प्र) सरगम पहा

**सारिफा, सारिफेवार**—(प्र) सर(रि)फा-वार पहा

**सारी**—स्त्री (बे) रोप [का]

**सारूप, सारोख**—वि (राजा) १ पतीचा, अनूदार २ काहीं कर्म करून आपण नामानिराळा असें दाखविण्यात पटा ईत, आपली बाजू पटेल अशी मांडण्यांत शहाणा ३ चांगलें, सत्य, महत्त्वाचें (भाषण, वर्तन, कृत्य इ०) 'महाभूतांचे सारोख सरळे होती।'—ज्ञा १५९८ —स्त्री सारखी पहा [सारख¹]

**सारखी-सारोखी**—स्त्री १ पत, अब्रू, लौकिक २ आपला चातुर्यपणा दाखविण्याची शिताफी, शहाणपणा (चोर, लबाड माणसाचा) ३ शहाणपणा, हुशारी **सारोखीच्या गोष्टी सांगणें**—सविस्तर सबबी, खुलाशाच्या गोष्टी सांगणें

**सारूप्य**—न १ सादृश्य, एकरूपता, सारखेपणा, एकजि नसीपणा २ मुक्तीच्या चार प्रकारांपैकीं एक, सरूपता [स]

**सारें**—न, (गो) १ माशाचें खत (शेतासाठीं) २ जिभे वरचा पांढरा साका [स सार¹]

**सारें**—क्रिवि (व) नेहमीं, सर्वकाळ [सर्व]

**सारोदार, सारोद्धार**—क्रिवि (कु गो) सदासर्वदा, सतत 'वारवार खेद करून सारोद्धार झुरत बसणें अगदीं उपयोगी नाहीं।'—रत्न ११

**सारोधार**—पु (महानु) सारांश 'तयाचा सारोधारु। आता आइक तु।'—भाए ६९५ [स सार+उध्दृ-उद्धार]

**सारोळा**—पु बेरजेचा एक ताळा (गु) सर्वाळा (क्रि० करणें, उतरणें)

**सार्थ**—पु १ व्यापारीसंघ, तांडा २ (सामा) संघ समूह जमाव ०**वाह**-पु १ लमाणाचा नाईक, तांड्याचा मुख्य [सं]

**सार्थ**—वि १ अर्थयुक्त, अर्थ देणारा (ग्रंथ) 'सार्थ भगव द्गीता २ सत्य, अन्वर्थक, यथार्थ ३ निष्फल, नि सत्त्व नव्हे अस ४ सधन, सधन [स स+अर्थ] **सार्थक-क्य**-न १ समाप्ति, सांगता, शेवट २ सफलता, सिद्धि 'म्हणोनि आपुलीं आपणपें या। जरी यें इंद्रियें येती आया। तरी अधिक कांहीं धनंजया। सार्थक असे।'—ज्ञा २ ३५१ ३ कृतकृत्यता, इति कृत्यता, इतिकर्तव्यता ४ उत्तरक्रिया 'त्याचें सार्थक करणें मला अवश्य आहे, असें म्हणून त्यानें स्मशानांत तात्काळ चिता रचिली'।—कीर्तन १५७ ५ चीज, साफल्य 'ही मनीषा सिद्धीस गेली असें वाचकांस वाटलें तर सर्व श्रमाचें सार्थक्य झालें' भावि २ —वि सफळ —एभा ११ ३८ [स सार्थक्य]

**सार्थकी लागणें**—योग्य कारणीं लागणें, यथायोग्य विनि योग होणें

**सार्द्र**—वि ओला, भिजलेला, सर्द —एभा १३ ६३७ [सं स+आर्द्र] **सार्द्रता**-स्त्री १ ओलेपणा —एभा १८ २५९ २ टवटवी —एभा १३ ६३७

**सार्ध**—वि अर्धे मिळविलेलें, दीड, अर्धासह 'तेय सार्धे सार्धे प्रार्ती। साडेनिया।'—ज्ञा ६ १९५ सार्धमुद्रा-रुपया-द्रव्य-त्रय इ० [स+अर्ध]

**सार्प**—वि सर्पासबधीं सर्पिल [स]

**सार्व**—वि अखिल, सबध, एकदर [स] ०**काल**-क्रिवि. सतत, नेहमीं, सदासर्वकाळ ०**कालिक**-वि सर्वकाळ लागू असणारें, शाश्वतचें ०**जनिक-जनीन**-वि सर्व लोकांसबधीं (आचार, इ०) सामान्य, सामुदायिक, लौकिक खाजगी याच्या उलट सार्वजनिक गणपति-चर्चा-सभा-हित इ० ' ०**भौतिक**-वि १ सर्व प्राण्यांसबधी, जगातील सर्व भूतमात्राविषयीं २ सर्वभूतांविषयीं ०**भौम**-पु सम्राट्, सर्व पृथ्वीचा राजा, चक्रवर्ती, बादशहा 'जन्म गेला वोरांभ मागोन। सार्वभौम नाम तया।' —वि सर्व पृथ्वीसबधीं, जागतिक ०**भौमपद**-न सम्राट्पद, सर्व पृथ्वीवर सत्ता, राज्य ०**राष्ट्रीय**-वि १ सर्व राष्ट्रांसबधीं-बाबत (नियम, कायदा इ०) 'ऑस्टिन हा सार्व राष्ट्रीय धर्मशास्त्राला कायदा ही सज्ञा लावीत नाहीं' २ आतर-राष्ट्रीय (इ) इटरनॅशनल —ज्ञानको ०**लौकिक**-वि जगातील सर्व राष्ट्रें, लोक यासबधीं, अखिल जागतिक **सार्वत्रिक**-त्रि १ सर्वत्र विद्यमान, प्रसिद्ध २ सर्व जागचा, सर्वत्र सबध असलेला **सार्वस्विक**-वि समाजसत्ताक 'लोकसत्ताक राज्य चांगलें सगळें राज्यतंत्र मुंडाळून टाकून सार्वस्विक सांप्रदाय असावा' —नि ७१२ **सार्वांग**-(प्र) सर्वांग 'न लावीं वो कर्पूरू। सार्वांगीं चेतसें ओदरू।'—शिशु ८३२

**सालेंकू करणें**—क्रि (व) मदत करणें, हातभार लावणें एकानें दुसऱ्याचें सालेंकू केलें पाहिजे'

**सार्ष्टिता, सार्ष्टि**—न (पचधा मुक्ति मानतात तव्हा चवथी मुक्ति) बुद्धि, बल, ऐश्वर्य इ० सर्व गुणात परमेश्वराशीं साम्य, एक प्रकारचा मोक्ष [स]

**साल**—न १ वर्ष, सवत्सर 'ईश्वर त्याजला बहुसाल करो'—रा ३ ३३५ २ वर्षासन, वार्षिक वेतन, पगार [फा साल्]

०आयद्रा-पु (बागदोपत्री) आगामी वर्ष आवदाचें साल ०उधारी-स्त्री वर्षमुदतीची उधारी -गांगा १४१ ०करी-पु १ जोसपण कुळकरण इ० वृत्तीचे अनेक जे भागीदार त्यांतून विशिष्ट सालची वहिवाट करण्याचा ज्याला अधिकार आहे तो, विशिष्ट सालचा वृत्तिभोगी २ एक सालाकरितां नमरलेला माणूस ३ वर्षाचें वेतन द्यावयाचा करार करून ठेवलेला माणूस ०गिरा-गिरी-गिर-पुस्त्री १ वाढदिवस, वर्षगांठ 'महाराजांच्या सालगिऱ्याच दिवशीं ग्वाल्हेरमध्यें मोठा जलसा होता' -एहिमा ३०३ नबाबाची सालगिरे' -रा ५ २७ २ वाढदिवसाचा समारंभ -रा ७ ८२ 'सालगिरीच्या समारंभांतही बहुत आरास करावी' -ऐसफुले ३४ [फा सालगिरह्] ०गुदस्त-न गलें वर्ष, मागील साल -दिमरा १ १८८ ०गुदस्त-स्ता-क्रिवि गतवर्षी, गुदस्ता ०झाडा-पु साल अखेर हिशेब, वर्षाचा हिशेब 'सावधान तुका निर्भर मानसीं। सालझाडयापाशीं गुंपो नेणें।' -तुगा १८९४ ०दरसाल-क्रिवि प्रतिवर्षी ०दार-(खा) सालाच्या बोलीनें नेमलेला नोकर गड्या सालकरी ०पाडा-पु (गो) वर्षाअखेर झाडां वरची सर्व फळें काढणें, वार्षिक तोड [साल+पाड] ०बंदी-स्त्री १ (जमाबंदी संज्ञा) कौल खत इ० सबंधीं लागोपाठ वर्षासाठीं ठराव, योजना, हप्ते अनेक यावे, ध्यावे इ० ठरावांचा त्या कागदावर केलेला क्रम २ (राजा) कृत्यादिकांच्या वहिवाटीविषयीं अमुक नीं अमुकमालीं वहिवाट करावी असा सालकऱ्यामध्यें झालेला ठराव सालउत्पन्नाचा करार ०ब-साल-क्रिवि प्रतिवर्षी, दर साल वर्षानुवर्ष मौज मजकूरची जमाबंदी साल-ब-साल तनख्याप्रमाणें करून। -वाडबाबा १ २०६ ०बेगमी-बजमी स्त्री वर्षभर पुरेल इतका साठा करणें, सालाची बेगमी (धान्य लोणचीं पापड इ० ची) ०बोली-स्त्री एका वर्षा पुरती केलेली बोली करार ०माडया-पु साल अखेरचा हिशेब घेणारा अमलदार -तुगा ०मजकूर-न चालू साल वर्तमान वर्ष ०वारा स्त्री वर्षात घडलेल्या गोष्टींची नोंद टाचण -वि सालवार सालाप्रमाणें लावलेली ०सवर्षी-वि सालीना सालचें (उत्पन्न वेतन मिळकत इ०) ०हाल न चालू साल सालहाल व गुदस्तची खडणीची वेवाकी करून घेणें' -दिमरा १ ०८८ क्रिवि चालू सालीं हालसाल पहा सालाना सालि(ली)ना-क्रिवि वर्षाकाठीं-वर्षाला सर्व साल मिळून येई अशा प्रकारानें 'आम्हास सालीना एक हजार रुपये वेतन मिळतें [फा साल्याना] सालाबाद-वि वार्षिक दरसालचा (खर्च पैका पट्टी) -क्रिवि दरवर्षी सालाबादप्रमाणें' [फा साल् बमद्] सालाबादी-वि दर साल होणारा चालणारा (दर्जे धंदे इ० व्यवहार) -स्त्री दरसाल पडत असतो तो विशिष्ट व्यवहार, खर्च इ० 'श्रीची सालाबादी ३०० रु आहे' साली-वि वार्षिक, सालाची सालोसाल-क्रिवि १ प्रतिवर्षी, दरसाल २ वर्षानुवर्ष

साल—स्त्री १ त्वचा, वरचें जाड आवरण (झाड, फळ, इ० चें) २ घांसल्यानें, सोलवटल्यानें निघालेलें कातडें (माणूस, जनावर यांचें), -न १ बारीक त्वचा, फोल, तूस, टरफल (धान्य, दाणे इ० वरचें) 'कलियुगांतीं कोरडीं। चहू युगांचीं सालें सांडीं।' -ज्ञा १५ १२९ २ कोकणीचें टरफल, आमसूल ३ शेत जमीन नांगरल्यानंतर तींतील ढेकळें फोडून जमीन साफ करण्याकरितां जमीनीवर फिरवावयाचा लाकडी जाड ओंडा, गुठें [स छाल, द प्रा सालण] ०(पाठीचें) जाणें-पाठ लागणें, नुकसान येणें ०ट-वि १ याहेंबहुत साल ज्याच्या अंगीं आहे असा (डाळ, कणीक तांदूळ, लांकूड इ० पदार्थ) २ आंब्याचा एक प्रकार -न १ फोल, टरफल (धान्य, बी इ० चें) २ पोकळ शेंग (आंत दाणा नसलेली) सालटें असा अनेकवचनी प्रयोग बहुधा येतो ०टी-डी-स्त्री १ सबंध कातडें (मनुष्य, जनावर यांचें), शरीरावरण २ खरचटून, घासून निघालेलें कातडें ३ (तुच्छतार्थी) एखाद्या माणसाचें कातडें ४ (सामा) साल त्वचा, पातळ कवच 'आकाशाची सालटी। काढुनि घेइजे आतुली गोठी।' -सिस ४ १९६, -विउ ४ ६२ ०टें-डें-न सालटी डी (१-२) पहा ०दाटा-वि जाड सालाचा (आंबा, केळें, इ०) 'सालदाटी केळ' नांवाची एक केळ्याची जात आहे [साल+दाटणें] ०दोडा-पु १ जाड साल असणारा एक जातीचा आंबा २ अतिशय जाड साल असणारें हातांबाचें फळ ०पट-न १ साल (वृक्ष मनुष्य, धान्य, फळ इ० ची) २ घासून खरचटून निघालेला कातड्याचा तुकडा साल पहा ३ ओंडा तूस फोल ०पा-पु ढळप्याची रास ०मोगा-ठा-वि जाड सालीचा (वृक्ष, फळ वनस्पति इ०) ०वणी-न अमसुलाचें सार सोलवणी ०सुल-नस्त्री (व्यापक) साल इ०

साल—न (गो) दिवाणखाना, दालन -सह्याद्री ३१४ [पोर्तु इ सल्ल]

साल सालई—पुस्त्री एक झाड सारफळ [स शाल प्रा साल]

सालकडू—पु (मुंबई) जातगंगेने पाक्क ठरविलेला इसम तिळोरी पहा

सालंकरणें—क्रि अलंकृत करणें होणें 'दिसें सालंकरलें सकळ। प्रत्यक्ष जैसें निराकार केवळ।' -स्वानु १५५० [स+अलंकरण] सालंकृत कन्यादान-न अगावर दागीने घालून मुलीचें विवाहप्रसंगीं दान करणें (एरवीं कन्यादानाच्या

वेळीं मुलीच्या अंगावर फारसें काहीं ठेवीत नाहींत) याच्या उलट गमतीचा प्रयोग-**गिळंकृत कन्यादान.**

**सालखादें**—न (कों) एक प्रकारची दश करणारी माशी

**सालखाद्या**—वि १ चांगलें असेल तेवढें घेणारा, लोणी, मलई खाणारा २ फायदा मिळतो आहे तोंपर्यंतच राहणारा (धंदा, नोकरी, जागा इ० वर) [साल+खाणें]

**सालजाव**—पु जावसाल पहा १ तह, निकाल 'मोंग लाच्या विचारें पाहता हे उभयता सरदार वशीं असावे म्हणजे मोंगलाशीं सालजाव होऊन बदोबस्त होईल' –रा १ १२१ २ चोरणें 'तरी सालजाव करून मशारनिल्हेस माघारें लौकर पाठविणें –रा ६ ३९३

**सालढोल**—स्त्री एक झाड, सालफळ पहा

**सालवळ**—स्त्री (वे) १ वशावळ २ चाल [का साल]

**सालन**—पु (व) मासाचा रसा, तोंडीं लावणें [हिं]

**सालपाई**—स्त्री एक लहान दवता –खेया

**सालपापड**—न फेणी, एक पक्वान्न –पाक ६४

**सालफण**—पु एक झाड –अश्वप २ ४८

**सालफळ-ळी**—स्त्री एक झाड, सालढोल

**सालभुक-पाडरी**—वि कानावर पाढरा ठिपका अस णारा (घोडा) –मसाप २ १ ५७

**सालभेंडा-डी**—वि १ साल जाड पण आत तत्त्वाश मात्र थोडा असा (नारळ, पोफळ, केळें, इ० फळ) २ अशीं जाड सालीचीं फळें धरणारें (झाड) ३ जाड सालीचें (झाड) [साल+भेंडा] **सालभेंडी**-स्त्री एक झाड याचें साल जाड पण लाकूड फार हलकें असतें

**सालमाल**—पु एक हलकी हिंदु जात धदा तांबोळ्याचा –विल्सन कोश

**साल(लं)मिश्री**—स्त्री एक औषधी मूळ –वगु ६ १० [अर सालबि+मिश्री]

**सालवन-णा**—स्त्री एक वनस्पति [स शालि-पर्णी]

**सालस**—वि १ प्रामाणिक, सज्जन, निरागस २ गरीब खोडकर नव्हे असा (माणूस, जनावर) 'एका पाटील सालस सवलस होऊन बोलती कशी।' –पला २ २७ [अर सल्सि] ०**पण-णा**-नपु सुजनता, साळसुदपणा, 'चल सालसपण धरुनि निखालस खोट्या बोला बोलु नको।' –अफला **सालसाई**, **सालसी**-स्त्री प्रामाणिकपणा, सरळपणा 'त्याचीं उत्तरें त सालसीनें दिलेलीं आहेत' –वाडसभा २ १७७

**साला**—पु १ बायकोचा भाऊ, मेहुणा –एहस्व ७ ७५ 'हे कोण बायकोचे साले' –अमृत ११८ २ बहिणीचा नवरा (या अर्थानें आज फारसा रूढ नाहीं) ३ एक शिवी 'बायकोनें सावरल म्हणून ठीक, नाहीं तर साल्यापासुन सुरवात होती' –के १ ७ ३० [स श्याल(क), प्रा साल, हिं साल, प साळा] **साली**-वि १ बायकोची बहीण (विशेषत धाकटी) 'साल्या मेहुण्या घरास येती। फराळाच्या वसती पक्की।' –अमृत २ बायकोच्या भावाची पत्नी 'साली अथवा मेहुणी। रूपवत कुशल तरणी। स्त्रियेच्या बाळतपणा आणी। तो एक मुर्ख।' –मुमूल ८३ [स श्याली, प्रा साली] **सालेपण**-न मेव्हण्याचें नातें 'इणें लाज धरिसी मनीं। सालेपणें तुजसी केला थाकरु।' –धवळे उ १०

**सालाधाला**—वि १ अल्पसतोषी २ आनदी, सुखी समाधानी 'सदा दिसे सालीधाली। रगम्मा माझी।' –मध्व ३१९ [धाला द्वि]

**सालार**—वि सेनापति, नाईक [फा सालार्]

**सालिम**—वि (व) सगळा, तमाम [अर सालिम्]

**सालु**—न (व) पागोटें [हिं]

**सालोक्य**—न सलोकता पहा [स]

**सालोत्री**—पु घोडावैद्य, शालिहोत्री, पशुवैद्य [स शालिहोत्र]

**सालोरी**—स्त्री एक वनस्पति हिचें मूळ सार्सापरिल्याच्या ऐवजीं देतात [स शारिवा]

**साव**—वि सर्व, अवघा 'मरावें मारावें या आलें प्रसगा। बरें पाडुरगा कळलें सावें।' –तुगा ४०८२ [स सर्व, प्रा सव्व-साव]

**साव**—पु १ सावकार, पेढीवाला 'होय व्याकुळ जळता सर्वस्व वही मनात साव जसा।' –मोआश्रम ५ ९२ २ श्रीमत, भरभराट असलेला व्यापारी धदेवाला ३ प्रामाणिक, पतीचा माणूस याच्या उलट चोर ठक इ० 'तुका म्हणे चोरटाचि झाला साव। सहज न्याय नाहीं तेथें।' –तुगा ३७० [स साधु प्रा साहु-साहव] ०**जी**-पु (आदरार्थी) सावकार, शेठजी 'बहुत सावजी, क्रोधयुक्त प्यायाचा फर्जी।' –देवनाथ कटिबध ६ ०**चोर**-पु साव दिसणारा चोर ०**पणा**-पु सचोटी, प्रामाणिकपणा ०**सावकारा** पु सावकार आणि सावकारी, व्यापार-व्यापारी, धदे आणि धदेवाले यासबधी व्यापकपणें बोलावयाचें असल्यास योजतात (सामा) उद्योगधदा 'हें राज्य झाल्यापासुन साव सावकारा वाढला हो!'

**सा(सा)ध**—स्त्री १ नाडी, शीर, स्नायु (क्रि० चढणें, फुगणें, ठोकणें, उतरणें, दुखणें) अनेकवचनी उपयोग जसें-

सावा ओढताना-ताणताना-तुटताना इ० 'घडिघडि घडु घाई ओढती सर्व सांवा।' -सारद ३ ७५ २ बकरा, इ० कांच्या आतड्याचा तांत तनु तांत दिरा, नाडी पहा [स स्नायु]

**सावकार**—पु १ व्यापासुन लोक पैसे कर्जाऊ घेतात असा श्रीमत माणूस, पेढीवाला २ जो ज्यास कर्जाऊ पैसा देतो तो त्याचा सावकार ३ व्यापारी, धंदेवाला साव पहा [स साधु कार; प्रा साहुकार यांनें पुढील व्युत्पत्ति देतात सा (सह)+वकार (वस्त्र, वपु विद्या, विनय वाणी, वित्त) ज्याच्या जवळ आहेत किंवा पाहिजेत असा] 'भरजाव, मरजाव, विसरजाव' हा मत्र सावकार टेव घेत ना उच्चारतो असें वाटेनें मानतात व त्यास सावकारी मत्र म्हणतात **सावकारकी**-स्त्री १ साव कारी पहा २ (ल ना) चोंबडेपणा, लुडबुड **सावकारा**-पु १ सावकाराचा समुदाय; अनेक श्रीमान् पेढीवाले 'त्या शहरांत सावकारा मोठा आहे' -तीप्र १०४ २ (राजा) मोठी साव कारी, व्यापार उदीम 'तमाम सावकारा बद झाला' -रा ३ १६४ ०उठणें-पेठ बसणें, व्यापारी उठून जाणें **सावकाराचा नातू**-पु जवळ पैसा नसुन श्रीमताप्रमाणें राहणाऱ्यास म्हणतात **सावकारी**-स्त्री १ पैशाचा व्यवहार, देवघेव २ सावकाराचा धदा, सावकारकी 'ऋण तरि मुठी पोटे त्याच्या व्याजांत हेम नगरी ती। मुदलांत मुक्ति देणें ही बोण्या सावकारिची रीती।' -वि १ सावकारासबधी २ व्यापारी; धंदेवाईक ०बातमी-स्त्री पेशवाईत सावकार लोक आपली जी डाक स्वतत्र ठेवीत, तिच्या द्वारें आलेली बातमी ही अगदीं निश्चित अशी मानली जात नसे -रा १० २६०

**सावकाश**—पुन आराम, स्वस्थता 'की ऐक्ता परिणाम घोष। भूतप्रेतास न वाट सावकाश।' -ह २३ २१४ 'महाराज श्रीस्वामीस सावकाश वाटलें' -वाडशा ३७ -क्रिवि घाई गोंधळ न करता स्वस्थपणें, शातपणें (क्रि० जाणें, येणें, चालणें इ०) [स+अवकाश] **सावकाशी**-स्त्री सयपणा मदपणा; घाई नसणें ०वर घेणें-सावकाश चालु देणें, सयपणें करणें **सावकाशें**-क्रिवि आरामशीर स्वस्थपणें 'तववरी तुम्ही सावकाशें। शाश्वत लोकीं सुखवस्ती।' -मुआदि २० १४२

**सावकें सेवकें**—क्रिवि (बायकी) घालूनपाडून टोमणे मारून; लावून (बोलणें)

**सावघड**—वि सोपी, सुलभ 'या गोष्टी आवघडा। जाल्या घर सावघडा। नावाचा चौघडा झडल झडल झडल।' -होला १२२ [स सुघट]

**सावचित-त्त**—वि. १ दक्ष सावधान 'नव्हतो सावचित्त। तर्णे अतरलें हित। -तुगा २०२६ २ एकचित्त लक्षपूर्वक 'तुकारामरूप प्रत्यक्ष बोलत। होईं सावचित्त सावधान।' -ब ५०५ ३ जागा, हुशार 'निजोन उठतां दुश्चित्त। कदा नाहीं सावचित्त।' -दा ८ ६ ३९ ४ जिवत, शुद्धीवर आलेलें 'प्रेत झालें सावचित्त। नवें वस्त्र नेसत।' -गुच ३२ १५५ [सावध+चित्त] **सावचित-त्तीं, सावचित्तपणें**-क्रिवि सावधान चित्तानें, स्वस्थपणें सावचित्त पहा

**सावज**—न १ श्वापद, रानटी पशु (माणसाळलेला नव्हे असा) -एमा २ ९३ २ शिकारीचें जनावर (ससा, हरण, इ०) 'विचाराचनि परसे। निजेहेंचें सावज उसासे।' -भाए १९८ ३ मृग 'पाहें पां सावजें हातिरू धरिलें। तणें तया काकुळती मातें स्मरिलें' -ज्ञा ९ ४४२ [स श्वापद प्रा सावज, हिं सौजा]

**सावजिरा**—पु सगजिरें पहा

**सावट**—न १ सावलीची जागा, विशेषत जेथें नेहमीं झाडेंझुडपांचें आच्छादन असल्यानें जिरव होत नाहीं अशी 'शेतामध्यें झाडांचें सावट फार झालें आहे तें काढल्याशिवाय पीक चांगलें येणार नाहीं' २ (सामा) सावली, छाया ३ सावलीची स्थिति आतपशून्यता [स छाया] ०पहाणें-(माण) आरसा पाणी इ०त आपलें प्रतिबिंब पाहणें **सावटी**-वि सावटाची सावलीची (जागा, शेत,)

**सावट**—क्रिवि (ग्रा) एकदम -भाने ७१४ [स+अवचित]

**सावड**—स्त्री शेतकामांत एकमेकांना जनावरें इ० ची मदत करणें, सावट, इरजीक पहा (क्रि० करणें)

**सावड**—स्त्रीन (गो) १ रानांतील फांद्यावगैरे राबासाठीं तोडणें २ राब जाळून धान्य पेरणें (डोंगरावर कदधान्य) ०मारप-क्रि रानांतील झाडी तोडून शेतजमीन तयार करणें

**सा(सां)वडणें**—उक्रि १ गोळा करणें, एकत्र करणें (अस्ता व्यस्त वस्तू) २ एकदम नेण्यासाठीं, एकजागीं करणें, ढीग करणें 'करिन ब्राह्मण पादप्रक्षालन सावडीन मी उष्टीं।' -मोसभा २ ११ 'राख सावडणें' असा प्रयोग रूढ आहे ३ साचविणें, जमविणें (पैसा) 'तुज होता व्यया टकमका पहाती। परी सावडीती द्रव्य आधी।' ४ निवडणें 'येक दिव्यान्नें भक्षिती। यक विष्ठा सावडिती।' -दा ६ ९ ६ ५ (कांहीं अर्थी) सावरणें पहा [सावरणें]

**सावण**—न (वे) सावा मळल्यानतर उरणारें गवत पेंढा [सावा]

**सावत**—(प्र) सामत पहा 'तु सावत राओ वाचोनि आणिक। कवण राखेल।' -भाए १०३ २ एक आडनांव

**सावतें**—वि सारखें -शर [स सम]

**सावतोल**—पु (व) दागिन्याचें रेशमी गोंडे वगैरेसकट वजन -जनि १५ [स सर्व; प्रा साव+तोल्णें]

सिपुर, सिर्रे—अनुक्रमें सबुरी, शिर्रे पहा

सिम सिमगा, सिमा—अनुक्रमें सीम, शिमगा सीमा पहा

सिमुर-री—शिमरी पहा 'नागवी माथा मोत्याची जाळी। सिमरी सुपाणी दाणा रयाली।' –एभा ३ ३९३

सिमेंट, सिमेंट—न एक चुनखडीची भाजून केलेली विशिष्ट पूड, सधानद्रव्य हें बाधकामास उपयोगी पडतें, शिमिट [इ]

सियारी—स्त्री शहारा, कापरें शियारी पहा [शहारा]

सियारी—स्त्री डाकीण 'म्हणे काम सागुन ऐकल। हे आशा सियारी दखैल।' –ज्ञा १३ ५०४ [अर साहर=मान्त्रिक, चेटकी]

सियाळ—स्त्री (महानु) साल, आवरण 'तचि स्वयेंभु सियाळी। वेढीजताती।' –शिशु २७, [छाल, छियाल]

सिर—न १ शिर पहा २ जवियाचा एक हात चीर मारल्यानतर हात फिरवून डोक्यावर मारणें सिर्रे–न शिरो भाग 'एन्हवीं जगदाकाराचें सिरें।' –ज्ञा ८ १५४

सिरकुंबा, सिरका—शिरकुंबा, शिरका पहा

सिरचोट—स्त्री लकडा, तगादा 'समाजीची शिरचोट लागली आहे की' –पेद १० ७२

सिरजोर, सिरताज—शिरजोर, शिरताज पहा

सिरड—स्त्री (जुनर) जळाऊ लाकडाचा साठा

सिर(रि)याणी सिराणी—स्त्री, आवड, शिराणी पहा –ज्ञा १६ ३९ 'आनदाची दिवाळी सनी। जेयाचेया दर्शनाची सिराणी।' –शिशु १०

सिरस्ता—शिरस्ता पहा

सिरा—वि उत्कृष्ट शिरा पहा –सला ६३

सिराई—स्त्री (जुनर) केरसुणी, झाडणी

सिरियाळणें—कि गुडघ्यात मान घालून बसणें –मनको

सिलक, सिलकझाडा, सिलकणें, सिलकचद-सावळी, सिलकावण-णी-णें सिलकी, सिलगण, सिलगणें सिलगावण-णी-णें—श नें आरभ होणारे ह शब्द पहा

सिलका—स्त्री शिणका, शिळका 'सल सिलका आणि सरांडे।' –दा ३ ७४

सिलपी—स्त्री (व) ढलपी [छिलणें]

सिलयत्ती स्या—वि (व) शोकी, गुलहौसी मुलगा तर सिलयत्या निघाला' [? हिं सिलवत=खलवत्त]

सिलसिला—१ शिलशिला पहा २ वळण परपरा, सबब राजश्री सावाजी भोसल्याची बोलण्याचा सिलसिला होताच' –पेद ५ १२ ३ योजना, तजवीज सिलसिलाट–पु उपद्रव

सिलारपेसानी—वि कपाळावर चद्रासारखा ल्हान वाटोळा टिळा असणारा (घोडा) हें शुभलक्षण आहे –अश्वप ११०४

सिलावट, सिलाट—वि पाथरवट –शिदि ४१४ [स शिला, हिं सिला]

सिलिक—स्त्री पेटवणी, बत्ती देणें 'जलदीनें कूच करणें नाहीं तर तोफास सिलिक होईल' –भाव ३० [अर सलक म शिलगणें, शिलक]

सिले—न हत्यार, शस्त्र 'घोडियासी सिले व राऊतासी सिले व टोप' –इम ७ –वि हत्यारबंद 'हत्ती आणऊनु सिले करविले' –भाद्विसर १७४ [अर सिल्ह] ०खाना–पु हत्यारें ठवण्याची जागा, शस्त्रागार 'चकचकीत खुब सिलेखाना।' –ऐपो १९५, –हिंलइ ५३ सि(सी)ले टोप–पु शिरस्त्राण –तुगा ३०२१ सीलेटोप अनेक हा निवडता ते लोकही भागले।' –सारुद ३ ४५

सिलेदार-री, सिलेदारीढंग सिलेपोस-पोस्त, सिलेभाल्यानिशीं—शिलेदार इ० पहा

सिंव—स्त्री मर्यादा, शिव पहा 'सिंधूची सिंव न मोडे।' –अमृ ७ २६१ [स सीमा]

सिवण सिवणावळ, सिवणें—शिवण–णें इ० पहा

सिवणा—वि निद्रिस्त ? 'बोखगा देख सिवणा। उठूनि बैसे तो शहाणा।' –गीता २ ८२ [स स्वप् हिं सोना]

सिवणी—स्त्री गुद आणि शिस्न याना जोडणारी शिवण, यामधला भाग शिवणी पहा 'सव्य तें नळीं ठेविजे। तर्णे सिवणीमध्यु पीडिजे।' –ज्ञा ६ १९४

सिवरा, सिवराई सिवसेजारी-सर सरणें-सोयरा सिवाई-य सिवायजमा-मिळकत सिवार, सिवारसैंपाक सिवासीव, सिवी सिवीगाळ-ळी, सिवेरा—श मध्यें पहा

सिविंतणें—कि स्वीकारणे, मानणें 'तैसें तुवा कलें मातें। आपुल म्हणोनि सिविंतलें होतें।' –मुआदि १० १२० [स सविद्]

सिंव्ह—(प्र) सिंह पहा

सिष्ट सिष्ट-सभावना सिष्टाई सिष्टाचार, सिसकारी—शिष्ट इ० शब्द पहा

सिस, सास—न डोकें, शीर्ष 'सिसा परता नाहीं दड। ऐसें बोल्ती उदड।' –दा ४ ६ १६ [स शीर्ष, प्रा.

सिस्र ] सिसार-पु अर्धशिशी, एक मस्तकरोग सिसाळ-ळी-स्त्री शीर्षपंक्ति, मुक्तावळी 'पार्ही उभे टाकूनि सुवळी। प्रतापलक्ष्मराची सिसाळी।' -ज्ञा १० २५१, -मुक्तादि ३७ २५ [ सिस+आलि-ळि ]

सिसफूल—न डोक्यातील अलंकार, शिसफूल 'सिसफूल धरि माथा भांग टीळा कपाळीं।' -सादह ६ २२ [शीस+फूल]

सिसव-वा-वी-वेल, सिसा—श मध्यें पहा

सिसारी, सिसें, सिस्त—शिसारी, शिसें, शिस्त इ० पहा

सिसेंभासें—न ( माण ) दुर्लक्षवहाणें

सिंह—पु १ एक श्रेष्ठ पशु, मृगराज २ ( समासांत उत्तरपदीं ) श्रेष्ठ, वरिष्ठ व्यक्ति उदा० पुरुषसिंह, पंडितसिंह ३ ( ज्यो ) बारा राशींतील पांचवी रास [ स ] ०कटी-स्त्री सिंहाप्रमाणें बारीक कमर असलेली स्त्री बारीक कमर हें सौंदर्याचें एक लक्षण आहे ०कंपित(करण)-न ( नृत्य ) पाय सरपटत पाठीमागचे बाजूस नेऊन दोन्ही हात आकुंचित करणें ०केसर-पु १ सिंहाची आयाळ २ एक वनस्पति ०तल-पु पसरून जोडलेले दोन हात ०द्वार-न मुख्य दरवाजा, प्रवेशद्वार ( राजवाडा, किल्ला इ० चें ), दिल्लीदरवाजा, ०नाद पु १ सिंहाचें ओरडणें २ ( ल ) युद्धाची आरोळी, युद्धाचें आव्हान 'सिंहनाद केला वीरीं। उपराउपरी धावि न्नले।' -एरुस्व ८ २० ३ मोठा, भयंकर आवाज, ओरडा, गर्जना 'विजय जाणोनि तदा करी बहु सिंहनाद हर्षानें।' -मोकर्ण ४७ ३५ ४ ववळात निर्माणुष स्थितींतहि, एखाद वेळीं आतून निघणारा गभीर, खोल आवाज ०विक्रीडित (करण)-न उजवा पाय पुढल्या बाजूस अलात करून, डावा पाय मागच्या बाजूस वळवून कनिष्ठिकेच्या बाजूनें मंडल करून टाचेवर टेंकविणें ०स्थ-पु गुरु सिंहराशीस येण्याचा काल हा काल सुमारें १२ महिन्यांचा असतो हा बारा वर्षांनीं एकदा येतो ही पर्वणी शुभ, पुण्यप्रद मानली जाते 'कीं श्लोक सर्वतीर्थे सगातु। आला श्रीगीतें गंगे आतु। जे अर्जुन सिंहस्थु। जाला म्हणौनि।' -ज्ञा १८ १६७५, -तुगा २७७५ सिंहल सिंहलद्वीप-न लंका, सिलोन सिंहाडा-पु मोठा, भयंकर सिंह 'न समाती दरीमाजीं सिंहाडे। तैसे दात दिसती रागीट।' -ज्ञा ११ ३४४ सिंहावतार-पु ( सिंहासारखा उग्र अवतार ) १ ( ल ) अतिशय रागावलेली स्थिति, भयंकर क्रोध ( क्रि० धरणें, घेणें ) २ ( चुकीनें नरसिंहअवतार ) सिंहावलोकन-न ( सिंहाप्रमाणें वारंवार मागें दृष्टि टाकणें ) १ मागचा इतिहास पाहाणें, पूर्ववृत्त लक्ष्यात घेणें, त्याचा विचार करणें, ( उत्तरोत्तर प्रगति होत असता ) 'सिंहावलोकनें करून। पहा मागील अनुसंधान।' -ह २५ ४७. २ एक न्याय समालोचन पद्धति [ सिंह+अवलोकन ] सिंहासन-न १ देव, राजा इ० चें बसावयाचें आसन, पीठ, गादी, तक्त ( असा सोन्याच्या किंवा मौल्यवान पदार्थाच्या आसनाखालीं सिंह असत म्हणून हें नांव ) -एभा १०.६०६ २ राजधानीचा प्रांत, परगणा 'शयवाग सिंहासन' -भोजताम्रपट शके ४१० ३ एक योगासन -सयोग ३२१ [ सिंह+आसन ] सिंहिका-स्त्री राहूची माता, एक राक्षसी. 'तो सिंहिकेनें वदन पसरिलें। छायाग्रह साधिलें।' -रावि १५३९ सिंही, सिंहीण-स्त्री सिंहाची मादी

सिहतखाना—पु १ आरोग्यखातें -थाने शि व ९९ २ दवाखाना [ अर सिहत्खाना ]

सिंहधार-स्त्री ( वे ) लिंगायताचें जानवें

सिहाड—न मोठा आर्त स्वर 'बोभाती सिहाडें उठिलीं। अपरें सिमेचें।' -शिशु २ ११ २६

सिहाणा-ना—वि ( महानु ) शहाणा 'सिहाणेआ देश विगोवा।' -शिशु १५३ [ सं सज्ञान ]

सिंहानक—पु घोड्याचा एक रोग, शिंगाडा -अश्वप २ ३३

सिहार—न शेराचें लाकूड सीहार पहा -शर

सिळा, सिळापाका-बाजार-विक्रा-वेळ, सिळा सप्तमी, सिळोरा—'शि' मध्यें पहा

सिक्ष—पु शिष्य 'व सिक्षासि हि वक्रें काहिं इ०य।' -पंच ५१ [ स शिष्य ]

सी—वि तीन -शिचप्र १०८ [ फा सिह् ]

सीक—स्त्री शिक्षा, शीक पहा 'आतां नवारें लावीन सीक।' -उषा ५४ -एभा २४ २४०

सीकल—वि परजलेलें, शिकल पहा 'जैसें खड्ग सीकल होता। मग भय कायतें शत्रु जिंकिता।' -नव १० ३७

सीख—शीख पहा

सीग—शीग पहा 'कृष्णप्रभेचें रूपारि आली। वरवपणा सीग चढली।' -एरुस्व ७ ६

सीगट—न शिगट पहा 'मणी होता सीगटाचा।' -दा ५ ६ ६२

सींगवट-टी—स्त्री ( महानु ) ( ल ) शृंगाररचना 'ये मोथळेचा हार्टी। शरीराची करूनि सींगवटी।' -भाए ४०६ [ शृंग सींग+वट प्रत्यय ]

सीण—पु कष्ट; शीण पहा 'वक्ता अधिकारेंवीण। वक्तृत्वाचा करी सीण।' -दा २ १० ११

सीत—सर्व अर्थी शीत पहा १ शडी 'पिडा होते सीतें खटपट जनीं दत बसती।' -दावि २२४ २ ज्या धनुष्याची दोरी 'सीत लाऊन सोडिला बाण।' -जै २०.११९ ( वाप्र )

**सीतापुढें मीठ खावप**-(गो) कामाच्या आधींच त्याविषयीं बोंब मारणें

**सीतरणें**—क्रि फसविणें, ठकविणें. 'सीतारोनी नाना जन। पाशी उदर आणि शिश्न।' -मुवन १० १४९

**सीता**—स्त्री १ रामपत्नी, रामायणातील नायिका, पंच कन्यांपैकीं एक २ स्वर्गांतून मेरुपर्वतावर पडल्यानंतर गंगेचे जे चार प्रवाह झाले त्यांपैकीं पूर्वेचा प्रवाह बाकीचे तीन म्हणजे अलकनंदा, भद्रा व चक्षु ३ वृक्ष, वनस्पतिदेवता ४ (सांकेतिक) अर्धा रुपाया, अधेली [स] **म्ह॰** १ सीता कीं संग्राम =(सीता दे किंवा लढण्यास सिद्ध हो असा रावणास रामाचा निरोप) कठीण अटी असल्यावेळीं हा प्रयोग वापरतात २ (व.) सीता गेली वनवासा, मला लागली कर्कशा=चांगली गेली व कैदाशीण आली **॰चवरी** स्त्री चवरी (वनस्पती) चा एक प्रकार **॰देवी** स्त्री पीक काढतांना महारासाठीं तसाच राखून ठेवलेला पिकाचा भाग काहीं ठिकाणीं खळ्यावरची रास नेल्यानंतर तेथें जें धान्य राहतें त्याला म्हणतात या धान्यावर महाराचा हक्क असतो **॰फळ-ळी**-स्त्री न एक फळझाड व त्याचें फळ **सीतेचा पोल्हारा**-एक प्रकारची मोठी कवडी, कवडा **सीतेचे पोहे**-न एका जातीच्या गवताचें बी

**सीत्कार**—पु सुस् असा ध्वनि, दु खाचा हलका ध्वनि, दात मिटले असता आत वारा ओढून काढलेला आवाज [स ध्व]

**सीत्कारणें**—क्रि फेंफणें, धुडकावणें 'मोटका काळासीं सीतकारी।' -भाए ४५९ [छित्+करणें]

**सीधा**—वि १ सरळ २ प्रामाणिक, निष्कपटी ३ विना दु ख-संकट 'आता तू इथून कशी सिधी सुटतेस तें मी पहातों।' -स्वप ३५४ [हिं] **सीधे वारस**-पु अव. बापानंतर मुलगा याप्रमाणें वारस, याच्या उलट तेढेवारस 'पेशव्यानीं सीधे वारस व तेढेवारस याजकडे इनामें चालविल्याबद्दल उदाहरणें आहेत' -इनाम १०१

**सीनसाळ**—सिनसाळ पहा

**सीना**—पु (जंबिया खेळ) आपल्या हातातील जंबियानें जोडीदाराच्या छातींत मधोमध मारणें [फा सीना=छाती]

**सीम**—वि १ तिसरा -रा ८ ९५ २ तिसरी प्रत, कनिष्ठ (जमीन) 'सबब हल्लीं जमीन अवल दूम सीम तिही प्रतीची' -वाडसमा १ ३७, -वाडबाबा १ २०३ ३ तिसऱ्या दर्जाचें, रेशमाची एक जात -मुव्या ९६ ४ (विणकाम) जरीच्या काठाची एक जात [फा सिवुम्]

**सीन**—स्त्री सीमा पहा 'तेणें होय देहधर्म। तदनंतर पुरे सीम।' -वि उ ७८६

**सीमंत**—पु १ केंसांचा भाग, स्त्रियाची विशिष्ट केशरचना २ सीमादर्शक चिन्ह, सीमेचा शवट [स] **॰पूजन, सीमंती**-न स्त्री सीमांतपूजन पहा 'मग सीमंती आली। वरा वस्त्रें वोपिलीं।' -कालिका ६ ८ **सीमंतोन्नयन**-न एक गर्भसंस्कार, सोळा संस्कारांपैकीं एक सातव्या आठव्या महिन्यात करतात. काटयानीं भांग विंचरण्याचा विधि 'मग सातवें मासीं सीमंतोन्नयन।' -स्वानु ५ २ १८ [सीमंत=भांग+उन्नयन=विंचरणें]

**सीमा**—स्त्री १ मर्यादा, हद्द, अवधि (देश, ग्राम, काल इ॰ चा) 'जेणें चैतन्या ईश्वरा ब्रह्मा। देहचि केलें परमसीमा।' -ज्ञा १८ ३८२ २ (ल) आधिक्य, अतिरेक, कळस, पराकाष्ठा पहा 'येथें बोलण्याची जाली सीमा।' -दा १० ८ २६ ३ (ल) अतिशय समृद्धि पुरेपूर, रेलचेल 'त्यावर्षी पर्जन्यानें मोठी सीमा केली' [स] **॰सांडणें**-क्रि मर्यादा सोडणें, सीमेपलीकडे जाणें 'तेथें येशकीर्ति प्रतापें। सीमा सांडिली।' -दा १५ २ २१ **॰सूत्र**-न (भूमिति) परिमिति, परिसूत्र, परीघ **सीमांत-पूजन-पूजा**-नस्त्री १ नवरदेवाची गावच्या सीमेवर किंवा देवळात किंवा त्याच्या घरीं जी पूजा करतात तें, श्रीमंतपूजन 'राव समोर गेला त्यासी। केलें सीमांतपूजेसी।' -एरुस्व ५ ३२ २ ज्येष्ठ अमावास्येला बाराबलुतेदारांनीं गावसीमाना द्यावयाची भेट **सीमोल्लंघन**-न १ गावसीमा ओलांडणें, गावाबाहेर जाणें २ विजयादशमीस समारंभानें अवश्य करावयाचा किंवा श्राद्धादिदिनीं न करावयाचा सीमा ओलांडण्याचा विधि [सीमा+उल्लंघन]

**सीमूर**—वि (महानु) उद्धट (स्त्री) -दृष्टांतपाठ १६

**सीयाळी**—स्त्री (महानु) थंडी -स्मृतिस्थळ [स शीतकाल]

**सीर(री)गिरी**—स्त्री (महानु) एक प्रकारचें छत्र 'पालव छत्रें सीरगिरिआ नाहीं तेथ अनु।' -धवळे पू ३४ [श्रीगिरि]

**सीरणें**—न (महानु) साम्य, बरोबरी 'कोवळीक घाली सीरणें। शिरीष पुष्पासी।' -भाए २६

**सील**—पु (हिं) पाटा [स शिला]

**सील-ला**—न चिलखत 'सीलवर मारा न चाले जरा।' -ऐपो १९ 'महावाक्य सीला अखंडीत त्यालें।' -मध्व ३०९ [अर सिलाह्]

**सीलद्री**—स्त्री (महानु) एक प्रकारचें भारी उगडें, शेलारी 'तव सीलद्रिया आणिले अनेक वस्त्रें आळकारू।' -धवळे पू ७६

**सींव**—स्त्री सीमा, मर्यादा, हद्द; शींव पहा [स सीमा] **॰शेजारी**-पु हद्दीवरचा, शेजारी

**सीवकारा-रू**—पु (महानु) शिदकावा, शिंपडणें 'देइजे कस्तुरिअेचा सींवकारू।' -शिशु

**सीवणा**—पु स्वप्न 'दिठीं देखिला सीवणा साचवेना। सुतेलें तया माखिती सीसहीना।'–मुराअयोध्या ७९ [स प्रा]
**सीवन**—न शिवणें, दोरा घालणें [स ]
**सीवन**—स्त्री शिश्नमणीच्या कातड्यावरील शिवण [स ]
**सीवा**—स्त्री (व ) तिफणीच्या दात्यातील मधली जागा
**सीस**—न डोकें, मस्तक 'परि साचचि महामोहाचिये पुरीं। बुडालेया देखोनि सीसवरी।'–ज्ञा ११ ४९ [स शीर्ष; प्रा सीस] ०फूल-न (डोक्यातील) एक दागिना, शीसफूल –वेसीस्व ९ १२९
**सीस, सीसक**—न शिसें पहा
**सीहार**—न शेराचें लाकूड –तुगा १८८१
**सीक्षणें**—क्रि शिक्षा करणें –दावि ४२१ [सं शिक्षण]
**सु**—अव्यय चांगला, बरा, उत्तम यासर्थी नामादिकांच्या मागें लागणारें अव्यय जसें–सुपुत्र, सुरूढ [स ]
**सुआर**—पु आचारी, स्वयपाकी 'कीं सुआरासीचि अन्न घरीं। देरा नोहे।'–ज्ञा १७९० [स सूद्=शिजणें] **सुआ चर्णें**-सक्रि सेवन करणें
**सुइजणें, सुजणें**—सक्रि कार्यप्रवृत्त होणें (जमीनीत नागर वगैरे) घालणें 'सुइजताती नागर काई।'–अमृ ५ ६५ २ माड, पोफळ इ० झाडातून पानाचा कोंब निघणें [स सु=प्रसवणें]
**सुई**—स्त्री लहान दाभण; कपडा इ० शिवण्याचें साधन [स सूची, मैंनि सुव] म्ह० १ सुईचे अग्रीं मृत्तिका २ जिकडे सुई तिकडे दोरा
**सुई(यी)ण**—स्त्री क्रियाची प्रसूति सुलभपणें करवून पुढील बाळंतपणाची खटपट करणारी स्त्री [स सु=प्रसवणें] म्ह० (व) सुइणीपुढें पोट लपत नाहीं ०पण-णा-नपु सुईणीचें काम
**सुपर, सुपरणें सुपरतुला**—सुनेर इ० पहा
**सुक**—स्त्री (कारवारी) एक वृक्ष
**सुंक**—पु (कु ) मधमाशीचे नांगीचा काटा
**सुकट**—स्त्री वाळलेला मासा, वाळलेला बोंबील –वि सुकलेलें, वाळलेलें [स शुष्क] ०णें-अक्रि वाळणें, शुष्क होणें ताजेपणा निघून जाणें **सुकटा-ट्या**-वि सुकट (-वि) पहा **सुकटी**-स्त्री वाळलेला माशांचा सुरा, सुगा
**सुक(ख)ड-डी**—स्त्री पुरा झालेला व सुकलेला नारळ –वि सुकलेला [सं शुष्कल] **सुक्ड-ड्या**-वि सुकटा-ट्या पहा **सुक्डा**-पु हिरवट रंगाचा अंगावर खवले नसलेला मासा **सुकडा-सुकडोजी**-वि आजारीपणानें वाळलेला (माणूस)
**सुकडी**—स्त्री (महानु) कस्तुरी 'सर्वांगें बाहाळाति परि मळें। सुकडिचेनि।'–ऋ ७१ [म सुकाट²; सुखड=चंदन]
**सुकणा**—पु (कु ) एक जातीचा पक्षी **सुकणें**-अक्रि १ वाळणें, शुष्क होणें; ओलावा नाहींसा होणें २ नदी, खाडी इ० मधील पाणी कमी होणें, पात्र कोरडें पडणें ३ आजारीपणामुळें शरीर क्षीण होणें, वाळणें [स शुष्=वाळणें] म्ह० (गो ) सुकलेलें पान न्हय झालेले सांग=निरुपयोगी माणसास भलतेंच काम सांगणें **सुकणावळ**-स्त्री सुकल्यामुळें झालेली द्रवपदार्थाची खराबी **सुकतळ**-न जोड्यात पावलाचा घाम शोषून घेण्यासाठीं घातलेला चामड्याचा तुकडा, घामोळें, खोगिराच्या खालचें घामोळें, अंगरखा इ० कामध्यें कांखेंत असल्या प्रकारें घातलेलें जोड कापड [सुकणें+तळ] **सुकताव**-पु भांडें सोनें तापवून द्रवानें आपोआप थंड होऊं देण्याची क्रिया याच्या उलट पाणताव (पाणी ओतून थंड करणें) [सुका+ताव] **सुकती**-स्त्री नदी, समुद्र इ०ची ओहोटी, पात्र कोरडें होणें **सुकती भरती**-स्त्री समुद्र इ० चें पाणी उतरणें व चढणें **सुकवडा**-पु उडदाचे पिठात मिरें, गुळ, हिंग इ० घालून तळलेला वडा **सुकवण**-न १ धान्य इ० सुकविणें, वाळवण २ वाळविण्याची मजुरी –स्त्री जीर्ण स्थिति, अशक्तता **सुक(ख)वत**-स्त्रीन. वाळलेलें केळीचें पान **सुकवणी**-स्त्री १ क्षयरोग, क्षीणता २ (व ) एक प्रकारची गवती चटई **सुकविणें**-सक्रि १ वाळविणें २ (ल ) निस्तेज करणें –मोश्री ४ ३९ **सुकर्वे**-न (वी ) करपलेलें पीक, वाळलेलें शेत **सुका**-वि १ सुकलेलें, वाळलेल २ (ल ) लाभरहित, उत्पन्नरहित, पोकळ, निरर्थक, अर्थहीन, कसहीन ३ कोरडा, जेवणाशिवाय (पगार) [स शुष्क, तुल० मैंनि शुको] **सुका फूल**-न एक जातीचें फळ, मिसी **सुकाट**-न (कु ) वाळविलेला कोळवी जातीचा एक मासा, सुगाट **सुकाट(ठ)णक**-वि कोरडा ठणठणीत (जमीन) **सुकाड**-पु १ सुकाट पहा २ शेतांतील पाखरासाठीं उभें केलेलें बुजगावणें **सुकाताव**-पु १ भुकेमुळें होणारा पोटाचा भडका, भुकेमुळें होणारी व्याकुळता २ शुष्क पाहुणचार, निरर्थक फेरफटका, साफ नाकुली, खरडपट्टी; घसमुसळेपणा (क्रि० देणें, बसणें) ३ सुकताव पहा **सुका दुक(ख्का)ळ**-पु पावसाच्या अभावामुळें पडलेला दुष्काळ **सुका लफडा-डें**-पुन निरर्थक व्याप, त्रास, अडचण, भांडण इ० **सुकाळें**-न (गो ) सुकें मळें **सुकी(कें)कळ सुकेळ**-न सोलून तूप लावून वाळविलेलें केळें **सुकी(खू)परूज**-स्त्री कोरडी, पू नसलेली खरूज **सुकेड**-स्त्री (राजा ) वाळलेली बाजू जागा [सुका+कड] **सुको जामोर**-(गो ) फायद्याशिवाय काम करणें **सुक्या**-वि (रत्ना) सुका पहा **सुक्यो पोळयो**-(गो )हवेतील बगले मनचे मांडे
**सुकद**—पु कांदा इ० भाजी [सं ]
**सुकर**—वि करण्यास सोपें; सुलभ, सहज मिळविण्यासारखें [स सु+कृ] ०णें-सक्रि आनंदविणें

**सुकरगुजारा**—पु आभारप्रदर्शन [फा शुक्र+गुजारी]

**सुकर्मा**—पु १ सत्तावीस योगांतील सातवा योग २ देवाचा एक कारागीर [स]

**सुंकलें**—न लहान मुलगा, मुलगी यांच्या कानात, नाकात घालावयाचें सोन्याच्या तारेचें लहानसें वेटोळें प्रथम यानेंच भोंक पाडून मग तें आत ओंवतात [स शृंखला]

**सुक्सुक**—स्त्री (ना) सुगावा

**सुक्ळ**—पु सुकाळ, सुगी, स्वस्ताई [स सुकाल]

**सुकळास**—क्रिवि सुकर पहा सहजगत्या, सहज, मोकळेपणें, आपोआप [स सु+क्लेश]

**सुका**—पु (ल) तवाखू

**सुकाण-णूं**—न गलबत विवक्षित दिशेस वळविण्याचें त्याच्याच मागच्या बाजूस पाण्यात असलेलें एक साधन कर्ण [स सुकर्ण, अर-सुक्कान] **०दार-गीर, सुकान्या(ण्या)**-पु १ सुकाणू धरणारा, कर्णधार २ (ल) पुढारी, मुख्य, नायक. **०यारी**-स्त्री सुकाणू फिरविण्यासाठीं लावलेली दोरी **सुकाणूची दांडी**-स्त्री सुकाणू फिरविण्याचा दांडा

**सुकाळ**—पु १ चांगला पाऊस पडून भरपूर धान्य आलेले दिवस दुष्काळाच्या उलट काळ २ समृद्धि, विपुलता, सुबत्ता [स सु+काल] **०पुरा**-पु अत्यंत विपुलता (धान्य, पाऊस, नफा इ० ची) [सुकाळ+पुरा] **०सौदा**-पु अत्यंत स्वस्त मालाची देव घेव (विशेषत नुकसानीचा दर्शक म्हणून योजतात) म्ह० सुकाळसौदा आणि हगवणीस काळ **सुकाळ्या**-वि १ अत्यंत विषयासक्त, कामोत्सुक (पुरुष, स्त्री) २ सुखार्थ वारंवार दुसऱ्या पुरुषापासून मैथुन करून घेत असावें अशा स्वभावाचा (पुरुष, स्त्री, नपुंसक)

**सुकीर-सुक्र, -कर**—पु (अशिष्ट) शुक्र तारा [स शुक्र]

**सुकीर्ति**—स्त्री चांगला नावलौकिक -वि चांगल्या नावा लौकिकाचा, कीर्तिमान [स]

**सुकुडदुम**—अक्रि (ना) घाबरणें, गर्भगळणें, सर्द होणें, पाचावर धारण बसणें [सुकुड=सुकणें, दाबणें, आवरणें+हि दुम=शेपटी]

**सुकुंडो**—पु (गो) घुला, सुरवट नावाचा किडा, कुसुडा

**सुकुमार**—वि नाजूक, कोमल, कोंवळा [सं]

**सुकुरउडो**—पु (गो) शकुनउडा

**सुक्का**—पु पत्र, चिठ्ठी, हातरोखा [फा रुक्का]

**सुकृत**—न १ पुण्याईचें कृत्य, सत्कृत्य, पुण्यकार्य, देवता संतुष्ट करण्यासाठीं करावयाचें कर्म (यज्ञ, याग इ०) २ पुण्य, सद्गुण वि पुण्यवान, सद्गुणी [स] **सुकृती**-वि पुण्यवान, धार्मिक कृत्यें करणारा, नीतिमान

**सुक्ता(सूक्ता)सुक्त(सूक्त)**—वि भलेंबुरें, बरेंवाईट, न्याय्य अन्याय्य, सदसत्, वेळावेळ, शब्दाशब्द, सव्यापसव्य 'चौघांमध्यें सुक्तासुक्त बोलू नये समजून बोलावें.' [स सुक्त+असुक्त]

**सुक्ती**—स्त्री (व) पाथरवटाचा दगड फोडण्याचा लहान हातोडा सुतकी पहा

**सुख**—न समाधान, मनास वाटणारी स्वस्थता, आराम, आनंद, चैन, अनुकूल अनुभव, शांतता व विश्रांति; करमणूक व उपभोग, शांति (समासात) आत्म-रति-विषय-इंद्रिय-सुख (समासात पूर्वपदीं-विशेषणार्थी) सुखकर, सुखसाध्य, सुखवाच्य इ० [स.] म्ह० सुखच मे शयनच मे-चैनींत राहून झोपा ताणणें (ग्राम्य) **सकलसुखसंपत्तिवसति**-सर्व प्रकारच्या सुखाची व समृद्धीची खाण (खुषमस्करी किंवा हितचिंतनाच्या वेळीं उपयोगांत आणावयाचा शब्द) **सुखाचा विचार**-पु समाधानाची कल्पना **सुखाचा भाऊबंद-भागी-घाटेकरी-सोबती**-पु शालुसोबती, ताज्या घोड्यावरील गोमाशा केवळ चैनीच्या वेळच्या सोबती **सुखाचा शब्द**-पु गोड, सभ्य भाषा; मन स समाधान वाटेल असें भाषण, मृदु भाषण **सुखानें सुखें-सुखें=सुखेनैव**-क्रिवि आनंदानें, तत्परतेनें, अंत करणपूर्वक, सहजरीतीनें **सुखास पडणें-येणें-वाटणें**-सोपें, होणें, बरें वाटणें. सामाशब्द- **०कर-दायक-सुखावह**-वि सुख देणारें, **०ढाळ**-पु फार त्रास न देणारें जुलाबाचें औषध व त्यामुळें होणारा जुलाब [सुख+ढाळ] **०दु खभोक्तृत्व**-न संसारिकास किंवा जीवात्म्यास भोगावे लागणारे सुखदु खाचे अनुभव **०निद्रा**-स्त्री गाढ झोंप **०प्रसव**-पु विनाआयास होणारी प्रसुति **०भाक्-भोगी**-वि १ सुखी, सुखें भोगणारा, सुखाचा वाटेकरी २ अत्यंत विषयासक्त **०भाग**-पु सुखकारक, सोपा वाटा, टेवा **०मास**-पु समृद्धीमुळें शरीर सुर्णे (क्रि० येणें, चढणें) **०रीण**-न जरूरी नसता चैनीसाठीं काढलेलें किंवा सुखानें, सोईनें फेडता येईल असें कर्ज **०रूप**-वि सुखी, खुशाल, संकटरहित -क्रिवि कांहीं त्रास किंवा अडथळा न होता; सुखानें सुरक्षितपणें, सुखेनैव **०वंत**-वि सुखी **०वस्ती**-स्त्री १ कोठेंहि सुखानें राहणें, मुक्काम करणें २ वतन, जमीन, वतनवाडी, कामधंदा यासंबंधाची काळजी मागें नसून केवळ पूर्वार्जित धनसंचयावर कोणत्याहि गांवीं चैनीखातर राहणें -वि सुखवस्तू श्रमरहित जीवन कंठणारा, जीवनाकरितां परिश्रम करावे न लागणारा **०वास**-पु सुखवस्ती अर्थ १ व २ पहा **०वासी**-स्त्री (व) गवती चटई (बसण्याची) -वि सुखवस्ती (-वि) पहा **०विणें**-अक्रि सुख देणें आनंदित करणें **०शयन**-न **०शेज**-स्त्री १ (शृंगारिक काव्य) चांगला पलंग, अंथरूण इ० २ सुखकारक झोप **०शय्या**-स्त्री सुखशयन अर्थ १ पहा

२ परलोकीं सुख व्हावें म्हणून ब्राह्मणास दान करावयाचा पलंग, बिछाना इ०, मृतशय्या पहा ०संतोष-समाधान-पु न आनंद आणि शांति, स्वास्थ्य व सुखोपभोग, विश्रांति आणि तृप्ति ०संतोषानें-क्रिवि १ आनंदीपणें २ स्वेच्छेनें, स्वतःच्या राजीखुशीनें, मकलहुपारीनें, कोणाच्या जबरदस्ती शिवाय ०सोहळा, सुखाचा सोहळा-पु विवाह मुंज इ० प्रसंगीं करावयाचें न्हाणें माखणें, मिरवणूक, अलंकारधारण, प्रीति भोजन इ० (क्रि० भोगणें) ०स्पर्श-वि ज्याच्या स्पर्शापासुन आनंद मिळतो असा सुखागणें-अक्रि १ केवळ चैनींत गुरफटणें, सुखातच मग्न राहणें (निंदार्थी), हालअपेष्टा सोसल्यानंतर सुखी बनणें [सुख+अग] सुखाचा धनी-प्राणी-जीव, सुखानंद-पु १ सुखासमाधानांत आयुष्य घालवणारी व्यक्ति, सुखानें निर्वाह होणारा माणूस २ दयाळु स्नेहाळु पुरुष सुखाचा वाटा-पु सुखमय स्थिति, ठेवा (क्रि० उचलणें, घेणें, भोगणें) सुखाचा वारा-पु १ संतोषदायक बातमी, वार्ता २ गोड, सुखकारक शब्द, बोलणें, सुखाचा शब्द सुखाची आईबाई-स्त्री ऐश्वर्यातील सहचारिणी, सुखापुरती झालेली मैत्रीण सुखाची घडी-स्त्री सुखदायक वेळ, प्रसंग (क्रि० येणें, उगवणें, चालणें) सुखाची भाकर-री-स्त्री सुखकारक उद्योग, विनात्रासाचा धंदा, नोकरी किंवा अशा परिस्थितींतील सुख सुखाचें माहेर-न सुख मिळण्याचें ठिकाण, आजोळ, आनंद देणारी जागा 'वक्षस्थळ तैसें रुदावलें । सर्व सुखाचें माहेर ।' सुखाचें शरीर-न सुखोपभोगानें पोसलेलें शरीर, निरोगी काया सुखाड-न सुख -वि सुखकारक सुखा(खा)डणें-अक्रि (काव्य) सुख पावणें, आनंदात गर्क होणें, फार संतुष्ट होणें 'निजसुखें सुखाडला ।' सुखादु:खाचा सोबती-सोबतीण-पु स्त्री जिवलग मित्र, नवरा, जिवलग मैत्रीण, बायको सुखानुभव-सुखानुभूती-पु स्त्री सुखसंतोषाची जाणीव सुखानुभव-वि सुखाचा अनुभव घेणारा सुखापा(वा) सुखोपा-पु सुख, शांति सुखापुरी-पु एक गोसाव्याचा पंथ, (निंदार्थी) आनंदी मनुष्य चैनी, सुखी इसम [सुख+पुरी] सुखार्थी सुखेप्सी-वि सुख इच्छिणारा सुखावणें-अक्रि सुखाडणें पहा, आनंद पावणें, सुखाची चट लागणें व त्यामुळें आळस उत्पन्न होणें सुखावह-वि सुखकर सुख देणारें सुखाविणें-सक्रि सुखी व समाधानी करणें, आनंदीच्या संतुष्ट करणें सुखासंतोषानें-संतोषें-समाधानानें-क्रि वि सुखसंतोषें पहा सुखासन-न सुखानें बसतां येईल अशी पालखी, मेणा इ० वाहन सुखासुखी(खीं)-क्रिवि १ सुखसंतोषें पहा २ उगाच, निष्कारण सुखास्वाद-पु सुखाचा उपभोग -वि स्वादिष्ट पणाचा, चवीचा सुखिया-वि १ सुख भोगणारा, सुखी २ समाधानी, संतोषी, आनंदी, चैनी; मौजा मारणारा सुखीस्वभाव-पु समाधानी स्वभाव सुखें सुखेनैव-क्रि वि १ सुखानें सुखसंतोषें पहा २ अनायासें सुखोत्पत्ति-स्त्री १ सुखाचा उदय २ सामान्यतः सुख, चैन

सुखट-सुखटणें-सुखड--सुकट इ० पहा

सुखणावळ-सुखणें-सुखताव-सुखती--सुकणावळ इ० पहा

सुखरुज--स्त्री सुकी खरुज

सुखवत--स्त्री (को) सुकवत पहा

सुखवशी--स्त्री सुकवशी पहा

सुखा--पु मावस वि सुका पहा शुष्क [स शुष्क] ०ड-स्त्री कोरडी जागा ०डी-स्त्री कोरड, शुष्कता, वाळलेली स्थिति ०रखा-वि शुष्क, कोरडा

सु(स)खुन--पु शब्द, वचन [स शकुन, फा सुखून]

सुखुस--वि (गो) रुचकर, चवदार

सुगई--स्त्री सुगी पहा

सुगट--न (गो) मिगा जातीचा मासा

सुग(घ)ड--न लहान मडकें [स सु+घट]

सुगड-डा--वि चतुर, कुशल, शहाणा

सुगणें--सक्रि वास घेणें, हुंगणें [स सु+घ्रा, फ्रें जि सुग]

सुगति--स्त्री १ सुखासमाधानाची स्थिति २ उत्तम गति मोक्ष [स]

सुगंध--पु सुवास, चांगला वास [स] ०क, सुगंधिक-वि मधुर वासाचें, सुवासिक ०मार्जार-न जवादी मांजर ०मूली-स्त्री कचोरा, आंबेहळद ०मृग-पु कस्तुरीमृग ०राज-य-पु एक जातीचें सुगंधी तेल सुगंधि पु सुवास -वि सुवासिक सुगंधिक(त)-वि सुवासिक सुगंधिद्रव्य-न सुवासिक औषधें वस्तु इ० सुगंधी-पु सुवासिक वस्तु अत्तरें इ० विकणारा, गंधी ०सुगंधेल-न अत्तर.

सुगम--वि १ सोपें, सुलभ, साध्य करण्यास, मिळविण्यास सोपें २ फारसा त्रास न देणारें (औषध) ३ समजण्यास सुलभ (पुस्तक) [स]

सुगर--वि सुगड (-वि) पहा [सं सुघड] ०ण, सुगरीण-स्त्री १ एक जातीचा पक्षी २ एक जातीचें जंगली झाड ३ चांगला स्वयंपाक करणारी स्त्री ४ (व) खळवाडीतील गवताच्या काडाची केरसुणी खराटा -वि सुगर, निष्णात (सुगरीनें पुरणावरहि लावतात) सुगरणीचें घर-न सुगरीण पक्ष्याचें घरटें सुगरीण, सुगराई सुगराचा पणा-पु स्त्री हुशारी, दक्षता, कौशल्य, चतुराई सुगरावा-पु थाटमाट 'जयाचा सुगरावा देखे।'-ज्ञा १३.८१२ इ० (व) सुगरीण सातांची शवदातीं

ळल्या हाताची=मोठी सुगरीण पण घर स्वच्छ ठेवतां येत नाहीं अशी स्त्री

सुगराई—स्त्री (संगीत) गायनातील एक राग [ हिं ]

सुगरात—पु (गो) स्वार्थ

सुगळ—वि चांगल्या मानेचा सुग्रीव (-वि) पहा [ सु+गळा ]

सुगाड—न (कु) वडपौर्णिमेस (सक्रांतीस ?) द्यावयाचें सुगडाचें वायन [ सं. सुघट ]

सुगावणें—अक्रि. अनुकूल होणें, इच्छेप्रमाणें होणें, सुलभ प्रकारें आढळणें [ सु+गावणें ] सुगा(वा)वा-पु शोध, तपास, तलास, पत्ता (हरवलेल्या, सापडावयाच्या वस्तूचा इ० ]

सुगी—स्त्री १ पिकाचा हंगाम २ समृद्धि, सुकाळ, सपन्नता (वि) सोंगणी (क्रि० सरणें, चुकणें) [ सं सुगति का सुगी] म्ह० मारी सुगी येम उगी ०सराई-स्त्री (व) सुगी व्यापकपणें

सुगुण—पु सद्गुण [ सं ]

सुगु(गू)म—वि सुगम पहा

सुगुरचा—पु (गो) पायगुण

सुगूर—वि (गो) सावध

सुग्रण, सुग्राई, सुग्रावा. सुग्रीण—सुगरण इ० पहा

सुग्राना, सुगुर्वा—पु शुभ शकुन

सुग्रास—पु उत्तम प्रकारचें अन्न, मिष्टान्न [ सं ]

सुग्रीव—पु किष्किंधेचा वानरराजा व श्रीरामाचा मित्र -वि चांगल्या मानेचा (सु+ग्रीव]

सुघटित, सुघट—वि १ चांगलें घडविलेलें, बनविलेलें, चांगल्या आकाराचें-घाटाचें २ बनविण्यास सोपें, सवघड ३ चांगलें जोडलेलें ४ चांगल्या योजनेचें, आखणीचें, मांडणीचें [ सं ]

सुघटी—स्त्री टाच -ज्ञा ६ १९२

सुघड—न सुगड (-न -वि) पहा

सुघडाई—स्त्री सुगराई पहा

सुघराणी—स्त्री सुगरीण पहा

सुचणें—अक्रि मनांत स्फुरणें, येणें, आठवणें, मनात आणणें निर्माण करणें [ सं सुच् ] सु(सू)चक-पु चहाडखोर माणूस -वि सुचविणारें, कल्पना करून देणारें सु(सू)चना-स्त्री प्रस्ताव, उपक्रमाचें ज्ञान सुचविणें, जाणीव देणें लक्ष्यात घेण्याची गोष्ट सुचविणें-सक्रि सूचना करणें, कळविणें, इषारा देणें माहीत करून देणें सुचें-न सूचना, इषारा

सुचरित्र—न चांगली, भलाईची वागणूक, आचरण -वि चांगल्या वर्तनाचा [सं] सुचरित्रा-स्त्री चांगली, सद्गुणी स्त्री

सुचिं(चिं)त—वि शांत, स्वस्थ, बिनत्रासाचें, निश्चिंत [ सं सुचित ] सुचित्त-वि १ सुचित पहा *२ दक्ष, सावध

सुचिन्ह—न चांगलें, शुभकारक लक्षण; शुभ शकुन, खूण

सुजगर—वि जागृत, जागा [ सं सु+जागर ]

सुजणी—स्त्री एक जातीचें लांबट व निमुळतें मोती

सुजणें—अक्रि १ फुगणें, फुगीर दिसणें २ अत्यंत लुब्ध, उत्सुक होणें ३ घालणें 'वाचूनि विकल्या सेतीं। सुजताती नागर काई।' -अमृ ५ ६५ ४ खाळवणें-शर म्ह० १ सुजलें सूत कोडयोळयास राजी २ (गो) सुजिलें तोंड हासुक उपकार ना रडूकय उपकार ना=जायबंदी वस्तु ठेवून उपयोग नाहीं व टाकूनहि उपयोग नाहीं सुजे मोठेपण-न (गो) १ मृत्यूच्या वेळची सूज (त्यावरून ल) २ अत्यंत निरुपयोगी वस्तु [ सं शाथ, हिं सोजना ] सुजट सुजकट-सुजोर-वि किंचित सुजलेलें, फुगीर सुजम(मि)रणें-अक्रि थोडेसें सुजणें सुजमीर-वि सुजट सुजरा(ला), सुजलेला-वि १ फुगीर, सुजणारा २ अत्यंत आसक्त, लुब्ध सुजलेंभूत-न सुजरा अर्थ २ पहा सुजी-स्त्री सूज

सुजन—पु सज्जन; सुज्ञाण, सुस्वभावी माणूस [ सं ] ०ता-त्व-स्त्रीन चांगुलपणा, सज्जनपणा, सभ्यता

सुजना—पु दाभण, टोंच्या [ फा सोज़न्=सुई ]

सुजनी—स्त्री १ गर्भरेशमी सुती कापड २ पांघरण्याची दुलई

सुज्ञाण—वि सुज्ञ बुद्धिवान, तडफदार, चलाख [ सं सुज्ञ ]

सुझणें—अक्रि १ सुचणें, समजणें २ दिसणें 'किंबहुना सुझे। स्वर्गवरी।' -ज्ञा १४ १५६ ३ राहणें -शर [ सं सूचना ]

सुटक—न सुचिन्ह -वि १ शुभकारक 'या नाव गा निज नैष्ठिक्य। ब्रह्मचर्य अति सुटक।' -एभा ३ ४४९ २ पाणीदार तीक्ष्ण, जहाल. 'अति सुटक दळभार।' -एरुस्व ५ ४०

सुट-कन-कर-दिनीं-दिशीं—क्रिवि सुट् असा आवाज होऊन, झटकन, फटकन, तडकाफडकी, झटदिशीं [ ध्व ]

सुटकणें—क्रि १ चटकन् निघून जाणें, सटकणें पहा [ हिं छुटकना ] सुटका-स्त्री १ मुक्तता, मोकळीक २ प्रसूति, बाळंत होणें [ हिं छुटका ] सुटगाठ-स्त्री सुरगाठ पहा सुटणूक-स्त्री मुक्तता सुटणें अक्रि १ मोकळें होणें, स्वतंत्र होणें, बंधन-करार-दाव-त्रास-घोटाळा इ० तून मुक्त होणें २ अलग होणें, विभाग पडणें, गांठ-संबंध-संगत इ० मधून मोकळें होणें, विलग, वियुक्त होणें ३ भागणें, फुटणें ४ उद्भवणें, फुटणें; बाहेर पडणें (घाम, कफ वगैरे), पाझर फुटणें, वास येणें; भीति राग-रोग जुलम-अरिष्ट इ० चा प्रादुर्भाव होणें, वारा-पाऊस इ० सोसाट्यानें वहाणें, आग-वणवा पेटणें ५ बैल-घोडा भडकणें किंवा भरधाव पळणें,

दाय-बंधन नसणें, मोकाट धावणें, स्वैरपणें सचरणें, एखादें काम-धंदा इ० करण्यास बदरकारपणें सुटून पडणें, मनमुराद व बेमुर्वत पणें एखादें कृत्य करीत सुटणें 'तो मारीत-शिव्या देत-बोंब ठत-पळत-सुटला' ६ बार होणें, उडणें, स्फोट होणें (तोफ बंदुक इ० चा) ७ मर्यादेबाहेर मोठें होणें, वाताने फोपसें होणें (पोट भंग) [स भ्रट्] सुटला-वि (व) पाल्हू (माणूस) सुटल्या सारखा-वि आधाशी सुटसुटीत-वि चपळ, मोकळाचाकळा, मोटकन्दा, आस्तुद व बांधसूद, हलका व मज बूत, तडफदार व चलाख (माणूस, शरीराचा बांधा), टुमदार व छोटें (घर), सोईस्कर व मर्यादित, आटोपशीर (काम, धंदा) ल्हान पण व्यवस्थित बोजड नसलेलें सुटा-वि १ ढिला, मोकळा, अलग न गुंतलेला २ बंधनरहित, घर न बसविलेला, लोंबता, हालत असलेला ३ गर्दी नसलेला, विरळ, फार, अंतर पडलेला ४ एकटा, वेगळा, निराळा ५ न अटकलेला, कामात नसलेला ६ मुक्त सुटलेला (कर्ज इ० मधून) हाताचा सुटा=उदार सुटाऊ-स्त्री (कु) वाईट चालीची स्त्री सुटावणें-अक्रि १ सुटणें, मोकळा होणें, विरळित होणें, ढासळणें (गवताचा भारा, गज इ०) २ ओलीनें फुगोटा येणें (मातीची भिंत इ० स); वाढणें, सुजणें मोठें होणें (पोट इ०); चैनीनें शरीर फोपसें, स्थूल होणें ३ जागेवरून घसरणें (सुवई इ०) सुटा स्वर-पु (संगीत) ज्यावर गायक थांबून रागरक्ति वाढवितो तो स्वर सुटिक-का-स्त्री १ (काव्य) सुटणूक, सुटका २ वर्षाव, वृष्टि 'पर्जन्याची सुटिका जैसी।'-ज्ञा ११ ६८६ सुटी-ट्टी-स्त्री मोकळीक, रजा (काम अभ्यास इ० मधून) कामास टाळा, नागा दिवस [हिं छुट्टी] सुटी करणें-(कु) नीट करणें, निवडणें (धान्य) सुटुक-न (व) ल्वाड सुटुबुटु-स्त्री निरर्थक हालचाल रिकामी चुळबुळ (क्रि० लावणें, मांडणें करणें) -क्रिवि आळसानें मागेंपुढें करून, निरर्थक प्रकारें सुट्टा-क्रिवि (व) पहिल्यानें, प्रथम 'पहिले सुट्टा तो माझ्या घरीं आला सुट्टी बाहेरील टांग-स्त्री (मल्लविद्या) कुस्तीतील एक पेंच सुटयो-न १ (कों) वेळेवेळेस पुढें करणें, कर्जमोबद, ऋणमुक्तता २ -टा मुलाच्या खेळातील अर्थातून मोकळीक करण्याविषयीं आधळ्याचे डोळे सोडण्याविषयीं एक खेळ

सुट(ठ)र-रू रें, सुडार—न सुठीच्या आगीसारखी आग होणारें गळू उटाणू [सुठ]

सुटारा—पु धाण्याची सवय लावण्यासाठीं, बैलास ज्या खांबाभोंवतीं गरगर फिरावयास लावतात तो खांब [खुट]

सुठ—स्त्री वाळविलेलें आलें [स शुंठी] म्ह० सुंठीवाचून खोकला गेला=खटपटीवाचून वाईट गोष्ट सुधारणें, पीडा टळणें (साठा वर्षा) सुठ फुलणें-नदीव फळफळणें (गार्डीत) सुंठ फुंकणें-एखाद्याचें मन फिरविणें, कान भरणें, वियकाविणें ०वडा-पु बाळंतिणीस खाण्यासाठीं किंवा जन्मोत्सवाच्या वाटीं वाटण्यासाठीं केलेलें सुंठ, गुळ किंवा साखर इ० पदार्थाचें मिश्रण ०वणी-स्त्री सुंठीचा काढा ०साखर-स्त्री पित्तनिर सनार्थ खावयाचें सुंठसाखरेचें मिश्रण

सुडकणें—अक्रि हाटकण, हाटकन निघून जाणें

सुडका-कं—पुन १ जुनें वस्त्राचें फडकें, फटकूर चिंधी २ (निंदेनें) म्हातारा मनुष्य ३ फक्त लंगोटी जवळ असलेला माणूस -सुगा १८८१

सुडबुड—स्त्री सुदबुद अर्थ २ पहा ०णें-अक्रि उडबुडणें, चुळबुळ करणें, गोंधळ उडविणें (वदीर मुलें यानीं) सुड-बुडाट-पु गोंधळ, लुडबुड

सुडमुंडणें—अक्रि (व) डोक्यावरपांघरूण घेऊन निजणें.

सुडमे की मुंडमें—क्रिवि (व) अविचारानें, निकराबर येऊन

सुडसुडाट, सुडसुडीत—सुळसुळाट, सुटसुटीत इ० पहा

सुडा—पु (व) महकित्ता [हिं सराता]

सुडाघणी—स्त्री १ गर्जना, ध्वनी, गजर 'तव अनुहताची सुडावणी। दुर्गमयोनि उठली।' -एभा ६ १२९ २ सुरवात ३ मुक्तता -ज्ञा १२ ५४ [सुटणें]

सुडावणें—अक्रि कठीण काम करण्यास पुढें होणें, धाडसानें पुढें सरसावणें [सूड=शोध]

सुडी—स्त्री कणिसांसहित जोंधळा सजगुरा इ० धान्याच्या ताटांचा रचून ठेवलेला ढीग गंज गूड २ गवताची गंजी, भारा, पेंढी [स शाड]

सुढाळ—वि १ चांगल्या घडणीचें-रचनेचें, सुरेख सुंदर २ तजस्वी, चकचकीत पाणीदार (मोती इ०) [सु+ढाळ=तेज]

सुणगार—पु (बे) सुना भाजणारा

सुणा-णी-णें—पुस्त्रीन कुत्रा-त्री-त्रें [स श्वान] म्ह० (को) सुण्याक सिंहासनावर बसयलें, ताणें गोवरांत नडी घेतली. ०गाठ-स्त्री (कु) कुत्र्याच हडपूक

सुणा-णी णें—वि व्यर्थ, शून्य, निरर्थक [स शून्य]

सुणें—अक्रि रिघणें, शिरकाव करणें, घालणें 'न रिगावें तय करणें। तोंडें सुती।' -ज्ञा १३ १२४, -एमा २३ ५५४

सुत—पु १ पुत्र मुलगा २ (ल) राजपुत्र-कुमार, शिष्य 'तेय महशा-वयसमूर्ते। श्री निवृत्तिनाथसुतें।' -ज्ञा १८ १८०५ [स सु=वाळत होणें] सुता-स्त्री मुलगी

सु(सू)त—न १ दोरा, धागा सून २ नाकात (नथ-घालण्यापूर्वी भोंक रहावें म्हणून) घालावयाचा दोरा, धागा (त्या

वरून) ३ -नि सुताप्रमाणें सरळ नीट [ स सूत्र ] **सुतानें चंद्राला ओंवाळणें**-शुद्ध द्वितीयेच्या सध्याकाळीं भाविक लोक आपल्या वस्त्राचें सुत (दशा) काढून तें चद्राला अर्पण करतात आणि तू जसा पुन्हा नवा झालास तशीं आमचीं वस्त्रें नवीं होऊ दे अशी प्रार्थना करतात त्यावरून **सुतानें सुत लागणें**-एका गोष्टीच्या योगानें दुसरी गोष्ट समजणें (गो ) **सुतान डोंगर खेडायप**-डोंगराला सुत वेडणें **सुतानें स्वर्गास गाठणें-जाणें-चढणें**-एखाद्या गोष्टीचा यत्किंचित् अश समजल्यानें बुद्धिप्रभावानें ती गोष्ट पूर्णपणें तर्कानें जाणणें **सुतास लागणें**-सुरळीतपणें चालू लागणें **सुतासाठीं मणि फोडणें बरा वर नाहीं**-क्षुल्लक वस्तु बचावण्यासाठीं मूल्यवान वस्तूचा नाश करणें योग्य नाहीं **सुतासुतानें**-लहरीनें, कलानें **०काडी**-स्त्री (वोटी) सुत गुडाळावयाची काडी **०कुडें**-न (गो ) सुताचें गुडाळें **सुतड गोतड जुळणें-असणें**-एकमेकाचें गुत्य जमणें, (लावचा) सवध असणें **०णें**-अक्रि १ (व ) एखाद्या वस्तूभोंवतीं सुत गुडाळणें २ (ल ) मारणें, ठोकणें **०पुती-पुतळी**-स्त्री (कर ) १ कापसाचा ( जखमेवर लावावयाचा ) मणी २ स्त्रिया मगलागौर, शिवामूठ इ० पूजेमध्यें वस्त्राकरिता विशिष्ट आकृतीचा कापूस करून वाहतात ती **०पात**-न कापडाची वीण, पोत **सुतर फेणी**-स्त्री एक गुजराथी खाद्य पदार्थ **सुतरा**-वि शहाणा, धूर्त, तीक्ष्ण **सुतव(वि)णें** अक्रि १ सुतात गुफणें, ओवणें, गोवणें २ भोंवतीं सुत गुडाळणें ( सकातीचीं सुगड, वधुवर, पिंपळ इ०च्या ) 'विप्रीं त्या सुतवूनिया निज करीं ते कंकणें बाधिती।' -अकक २ सी स्व १०२ त्यातील तेल्फळ, सुखवतातील लाडू इ०स सुत गुडाळणें **सुतळी(ळ)**-स्त्री सुताची जाड दोरी **०ळ्या लगाम**-पु एक प्रकारचा लगाम **सुताचा तोडा**-पु १ सुताचा तोडलेला तुकडा दोऱ्याचा तुकडा २ (ल ) क पदार्थ, अत्यत हलक्या किंमतीची वस्तु **सुताड पुनव**-स्त्री (गो ) श्रावणी पौर्णिमा **सुताडा**-पु कापसाच्या सुताचें विणलेलें जाड वस्त्र (लुगडें इ० ), खोऱ्या, बोऱ्या **सुताडें** न १ ( निंदार्थी ) सुताडा २ फार दूरचें नातेंगोत आप्तसबध, नात्यागोत्याचें जाळें, घरोवा निकटचा सवध **सुताडेंगुताडें-गोताडें-गाताडें, सुताडगुताड**-१ सुताडें अर्थ २ पहा २ दूरचे व्यापारी सबध एकमेकाचे गुतागुतीचे व्यवहार किंवा सबध ३ सुताची गुतागुत [सुत+गुतणें किंवा गोत] **सुतार बाधणें**-(कर ) पतगास दोरा बाधण्यासाठीं फासा करणें **सुतारा** पु (कोष्टी) मागाचा एक भाग गुलड्याशीं समातर असलेली काठी **सुती**-स्त्री १ अवश, विस्तार-शर २ (व ) एखाद्यावर दाव, वजन पाडणें, एखाद्याच्या धाकानें निमूटपणें वागणें, ऐकणें -वि १ कापसाच्या सुताचें केलेलें, तत्संबधीं २ (ल ) सरळ, नीट, बिनचूक, पद्धतशीर, चोख ३ ओळीनें, सम पातळींत असलेलें, कुशलतेनें माडणी केलेलें, आवाक्यातील ४ ( सख्यावाचक शब्द जोडून समासात ) कापडाचा पोत, वीण, तत्समपणा दाखविणें जसें-एकसुती, दोन सुती, जाड सुती, बारीक सुती **सुतीव**-वि वरील अर्थ २,३, पहा **सुतेरा**-पु कोळी नावाचा किडा व त्याचे गुदापासुन उत्पन्न होणारा ततु, दोरा

**सु(सु)तक**—न अशौच, मृत माणसाबद्दल धरावयाचा विटाळ [ स सु=बाळत होणें ] **०तुला, सुतकाळा(ळ्या), सुतकी, सुतकील, सुतकाडो**-नि सुतक आल्यामुळें अपवित्र झालेला

**सुतकी**—स्त्री पाथरवटाचें दगड फोडण्याचें एक हत्यार

**सुतणें**—अक्रि निजणें 'राज तो मी सुतलों।' -तुगा १४२९ [ स शी-शय, हिं सोना]

**सुत(ता)रनाल(ळ)सुत्रनाल**—स्त्री उटावर वाहून न्यावयाची तोफ [फा शुतुर्नाल्] **सुतरस्वार**-पु साडणीस्वार ( पत्रें इ० नेणारा ) [फा शुतुर्सुवार]

**सुत(ता)राम्**—क्रिवि १ ( मूलार्थ ) पलीकडे, पुढें, अतिशयपणें २ अगदीं सर्वथा सर्वस्वीं सर्वत्र इत्यादि ३ मुळींच नाहीं, कधींहि नाहीं ( नकारार्थीच ) उपयोग [ स ]

**सुतल-ळ**—न सप्तपाताळापैकीं तिसरें पाताळ [ स ]

**सुतला**—स्त्री (गो ) चोरी **सुतलायप**-चोरी करून नेणें

**सुतसणें**—सक्रि घालणें; ठेवणें -शर

**सुना सुनत(ता)**—स्त्री शिश्नत्वचेचा छेद करण्याचा मुसलमानाचा एक धार्मिक विधि [ अर. सुन्नत् ]

**सुतार**—पु १ लाकडाचें काम करणारी एक जात व त्यातील व्यक्ति २ लाकूड कोरणारा एक पक्षी [ स सूत्रधार ] **०काम**-न सुताराचा धदा किंवा त्यानें केलेलें काम **०की**-स्त्री सुतारकाम खेड्यातील सुताराचा वतनाचा हक्क **०डा**-पु ( निंदार्थी ) सुतार **०मेट**-न सुताराचें दुकान, अड्डा

**सुताळ**—स्त्री एक जातीचा तादूळ

**सुताळी**—स्त्री शोध, माग, पत्ता -तुगा २८३ [ सूत्र ]

**सुतिणें**—अक्रि मारणें -शर [ सूत ]

**सुती**—(साकेतिक) (मडई) वीस' या संख्येचा साकेतिक शब्द

**सुती**—स्त्री (गो ) १ गायीचें जननेंद्रिय २ आई, जननी ३ जन्मस्थान, उत्पत्तिस्थान 'स्त्रीसुखाची आसक्ती।

तेचि वाढल्या दु खाची सुती।' –एभा ७ ५९७ [स सु= वाळत होणें]

**सुती**—स्त्री नाद, छद, लोभ –तुगा २१२७

**सुतोवाच**—उद्गा सागण्यास किंवा बोलण्यास सुरुवात करणें या अर्थी वाक्प्रचार बहुतेक पुराणें सुतानें शौनकादिक ऋषीस सागितलीं आहेत त्यामुळें त्यातील अनेक अध्यायाच्या, आरभीं 'सुत उवाच' असे शब्द असतात त्यावरून [स सुत+उवाच]

**सुत्रा-त्री**—वि सुतरा पहा शहाणा; धूर्त [स सुत्र]

**सुथारणें**—उक्रि सरळ व्यवस्थित करणें सुधारणें पहा [स सुस्थिर, सु+थारा]

**सुद्गत**—स्त्री शोध, विचारपूस, तपास, चौकशी (क्रि० लावणें, लागणें) [शुद्धि; शोध+गति]

**सुंदडणें, सुदणें**—उक्रि (कों) पायाखालीं तुडविणें, चिरडणें [स सुदन]

**सु(सू)दणें**—सक्रि (काव्य) दणें, घालणें 'ऐसेनिहि विप होय सुदलें। नवज्वरीं देता।' –ज्ञा २ १८४, –ज्ञा १ २६४ [स स्यूत] **सुदविणें** आत घालणें, शिरकविणें, प्रवेश करविणें

**सुदम**—वि माणसाळण्यास सोपा [स सु+दमन]

**सुदमुद**—वि (ना) हुबेहुब

**सुदर**—वि देखणा, रम्य, मनोरम, चागला [स]

**सुदरा-री**—स्त्री १ सुदर स्त्री २ स्हान वीतभर सनई, ही मोठया सनईच्या तुप्पट तीव्रतेनें वाजते सतार, रुद्रविणा इ० वाद्यास विवक्षित स्वरानुसधानानें त्याचे दाडीस जे पडदे बाधीत असतात ते प्रत्येकीं

**सुदर्शन**—न १ विष्णूचें चक्र २ (ल) व्याद, अरिष्ट, पाठीस लागलेलें लफडें ३ चक्राकित शाळिग्राम ४ अमरावती [स] –वि सुदर ०**चूर्ण**-न अनेक औषधें कुटून केलेली एक भुकटी

**सुंदल**—स्त्री (व) लुडबूड

**सुदंश**—वि ज्ञाता, मार्मिक. 'तेथ अर्जुनु सुदक्षु। म्हणोनि चमत्कारिला।' –ज्ञा. ५. १६१.

**सुदा**—वि शुद्ध साधा, चांगला, सरळ, नीट, व्यवस्थेशीर [स शुद्ध]

**सुदाम सुदामदेव**—पु श्रीकृष्णाचा एक मित्र हा रोड व दरिद्री होता –वि (ल) रोड, दरिद्री (मनुष्य) [स] ०**दरिद्र**-पु अत्यत दारिद्र्य ०**दरिद्री**-वि फार दरिद्री **सुदाम्याचें वस्त्र**-न अत्यत जीर्ण व फाटकें वस्त्र **सुदामपुरी**-स्त्री फार दरिद्री गाव **सुदाम्याचे पोहे**-पु अव (सुदाम्यानें एक मूठभर पोहे श्रीकृष्णास दिले त्याच्या मोबदल्यांत दवानें त्यास धान्याचें नगर दिलें त्यावरून) दात्यानें आपल्या देणगीबद्दल बोलावयाचा विनयाचा शब्द, भाजीभाकरी **सुदामे**-पु अव पोह्यास साकेतिक शब्द

**सुदामत**—क्रिवि १ सरळ, सरळपणें, सुखसतोषानें, सुरक्षितपणें, सुस्थितींत, नुकसान न पावता, इजा न होतां, विनधोक (असणें, पोहोंचणें, पावणें इ० चें वि) 'परंतु नावा सुदामत लागतील, न लागतील' –ख १० ५३३८ 'ऐवज येणें त्यास तो सुदामत फडशा करीत नाहीं' –ख ११ ६००९ २ विनत्रासानें, विनाखटपट, नियमितपणें, पूर्वीपासून, पूर्ववत, विन हरकत (वागणें, नादणें, वणें, बोलणें; चालणें इ०चें वि). 'कोंकणचें मार्ग सुदामत, चालू लागले' –ख १० ५५३३८. –स्त्री १ चाल, प्राचीन वहिवाट, सलोखा 'घरोब्यानें ऐक्यतेनें उभयपक्षीं सुधामत चालवा' –रा ८ १८१ [फा शुदामद]

**सुदारणी-णूक-सुदारणें**—सुधारणी इ० पहा

**सुंदावणें**—अक्रि जड होणें [सुद]

**सुदावा**—पु सुगावा पहा

**सुदिन, सुदिवस-दीस**—नपु १ कुयोग इ० नसलेला, मगलकारक, शुभकारक दिवस २ सणाचा दिवस ३ इष्टवस्तूचा लाभ, सकटापासून मुक्ति, इष्टवार्ताश्रवण इ० घडण्याचा दिवस [स] **सुदिस**-क्रिवि (अशिष्ट) सर्व दिवसभर.

**सुदीर**—पु (गो) बाटया कुणबी, शूद्र [सं शूद्र]

**सुदुर्लभ**—वि अत्यंत कठीण (मिळविणें, मिळणें इ० स) [स]

**सुदूर याफ्तन्**—सादर होणें, उद्भूत होणें [फा]

**सुदृढ**—वि फार बळकट, मजबूत, गच्च बसविलेलें, कठिण, कणखर, सशक्त व मजबूत [स]

**सुध्दबुध्द**—स्त्री शुद्धी (ज्ञान), समजण्याची ताकद, जाणीव, मनाची सुस्थिति [स शुद्धि+बुद्धि]

**सुध्दां**—शअ १ सहित, बरोबर, सगतीनें, सकट २ –क्रिवि देखील [स सार्द्ध]

**सुध्दा**—वि (कों) शुद्ध, साधा, एवढाच 'हें तावें सुद्धें सोनें' [स शुद्ध]

**सुंधडणें, सुंधणें**—(कों) सुदडणें, सुदणें पहा

**सुंधणें**—उक्रि सपाट होणें, समपातळींत येणें, आणणें

**सुधरणें**—उक्रि सुधारणें पहा **सुधर**-वि व्यवस्थित, सुधारलेलें **सुधराई**-स्त्री १ सुधारणा २ (बडोदें) म्युनिसिपालिटी

**सुधर्मा**—स्त्री. इंद्राची सभा [स]

**सुधा**—स्त्री १ अमृत २ फुलामधील मध ३ चुना ४ रस, पाणी ५ वीज ६ हार ७ हरितकी [स] ०**कर, सुधांशु**-पु चद्र त्याची सत्रावी कला ती सुधाकरी ०**पाणी**-पु ज्याच्या

अमृताचा कलश आहे असा देवाचा वैद्य, धन्वंतरी ०रस-पु १ अमृत २ लिंबाचा रस साखरेच्या पाकांत घालून केलेलें एक पक्वान्न

**सुधा**—वि बरोबर, योग्य, बिनचूक, शुद्ध, सरळ [स शुद्ध] म्ह० सुधा बोकरे नाच्या, वोडक्या झाल्या साऱ्या ०भाव-पु सरळ भाव

**सुधारणें**—उक्रि बरोबर व्यवस्थित, करणें, रचणें, ठेवणें, सरळ, नीट, बरोबर, योग्य, दुरुस्त करणें, योग्य व व्यवस्थित रीतीनें पुरें करणें, सपविणें —अक्रि सरळ, बरोबर, योग्य होणें, अधिक चांगलें, टापटीपेचें होणें, सभ्य बनणें [म शुद्ध, हिं सुधारना] **सुधारक**-पु १ दोष नाहींसे करू पाहणारा २ समाजामध्यें नवीन गोष्टी आणू पाहणारा, परंपरेस सोडून नवीन आचारविचारास अनुसरणारा. **सुधारणा-णी-णूक सुधारा**-स्त्रीपु १ योग्य, व्यवस्थित मांडणी, व्यवस्था, दुरुस्ती, अधिकाधिक पूर्णत्वाकडे जाण्याची किंवा नेण्याची क्रिया २ परंपरेस सोडून नवीन गोष्टींची समाजात प्रस्थापना, पुराण प्रियतेविरुद्ध बंड

**सुधी**—पु १ पंडित, विद्वान शहाणा माणूस २ तीक्ष्ण व उत्तमबुद्धीचा मनुष्य —वि बुद्धिवान, शहाणा [स ]

**सुधीर**—वि मजबूत, बळकट, धाडसी, निर्भय, दृढ, खंबीर मनाचा [स ]

**सुनका**—वि सुना पहा [स शून्य] **सुनवहि(ह्य)री**-१ कातडीचें स्पर्शज्ञान नाहींसें होणें २ रगतपिती, महाव्याधि **सुनसान**-स्त्री सामसूम **सुना-नें**-वि १ रिकामा-में २ ओका, नागवा उघडा, निष्फळ, ओसाड, व्यर्थ, मोकळा ३ उदास, शून्य; अभावयुक्त (क्रि० जाणें=तोटयाचा असणें, वाझ असणें, व्यर्थ जाणें) **सुनाट**-वि सुना, व्यर्थ, शून्यरूप, स्वैर —क्रिवि स्वैरपणानें **सुनावा पडणें**-मोकळा पडणें **सुनो**-क्रिवि शून्यरूपानें **सुन्न**-वि बधिर (कातडी, अवयव) **सुन्न पडणें**-(व ) निश्चल पडणें, बधिर होणें, मूर्च्छित होणें **सुन्न होणें**-(व ) थक होणें

**सुनत-ता**—स्त्री सुंता पहा

**सुना**—पु एक जातीचें झाड

**सुनावणी**—स्त्री स्पष्टीकरण, कथन, न्यायाधिशापुढचें फिर्यादीचें वाचन, वादीप्रतिवादींचा वगैरे जबाब **सुनाविणें**-उक्रि १ ऐकविणें २ कानउघाडणी करणें [हिं सुनाना]

**सुनीळ**—वि निळ्या छटाच्या रंगाचा [स ]

**सुनें**—न कुत्रें [स श्वान]

**सुपक-क्व**—वि (बायकी) चांगलें शिजलेलें, चांगलें पिकलेलें [स सुपक्व ]

**सुपडें(ली), सुंपली**—नस्त्री ल्हान सूप [सूप]

**सुपतळ**—न सुकतळ पहा

**सुपती**—स्त्री १ पायरवटाची हातोडी; सुतकी २ एक फुलझाड, सुपी

**सुप(पे)ती**—स्त्री निजण्याची गादी, चटई, बिछाना 'बाजावरी सुपती।'—तुगा १९२ [स स्वप्]

**सुपथ**—पु १ चांगला रस्ता, वाट २ (ल ) सन्मार्ग (क्रि० धरणें, घेणें, सोडणें) [स ]

**सुपरिणाम**—पु चांगला शेवट, अखेरी —वि अनुकूल परिणामाचा [स ]

**सुपरीत**—वि सरळ, बरोबर, व्यवस्थित, नियमित, योग्य, पसंत २ विपरीतच्या उलट, सुलटें [स ]

**सुपर्ण**—पु गरुड [स ]

**सुपली**—स्त्री १ गोकर्णीचा वेल व फूल, ही निळी व पांढरी असते २ सुपडें पहा

**सुपळाष्ट, सुपाष्ट**—वि (व ) स्पष्ट [स स्पष्ट]

**सुपाऊस**—पु फायदेशीर होणारा पाऊस किंवा त्याची सर

**सुपाणी-नी**—न नाकातील एक जातीची, बहुधा एका मोत्याची नथ, सुकलें 'भीमकी नाकीचें सुपाणी।'—एरुस्व ७ ३३ —वि पाणीदार [स ]

**सुपात्र**—पु दान, मान देण्यास लायक माणूस [स ] ०दान-न वरील प्रकारच्या माणसास द्यावयाचें दान किंवा तें देण्याची क्रिया

**सुपारी**—स्त्री पूगीफल, पोफळीचें बीं, पोफळ व त्याचें फळ सुपारीचे पुढील प्रकार आहेत —ओली सुपारी=कच्ची सुपारी, पांढरी-गोटा-रोठी सुपारी=पक्की व टणक झालेली काढून वाळविलेली सुपारी, चिकणी सुपारी=कच्ची व मऊ असता काढून, दुधात शिजवून, सावलींत वाळविलेली सुपारी, दगडी सुपारी=शिजवून कठीण करून तिच्याच पाण्यात भिजवून उन्हात वाळविलेली, फुलबरडी-बरडी सुपारी=अर्धवट पक्की असता काढून, शिजवून उन्हात वाळविलेली [स सु+पारी=खोबरें] म्ह० १ तारवात अर्धी सुपारी=सर्व गलबतातील माल दुसऱ्याचा असता आपलें एक सुपारीचें खांड टाकून एकंदर मालात आपला वाटा आहे असें प्रतिपादणें २ (बे ) सुपारी इतकें खातें, दुपारी पर साकडे जातं=नाजूक प्रकृतीचें माणूस **सुपारीचें फूल**-न सुपारीचे काप विंच्याच्या तेलात तळून केलेलें एक औषध ०देणें-मगलकृत्य, गोंधळ इ० प्रसंगीं ब्राह्मण, गोंधळी इ०कास त्याचा प्रारंभ करण्यासाठीं सुपारी देऊन (पुन्हा फिरणार नाहीं याअर्थी) निश्चित करणें, नेमणें, आमंत्रण देणें ०सोडणें-

(मायकी) समान वधूनें वराच्या किंवा वरानें वधूच्या मुठींत किंवा चिमटींत धरलेली सुपारी सोडून बाहेर काढणें ०घाट-पु मोतीं अगर इतर रत्नें यांचा सुपारीसारखा आकार, यांचें विशेषण सुपारी घाटी

सुपिंड—वि बळकट, दणकट, कणखर [ स ]

सुपी—स्री सुपली अर्थ १ पहा

सुपीक—न चांगला हंगाम, सुगी –वि चांगली पिकाऊ (जमीन)

सुपुत्र—पु कर्तव्यपरायण व प्रेमळ मुलगा [ सं ]

सुपूर्द-र्त-सुप्रत—क्रिवि हवालीं, ताब्यांत, स्वाधीन. (क्रि० करणें) [ फा ]

सुपेती—स्री सफेदी

सुप्त—वि १ निजलेला २ बधिर, स्पर्शज्ञानहीन [ सं ] सुप्ति–स्री १ झोंप, निद्रा २ सुन्नी, ग्लानि, बधिरता

सुप्रभात—न पहांट, सकाळ, उष काळ –क्रिवि पहांटे, उजाडतांच, सुप्रभातीं [ स ]

सुप्रयुक्त—वि उत्तम, यथायोग्य ज्याची योजना केली आहे तो, चांगलें रचलेलें, ठेवलेलें –क्रिवि व्यवस्थितपणें, साजेलसें ( भाषण, कृत्य ) [ सं ]

सुप्रयोग—पु योग्य संबंध, जोडणी, दिशा, प्रसंग [ स ]

सुप्रसन्न—वि अतिशय आनंदित, खुष, संतुष्ट [ स ]

सुफराटणें, सुफारटणें—अक्रि सुलटें, योग्य, सरळ, वजू करणें, उफराटयाचें विरुद्ध करणें किंवा होणें सुफराटा, सुफारटा–वि सुलटा, सुरफाटा, सरळ, ऋजू बरोबर [ स सुपरीत ]

सुफल—न १ बाण, सुई इ० चें टोंक, अग्र २ खाच, खाप, खोंगा [ सु+फळ ]

सुफल-ळ—वि चांगलें फळ, शेवट देणारें, येणारें, चांगलें फळ आलें आहे असें ( झाड ), लाभकारक, फायदेशीर (धंदा, उद्योग) ३ सुपरिणामकारक फलदायक, (उपाय, योजना) [ स ]

सुफी—पु मुसलमानांतील एक गूढवादी पंथ [ फा ]

सुफेदरंग—वि (व) पक्का ल्याह [ हिं ]

सुफेदसुरमा—पु डोळयांत घालावयाचें एक औषध [ हिं ]

सुफेन—न समुद्रफेस, एक औषध [ स ]

सुब-भ—नपु नारळाचे कवचीवरचे तंतु काथ्या, ताग अंबाडी, मोळ इ०च्या तंतूची विणलेली दोरी उदा० सुंभ जळे पण वळ न जळे=सुंभ जळाला तरी पीळ जळणार नाहीं गर्विष्ट किंवा हट्टी माणसाचें नुकसान झालें तरी त्याचा ताठा किंवा हट्ट जात नाहीं [ स शुल्व ] ०झड-डी सुंभाडी–न स्री काथ्याचा तुकडा ०णें–अक्रि खाद, पाळणा इ मुबानें विणणें.

सुंब-म—पु घोडा, गाढव यांचा खुर [ हिं सुम ०तराशी-सी–स्री खुराच्या नख्या कापणें सुंबतराश-स–पु घोडा, गाढव यांच्या नख्या तासून साफ करणारा मनुष्य

सुबक—वि लहान पण चांगल्या घाटाचें, डौलदार, सुंदर, नीटनेटकें, सुग्मुठीत, मोजेसुद, आटोपशीर, शरीर, ओसें गहा [ फा सबक ]

सुबर्णी—सक्रि सुबरणें पहा

सुबत्ता—स्री स्वस्तता व समृद्धता, विपुलता ( धान्य गोंव, इ० चा ), स्वस्थता, सर्वनाई [ हिं ] ०काळ-पु भरभराटीचे दिवस, अनुकूल काळ, हंगाम, सुखकारक दिवस

सुबद्ध—वि बळकट, चांगलें बांधलेलें, मजबूत, पक्का [ स ]

सुबरा, सुभ्रा—पु ( वैद्यशास्त्र ) एक रसायन [ सं सुभ्र=पांढरें ]

सुंबा-भा—पु दगडी शिळा फोडण्याचा अणी लोखंडी घण २ तोफ ठासण्याची टोकणी ३ घोडयाचा खुर सुंबेकरी–पु वरील दणानें काम करणारा, दगड फोडणारा मनुष्य

सुबा, सुबेदार—सुभा, सुभेदार इ० पहा

सुबाईक—न सुबत्ता पहा [ सुभिक्ष ]

सु(सुं)बारा-सुंबारया—पु ( सोंगटयांच्या खेळांतील एक शब्द ), फडवून पडून जाणें, निसटणें, दूर पडून जाणें (क्रि० करणें ) [ सु+बारा ]

सुबिकी—स्री कमीपणा, हलकेपणा, अप्रतिष्ठा [फा सुबकी]

सुंबी चाकू—न चार जाड धार असलेलें चाकू

सुबुद्ध-द्धि—वि हुशार, बुद्धिमान, शहाणा, धूर्त [ सं ]

सुबोध—पु चांगला उपदेश, सल्ला, शिक्षणूक [ स ] –वि समजण्यास चांगलें, बालबोध, सोपें, साधें, सहज शिक्षण विण्यासारखें

सुंभ—पु कनुष माणूस [ अर शुम ]

सुंभ—पु १ एक दैत्य २ (ल) त्यावरून आळशी व मूर्ख माणूस [ स शुंभ ]

सुंभ, सुभगंड-डी सुंभणें, सुभतराश-शी, सुभत्ता, सुभत्ताकाळ, सुंभा सुभाडी—सुब इ० पहा

सुभक-ग—वि सुबक पहा

सुभक्त—वि पूजनशील, आदरशील, भक्ति करणारा, भक्ति असलेला [ सं ] सुभक्ति–स्री पूज्यता, आदरणीय प्रेम

सुभग—वि १ दैववान, नशीबवान २ सुंदर [ स सु+भग=दैव ] सुभगा–स्री भाग्यशाली स्री

सुभट—वि १ चांगल्या घाटाचें, मोठें २ भव्य, चांगलें, सुरेख ३ शूर [ स. ]

सुभद—वि सुखी, संतुष्ट 'कुसाचें सुभ गायेन माळोनि। सुभद जाहाले।'–शिशु २४१ १८२ [ स सुभद्र ]

सुमर—वि उत्तम भरलेलें [स सु+भृ]

सुमा—पु १ प्रांत, देश २ प्रांताधिकार ३ प्रांताधिकारी ४ (सांकेतिक) विटाळशी स्त्री [फा सुबा] ०पेटा-पु सुभेदाराच्या हाताखालील पेटा सुभेदार-पु सुभ्यावरील अधिकारी, गव्हर्नर २ (इ) इंग्रजी सैन्यांतील एक देशी अधिकारी सुभेदारी-स्त्री सुभेदाराचें काम व हुद्दा सुभे लष्कर-न सेनापती व शिपाई इ० ची नेमणूक, नोंदण्याचें हिशेबी सदर

सुभाज—वि पुरता भाजलेला (पापड, धान्य इ०) [सु+भाजणें]

सुभावणा—वि दिसण्यांत सुरेख, छानदार, सुंदर, देखणा

सुभाष—वि चांगलें बोलणारा सुभाषित-न १ चांगलें भाषण, वक्तृत्व २ विनोदपर किंवा बोधपर सूत्रवचन -वि चांगलें लिहिलेलें, बोललेलें [स.]

सुभित्ता, सुभित्ताकाळ—सुबत्ता इ० पहा

सुभिक्ष—न सवंगाई, विपुलता, समृद्धि, स्वस्ताई (धान्य इ० ची) -वि स्वस्त, सुबत्तक [स] ०ता-स्त्री सवंगाई, समृद्धि

सुम—न फूल, पुष्प [स]

सुम—वि (ना) कंजूष, कद्रू [अर शूम]

सुमंत—पु अष्टप्रधानांतील एक प्रधान [स सुमति]

सुमधुम—क्रिवि तडक, सरळपणें, दोरीसुत (रस्ता, राग), स्पष्ट, उघड, स्वच्छ [धूम द्वि]

सुमन—पु १ गहू २ दव

सुमन—न १ चांगलें मन २ फूल [स]

सुमनस्क, सुमना—वि १ चांगल्या, सुखी मनाचा, प्रक्षुब्ध नसलेल्या मनाचा २ अनुकूल मनाचा, प्रवृत्तीचा [स]

सुमरू—न स्मरण -शर

सुमसाम—स्त्री शांतता; स्तब्धता -क्रिवि सुमाटयानें, शांततेनें [स शून्य, शान्त, हिं सुन-सान]

सुमार—पु अजमास, अदाज, गणती साधारण संख्या, तर्क (क्रि० पहाणें, काढणें, करणें, बांधणें, येणें, दिसणें होणें) २ बेसुमार किंवा अदाजाबाहेरची संख्या 'विहिरीला पाण्याचा सुमारच नाहीं' ३ किमान मर्यादा, मध्यम प्रमाण 'हा सुमारानें चालतो' ४ निकटपणा, सान्निध्य 'पौर्णिमेच्या सुमारावर या' ५ मर्यादा, काळ 'हा घोडा बसकणेच्या सुमारास आला' ६ भान, शुद्धि 'एवढा वेळ भलतेंसलतें बोलत होता आता सुमारावर आला' ७ प्रमाण, नेम; बेत ८ रोख -वि वाईट, मध्यम प्रकारचें 'हे आंबे सुमार आहेत' [फा शुमार] सुमाराचा-वि साधारण, मध्यम प्रकारचा सुमारणें-अक्रि १ मर्यादेंत येणें असणें २ अदाजापेक्षा जास्त होणें, भरभराटणें (पीक, धंदा) घको ७ ३४ -१ विंचित फुगवटी येणें सुमार माफक-घट-वि सुमाराचा

सुमारी-वि संख्येनें मोजतां येण्यासारखें, मापीच्या उलट गणनीय, संख्यावाचक १ -स्त्री सुमार पहा (अर्थ ३,४ सोडून) २ गणना, गणती 'खानसुमारी' झाडसुमारी, गाव सुमारी, शतसुमारी सुमारें-क्रिवि अदाजें

सुमुहूर्त—पु, शुभकार्य, उपयोगी ग्रहबलादिकेंकरून उत्तम प्रकारचा दिवस, वेळ [स]

सुमेरु—पु मेरु पर्वत [स]

सुयका—वि (व) सुलटा, सरळ

सुयटा-टी, सुयरा—पु स्त्री.पु केळी-नारळीचा कोंभ, बारीक पानाची सुरळी [सुई] सुय(या)रणें-अक्रि (कों) वरील कोंभ, एखादा रोगानें जळून जाणें

सुयंत्र—वि सुव्यवस्थित, सुरळीत [स]

सुयाण-णें—न सुकाळ -ज्ञा ११ ३३८

सुयाणा—पु (कर) सुईदोरा ठेवण्याची दवी [सुई]

सुयेर-सुयेरणें—सुवेर, सुवेरणें पहा

सुर—पु देव, देवता [स] ०गुरु-पु देवाचा गुरु बृहस्पति, गुरूचा तारा ०तरु द्रु-द्रुम-पु कल्पवृक्ष ०धनु-न इंद्र धनुष्य ०नदी-सरी-सिंधु-स्त्री १ आकाशगंगा, भागीरथी ०पति-पु देवराज, इंद्र सुरभि-स्त्री कामधेनु 'विषाद धरिला म्हणो न सुरभी विष क्षीर दी'-केका ४ सुरयुवती-स्त्री देवांगना, अप्सरा ०लोक-पु स्वर्ग, देवलोक ०वाड-पु १ मोटेपणा, थोरवी, महात्म्य २ शोभा, शृंगार, सुख ३ सुकाळ, पूर; रेलचेल ४ स्वतंत्रता, अनुकूलता ५ मर्जी -वि शुद्ध, चोख ०वाडा-पु देवाच्या शौर्याचें वर्णन, स्तोत्र, गाणें, पवाडा (क्रि० गाणें, म्हणणें) ०वाडणें-अक्रि आनंदित होणें, शोभणें, प्रफुल्लित होणें

सुरई—स्त्री चंबू, खुजा, उभें लांबट व चिंचोळ मानेचें पाण्याचें भांडें. [स सुरा हिं सुराही]

सुरई—स्त्री कट्यारीसारखें कमरेंत खोंचण्याचें एक शस्त्र 'सुरई मारती हातहातात।'-ऐपो २८३ [हिं सुराही]

सुरई सुरई पीक-धान्य-धान-भात—स्त्री न कोंकणी खलाटींतील सर्व प्रकारचें पीक लवंग वेलदोडे-जायफळ-केशर इ० सुवासिक पीक प्रत्येकीं सुरईभात-तादुळ-नपु अव (कों) उकडे नसलेले तांदुळ

सुर-कण-कन-कर-दिन-दिनीं-दिशीं—क्रिवि झटकन, भरदिशीं (उडवावयाची दारू, पोहण्यांतील सुरकाडी इ० स अनुलक्षून) [ध्व]

सुरकंडी-कांडी-कुंडी—स्त्री १ माशासारखा आकार करून पाण्यात बुडी मारणें, नदींत सुसडी मारणें (क्रि० मारणें,

देणें ) २ द्रव पदार्थांची ( दारू इ० ) एकदम वर आलेली सुरळी, प्रवाह [ ध्व. ]

सुरकणें—अक्रि १ सूंर, फुर्र असा आवाज करणें २ ( ल ) गर्दीतून सटकन निसटून जाणें, सुळकी मारणें [ ध्व. ]

सुरकरी—पु १ तमाशांतील गाणाऱ्याला सुराची साथ देणारा २ सुर हें वाद्य वाजविणारा [ सुर ]

सुरकवडी—स्त्री एक खेळ

सुरकाड—स्त्री ( व ) ओळ, रांग ( क्रि० मारणें=सरळ धावणें ) [ सूर ]

सुरकी—स्त्री भाजलेली लाल वीट —मॅरट ८. [ फा सुर्ख=तांबडा ]

सुरकु(र)(टु)ती—स्त्री वस्त्र, चामडें इ० वरील सुणी, वळी, चिरमी, आकुंचन. [ का सुर्कु ] सुरकुतणें—अक्रि सुर कुत्या पडणें

सुरक्या—पु १ सुंवाद्य वाजविणारा २ ( आट्यापाट्यांचा खेळ ) सुरदुग्या, मृदंग [ सुर ]

सुरक्या-ख्या—पु ( गंजिफा ) ज्या चित्रापासून खेळाचा प्रारंभ होतो तें चित्र हें दशावतारांपैकीं दिवसा रामाचें व रात्रीं कृष्णाचें मानितात [ सुरू=आरंभ ]

सुरखा-मुरखा—पु अफूच्या झाडावरील एक किडा

सुरखाई, सुरखी—स्त्री १ तांबड्या रंगाची तकाकी, तेज ( कपडा, चामडी इ० वरील ) लाली, गुलाबी झांक २ औषध, जागरण इ० मुळें डोळ्यांत आलेला तांबूसपणा ३ फूल, वनस्पती इ० चा तजेला ( क्रि० येणें ) [ फा सुर्खी=तांबडेपणा ]

सुरखाई—स्त्री सुंदरपणा, सुरेखपणा. [ सुरेख ]

सुरखान—न ल्हान पाणवदक

सुरंग-गी—स्त्री रक्तचंदनाचें झाड 'जैसें सुरंग तैसें तुझें अंग।'—ह १ ३४ [ स ]

सुरंग—वि चांगल्या रंगाचा [ स ] ०ता-स्त्री लालपणा

सुर(रु)ग, सुरुंगा—पु भुयार, विवर, किल्ल्याचा तट इ० उडवून देण्यासाठीं जमीनीच्या पोटांत भुयार खणून त्यांत स्फोटक दारू भरून तयार करणें, किंवा तसलें भगदाड, तटाखा लून बाहेर जाण्यायेण्यास तयार केलेला चोर मार्ग ( क्रि० पाडणें, करणें ) [ स ]

सुरगधातु—पु गेरु [ स ]

सुरगाठ—स्त्री सहज सुटण्यासारखी गांठ निसरगांठ

सुरंगी—स्त्री खाणीच्या कामांतील पहार —वि सुरंग खणण्याच्या उपयोगी [ स सुरंग ]

सुरंगी—स्त्री देवपुन्नाग नावाचा एक सुवासिक फुलाचा वृक्ष, त्यापासून काढलेलें अत्तर

सुरंगी—स्त्री झारी. 'पमरी सुरासुरंगी।'—गुच ( पाठभेद ) ११०८

सुरंज—पु १ सुरंजी झाडाचें मूळ रंगकामांत याचा उपयोग होतो २ रक्तचंदनाचें लांकूड सुरंजी-स्त्री रक्तचंदनाचें झाड —वि. रक्तचंदनाच्या रंगानें रंगविलेलें [ स. सुरंज ]

सुरंजन, सुरंजनमिश्री—स्त्री एक औषध [ अर ]

सुरट—पु ( राजा. ) डोंगराच्या बांधांत पाणी येण्यासाठीं ठेवलेलें ल्हानसें भोंक

सुरट, सुरंट—पु न सुरवट पहा

सुरड—स्त्री ( व ) सर्पणाची काडी, सर्पण.

सु( सू )रण—पु एक खाजट कंद, मूळव्याधीवर याची भाजी खातात [ सं सूरण ]

सुरत—न १ मैथुन २ ( ल ) ऐक्य [ स ] ०क्रीडा-स्त्री मैथुन, संभोग सुरती-वि मैथुनविषयक

सुरत—स्त्री १ चेहरा, सौंदर्य, प्रतिमा, पुतळा, रूपरेषा २ हकीकत, तऱ्हा, स्थिति, प्रकार ३ गाठ ४ ( ल ) दिमन; स्वरूप [ अर सुरत् ] ०पाक-वि सुंदर व तेजस्वी चेहऱ्याचा, सुस्वरूप, देखणा ०हाल-पु हकीकत, कैफियत रडवीसुरत=रडव्या तोंडाचा म्ह० सुरतेचा भला कमरेचा ढिला-सुंदर पण निर्बळ असा

सुरती—वि सुरत गांवासंबंधीं उ० सुरती एरंड, सुरती भुईतरवड सुरती, सुरतीचुना, मोतीं=हें बहुमोल व तेजस्वी असतें

सुरत्वान—वि सुंदर 'प्रतिमा सुरत्वान नाहींत'—ख ४७९३ [ अर सुरत+वान ]

सुरत्या, सुरदास, सुरनीस—वि गाण्यांत, सूर देऊन साथ करणारा [ सूर ]

सुरदार—वि सुरूच्या झाडाप्रमाणें उंच व सुंदर [ सुरु= झाड ]

सुरना—पु ( व ) तपास पत्ता, बातमी

सुरनीस, सुर्नीस—पु सरकारी सनद, वरात कौल इ० वर 'सुरू सुद, बार' हे तीन शब्द लिहिणारा एक सरकारी कामगार, यालाच पुढें संस्कृतांत सचिव हें नांव दिलें गेलें [ फा सरु+नविस् ]

सुरपणें—अक्रि ( कों ) सुरकुत्या पडणें किंवा ( भात इ० ) खाऊन पोकळ होणें

सुरपाटी—स्त्री ( आट्यापाट्या ) मधली येथपर्यंत जाणारी पाटी सुरदुग्याची पाटी सुरपाट्या-पु सुरदुग्या [ सूर ]

सुरपारंवी-धा-व्या—स्त्री झाडावर सरसर चढावयाचें, खालीं धावत धावत उतरावयाचें आणि सुर नावाची काठी फेका

वयाची असा मुलाचा एक खेळ (क्रि० करणें=ओढाताण करणें, कमी लेखणें)

**सुरफाक**—पु (संगीत) एक ताल

**सुरफाटणें, सुरफाटा**—सुफराटणें, सुफराटा इ० पहा

**सुरफुरें**—वि १ भरपूर 'ऐसें प्रेमरसें सुरफुरें।'-ज्ञा १५ ६८ २ सूचक

**सुरबंद**—स्त्री एक औषधी वनस्पति, हिनें पोटदुखी, जंत याचा नाश होतो [सूळ+बंद]

**सुरबुर, सुरबुरणें, सुरबुराट**—सुडबुड इ० पहा

**सुरबुसाण**—पु (गो) स्वादिष्टपणा

**सुरभि**—वि १ सुगंधी, सुवासिक २ संतोषदायक [स]

**सुरम, सुरम(मा)ई**—स्त्री एक जातीचा मासा **सुरमट**-वि रामग, स्वादिष्ट, वरील मासा घालून तयार केलेला (पदार्थ)

**सुरमा, सुर्मा**—पु १ डोळ्यांत घालावयाचें एक मोत्याच्या चुराचें केलेलें अंजन २ शिबें नांवाचा शरीरावर पांढरे चट्टे पडणारा एक रोग (क्रि० फुटणें, पसरणें) ३ सुरम नांवाचा मासा

**सुरमाड**—पु एक जातीचें माडाचें झाड, भेरल, याच्यापासून दारू तयार करतात, याच्या खोडाचे पन्हाळ करतात याच्या बियांना सुरमाडाची सुपारी म्हणतात [सुरा+माड]

**सुरमी**—स्त्री १ फार जेवण झाल्यानें येणारी सुस्ती झोंपण्याची सुरसुरी २ सुरम मासा ३ सुरमा अर्थ २ पहा [सुर! सुर! ध्व]

**सुरय-यी**—स्त्री सुरई पहा

**सुरल**—न (नाविक) पाण्यातील खेकड्यानें गलबताच्या तळास पाडलेलें बारीक भोंक

**सुरवं(विं-वें)ट**—पु घुला, कुसरूड जो चावला असता खाज सुटते असा एक केसाळ किडा

**सुरवा**—पु (कु) मास, हरभरे इ० चा रस्सा [फा शुर्वा]

**सुरवा**—पु केळी, नारळी इ० झाडास फुटणाऱ्या नवीन सुरळी कोंब २ शेव करण्याचें पात्र सोऱ्या

**सुरवाडिक**—वि १ सुखदायक २ महत्त्वकारक [स सुख] **सुरवाडें**-न सुख, अनुकूलता, सुकाळ

**सुर(रु)वात**—स्त्री प्रारंभ आरंभ प्रथम उपक्रम

**सुरवार-रा**—स्त्री कमरेजवळ सैल व खालीं निमुळता होत गलेला पोटरीपासून तंग बसणारा पायजमा, विजार पायचोळणा [फा शुल्वार्]

**सुरवारी हिरडा**—पु लांब व मोठा, औषधोपयोगी हिरडा

**सुरस**—वि चवदार रसाळ स्वादिष्ट, रसभरित, मधुर, मिष्ट

**सुर(रु)सन(न्न)**—पु एक मुसल्मानी शक हा इसवी सन ५९९ किंवा शालिवाहन शक ५२१ या वर्षी सुरू झाला हा मृगनक्षत्र लागतें तेव्हा (बहुधा ६ जून) सुरू होतो, म्हणून यास मृगसाल किंवा अरबीसाल म्हणतात यामध्यें ९ मिळविले म्हणजे फसली साल येतें [अर शुहूर=महिने]

**सुरसा**—पु दोन्ही बाजूस टोकें असलेला लांब खिळा, किंवा बाबूची केलेली खीळ

**सुरसा**—पु डाळिंबाच्या फळावरील एक रोग

**सुरसाबीज**—न सबज्याचें बी

**सुर सिंघार**—पु रबाबप्रमाणें असलेलें एक वाद्य [सुर+शृंगार]

**सुरसी**—स्त्री प्राप्ति -शर

**सुरसुर-रा**—क्रिवि स्फोटक दारू फुटण्याच्या वेळीं होणाऱ्या आवाजाप्रमाणें [ध्व] **सुरसुर**-स्त्री १ सुरमी १ पहा २ स्फोटक दारू उडताना होणारा सुर्रं असा आवाज ३ हातापायास मुग्या येणें, रिवरिव [ध्व] ०णें-अक्रि १,वरील दारूचा सुरसुर असा आवाज होणें २ अवयवास मुग्या येणें, मरगळ येणें **सुरसुरा(रें)**-पुन (गो) गोवराच्या जातीचा एक रोग

**सुरसुरी, सुरसुर**-स्त्री १ भुईनळ्यासारखा शोभेच्या दारूचा एक प्रकार २ सुस्ती ३ सुरमी पहा, (क्रि० येणें) **सुरसेप**-पु एक जातीचा स्फोटक द्रव्य भरलेला गोळा

**सुरसोटा**—पु तबो-यासारखें विन भोपळ्याचें एक सोटयासारखें ततुवाद्य [सूर+सोटा]

**सुरळ**—वि गाडीची मागील बाजू जड असणें, झुलार पहा

**सुरळी**—स्त्री १ कागद वस्त्र इ० ची वळकटी २ वायकाचें एक रेशमी वस्त्र ३ एक प्रकारचा रोग [सु+वळणें]

**सुरळीत**—वि सरळ बिनघोक, निर्बाध, व्यवस्थित, अडचणीविरहित, वक्रोक्ति-गूढ इ० ज्यांत नाहीं असें (भाषण, श्लोक इ०) -क्रिवि व्यवस्थितपणें मोकळेपणें, निष्कपटपणें (क्रि० जाणें, चालणें, वर्तणें) [स सरलित]

**सुरक्षण**—न व्यवस्थित राखणें, सांभाळणें [स,] **सुरक्षित**-वि सुखरूप व्यवस्थित, चागलें राखलेलें, सांभाळलेलें, निर्धास्त

**सुरा**—पु एक प्रकारचा खंजीर, मोठी सुरी [हिं]

**सुरा**—स्त्री (बे) सुळा केळीचा कोंवळा कोंब, मोना

**सुरा**—पु (खान) मडकी टोकण्याचें थापटणें

**सुरा**—पु मुसलमानाच्या कुराणग्रंथाचा खंड [अर सूरा]

**सुरा**—स्त्री १ मद्य, दारू पिण्याचें भांडें, सुरई [स]

**सुराख**—पु शोध, पाळत, बातमी, सूचना २ भोंक छिद्र [फा सुराघ्]

सुरा(न्या)क्षार—पु एक प्रकारचा क्षार, सारा [ स सूर्यक्षार ]

सुरांगना—स्त्री देवस्त्री, देवांगना, अप्सरा [ स ]

सुराचार्य—पु देवांचा पुरोहित, बृहस्पति [ स ]

सुराज्य—न चांगलें जुल्मी नसलेलें व्यवस्थित पद्धतीचें राज्य [ स ]

सुराणा—पु ( व ) आवाज [ स स्वर सुर ]

सुराणी—स्त्री १ भावड २ उपभोग –तुगा २६८४

सुरापान—न मद्यपान, दारू पिणें [ सं ] सुरमंड पु दारू तयार करताना त्यावर येणारा फेस तवंग सुरामेह-पु प्रमेह पहा

सुरालय—पु १ स्वर्ग २ मेरुपर्वत पृथ्वीच्या अक्षाचें टोंक [ स सुर+आलय=घर ]

सुराष्ट्र—पु काठेवाड वस सुरत प्रांत [ स ]

सुरी—स्त्री मोठा दुधारी चाकू ल्हान तरवार [ स क्षुरिका हिं, पोर्त सुरी ] म्ह० घे सुरी आणि घाल उरीं

सुरु—स्त्री १ पेजेवरची जाड साय २ अडसर नारळांतील कोंवळें खोबरें

सुरक—स्त्री डुकर इ० जनावराची मुसंडी

सुरंग—पु सुरंग ( भुयार इ० ) पहा

सुरुवात- स्त्री सुरवात पहा

सुरुसन—स्त्री सुरसन पहा

सुरू—पु १ खालीं फुगीर व वर निमुळता असा सरळ उंच व वाढणारा वृक्ष फार्सी कवितेंत प्रियेच्या शरीरास याची उपमा देतात २ एक वनस्पति [ फा सर्व् ] ०चा-दार-वि सुरुसारखा सरळ व उंच ( समई सुंदर स्त्री )

सुरू—पु वद्र (घोडा) –वि १ प्रारंभ केलेलं सुरवात झालेलें २ चालू झालेलें ( काम ) ३ सुरुसुरू याअर्थी सुरीनें [ अर शुरुअ ] ०तहकूब-वि क्रिवि आरंभिलेलें व मध्यंतरीं थांबविलेलें

सुरूख—पु सुरक्या ( नजिफातील ) पहा

सुरूप—वि सुंदर, दिसण्यांत चांगला देखणा ( गो ) सुरु पाय [ स ]

सुरेख—वि सुरूप पहा नीटनेटका रेखीव ठीक योग्य [ स सु+रेखा ] सुरेखाई सुरेखी स्त्री छानदारपणा, सौंदर्य गोंडसपणा बांधेसूदपणा

सुरोव—पु ( गो ) सावस नांवाचा एक किडा

सुऱ्या—पु कुरडई चकली इ० तयार करण्याचें मध्यें भोंक असलेलें पात्र साचा सोरा

सुर्खरू(रा)ई—स्त्री १ बहुमान आव त्याजकडून घडलें नाहीं इतकी सुर्खरोई आहे –रा ५ १७० २ सुर्का [ फा ]

सुर्खरु-सुरूखरू-वि १ उजळ तोंडाचा, मुक्त 'भगवान् सुर्खरू करील तोच सुदिन समजावा '–रा ६ ३९५ २ ( ल ) निर्लज्ज, बेशरम, बमुर्वतदार, कोडगा, बेगुमान, वाईट कर्म करून प्रतिष्ठेनें वागणारा [ फा सुर्ख=तांबडें+रु=चर्या ] म्ह० सुरूखुरू सालिका आणि नकटा तिडका सुर्खाई-स्त्री लाली सुर्खी-स्त्री १ लाली, तजेलेदार गुलाबी छटा २ लालशाई [ फा ]

सुर्वा—स्त्री ( व ) सध्येची पळी, तिच्यांतील पाण्याचें आचमन [ स स्रुवा ]

सुलखणी—स्त्री सोन्यास भोंक पाडून त्याची परीक्षा करण्याची क्रिया, घाचणी सुलाखणें पहा सुलखणें-सक्रि सोन्याची परीक्षा पाहणें म्ह० सोनें सुलखावें माणूस पारखावें

सुलगावणें—सक्रि ( व ) पटविणें, शिलगाविणें [ हिं ]

सुलट—न ( व ) १ लग्नमुंजीतील बोहल्यावरील ओवाळणी २ वधुवरांचीं मस्तकें एकमेकांस लावून गळ्यात पैसा टाकणें

सुलट-टा—वि सरळ, योग्य प्रकारचा साईचा, उजू अनुकूल, योग्य दिशेचा व बाजूचा सुलटणें-पुन्हा सरळ रस्त्यावर येणें, अनुकूल होणें, उलटलेल्या स्थितींतून पुन्हा पूर्व स्थितींत येणें सरळ होणें, बरोबर करणें याच्या विरुद्ध उलटणें सुलटा वारा-पु अनुकूल वारा याचे विरुद्ध उलटा वारा

सुलतान—पु १ बादशहा, राजा २ अनियंत्रित सत्ता चालविणारा जुलमी राजा [ फा ] सुलतानी-स्त्री बादशाहाचा अमल, सरकारचे हातून घडणारें जुलमाचें अगर इतर वाईट कृत्य दडपशाही, फौजेनें केलेली लूट याच्या विरुद्ध अस्मानी=दैवी प्रकोप सुलतानी कोस-पु टिपू सुलतानानें ठरविलेला ५ मैलांचा एक कोस

सुलभ—वि सहज मिळणारें, करण्यास सोपें स्वल्प, सव घड [ स ]

सुलह—पु सलुख, सख्य पेस्तर रवनुदौला याचे मारिफत सुलह करून '–रा १७५३ [ अर सुल्ह् ]

सुलक्षण—न १ शुभकारक चिन्ह गुण २ सद्गुण उच्चपणा इ० वाखाणण्याजोगे गुण ३ –वि चांगल्या गुणाचा चिन्हाचा, शोभायमान [ स ] सुलक्षणिय सुलक्षणी-वि १ शुभकारक चिन्हाचा ( घोडा माणूस ) २ सद्गुणी, सुंदर, देखणा

सुलाख—पु सोनें-चांदीच्या दागीन्या नाण्यांतील धातूच्या शुद्धतेची परीक्षा पाहण्याकरितां त्याला पाडलेलें भोंक ( क्रि० घालणें पाडणें 'गवणें ) [ फा सुराख्=भोंक ] ०णा स्त्री १ वरीलप्रमाणें भोंक पाडणें २ असें भोंक पाडण्याचें हत्यार सुलाखणीनें टोचूनि नाणें । खर पारखिती सज्ञान । ' –भवि ३ २२४ ०णें–

सक्रि १ वरीलप्रमाणें भोंक पाडणें २ (ल) अंतर्बाह्य परीक्षा करणें सुलाखी-वि वरीलप्रमाणें भोंक पाडलेलें

सुलाखणें—अक्रि दागिन्यात भरलेली लाख बाहेर, उघड कीस येणें

सुलार—वि (व) मागें झुकलेली ओझ्याची गाडी सुरळ पहा

सुलीन—वि तन्मय, एकरूप 'तिये पदीं जे सुलीन।' -एरस्व १ ३९ [स.] ॰णें-सक्रि एकरूप होणें, ऐक्यता पावणें, लय पावणें ॰ता-स्त्री पूर्णपणें लीन होण्याची अवस्था.

सुलुक-ख—पु १ स्नेहभाव, सलोखा, मैत्री २ तह, समेट [अर सलूक]

सुलुप—पु उतार, ढाळ [इ स्लोप]

सुले—न मुलाच्या पोटात होणारा डबा नावाचा रोग

सुलेमानी दगड-पत्थर—पु मुसलमान लोक ज्याच्या मण्याची गळ्यात माळ घालतात असा अकीकाच्या जातीचा दगड, त्याचे मणी या दगडातील पाणी प्याल्यानें अनेक रोग नाहीसे होतात -सह्याद्रि आक्टोबर १९३५

सुवण—पु जन्म -शर [म सु=प्रसवणें]

सुव(-व)र—पु डुक्कर [फा]

सुवरा—पु कळीचा कोंब, सुयरा, सुई

सुवर्ण—न १ सोनें धातु २ सोळा माशाचें वजन (५ रती=१ मासा) साधारण ८० गुंजाचा एक तोळा ३ चांगला रंग -वि चांगल्या रंगाचें, जातीचें कुळवाचें [म]॰कदली-स्त्री. सोनकेळ ॰कार-पु सोनार ॰कीटक-पु काजवा, चकाकणारा कोणताहि किडा ॰सोटा-स्त्री सोन्याची लगड 'सुवर्ण खोटी जडपणें निखळ।' —स्वानुदि १३ १६६ ॰गणित-न अंकगणितातील एक रीत, मध्यम सरासरी ॰चलन-न सोन्याच्या नाण्याचा प्रचार, सोन्याचें नाणें ॰धातूचामार्ग-पु किमया 'का सुवर्ण धातूचा मार्ग। दृष्टिवर्णे लागवेग।' -दा ५ २ ३ ॰पथा-पु किमयागार -दाप ३ 'सुवर्णपथी भुररकरी।' -दा ३ ७ ४९ ॰पाद-वि छाती व पाय याचेवर अतिशय केस असलेला (घोडा) ॰पुष्प-स्त्रीन सोनचाफा ॰पुष्पी-स्त्री सोनचाफ्याचें झाड व फूल ॰मध्य-पु दोन परस्परविरुद्ध गोष्टींतून काढलेला मधला मार्ग मध्यम मार्ग, तडजोड, एरंडोली न्याय ॰मालिना वसंत-पु एका मात्रेचें नाव, हींत सोनें असतें ॰माक्षिक मुखी-की-न स्त्री एक सोन्यासारख्या रंगाची औषधी मात्रा विग्माक्षिक ॰स्तेय-न सोन्याची चोरी, पंचमहापातकांपैकीं एक ॰स्तेयी-पु सोनार -वि सोन्याची चोरी करणारा सुवर्णाभिषेक-पु ज्यात ज्या पाण्यात सोन्याचा तुकडा घातला आहे असा पाण्यानें वधूवरास करावयाचा अभिषेक

सुवह—वि १ वाहून नेण्यास सोपें, सोसण्यास सुलभ २ सोशिक [स]

सुवा—पु मोठी सुई, दाभण [हिं]

सुवाच्य—वि वाचण्यास सोपें, सुलभ, स्वच्छ (पुस्तक, अक्षर) [स]

सुवाड—वि सुरेख -हरि २ १८

सुवाड दुवाड, सुवाण—वि (कु) लहरी, चचल

सुवात—स्त्री (गो) जागा

सुवाफळी—स्त्री (कोष्टी) नकशीचा सोवळा भरण्यासाठीं लागणारी फळी

सुवाय सुवावो—पु चांगला वारा -ज्ञा ९ २८ [स सुवायु]

सुवार रू—पु पाकक्रिया, आचारी -शर

सुवारा—पु (बायकी) सुखाचा शब्द आनंदाची वातमी, वार्ता, माहिती, खबर 'नवऱ्याचा मला कधी सुवारा नाहीं' [स सुवार्ता]

सुवारा—पु (कों) खळयातील भात झोडण्याचा दगड

सुवारी—स्त्री (कु) छत असलेली छकडा, गाडी

सुवार्ता—स्त्री चांगली वातमी, खबर [स]

सुवाला—पु गलबताचा सुकाणूकडील चपटा भाग

सुवाव—पु अनुकूल वारा म्हणूनि सवादाचा सुवावा ढळ।' -ज्ञा ९ २८ [स सु+वायु]

सुवाय—पु सहवास -शर

सुवावणें—सक्रि घालणें घेणें (मुठींत) -मनको 'गगन मुठीं सुवावें। मशकें केवीं।' -ज्ञा १ ७४

सुवाशाण—न सुवासिनी पहा

सुवास—पु १ चांगला वास, सुगंध २ चांगली वसति [स] सुवासिक-वि सुगंधि सुगंधयुक्त सुवासिणें-सक्रि सुगंधित करणें सुवासित-वि सुगंधित केलेलें, सुवासिक

सुवासिनी, सुवासीन-ण—स्त्री सवाण स्त्री, नवरा जिवंत असलेली स्त्री, सौभाग्यवती स्त्री [स]

सुवाळा—पु (कों) साधारण फत्तेमारीसारखा, १०० ते १५० खंडी वजन वाहून नेईल असा मचवा

सुवाळी—स्त्री (गो) एक प्रकारचें वाद्य

सुवाळीमवाळी—स्त्री गोड व मृदु भाषण, लाडीगोडीचें भाषण [मवाळी द्वि]

सुविद्य—वि १ सुशिक्षित, शुद्ध पढिक, विद्यासंपन्न, बहुश्रुत २ हुशार बुद्धिमान [स]

सुवी—स्त्री सुई पहा

सुवीण—स्त्री सुइण पहा [सु+वीण]

सुवेत—न पूर्ण मास होऊन झालेलें स्त्रियाचें बाळतपण, अशा प्रकारची प्रसूति योग्यवेळीं व सुलभ रीतीनें झालेली प्रसूति [ सु+वेत ]

सुवेनसो—स्त्री सामर्थ्य

सुवेर—पु सुएर, सोयर, वृद्धि, जननाशौच [ सु+वेर=वेळ ] ०णें—अक्रि वृद्धि असणें ०तुला—वि सुवेर असलेला [ सुवेर+तुला प्रत्यय ]

सुवेळ—स्त्री चागली वेळ, शुभकारक काळ, योग, सोईचा समय [ स ]

सुशक-यय—वि करण्यास सोपें, सुलभ, सत्वर साध्य होणारें, बणारें [ स ]

सुशिक्षित—वि चागला शिकलेला, शिकवणुकीचा, उत्तम शिस्तीचा किंवा वळणाचा [ स ]

सुशी—स्त्री १ एकप्रकारचें पटेदार सुती कापड, गादीचें कापडें २ लहान मुलाच्या पोटांत होणारा एक रोग

सुशीत—वि ( माण ) संचित

सुशील—वि उत्तम वर्तनाचा, सद्वर्तनी, सुस्वभावी [ स ]

सुशेल—स्त्री ( कु ) कोवळ्या फणसाची भाजी

सुशोभित—वि उत्तमप्रकारें नटविलेलें, शोभायमान, शोभित [ स ]

सुश्रात—वि ( काव्य ) अत्यत दमलेला, थकलेला, श्रात [ सु+श्रातणें ] सुश्रातणें-दमणें, थकणें, श्रमित होणें

सुश्राव्य—वि कर्णमधुर, ऐकल्यावर मनास प्रसन्नता देणारें, ऐकण्यास सुखकारक ( गाणें, भाषण इ० ) [ स ]

सुषमा—स्त्री उत्तम प्रकारची शोभा [ स ]

सुषुप्त—वि गाढ निजलेला, झोंपलेला [ स ] सुषुप्ति-स्त्री गाढ झोंप, जागृति व स्वप्न या दोहोंहून भिन्न अशी तिसरी अवस्था हींत अत करणवृत्तीचा अज्ञानात लय झाल्यामुळें कोण त्याच विषयाची स्फूर्ति असत नाहीं ज्ञानशून्य अवस्था [ स ]

सुषुम्ना—स्त्री ( योग ) शरीरांतर्गत इडा व पिंगला या दोन नाड्यामधील एक नाडी [ स ]

सुष्ठ-ष्ट—वि चागलें, शुभ [ स सुष्ठु ] सुष्ठासुष्ठ-वि. चागलेंवाईट, बरेंवाईट, शुभाशुभ

सुस—न सुख -हक्क

सुसकार-रा—पु हृदयातल्या खोल जागेपासून वेगानें व शब्द करित बाहेर पडणारा उच्छ्वास, उसासा, ( क्रि० टाकणें, देणें ) [ ध्व ] ०णें—अक्रि वरीलप्रकारें उसासा टाकणें, काढणें

सुसग, सुसगति—पु स्त्री चांगल्या माणसाचा सहवास, सत्समागम [ स ]

सुसड—वि उत्तम सडलेलें ( धान्य ) [ सु+सडणें ]

सुसत—क्रिवि सुसकारून

सुसंबद्ध—वि सुसगत, मागच्या पुढच्याशीं उत्तम मेळ असलेलें, चागलें जोडलेलें ( भाषण इ० ) [ स ]

सुसंबळ—वि ( महानु ) स्ववळानें युक्त राज्यामध्यें सुसबळ साधु। '

सुसमारणें—क्रिवि अगावर सुज चढणें [ सुज+मारणें ]

सुसर—स्त्री मगर [ स सुशिर ? सिधी ससर ]

सुसर—वि चांगल्या वर्तनाचा, सुव्यवस्थित चाललेला

सुसवो—पु पीक पिवळें होऊन सुकू लागण्याचा एक रोग.

सुसह-ह्य—वि सोसण्यास सोपें [ स ]

सुसा—पु १ जनावराचा एक रोग २ ( सोनारी ) तोटी असलेली कासई डिब्यांत पाणी भरून बागेसरी ( शेगडी )त ठेवतात व तोटीतून येणाऱ्या वाफेमुळें विस्तव टिकवितात

सुसा—वि ( व ) बारीक, निमुळता

सुसाइणें—अक्रि ( महानु ) चागली सावली पडणें ' सुसाइली नाखिवें एकें। कवणा साध्यें तें नाटकें। ' —भा ६९

सुसाचणें—अक्रि दम घेणें, उसासा टाकणें [ सुस्कारा ]

सु(सुं)साट-टा—पु १ आवाजयुक्त जोराची गति, गर्जना, गाणें, वाऱ्याचा जोर, गतिमान वस्तूचा आवाज ( बाण, बदुकीची गोळी, पक्ष्याची भरारी इ० चा ) जोराचा शिरकाव, तडाखा, झपाटा, सोसाटा २ जोराचा श्वास [ ध्व ] —क्रिवि वरील प्रकारच्या आवाजानें, सु सु आवाज करीत ०णें—अक्रि वरील प्रकारें आवाज करून सुटणें, वेगानें व आवेशानें जाणें, अंगावर चालून जाणें

सुसार—वि ( गो ) सुसाध्य

सुसास—पु अवकाश —वि सांगण्याजोगें —शर

सुसासा—पु सुसकारा, उसासा ( क्रि० टाकणें, घालणें, देणें ) [ ध्व ]

सुसु—क्रिवि सुसाट ( —क्रिवि ) पहा ( क्रि० करणें ) [ ध्व ]

सुसुद्रो—स्त्री ( व ) चिंचुद्री

सुसूत्र-सुत्रक —वि १ सुसबद्ध पहा २ ( ल ) छानदार, गोंडस देखणा —क्रिवि व्यवस्थितपणें बरोबर

सुसें—न एक रोग सुशी पहा

सुस्कार-रा सुस्कारणें—सुसकार, सुसकारणें पहा

सुस्त—वि मद, आळशी रेंगाळणारा, जड, मद्दड धिम्मा, थड, ढिला, आळसावलेला —क्रिवि थडपणें रेंगाळत ( क्रि० असणें, दिसणें असणें ) [ फा ] सुस्ता-वि सुस्त पहा

सुस्ताई—स्त्री आळशीपणा ढिलाई, थडपणा, दिरगाई, हयगय [ फा ] सुस्तावणें—अक्रि सुस्त होणें उत्साहहीन होणें

सुस्थ—वि चांगल्या अवस्थेत असलेला, सुखी, सुलभ, सोईस्कर [स] सुस्थिति-स्त्री सोईस्कर अवस्था, सोई, सुखदायक अवस्था [स]

सुस्नातणें—क्रि (काव्य) सुस्नातणें पहा

सुस्मित—वि आनंदानें हसणारा, मदस्मित करणारा [स]

सुस्वभाव—पु चांगला स्वभाव, वृत्ति, मनोधर्म [स]

सुस्वर—पु १ (गायन) उत्तम सुर, गळा २-वि उत्तम गळ्याचा, सुराचा; चांगल्या आवाजात म्हटलेलें (गाणें) [स]

सुस्वर—स्त्री (अप) सुसर, मगर

सुहा—पु गायनातील एक राग यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल निषाद हे स्वर लागतात जाति षाडव-षाडव, वादी मध्यम, संवादी षड्ज गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर

सुहा—पु द्वेष, वैर -हार

सुहागी—स्त्री सवागी, टाकणखार [हिं]

सुहाड—पु १ उत्तम योद्धा, राजा 'आइके द्वारकापुर सुहाडा।'-ज्ञा ११ ६७० २ मित्र 'साम्य तेचि सुहाडा। वेदि जाणे।'-ज्ञा ९ २४१ -वि १ सुज्ञ शहाणा 'अगा आत्म परपीडा। बीज तमक्षेत्रीं सुहाडा। पेरिती मग पुढां। तेचि पिके।'-ज्ञा १७ ९९ २ शोभिवंत, मनोरम 'वरि वैराग्याचिया पाखरा सुहाडा।'-स्वादि ७ ३ ३९ [स सुभट]

सुहाव—पु १ आवड, प्रीति, प्रेम 'एकु सुहावें पवाडे पढतु।'-दाव ८४ २ (ल) ब्रह्मसुख -हार -वि सुशोभित, आल्हादकारक, मधुर 'आणि शाब्दादिक सुहावे।'-ज्ञा १५ १६१ [स सुभग] सुहावणें-क्रि १ सुशोभित करणें २ रचना, उभारणी करणें 'वरि मंडप सुहाविला।'-स्वादि १० १ २ ३ तयार करणें 'जन्ममृत्यूची सुरगी। सुहाविली निलागी।' -ज्ञा १३ ४८

सुहावना—वि (महा) सुंदर 'कान्हा मना सुहावना। रावो गाती श्री चक्रपाणी। -धवळेउ ५९

सुहावा—वि आवडता, साह्यकर्ता 'जयजय सर्व विसावया। सोहंभाव सुहावया।'-ज्ञा १४ २

सुहास्यवदन—वि हसतमुख असणारा

सुहीण—स्त्री सुईण पहा

सुहृत्-द्—पु १ प्रेमळ मित्र, सोबती २ (ल) लढाईंतील दोस्त राष्ट्र [स] ०ता-स्त्री मैत्री

सुहृदय—नवि चांगलें मन चांगल्या अंतःकरणाचा, स्नेहाळू [स]

सुहेर, सुहेरणें सुहेरतुला—सुवेर इ० पहा

सुळ-कन-कर-दिनी-दिशी—क्रिवि सुळ् अशा आवाजानें गुळगुळीत बुळबुळीत पदार्थावरून घसरणें, निसरणें किंवा त्यावेळीं होणाऱ्या आवाजाप्रमाणें आवाज होऊन (क्रि० गळणें, सुटणें, निसटणें, पडणें, उडणें) [ध्व] सुळकं(का)डी-र्डुडी-स्त्री सुरकडी पहा सुळकणें-अक्रि १ बाजूनें-मधून-आंतून हळूच घसरणें, निसटून जाणें, सुकाट्यानें निघून जाणें २ (व) बारीक, निमुळतें होणें

सुळका—पु १ डोंगराचा, खडकाचा, फडयाचा शूळाप्रमाणें खालीं रुंद व वर क्रमाक्रमानें निमुळता होत गेलेला माथा, शिखर २ सुळा दात, शंकुप्रमाणें निमुळता होत गेलेला एखाद्या वस्तूचा भाग ३ पीक कापल्यावर राहिलेला खुंट, सरळ व वर निमुळता होत गेलेला वृक्ष ४ दाराच्या चौकटीचा एक भाग, चौकटीच्या बाहीच्या उलट बाजू ५ (कु) नारळ सोलण्याचें निमुळतें हत्यार, उलकड [स शूल] सुळकी-स्त्री खुंटी, दांडा इ०चें निमुळतं अग्र, निमुळती झालेली कोणतीहि वस्तु सुळकु(कं) चा-सुळखांब-खुंबा-पु १ बैलरहाटाचे कणेकडाचे खालीं आंत तुंब भरून उभा केलेला निमुळता खांब, तुंब्याचा आधार २ सुळका सुळकेपट्टी-स्त्री दाराच्या बाहेरच्या बाजूस माथ्या वर जशी गणेशपट्टी किंवा कपाळपट्टी असते तशी आंतल्या चौकटीची वरची पट्टी सुळबुळाट-पु सुळसुळाट पहा [सुळ ध्व] सुळबुळीत-वि बुळबुळीत सुळसुळ-स्त्री सुळसुळाट पहा सुळसुळणें-अक्रि १ सुळकणें पहा चुळबुळणें, चळवळणें २ मागें सुगळा लागणें, धादल उडणें सुळसुळाट-पु १ अतिशय मोठी चुळबुळ, गर्दी, वळवळ चुळबुळ सुगळा, धादल, गडबड (मुलें, उंदीर, पक्षी, भिकारी, लोकांचा जमाव इ० ची-आंत बाहेर येणेंजाणें वगैरेची). (क्रि० लावणें, मांडणें, करणें, लागणें, सुटणें, होणें) छपरातून उंदीर, साप इ० ची येरझार २ फार त्रास ३ विपुलता सुळसुळीत-वि १ बुळबुळीत निसरतें (अतिशय जिल्हई दिल्यामुळें) २ जीर्ण झाल्यामुळें उतरलेलें (धोतर इ०)

सुळा—पु १ अणकुचीदार दांत तोंडातील सुळ्याचा दात, हत्तीचा पुढचा दात, डुकर, साप, वाघ मांजर यांचे अणकोचीचे दांत, अणकोचीचा खुंटा, चालतांना पायास खुपणारा जमीनींतून वर आलेला खडा खुंटाग्र इ० २ मास इ० भाजावयाची एक प्रकारची लोखंडी सळई ३ वसई, करोट गवताचें बीं ४ पक्षाचे अंगावरील गोचिडाप्रमाणें पडणारा एक जंतु रू (क्रि० पडणें) ५ मोटेचें चाक ठेवण्यासाठीं जे दोन खांब विहिरीचे कांठावर झुकते उभे केलेले असतात ते प्रत्येकीं [स शूल] ०गीर-वि (घरावरील छपर) फार उताराचें, याचें उलट माठ सुळावरची पोळी-स्त्री अत्यंत धोक्याचें, जिवावरचें जिकीरीचें काम, जो लाभ मिळवावयाला जीव धोक्यांत किंवा संकटांत घालावा लागतो तो 'मृगसाली गल्बतांत बसून जाणें हे सूळावरची पोळी आहे'

**सुळी**—स्त्री (तंजावर) देवदासी, कलावंतीण, नायकीण [का सुळे=वेश्या, देवदासी]

**सुज्ञ**—वि विद्वान, समजस, बुद्धिवान, जाणता, शहाणपणा असलेला [म]

**सू**—स्त्री सुई (शिवण्याची) [सुई]

**सू सूं**—क्रिवि १ जोरानें व वेगानें बाहेर पडल्यानें होणाऱ्या आवाजाप्रमाणें (सापाचा फुत्कारा, बाणाचा वेग, वादळाचा आवाज इ०) २ सुरपारंबी खेळांत तोंडानें उच्चारावयाच्या शब्दाप्रमाणें आवाज करून (क्रि० करणें) ३ -स्त्री वरीलप्रमाणें होणारा आवाज व क्रिया, (क्रि० करणें) [ध्व] •निघणें-सुटणें-पळणें-धावणें-वाऱ्याच्या वेगानें (घोडा, दौड करणारा मनुष्य,इ०) पळणें **सू काढणें-हाकणें-दपटणें-दवडणें**-(घोड्यास) जोरानें धावविणें •वाऱ्या करणें-वेगानें निसटणें, पळून जाणें

**सू**—वि (समासांत उत्तरपदीं) जन्म देणारी उदा० 'वीरसू, विश्वसू' [स]

**सू**—स्त्री (हेट) न उघडलेली कोंवळी झावळी, पान; सुसरा

**सू**—स्त्री बाजू

**सूक**—पु शुक्राची चांदणी [स शुक्र]

**सूकर**—पु १ डुकर २ एक जातीचें हरिण [स]

**सूक्त**—न वेदांतील कांहीं ऋचांचा समूह -वि चांगलें म्हटलेलें, बोललेलें, चांगलें, बरें, योग्य, प्रशस्त (भाषण, वर्तन, इ०) सुक्तासुक्त पहा

**सूचक**—न सूण, निदान, तर्क -पु हेर, बातमीदार -वि १ सूचना, माहिती, कल्पना, ओळख, बोध इ० करून देणारा २ चहाडी करणारा ३ भेद, छेद पाडणारा ४ सभेपुढें ठरावाची सूचना मांडणारा [स]

**सूचणी**—स्त्री (काव्य) सूचना 'ऐसी वार्धक्याची सूचणी।'-ज्ञा १३.५७५

**सूचन-ना**—न स्त्री १ इषारा अप्रत्यक्ष रीतीनें कळविलेली गोष्ट, इषारत, सुचवणी व तिची क्रिया २ सभेच्या विचाराधें लायक सदस्यानें योग्य वर्दी देऊन मांडलेली योजना, कल्पना [स] **सूचित**-वि सुचविलेलें, दर्शविलेलें, इषारा दिलेलें, ओळख करून दिलेलें **सूची**-वि १ (समासांत उत्तरपदीं) सुचविणारा, सूचक (-वि पहा) उदा० हर्षसूची, मरणसूची २ भोसकणारा [स]

**सूचिका, सूची**—स्त्री १ सुई; अग्र २ अनुक्रमणिका, विषयांची यादी ३ प्रस्तावना ४ (ज्यो) पृथ्वीच्या गोलाची कोनाकृति छाया, हिच्यांत चंद्र प्रवेश करतो म्हणून ग्रहण होतें ५ गुच्छा, पिरामीड, शंकु, हत्तीची सोंड; अणकुचीदार खाब इ० [स] म्ह० सुची प्रवेशे मुसलप्रवेश •कटाह न्याय-पु एक अति लहान व एक अति मोठी अशीं दोन कामें युगपत् प्राप्त झालीं असतां, लहान काम अगोदर करून टाकावें अशा अर्थाविषयीं दृष्टांतलेंकरून घेतात जें, सुई व कढई हीं दोन घडावयाचीं असता सुई आधीं घडतात, असें जें एक लोकव्यवहाररूप प्रमाण तें. **सूचित**-वि भोसकलेलें, टोंचलेलें, छिद्र केलेलें **सूच्यग्र, सूचीमुख**-वि कोनासारखा, अणकुचीदार, निमुळता [स सुचि=सुई+अग्र]

**सूज**—स्त्री शरीरास कांहीं विकारामुळें येणारा फुगीरपणा; फुगवटी [स शोथ, हिं सूज, फा सोज़्=दाह]

**सूं झ्या**—स्त्री झपाट्यानें पळणें, सु वाऱ्या (क्रि० करणें) [सुर-पारंबीच्या खेळांतील शब्द+झ्या=घोड्यास हाकताना उच्चारण्याचा शब्द]

**सूट**—स्त्री १ (कर्ज इ० तून) माफ केलेली, सोडलेली रकम २ (गुलाम, वर्दी इ० स) बंधनांतून मुक्तता, सुटका, सोडवणूक ३ रांगेंत मध्यें पडणारा खड, दोन पदार्थांतील अंतर, फट. ४ (ना) वीर्यस्खलन ५ (व) वाळलेली मिरची. [सुटणें] •पत्र-न सोडचिठ्ठी, माफपत्र, साक्षत •मोकळ-स्त्री १ कांहीं काळापुरती केलेली सुटका (क्रि० असणें, होणें, चालणें, भोगणें, देणें) २ कर, दस्तुरी, कर्ज इ० तून मिळालेली सूटरकम, सोडमोकळ [सुटणें+मोकळें होणें] •साट-सांड-तूट-स्त्री सूट अर्थ १ पहा, सूटमोकळ अर्थ २ पहा

**सूड**—पु १ शोध, तपास, चौकशी, विचारपूस (क्रि० काढणें, लावणें, लागणें) २ बदला, परतफेड; उट्टें, वचपा, अपकाराची प्रतिक्रिया (क्रि० काढणें, लावणें घेणें) 'मारिलियाचेनि रागें। पाटीचा जरी सूड मागें।'-ज्ञा ११.५४२ ३ खतावणींतून काढलेला हिशेबाचा उतारा उदा० (व) पहाणीसूड ४ हिशोब उघडकीस आणणें ५ नगारा, तबला इ० वाद्यें वाजविण्याची विशिष्ट गति, प्रकार (क्रि० मारणें) (त्यावरून) खंड न पडतां चाललेलें कोणतेंहि कार्य, अखंड क्रिया ६ अनेक कलमें लिहिलेला कागद, सूडबंद ७ शेतपांची शेतांची फळ वारीनें अथवा नंबरवारीनें यादी ८ ढोल इ० वाजूं लागल्यापासून मध्यें अवसान घेईतोंपर्यंत वाजविण्याचा व्यापार ९ (व) विशिष्ट प्रकारचा गीतसमूह १० ताण देऊन काम करणें [स शोध, का सुड़िसु = तिरस्कार करणें] •घेणें, उगवणें-उट्टें काढणें •दायी-वि (ना) डाव, त्रासदायक •बंद-पु अनेक कलमांचे सूड लिहिलेली यादी, गावखतावणींतून काढलेले हिशेब किंवा माहितीपत्रकाची जंत्री

**सूड**—स्त्री (ना) न फोडलेलें सरपण, लांकडें [का सुड= जाळणें, दग्ध]

सूर्णे—सकि घालणें, ठेवणें 'तू धरूनि देहाभिमानातें। दिठी सूनि या शरीरातें।'-ज्ञा २ १३७ [स सु=ठेवणें]

सूत—न १ धागा, दोरा, तार, रेषा, ततु (विशेषत कापसाचा) २ (ल) सधान, सबध (आश्रय, आधार इ० चा), मार्ग, उपाय (मिळविण्याचा सपादण्याचा, साध्य करण्याचा) नात्यागोत्याचा सबध ३ नासकें फळ ४ जखम इ० मध्यें धाग्याप्रमाणें आढळणारा एक जतु ५ कापडाचें वीण काम, वीण ६ (ल) समेट, स्नेहभाव, मित्रत्वाचा सबध ७ भगदीं थोडी लाबी दाखविणारें माप, एकअष्टमाश इच ८ लाकूड कापण्यासाठीं त्यावर खूण करावयाची दोरी ९ चातुर्य, शहाणपण [म सूत्र] (वाप्र) सुताचा तोडा-१ दोन्याचा तुकडा २ (ल) क्षुल्लक रक्कम, वस्तु 'शमर रुपय दिले त्यापैकीं सुताचा तोडा हातीं लागला नाहीं' सुतानें सूत लागणें-एका गोष्टीच्या शोधानें दुसरीचा शोध लागण सुतानें स्वर्गास जाणें-स्वर्ग गाठणें-किंचित सुगावा लागताच त्यावरून तर्कानें एकदर सर्व गोष्टींचें स्वरूप ओळखणें सुतास (सूतीं) किंवा सुतींपातीं लागणें-सुरळीतपण चालू लागणें नीट व्यवस्था लागणें सुतास-सुतीं-सुतीपातीं चालणें, लावणें-सुरळीत असणें, लावणें ०बाधणें-सबध जोडणें, धागा लावणें (नातेंगोतें, मित्रत्व इ० चा) (मूठभर) सूत बाधणें-देणें-(स्नेहदर्शक चिन्ह म्हणून एखाद्यास) पागोटें देणें ०असणें-स्नेहसबध असणें, जुळतें असणें ०जमणें-मैत्री जमणें (नाकाशीं) सूत धरणें-(मरणोन्मुख अवस्थेंत श्वासोच्छ्वास चालला आहे की नाहीं हें पाहण्यास नाकाशीं सूत धरतात यावरून) मरणोन्मुख अवस्था सूत नसणें-मैत्री नसणें सामाशब्द- ०काडी-स्त्री (कोष्टी) जिच्या भोंवतीं सूत गुडाळलेलें असतें ती काडी, गणा, रिकाडी सुतणें-सकि वेष्टणें -शर ०परमें न परम्याचा एक प्रकार, लघवींतून सुतासारखे जत जाणें ०पाड-पु न सणगाची वीण व किंमत 'ह सणग सुतापाडास बरें आहे' ०पात-पात-पु कापडाचें विणकाम, बनावट, वीण

सूत—पु १ बाप क्षत्रिय व आई ब्राह्मण अशाची सतति अशी जात व तींतील व्यक्ति याचा धदा सारथ्याचा (त्यावरून) २ सारथी ३ सुतार ४ भाट पुराणिक [स] ०उवाच-ज्या सगळ्या पौराणिक कथा वरील जातींतील एका पुराणिकानें सांगितल्या आहेत म्हणून प्रत्येक कथेच्या प्रारभीं हा शब्द असतो (यावरून) प्रारभ करणें

सूत—वि जन्मलेला, झालेला [स]

सू(सु)तक—न १ जननाशौच, सुवेर २ ग्रहणातील अशौच ३ मृताशौच [स सु=प्रसवणें] सू(सु)तकी—वि सुतक असलेला

शको ७ ३५

सूतपणें—अकि तन्मय होणें -शर

सूतशेखर—पु पित्तशामक एक औषधी मात्रा [स]

सूति—स्त्री १ जन्म, बाळतपण २ सतति ३ प्रवेश -ज्ञा १० १०९ [स सु=प्रसवणें] सूतिका-स्त्री १ नुकतीच बाळत झालेली स्त्री २ बाळतरोग सूति' ह सूतिकागृह-न बाळतिणीची खोली सूतिमास-पु बाळत झाल्याचा महिना

सूत्याशौच—न सुखरूप झालेल्या बाळतपणाचें १० दिवसाचें सुवेर, वाळा झाल्यास गर्भारपणाचे जितके महिने झाले असतील तितके दिवस पाळावयाचें सुवेर

सूत्कार—पु जोराचा सोडलेला श्वास, फूत्कार [ध्व]

सूत्र—न १ सूत, धागा, ततु, दोरा २ कळसूत्री बाहुलीची दोरी, तार, (यावरून) एकाद्या यत्रातील किंवा भानगडीच्या धद्या-उद्योगातील मख्खी चावी किल्ली, युक्ति, सधान, फिरकी, तसेंच त्या रचनेची युक्ति, पूर्वी करून ठेवलेली योजना, यत्राच्या कृतीची पद्धत, रीत उ० मनसूत्र म्हणजे मनाचा कल, इच्छा, आवड ३ नियम कायदा, तत्त्व, सूचना, शिकवण याची ठरीव पद्धत, ठराविक रीत ४ व्याकरण तर्क इ० शास्त्रातील नियम, शास्त्रप्रवर्तक आचार्यांनीं त्या त्या शास्त्रावर लिहिलेले मूलग्रथ, त्यातील सुटीं वाक्यें ५ (कायदा) हुकुमनामा, निर्णायक मत ६ जानवें ७ ओळबा ८ वात (कापसादिकाची) ९ (ल) सरळ ओळ, राग तैसें दिसें सैन्यसूत्र।'-एरुस्व६ ५५ १० (ल) मैत्री, सधान [स] ०जमणें-गट्टी जमणें सामाशब्द- ०क-वि १ बिनचूक, सरळ, सुतामध्यें, निश्चित, बरोबर २ सरळ, एका रेषेंत, लबरेषेंत, समपातळींत असलेला (रस्ता, भिंत, काठी, खाब) ३ बरोबर, नियमित, (त्यावरून) नीटनेटका छानदार ०काठी-स्त्री मागच्या हात्यास लाविलेली किंवा जोडलेली काठी ०जंत-पु एक प्रकारचा बारीक जताचा किडा ०धार-पु नाटकाध्यक्ष, नाटकासबधी माहिती करून देणारें मुख्य पात्र २ कळसूत्री बाहुल्याच्या खेळात ज्याच्या हातात बाहुल्याच्या दोऱ्या असतात तो माणूस ३ मडळ, समाज सघ इ० चा मुख्य चालक ०धारी-पु सूत्रधार अर्थ २, ३ पहा ०प्राय-क्रिवि थोडक्यात, सक्षेपानें सूत्रात्मा-पु हिरण्यगर्भ [स] सूत्रा-त्री-वि सूत्रक पहा शहाणा, तरबेज चतुर, चलाख, निष्णात, धूर्त तीक्ष्ण बुद्धीचा 'ज्यासु सहजें सूत्री बळी।' -ज्ञा १८ ३५ [स]

सूद कल्याण—पु (सगीत) कल्याण रागाचा एक प्रकार

सूदणें—अकि उकि १ मारणें ठार मारणें, वध करणें (विशेषत काव्यात) २ रिघविणें घालणें ठेवणें 'नयनीं सूदलें अजन।' -एरुस्व ७ २४ [स सूद्=ठेवणें मारणें] सूदन-न वध हनन

**सूद्रसेव**—पु. (गो.) १ पलंगपोस; चादर. २ मच्छरदाणी.

**सून**—स्त्री. १ मुलाची बायको. २ पुतण्याची किंवा मुलासारखा मानलेल्या पुरुषाची स्त्री. [ सं. स्नुषा; प्रा. सोण्हा,सुण्हा ] म्ह० १ कसी गे सुने घरासारखी. २ (गो.) सुने फुडे खावचें धुये फुडें भोगचें=सुनेच्या हातीं कारभार जाण्यापूर्वी खावेंप्यावें व मुलगी मोठी होण्यापूर्वी दागदागिने घालण्याची हौस भागवून घ्यावी. ३ चार दिवस सासूचे चार दिवस सुनेचे=सून लहान असतां सासू आपला अधिकार गाजविते, पुढें सुनेस मुलेंबाळें झालीं व सासू म्हातारी झाली म्हणजे सुनेस आपला अधिकार गाजविण्याची संधि मिळते. ॰मुख–न. लग्नांत वरातीच्या अगोदर करावयाचा एक समारंभ. यांत सासू आपल्या सुनेचें तोंड पाहते व तिच्या तोंडांत साखर घालून तीस मांडीवर बसवून अंगावर दागिने घालते.

**सून**—पु. (कु.) पौष महिना. [ सं. शून्य ]

**सूना**—पु घोड्याच्या जिभेखालचा भाग.

**सूना**—स्त्री. झाडणें, कांडणें; दळणें, चूल पेटविणें, पाणी भरणें या पांच घरकामाच्या वेळीं किडे इ० च्या हिंसा घडतात त्या प्रत्येकीं. [ सं. ]

**सूनि**—क्रिवि. डोळ्यापुढें ठेवून, असून, घालून. 'म्हणौनि निवृत्तीची माडिली । सूनि प्रवृत्तितळीं ।' –ज्ञा १८.७०४. [ सं. सू=ठेवणें ]

**सूनु**—पु पुत्र; मुलगा. [ सं. ]

**सूनृत**—वि. खरें; सत्य; गोड (भाषण). –पु. खरें व मधुर भाषण. [ सं. ] म्ह० सत्य आणि सूनृत.

**सूप**—न. १ धान्य पाखडण्याचें वांबूचें केलेलें एक साधन; पाखडण. २ ओढा–डबकें यातील पाणी शेतास देण्याचें एक साधन. [ सं. शूर्प ] म्ह० भरल्या गाड्यास सूप जड काय ! **सुपा एवढें काळीज होणें**–आनंदानें हृदय प्रफुल्लित, मोठें होणें, फुगणें. **सूप फडफडणें–वाजणें**–विवाह वगैरे समारंभ संपला, *मांडव परतणें वगैरे झालें म्हणजे हें मंगलकार्य समाप्त झालें असें* दर्शविणें (त्या साठीं उपाध्याय एखाद्या समिधेनें सूप वाजवितो) मग कार्यासाठीं आलेले पाहुणे परत जातात.

**सूप**—न. वरण. [ सं. ] ॰कर्म–न. पाकक्रिया; स्वयंपाक. ॰कार–पु स्वयंपाकी. ॰शास्त्र–न. स्वयंपाकाचें शास्त्र, रीत, विद्या, पाकशास्त्र.

**सूपरम, सूपराम**—पु मरण. 'रडोनि त्या सांगती सूपरामो ।' –वामन भरतभाव. [ सं. ]

**सूपवती**—स्त्री. (महानु.) आसन. –ऋ १२५.

**सूम**—वि. (व.) कंजूष, चिक्कू सुम पहा. [ अर. शूम ]

**सूय**—स्त्री. १ सुई (शिवण्याची). २ केळ्याचा घड. सुई पहा. ३ (गो.) एक प्रकारचें पक्वान्न. [ सं. सूची ]

**सूर**—पु. १ गाण्यांतील स्वर; आवाज; मधुर ध्वनि. २ नाकांतून बाहेर सोडण्यांत येणारा श्वास. (क्रि० काढणें; घालणें; जाणें; बंद होणें). ३ सनई, पावा इ० वाद्यें सप्त स्वरांनं वाजत असतां, त्या स्वरांचें सामान्य रूप घेऊन जें सतत एक सारखें लांब सनईप्रमाणें वाद्य वाजवितात तें. यानें सुराचा भरणा होतो. ४ सूरपारंबी खेळांतील फेकावयाची व परत आणावयाची काठी. [ सं. स्वर ] ॰काढणें–(ल.) रडणें. ॰धरणें–१ स्वर संभाळणें. २ (आटयापाटया) मधली पाटी धरणें. ३ सूर देणें; साथ देणें, री ओढणें. ॰देणारा–पु. सूर ओढणारा, साथ करणारा इसम. ॰बंद होणें–१ थंडी वगैरेमुळें (नाकांतील) श्वासास अडथळा होणें. २ श्वास बंद होऊन मरणें. ॰वाहणें–१ वरील प्रकारचा अडथळा दूर होणें. २ (एखाद्या कामाची) शक्यता किंवा संभव दिसणें; मनाचा कल होणें. ॰करी–दास–भीस–पु. गाणाऱ्याचा साथीदार; त्याचें स्वरपूरण करणारा. ॰भरणा–पु गाणाऱ्यास सुराची मदत करणें, साथ. ॰भरवणी–स्त्री. १ सूर भरण्याची क्रिया; अनेक वाद्यांचे एक सूर जमविणें. २ साथ. ॰ज्ञान–न. स्वरज्ञान. [ सं. ]

**सूर**—स्त्री. (कों.) नारळाची दारू (पिण्याची). [ सं. सुरा ]

**सूर**—पु. सूर्य. 'उदयापूर्वीच हरी तेजोलेशेंचि जेंवि सूर तमें ।' –मोकर्ण ७.१८. [ सं. सूर्य ]

**सूर**—वि. शूर; वीर. [ सं ] ॰मर्द–पु. शूर पुरुष; धाडसी माणूस. [ शूर+मर्द ]

**सूरण**—पु सुरण पहा.

**सूरपारंबी**—सुरपारंबी पहा.

**सूरमदी**—पु (नाविक) आग्नेयीकडील वारा.

**सूर मल्हार**—पु (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल मध्यम, पंचम, कोमल निषाद हे स्वर लागतात. जाति–औडुव–औडुव, वादी मध्यम, संवादी षड्ज. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. [ सं. ]

**सूर्त**—न. (गो.) सूर भरण्याचें वाद्य.

**सूर्य**—पु. १ आकाशस्थ ज्योतींपैकीं पृथ्वीला विशेष महत्त्वाची एक ज्योति. इतर तारकांप्रमाणें हीहि एक तारकाच आहे. पृथ्वीवरील चराचर वस्तूंचें रक्षण–पोषण होण्यास लागणारी उष्णता याच्यापासून मिळते. याच्या उदयास्तानें दिवस–रात्र होतात पृथ्वीपासून याचें अंतर ९ कोटी.२७ लक्ष मैल; याचा व्यास ८५००५०० मैल. हा आपल्या आंसाभोंवतीं सुमारें २५ दिवसांत प्रदक्षिणा करतो; आदित्य. रवि; भानु २ सूर्यदेव.

[स] म्ह० सूर्यापुढें काजवात–काजवा (वाप्र) सूर्याचे आड–, सूर्य प्रकाशात सूर्याची हरणें–पिलें दाखविणें–मुलाचे कान पकडून त्यास वर उचलणें, कानाच्या पाळ्या आगठ्यानें जोरानें दाबून उचलणें. याच अर्थी–समुद्र दाखविणें, काशीची वाट दाखविणें, घोरीस घोरें आणणें इत्यादि वाक्प्रचार आहेत हा सूर्य आणि हा जयद्रथ (= हीच ती वेळ व हाच तो माणूस), एखाद्याचा दोष पुराव्यानिशी त्याच्या पदरीं घालणें. सामासिकशब्द– ०उजेडीं–क्रिवि दिवसाढवळ्या सूर्यप्रकाश असतां ०कन्या–स्त्री (सांकेतिक) भाकरी (भास्करीपासून) [स] ०कर–पु किरण [स] ०कमळ–पु सूर्य उगवल्यानंतर उमलणारें व उदोदित सूर्याकडे तोंड असणारें एक कमळ [स] ०कमळी–स्त्री वरील कमळाचें झाड ०कांत–पु १ सूर्य किरणाचें एका केंद्रांत परावर्तन करून उष्णता उत्पन्न करणारा एक विशिष्ट प्रकारचा स्फटिकमय मणि, याची पंचायतनात सूर्य म्हणून पूजा करतात २ एक सूर्यफूल ०कांती–वि सूर्यकांतमण्याचा (पदार्थ, आरसी इ०) [स] ०क्षार–पु एक प्रकारचा क्षार, सोरा [स सूर्यक्षार] ०ग्रहण–न सूर्य आणि पृथ्वी यांच्यांत चंद्र आला म्हणून सूर्य दिसेनासा होणें, हें ग्रहण अमावास्येस होतें, जुन्या हिंदु शास्त्राप्रमाणें सूर्याचा कतु ग्रहानें केलेला ग्रास [स.] ०तवकडी–स्त्री सूर्यपूजा करण्यासाठीं बायका ज्या ताम्हनात, तवकावर सूर्यप्रतिमा काढतात तें पात्र [सूर्य+तवकडी] ०तळीं–क्रिवि सूर्याचे खालीं, पूर्वेस [सूर्य+तळ] ०दर्शन व्रत–न सूर्य मेघानीं आच्छादित झाला असता त्याचे दर्शन होईपर्यंत उपोषण करण्याचें व्रत [सूर्य+दर्शन+व्रत] ०नंदन–पु १ यम २ शनि ३ सुग्रीव ४ कर्ण ०नक्षत्र–न ज्या नक्षत्राजवळ सूर्य असेल तें नक्षत्र [स] ०नारायण–पु देवतारूप सूर्य [स] ०पत्र–पान–न अब्दागीर 'आणि तीं सूर्यपत्रें।' –माधवरामायण बाल कांड ३९ ०पर्व–न सूर्य ग्रहण, व्यतीपात, सूर्यसंक्रांत, अमावास्या इ० पर्वें प्रत्येकीं [स] ०पिलूं–न लहान दिवा ०पुट–ठ–न सूर्याचें उन्ह देऊन वाळविण्याची क्रिया (औषधी, रसायनें इ०), उन्हाचा ताप [स] ०पुटा–वि उन्हात वाळविलेलें (औषध इ०) ०पाटी शनैश्चर–पु (शनि हा सूर्याचा मुलगा त्यावरून) चांगल्या बापाचा वाईट मुलगा ०फूल–पु सूर्यकमळ पहा ०बिंब–न सूर्याचें बिंब किंवा प्रतिबिंब [स] ०भक्त–वि १ सूर्याचा भक्त २ (थट्टेनें) दिवाळखोर (सूर्योपासकाप्रमाणें, हात वर करून दिवाळं वाजल्याचें जाहीर करण्याच्या रीतीवरून) ०मंडल–न १ सूर्याचें बिंब २ सूर्याच्या आसपासचा प्रांत, प्रदेश, याचा स्वामि सूर्य असतो सूर्यलोक [स] ०मंडळी–स्त्री ज्या सूर्य व त्या सभोंवती फिरणारे इतर गोल, ग्रह, उपग्रह इ० ०मणि–पु सूर्यकांत पहा ०माला–स्त्री सूर्यमंडळी पहा ०यंत्र–न १ सूर्याच्या पूजेसाठीं ताम्याचे पत्र्यावर किंवा एखाद्या फळ्कावर काढलेली प्रतिमा, एक विशिष्ट रेखाकृति २ ग्रहाचे वेध घेण्याचें एक यंत्र [स] ०लता–वल्ली–स्त्री एक प्रकारचा वेल ०लोक–पु सूर्यमंडल पहा ०वंश–पु सूर्यापासून झालेला एक राजवंश उ० श्रीरामाचा वंश ०वंशी–वि १ सूर्यवंशातील (राजा) २ (ल) सूर्योदय झाल्यावर निजून उठणारा ०विकासी–वि दिवसा उगवणारें व रात्रीं मिटणारें (फूल कमळ इ०) ०संतान–न १ सूर्याची प्रजा, वंश, मूल २ (शनी हा सूर्यपुत्र पण खोडकर म्हणून ल) चांगल्या बापाचा वाईट मुलगा ३ भाकरी ०सूर–पु उजव्या नाकपुडींतून निघणारा श्वास, याचे उलट चंद्रसूर ०स्नान–न उन्हात बसणें ०हार–पु बायकांचे गळ्यातील सूर्याच्या आकाराच्या टिकल्यांचा एक हार सूर्याचें झाड–न सूर्यकमळी पहा सूर्यावर थुंकणें–(ल) एखाद्या थोर व्यक्तीची निंदा करून स्वतःचें हसें करून घेणें सूर्यावर भुंकणें–प्रसिद्ध पुरुषाची वृथा निंदा करणें सूर्यावर्त–पु अर्धशिशी दुखण्याचा एक प्रकार, ही सूर्याच्या उदयापासून वाढत जाऊन सूर्यास्तास बंद होते सूर्यास्त–पु सूर्य मावळणें सूर्येंदुसंगम–पु अमावास्येनंतरचा चंद्रोदयाचा पहिला दिवस [स सूर्य+इंदु+संगम] सूर्योदय पु सूर्य उगवणें सूर्योपासक–वि १ सूर्याची पूजा करणारा सूर्य पूजक २ (ल) दिवाळखोर सूर्योपासना–स्त्री सूर्याची भक्ति उपासना, पूजा इ०

सूल—पु एक प्रकारचा ताल, यात मात्रा दहा व विभाग पाच असतात

सूस—पु स्त्री एक प्रकारचें कंदमूळ [हिं]

सूळ—पु १ शूल पहा २ एक प्रकारचें हत्यार सुळीं चावयाची वेळ–भर दुपारची वेळ [स शूल] सुळीं देणें–सुळाच्या तीव्र अग्रावर दाबून बसवून मारणें सुळावरची पोळी–स्त्री जीव धोक्यात घालण्यासारखें काम सूळ घेणें–अत्यंत कष्टप्रद काम करणें ०घेणा–ण्या–वि कठीण, अवघड, दुःसाध्य (काम) ०बाघ पु चढाचा व अरुंद रस्ता, सुळक्यासारखा बधारा, बाघ

सूक्ष्मना—स्त्री सुषुम्ना (नाडी) याचा अपभ्रंश

सूक्ष्म—न ब्रह्म (सर्व विश्वाला व्यापून राहिलेलें पण सूक्ष्माहून सूक्ष्म) –पु १ अणु २ साहित्यातील एक अलंकार वाच्यालंकार पहा –वि १ बारीक, लहान, थोडें, अणुप्रमाण २ नाजूक, साधारण किंचित् ३ सुरख; विरळ ४ विरविरीत, ठिसूळ ५ दिसण्यांत डौलदार, सुरेख [स] ०दर्शक यंत्र–न सूक्ष्म व अति सूक्ष्म पदार्थ पाहण्याचें यंत्र ०दर्शी–दृष्टि–

द्रष्टा–वि तीव्र नजरेचा, बारकाईनें पाहणारा, मर्मज्ञ ०देह–शरीर–पु न लिंगदेह पहा, वासनात्मक शरीर ०बुद्धि–वि अतिशय बुद्धिमान, मर्मज्ञ, मार्मिक ०मान–न १ अगदीं बरोबर व सूक्ष्म माप, बिनचूक मोजमाप २ सविस्तर व ततोतंत अंदाज. ३ (विपल, पल, विकला, कला इ० निमेषापासून संवत्सरापर्यंत) काल–विभागाचें मोजमाप, याचे उलट स्थूलमान ०वाद–पु परमाणुवाद (एका परमाणूपासून आत्मा झाला हा) याचे उलट स्थूलवाद ०वादी–पु सूक्ष्म वादाचें समर्थन करणारा ०संचयन गणित–न अति सूक्ष्म संख्याची किंवा परिमाणाची बेरीज करणारें गणितशास्त्र इंटीग्रल कॅल्क्युलस या इंग्रजी शब्दास प्रतिशब्द

सृजणें—उक्रि उत्पन्न होणें, करणें, बनणें, बनविणें 'त ते जीव सृजिले तैसे।' [स सृज्] सृजन–न १ उत्पत्ति २ सृष्टि

सृति—स्त्री मार्ग [स]

सृष्टि—स्त्री १ निर्माण करणें, उत्पन्न करणें, जोडणें, लागणें, संलग्न होणें म्ह० प्रतिजीवीं सृष्टि भिन्न २ विश्वातील ब्रह्माचा सर्वव्यापीपणा ३ जगाची उत्पत्ति ४ जग, विश्व (समासांत) मनोरथ सृष्टि=मनोराज्य, त्यांत निर्माण केलेले अनेक प्रकार इ० स्वप्नसृष्टि=स्वप्नांतील भ्रामक देखावे जीवसृष्टि=जीवानें निर्माण केलेली सृष्टि, प्रत्येक जीवाचे नानाविध व्यापार मायिक सृष्टि=अशाश्वत जग, ब्रह्मापासून निर्माण झालेल्या मायेनें वाढविलेला सर्व प्रपंच, विश्व याप्रमाणें कल्पना–मानसी–आसुरी–भूत–ब्रह्म–विश्वामित्र सृष्टि इ० [स सृज=उत्पन्न करणें] ०क्रम–मार्ग–पु १ सृष्टीची रहाटी, रीतभात, रीत, क्रम, मानवी जीविताची परिपाटी, गुणधर्म 'सृष्टिक्रमच आहे, कोणी रडतो कोणी हसतो, कोणी मरतो, कोणी जन्मतो' २ ऐहिक जीवन, जीवित सृष्टि नव्यानें–नवी सृष्टी करणें–बदललेल्या जीवनक्रमास आयुष्यक्रमास प्रारंभ करणें सृष्ट–वि १ उत्पन्न केलेलें, निर्माण केलेलें २ जोडलेलें, संलग्न; बनविलेलें

से—स्त्री १ स्मृति, सय, आठवण 'देवें ऋद्धिसिद्धि तयापरी आली गेली से न करी।'–ज्ञा ७ ३६२ २ त्यावरून छंद स्फुर्ति 'म्हणोनि अया वाखाणा–। पासीं से भली चौगुणा।'–ज्ञा १२ ६४५ ३ अनुमान, हेतु 'ऐसी पुढील से घेतु।'–ज्ञा १ १७१ ४ (ल) रोष, असंतोष, क्रोधयुक्त स्मृति, दरा 'परि तें तैसें कैसेनि होईल। जात्यंधा कैसें पाहेल। तेवींचि येरू से घेईल। म्हणोनि बिहे।'–ज्ञा ६ ७ [स स्मृति सई सय=आठवण ?]

सेहणें—अक्रि (घर) झाकारणें; (घर गवतानें) शिवणें [स च्छादन]

सेक, सेक्ट, सेंकडा–डी–डोरा, सेकणें, सेक सेगडी—समध्यें पहा

सेख–ख—पु शेवट, अखेर, शेवटीं सेखीं–क्रिवि अखेरीस 'सेखीं अडविपी'–तुगा १२३८ [स शेष]

सेक—पु शिंपडणी, सिंचन, सडा [स सिच्=शिंपडणें] ०ता–वि सडा टाकणारा, सिंचन करणारा

सेकंद—न मिनिटाचा ६० वा भाग [इ]

सेकाटा–टी, सेकार–रणी–रणें, सेकारणें, सेकाटी, सेखचिल्ली, सेखदार–री, सेखी, सेंग, सेंगट–वगी, सेगडी, सेंगदा सेगोळे—शेकाटा, शेकार, शेकविणें इ० पहा

सेक्रेटरी—पु चिटणीस [इ]

सेचन—न शिंपडणी [स] सेचक–वि शिंपडणारा

सेवाळ–ळीस, सेज–आरती, सेजार–धर्म, सेजारी–पाजारी, सेजो, सेजुटणें, सेजार–री, सेठ(ट)जी–सेठाई–णी, सेठी–ट्या(ठ्या) सेंडा–डी, सेण, सेत, सेताळ–ळीस—शेवाळ, शेज इ० पहा

सेज—स्त्री १ बिछाना, शय्या शेज पहा २ क्रम, रांग, ओळ ०साळ–स्त्री शयनगृह 'शून्य सेजसाळिये। कुलीनते चिये तुळिये।'–ज्ञा १३ ४२ [स शय्याशाला] सेजे येणें–निजणें

सेजरें—न कणसें ठेवण्यासाठीं केलेलें कडव्याच्या पेंढ्याचें वर्तुळ [शेज=रांग]

सेजा—पु (गो) सज्जा, ग्यालरी [हिं छज्जा]

सेंट—न विशिष्ट प्रकारें काढलेलें अत्तर, सुगंधी अर्क [इ]

सेंटर—पु मध्यबिंदु गाभा [इ]

सेत सईत—पु (गो) शेंदूड

सेतु—पु पूल बांध; धरण [स] ०बंध पु १ वानरसैन्य लंकेंत नेण्यासाठीं रामाच्या आज्ञेवरून नलानें समुद्रावर बांधलेला पूल २ (सामा) पूल

सेंद, सेंदाडशिपाई सेंदणी, सेंदणें, सेंदरा–री, सेंदव सेंदाडवलि, सेंदमले, सेंदाड, सेंदाडें, सेंधूर सेंधेलोण—शेंद, शेंदाड शिपाई इ० पहा

सेंद—स्त्री कापूर ठेवण्याची हस्तिदंती डबी

सेंद्रिय—वि इंद्रियविशिष्ट [स] ०रसायनशास्त्र–न इंद्रियविशिष्ट प्राणी व वनस्पति आणि त्यांचीं इ०यावर रसायन कार्यें घडून बनलेले संयुक्त पदार्थ यांचें विवरण ज्यांत केलेलें असतें असा रसायनशास्त्राचा भाग

सेन—पु ससाणा [स श्येन]

सेनगांठ—पु घोड्याच्या फ यांजवळील भोंवरा

सेना—स्त्री. सैन्य; फौज. [सं.] ०खासखेल-पु. बडोदेकर गायकवाड घराण्याची पेशव्यांनी दिलेली पदवी. सेनांग-न. गज-अश्व रथ पदाती असे सैन्याचे चार भाग, त्यापैकीं प्रत्येक. [सं.] सेनांगचतुष्टय-न. वरील चार भागांचें एकत्रित सैन्य. सेनाचर-वि. सैन्याबरोबर जाणारा. ०नाथ ०पति-पु. सैन्याचा मुख्य नायक. ०निवेश-पु. सैन्याचा तळ; छावणी; शिबिर. ०भार-पु सर्व सैन्य; दळभार; फौज. ०मुख-न. तीन पत्ती इतकें सैन्य. ०सरखेल-पु एक फौजबंद सरदाराची पदवी.

सेप, सेपकिडा, सेपू, सेपूट, सेपई—शेप, शेपकिडा इ० पहा.

सैपाक-घर-सैपाकीण--सैपाक, सैपाकघर पहा.

सेंबी—स्त्री. शेंबी पहा.

सेंभ—वि. स्वयंभू. [सं. स्वयंभू]

सेयारी—स्त्री. चेटकी; डाकीण, पिशाची. [अर. साहिर= जादुगार, मांत्रिक]

सेर, सेरणी; सेरी—शेर, शेरणी इ० पहा.

सेरि—स्त्री. तृप्ति; समाधान. -शर.

सेरीक—पु. सरकारी शेरी जमीनीवरील अधिकारी. [शेरी]

सेरू—पु लाकडी पळी. [सं. स्रुवा]

सेल—पु. १ बैलगाडीच्या जुवाचा समतोलपणा. २ एकाच उंचीची बैलजोडी. [सं. शैल]

सेल—पु १ खाण्याचा पदार्थ. -शर. २ शेवट; टोंक. 'वैमेला गुरुत्वाचे सेले।' -अमृ ७.२०. -वि. शेलका, निवडक, उत्तम (वांटा); 'तो दुष्कृताचा कीर सेल वाटा।' -ज्ञा ९.४१६. [सं. शैल=टोंक]

सेलडी-डो(दो)रा, सेलूदोरा—पु. मुलांचा एक खेळ. -शर.

सेलणें—सक्रि. १ (पाणी) तोडणें; कापणें, टोंचणें. 'ते उपरतीच्या वावी सेलत।' -ज्ञा ७.१०१. २ दुष्ट शब्द बोलणें. -ज्ञा ३.४९६. ३ आकाशात भरारी मारणें. 'कीं म्हणिजे गरुड हा सेलत। पतंगासारिखा।' -स्वादि १.२.१६.

सेलतणें—अक्रि. थामणें. -शाश्रीको.

सेला—पु. गर्दी; जमाव; लोंढा. 'दत्ताजी शिंदे इकडे तोंड करीत तों इकडील फौजेचे सेले तोंडासन्मुख येन.' -म.व ६१. [फा. सैलाब]

सेलाटक—न. भोंवरीचें झाड.

सेलार-रा—पु शाल तयार करणारा कारागीर. 'सेलारा फणिमौळी। उर्णनाभि क्षीरि।या चोविमा गुरुंची वोळि। घाधिवली तुज।' -भाए २९८. [अर. सिल्ह्=वस्त्र]

सेली—स्त्री. हार; दोऱ्याची कंठी. [सं.]

सेलू—वि (व्यापारी सांकेतिक) सहा (संख्या). 'सेलू पोंकू आणि ढकार। आवारू खुण सांगती सत्वर।' -भवि ४२.४६.

सेव—पु. (व.) वायकांचा डोकीवरील पदर. [सं. शेवट] -वि. (व.) थोडा ढाळ, उतार असलेलें.

सेव—पु सफरचंद फळ. 'विलायती मेवा सेव दाणे पेंवरा...' -दिमरा १.२२. शेव पहा. [फा.]

सेवक—पु. १ चाकर; नोकर; कामीं येणारा, हाताखालचें हलकें काम करणारा माणूस. २ सेवन पहा. [सं.] सेवकिनी-स्त्री. दासी; मोलकरीण. सेवकै-स्त्री. चाकरी; सेवाधर्म. सेवणें-सक्रि. १ उपयोग करणें; कामावर योजणें; सेवा-चाकरी करणें; पूजा करणें; आदर दाखविणें. २ उपभोग घेणें; भक्षण करणें; खाणें सेवन करणें, [सं. सेवन] सेवन-न. १ चाकरी; चाकरी करणें. २ उपयोग; उपभोग; स्वीकार; अनुभव घेणें; कामी लावून पहाणें (वस्तु, उपाय, योजना, औषध, अन्न इ०) 'हें औषध सेवन कर.' ३ शिवणें; दोरा घालणें. ४ पूजा, उपासना, करणें. सेवनीय-वि. पूजा करण्यास, आज्ञा पाळण्यास, सेवा करण्यास, उपयोगात आणण्यास, उपभोगण्यास योग्य सेवा-स्त्री. १चाकरी; नौकरी; दास्य. २ पूजा; मान; आदर. ३ देवाची चाकरी; उपासना. ४ उपयोग. [सं.] ०चोर-वि. सेवेंत अंतर पाडणारा. ०दल-न. स्वयंसेवकांचें पथक. ०धर्म-पु. चाकरीचें काम. ०धारी-पु. सेवेकरी. सेविका-स्त्री. १ स्त्रीस्वयंसेविका. २ इस्पितळांत रोग्याची शुश्रूषा करणारी स्त्री. (इं.) नर्स. सेवित-वि. सेवन केलेलें; चाकरी झालेलें. सेवी-वि. सेवा, चाकरी, उपयोग करणारा, उपभोग घेणारा. (समासांत) तीर्थ-औषध-सेवी. सेवेकरी-पु चाकर; विशेषत: देवाची सेवा करणारा; पुजारी; उपासक सेव्य-वि. सेवनीय. सेव्याठाय-पु. (संकेतानें) ब्रह्म. -शर.

सेवखंड, सेवगा, सेवट, सेवटणें, सेवटला, सेवतें-शेवखंड, शेवगा इ० पहा.

सेवडी—स्त्री कातडें; चामडें. 'घरी चोखट मृगमेवडी।' -ज्ञा ६ १८२. [सं. छाल+डी]

सेवय-या, सेवरा-री-ऱ्या—'शे' खालीं पहा.

सेवसवजी--स्त्री. भाजीपाल्यावरची पट्टी, कर. [फा. सेव=फळ+सब्जी=भाजी]

सेवाळ-ळी-ळें, सेवाळणें—शेवाळ इ० पहा.

सेशनकोर्ट—न. प्रत्येक जिल्ह्यांत असलेलें सर्वांत वरिष्ठ फौजदारी कोर्ट [इं.]

सें(सें)स—स्त्री. शेस पहा.

**सेंस-पाट-फूल, सेंसगाठ, सेहत्तर**—शेसपाट, शेसफूल इ० पहा

**सेहत**—स्त्री प्रकृतिस्वास्थ्य 'आपल्याप सेहत जालि याचे खुशीचे पोंचे '-पया ४६७ [अर सिह्‌त्]

**सेळपया, सेळड्ड, सेळी**—शेळक्या इ० पहा

**सें**—स्त्री साई पहा

**सेंग**—स्त्री (महानु ) सोपा, पडवी -ऋ ११६

*सैंग-घ*—पु समूह [स संघ] -वि १ पुष्कळ, सर्व 'घापे पगामाजीं ततुची सेंघ सटी।'-ज्ञा ६ १०० २ स्वत सिद्ध -क्रिवि १ केवळ २ एकदम 'त्याधर्गी सैंघ पळिपे। क्रोधामि तो।'-ज्ञा १६ ३६४

**सेंचळ**—न सचळ पहा

**सैताडला, सैताडल्या वाणाचा**—वि (व ) लहरी, पिसाट

**सैतान**—पु १ खोटिंग, वेताळ, पिशाचाचा राजा २ (ल ) घोर कर्म आचरणारा पुरुष, पापमूर्ती माणूस [ अर शैतान्]

**सैति**—स्त्री दोरी जोडलेली लाब बर्ची [ स शित=तीक्ष्ण ?]

**सैदोन**—पु एक प्रकारचा नगारा [ फा ]

**सेंधव**—न पु १ शेंदेलोण २ घोडा [ स सिंधु] ०ता-स्त्री खारपणा -वि समुद्रसंबधी, सिंधुनद अगर सिंध देश यासंबधी [ स ] **सेंधवी**-स्त्री गाण्यातील एक राग

**सैन्य**—न फौज, लष्कर; फौजेची तुकडी [ स ] **सेना (न्या)धिपति सेना(न्या)ध्यक्ष**-पु सेनापति **सैनापत्य-सेनाधिपत्य**-न सेनापतींचें काम; त्याची सैन्यावरील हुकमत, त्याची पदवी **सैनिक**-पु शिपाई -वि सैन्यासबधी

**से(सें)पाक सेंपाकघर सैंपाकी, सेंपाकीण**—स्वय पाक इ० पहा

**सेफ**—स्त्री एक जातीची तरवार [ अर सैफ्]

**सैयद**—पु सय्यद पहा

**सैया**—पु भैय्या, उत्तर हिंदुस्थानातील इसम 'घरात एखादा परदेशी सैया होऊन राहील '-आवळपळ [स सखिन्]

**सैर**—पु चोराची एक जात व तींतील व्यक्ति -वि स्वैर, स्वच्छदी [स स्वैर] ०ट, **सेराट**-वि स्वच्छंदी इ १, हेके खोर, दांडगा वेडेवाकडे, आडदाड, कठोर, वर्वश म्ह० वाई वैराट चोली सैराट

**सैर, सैरणी**—स्त्री सहल, निसर्गनिरीक्षण 'आम्हयाची सैर करावयास या प्रातीं आलें आहेत '-दिमरा १ ३०१ [अर सैर]

**सैरंध्री**—स्त्री १ अत पुरांतील दासी, ही गरती असुन थीम ताच्या घरीं चणीफणी वस्त्रालकारादि रचना इ०कामें करण्यासाठीं वेतन घेऊन राहते २ द्रौपदी [ स ]

**सैरफाजील**—न कोरडवाहू व बागायत याच्या उत्पनाची नोंद व उत्पन, याच्या उलट ऐन फाजील [ अर सायर=इतर ]

**सैरा, सैरावैरा**—क्रिवि ज्याला जिकडे वाट फुटल तिकडे, दाही दिशानीं, स्वैरपणें ( भीतीनें धावणें, पळणें ), अफाट, मोकाटपणें; स्वच्छदानें [ स स्वैर द्वि ]

**सैरा**—वि (व ) नीट, चांगलें, सरळ 'सैरा घरीं जा ' म्ह० एक कान सैरा, एक कान बहिरा

*सैराव*—पु (कु ) स्नान, आटस्य

**सैरिक-सेर**—वि नागरासबधी, नांगरटी-शेतकीविषयक [ स सीर-नांगर ]

**सैरिय**—पु रेडा, हेला

**सेल**—स्त्री कणी इ० दागिने घडविण्याचा दाडा

**सैल**—वि ढिला, लटपटीत मजबुत नव्हे असा, पोकळ [ स शिथिल ] ०**सोडणें**-ढिलें सोडणें, लटपटित ठेवणें, दाबात न ठेवणें ०**दोरी**-स्त्री लटपटीत दाब, वचक, अमल ( क्रि० देणें, सोडणें ) ०**णें, सैलावणें**-अक्रि ढिलें, लटपटित होणें, सोडणें, करणें **सैलावणी**-स्त्री मोकळीक, ढिलेपणा

**सैली**—स्त्री १ फकीराच्या गळ्यातील फुलाची माळ २ (तंजा ) फुलाची माळ ३ मोत्याची माळ, कंठी 'मोत्याची एक सैली आहे त्याची किंमत नऊ लाख रुपये आहे '-नानासाहेब शिंदे यांचें आत्मवृत्त ३३८ [ हिं ]

**सैंवर**—न स्वयवर पहा

**सैसद**—क्रिवि (राजा ) सारखा, ओळीनें सलसय पहा

**सोइरगत, सोइरा, सोइराधायरा, सोइरी, सोइरीक**—सोयरगत, सोयरा इ० पहा

**सोई, सोय**—स्त्री १ परिस्थितीची अनुकूलता, कामधदा, व्यापार, उदीम इ०चा फायदा फुरसत, समाधान ज्यात लाभेल अशी परिस्थिति २ अनुक्रम, व्यवस्था, रचना इ० लावणें, करणें 'पोथ्या सोईनें लाव ' ३ अनुकूलतेचें, व्यवस्थेचें इ० साधन, उपजीविकेचें, धंद्याचें (चाकरी, वतन, शेत ) इ० सुखदायक साधन, मार्ग ४ आश्रय आधार, विश्रांतिस्थान -ज्ञा १७ २२९ [ स सु=चागलें+ईर=जाणें ] ०**करणें**-१ व्यवस्था लावणें २ (कु ) टोकणें ०**चसविणें**-(ना ) खोडकी, नांगी मोडणें ०**वार-सार-स्कर**-वि असावी तशी सोय, फायदा असणारा, लाभदायक सुखकर ( उद्योग, धंदा इ० ) ०**सुमार**-पु प्रसंगाचें औचित्य किंवा अनुकूलता योग्यपणा, व्यवस्थितपणा, मेळ, योग्य काळ वेळ सधि मागचें पुढचें धोरण, समजसपणा 'त्याचे वर्चाव आणि तुम्हा करण्याला सोई सुमार नाहीं ' ०**सोईनें**-क्रिवि वेतावेतानें, हळू हळू सौम्यपणें, परिस्थितीस अनुसरून (पैसा देणें, घेणें इ० )

**हमसर**—पु मामस्य -पेद १० ७०.

**हंमा**—हबा पहा

**हमाणी-नी, हमीण हमिणी-नी, हमेणी**—स्त्री पुंगी १ पैसे ठेवण्याची लांब पिशवी, थैली 'थयरेस हमिन्या हग्याच्या '-मदर १ ६४ 'जिनसवार हमीणे दिल्ह '-इम ७ २ कोडबोळें [फा हम्यानी]

**हमाम**—पु उखळ, खल [फा हावन् हिं] **०दस्ता**-पु खल व बत्ता. [हिं]

**हमामखाना**—पु न्हाणीघर, स्नानगृह [अर हम्माम्+ फा खाना]

**हमामा**—पु १ गुराख्यांचा एक खेळ 'पेंधा म्हणे यमु नेसी। तु बायको होऊन आम्हांसीं। हमामा आजि घाल्सी।' -ह १० ८९ २ (ल) धुमश्चक्री, धुडगूस, धांगडधिंगा (खेळातील) (क्रि० घालणें, मांडणें, माजणें, करणें) ३ अस्ताव्यस्त ढीग, रास, गडगा (माती, चिखल इ० चा), ओबडधोबड रचना (घर, भिंत इ० ची) हमशा पहा

**हमामो**—पु निवळीचें थीं

**हमाल**—पु १ ओझें वहाणारा मनुष्य, मजूर २ पालखी इ० वाहून नेणारा माणूस भोई ३ अफूच्या बोंडांतील रसाचा घट्ट गोळा होण्यासाठीं तो रस तांब्याच्या पत्र्यावर तुडवून मळण्याचें काम करणारा इसम हें काम हा इसम माजूरच्या कैफात करतो [अर हम्माल्] **हमाली**-स्त्री १ हमालाचा पेशा, धंदा, कामगिरी २ हमालाची मजुरी ३ बिन डोक्याचें-अक्कलेचें काम केवळ शारीरिक कष्ट **हमाली चाकरी**-स्त्री १ हमाली धंदा २ मुख्यत निरोप आणणें-पोहोंचविणें एवढी नोकरी ३ हातावरचं काम, आज आहे उद्यां नाहीं असा रोजगार ४ हलकें काम

**हमिचा**—पु ताम्याचे पैसे वगैरे ठेवण्याची, चारी पाय याचून आहेत अशा चौकोनाच्या कातड्याची पिशवी

**हमी**—स्त्री जामिनकी (तिन्हाईत माणसानें भरण्याची) जिम्मा, खात्री (क्रि० देणें, भरणें, घेणें, पटणें, पटविणें) [अर हामी] **०टमी**-स्त्री (सामा) हमी, खात्री (क्रि० करणें, देणें भरणें) **०तारण**-न हमीटमी (क्रि० देणें घेणें, पटविणें) **०दार**-वि जामीन राहणारा 'ती जबरदन आपण ऐवजाचा हमीदार घतला '-ऐटि १ २२ **०दारी**-स्त्री हमी दाराचें काम पेशा **०पत्र**-न जामीनखत खात्री पटविण्या साठीं लिहून दिलेला कागद

**हमीधुमीचा**—वि दिखाऊ डौलाचा, थाटामाटाचा, नामडौलाचा दिपविणारा, झगझगीत, उठून दिसणारा (उम, इ० समारंभ)

**हमीन**—स्त्री खरबुजाचें मूळ, कांदा

**हमीर**—पु (संगीत) कल्याण रागाचा एक प्रकार

**हमी(मे)शा-शां**-क्रिवि नेहमीं, सतत, चिरकाल [फा हमिशह्]

**हमु**—पु अहंकार -शर [स अहम्, अर हिम्यान्]

**हम्द**—पु घोडा फिरविणारा -शर [फा]

**हम्वार**—वि प्रशस्त, सरळ 'ज्यांत त्याची मर्जी हमवार राहे तें करणें योग्य '-इम २५५ [फा हम्वार्]

**हय**—पु घोडा; अश्व [सं] **०कुंडी**-वि मानवर भोंवरा असलेला (घोडा) हें घोड्याचें शुभ चिन्ह आहे **०भंग**-वि पाटावर पांढरे ठिपके असलेला (घोडा) हें अशुभ चिन्ह होय **०मेध**-पु अश्वमेध **०विक्रय**-पु घोडे विक्री हिंदु धर्म शास्त्राप्रमाणें निषिद्ध आहे विक्रय पहा

**हंय**—क्रिवि (गो कों कु) येथें [स इह] **०सर**-(हेट) येथवर. **०सून**-क्रिवि येथून

**हयकत**—स्त्री (माण) हाल अपेक्षा, तारवळ [हाय!]

**हयकोल**—पु सरी, गळ्यातील बायकी दागिना [अर हैकल्]

**हयगई-य-यी, हैगई**—स्त्री १ दुर्लक्ष, हेळसांड 'परोप कार, परमार्थसाधन इ० पुण्यकर्माविषयीं हयगय केल्यास पाप वाढतें ' २ ढिलाई, चालढकल, दिरंगाई 'सत्कर्माविषयीं हयगय करू नये, आयुष्य थोडें आहे ' ३ बेफिकिरी, अनादरबुद्धि 'घोड्याचे पोटाची हयगय केल्यास घोडा वाळेल ' [हिं]

**हयता**—सना (राजा कुण) १ तो, तो पलीकडचा. 'त्याची मीं तुला गोष्ट नाहीं सांगितली, हयता शेवटास बसला आहे तो त्याची गोष्ट ' २ ज्याप्रमाणें तो या सर्वनामापासून तिकडचा, तिकडे, तसा, तेव्हां, तेथें इ० रूपें होतात त्याप्रमाणें हय या सर्वनामापासून **हयतिकडचा हयतिकडे, हय तसा, हयतेधवा**-इ० रूपें होतात [हा+तो]

**हयपत-पती-घत घती**—हैवत इ० पहा

**हयराण-न, हयराणगत, हयराणी-नी**—हैराण इ० पहा

**हयवान**—पु १ पशु जनावर निर्बुद्ध प्राणी २ (ल) अगदीं अशक्त, नाजूक प्रकृतीचा माणूस [अर हयवान्= सजीव प्राणी]

**हयथासी**—वि (कु) स्वार्थी ?

**हयहाय-हुय**— हायहाय-हुय इ० पहा

**हया**—स्त्री लज्जा विनय [अर]

**हयात-ती**—स्त्री १ आयुष्य जिंदगी, जिवंतपणा 'आज येथून आमची हयात खुंटली ऐसें भविष्य केलें '-भाम १८१४

'काय हयाती बाकी असेल ते, ते स्थळीं अखेर होय तर उत्तम आहे ' –मत्रया १ १५६ २ उमर, वय –वि निरत [अर हयात] ०मुलाकात-मुलाखत-स्त्री (कागदोपत्रीं) तुमची आमची जगून भेट (होणें) हयातीचा दम–१ आयुष्यातील जोम, उत्साह, शक्ती, सत्त्व, वीर्य, रग २ जगण्याची आशा इच्छा हयातीचा दम असला तर–आम्ही तुम्ही जगलों वाचलों तर

हयासा–पु घोड्याच्या लगाम लावण्याची वादी किंवा दोरीचा तुकडा, जेरबद [फा]

हय्यगवीन–न कालच्या दुधाचें साजूक तूप ' हय्यगवीन जैसें सुरसिक रसनेपुढें न तेल टिके। '–मोवन. [स]

हर–पु शंकर, शिव ' तेय हरु म्हणे नेणिजे। देवी जैसें का स्वरूप तुझें। '–ज्ञा १ ७१ [स]

हर–पु (गो) भवमर म्ह० हर उवता म्होण गायडोळ उवता=भजगर उडतो म्हणून गाइळ उडतो

हर–वि (व) कठीण, टणक ०हालणें–अक्रि नरम होणें, थोडेंकार शिजणें (अन)

हर हरजीत–स्त्री हार, हारजीत पहा

हर–वि प्रत्येक, दरएक उदा० हरघडी-वखत-रस्ता-गव-जागा इ० [फा] ०उपाय–पु दरएक इलाज, युक्ति, साधन, सर्व, नाना इलाज, युक्त्या (विशेषत अव प्रयोग) ०एक–वि १ प्रत्येक, जो जो कोणी तो तो ' हरएक मनुष्या समागमें पत्र पाठवून सतोषपत्रीत असावें ' २ कसलाहि, कोणताहि ' जुने लोक यास हरएक उपद्रव न केला '–मराचिस २८ ०एकरंगी–वि निष्फळ एकाच रगाचा (घोडा) हें अशुभ लक्षण आहे अशुभ चिन्हें पहा ०कसी–वि कशीबशी, हर एक ' हरकसी निभावणूक करून तजावरपर्यंत आले '–पेशवे० महाराष्ट्र २४४ ०कसबी–वि १ हरएक कौशल्याचें काम करणारा, अष्टपैलू कारागीर २ हरकामी ०काम–न प्रत्येक किंवा कोणतेंहि काम, धदा, वेळीं उपस्थित होईल तें काम ०कामी–काम्या–वि १ जरूर पडेल तें तें काम करण्यास तयार असलेला, अशा बोलीनें ठेवलेला (माणूस) २ कोणतेंहि किंवा दरेक प्रकारचें काम करण्यास समर्थ असलेला, कोणतेंहि काम करण्यास ज्याचे हात वळतात असा ३ अनेक प्रकारें उपयुक्त होणारी (वस्तु) ०कोण्टी-कोणी–वि १ भलतासलता कोणी २ प्रत्येक जण, दरएक ०घडी–क्रिवि वारवार प्रत्येकक्षणीं, नेहमीं, घडोघडी ०जिन्नस–पु सर्व तऱ्हेचा माल जिन्नस, किरकोळ व्यापारी वस्तु ०जिनसी-सी–वि हरएक, अनेक जातीचा-प्रकारचा, नाना प्रकारचा त्याच दुकानीं ल्हान मोठे गाड आयन अस्म हरजिनसी माल मुर्दुहत.' ०तऱ्हा–स्त्री प्रत्येक रीत, योजना, युक्ति, साधन इ० (विशेषत अव प्रयोग), नाना तऱ्हा-प्रकार [फा] ०दम–क्रिवि हरघडी ०दमख्याली–पु १ दरेकक्षणीं नवीन कल्पना, ल्हर ख्याल २ (अव) अनेक युक्त्या, यत्न, बेत, योजना, साहसें, श्रम ' हरदमख्याल करून त्यानें लग्न केलें ' ३ शोधकता, कल्पकता, हिकमत ' ज्याचे अगीं हरदमख्याल नाहीं असला एकमार्गी काय उपयोगी' ' ०दमख्याली–वि १ फार उलाढाल्या करणारा, चळवळ्या, उद्योगी, युक्तिबाज. २ (ल) लहरी '(शिंद) जात्या हरदमख्याली कर्से करितील याचा विश्वास नाहीं ' –स ७ ३२ ३ लबाड ' त्यात तो (हैदर) हरदमख्याली आहे ' –ख १०९६ ०प्रयत्न-प्रेत्न–पु प्रत्येक प्रकारची खटपट, श्रम, योजना २ (अव) सर्व प्रकारच्या खटपटी इ० ०बयाज-द-बहाणा–पु दरएक सबब, ढोंग, युक्ति कावा खोटी कहाणी (अपराध्यानें पुढें केलेली) (क्रि० करणें) ०बाबी-बाब–वि दरेक बाबीसबंधींचें (बाब=जमाबदीचा प्रकार) जसे हरबाबी वद-कागद-हिशेब-बसुलबाकी इ० ०भास–वि फार हुशार, अष्टपैलु, सर्व गोष्टींत निपुण, बहुगुणी ०भांत–वि १ वरील शब्द पहा २ सर्व प्रकारचा, जातीचा, तऱ्हेचा, नानाविध ०मळ-माळ–स्त्री १ माणसें, गुरें इ० ची घालणारी राग, ओळ, जाणाऱ्यायेणाऱ्याची माळका (क्रि० लावणें, लागणें, चालणें, टळणें, मोडणें) २ नेमलेली, ठरविलेली वेळ (क्रि० सभाळणें, साधणें, टळणें, चुकणें) ३ परिचय, घसट, वावर ०युक्ती–स्त्री दरेक उपाय, योजना, बेत, मसलत, (अव) सर्व उपाय इ० ०येक–वि हरएक पहा ०घडी–क्रिवि हरघडी ०वळ–स्त्री हरमाळ अर्थ १ पहा ०साव न चोर, शत्रू इ० धाडीवर, सर्व प्रकारचीं शस्त्रास्त्रें घेऊन उठलेला गावकऱ्याचा, शेतकऱ्याचा समूह, थवा (क्रि० उठणें, मिळणें) ०हमेश-शा–क्रिवि नेहमीं ०हुन(न्न)र–न प्रत्येक कौशल्य, युक्ति, कसब, (अव) सर्व कलाकौशल्य ०हुन(न्न)री–वि हरकसबी, हरहुन्नर जाणणारा

हर–वि १ हिरावून नेणारा, उचलून नेणारा, पळविणारा (समासात) 'धन-कीर्ति-दुख-कफ-वात-ज्वर-हर इ० ' २ (गणित) भाजक ३ (गणित) अपूर्णांकाचा छेद [स हृ=हरण करणें] ०क–पु चोर हारक –वि हरण करणारा, हर अर्थ १ पहा

हरक–न एक प्रकारचें पाढरें कापड, हारक [इ ?]

हरकणें–अक्रि (क) हुरळणें, हर्षित, होणें हरखणें पहा

हरकत–स्त्री १ अडथळा आडकाठी, विरोध, अडक विण्याचे थांबविण्याचे कोणतेंहि कृत्य प्रकार (क्रि० करणें) 'बडर मनजूर करून वकूर पाहून जागा व मनानें घ्यावयाचे उद्देशें हरकत करणार '–रा ५ ६८ २ प्रतिकूल वर्तन, (वर्तणे-चाकरी इ० व्यवहारीं,, अयोग्य कर्म ३ निंद्य खोटी [अर हरकत] ०खोर हरकती–वि हरकत करणारा, घणरा

हरकत—स्त्री (संगीत) विशिष्ट स्वराची तान

हरक(को)ल, हरकलपरणी—स्त्री एक प्रकारचा तांदूळ, स ळं

हरका—पु घोड्याच्या पाठीच्या कण्यास होणारा रोग अश्वप २ ३००

हरकारा—पु १ दूत, निरोप्या, ज सूद बोलावणेकरी (राजा सरदार इ० जवळील याचे हातीं गोंडा असलेली काठी असत) २ हर, टेहळ्या 'तर्थील ल्ष्करची माहीतेत खरी व्हावी म्हणून दोघे हरकारे पाठविले हात ' -विश ४४. [फा हर्कारा] ०गिरी हरकारगी-स्त्री हरकाऱ्याचें काम, धंदा, जासूदी 'तुजे बाप नार होणरी यासी हरकारगी मिरास वेमाई याणी मोकर करुन दिवाण-चाकरीसी ठेविले होत ' -सास ३ जुलै २५

हरकी हर्की—स्त्री १ वादात ज्याचा जय होतो, त्यानें हर्ष झाल्याबद्दल सरकारात द्यावयाचें द्रव्य, नजर 'कुंभार खरे झाले त्यांजपासून हरकी घेतली ' -वाडसमा ३ २६५ २ हरव लेली वस्तु आणून देणारास दिलेली बक्षिसी ३ चांगली नोकरी केल्याबद्दल, एकदम लाभ झाला असतां, एकाएकीं मिश्रभेद झाली असता, कोणतेंहि आनंददायक कृत्य चालू असता वाटावयाचें बक्षीस [स हर्ष,म हरख] ०पत्र न बक्षीसपत्र ०शिरिणी-शेरणी-स्त्री १ हरकी अर्थ १ पहा २ आनंदाचे प्रसंगीं वांट लेली मेवामिठाई [शेरणी=मिठाई]

हरकीपत्र—न वादात हरणारापासुन घेण्याविषयींचें पत्र -शर [हरणें]

हरकेंड—न (राजा) १ हरीक धान्याचा पाकळ दाणा, एस, गोंद, वेंद २ (निदार्थी) हरीक [हरीक+केंड] हरकेण-कयेण-कयाण न (कों कु) हरीकाचें गवत, काड [हरीक+तृण]

हरख—पु हर्ष, आनंद [स हर्ष, हिं हरख] हरखणें-अकि हर्ष पावणें, आनंदणें

हरखी—स्त्री हरकी पहा

हरगा, हरगेचार हरगेभाई—'हिडगा' पहा

हरगाह—अ ज्याअर्थी -रा ००४७ [फा हर्गाह्]

हरगी(घी)ज-स—क्रिवि १ हरहमेश, नेहमीं 'तेथें तुम्हाकडून उपसर्ग हरगीस होऊ नये ' -वाडबुवा २ मुळींच, बिल्कुल 'ससरबीचा एक हरगीस होत नाहीं ' -पेद ६ १९० 'जे मजला मानिती । म इया विचारें वर्तती । ते हरगीस झोला न पावती । ' -रामदिवटा ६ [फा हर्गिज़्]

हरजुरी—स्त्री (व) आंब्याच्या झाडावरील एक औषधी वाडगूळ

हरडपुंकया—हुरडफुतया पहा

हरडा-डी—हिरडा-डी पहा

हरडा—पु (सोनारी) कमरेच्या गोफाचा एक भाग

हरडी—स्त्री एक जंगली झाड

हरडें—न (कु) अंत करण, छाती [स हृदय]

हरण—पु न मृग, एक जनावर -स्त्री हरणी [स हरिण] ०फासांत सापडणें-पडणें-अडचणींत पडून हताश होणें ०फासांत घालणें-पाडणें-अडचणींत आणणें, टाकणें ०काळजी-स्त्री (एकादा गोष्टीवरून) अतिशय काळजी (हरवलेल्या वस्तुची, इ०) एखाद्या गोष्टीबद्दल अतिशय चिंता, काळजी 'हरणकाळजी फारच वाई मी मला दिसला कोणी वा ग। ' -पग ४२ ०टोळ-स्त्री भयंकर विषारी हिरव्या रंगाची, झाडावर पडणारी सापाची एक जात, सापटोळी -बदलापूर २४८ ०दाडी-स्त्री एक वनस्पति वेल ०मान्या-शिकारी-न्या-वि हरणाची शिकार करणारा, पारधी ०धीत-घेणं-चेत-नवी तात्काल, सुलभ प्रवृति (सुर्केहोणाऱ्या स्त्रीची) ०वेल-स्त्री फार वाढणारी, फळांतून रशमासारखा कापूस निघणारी, पानांची भाजी होणारी एक वेल, हरणदोडी ०शिकार-स्त्री हरणाची पारध हरणाळें-न (चांभारी) हरणाचें कातडें हरणाचें काळीज-न भीति 'तुम्ही एवढें मनुष्य, दुराणी तो दृष्टीस पडेनात, राडापोरें घोडी ओढतात, तुमच्या पोटात हरणाचीं काळजें कशीं शिरलीं ! ' -भाव ९१ हर(रि)णी-स्त्री १ हरणाची मादी हरणुली-स्त्री (काव्य) (लाडक्या भार्थेत) हरण 'मी ग हरणुली होईन। वनामधि जाइन् पळून । ' -मास जुलै १९३२

हरण—न १ जबरदस्तीनें नेणें, लुटणें, अपहार २ नाश, घात करणें, दूर करणें, नाहींसें करणें (पाप, रोग, त्रास इ०) (समासांत) पापहरण, दु खहरण, दोषहरण इ० 'कुळ-हरणीं पातकें। ' -ज्ञा १ २२९ ३ (गणित) भागाकार [स] हरणीय-वि हरून नेण्यास योग्य, हरण करण्याजोगी (वस्तु इ०)

हरण—स्त्री सोनार, लोहार याची ऐरण [हिं अहरन]

हरणी—स्त्री (बैलगाडी) बैलास चाक लागू नये म्हणून चाकाचे पुढें आडव जोडलेलें लांकूड

हरणें—उक्रि १ बलात्कारानें अन्यायानें नेणें, घेऊन जाणें, उपटणें, अपहार करणें २ दूर करणें, नाहींसें करणें, निवारणें (दु ख, शोक, पाप त्रास अडचण, दोष, रोग इ०) 'पै हरूनि कफवात। ' -ज्ञा १४ १९६ ३ जिंकणें, जिंतणें (बक्षीस) 'त्यानें पहिल्या डावास शभर रुपये मांडले ते त्या हरले ' -अक्रि, १ पराभव पावणें, हरणें (युद्ध, खेळ,

वाद इ० त) २ अपुरें पडणें; यामाम न येणें; निष्फळ होणें (बुद्धि, प्रयत्न, शक्ति, शहाणपणा इ०) ३ (ल) कमविणें, गुंतविणें 'ऐसी हरी मेळाळे। लेवु जैसा।' –ज्ञा १५ २४१. [स हरण] हरतलेपण–न अभाव, नसलेपणा 'हें अर्थी तरी कायमें हरतलेपण।' –अमृ ७ १०४

हरताळ—स्त्री पु एक पिवळें विषारी-द्रव्य [स हरिताल] ०लागणें-फासणें–१ दोष येणें, लावणें २ (हस्तलिखित लेखांतील अक्षरें इ० वर हरताळ लावून) खोडणें, रद्द करणें ०लागणें-रद्द पडणें, मुदीचा ठरणें, खोटा ठरणें ०तीज–स्त्री हरताळका पहा ०भस्म–न हरताळाचें भस्म

हरताळ—पु बाजार, व्यवहार बंद असणें; प्रत्येक दुकानास कुलूप लागणें, असणें, बाजारी राप, काम बंद पडणें [हर+गु ताउ=कुलूप] ०पडणें–दुर्मीळ होणें, अत्यंत उणीव असणें, वाण पडणें ०बाजारांत पडणें–१ थोर व्यक्ती मेली असतां, किंवा सरकारच्या जुलमाचा निषेध प्रदर्शित करण्याकरितां व्यापाऱ्यांनीं आपापलीं दुकानें खुषीनें बंद ठेवणें, व्यापार व्यवहार बंद करणें

हरताळ(ळि)का—स्त्री १ हरताळ अर्थ १ पहा २ भाद्रपद शुद्ध तृतीयेस सुवासिनींनी गौरीची, पार्वतीची करावयाची पूजा, त्या दिवशीची तिथि ३ पूजेची पार्वतीची मूर्ति, हरितालिका [स हरितालिका]

हरदहाल—क्रिवि केव्हांहि हरदहाल मोहिब्बाचे कामामध्यें तकावत तजावज करणार नाहीं ' –ब्रप २४० [फा]

हरदावळ—पु घोड्याचे छातीवरील भोंवरा, हा अशुभ कारक असतो [स हृदावर्त, हृदय+आवली] हरदावळी–वि वरील भोंवरा असलेला (घोडा)

हर(रि)दास—पु १ कथेकरी, कीर्तनकार २ (खा) कोल्हाट्याप्रमाणें एक कसब करणारी शूद्र जात –गागा १२० [स हरिदास] हरदासी-सी–वि हरदासविषयक हरदासाचा (पोषाक, वाद्य, तट्टू इ०) हरदासवळ स्त्री शाहीरांतील एक पक्ष ह देवास प्रकृतीपेक्षा श्रेष्ठ मानून तुरा–लावणी गातात हरदासी घोडा-तट्टू–पु हडकुळें, ढेंगें, रेंर करीत चालणारें तट्टू

हरदू—वि १ (खतपत्रात) दोघेहि दोन्ही पक्षाचे 'हरदू असामीयांचे घराची जप्ती करतील ' –वाडसमा १ १९० २ दोहोंपैकीं प्रत्येक, जोडी [फा हर्दो] ०पक्षकार–पु अव वादीतील दोन्ही पक्षांचे पक्षकार, वादी–प्रतिवादी, दोन्ही पक्ष ०मुसना जुमला–क्रिवि हरवलेली सनद पुन्हा करून देतेवेळीं तिच्यावर लिहिण्याचा शेरा [मुसना=दुसरी नकल]

हरदू, हरदुलर—स्त्री (गंजीफा) हुकमाचीं अनुक्रमें दोन पानें जसें–वजीर–एक्का, एक्का–दुर्रा, दुर्रा–तिर्रा इ० वरच्या रंगांतील याचे उलट खालच्या रंगातील दहिल्या–नाहिल्या, नहिल्या–अठ्या वगैरे [फा]

हरद्द—न १ अर्थ, उद्देश, मनाचा कल, शौक २ मजकूर, अभिप्राय, मुद्दा, मतलब (मापण, क्रिया इ० चा) 'शामला वडील वकील बोलाऊन आणून त्याचें हरद मनास आणून पक्का तह करणें ' –वाडसमा १ ३११ [स हार्द]

हरफ-फ, हर्फ—पु १ (कागदपत्रात) अक्षर, वर्ण (विशेषत अरबी, फार्सी) 'तहनाम्यात काहीं हर्फ नीट करावयाचे ते करून ' –रा ५ ३३; –ब्रप ८९ २ दोष, ठपका (क्रि० लावणें, ठेवणें, आणणें, लागणें, येणें) ३ (कारकुनी) घडया पाडलेल्या कागदात दुसऱ्या रकान्याचे मध्यापासून पुढील रकान्यापर्यंत ओढलेल्या रेषेचें नाव [अर हरफ्] ०ब–हर्फ–क्रिवि अक्षरशः 'कउमाची फर्द सरकारची आली ती हरफ–ब–हर्फ वाचून दाखविली ' –रा ७ ८

हरपणें—उक्रि १ हरविणें, गमाविणें –अक्रि माहणें; जाणें, नाहींसें होणें, नष्ट होणें 'द्वैताचिया भावें हरिसम झाले। भाव हरपले देहादिक।' –तुगा ८८ [हरणें]

हरपररेवडी—स्त्री एक प्रकारचा लहान आवळा आणि त्याचें झाड, रायआवळा व रायआवळी [स हरिपर्वरी, हिं हरफारवडी]

हरब(भ)क-की—स्त्री (कु) खादाडपणा –वि खादाड, हावरा

हरबटणें—अक्रि (कों) लडबडणें, बरबटणें (माती, चिखल इ० नीं अवयव किंवा स्वयपाकाचीं भांडीं इ०)

हरबडणें—क्रि (ना) ऐन वेळेवर इकडेतिकडे शोध करणें

हरबळ—स्त्री हयगय

हरबळणें—अक्रि तळमळणें, हरमळणें पहा 'तेणें दु खें प्राणी हरबळे।' –दा ३ ७ ३९

हरब(भ)रा—पु एक द्विदल धान्य चणा, घोड्यास खावयास द्यावयाचें एक कडधान्य [स हरि=घोडा किंवा हर=शिव+भरक] हरभऱ्याचे झाडावर चढविणें-बसविणें आपलें काम करून घेण्यासाठीं एखाद्याची फाजील स्तुति करून त्याला खूष करणें, खुशामत करणें, बनविणें, फसविणें हरभऱ्याच्या झाडावर चढणें–अशा खोट्या स्तुतीला भुलणें, फसणें 'याला एखादे वेळीं तू फार चांगला दिसतोस असें कोणी म्हटलें असेल तेवढ्यावरच स्वारी हरभऱ्याच्या झाडावर चढली आहे।' –अतिपीड

हरमाळ—स्त्री. हरमाळ (हर=प्रत्येक मध्यें) पहा.

हरमळ—वि. (दों.) (दु.ख, आजार इ० नें) अस्वस्थ; बेचैन हरमळणें-अकि. तळमळणें; तडफडणें.

हरमळणें—अकि. परिचित होणें; ओळख होणें. हरमाळ पहा. [हरमळ-माळ=परिचय]

हरमोर—स्त्री. हरमाळ (हर=प्रत्येक मध्यें) पहा.

हरया(ये)ळी—स्त्री. हरळी; दूर्वा.

हरराजी, हराजी, हर्राजी—स्त्री. लिलांव. [अर. हर्राज्, हराज्]

हरल-ला-ली—पुस्त्री. (कु गों.) १ ल्हानसा प्रवाह; ओढा; ओघळ (विशेषतः पावसाळ्यांतील); त्याचें पात्र, मार्ग. २ पाण्यासाठीं खोदलेला चर, पाट; लहान कालवा.

हरला—पु. बांबूची ल्हानशी वाटोळी टोपली, ल्हान हारा.

हरव(वि)णें—उक्रि. १ घालविणें; गमाविणें, खोणें (संपत्ति, कीर्ति, नाव, प्रकृति, सद्गुण, मान इ०). २ घालविणें; गमवावयास लावणें, नुकसान सोसावयास लावणें, मुकविणें; लुबाडणें. ३ प्रतिपक्षास हार कमा करणें; पराभव करणें (वाद, लढाई, खेळ इ० त) [हरणें प्रयोजक] हरवस करणें-(माण.) हरवून घेणें, आपत्ति ओढवून घेणें.

हरवळ—वि. (दादर) उग्र.

हरवळ—स्त्री. (दादर) हयगय.

हरव(वा)ळ—वि. १ खेळकर, आनंदी (मूल). २ (माण.) चपळ

हरवार-ळ—वि. अरुवार; हलकें व मऊ, मोखर (अनरसा इ० पक्वान्न) हळवार पहा

हरवेल—स्त्री. (गो.) हाणटोळ नांवाचा हिरवा साप.

हरवो—वि. (कु.) हिरव्या रंगाचा; हिरवा.

हरशीं-शें-सुं—क्रिवि. (गो.) एरवीं, सहज.

हरस—पु. (वे.) बैलगाडीचा कणा.

हरसट—स्त्री. (ना.) चंपाषष्ठी. सट पहा.

हरस्व—वि. न्हस्व, ल्हान. 'चौदा विद्याचा गोसावी। हरस्व लोचन हिलावी।' -दा १.२.१३. [सं. न्हस्व]

हर! हर!—उद्गा. शिव, शिव, वाईट वाटलें असता निघणारा शब्द. [सं.] ॰महादेव-उद्गा. (आवेश, औत्सुक्य दर्शविणारा उद्गार) १ निकराचा हल्ला करताना मराठ्यांची लढाईंत उच्चारावयाची रणगर्जना. 'हरहर महादेव या रणघोषात।'-संग्राम ६९. २ पंगत जेवावयास बसतांना म्हणावयाचा शब्द (याच्या आधीं 'पार्वतीपते' म्हणतात) ३ सर्वस्व नाश; नायनाट, सत्यानाश (एखाद्या वस्तूचा, माणसाचा).

हरहरला—क्रिवि. १ हटकून, खात्रीनें, बिनचूक २ सतत, नेहमीं. [? हरण-हरजा न हरत्र तरी]

हरहरा, हरारा—पु. (व.) पातळसर शिरा. 'हरहरा करून रोग्याला खायला घातला.' [? हिं. हरीरा=एक पेय]

हरळ-ळी—स्त्री. एक गवत; दूर्वा. [सं. हरिताली, प्रा. हरिआली, हिं. हरियल] ॰चीमुळी-स्त्री. १ (दूर्वा उपटली तरी तिचा बीजांश जमीनींत राहून पुन्हा पुन्हां उगवतेच त्यावरून) अनेक प्रकारचे छळ, त्रास इ० सोसूनहि टिकाव धरणारी जात, कुळी, समाज. २ जमीन, अधिकार, हुद्दा, मान इ० कोणत्याहि रीतीनीं काढून घेतला असताहि पुन्हा तो परत मिळविणारी व्यक्ति, विशेषतः वतनदार इसम. ३ अनेकवार औषधादिकांनीं दवविला तरी पुन्हा उचल घेणारा रोग, आजार. हरळीप्रसाद-पु. १ (ल.) हरदागी तट्टू; हिंमतींत उतरलेला घोडा; नुसत्या गवतावर राहणारा (चंदी न मिळणारा) घोडा. २ फुकटकामी नोकर.

हरळ—पुन. १ डोळ्यांतून त्रिकाळ पाणी सुटण्याचा व खुपण्याचा एक रोग. २ डोळ्याचा एक विकार; खुपऱ्या. (क्रि० येणें.).

हरळ—पु. ल्हान दगड; बारीक खडे; कण; गार; केर; धूलीकण. 'आणि घाराआंतील हरळु। केंदितां लागे वेळु।'-ज्ञा १३.३३६. -स्त्री वाळू 'सिकता हरळ रिजविती। मवाळ नव्हे कल्पांती।' [का. हरळु]

हरळ—स्त्री. खाष्ट सेवा; त्रासदायक काम, नोकरी; दगदग, त्रास. (क्रि० लागणें) 'काय हो या पोराची हरळ लागली'

हरळ-ळा—पु. १ (वांगी, मिरच्या इ० कांचें) रोप लावण्यासाठीं जमीनींत खोदलेली लांबट खळी; खांच, चर. २ पाणी नेण्याचा पाट; कालवा. हरल पहा. ३ पाणी वाहण्यानें पडलेला ओघळ; चर.

हरळ—वि. सैल, विरळ; फटी, भेगा असलेला. अरळ पहा. हरळणें-अक्रि. फट ठेवणें, पाडणें; दूर, विरळ असणें (दात, झाडें इ०). 'दांत कस्करे आणि हरळे।'-दा ३.७.२३.

हरळगा—पु. (वे.) एक जातीचा तांदूळ.

हरळी—स्त्री. (प्र.) १ आरोळी; मोठ्यानें मारलेली हाक. २ आक्रोश, दु:खानें फोडलेला हंबरडा, किंकाळी, बोंब. (क्रि० फोडणें; मारणें) ३ (नाट्य) राक्षसपात्राची आरडाओरड. [आरोळी]

हरा—पु. १ हारा; बांबूच्या कामटयाची मोठी टोपली; पाटी (भाजी, फळें इ० ठेवण्याची). २ (ल.) हाराभर जिन्नस (बाळकें, फळें इ०) म्ह० १ बाळकाचा हरा आणि छाकाचा डेरा (फार दिवस टिकत नाहीं). २ हरा बारा देव्हारा (दोन दिवसांचा)=क्षणभंगुरता, नश्वरता दर्शक

हरांजनी—वि. एक विशिष्ट रंगाचा (घोडा). -अश्वप १.१८.

**हराडा**—पु (व.) तापाची कमर, अंगमोडून येणें. 'एवढा फोड झाला त्याचा हराडा गाला असेल.'

**हराम**—वि १ बेकायदेशीर, असमान, निगम; दुष्ट, वाईट, अन्यायी, गैरशिस्त, निंद्य (व्यक्ति, काम) २ निषिद्ध (अन्न) [अर हराम्] ०खोर-वि. १ स्वामिद्रोही; लुच्चा, बेइमान. २ निषिद्ध अन्न सेवन करणारा. ३ लाचखाऊ, अप्रामाणिक, [फा हरामूखुर्] ०खोरी-स्त्री १ बेकायदेशीर कृत्य, अप्रामाणिकपणा; स्वामिद्रोह, लुच्चेगिरी २ निषिद्ध अन्नसेवन ३ लाच खाणें, अन्यायाची प्राप्ति [फा हरामूखुरी] ०जादगी-स्त्री १ हरामखोरी, लुच्चेगिरी 'जमीनदारांनीं हरामजादगी केली.' –रा १. २४४. २ स्वामिद्रोह 'रयत हरामजादगी करून अंमल सुरळीत देत नाहीं.' –रा ८.१५८. ०जादा-वि १ अनौरस, नाज. २ स्वामिद्रोही; लबाड, बेइमान. ३ धूर्त, दुष्ट, कपटी, बदमाष, उग. [फा हरामूझादा] ०जादी-स्त्री. १ अनौरस स्त्री २ हरामजादगी, लबाडी. 'त्याच्या हरामजादा व मक्रे सर्व नबाव बहादूर यांचे ध्यानात.' –रा १९.५९ ०नमकी-स्त्री निमकहरामी. 'पादशहाशी ज्यानें हरामनमकी बे-अदा केली.' –पया २१. ०मोत-स्त्री. वाईट प्रकारें आलेला मृत्यु **हरामाचा**-वि. लबाडी, अन्याय इ०नीं मिळविलेला (माल, पैसा) **हरामी**-वि. खराब, लुच्चा, कपटी, हराम पहा. –स्त्री हरामखोरी

**हरावल**—पु हरोल, सैन्याची आघाडी. [फा हरावुल्]

**हराशिवा**—उद्गा. स्पष्टपणें नाकबुली, नकार देताना उच्चारावयाचा शब्द [सं हर! शिव!] ०गोविंदा-उद्गा काहीं उत्तर न हीं, कृति नाहीं, अगदीं तटस्थता आहे असें दर्शविणारा उद्गार, रामशिवा!, गोविंदा!.

**हराप**—पु तोटा, नुकसान, हानि [सं ऱ्हास, अर हराज्] ०काळ-पु अडचणीची परिस्थिति, दिवस, उतरती कळा, विनाशकाळ **हरावणें**-अक्रि नष्ट होणें, नाहींसें होणें, उतरती कळा लागणें

**हरास**—पु लिलाव, विक्री. 'पाचशें शेतें हारासाला निघालीं असून त्यापैकीं ३० हरासही झालीं.' –केसरी २१.५ ३७. हैराज पहा.

**हराहोरा**—पु हरें वारें पहा

**हरि**—पु १ विष्णु, कृष्ण. 'हरि ज्याचा कैवारी त्या पाडुसुतासि वंदितों भावें' –मोआदि १ ७ (समासात) हरि-सत्ता-कीर्तन-कथा २ जुन्या संस्कृत व प्राकृत वाङ्मयात हरि शब्द पुढील अर्थानें आढळतो. उदा० घोडा, सिंह, माकड, बेडूक, सूर्य, इंद्र, यम वायु, चंद्र, प्रकाशकिरण, पोपट, सर्प इ०. ३ पृथ्वीच्या नऊ वर्षां (भागां) पैकीं एक वर्ष (हें निषध व हेमकूट याच्यामध्यें आहे) [सं] ०खग-पु विष्णुवाहन, गरुड 'त्याच्या विमान येइल काय न येनाचि हरिखग मनातें' –मोवन. ०गण-पु वानरसेना. 'सुग्रीवें घालुनि आपुली आण। आणविले सप्तद्वीपाचे हरिगण।'. ०चंदन-पु. पिवळा चंदन, कुंकुमागरु –न केशर. ०जन-पु महार, माग, भंगी इ० अस्पृश्य मनुष्य व जात (महात्मा गांधींनीं तयार केलेला शब्द). ०जागर-पु एकादशीच्या रात्रीचें जागरण 'दशमीव्रत एकभुक्त साचार। एकादशी उपोषण हरिजागर।' ०दास-पु १ हरीचा भक्त, उपासक २ कथेकरी, हरदास पहा ०दिन-दिनी-पुस्त्री. एकादशी. –जैअ १७ १२४ ०दिशा-स्त्री. पूर्वदिशा. 'हरीदिशेप्रती गमन करी। तों पुढें सह्याद्री देखिला।' –जैअ १६ २. ०द्वार-पु उत्तर हिंदुस्थानातील एक तीर्थ क्षेत्र, येथें गंगा हिमालयातून बाहेर सपाटीवर येते ०नाख-ग-वि १ एकरंगी पण पाठ पांढरी असणारा (घोडा). –मसाप २. १ २ दोन्ही कानात आणि डोक्याच्या केसात भोंवरा असलेला (घोडा) –अश्वप १ १०१ ०पद-न मेषसंपात, महाविषुव. [सं] ०पाठ-पु विठ्ठलभक्तिपर नामदेवरचित अभंग ०भक्त-वि १ विष्णुभक्त (विशेषत) हरिनाम घेत संन्यासवृत्तीनें फिरणारा भक्त. २ (ल) पक्का नास्तिक, दांभिक, ढोंगी ३ (ल) भोळसर, वेडसर ०भक्तपरायण-वि भगवद्भक्त, संत, हरदास. ०रंगण-न देवापुढील भजन किंवा नृत्य करण्याची जागा. –एभा १७.१९० 'गरुडपार हरिरंगणीं। टाळ मृदुंगाचा ध्वनी।' ०वर्ष-न हरि अर्थ ३ पहा. ०वासर-पु १ द्वादशीचा प्रथम पाद, तिथिवासर (यात भोजन करावयाचें नसतें) २ आषाढ, भाद्रपद, कार्तिक या महिन्यातील शुद्ध द्वादशीचा व अनुक्रमें अनुराधा, श्रवण, रेवती या नक्षत्राचा योग, नक्षत्रवासर. ०विठ्ठल-उद्गा भजनातील नामोच्चार –न (ल) सत्यानाश, नासधूस, सर्व समाप्ति, कार्यहानि इ० **हरीचा लाल**-पु वि १ चैनी मनुष्य, रंगेल मनुष्य 'डफ तुणतुणे वाजविणारे हरीचे लाल कोण असतील?' –स्वप २९ २ कोणी तरी, कोठला तरी माणूस.

**हरिक्अम्ल**—न (शाप) क्लोरिक ॲसिड [हर=क्लोरिन+ अम्ल]

**हरि(री)ख-क**—पु आनंद, हर्ष, उल्हास [स हर्ष, प्रा. हरिस, हिं हरिस] **हरिखणें, हरिखावणें, हरिखेजणें**-अक्रि आनंद होणें, पावणें 'जो आत्मलाभासारिखें। गोमटें काहींचि न देखे। म्हणोनि भोगविशेखें। हरिखेजे ना।' –ज्ञा ३. ७५९, १८ २३३

**हरिण**—पु मृग हरण पहा [स] **हरिणी**-स्त्री. हरणाची मादी २ स्त्रियांच्या चार जातींपैकीं एक चित्रिणी पहा ३ (काव्य) एक वृत्त याचे चरणात १७ अक्षरें व न, स, म, र, स, ल, ग, हे गण असतात उदा० 'हृदय उलटे शोकें माझें नव्हे द्विविधा तरी। विकल धरते मूर्च्छा काया न जीवित संहरी।

हरित—वि हिरवें [स]

हरि(री)तणें—सक्रि हिसकावून घेणें, काढून घेणें, नाहींस करणें 'पूर्वक्रम स्वतन्त्रता। हरितली की।' -विपु १०० -एभा २३ ५१९ [स हृ-हरण करणें] हरिता हर्ता-वि १ नाहींस करणारा, हरण करणारा २ चोर -एभा २ ३८८ हरिपत्र-न आपण हरलों असें लिहून द्यावयाचें पत्र, जितलेख अथवा यावें हरिपत्र' -गुच २५ ३६

हरिताल—पु हरताळ पहा हरितालिका-हरिताली-स्त्री 'हरताळका हरताळतीज पहा

हरिद्र—न हरद्र पहा [स हार्द]

हरिद्र—न (दादर) दारिद्य [स हृ-हर]

हरिद्रा—स्त्री हळद [स] ०मेह-पु पिवळी लघवी होणारा एक रोग 'प्रमेह' पहा ०राग-वि हळदी०या रंगाचें (नीलरागाच्या उलट) २ (ल) चचल, अस्थिर वृत्तीचा प्रेमाचा

हरिन्मणि—पु पाच रत्न [स]

हरिपी प्या—वि धाडसी साहसी हरीप पहा

हरियळ-ह्याळ—पु मधमाशा खाणारा एक प्राणी

हरियाळ—पुस्त्री ह्न्याळ पहा [हिं]

हरिश्चद्र—पु १ सूर्यवशातील एक प्रसिद्ध राजा यानें स्वप्नांत दिलेलें वचन अनेक सकटें सासून पूर्ण केलें २ (ल) (हरिश्चंद्रा सारखा) सत्यवचनी उदार माणूस [स]

हरी—स्त्री हार, ओळ राग (घाडें, विकें इ० ची) [स हार] हरीं क्रिवि दिशेनें ओळीनें सरी

हरी—स्त्री पराभव हार 'तवीं पुत्रापुढें रघुनाथ। हरी आपण घेतस -जैअ ३६ ६५ [स हृ=हरण करणें]

हरीक—पु कोदु नांवाचें हलकें, नाचणी सारखें धान्य याच्या ४ जाती आहेत भात पेज इ० करतात आकार राईसारखा व रग पिवळा असतो -वगु ६ २५ हरि(र)काचें जातें न हरीक दळण्यासाठीं एक विशिष्ट प्रकारचें केलेलें मातीचें जातें

हरीतकी हर्तकी—स्त्री पिवळा हिरडा याचे ७ प्रकार आहेत सप्त हरीतकी पहा [स]

हरीप प—पु १ शत्रु वैरी, बरोबरीचा प्रतिस्पर्धी २ शौर्यादि गुणांमुळें दुसऱ्याचें दमन करणारा माणूस 'आता दवा वाढें जाती। गांठ पडली हरीपाशीं।' ३ लबाड धूर्त माणूस, कावबाज साधु मराठे हरीफ बहुत आहेत असें बोलले' -सभासद ४९ -दिमरा १ २६१ ४ माहो घोव, वस्ताद तोडीस तोड करणारा तुल्यबळ मनुष्य [अर हरीफ] हरिपी-पी हरिफाई-स्त्री १ वैर, शत्रुभाव २ धाडस साहस धैर्य धाडसी कृत्य ३ धूर्तता, चतुराई कावबाजी 'आता तुमची त्यांची भेटी खास खास मांडी करवितों, तुम्हीं हरिपी करून कार्यभाग करणें तो करावा' -सभासद १५ हरिपी-प्या-वि धीट साहसी, धाडसाच्या कामात पुढें असणारा

हरीमुग—पु मुगा(धान्या)ची एक जात रंग हिरवा -कृषि ३२३

हरुख-ष हर्ख—पु हर्ष हरीक-ख पहा 'हरुषकाळीं विषमकाळीं।' -दा ४ ३ ५ [स हर्ष] ०मात-स्त्री आनंदाची बातमी आली द रा केले हरखाची गुढी। सांगितली पुढीं हरूखमात।' हरूषते वि हर्षित

हरेरा(रो)रे—न (टवाळीखुणाली, चैन इ० ची) अस्थिरता चचलता, क्षणभगुरता, पोकळपणा, इ० होरा वार हराहोरा हरा पहा [होरा=भविष्य+रोरे=देव इ० चा सचार] म्ह० हरेवारे वव्हारे किंवा हरावारा वव्हारा

हरोल ळ-ळी—स्त्री १ हरवल पहा सैन्याची आघाडी फिनी 'जाधवराव पुढें हरोळास आले' -पेद १ ७२ २ (ल) पुढारी माणूस, नायक तुम्ही या मनसबियास हरोल होऊन गन सुवा सिद्धीस जाय ते करणें -बादशाह ३०, -पद १ ११ [फा हरावुल]

हराह(हा)र—विक्रि हारोहार पहा

हराळी—स्त्री आरोळी पहा -लोकरथा २ ८०

हरोळी—स्त्री आरोळी गारर, लहान पोळी, भाकरी 'गूळ घालून हरोळया केल्या (लक्ष्मीबाई टिळक) १३१ [अहार-ळ+पोळी]

हर्क—पु हरिख हर्ष तर्कांत तर्कला रि हर्क। हर्कांत हर्कला कि हर्क।' -ज्ञाप्र ३६० [स हर्ष]

हर्ता—वि हरण करून नेणारा, बलात्कारानें घेऊन जाणारा पळवून नेणारा २ निवारण करणारा (सकट इ०) 'सुखकर्ता दु खहर्ता वार्ता विघ्नाची।' -गणपतीची आरती [स] हर्तृत्व-न १ पळवून नेणें; बलात्कारानें लुबाडणें हरण, अन्यायानें संपादन २ लुबाडण्याची इच्छा

हर्यळ—पु हरियळ पहा

हर्र—उद्गा मेंढया बकरीं इ० ना हाकावयाचा शब्द [ध्व]

हर्याळ—पु लहान हिरवट साप [स हरित् हिरवा+अहार-आर=अजगर]

हर्वजेनें—क्रिवि योणत्यादि रीतीनें दिक्कदरि याहून हादत निघाला म्हणज मार्गींच हर्वजेनें निशा करितो' -रा ६२३ [फा हर्वजह्]

हर्ष—पु आनद उल्हास सुख [स] ०माण-वि आनंदित उल्हासित, आनंद उपभोगणारा ०वायु-पु अत्यंत आनंद झाला असतां होणारा वातविकार ०शोकविरहित-वि स्थितप्रज्ञ, मनाच्या सुखदु खादि भावनांपासून मुक्त हर्षक-

वि. आनंद देणारा. हर्षण–न १ आनंद करणें-देणें; आनंदावस्था २ –पु (ज्यो) सत्तावा योग. ३ –नपु डोळ्यांचा एक रोग हर्षणें हर्षिणें–अक्रि. आनंदणें; आनंद पावणें. 'दाता देखतां याचक हर्षे।' हर्षामर्ष-र्षा–पु १ तंटाभांडण; अरेतुरे; गालिप्रदान; त्रास. "त्याचा तुमचा हर्षामर्ष पहिलेपासून लागला." –वाडशाछा २४. २ आनंद व क्रोध; रागलोभ. 'हर्षामर्षे ठेलें। दुर्जनविण।' –ज्ञा १२.१६८. [हर्ष+अमर्ष] हर्षित–वि. आनंदित; आनंदलेला; आनंदित झालेला किंवा केलेला.

हल्—पु १ व्यंजन. २ अर्धाक्षर, व्यंजन दर्शविणारी अक्षराचे खालील पाय तोडावयाची (्) खूण. (क्रि० देणें, करणें). ३ असल्या खुणेचें अक्षर. [पाणिनीच्या पहिल्या माहेश्वर सूत्रावरून] हलन्त–वि. ज्या शब्दाच्या शेवटीं स्वर नसून व्यंजन असतें असा (शब्द).

हल—पु नांगर. –एभा २७.२५६. [सं.] ०धर–हलायुध–पु. बलराम यादव. 'तीतें स्वमतें हलधर धृतराष्ट्रसुतासि द्यावया पाहे।' –मोकृष्ण ८६ २. हलवंदी–स्त्री. गायकवाडींत जमीन कसण्यासाठीं वापरण्यांत येणाऱ्या दोन बैलांच्या नांगरावरील कर –दा. ना. आपटेकृत सयाजीराव गायकवाड (तिसरे) यांचें चरित्र खं. १, पृ ३३९. [हल=नांगर+वंदी]

हलअ(आ)पदा–अपेक्षा—ढाल मध्यें पद्दा.

हलक—स्त्री गवयाचा गळा; आवाज, फिरकी. [अर. हल्क्]

हल(लु)क, हलाक-ख—वि. १ निःशक्त झालेला; दमलेला; क्षीण (दुखणें, श्रम इ० नें). 'दोनतीन चपेट होऊन बहुत हलाक जहाले आहेत.' –चित्रगुप्त ७९ २ गरजू; निष्कांचन; दरिद्री. [अर. हलाक्] हलाकी-खी-स्त्री. १ थकवा; शीण; अशक्तपणा; क्लांति. 'आपले राज्य नवें त्याहीमध्यें दोनतीन चपेट होऊन हलाखी झाली आहे.' –सभासद ४७. २ कंगालपणा; अत्यंत दारिद्र्य; दुर्दशा. 'हलाखीची स्थिति' असा रूढ प्रयोग. 'लस्करात दाणाचारा मिळेना तेव्हां हलाखींत आले.' –मराविग्रोशा ५८. [अर. हलाकी]

हलकट—वि (सर्व अर्थानें) हलका पहा. [अल्पार्थी हलका]

हलकट—स्त्री (राजा) दंगाधोपा; ठाणमार; लुटालूट. 'गंगातीराकडे अलाशीं हलकट आहे तुम्ही तिकडे जाऊं नका' [अर. हलाकत्] हलकटणें–अक्रि. दंगा चालू असणें.

हलकडी—स्त्री. १ नथेचे लोंबतें मोती. झिरमिळया. २ मोती गुंफण्यासाठीं दुफांडी नथेला जो तुकडा जोडतात तो ३ झोंपाळा, पाळणा इ० टांगण्याचा आकडा, कडी. [अर. हल्का]

हलकयाल—न चित्रे इ० काम रंग देण्याचे उपयोगी एक पदार्थ; हा जस्तापासून करतात. [अर. हला=विरघळणें+कयील]

हलकलणें—अक्रि. १ (दंगाधोपा, आग, दुष्काळ इ० नीं देश, गाव जनसमुदाय इ०) गडबडणें; गोंधळणें. २ अस्वस्थ, बेचैन, फार प्रक्षुब्ध होणें (एखाद्या व्यक्तीनें). [कल्कल्+हल् द्वि]

हलकल्लोळ–कल्होळ–कालोळ—पु. आरडाओरड; बोंबाबोंब, गडबड; गोंधळ; मोठा बेसुर आवाज (वाद्यें इ०चा); तुंबळ ध्वनि; कडकडाट. [कल्लोळ+हल द्वि]

हलकल्हई—स्त्री. जस्तापासून केलेला एक मऊ हलका पदार्थ; हलकथील.

हलका-गा—पु १ झोंपाळा, पाळणा इ०च्या दोऱ्या, कड्या छतास टांगण्यासाठीं केलेले विशिष्ट आकाराचे आंकडे प्रत्येकी. 'लावून रुपेरी हलके हिंदुळे बांधिले।' –प्रला. २ दिवा इ० टांगण्याचा आकडा. 'फणसें रिवर्ळी हलक्यांना। आत पिवळ्या मोंवत्या आरमे पिवळे झळक्याना।' –प्रला ९३. [अर. हलका] हलकी–स्त्री. झोंपाळा इ० टांगावयाची आंकडी, कडी. हलका पहा.

हलका—पु. एक वाद्य. याला हळका व धूम नांवाचीं दोन डफडीं असतात. संबळ पहा. हलकी–स्त्री. एक वाद्य; खंजिरी, डफडी. हलका पहा.

हलका—पु (वे. कर्ना.) शेतांतील ढेंकळें फोडण्याचें दाताळें; एक औत. [का हलिके; तुल० सं. हल]

हलका—वि. १ वजनांत कमी; जड नसलेला. २ लहान; न्यून (प्रमाण, वजन, लांबी इ० मोजतांना). ३ कमीप्रतीचा; कडक नसलेला (गुण, प्रभाव इ० त). 'अंमलाच्या बाबतीत अफूपेक्षां भांग हलकी' ४ सौम्य; मंद, कमजोर (थंडी, पाऊस इ०). ५ जड नसलेलें; पचण्यास सोपें (अन्न) ६ शरीरास गुणकारी, (अन्न); पचण्यास सोपें (पाणी) ७ सहन करण्याजोगा; फारसा मोठा नसलेला; क्षुद्रक (रोग, विकार काम). ८ कमी महत्त्वाचें; किरकोळ (काम, वाव) ९ कमी दर्जाचा, अधिकाराचा, वजनाचा (माणूस) १० कमी किंमतीची (वस्तु). ११ बेताची, प्रमाणशीर; कमी (किंमत, भाव) १२ क्षुद्रक; गौण (विषय) [स लघु प्रा. हलुअ; हिं हलका; तुल० सं. क्षुद्रक] कानाचा हलका–वाटेल त्यानें ऐकून त्यावर विश्वास ठेवणारा. जिवाचा मनाचा हलका संकुचित दृष्टीचा; क्षुद्र; हलकट. मुद्दांचा हलका–कमी बुद्धीचा; मंद डोक्याचा; मूर्ख. ०पतला–वि. (व) कमजोर, दुर्बळ; किरकोळ. ०फराळ–पु थोडें अन्न व पुष्कळ पाणी पिणें. ०फूल–वि अत्यंत हलका. ०भार–पु. कमी भार, तोल. हलक्यानें–क्रिवि. हळू, लघुप्रमाणानें; सावधपणें (बोलणें, चालणें इ०). 'हलक्यानें–बोल, चाल इ०.'

हलकारत-ती—स्त्री. १ आग दिवे ( कापूर इ० ) लावून देवास ओवाळावयाचे एक लाकट व चापट असे धातुमय पात्र. २ आरती. [ हलका+आरती ? ]

हलकारा—पु. जासूद. हरकारा पहा. हलकारगिरी-करागिरी-स्त्री. हलकाऱ्याचें काम व हुद्दा.

हलकावणी—स्त्री. हुलकावणी पहा.

हलकावणें—अक्रि. १ हलकें होणें; मवाळ, कमी होणें. 'कष्टाचा भारही हलकावन जाईल.' —तुफान २९. २ विनीत, नम्र होणें. —उक्रि. १ हलकें करणें. २ ( एखाद्याचा ताठा, गर्व ) उतरविणें, खालीं करणें [ हलका ]

हलकुन-द—वि. मऊ व नाजूक; हलकी ( वस्तु, प्रकृति, व्यक्ति ). [ हलकें ]

हलकुम-न—पु ( कुस्ती ) हातखोडा; आपला हात जोडीदाराच्या पलीकडच्या बगलेवरून घालून, अलीकडच्या आपल्या हाताच्या कोंपराच्या सांध्यांत आपल्या हाताचें मनगट धरून, जोडीदाराच्या पोटास दाब देऊन घुमवून चीत करणें हलकुम उलटा-पु. ( जचिया ) आपल्या जंवियानें जोडीदाराच्या गळ्याच्या घांटीजवळ उजवीकडे मारणें. ०सीधा-वरील डावाच्या उलट म्हणजे जोडीदाराच्या घांटीच्या डाव्याबाजूजवळ मारणें. [ अर हल्क-हल्कूम=गळ्याची घांटी ]

हलकें—न १ ल्हान लहवा हलकी ( कडी इकडे ). २ ल्हान हलकरती. [ हलका ] हलकें डोसकें-डोकसें-मस्तक-न. १ हजामतीला सोपें व राठ नसलेल्या केसांचें डोकें; याचे उलट जड डोसकें. २ मस्तक हलकें होणें ( रक्त जाण्यानें इ० ) १ ल्वकर बिघडणारें, भडकणारें डोकें; याच्या उलट शांत डोकें ! ०फूल-वि. साधें, बिनत्रासाचें ( काम धंदा ).

हलख—स्त्री.वि. हलक पहा.

हलखुशामत-ती—हाल्खुशामत पहा.

हलखुद—वि. हलकें; सहज व्यवस्था करतां येणारें; अव जड नसलेलें, बिनत्रासाचें ( काम, गडा, शरीर इ० ). [ हलका+सं क्षुद्र; फा खुर्द=ल्हान ]

हलगती—वि. हलगत म्हणून एक पेठ आहे तेथील ( कापड इ० ).

हलगरजी-जू—वि. निष्काळजी; स्वतः वाटेल तेव्हां, वाटेल तसें काम करणारा; सुस्त, मंद ( प्र. ) अलगरजी. [ फा. अहल्-इ-गरज़=स्वार्थी ] हलगरज-स्त्री. सुस्तपणा; निष्काळजीपणा. असेंहि नाम कधीं वापरतात.

हलगा—( सर्व अर्थी ) हलका कडी पहा.

हलगी—हलकी पहा.

हलगी मालगी—स्त्री. टाळमंगळ, नाचूं; कांहूं; चालढकल ( क्रि० करणें ). -क्रिवि. कांहूं करीत. [ ध्व ]

हलचाल. हलणें. हलता नारळ—हालचाल इ० पहा. [ वै. प्रा. हल; हिं. हिलना ]

हलद( दि )या—वि. ( कों ) पिवळा. [ हळद ]

हलपटणें—सक्रि. ( वे. ) फेकणें.

हलपिला—वि. ( क. ) चपळ; दक्ष; भरभर काम करणारा.

हलफिलाल—क्रिवि. आत्तां; याक्षणीं; ल्वकर. [ अर. हाल, फिल्हाल ]

हलफूल—वि हलका फूल.

हल(ळ)बी—पु नागपूर-वऱ्हाड प्रांतांतील एक रजपूत सदृश हिंदु जात. हे लोक शेती करून असतात. याच्या अर्वाचीन सततीस 'लाल पंथी' म्हणतात. याच जातीनें बहिष्कृत केल्यामुळें हे इस्लाम धर्म स्वीकारतात. याच्यांत घरजावई करून घेण्याची चाल आहे. अशा घरजावयास 'घरजवळे' म्हणतात. —केसरी ३० ६ ३६.

हलबेलंडी-चालंडी-बेलंडें, हलबिंडया-चंडया—स्त्री.स्त्री.न.स्त्री.अव. ( अशिष्ट ) गाळण; तारांबळ; तिरपीट; भीतीमुळें होणारी अवस्था, दिपति [ हिं हे+बेलंड ]

हलमस्त—वि. दरिद्री परंतु गर्विष्ठ. हालमस्त पहा.

हलमा दांडू—वि. ( व. ) आडदांड. 'सुन सांडली हलमा दांडू'

हलयाणें—सक्रि. हलासिणें, हाणणें. —शर.

हलवा—पु १ एक मिठाई. २ तीळ, खसखस वेलचीदाणा इ० साखरेच्या पाकांत घोळून त्यावर कांटा आणून केलेली एक मिठाई; संक्रांतीचा तिळगूळ. ३ एक जातीचा मासा. [ अर. हल्वा ] हलव( वा )ई-पु. हलवा व इतर मिठाई करणारा व विकणारा मनुष्य; मिठाईवाला. [ फा. हल्वाई ] म्ह० हलवायाचे घरावर तुळशीपत्र-अग्रार्पण=परभारें दुसऱ्याची वस्तु तिसऱ्यास देणें, आईजीच्या जीवावर बाईजी उदार याप्रमाणें.

हलवांग—पु. ( गो. ) खुशामत्याचा अंगविक्षेप. [ हलविणें+अंग ]

हलवान—न. कमी किंमतीच्या शालीचें एक फर्द; अलवान पहा.

हलवान—न. एक पेल्यासारखें भांडें.

हलवी—स्त्री. एक ल्हान झाड.

हलसान—क्रिवि ( व. ) बेजार ( क्रि० होणें ). [ हलाक ]

हलसूद—वि. हलकें; अवजड नसलेलें ( शरीर, ओझें इ० ). हल्खुद पहा. [ हलकें ]

हल्ह(हा)लणें—अक्रि. राग इ० विकारानें अंगाचा थरकाप होणें [ हिं हल्हलाना, म हलणें द्वि ] हलह(हा)लून-क्रिवि कापत कापत ( क्रि० उठणें )

हल्हलीन—वि अत्यंत दरिद्री, हीनदीन [ हाल ]

हलहवाल—पु संकटमय दुःखद स्थिति हाल्हवाल पहा

हलाक-ख—हल्क पहा.

हलायक—वि पाच ते दहा अंगुळेंपर्यंत पांढरे पाय असलेला ( घोडा ). –अश्वप १९

हला(ल्ला)ल—वि १ योग्य, धर्म्य, विहित, न्याय्य, अनिषिद्ध ( खाद्य वस्तु, दान इ० वेण्याचे पदार्थ ), विधीपूर्वक मारलेल्या पशूचें ( मांस ) 'मुलानानें फत्या न दिला तर बकरें मुर्दाड म्हातें म्हणजे तें हलाल होत नाहीं' –गागा ११३ २ रास्त योग्य, प्रामाणिक, उत्तम; कायदेशीर ( धंदा, नेमणूक, काम, फायदा मिळकत, संपादन ) [ अर हलाल् ] ०करण-मुसल्मानी धर्मशास्त्राप्रमाणें पशु मारणें, जबा-जबे करणें हलालाचा-वि योग्य मार्गानें, न्यायानें मिळविलेला, संपादलेला ०खार-पु १ स्वतः श्रम करून खाणारा माणूस. २ भंगी, झाडू 'शेन मजकूरच्या गल्या हलालखाराकडून झाडवून निर्मळ राखणें' –वाडसमा ३ १२ ३ हलकें काम करणारा माणूस [ फा हलालखुर् ] हलालखोरी-स्त्री १ हलालखोराचा धंदा, स्थिति २ हलका धंदा ३ प्रामाणिकपणा, इमानीपणा 'तुझे बावें नरसो दामोधरें हुजूर हलालखोरी बहुत वजा साणिली' –रा ११ ३१ –वि हलालखोरासंबंधीं (भाषा वगैरे इ० ) हलाला हरामी-स्त्री प्रामाणिकपणा व अप्रामाणिकपणा, बरेवाईटपणा –वि बरेवाईट, भलाबुरा 'हलाली-हरामीची गांठ पल्ली तर यांस माल न द्यावी' –भाव ८१ [ अर ]

हलाल्णें—अक्रि अतिशय हलणें हल्हलणें [ हलणें ]

ह(हा)ला(स)सिगें—क्रि हाणणें –हंको 'जेणें उरीं हालासि पापरा। तयाचा चरण वाहामी दातारा।' –माज्ञा ११ १०५.

हलाहल—न. १ समुद्रमथनांतून निघालेलें भयंकर विष 'धात्रें धरिलें हलाहला। तेणें नीलवर्ण झाला गळा।' –नव २ सापाचें जलाल विष ( सामा ) जहर, जहाल विष हालाहल पहा

हली, हलिक—पु नागऱ्या, शेतकरी, कर्दा 'जेविं भज शस्त्रपाणि हलिक वहा।' –मोवन ४ ९२ [ स हल ]

हलामवाली—पुअव. मोठेधाकटे, उच्चनीच, श्रीमतगरीब, सरसकट सारेजण [ अर, अहालीमवाली ]

हलाहरामी—स्त्री ठकबाजी, लुच्चेगिरी यांचा अतिरेक –वि लुच्चा, लबाड, अप्रामाणिक, भामटा [ हरामी द्वि ]

हलुवट—वि हलकें. हलुवट पहा.

हलुस्वार—वि ( कु ) हौशी.

हलूमालू—स्त्री डगमगळ, चाल्ढकल, कांकू, नानू. –क्रिवि डगमगळ, काकू करीत हलोमालो पहा

हलेणें—सक्रि बदविणें, मारणें 'तरी चाखिता गूळगुळें। माखिलें काजळ काजळें। कां घेपे दपे शुळें हालया शूळ।' –अमृ ७५०. 'साउलियेतें स वळे। हालया भाय आदळे।' –अमृ ६४४

हलेसा—पतिंगा पहा

हलो—पु ( कु ) रेडा, हल्या.

हलोह(हा)ल—क्रिवि हलफिलाल हालोहाल पहा [ हिं ]

हल्य—वि नांगर, नागरट इ० संबंधीं [ स ] हल्या पु. रेडा, टोणगा [ स हल्य, हिं हला ] हल्याहल्या करणें– ( कर ) दुमणें लावून काम करून घेणें.

हंल्ल—हाल पहा 'प्राणरत्नभा हल्ल पावल्या.' –अमृत युद्धवर्णन पृ ५५

हल्लक-ख, हल्लकी-खी—हलाक, हलाकी पहा.

हल्लर—पु अंगाईगीत, पाळणा 'अनुइन बाळका हल्लर गातीं।' –तुगा ४०३५ 'हल्लर गाती यशोदा सुंदरी।' [ ध्व. हला! ]

हल्ला—स्त्रीपु १ चढाई, छापा, एलगार 'शिवाजी आपला पुन याजवरी हल्ला करावी.' –सभासद १०. २ ( ल ) आवेशानें झटणें, जोमानें, निश्चयानें एखाद्या कामास लागणें 'तुम्ही सांप्रत लिहिण्यावर हल्ला माडला हें काय?' [ अर हल्ला ] ०हरकत-स्त्री १ अडथळा, त्रास, विघ्न, तटा, बखेडा (सर्वसामान्यपणें). 'या वाटेनें तुम्ही खुशाल जा, कोणी हल्ला हरकत करणार नाहीं' 'हा गृहस्थ बरा आहे ह्यास रुपये दिले असता काहीं हल्ला हरकत करणार नाहीं' २ ( क्वचित् ) हिला हरकत असेंहि रूप आढळतें

हल्लाळ—हालाहल पहा.

हल्लाली—वि मारलेल्या जनावराचें काढलेलें ( कातडें ), हलाली पहा याच्या उलट मुर्दाडी

हल्लीं—क्रिवि सांप्रत, आतां, यावेळीं हाली पहा हल्ली-माजा-माजी इ० पहा

हल्लीसक नृत्य—न रासक्रीडेचा एक प्रकार या नृत्यांत एक पुरुष व एक स्त्री अशी माळ लावून चक्राकार फेर धरून नृत्य करतात अथवा क्वचित् एकच पुरुष असून स्त्रिया मात्र अनेक असतात –किरातकृत भासाच्या बालचरित नाटकाचा मराठी अनुवाद व त्याची प्रस्तावना, पृ ५. [ स ]

हल्संधि—पु व्यंजनाशीं होणारा संधि. उदा० महान्+ ईश=महानीश [ स ]

हवा(यी), हवाई—स्त्री १ मोठी चंद्रज्योत ( दोमेच्या दारूची ) २ एक प्रकारचा बाण ( दारूचा ) 'हवया गगनातें भेदिती। देव पाहती विमानीं।' –ह २४.१३४. [ फा हवाई ]

हयडा—पु (बायकी) कपडाने पिळून करणे, बडा. (क्रि० मारणे)

हयदा—पु हौदा पहा

हवन—पु होम अर्थात आहुती टाकणे 'गुरुवाक्यहुताशीं। हवन केलें।' –ज्ञा ४ १२३ 'अथर्वणे वदें केलें हवन। प्रद्युम्नानि ययोन्विता।' –एरुस्व ५ २२ हवणें–सक्रि होम करणे आहुति देणे [स हु] हवनी–स्त्री हामकुड

हवरा—वि लोभी हावरा पहा

हवरा-री—पुस्त्री पंधरा तीळ

हवलदार री—हवालदार-री पहा

हवलदि(दो)ल—वि भयभीत, घाबरलेला, गोंधळलेला हवालदिल पहा [फा] हवलदिली–स्त्री भीतीची अवस्था, काळजी, चिंता, हवालदिली

हवशा-शी-सी हवस, हवसदार—हौशा, हौस इ० पहा 'मामलत्याची हवस काहीं राहिली नाहीं' –इम ६७

हवळा—पु हुळा, भाजलेले हिरवा हरभऱ्याचे घाट [स होलक]

हवळा—वि लोभी, अधाशी, हावरा [हाव]

हवळा—वि नाजुक, कोमल (व्यक्ति, रचना, प्रकृति शरीर, शब्द इ०) [हळवा]

हवा—स्त्री १ वारा वायु पचमहाभूतांपैकी एक २ हवेचें शीतोष्णमान प्रकृतीवर परिणामकारक गुणधर्म ३ आकाशाची पोकळी अतराळ 'पक्षी हवेंत उडतात' ४ हवापाणी ५ धुंदी 'उतरली भरज्वानीची हवा।' –पला [अर हवा, तुल० स वह्] ०खाणें–सहल करणें, घराबाहेर उघड्या मैदानात इ० फिरावयास जाणें ०खेळणें–घरात हवेचा प्रवाह सर्वत्र मोकळे पणें वहाणें ०दोज–वि उच, गगनचुंबी 'हवादोज शामीने' –भाम १८३४ ४८ ०फेर–पु (गु) प्रकृति सुधारण्यासाठीं दुसरे ठिकाणीं चांगल्या हवेंत जाणें हवापालट ०शीर–वि पु कळ वारा असलेली शुद्ध हवा मुबलक खेळते अशी (जागा इ०) हवाई वि हवेसबधीं हवाई जहाज–न विमान

हवाई—स्त्री छापा हल्ला 'तेथून सडे हाकून रोज फौज यत चलली म्हणजे त्याजवरी हवाई करावयास येईल' –ख १ २०७

हवाडी—स्त्री सुकाणूची मूठ

हवारू—वि (गो व्यापारी नदभाषा) दोन (सख्या) अवारू पहा

हवाव—स्त्री शोभा रंग 'सहज रंगें हवावें।' –ज्ञा १५ १६१ 'कैसी बोलाची हवाव।' –ज्ञा ६.१३२

हवाल—पुस्त्री (अरीवाईट) चालू परिस्थिति, हालहवाल पहा (कामकाज, व्यक्ति दश स्थान इ० चा) 'वाचून दाखव तील त्याजवरून कच्चा हवाल मनात ध्यानास येईल' –दिमरा १ १३३ [अर अहवाल]

हवा(य)लदार—पु १ सुभेदाराच्या हाताखालचा मुलकी अधिकारी २ किल्ल्याचा रखवालदार अधिकारी ३ इग्रजी सैन्यां तील सार्जंटच्या तोलाचा अधिकारी (जमादार, नाईक याप्रमाणे), निरनिराळ्या खात्यांतील या पदवीचे अनेक अधिकारी असतात ४ एक पोलीस अधिकारी [फा हवालदार] हवालदारी–स्त्री हवालदाराचें काम, अधिकार इ० [फा]

हवालदिल-ली—वि घाबरलेला, धीर सुटलेला होलदिल इ० पहा [फा]

हवाला—पु १ ताबा, काळजी, भिस्त दुसऱ्याकडे सोप विणें २ हमी, आमीनकी –पक्षा ९८ ३ रखवाली, राखण, टाकलेला विश्वास (क्रि० पार पाडणें, उतरणें, चालविणें इ०). 'निज प्रियरत्नांकडे ठेविहि द हवाला जशी।' –कका ११ ४ सुपूर्दगी, जबाबदार ताबा किंवा अधिकार (क्रि० देणें, घेणें) [अर हवाल] हवाला-ली-लें–क्रिवि (रक्षणादिसाठीं) स्वाधीन. (क्रि० करणें होणें, असणें इ०) हवालणें–उक्रि सोंपविणें सुपूर्त करणें, स्वाधीन करणें, जबाबदारीवर टाकणें, हवाला देणें (कर्म, काम इ०) 'हें घर बाधण्याचें काम मजकडे हवालून द्या' हवालत–स्त्री सोंपवणूक जबाबदारी भिस्त हवाला पहा 'अठरा हजार रुपये हवालतीस होत तेही परिहार करून' –मदरु २ १४ [अर] हवाला कवाला-टवाला–पु (सामान्यत) हवाला, हमी इ० [हवाला द्वि]

हवाची—स्त्री (को) घोंगल्यानें लागलेली धाप दमा, कफ [ध्व हा!]

हवि—न होमांत टाकावयाचें (तूप भात इ०) द्रव्य पदार्थ, बली [स हविस्] हविर्त्रि–स्त्री होमकुड हविष्य–न १ हवन करावयास योग्य वस्तु हवि २ व्रतादि दिवशीं भक्षणीय असा शुद्ध पदार्थ (गोधूम गोदुग्ध इ०) ३ (ल) वरील पदार्थ खाण्याचें व्रत नियम बधन ४ (उप) नेहमीची लोकाचारा विरुद्ध किंवा स्वैर वागणूक वर्तवाद, नेम, प्रघात, व्यसन 'या गावात सव लोकास राडबाजी हें तर हविष्य आहे' 'घोड्यावर बसणें हें त्याचें हविष्य आहे' हविष्यान्न–पु हवि, हविष्य अर्थ १ पहा २ तांदूळ, गहू इ० धान्य व तूप, दूध इ० हवनीय पदार्थ, ३ हे पदार्थ खाऊन रहावयाचें एक व्रत [स हविष्य+अन्न]

हवेली—स्त्री १ मोठा वाडा राजवाडा, मदिर, मोठें व उच सुशोभित घर २ जिल्ह्याचें मुख्य ठिकाण राजधानी (प्रांत जिल्हा यांच्या मुख्य शहराच्या नावांपुढें किंवा मागें जोडून हा

शब्द येतो ) १ राजधानीचे भोंवतालचा भाग, गिर्द २ पुणें जिल्ह्यातील आंत पुणें शहर असलेला एक तालुका [ फा हवीली ] ०दाखल–वि गृहप्रविष्ट 'आम्ही हवेलीदाखल जहालों ' –रा ६ २८८

**हवेली**—स्त्री (गु) गुजराथेंतील वैष्णवांचें देवालय महात्माजीचे सत्याचे प्रयोग [फा हवीली]

**हव्य**—न १ तूप भात इ० हवन करावयास योग्य पदार्थ हवि २ यज्ञयागादि कर्म [स] ०कव्य–न (देवासाठीं तें हव्य व पितरांसाठीं तें कव्य ) देव व पितर यांना हविर्भाग अर्पण करावयाचा विधि होमहवन, मन पूजा श्राद्धपक्ष इ० 'त्याचे घरीं कांहीं हव्यकव्य झालें असता मला बोलावतात ०पाक–पु देवतांसाठीं तयार केलेलें अन्न इ० होमान्न ०वाट्–पु अग्नि

**हव्यास**—पु १ उत्कट इच्छा तृष्णा हाव छंद नाद २ त्रास (क्रि० घेणें लागणें) 'दुर्बोध वक्रपणीं ज्याचा सर्वत्र परम हव्यास।' –माभीष्म १२ ३८ 'या जोशीबुवास पुस्तकसंग्रह करण्याचा हव्यास फार' ३ उत्साह [ अर हवस् हव अशी आस ] **हव्याशी सी**–वि १ सकाम, सतृष्ण २ नादी, छंदी, सोस बाहुला

**हश(शा)म**—न लवाजमा परिवार नोकरचाकर शिपाई प्यादे अनुयायी (मोठ्या लोकांचे) [अर हशम्] ०दस्तगाह–पहा–वि ऐश्वर्यसंपन्न ०नवीस स ०नीस–पु शिपाया वरील किंवा सैन्यांतील सैन्याची हजेरी हिशेब इ० ठेवणारा अधिकारी [फा हशमनवीस्] ०निशी–सी–स्त्री हशमनीसाचें काम हुद्दा 'प्रांत बलापूर येथील हशमनिशी शामजीराम याज कडे होती ' –वाडसमा २ १२ ०फडणवीस फडणीस–पु हशमनवीस **हशमत**–हशम पहा [ अर हश्मत् ] **हशामा**–वि हशमसमर्थी

**हशा**—पु कापडाची किनार काठ (शाल गालिचा दुलई इ० चा) [ अर हाशिया ] **हशेदार**–वि किनारीदार 'गाया मशरूच्या हशेदार –वाडबाबा १ ११३

**ह(हं)शा**—पु १ मोठ्यानें खो खो हसणें हास्य (क्रि० करणें पिकणें) २ हशी पहा ३ लहान मुलांचें हसणेंखिदळणें [स हस् हि हंसी]

**ह(हं)शी**—स्त्री हशा उपहासात्मक हसणें विडंबन मस्करी (क्रि० करणें, मांडणें ) [हिं] ०खुशी स्त्री प्र, प्रवृत्ति प्रसन्नमर्जी राजीखुशी ०खेळी–स्त्री हसणें व खेळणें मजा चैन हशीखशी–खांनीं–नें–मध्यें इ० (कारक विभक्तींत प्रयोग) [हसण+खेळणें]

**ह(हा)शी(सी)ल**—न (प्र) हाशी(सी)ल १ सरकार देणें, आकार २ हेतु उद्देश अर्थ तात्पर्य ३ टपाल इत्यादींचा खर्च, आकार किंमत फी ४ प्राप्ती लाभ नफा 'साहुकारी मुळें जकातीचेंच हशील होईल ' –मराभा ३७ –वि प्राप्त पुढें मुद्दे हशील होतील ' –ख २ ५४८ [ अर हासिल् ]

**हंस**—पु १ एक पक्षी हा मानससरोवराकडे असतो बदकापेक्षा मोठा व पांढरा असून दूध आणि पाणी एकत्र केलें असता त्यांतून दूध निवडून पिणारा जवर उडणारा, पोहणारा पक्षी असा त्याचा लौकिक आहे बदक बरट २ (ल) जीवात्मा 'हंसाविणें कुडी ' –वसा ३ संन्याशांतील एक भेद, परमहंस ४ ब्रह्म परमात्मा ५ विष्णु, सूर्य इ० देव [स] ०कंकणी–पु (संगीत) एक राग यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार कोमल मध्यम पंचम तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात आरोहांत ऋषभ व धैवत वर्ज्य जाति औडुव–संपूर्ण वादी पंचम संवादी षड्ज गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर ०गति-गामिनी–वि हंसाप्रमाणें चालणारी (स्त्री) ०ध्वनी–पु (संगीत) एक राग यांत षड्ज तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, पंचम तीव्र निषाद हे स्वर येतात जाति औडुव–औडुव, वादी षड्ज संवादी पंचम वेळ रात्रीचा पहिला प्रहर ०नाद–पु हंस बदक यांचा किलकिलाट ०पद–न काकपद (लिखाणांत केलेलें) हंसपद देवोनी ओळी। उणें अक्षर रेखिन मौळी।' –मुआदि २५ ५९ ०पक्ष(हस्त)–पु नृत्यांतील एक अंगविक्षेप आंगठा व करंगळी याशिवाय सर्व बोटें मिटणें (तीं तळहातास न चिकटतील अशीं वांकविणें) आंगठा कोणत्याहि बोटास न चिकटविता थोडा वांकविणें व करंगळी उभी ठेवणें 'हंसपक्षी नितंबकु ऐसे। भेद सांगता कथा वाढेल।' –भाए ४५८ ०पुतळी–स्त्री गळ्यांतील पुतळीच एक प्रकार 'हंसपुतळ्या तेज कल्लोळ।' –देवीदासकृत भामावर्णन ६ ०बुद्धि–स्त्री तीव्रबुद्धि विषय चटकन आकलन करण्याजोगी बुद्धि तारतम्य बुद्धि –ज्ञानप्रकाश १७–८–३८ –वि अशा बुद्धीचा ०माला–स्त्री हंसांची रांग, पंक्ति ०मुख(हस्त) न नृत्यांतील एक अंगविक्षेप आंगठा, तर्जनी व मधलें बोट या तीन बोटांचीं अग्रें एकत्र जुळविणें करंगळी व अनामिका हीं उभीं ठेवणें ०वाहन–पु ब्रह्मदेव ०वाहिनी–स्त्री सरस्वती ०क्षीरन्याय-विवेक–पु दूध पाण्याच्या मिश्रणांतून हंस दूध तेवढें काढून पितो अशी समजूत आहे त्याप्रमाणें एखाद्या कृत्यांतील दोषाकडे दुर्लक्ष्य करून त्यांतील गुणांचें ग्रहण करणें **हंसळें** न (महानु) हंसाचें चित्र काढलेलें अगदीं पांढरें स्वच्छ वस्त्र 'गौर्वी मुरळ हंसळें।' –प्रमा ८ **हंसात्मा**–पु प्राण्याचा जीवात्मा 'हंसात्मा प्रगट। दावील सुभट। सद्गुरु वसिष्ठ। तावि जाणा।' **हंसासन**–न,

योगशास्त्रांतील एक आसन प्रथम मयूरासनाप्रमाणें आकृति करून नंतर पाय मयूरासनांतल्याप्रमाणें अधांत्रीं न धरतां त्याचीं बोटें जमिनीवर टेकून स्थिर राहाणें. –संयोग १४९ हंसी–स्त्री. १ हंसाची मादी. २ तिच्याप्रमाणें चालण्याची गति 'दाखविनी गती नानापरी । उष्ट्री नाडुळी हंसी मयूरी ।' –जै ४.२२.

हसकार–रा–पु (बायकी) (डोळ्यांत अश्रु, तलाव–विहिरींत पाणी, घरांतील तूप इ० संबंधीं योजतात) पूर्ण अभाव, नकारार्थी यासमयीं अभावात्मक प्रयोग 'हा रडतो खरा पर डोळ्यांत पाण्याचा हसकारा नाहीं' [सं अस्तिकरण–असणेंकार–असकार?]

ह(हं)सडणें–उक्रि १ जोरानें हिसका देणें, आचका मारणें, ओढणें, झटकणें. २ (ल) (एखाद्यापासून) द्रव्य इ० काढणें, घुसारणें, लुबाडणें ३ भोसडपणें काढणें, खडकावणें; खडसणें. [ध्व] ह(हं)सडा–पु १ जोराचा हिसका, झटका आचका (तगडी इ० चा) २ मृत्युसमयींचा जोराचा श्वास, घोर ३ (ल) खरडपट्टी खडसणी (क्रि० देणें) आसडा पहा

ह(हं)सणें–उक्रि १ हास्य, स्मित करणें २ (ल) एखाद्याचें नांव ठेवणें, खोड्या काढणें, उपहास करणें. ३ (ल) फुटणें, उलणें (करंजी गुजवटी लाडू इ०) [सं हसन] (खाऊ रानें) हसणें–(चुलीवर ठेवलेल्या) वर जमलेल्या मडीनें पेट घेणें हसता नाहीं पोसता नाहीं–अत्यंत पोरका, गरीब, सुखदुःख देणारा कोणी आप्तेष्ट नसलेला हसायला आहेत पोसायला नाहींत–फक्त थट्टा, फजीति करणारे लोक असतात, पोटाला कोणी घालीत नाहींत हसत हसत–हसतां हसतां दात पाडणें–न रागावतां चरफडतां एखाद्याची फजीती, पराभव नाश करणें. हसत्या बरोबर हसणें, रडत्या बरोबर रडणें–वारा येईल तशी पाठ देणें. हसून गोड (साजरें) करणें–१ दुसऱ्याचा राग, विषाद, शब्दी गोडगोड शब्द बोलून घालविणें २ गोड बोलून फसविणें हंसतील त्याचे दांत दिसतील–लोकांनीं नांवें ठेवल्यास त्याची पर्वा न करणें आपण हंसे लोकांना शेंबूड आपल्या नाकाला–दुसऱ्याला ज्या दोषाबद्दल हंसावयाचें तोच दुर्गुण आपणापाशीं असणें हंसत गौरी–पार्वती–लक्ष्मी–स्त्री हसतमुख, आनंदी स्त्री ०चहाड–वि हसत हसत चहाड्या करणारा ०मुख–न आनंदी हसरा चेहरा –वि उल्लसित, आनंदी वृत्तीचा ०हिंडळ–वि १ नखरेबाज, चटकचांदणी (परंतु ... व्यभिचारी नाहीं अशी स्त्री) २ मोठमोठ्यानें हसण्याची खोड असलेला (पुरुष) ३ हसवून फसविणारा, भ्रष्टविणारा, भुरळ घालणारा, गोड बोलून कमानें गळा कापणारा –वि. १ हसणारा. २ (ल) हौशी, रंगेल, आनंदी, खेळकर. म्ह० 'हसती बायको रडता पुरुष कामाची नाहींत.' हसती–स्त्री हास्यविनोद हसतीं(त्तीं)दंतीं भेट ओळख–स्त्री. न बोलतांना नुसतें परस्पराकडे पाहून हसून झालेली भेट, फक्त परस्पर स्मित करण्याइतकी ओळख. ह(हं)सरा–वि. १ नेहमीं किंवा पुष्कळ हसणारा. २ खेळकर, आनंदी (मूल इ०). हंसाबाजी–स्त्री १ हास्यविनोद, थट्टा २ मस्करी; टिंगल, उपहास [हिं.] हसित–न (न्याय) मुख, नेत्र व गाल हे ज्यामध्यें किंचित विकसित होऊन कांहींसे दात हि दिसतील असें हसणें. हसिताचे प्रकार.–अतिहसित, अपहसित, उपहसित, विहसित, स्मित –मराठी रसमुसी ११२. हसूं–सें हंसू–सें–न १ हसणें, हास्य २ विटंबना, उपहास, फजिती 'चोघामध्यें मांझें हसें झालें' ३ हसण्याचा विषय, हास्यास्पद वस्तु.

हसंती–स्त्री शेगडी, आगटी. [स]

हसबी–स्त्री दप्तरें इ० अडन घोड्यावर घालून गांवोगांव न्यावयाच्या उपयोगी पडशीसारखी पिशवी [अर]

हसरा–पु (चांभारी, कों.) चामडें ठोकण्याचा वता. –बडलापुर १८६

हंसली–ळी–स्त्री गळ्याजवळचें हाड ०उलटी–स्त्री. (जविया) आपल्या जवियानें जोडीदाराच्या गळ्याच्या उजव्या बगडी वरळीत खड्यानें वार करणें ०सीधा–स्त्री (जविया) वरील डावाचें उलट डाव, उजव्या ऐवजीं डाव्या बगडीवरळचा वार [हिं]

हा(ह)सळी, हंसोळी–स्त्री चांदी–सोन्याची लहानसरी, (लहान मुलाचा) गळ्यांतील एक दागिना [हिं हसळी]

हसोक–पु (कर.) अशोकाचें झाड, अशोक त्याचें फळ, बी [सं अशोक]

ह(हं)सोळी–स्त्री एक रानवट फळझाड ह(हं)सोळें–न. हसोळीचें फळ. हसोळीं खाणें–अतिशय बेकार हसणें.

हस्कार–रा–पु हसकार–रा पहा

हस्त–पु १ हात, कर २ कोंपरापासून मधल्या बोटाचे टोंकापर्यंतची लांबी; तितक्या लांबीचें माप; चोवीस अंगुळांचें परिमाण ३ हत्तीची सोंड. ४ तेरावें नक्षत्र (अव प्रयोग) ५ खांबाचा वरचा भाग व त्यावर पेलेलें जाणारें ओझें किंवा पाखाडी यामधील ठोकळा, लाकडी चापट तुकडा ६ (बुद्धिबळें) एकदा प्यादास हात लावला कीं तें खेळलेंच पाहिजे अशी खेळाची रीत, प्रकार (विशेषण, क्रियाविशेषण किंवा उद्गार वाचक प्रयोग होतात) [सं] ०क–पु १ हात. 'दोन हस्तक व तिसरें मस्तक' यानीं नमस्कार करणें, एवढेंच काय तें देण्यासारखें राहिलें आहे अशावेळीं म्हणावयाचा प्रयोग २ मदत नोकर, हाताखालचा आश्रित माणूस. ३ एखाद्याच्या हाताच्या

**सुरा-ऱ्या**-पु फुरडया इ० करण्याचा सांचा. ०**हालवणी**-स्त्री. प्रेताशावरील एक जुना कर ( त्यांच्या हात हालवण्याच्या क्रियेबद्दल हा कर असे ). **हातचा**-वि. १ हातानें दिलेला; स्वाधीनचा; हातातला; हातानें निर्मिलेली, मिळविलेली, दिलेली ( वस्तु, काम, उत्पादन इ० ). 'शूद्राचे हातचें पाणी स्नानसंध्येस घेऊं नये.' 'रोग्यास औषध देणें मनुष्याच्या हातचें आहे-आयुष्य घालणें नाहीं.' २ ( अंकगणित ) पूर्णांकाची बेरीज करतांना बेरजेच्या संख्येंतला अंक ज्या स्थानाचा त्या स्थानीं मिळविण्याकरिता धरलेला अंक. ( क्रि० येणें; रहाणें; ठेवणें ). ३ लवकर हातीं येणारें; अवसानातील ४ ताब्यांतील; कबजांतील. म्ह० 'हातचें सोडून पळत्याचे पाठीस लागूं नये.' ०**चा पाडणें**-१ हातातील सोडणें. २ एखाद्यास त्याचे ताब्यांतील वस्तूस मुकविणें. ०**चा-धड-नीट**-वि. नीटनेटकें काम करणारा ( लेखक, कारागीर ). ०**चा फोड**-पु. फार प्रिय माणूस. तळहाताचा फोड पहा. ०**चा मळ**-पु. सहज घडणारी गोष्ट. 'सरळ, सोपी आणि बालिकाबोध भाषा कशी वापरावी हें म्हणजे माझ्या हाताचा मळ आहे.' -कीच. ०**चा सुटा**-वि. सढळ हाताचा. **हातथा**-पु १ ( बायकी ) गौरीपूजनाचे सणांत हळदीकुंकवानें हात भिजवून जमिनीवर छाप मारणें. २ लग्नांत नवऱ्याच्या मिरवणुकीच्या मागें धरावयाचा कणकेचा दिवा. ३ घोडयाचा खरारा, साफ करण्याचा काथ्याचा पंजा. ४ काडवात मनको. ५ ( कऱ्हाड ) न्हाणवली बसविताना, मखर बांधावयाचे ठिकाणीं, कुंकू पाण्यांत भिजवून हातानें पाच उलटे पांच सुलटे ठसे उठविणें **हातळ, हाताळ-ळु**-वि. चोरण्याची संवय असलेला; चोर; भामटा. **हातळणें, हाताळणें**-उक्रि. १ हात लावणें; चोळवटणें; चिवडणें, २ हाताळ माणसानें वस्तु चोरणें. **हातळी, हाताळी, हाताळें**-स्त्रीन. १ घोडयाचा काथ्या इ० चा खरारा. २ भात्याची बोटात, हातांत अडकवावयाची चामडयाची वादी. ३ ( कर. ) भाकरी. **हाता**-पु हातात राहील इतका जिन्नस, पद्य ( फळें, फुलें इ० पांच-सहा इ० संख्येचा संच एकेक वेळ हातांत घेऊन बाजूस ठेवतात). **हाताखालचा**-वि. १ मदतनीस; हाताखालीं काम करणारा. २ उत्तम परिचयाचा, माहितींतील ३ हातांतील, कबज्यामधील; स्वाधीन. ४ दुय्यम, कमी दर्जाचा. **हाताखालीं**-क्रिवि. १ सत्तेखालीं; दुय्यम प्रतींत. २ स्वाधीन. ३ जातांजाता; हातासरशीं, सहजगत्या. 'मी आपला घोडा विकावयास नेतोंच आहे, मर्जी असली तर हाताखालीं तुमचाहि घोडा नेईन आणि विकीन.' **हाताचा उदार, मोकळा, सढळ**-वि. देणगी इ० देण्यांत सढळ. **हाताचा कुशल**-वि. हस्त कौशल्यात निपुण, प्रवीण. **हाताचा जड-चळकट-थंड**-वि. १ चिकट; कृपण. म्ह० हाताचा जड आणि बोलून गोड. २ मंद ( लेखक ). **हाताचा जलद**-वि. काम करण्यांत चलाख **हाताचा फटकळ**-वि फटाफट मारणारा; मारकट. **हाताचा वार्ण**-पु. वर्चस्व, पगडा, वजन पाडणारें कृत्य, गोष्ट ( क्रि० गमावणें; दवडणें; सोडणें ) **हाताजोगता**-वि. १ हातात बसेल; मावेल; धरतां येईल असा. २ हात पोंहोचण्याजोगें. **हातानिराळा-वेगळा**-वि. १ पूर्ण; पुरा; सिद्ध केलेला; पुन्हां हात लावण्याची जरूरी राहिली नाहीं असें ( काम, धंदा इ० ). 'हा दुर्निवह बोजा एकदां हातानिराळा झाला म्हणजे दुसरें काम घेतां येईल.' २-क्रिवि एकीकडे; बाजूस 'कामापुरती भाडीं वहिवाटींत ठेवा बरकड हातानिराळीं ठेवा.' **हातापद्धति**-स्त्री. दलाल माल घेणाऱ्याच्या हातावर रुमाल टाकून गुप्तरीतीनें मालाची किंमत माल घेणाऱ्याकडून अजमावतो ती पद्धत. **हाताची थट्टा**-स्त्री. थट्टेनें मारणें ( थापटी इ० ); चापट देणें. ( तोंडी थट्टा नव्हे ). **हाता( ता )फळी**-स्त्री. गुद्दागुद्दी; मारामारी; कुस्ती; हातझोंबी; धक्काबुक्की. 'मजमीं भिडे हातोफळी।' -ह १९.१४३. -क्रिवि. पट्कन; चट्दिशी; तत्काळ; हातावर हात मारून. [ हात+फळी ] **हातावरचा संसार-हातावरचें पोट**-पुन. मजुरी, कामधंदा करून स्वतःचें कसेंतरी पोट भरणें ( क्रि० करणें; चालविणें ) थोडया पगाराची, कष्टाची नोकरी करून उदरनिर्वाह **हातावीती**-क्रिवि. हातोहात पहा. 'सर्वज्ञ हातावीती पुढें जाती।'-पुच. **हातासन**-न. हातवटी. 'अन्योपदेशाचेनि हातासनें।' -ज्ञा ६.११९. **हातासरसां**-क्रिवि. त्याच हातानें, प्रकारानें, तसेंच; त्याच बरोबर; चालू कामांत आहे तोंच. 'उष्टी काढतो आहेस तों हातासरशीं भाडीं घास मग हात धू.' **हातिणें**-अक्रि. मारणें. -मनको. **हातिवा**-स्त्री. काडवात. 'उजळोनि दिव्य तेजा हातिवा।' -ज्ञा १६ २३. **हातुवसोया**-वि. एक हात अंतरावरील. 'हातवसिया कळांगा पार्वती।' -धवळे२१ **हातोणी**-स्त्री. ( व. ) खरकटें पाणी; हातवणी. **हातोपा**-हातपा पहा. **हातोपात-तीं**-क्रिवि. एका हातांतून दुसऱ्या हातात, वरचेवर; हातोहात. -ज्ञा १८.१५६. **हातोरी**-कि. ( ना. ) हातानें; साहाय्यानें. **हातोवा**-पु. ( महानु ) अंजली; ओंजळ. 'हातोवा केवि आटे अंभोनिधि।' -भाए २१७. **हातोसा**-पु. मदत; हातभार. ( क्रि० देणें ), **हातोहात-तीं**-क्रिवि. १ हातचेहातीं; हातोपात. २ चट्कन, भरदिशीं. ( क्रि० येणें=मारामारी करणें ). 'हिंवाळयाचे दिवसात दुपार हातोहात भरते.' **हातोळा**-हातवळा पहा. **हातोळी**-स्त्री. ( व. ) लग्न. **हात्या**-पु १ पाणरहाटाचा दाडा. २ घोडा घासण्याची पिशवी; खरारा. हाताळी अर्थ १ पहा. ३मागाच्या फणीची मुठ ४ कादिलींतील गूळ खरवडण्याचें खुरपें. ५ ( कर. ) मोटी किल्ली.

**हात**—स्त्री. संवय, खोड. 'तरुणपणाची ऐट आणण्याची विलक्षण हात होती.' -महाराष्ट्रशारदा, नोव्हेंबर १९३६.

हातणी-न-नी—स्त्री (कु को राजा ) विहिरीच्या काठा वर बैलरहाटाचें पाणी प डळातून पडतें त्या निवाणी बांधलेली उच जागा यांतावरून (पाटाचें ) पाणी नेण्याकरिता केलेली वाट; बैल-पाय रहाट लावावयाच्या विहिरीचे बाजूस केणेहाचे टोंक किरा रूव टाकण्यासाठीं केलेला चौथरा —आदिव याची महा लक्ष्मी १५४ [स हस्त ]

हातणी नी—स्त्री १ घोडा वगैर धुताना हातात घालण्याची काथ्याची पिशवी खरारा २ खळयातील खराटा, केरसुणी ३ (चाम री ) चामडें ठोकण्याचें अवजार [स हस्त, हिं हथनी]

हातमली—स्त्री (बुद्धिबळें ) प्रतिपक्षाचा हत्ती व राजा आणि आपला हत्ती राजा व एकच प्यादें राखून प्यादी करणें

हातर री—पुस्त्री वाबूची मोठी चटई (गो ) हातर पाने

हातरणें हाथरूण—अथरण इ० पहा

हाथरूं—न (निदार्थी ) हत्ती

हातळ—स्त्री धुर्यावर जोखड ज्या दोरीनें बांधतात ती दोरी —बदगापूर २८७

हाता—पु (कों गो ) केतकी केवडा; सोनकेवडा, त्याचें कणीस

हातियार-येर-येरु हातेर—न हत्यार पहा 'तरी मनासि करावा मारु । तेथ न चले हातियरु ।' —एभा २३ ७१५

हातुलें—स्त्री लाकडाचें परळ —शर २

हातुल्यो—उद्गा मुलाचे खेळात अंगींतून मुक्त होण्याचे वेळीं उच्चारण्याचा शब्द थुथुल्यो, थुथुरयाप्रमाणें

हाते(त्या)ण—न (घोडी, गाढवी) माजावर येणें वाफ माज (क्रि० करणें) पडल्या एका शिंगाकरूनि हातेणें ।' —भोउद्योग १३ २१७ हात्याणास येणें-माज करणें

हातेर—न (कों )पाटील खोत इ० ज्या शेत इ० मधील कुळांनीं किंवा रयतांनीं करावयाची विगार

हात्यार-त्येर हात्यारघर—हत्यार इ० पहा

हाथरणें हाथरूण—आथरणें इ० पहा

हाथि(ए)येर—हातियर हत्यार पहा हें का हो जी उमा सिलें। हाथिएरविण। —भाए ७६

हादकळणें—अक्रि (व ) डचमळणें हिंदकळणें पहा

हादगा—हदगा पहा

हादरणें—हदरणें पहा 'पदराच्या वाऱ्यानेंसुद्धां वाय कांच हृदय हादरायला लागत ' —एक ६५

हादा—पु पैरा; इर्जीक पडकेल झाले परस्परांना मदत करण्याची शेतकऱ्यांची रीत हादेकरी हादलेकरी-पु हांदा करण्यासाठीं दिलेला माणूस बैल इ० हांदा केला आहे ते परस्पर

हादाल हादालपार्वती—हदाल इ० पहा

हादी—पु मार्गदर्शक —पेद ३ १८३,१,११० [अर ]

हादु(दू)ळणें—उक्रि १ आदुळणें पहा फळें पाडण्या साठी झाड गदगदा हालविणें २ झोके देणें पुढेंमागें करणें —अक्रि हालणें डोलणें, झोका खाणें [स आंदोलन] हांदुळ हिंदूळ-हिंदळ—स्त्री झोका आवका पुढें मागें करणें झोकाझोकी

हादोशी—स्त्री (कु ) हाव लोभ —वि लोभी

हान—उभ अन; आणि —शर

हानजा—पु (नाविक ) यारी

हानाउ—पु (नाविक ) तिरपा साथा

हानि-नी हान हाण—स्त्री १ नुकसान, तोटा बुड २ घात दुखापत, धोका उध्वस्तता, बिघाड, नाश [स ] म्ह० आपत्री हानि जगाचें हासें ०पचक-न (ज्यो ) एक कुमुहूर्त चोरपचक पहा

हापटणें—आपटणें पहा

हापा—पु धाप, दमा, श्वास (क्रि० भरणें, टाकणें, देणें, सोडणें ) [हिं हांपना ध्व ]

हाफीज—पु कुराण तोंडपाठ म्हणणारा मुसलमान [फा हाफिज् ]

हाम—न (माण धनगरी) बिरोबासाठीं बकरें मारून त्याच्या मासाचें घातलेलें जेवण

हावक—स्त्री (व ) कटकट त्रास (क्रि० मिरणें )

हायकणें—उक्रि हकणें पहा हायका-हवका पहा

हायड—स्त्री (ना ) तोटा नुकसान

हायडणें—क्रि (कु ) गुरें हाकणें आंवडणें अर्थ २ पहा

हायरणें हायरडा—हवरणें हवरडा पहा

हायशी, हायसाण—हपशी, हपसाण पहा

हायसाहुयशी, हामसाहामशी—स्त्री स्फुदणें हुंदका —क्रिवि ओक्साबोक्शी [ध्व ]

हायळणी णें—हवालणी णें पहा

हावासणी—स्त्री (दादर) जोरानें ओरडणें, खेकसणें

हाबेट—उद्गा (गो ) खेळ थोडावेळ बंद करावयाच्या सूचनेचा शब्द थुथुल्यो थुरयो [ध्व ]

हामी हामीदार-री—हमी इ० पहा

हाय, हा—बहुवचनाचा फारसी प्रत्यय (हा बहुधा निर्जीव वस्तु दर्शविणाऱ्या नामांना लागतो पण मराठींत प्रादेशिक नामां नाच लागतो उदा० देहेहाय, जिल्हेहाय, महालहाय [फा हा]

हाय—स्त्री हयात आयुष्य [अर हइ] हायत, हायात-हयात इ० पहा

हाय—उद्गा. १ सुखानुभवाचा उद्गार (दुःखाचा प्रतिकार होऊं लागला म्हणजे तोंडांतून निघणारा. २ शरीर, मन यास दुस्सह वेदना झाली असतां निघणारा सुस्कारा, दुःखोद्गार; हां, चुं, कुं कटकटा, इ०. -स्त्री. (बालभाषा) तिखट, विस्तव, दिवा, तीक्ष्ण शस्त्र, क्षत इ०. [ध्व.] ०खाणें-घेणें-१ जिवास लावून घेणें; धास्ती घेणें; घावरून जाणें. २ (तापाची, खाण्याची) भीति वाटणें, धडकी घेणें. ०पतकरणें-मोकलणें-पश्चात्ताप करणें; सुस्कीबद्दल दुःखोद्गार काढणें. ०सोडणें-देणें-घालणें-उसासा टाकणें. ०घालणें-ध्यास घेणें, घोसरा काढणें. हायास येणें-आणणें-जीव मरयास येणें; थकणें; भागणें; अशक्त करणें, दुर्दशेप्रत आणणें. ०दोस्त-दोस-दुला-धुला, हायदोस-उद्गा. [मुसलमान लोक ताबुताचे पुढें हसन व हुसेन हे त्यांच्या लग्नानंतर लवकरच लढाईत मरण पावले, म्हणून हाय! मित्रा! नवरदेवा! असा दुःखोद्गार काढून नाचतात त्यावरून] नाचणें, ओरडणें; दंगल; धुमाकूळ. (क्रि० घालणें; माजणें; उठणें; माडणें; करणें) [हि. हाय! दोस्त! दुल्हा=नवरा] ०सा-वि क्रिवि. हाय! असा; समाधानाचा, आनंदाचा उद्गार उच्चारावयाच्या स्थितींत असलेला; दुःखकारक स्थितींतून सुटका झाल्यामुळें सुखी झालेला. (क्रि० होणें). 'त्या दाटीमध्यें माझा जीव अगदीं कासावीस झाला होता, मी अंमळ बाहेर येताच हायसा झालों.' हायसें वाटणें-आनंद, स्वस्थता वाटणें (दुःखप्रतिकारानंतर) हाय-हय-दुःखोद्गार. -स्त्री. करुणोद्गार; वेदनांमुळें विवळणी. हाया, हायाहुया-हाय पहा.

हायकोर्ट—न. वरिष्ठ न्यायमंदिर. [सं.]

हायन—न. वर्ष. 'तेरा पळेंहि नसती माता हें हायन चवदावें हो।' -मोउद्योग ७.५१. [सं.]

हायल, हायेल—वि. भयंकर. 'लेकीन हा मसेला हायेल होय.' -रा ५.१५७. [अर. हाईल्]

हायवडा—पु. (व.) हव्यास.

हांयस—न (गो.) आमिष; आविस. [सं. आमिष]

हायस्कूल—न. इंग्रजी दुय्यम शिक्षणाची शाळा. [इं.]

हार—अ. (कु.) पाशीं; जवळ. 'माझ्या हार नाय.'

हार—पु. (गो.) आर; अजगर. आर पहा.

हार—स्त्री. १ नुकसान; तोटा; खोट. (क्रि० येणें; बसणें). 'कांद्याच्या व्यापारांत मला मोठी हार आली.' २ पराभव, अंगावर डाव येणें, लागणें (युद्ध, जुगार इ० त). (क्रि० येणें). ३ -पु. अपहार; हरण; लूट. ४ (अंकगणित) भाजक; छेद. [सं. हृ=हरण करणें, चोरणें] ०खाणें-घेणें-जाणें-पराभव पावणें; माघार घेणें; तोटा सोसणें; कमी दर्जाचे आहों असें कबूल करणें. 'त्यानें त्यांचा यथायोग्य समाचार घेऊन त्यांस हार खावयास लावलें' -नाना-महादजी. ०जाणें-कमीपणा पतकरणें; पड खाणें; पराभव पावणें; मागें राहणें. 'चलाखपणांत आम्हीं कोणत्याहि लोकांस हार जाणार नाहीं अशी आमची खात्री आहे.' -नि. ०घेणें-पत्करणें-मानणें-नुकसान सोसणें. म्ह० १ हार मानली झगडा तुटला. २ हार मानली पण झगडा तुटो=कोणीकडून तरी तंटा मिटो. हारीं जाणें-पराभव पावणें; पत्करणें. हारक-वि. १ हरण करणारा; लुबाडणारा; लुटणारा. २ निवारण करणारा; नाहींसें करणारा. उदा० पित्तहारक-वातहारक इ० (औषध) हारी मध्यें पहा. ३ (अंकगणित) भाजक. हारजीत-स्त्री. जयापजय. 'हारजीत कोणाचे स्वाधीन नाहीं.' [हारणें+जितणें]

हारणें-उक्रि. १ जिंकणें. 'म्यां त्याला १०० रुपयांस हारलें.' २ हरणें पहा हारतणें-हरण करणें. 'मुक्तीचा ठेवा हारता।' -भाए ८८ हारतलेपण-न. हरवलेपण; नष्टतेपण; नाहींपणा 'हें आथी तरी कायिसें। हरतले पण।' -अमृ ७. १०४. हारपणें-अक्रि. हरवणें; हरपणें पहा. हारवणें-विणें-उक्रि गमावणें; घालविणें, हरविणें पहा. ०सडणें-हारसरणें-अक्रि. (राजा.) पराभव कबूल करणें; हार खाणें; शरण जाणें. हारी-स्त्री. हार; पराभव, तोटा. हार पहा. -एभा २८.६८५. -वि. १ हारक पहा. (दुखहारी, ज्वरहारी). २ मोहक; आकर्षक. हार्य-वि हरण करण्यास शक्य, योग्य. [सं.] हारसडणें-उक्रि. (राजा.) आटोक्यांत येईल इतपत कमी होणें, करणें; समावणें; सहज करता येईल येथपर्यंत आकुंचित होणें, करीत आणणें. [हारणें+सडणें किंवा हार=रांग, ओळ] हारसडीस आणणें-आटोक्यांत, मर्यादेंत आणणें; आटोपशीर करणें (मोठा उद्योग, धंदा इ० हळू हळू विल्हेवाट लावून). 'एक वर्षाचें लिहिणें तुंबलें आहे, सारा गोंधळ झाला आहे, एवढें हारसडीस आणून दे, मग मी शेवटास नेईन.' हारसडीस येणें-आवाक्यांत येणें.

हार—पु १ गळयांतील एक कंठा; माळ (फुलें, रत्नें इ० ची). 'हार कंठीं साजरा।' २ रेशमाच्या लडया एकत्र ओंवून माळेसारखा करतात तो आकार. -स्त्री. ओळ; रांग; पंक्ति. [सं] हारोहार-क्रिवि १ एका अखंड ओळींत, एका ओळीनें, रांगेत; मागोमाग. २ अव्याहत क्रमानें; एकामागून एक (घडलेल्या गोष्टी, प्रसंग) 'त्या बायकोस हारोहार चार लेकी मुलीच झाल्या.'

हारा—पु मोठी वांबूची पाटी; हारा. ०देरा-पु १ मंगळागौरीचे पूजेच्या वेळीं वणकेच्या हेऱ्यांत पुरण भरून देवीजवळ ठेवतात तो. २ विवाहांत वराचे घरीं वधू आल्यावर एकावर एक तीन तपेलीं ठेवून, त्यांत काय आहे म्हणून वधू;

वरास विचारते व वर उत्तर देतो कीं नवरलाचा हार आहे, या प्रकारास हाराडेरा म्हणतात. २ (व.) वरातीबरोबर न्याव याचा वधूकडील कलश; करादिवा.

हाराप-स—पु. तोटा; नुकसान; खोट. (क्रि० येणें; होणें; बसणें). [सं. ऱ्हास]

हारिख—पु आनंद, हर्ष. [सं. हर्ष]

हारिद्र—वि. हळदीचें; पिवळें. [सं.]

हारी—स्त्री. रांग. हारीं-क्रिवि. १ कडे, दिशेस, बाजूस. 'तो शेताहारीं गेला.' २ कडे; हातीं; जवळ. 'त्या हारीं माझे दहा रु० आहेत.' ३ इतरअर्थी कडे शब्द पहा. ४ जवळ; पाशीं. 'गांवाहारीं, डोंगराहारीं.' हारेमोहरें, हारेमोहरेस हारेम्होरे-स, हाऱ्यामोहऱ्यास-क्रिवि. जवळ; आसपास; समोर; पुढें; आजूबाजूस. (नकारार्थी प्रयोग). 'म्यां एकवेळ त्या पोरास मार दिल्हा, तेंव्हांपासून तो माझे हारेमोहरेस उभा राहत नाहीं.' 'त्याचे हारेमोहरेस तुम्ही उभे राहूं नका, तो सोदा आहे.'

हार्णाळ—स्त्री. ओघ, प्रवाह. 'केली हार्णाळां अंघोळी।' —तुगा ४१२५.

हार्द-र्द्र—न १ इंगित; इशारत; कल. २ उद्देश; आशय; अभिप्राय; खोंक (कृति, भाषण इ० चा). —वि. मनांतील [सं. हार्द]

हाल—पु जलदी; त्वरा. [हिं.] हालका-क्रिवि. जलदीनें. 'चार हजार घोडा। हालका धराया चालला।' —ऐपो १४ [अर. हाल=भाता]

हाल—पु. आपदा; कष्ट, निकृष्टावस्था; दैना; तारंबळ (बहुधा अनेकवचनी प्र०). (क्रि० काढणें; भोगणें; सोसणें; घेणें; होणें, देणें; पाडणें; करणें) [अर. हाल्] म्ह० हाल असे झाले कीं कुत्रे खाईना. ०अपेष्टा-आपदा-स्त्री. हाल, दुर्दशा; नानाप्रकारचीं संकटें; आपत्ति. ०हवाल-पु स्त्री. दुर्दशा; हालअपेष्टा. 'हालहवाल असेल तरापी हे खंडणी सोडतात असा अर्थ नाहीं.' —ख ११४५. —वि. संकटग्रस्त; दुर्दशा असलेला. 'फौज हाल हवाल झाली.'

हाल—स्त्री. १ निश्चय; हट; निर्धार; पण. (क्रि० बांधणें, सोडणें). 'मज कोण्ही न लगे आणीक संगाती। रावाची बहुतीं हाल माझी।' २ पैज, होड, प्रतिज्ञा, स्पर्धा; चढाओढ; शर्यत (क्रि० बांधणें).

हाल—हालत पहा. 'लष्कर पायमालानें रयतीचा हाल राहिला नाहीं.' —रा १८.५३.

हाल—वि. हल्लींचा. —क्रिवि. १ सध्यां; हल्लीं, वर्तमान. २ सतत; नेहमीं; एकसारखें. 'हालवसूल.' —वाड्योमा १.९३. [अर. हाल्] ०अंमल-पु. सध्याचें सरकार; अंमल. ०अहवाल-हकीकत-स्त्री. १ कैफियत. 'एणें प्रमाणें आपला हाल अहवाल खातरेसी आणिता...' —रा १८.३१०. 'आमची हाल हकीकत विदित करून...' —इऐ ५.४८. २ वर्तमान. ०खुद-द्-क्रिवि. आहे त्या स्थितींत; ठायींचे ठायीं. 'आपण शिवाजीवरी जातों, त्यास हालखुद ठेवितों।' —सभासद ५५. ०खुशामती-वि. नेहमीं नव्यानें हांजीहांजी करणारा. खुशामती पहा. म्ह० 'हाल खुशामत ताजी रोटी.' ०फिलाल-क्रिवि. आतांचे आतां; या क्षणीं. ०साल-न. चालू वर्ष. —क्रिवि. या वर्षी. ०हवाल-पु. हकीकत, वर्तमान; सद्य स्थिति. 'रयतीचा हाल हवाल जाहीर केला.' —रा १८.५३. [अर.]

हालीं-हाल्लीं-क्रिवि सांप्रत, आतां —रा ३.९७. [फा. हाली]

हाली(ल्ली)माजी—स्त्री. १ सरकारी अधिकाऱ्याची बदलाबदली; राज्यकारभारांत बदल; फरक; फेरफार. 'जुनें हालीमाजीमुळें...' —वाड्योमा १.३३५. 'आमचे दौलतींत हालीमाजी होत गेल्यामुळें कागदपत्र दाखलेशीर राहिला नाहीं.' —रा १.३१२. २ येजा; जुनें जाणें, नवें येणें. हालोहाल-क्रिवि. या क्षणीं; आतांच, हातचे हातीं. [हिं.]

हॉल—पु. दिवाणखाना. 'दरबार हॉल.' [इं.]

हालउंडा—पु (गो.) तांदूळ, साखर इ० चें एक पक्वान्न. [हालगो+उंडा?]

हालगो—पु भाताची एक जात. [हळवा?]

हालणें—अक्रि. १ सरणें; ढळणें; गती येणें, सरकणें. २ गडबडीत, दंगलींत, गोंधळांत असणें (देश, गांव, घर). ३ हलकलणें. [हिं. हालना] हालकडी—स्त्री. नथेंतील किंवा मोत्यांची कडी, घोंस. हलकडी पहा. [हालणें+कडी]

हालचाल—स्त्री. १ सजीव अवस्थेची द्योतक क्रिया, चेतना. २ चळवळ; चालना; उद्योग; वळवळ; चलनवलन. [हिं.]

हालता नारळ—पु. हालविला असता आंतील पाणी वाजणारा नारळ. हालबोंद्रा-बोंद्रा-बेंद्रा-वि. १ पांगेरडा; अजागळ; मूर्ख. २ बेढगळ; हेकाड. ३ नालायक, कुचकामाचा; नपुंसक, दुर्बळ मनाचा. ४ (हेटकरी.) एक शिवी. चिष्ठ्या लावणारा. [हालणें+बोंदर-री; हलका+इंद्रिय] हालविणें—सक्रि. सरकविणें; गति देणें; सारणें; धामधूम करणें; जागृत करणें, चेतविणें; चेवविणें. हालवून जागा धरणें- १ आयासानें, प्रयासानें प्रवेश करणें. २ उठविणें; चेतना आणणें (सजून, सुचवून).

हालत—स्त्री. हाल; सुस्थिति; त्राण; जोर; दम, हाल. 'मुलकांत हालत कांहीं राहिली नाहीं.' —मदबा १.२११. [अर. हालत्]

हालपा—पु. (जुन्नरी) मेंढराच्या गळयास होणारा एक रोग. (क्रि० होणें; उतरणें).

हालवं(विं)ड्या, हालवा(वे)लंडी-डें—हलवेलंडी इ० पहा.

हालमस्त—वि गरीब पण गर्विष्ठ. हालमस्त पहा. म्ह० हालमस्त कीं मालमस्त. [अर. हाल्+फा-मस्त]

हालहूल—स्त्री. गडबड; गोंधळ; आरडाओरड; धिंगाणा; बेदिली (देशांत परचक्र आलें असतां किंवा लूटमार होत असतां होणारी).

हालाहल—पु. हलाहल पहा.

हालिक—वि. नागरासंबंधीं. [सं.]

हाली—कि. (महानु.) हाणितेली; हाणली. 'का करुणा केली हाली।' –भाए १११. [सं. हा.]

हालीमवाली—वि. उच्चनीच; गरीब श्रीमंत. अहाली-मवाली पहा. [अर. अहाली+मवाली]

हाली हरामी—हलीहरामी पहा.

हाल्या—पु. रेडा; हल्या पहा.

हांव—सना. (गो.) मी. [सं. अहं; हिं. इं.]

हाँव—पु. (गो.) मधाचें पोळें; मोहोळ.

हाय—स्त्री. गप्प; वदंता. [अर हवा]

हाव—पु १ कामोद्दीपक चेष्टा; नखरा; नटापट्टा. २ (अव) शृंगारचेष्टा; प्रेमकला. ३ (अव.) हावभाव. [सं.]

हाव—स्त्री. १ तीव्र इच्छा; औत्सुक्य; बळकट आशा. (क्रि० भरणें; लागणें; धरणें). २ हिंमत; धमक; धाडस; दम. 'हजार रुपये खर्चीन अशी त्याची हांव आहे.' ३ तेज; प्रभा. –दार. ४ हव्यास; लोभ. [अर. हवा=आयुष्य, वारा] ०घालणें–(काव्य) आशा धरणें. 'मार्जारें देखिला लोणियाचा गोळा। लावूनिया डोळा हाव घाली।' हाव करणें–मिळविण्या-साठीं धडपडणें; घाबरे होणें. ०भरी भरणें–होणें–अतिशय उत्सुक होणें; लोभ उत्पन्न होणें. हावेस-नें-हावें भरणें–१ उत्सुकतेनें पत्करणें (असामान्य, विक्षिप्त योजना). २ मन घालून पाठपुरावा करणें; चिकाटी धरणें. ३ फार महत्त्वाकांक्षी बनणें, होणें. ४ हृदय पेटणें. 'तों त्यावरि उठे भले दोघेहि संगरीं हांव।' –मोकर्ण ४५.१४. ०भरी–वि. १ लोभयुक्त; हावरा; वासनायुक्त. २ महत्त्वाकांक्षी; अति उत्साही; एखाद्या गोष्टीसाठीं वेडा झालेला. (क्रि० होणें). हावर-रें-पुस्त्री.न. अतिशय इच्छा; लोभ; हव्यास. (क्रि० सुटणें; भरणें) हावरा, हांवरा-वि. १ अत्यंत लोभी; कितीहि मिळालें तरी हावेंच असा स्वभावाचा, आशाळभूत. २ उतावळा; हलका, अधाशी (दुध, ईप्सित वस्तु इ० संबंधीं). हावळा-वि. हवळा. हळवा पहा. हावा-पु. हव्यास. 'भणौनि तळौनि काढिला हावा। अमृतरूप।' –ऋ ८१.

हावडें—न. (क.) अतिशय कष्ट, श्रम. खरड पहा. (क्रि० काढणें). 'त्यानें माझें हावडें काढलें.'

हांवदुळणें—हांदुळणें पहा.

हावबोर—पु. बचल्याचें बी. –मुंब्या ११२.

हावभाव—पुअव. १ भावनादर्शक अभिनय, भाव, चळवळ आणि हातवारे; आंतरभावदर्शक क्रिया. 'तंव नेत्रकटाक्ष हाव-भाव। दावितां नाना लाघव.' २ नखरे; चेष्टा. ३ अनुमान; अंदाज; तर्क. (क्रि० बांधणें). [हाव+भाव]

हावर—पुस्त्री. गळूं, फोड इ० फुटल्यानंतर पुन्हां जो सुजारा धरला जातो तो. (क्रि० धरणें).

हावरी-रा—स्त्रीपु. (व.) पांढरा तीळ.

हावळा—पु. हिरवा वाटाणा, हरभरा याचा केलेला हुरडा. हुळा पहा.

हॅावा—न. (गो) लग्नाचें वऱ्हाड.

हावा—(प्र.) व्हावा. [होण]

हावाव—स्त्री. शोभा. –मनको. [हाव+आव]

हा(हां)वाळी—स्त्री. (कु.) १ दमा; श्वास. २ सांय. [ध्व. हां]

हावेली—स्त्री. मोठें घर; वाडा. हवेली पहा.

हाशम—हशम पहा. शिबंदी. 'हाशमाकडील फडणीसीची असामी.' –वाडदुवा २१७.

हाशा-शी, हांशा-शी—पुस्त्री. हशियाहशी; बारतोंडी; एक झाड. पानें चार बोटें रुंद व लांबट असून; फळ बोराएवढें असून मुळापासून पिवळा रंग होतो –वगु ६ ३८.

हाशा-हाशीया—पु. वस्त्राची दशी; किनार. [अर हाशिया]

हाशीखुशी, हाशीखेळी—हशीखुशी पहा.

हाशी(सी)ल—न. १ हसील पहा. २ फायदा; नफा [अर. हासील] ०करणें-(उप) गमविणें; घालविणें.

हास—स्त्री. (व.) गळ्यांतील सरी, हासळी.

हास—पु. हास्य; हसणें. [सं.] हासणें-हसणें पहा. हासी-स्त्री. हंसें, उपहास. 'असी किरे प्रीत बाढल किते जनांत न होय हासी।' –सला १०. हासीन(ल)लें-अक्रि. (काव्य) हसणें।' तेव्हेळीं विस्मितमुखें हासीनली।'–शिशु १९०. हांसें–हसें पहा. हास्य न १ हंसें; हसें. २ आनंदाचें हसूं; खुशीची भावना. ३ नवरसापैकीं एक रस. ४ थट्टा; उपहास. ५ विनोद; मौज. हास्याचे चार प्रकार–स्मित, हसित, हास्य, अट्टहास्य. हास्यक–न. हास्याला कारणीभूत होणारी गोष्ट; विनोदविषय; –

हास्यकारण (इ) सुमलेला प्रतिशब्द -हास्यविनोद मीमांसा, प्र ६. [स] ०कारक-वि १ हसें उत्पन्न करणारें २ उपहासास्पद ०मुख-वदन-वि १ नेहमीं हसरा, हसत मुख, हसऱ्या तोंडाचा, आनंदी २ विशेषप्रसंगीं हास्ययुक्त वदन ज्याचें झालें आहे असा ०रस-पु नवरसांतील पाचवा रस, हास्य-हासणें हास्यास्पद-वि हसण्यासारखें, उपहास-पदा याचा विषय होण्याजोगें

हासडणें, हासडा, हासणें, हासडा, हासळी, हासू हासें—हसडणें इ० पहा

हासावाजी—स्त्री हसावाजी पहा

हासिया—स्त्री किनार हाशा पहा -ऐटि १.१४ [अर हाशिया]

हासेगडू—पु एक जातीचा गडू

हाहा—उद्गा दु खोद्गार, अरेरे, हाय, हाय! 'हाहा! हाहा! ऐसें म्हणताचि हतशप बळ पव्हालें हो!' -मोभीष्म ११ ११६ [ध्व] ०कार-हाहा कार, हाहाकार-पु १ मोठा शोक, विलाप 'चोहोंकडे पाण्याचा हाहाकार पडला' २ एखाद्या पदार्थाचा अभाव, हाकाटी पडणें

हांहा—उद्गा थांबा खबरदार! मागें सरा असें बजावणारा उद्गार (क्रि० म्हणणें, करणें) [ध्व] ०म्हणता-म्हणेतों-क्रिवि हातचेहातीं, चटदिशीं, त्वरेनें, चटकन 'ईचिरक्षुधित ब्राह्मण हांहा म्हणताहि वाढिल्या तारीं।' -मोकृष्ण ८६२२.

हा हू हा हू—स्त्रीन १ भय सावधान, जागृतपणा इ० सांगण्यासाठीं काढलेला उद्गार खाकरणें, हू करणें इ० २ तळमळ, विवळणें ३ काकू, साशकता, अनिश्चितपणा [ध्व]

हाहाकार—पु छाकू [ध्व]

हाहाट—पु ओरड, आक्रोश 'मुक्या नाकीं भरे मुरकु। तें फेंफें वेंवें करी निकृष्ट। न कळे रडे करी हाहाट ते खटपट याउगी।' -एभा २१ २२८ [ध्व आटाआट]

हाळ—स्त्री १ हारा, टोपली २ (त्यावरून) विक्रीचे जिन्नस घेऊन परगांवीं जाणें किंवा खेडोखेडीं विक्री करीत हिंडणें उदा० हाळी जाणें-चालणें-निघणें ३ (अशा तऱ्हेनें विका वयाचा माल, जिन्नस ४ या मालाचा विक्रीचा पैका, नफा ०बाजार-पु माल घेऊन खेडोखेडीं विकत हिंडणें (क्रि० करणें)

हाळ—स्त्री लागवड करताना जमीनींतून काढलेल्या किंवा पूर्वी असलेल्या झ डाची खूण

हाळ—पु १ गुरांसाठीं बांधलेला पाण्याचा मोठा हौद, टाकी २ लांब व खोल चर उथळ खोल चूल, विस्तवाची खाई चपापष्ठीचे दिवशीं खंडोबाचा गोंधळ चालू असतां त्याचे भक्त ज्या वरून चालत जातात तो विस्तव, खाई आहार-ळ पहा ३ (कर्ना) डोंगरावरून वाहाणारा ओढा, झरा त्याचें वन ऐलें खडबडीत पात्र ०करी-पु हाळांत मोटेनें पाणी भरणारा माणूस

हाळ—पु मार [का हाळु] ०करणें-(क) गमावणें, उधळणें

हाळजणें—अक्रि (माण व) वाळत होणें

हाळदुली—स्त्री हळद-हळदुली पहा

हाळी—स्त्री (महानु) एक प्रकारची पळी 'हाळीया पाळीया।' -सिद्धांतसूत्र

हाळी—स्त्री (कु) हांक, आरोळी

हाळीज-स—न (व) नांगराची धुरा, आडवी दांडी, इसाड [स. हलिज]

हाळीव—न अहाळीव (धान्य) पहा

हाळोपाळ—क्रिवि (व) आसपास, जवळ, शेजारीं [आळी द्वि का हळ्ळी+पळ्ळी]

हि—म देखील, आणखी [स अपि?]

हिक—स्त्री (व) घाण

हिकडचा-ला-ले, हिक्डणें, हिकडील हिकडून, हिक्डनतिकडन, हिकडे, हिकडेतिकडे—इकडचा इ० पहा

हिकणें—उक्रि (अश्लील) संभोग करणें

हिंकणें—उक्रि (राजा तिरस्कारार्थी) खाणें, चोकणा भरणें

हिकमत—स्त्री १ शहाणपण, चातुर्य २ कावा, मसलत, जादू युक्ति [अर. हिक्मत] हिकमती-त्या-वि १ शहाणा, हुषारी, कसबी, हुशार २ कावेबाज, लबाड

हिका हिंके(हिके)खोर—हेका, हेकखोर पहा.

हिकाती—स्त्री (क) अयोग्य खोटी सबब, अडचण दाखविणें, फालतू कारण, तकार, आडफाटे हिकाती-त्या, हिकात्याखोर-वि सबबी सांगणारा, आडफाट आणणारा, तकारी करणारा [अर हिकायत]

हिकायत—स्त्री कथा, गोष्ट, कहाणी [अर हिकायत] हिकायती-स्त्री चार रकान्यापर्यंत ओढलेली रेघ (पूर्वीच्या लिहिण्यांत) रेघ पहा -वि १ हिकाती पहा २ गोष्टी सांगणारा

हिंदूण्वती—स्त्री दुर्भिक्ष दारिद्र्य 'त्यांच्या कपाळीं आपली हिंदूण्वती' -खेडपांतील स्वभावचित्रें ९८ [हिंदूण्वती या वैदिक मंत्रावरून अडाणीपणें बनविलेला चुरीचा अर्थ]

हिक्का—स्त्री उचकी [स]

**हिक्का**—पु हेका पहा.

**हिंग**—पु. अति उग्र वासाचा एक चीक. हा मसाला, फोडणी इ० त घालतात. [सं. हिंगु] ०लावणें-लावून विचारणें-मानणें-मोजणें-( नकारार्थी प्रयोग ) मानणें आदर देणें; महत्त्व देणें ( हिंग महाग असल्यानें महत्त्वाच्या पदार्थांतच वापरतात, यावरून ) ०हुंगणें-रोग इ० नीं शिणणें; रोडावत जाणें; पिचत पडणें. **हिंगडा**-पु १ हलक्या प्रकारचा हिंग, बाईट हिंग २ ( निंदार्थी ) हिंग. **हिंगणें वाफणें**-उक्रि. १ ( पदार्थांस प्रथम हिंग लावून मग फोडणी देतात त्यावरून लक्षणेनें-नकारार्थी प्रयोग करून ) करावयाचें कृत्य अपुरें असणें, आरंभहि नसणें. 'अद्युन शेत हिंगलें नाहीं वाफलें नाहीं; इतक्यात पुढी काय म्हणून केली ' 'रोजगाराचा ठिकाणा नाहीं अद्युन हिंगला नाहीं वाफला नाहीं ' २ ( शेतजमीन ) वाफणें पहा. ३ शेत भागणें. ४ अजारातून बरें होऊं लागणें. [ हिंग+वाफ ] **हिंगतूप-धूप**-पु अव. नेहमीं होणारा सगाराचा खर्च ( विशेषत. देवधर्म, जेवणखाण इ० चा ) ( क्रि० जाणें; उडणें; खरचणें ) ( पैसा कमा उडतो हें दाखवितांना वापरतात ) 'हिंगतुपास-तुपाखालीं-पारी-त्यानें सर्व संपत्ति उडविली.' **हिंगरहूं-रूड**-न. हिंग खाल्ल्यामुळें मगावर उठणारें बेंड; हिंगुरडें **हिंगपाणी**-न हिंग लावलेलें पाणी. **हिंगाचा अंगारा**-पु बाळंतिणीचे पाचवे व सहावे दिवशीं हिंग व हळद पाण्यांत कालवून बाळंतिणीस व घरातील मुलाबाळांस लावतात तो अंगारा **हिंगाचा खडा**-पु १ एखादी त्रासदायक, निष्कारण फाटे फोडणारी व्यक्ति, वस्तु २ गडबड्या, तल्लख माणूस **हिंगाचा वास**-पु संपत्ति, शक्ति, अधिकार इ० नाहींसें होऊन मागें राहिलेला निव्वळ लौकिक, काप गेलें, भोकें राहिलीं या अर्थी म्हण० हिंग गेला पण हिंगाचा वास राहिला. **हिंगाचें पोतें**-न वरील लौकिकवान् व्यक्ति **हिंगा-लोण्याचा**-वि ( ना ) अशक्त व नाजूक प्रकृतीचा **हिंगाष्टक**-न सुंठ, मिरें, पिंपळी, ओवा, सैंधव, जिरें, शहाजिरें व हिंग या आठ औषधांचें समभाग चूर्ण हें जठराग्नि प्रदीप्त करतें [ हिंग+अष्टक ] **हिंगु**-पु हिंग व त्याचें झाड [ सं ] **हिंगुनिर्यास**-पु हिंग **हिंगुरडें**-हिंगरूं पहा

**हिंग**—क्रिवि ( व कुणबाऊ ) इकडे हगे, हिंगे पहा [ का. ई-हीगे ]

**हिंगण-णा-णी, हिंगणबेट-टी**—पु स्त्री एक झाड 'कल्पतरु आणि बाभूळ। हिंगण आणि मल्यागर।' [ सं इंगुदी ] **हिंगणबेट-मिठा**-न पु वरील झाडाचें फळ. यात बंदुकीची दारू भरून आपटबार इ० करतात **हिंगणमूळ**-न. हिंगणीचें मूळ.

**हिंगणें**—न. ( राजा. ) एक प्रकारचें वाटूचें शिपतर.

**हिंगरावांगर**—स्त्री. ( व ) ( लहान मुलाची ) झोंबाझोंबी; भांडण; तंटा

**हिंगलाट**—न. ( कु ) हिंगरूं पहा. घट्ट, चामसीळ.

**हिंगा**—पु ( माण. ) एक किडा; भुंगा **हिंगे पडणें**-( माण ) बाजरीच्या पिकावर लहान किडे पडणें.

**हिंगारी**—स्त्री ( माण. ) रब्बीचें पीक; याचे उलट मुंगारी [ का. हिंगु, हिंदे=मागें ]

**हिंगुल-गूळ, हिंगोळ हिंगळूक-हिंगुळूक**—पु पारा व गंधक यांचें एक मिश्रण, पाऱ्याची अशोधित धातु [ सं. हिंगुल ] **हिंगळी लाख**-स्त्री हिंगूळ मिसळलेली लाख. **हिंगुळी**-वि हिंगुळासंबंधीं ( रंग, रसायन, पारा इ० )

**हिंगू( गो )दाखविणें**—अक्रि चकविणें; फसविणें; चोंदी देणें **हिंगा तिंगो** स्त्री टाळाटाळ; चालढकल.

**हिंगे-गे**—क्रिवि १ ( अशिष्ट ) हंगे, इकडे, येथें. २ आता. [ का हीगे=असें, याप्रकारें ! ] ०**तिंगे**-न १ ( इकडे-तिकडे ) असंबद्ध व टाळाटाळीचें भाषण, टोलवाटोलव ( क्रि० करणें, लावणें, मांडणें, चालवणें, म्हणणें ). -क्रिवि १ असंबद्धपणें, दुटप्पीपणानें २ अजमासें, सरासरी, उणेंपुरें ( क्रि० म्हणणें; बोलणें, करणें ).

**हिचक, हिचका, हिचकाविणें, हिचडणें हिचडा**—हिगवणें इ० पहा

**हिचण**—पु वन्य पशूंचा सुळा, दात.

**हिचमिचणें**—अक्रि ( कसें तरी, मोठ्या कष्टानें ), थोडा विसावा घेणें, थोडेसे हातपाय हालविणें; चलनवलन करणें, हातपाय ताणून अंग मोकळें करणें; इकडे तिकडे हलणें. 'या दाटींत कसें बसावें, अंमळ हिचमिचेन म्हटलें तर जागा नाहीं ' [ ध्व हिच्+मिच् ]

**हिंचुटा**—वि हिंचुटा; हिमटा; हिंपुटा पहा. [ हीन+घुटा ( पुटा ) ? ]

**हिजड( र )णें**—अक्रि ( व ) रागानें अंगावर धमकून जाणें, रागावणें 'तो माझ्यावर फार हिजरला.'

**हिजडा**—पु १ पुरुषवेषधारी नपुंसक; पंढ, यांची विशिष्ट जात २ ( ल ) निर्लज्ज, बीभत्स हावभाव, भाषण करणारा माणूस ३ निःसत्त्व, दुबळा, पौरुषहीन माणूस कांहीं हिजडे स्त्रीवेषानं गावात दरसाल गरीब श्रीमंताकडून पैसे उकळतात त्यास वतनदार हिजडे म्हणतात **हिजडी**-स्त्री. स्त्रीवेषधारी नपुंसक. **हिजडें**-न हिजडा-हिजडी यास सामान्यत म्हण-

तात म्ह० ( गो ) हिजऱ्यानी जावें, सुरुपानीं रावचें=एकानें मिळवावें दुसऱ्यानें खावें

हिजरा-रा, हिजरी साल—पु मुसल्मानी एक शकाची वर्षे; मुहम्मद पैगंबर मक्का सोडून मदीनेकडे गेला त्या दिवसापासून म्हणजे १६ जुलै इ० स० ६२२ पासून सुरु झालेला शक [अर हिज्रा=देशत्याग] हिजरी-वि हिज्रासंबधी हिजरात—स्त्री सामुदायिक देशत्याग

हिजे करणें—(व ) उपहास करणें

हिटगा—वि (व ) मनाचा हलका, क्षुद्र बुद्धीचा हिटगेपणा-पु हलकेपणा

हिड—पु ( गो ) गुरांचा कळप

हिडक—स्त्री पिरत, जातें यातील टाचीची वरोळी खाच, खोर

हिडगा—पु १ दरिद्री, लहरी माणूस २ भटक्या उनाड माणूस म्ह० १ हिडग्याची ब्यालो गाय आणि सायावर बासरू जन्याला जाय २ क्षुमनी फकी, टवाळ माणूस ३ आवडो दुर्लौकिक असलेला अव्यवस्थित माणूस अनादरवाचो व भाई या शब्दावरोवर उपयोग उदा० ' हिडगेभाई मिळाले आणि मसलत बिघडली ' हिडगेचार-पु भव स्वैर वर्तन; गर्वी वर्तणूक

हिंडणें—अकि भटकणें, फिरणें भ्रमण करणें [स हिंडन] हिंडपगारे-पु अव उगीच इकडतिकडे भटकणें उद्योग सोडून भटकी मारणें उनाडक्या (क्रि० करणें लागणें) [हिंडणें+वारा] हिंडन-न फेरी भटकी भ्रमण हिंडण्या हिंड फिऱ्या वि १ भटक्या प्रवासी २ (ल ) जुनवी उदन उदत असलेले या हिंडत्या हिंडत्या लिहिण्याची किंमत मोजू लागल्यास काहीचीहि नाहीं ' —खेया [हिंडणें+फिरणें] हिंडायें मुडायें-न तीर्थयात्रा करणें व संन्यास घेणें ' नलगे हिंडावें मुडावें कांहीं । साधनाची आटाआटी । ' [हिंडणें+ मुडणें]

हिडशा-शी-सा—वि घाणेरडा, किळसवाणा, ओंगळ, बीभत्स, हिडीस (व्यक्ति, वस्तु इ० ) [स हिड्=धिक्कारणें हिडीस] हिडसणें उकि धिक्कारणें अपमान करणें विटंबना करणें कस्पटाप्रमाणें लेखणें हिडीसफिडीस करणें हिडसा विणें-उकि १ धिक्कारणें, धुडकाविणें २ घाण करणें, मळविणें लिडबिडीत करणें ( भांडीं इ० ) ' भांडीं सारीं हिडसा वून टाकलीं कीं हो यग्यानें ? ' हिडो(ड)स न उकीरडा घाण खातेरें —वि हिडसा पहा [स हिड] हिडास-पि(फि)डास-न अनादराची तुच्छतेची वागणूक —क्रिवि धिक्कारून, धुडकावून, तिरस्कारानें ( क्रि० करणें )

हिंडळणें—उकि तुडवडणें, हिंचमिचणें, हिंदळणें पहा [ध्व ]

हिंडा(डो)ळा—पु हिंदोळा पहा

हिडिंबा—स्त्री हिडंबा पहा

हिंडार—न ( व ) शेतातील ढेकळें फोडण्याचें एक औत [का हिंड=ढेकूळ]

हिंडाल—पु गायनातील एक राग [स हिंडोल]

हिण-णें—न हीन पहा [स हीन] हिणकस-वट-वट-कसा-वि हीणकस इ० पहा हिणपणा हिणावणी-स्त्री कमी करणें, हिन वगैरे मानणें हिणा ०वणें-विणें हिणा(ण्या)(व)विणें-उकि १ दोष अपराध न्यून इ० दाखवून मनस्ताप करणें, हीनपणा काढून लाजविणें २ कमी करणें, उतरविणें ( गो ) हिणयुचे ' पतो पदार्थे कां काय । हिणावनी जे । ' —ज्ञा १७ ३८८ हिणार-पु १ (कर ) प्रथम रडाचा, विजयर नसलेला नवरदेव २ हीनतर पहा हिणसुंद्रा-पु ( व ) पहा —वि ( व ) वाढ थमलला, खुडलेला ( क्रि० होणें ) हिणाव-वा पु फजीती; लाज हलकेपणा ' तें अनाथपण जाईन । हिणवा अवा यईल । ' —ज्ञा २ २१७

हिर्णो—न ( को ) बांबूची एक प्रकारची टोपली

हित—न लाभ, कल्याण बरवंपणा फायदा ( क्रि० शोधणें ) —वि १ उपयुक्त फायद्याचें योग्य रास्त [स ] म्ह० ( व ) हिताची हितकार अन जन्माची फजीतखोर ( सुनला उद्देशून ) ०कर-वि कल्याणकारक फायदेशीर ०गुज न १ स्वतःचे कल्याणाची गोष्ट ' सत्य वचन सांगण्यास नडळा बजिलें ह्या हितगुजा । ' —अफला २ आपल्या मनातील गोष्ट, गुप्त गोष्ट, कानगोष्ट ( क्रि० सांगणें, बोलणें, राखणें ) ' माझ्या मनिचें हितगुज सारें ठाउक झालां । —सौभद्र [हित+गुज] ०चिंतक-वि १ कल्याण चिंतणारा हितेच्छु २ सार्वजनिक सदरोस विशिष्ट रक्कम ( वर्गणी ) देणारा सभासद ( हे ) सिपयायसार ०बुद्धि-वि हित चिंतणारा, करणारा ०शत्रु-वि अकल्याण, अहित करणारा, हिताच्या आड येणारा ' मुलास खेद होईल म्हणून चांगली शिक्षा लावात नाहीं असा बाप स हितशत्रु म्हणावें । ' —बायबल प्राथर्ये १३ २४ ०वादी-वि कल्याणाची गोष्ट सल्ला सांगणारा ०संबंध पु १ हितासाठीं घडणारा संबंध २ मैत्री, सलोखा हितान्वेषण न कल्याण शोधणें हिताळ-ळा-ळू वि हितकर्ता उपकार कर्ता ' हित कर गे हिताळे, भा हित केरे गे घोळाळ , हितकर्ता हिताळू अनहित कर्ता ओढाळ ' हितेच्छु हितैषी वि कल्याण इच्छिणारा हितचिंतक हितोपदेश पु कल्याणकारक सल्ला हितोपदेशी-वि असा सल्ला देणारा

हिनचा, हिनपर्यंत, हिनवर, हिंतून—इथचा, एथवा इ० पहा

हिंताल—पु एक प्रकारचें खजूरीचें झाड

हिंद—पु १ हिंदुस्थान देश 'हा हिंदरश मामला।' २ या देशातील लोक ( हिंदु आणि मुसल्मान ) [स सिंधु-सिंध अर सिंध फा हिंद्] ०वाना हिंदवी-वि १ हिंदू हिंदुस्थानें सरंगी 'हिंदवी स्वराज्य' २ हिंदी हिंदा-स्त्री उत्तर हिंदु स्थानातल्या लोकांची भाषा -वि हिंदुस्थानचा हिंदु-दू-पु भारतखंडातील परंपरागत सनातनधर्मानुयायी, त्या धर्मानीत व्यक्ति हिंदुस्थान-पुन १ हिंदूंचा देश सर्व भारतवर्ष २ नर्मदेतर भरतखंड उत्तर हिंदुस्थान हिंदुस्थान सरकार-न हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहणारी संस्था, गव्हर्नर जनरल-इन-कौंसिल हिंदुस्थानी-स्त्री उर्दूभाषा उर्दूमिश्रित हिंदी भाषा -वि हिंदुस्थानसंबंधी

हिंकळणें हिंस्ळणें-उक्रि हुचमळणें, हिसळणें, हेल काव खाणें देणें [स हिन्दोल]

हिंदग-न हिंदाण हिंदान—न १ नेम मारण्यासाठी कलेलं चिन्ह लक्ष्य २ आणीबाणीची वेळ ३ नेम (क्रि० धरणें, बांधणें) विंदग पहा [स विंदन]

हिंदग-न हिंदाण-न—न १ युक्ति, चातुर्य, विंदान पहा २ (ना) शिकवण

हिंदहिंदणें—अक्रि विरविलीत होणें (फळ, गवू इ०) [ध्व?] हिंदहिंदात हिंदहिंदा-वि विरविलीत झालेला

हिंदुळा हिंदोल हिंदोळा—पु १ पाळणा चोपाळा, झोंपाळा २ झोंका हिसका धक्का ३ एक राग यात षड्ज तीव्र गांधार, तीव्र म मध्यम तीव्र धैवत तीव्र निषाद हे स्वर लागतात जाती औडुव-औडुव वादी धैवत संवादी गांधार वेळ रात्रीचा चौथा प्रहर [स हिंदोल] हिंदोळणें-सक्रि हालविणें 'त्या हिंदोळला कैलास।' -वेसोस्व ४९३

हिंयान—न (व घाटी) नेम हिंदग पहा

हिनसुद्दा—वि हिरमुसलेला -मनको

हिंपुटा-पूट-पुगा—वि (काव्य) खिन्न खेदयुक्त कष्टी बहु हिंपुटा होईजे मायपोटीं। -मनाचे श्लोक २०, -तुगा ८३३ -स्त्री शून्य शार (सांकि० अदूया) ३ [हीन= आकुंचित+पुट=ओठ तुल० अर हम्म्=चिंता]

हिफाजत—स्त्री १ सरक्षण 'परगणेचचे हिफाजती करिता अगोदर नवाबानीं मितावराव अमील यास पाठविले' -रा ५११९ २ आश्रय 'सिद्दी अबदुला यदरच हिफा अतीव जात होता' -रा ५६१ [अर हिफ्मत्]

हिम—न १ धुकें २ बर्फ ३ थंडी, थंडपणा, गारठा (हवा, शरीर यात) ४ हींव सर्दी ५ (-पुन) औषधी पदार्थ भिजत घालून त्याचें घ्यावयाचें पाणी ६ थंड पदार्थाचा स्पर्श -पु १ चंद्र २ हिमालय पर्वत ३ चंदनाचें झाड ४ कापूर इ० -वि थंड [स] ०कर-पु चंद्र ०केदार-पु हिमालयातील केदाराश्रम, बदरिकाश्रम 'त्या दोघी मातापितरीं। घोर तप करी हिमकेदारीं। तरीच माडीवरी श्रीहरी। रात्रंदिवस सेवतसे।' -ह ५ ८४ ०गिरी-पु १ ध्रुव प्रदेशातील बर्फाचे डोंगर पुढें पुढें ह समुद्रात वहात येतात २ हिमालय ०ज्वर-पु हिंवताप, शीतज्वर ०तेल न नारळाच्या रसावर थंडीच्या दिवसात येणारा मलईसारखा थर हे तल मस्तकाच्या रोगावर गुणकारी असतें ०नग-वंत-वान्-पु हिमालय पर्वत ०नगजा-स्त्री पार्वती ०भानु हिमांशु-पु चंद्र ०यान-पु थंड गाड, बर्फमय ०घृत-पु (भूगोल) ज्या उंचीवर नेहमीं बर्फ असतें ती उंची अथवा असा प्रदेश दर्शविणारी भौगोलिक रेषा हिमाचल हिमाद्रि हिमालय-पु १ भारतखंडाच्या उत्तर सीमेवरचा प्रचंड पर्वत २ (ल) अजस्र ढीग 'पुस्तकांचा हिमालय' हिम्य-वि थडीचें बर्फाचें

हिमकरगी—वि (व) हिनग, कृपण [स हीन+क्र-कर?]

हिमजी—पु सुरवारी हिरडा -मुक्या १७७

हिमट हिमटताडया—वि हिंपुटा खिन्न [स हिम?]

हिमटा-टा ठ्या—वि विवक्, कृपण हिमटाण पु (गो) कंजूषपणा

हिमणी काढून रडणें—(कु) ओक्साबोक्शीं रडणें [हीमर=ही! असा ध्वनी?]

हिमत हिम्मत—स्त्री १ धाडस, धैर्य शौर्य 'सर्वांची झालें, हिमत-मर्दानपणा मनला ठाऊक आहत पानपतावर भाऊस टाकून आलेत -ख १४८१, -मराभा १३ २ निग्रह हिंमत, उत्साह उमेद धमक अवसान [अर हिम्मत्] म्ह० हिम्मत मर्दा तर मदत खुदा ०हरणें-धैर्य, अवसान, उत्साह इ० नाहींसा होणें गडबडणें हिम्मतदार, हिम्मती हिम्मतीचा-वि धाडशी धैर्यवान् निधड्या छातीचा ०बहादर-वि १ शूर, वीर २ एक पदवी -रसप १३२

हिमसाण—पु (कु) मासळीची घाण

हिम(मू)ळ—वि १ थेंबव निःसत्त्व पाणचट 'तापवून निवविलेलें गाढ पाणीहि हिमळ लागतें' २ थोवट [हीनवळ?]

इ० टाळण्यासाठीं ) २ विरोध, हरकत ३ हला हरकत पहा [ अर ] हिल्लेबाज-वि छद, दगेखोर, हरकत्या

हिल्लारी—स्त्री आरोळी, हाक हुइड पहा 'एकवि हिलारी करा म्हणती। -निगा ४८ [ ध्व ]

हिंव—न १ थंडी, वस्तु हवा यांतील गारवा, गारठा २ शिरशिरी, सर्दी ३ हिंवताप ४ थंडीच्या कडाक्यानें खराब झालेलें पीक. ( क्रि० जाण, निरण ) [ स हिम ] ०ज्वर-ताप-पु थंडीचा ताप, हिमज्वर हिंवडणें हिंवर्णे-अक्रि थंडीनें कुडकुडणें, हुडहुडी भरणें, गारठणें कापणें 'एकां उभयावि प्राण गेले। घागाचे दात बैसले। विखराचे दातुले। हिंवताती।'-ज्ञा ११३५ हिंवडी-स्त्री (को) थंडीची हुडहुडी हिंवत हिंवत जमीन-पुस्त्री १ हिंवाळ्यात नागरून पावसाळ्यापर्यंत तशीच ठेवलेली पड जमीन 'हें नवरान हिंवताकडे टाकलें' २ (डाणी) एकवेळ पड टाकून पहिल्या हंगामात लागवडीस आणलेली माळजमीन हिंवताची नांगरणी-स्त्री वरील जमीनीची नांगरट हिंवताड-न (तिरस्कारानें) हिंवत. हिंवताप-पु (व) हिंवाळा हिंवली-स्त्री थंडी 'हिंवली जैसी माणिकें। दिवो नेदी निगाग।'-ज्ञा १७७२९ हिंवशी-स्त्री (व) थंडी हिंवशी पटक-स्त्री (व) फार थंडवा हिंवश्या पाण्याच्या भाकरी खाणें-(व) काळजी नसणें हिंवस-स्त्री १ (कों) सर्द हवा २ शीततुषार. -वि (व) थंडगार हिंवसणें-अक्रि १ थंडीची, सर्दीची बाधा होणें २ (ल) निराश होणें, हिरमुसणें, म्लान-मलूल होणें, विजणें, उत्साहहीन होणें हिंवसा-वि १ थंड सर्द (पाणी हवा इ०) २ रागीट नसलेला, सौम्य (माणूस) हिंवसाण-स्त्री सर्द झालेल्या व बिघडलेल्या वस्तूंची घाण [ हिंव+घाण ] हिंवाडी-हिंवडी पहा हिंवारें न हिंवताप. 'जळसोस आणि हिंवारें।'-दा ३६२६ हिंवाळा-ळी-पुस्त्री थंडीचा ऋतु

हिंवर—पु एक मोठें कांटेरी झाड म्ह० हिंवर तरूची शीतल छाया=रपुसकाच्या हातीं पद्मिनी, सुळावरची पोळी याप्रमाणें निरुपयोगी, निषिद्ध (हिंवराच्या छायेंत बसू नये असा संकेत आहे)

हिंवळणें, हिंवळावणें हिंवाळणें—अक्रि विवळणें पहा

हिंघळाण—स्त्री (गो) मासळीची घाण

हिंगावचें—सक्रि (गो) पसरणें, वासणें

हिंग्याळें—न (कु) विन विषारी साप वयाळें पहा

हिशे(शा)ब—पु १ अंक आकडे, व्यावहारिक जमा खर्चाचें, आवकजावकाचें गणित गणती, मापन, राशयाफल २ गणना; अंकगणिताप्रमाणें मेळ पडणें ३ गणित करून रकम निश्चित करणें, गणितानें निघालेली रकम ४ कागदावर टिपलेला जमाखर्च, कर्ज, खर्च इ० चें टिपण ५ जमा-खर्चांतील एखादी बाब (क्रि० धरणें) ६ (ल) सरळपणा, न्यायीपणा, न्याय, वाजवी रीत, सरळ मार्ग ७ (ल) पर्वा, महत्त्व, लौकिक [ अर हिम(सा)ब् ] ०किताब-ठिशेब-पु सामान्यपणें जमाखर्च, जमाखर्चाचे कागद इ०, गणित हिशे(शो)बी-वि १ हिशेब, गणित, जमाखर्च यासबंधीं २ हिशोबाचे कामात वाकबगार, कुशल, दक्ष, व्यवस्थित, सरळ ३ न्याय्य, योग्य; रास्त बरोबर ४ चोख, व्यवस्थित (माणूस) ५ काटकोर, पैन पै हिशेब घेणापणारा

हिस—स्त्री (व) कदर, मान (क्रि० वाटणें, मानणें). [ अर हिस्स् ]

हिसकणें—उक्रि १ जोरानें, झग्यानें ओढून घेणें, झटकणें, हिसडणें, जबरदस्तीनें घणें २ (ल) उपरणें उद-ळणें, हासडणें (पैसा इ०) ३ फिसकटविणें, बिघडविणें (काम, योजना, मसलत) [ स हिंस्कर्षण ? हिं हिचकना ] हिसकणी-स्त्री हिसडा, झटका, हिसकणें पहा हिसका-पु. १ हिसकणी; झग्यानें ओढणें व त्यापासून झालेली हिवति (क्रि० देणें, बसणें) २ अकल्पित बसलेला तडाखा, झपाटा, सपाटा, आघात, हिसडा आणि त्यापासून उद्भवलेला त्रास, होणारा परिणाम. ३ (ल) (चालु काम, धंदा) एकदम बंद पडणें, विघ्न यणें, खूट येणें, विघ्न, अडथळा ४ (ल) निष्फळ व दगदगीचा प्रवास खेप, हेलपाटा [ हिं ] हिसकावणी-स्त्री जोरानें ओढून घेणें हिसडणी हिसकाविणें-अक्रि हिसकणें, जोरानें ओढून घणें, अन्यायानें व बळानें घेणें, बळकावणें हिसकाहि(कि)सक-स्त्री (अनेकांनीं केलेली) ओढाताण, झगाट ओढाओढी हिसडणें-उक्रि हिसकणें; हिसका देणें हिसडा-डी-पुस्त्री हिसका, झटका

हि(हिं)सणें—अक्रि (घोडा) खेंकाळणें [ स ह्रष् ध्व ] हिंसाण-न खेंकाळणें 'वाज करिती हिंसाण।'-गीता १४०४

हिंसणें—उक्रि (काव्य) हिंसा करणें, इजा करणें ठार मारणें, खून करणें [ स हिंसन ] हिंसक, हिंस्र-वि १ सुनी हत्यारी, घातक २ (ल) क्रूर, उग्र, भयंकर (व्याघ्र सिंहादि प्राणी) हिंसा-स्त्री. १ हत्या, खून; ठार मारणें २ इजा, पीडा, दुखापत हिंसेचे तीन प्रकार-मानसिक (द्वेष, मत्सर इ०), वाचिक (शिव्या, शाप), शारीरिक (वध खून) [ स ] हिंस्रालु-वि हिंसक पहा

हि(हिं)सळणें—अक्रि १ उसळणें, उसळी खाणें, हेंदकळून सांडणें (भांड्यातील पातळ पदार्थ) २ (ल) भर भाव, बेफाम पळणें, उधळणें (घोडा, बैल) ३ शितोडे उडण

हिस(सा)ळा—पु. कापसावर पडणारा एक रोग. 'हिसाळ्यानें गेल सेत।' –एभा २१.१२८.

हिसा— हिस्सा पहा.

हिसा—वि. थंडगार ( पाणी, वस्तु ). हिंवसा पहा. [ हिंव ]

हिसाउणें, हिसाड्डा–डी—हिसवणें इ० पहा.

हिसाब, हिसाबकिताब, हिसाबी—हिशेब इ० पहा. 'त्याचा हिशाब काय धरावा.' –मराचियोशा ४३. 'ऐसें हिसाबीविनाबो असतां.' –रा १५.२६.

हिसार—पु किल्ला; गड. 'बजानव कारकुनानी हिसार जावळी.' –रा २०.१५९. [ अर. हिसार् ]

हिसेंमिरें—न. (तंजा.) कंकोळ. [ हिंवसें+मिरें ]

हिंस्र—हिंसणें पहा.

हिस्सा—पु. वांटा; भाग; अंश; पाती. [ अर. हिस्सा ] हिस्से॰शी–रसोद–स्त्री. १ ( गणित ) वाटावयाचें द्रव्य व वाटेकराची संख्या हेच भाज्यभाजक मानून त्रैराशिकाच्या रीतीनें विभाग करण्याचा प्रकार. ( क्रि० घालणें ). २ हिशेबानें काढलेला वाटा; पाती. ( क्रि० येणें; बसणें ). 'मशारनिले याच्या वियमानाची शिवेंदीची हिसेरसीद् बेहूदवाच्या अज मासें निवडून पाटविली आहे.' –पया ९२. [ फा. हिस्सा+रसद् ] हिस्सेदार–वि. पातीदार; भागीदार; वाटेली; वाटेकरी [ फा हिस्सा+दार् ]

हिहिहि—स्त्री. उपहास; फिदीफिदी. –क्रिवि. निंदार्थी कुत्सित, हसण्याच्या आवाजाचें अनुकरण करून. [ ध्व. ]

हिळणें, हिळणेंमिळणें—अक्रि. वळणीस येणें; कह्यांत येणें; रुळणें; माणसाळणें. [ मिळणें द्वि.; हिं. हिलाना ]

हिळभर—न. ( बे ) नागराची मूठ. [ सं. हल ]

हीं—अ. १ देखील; सुद्धा २ तसेंच; आणखी. हि पहा.

हीट—न ( गो. ) तांदुळाच्या पिठाचें एक पक्वान्न. [ कों. इट्टु=पीठ; तुल सं पिष्ठ ]

हींड—स्त्री. ( कों. ) वळचण.

हीण-न—न. १ हलक्या प्रतीची धातू. २ ( ल. ) क्षुद्रता; हलकटपणा. ३ ( हिणवायाजोगें ) व्यंग, दोष, उणीव –वि १ क्षुद्र; हलकट; नीच. २ उणा; रहित; हीन पहा ३ कमी प्रतीचा; गौण. [ सं हीन ] म्ह० रीण फिटेल पण हीण फिटणार नाहीं. ॰कट–कस–घट–वर्सा–वि १ भेसळीचें; मिश्रित. २ आंत हीण ( कमी किंमतीची धातू ) घालून कमी किंमतीचें बनविलेलें ३ कमी कसाच्या सोन्या चांदीचे ( नाणें, अलंकार ). ॰कौल–पु. भर आकारापेक्षा कमी साऱ्यानें जमीन देण्याचा लेखी करार. ॰वर–पु १ नवरीपेक्षां वय, उंची इ० नी कमी असलेला नवरामुलगा २ वराल्या जोडप्यांतील विजोडपणा. ३ सर्वसाधारणपणें ठेवण, स्वभाव इ० बाबींत हलका भरणारा धनी, वरिष्ठ. 'धिक् जिणें ज्याचा स्वामी हीन। मरण तें बरें भलें मग।' –तुगा १२७६. [ हीन+वर ]

हीन—वि. १ न्यून; रहित ( वित्तविद्या गुणधर्मादिकांनीं ); उणा. 'द्रव्य-संपत्ति-बुद्धि-सामर्थ्य-तेज-शौर्य-हीन.' २ क्षुद्र; गौण; हलका. 'हीन-जाति-वर्ण-दातृत्व-भाग्य इ०.' [ सं. ] ॰दंती–वि. पांच दांत असणारा ( घोडा ). –अश्वप १.९४. ॰वर–हिणवर पहा. ॰वाद–पु ( कायदा ) अयोग्य, अस्वीकरणीय साक्ष. ॰वादी–पु. अशी साक्ष देणारा तो ॰वीर्य–वि. निःसत्त्व; गुणहीन; पराक्रमहीन; पुरुषत्व नष्ट झालेला. ॰शक्त–क्ति–वि. अशक्त; कमजोर. ॰सख्य–न हलक्या जातीच्या, धंद्याच्या लोकांशीं मैत्री. ॰सेवा–स्त्री. हलकट धन्याची किंवा हलक्या प्रकारची नोकरी. हीनांग–वि. व्यंग असलेल्या शरीराचा; विकलांगी.

हीर—पु. १ माड, पोफळ इ० च्या पातींतील काडी. 'कुठें हिरा तो कुठें हीर हा।' २ हिरका पहा. ३ शिजलेल्या भातांतील न शिजलेला तांदूळ, कणी. ४ हिरकूट; कुसळ; घस; सडी. ( क्रि० भरणें; शिरणें; सलणें, उपटणें ). ॰भाजणें–( सडीचें टोंक जाळून बोथट करणें, पेरण्याच्या दाण्याचे डोळे मोड इ० भाजणें, यावरून ) शौर्य; तेज इ० चा नाश करणें; मऊ आणणें. 'काळाग्नि हा दुरुत्वी रामराजा तुझा भाजिल हिरवा हीर।' –मध्व ६६.

हीर—स्त्री. ईर्ष्या; चडाओढ. [ वोर्य; ईर ] ॰मोड–सांड–पुस्त्री. १ उत्साहभंग; उमेदमोड, नाउमेदीची स्थिति. २ हेलपाड.

हीर—पु. ( महानु ) प्रकाशकिरण; कीळ. 'तया रंगाचे हीर।' –भाए ६४५. [ सं ]

हीर, हीरक—पु हिरा, रत्न. [ सं. ]

हींव—न हिंव ( सर्व अर्थी ) पहा. [ स. हिम, पोर्तुगि. हील, हीर ]

हींहीं—स्त्री किदिफिदी हास्य. –क्रिवि. असल्या प्रकारें हसून, खिदळून [ ध्व. ]

हीळ—स्त्री ( हेट ) झावळीची काडी हीर ( १ ) पहा.

हुं. हुः, हुंऊ–हुंहुं—उद्गा. मान्यतादर्शक शब्द, उच्चार, हुकार. [ ध्व ] ॰हुणणें–करणें–१ ऐकतों आहे, करतों आहे इ० दर्शविणें. २ मान्यता देणें; संमति देणें 'कोणे अकर्ण विजया पुसी करतोंचि बोल बापा हूं।' –मोउद्योग वेणीसंहार.

हुपल—स्त्री ( कु. गो. ) आरोळी; ओरड; बोंब. [ ध्व. तुल० इं. येल् ]

हिमाईत-यत—स्त्री १ सहाय, मदतीचा आश्रय, आधार, मदत 'पेंढारी यांची हिमाईत करून स्वामींचा क्रोध होऊन स्वामी उपेक्षा करितात हें काय?' –ख ९ ४५.१८ २ जोरावारी, दंडेली. 'आक्रमक हिमायतीनें अ उर्ते धरितात' –रा ६ ११ [अर हिमायत] हिमाइ(य)ती-त्या, हिमाइतीचा, हिमाईतदार-गार-वि १ आश्रित, संरक्षित २ आवडता दोस्त हिमाइतीचा गाढव चों गधडी-पुभो १ आवडतें गाढव २ (ल) आवडता पण नालायक आश्रित इ० हिमाइतीचा गाढव तेथ्याचा लाथा मारी हिमायत-येत, हिमायतदार हिमायती-हिमाईत इ० पहा 'हिमायतीच्या बळें मरीचगुरिव ला'गुरगुरू नये'

हिमायल—पु (जरिया) भाग या जरियानें जोडी दाराच्या गळ्याजवळील बरगडीच्या मध्यांत केलेला वार याचे उग्र व सौम्य असे दोन प्रकार आहेत [अर हमायल=ताईत]

हिम्राद—स्त्री मदत –मासईनह २

हियें—न. १ (काव्य) छाती, हृदय 'तेणें दुःखें हियें फुटेल।' –ज्ञा १ २२४ २ धैर्य [स हृदय, प्रा हिअय, हिं हिया] ०घालणें-छाती फुगणें, काळजाचा ठाव सुटणें 'जो गाजत जव आइकती। तव उमेचि हियें घालिती।' –ज्ञा १ १६३ ०फोडणें-अंत करण खुलें करून गुप्त गोष्ट सांगणें 'येणें मानें जीवाचें हियें फोडावें।' –ज्ञा ९ ३५ हियया-पु हिम्मत धैर्य, अवसान, छाती [हिं] हियेदार-याज वि धाडसी, हिंमतवान

हियो-य्यो—उद्गा मोट फिरविताना बैलाला चालवायाचा इशारतीचा शब्द [ध्व]

हिर—हीर पहा

हिरक—स्त्री चिरट, जातें यातील टांकीची खांच, हीर

हिरकूट—नपु (तिरस्कारार्थी) हीर पहा हिरका-पु १ ताड, माड, पोफळ इ० च्या झावळीतील, लाकडांतील रेषा २ सुपारीतील रेषा हीर पहा ३ खापरपोळी इ०च्या पापुद्र्यांनी भिन्नभिन्न झालेला अवयव

हिरगण—न खाव व तुळई यांच्यामधील + अशा आकाराचा तुकडा; पिंडें

हिरगुंडा फापडो—स्त्री एक झाड

हिरडा—पु १ हरडा, एक औषधी फळ याचे जंगली, रंगारी, चांभारी, बाळ सुरवारी इ० अनेक प्रकार आहेत २ (ल) हिरड्याच्या आकाराची वस्तु (गळ्याची पाटी, निशाणाचे काठीचा शेवटचा भाग इ०) [स हरीतकी, प्रा हरडई] हिरडी-स्त्री बाळलेला बारीक कोंवळा हिरडा

हिरडी—स्त्री १ ज्याच्यामुळें दात परस्परांशीं संबद्ध असतात व ज्यात ते बसविलेले असतात तो मांसल भाग, दाताची खोबण, घर-

हिरणें—उक्रि हरण करणें, बलात्कारानें हिरावणें, हिरावून घेणें. 'सोडी मी कोण्हाचा हिरें। मग तयचि होती एकसरें।' –ज्ञा १६.४१६ [म]

हिरण्य—न. सोनें [सं] ०केशी-पु एक सूत्रकार –वि यजुर्वेदाची एक शाखा व सूत्र, त्या शाखेचा (ब्राह्मण) ०गर्भ-पु ब्रह्मदेव ०श्राद्ध-पु अन्नदाता ऐवजीं हिरण्यदान करून केलेलें श्राद्ध हिरण्मय-वि सोनेरी, सोन्याचें

हिरतणें—सक्रि हिरावून घेणें. 'जेणें भ्रांतिपासूनि हिरतलें।' –ज्ञा ५.३४. [सं. हृ]

हिरमुसा-मुसी, हिरमूस, हिरमोडी-वि निराश; उत्साहहीन, हताश, धीर खचलेला हिरमुसणें-अक्रि निराश होणें, धीर सुटणें, खिन्न होणें 'राजा मोठ्या हौसेनें स्वारीस निघाला होता, पण इतो मरताच हिरमुसून पडला' [हीर=वीर्य+मूस] हिरमोड-पु निराशा, धैर्य खचणें, उत्साहभंग, मनोभंग [हीर=वीर=मोडणें]

हिरमोड—वि (राजा) हिरव्या रंगाचा, गडद हिरवा नव्हे असा [हिरवा+मोडणें]

हिरली-लें—हरली-लें पहा

हिरवा—वि १ पाच शेवाळ, कोवळें गवत इ० च्या रंगाचा. २ (ल) कच्चा, अपक्व, अपुरा शिजलेला (फळ, अन्न, रसायन, वीट) ३ कोती (समजूत, विचार) ४ अपक्व वयाचा, कच्च्या रुचीचा ५ (माळ.) भांग, गांजा किंवा तो ओढणारा इसम ६ भांडखोर, ज्याचें कोणाशींहि पटत नाहीं असा, हिरवट [सं हरित] ०एरंड-पु एरंडाची एक जात ०कंच-०गार ०चार-वि अतिशय हिरवा गर्द हिरवा ०कच्चा-वि. १ अर्धवट पिकलेलें (फळ इ०) २ अर्धवट शिजलेलें, भाजलेलें (अन्न इ०) ३ अर्धवट केलेलें (काम) ०चापा-चाफा-पु एक फुलझाड याच्या उलट पांढरा, पिवळा चांपा ०निळा-पिवळा-वि काळानिळा (राग, मत्सर विष इ०मुळें झालेला-चेहरा, मुद्रा) ०भाजला राणें-मदानकदा, कांहींहि झालें तरी अतिशय छळणें, त्रास देणें हिरवट-वि १ साधारण किंचित् हिरवा २ किंचित अपक्व, क०चा ३ तबाखूसह गांजा ओढणारा. ४ (ल) अडाणी, अशिक्षित, रानवट. ५ अविचारी, तापट, एककल्ली, चिडखोर, तिरसट 'मृत्यु ऐसा व्याघ्र। मुख पसरोनि समोर। तेथें हिरवटाचार। वेडपेणें केवि रुचे।' –मुसभु २८२ हिरवटाण-स्त्री हिरवा घारा, फळ इ० ची घाण, हिरवा असल्याची घाण [हिरवट+घाण] हिरवंडा-वि १ हिरवट अर्थ २ पहा २ हिरवट घाण येणारें, हिरवट वासलेलें (फळ, वीट इ०) हिरवस-वि हिरवट हिरवसान-पु (गो) हिरवटपणा, कच्चेपणा हिरव(वा)ळ, हिरावळ-स्त्री ओलें, हिरवेंगार गवत,

वनस्पति इ०चा समुदाय 'सडून पर्जन्य पडला म्हणजे आठ दिवसात कोठेंकडे हिरवळ हात्ये' हिरवळणें-अकि हिरवा पाला फुटणें, पालवणें 'बाळें काष्ट हिरवळेना।' -दा ९७७९ हिरवी घेवडी-स्त्री हिरव्या शेंगा येणारी घेवड्याची वल हिरवीजमीन-स्त्री (कों) जमीन प्रथम भाजल्य शिवाय, दाढ केल्याशिवाय जोंत पेरणी केली आहे अशी जमीन हिरवी तमाखू-स्त्री (सांके) गजा हिरवें-न गुराना खाण्यास उपयोगी असें हिरवें गवत, पाला इ० हिरवळ

हिरविणें—हिरविणें पहा

हिरशो-सी—वि १ लोभी, खादाड २ चिडखोर, अव हेव्या करणारा चिडचिडा [अर हिराश] हिरस-स्त्री १ (क) लोभ, लोभीपणा, हाव २ (ना) मत्सर, स्पर्धा, ईर्षा [अर हिर्स]

हिरसा—वि १ संकाळण्याची सवय असलेला (घोडा) २ उन्मत्त नाठाळ [हिरस] ०तट्टू—न १ खेंकाळणारें, नाठाळ तट्टू २ बदफैलखोर माणूस ३ -वि परदाराभिलाषी, व्यभिचारी, दुर्व्यसनी (माणूस) 'लहेपुढे हिरसेतट्टू त्याची संगत धरू नका' -अज्ञा

हिरहिरा—स्त्री १ हिरिरी पहा २ हल्ला 'असा पाच सात हिरहिऱ्या झाल्या' -भाव १४७

हिरा—पु एक पाढऱ्या रंगाचें महारत्न परब, बिलवी सुखलसी, पलचा इ० याचे प्रकार आहेत [स हीरक हीर] म्ह० हिरा तो हिरा गार ती गार=धार व हलका कोण हें तेव्हाच कळून येतें ०दिवा-पु पुरा मूर्ख ०बोळ-पु एक प्रकारचा बोळ, कातबोळ ०हिंग-पु चकाकणारा उत्कृष्ट हिंग हिरे खाण-स्त्री हिऱ्यांची खाण हिरेदिवे-पु अव मकरसक्रांतीस ब्राह्मणास दोन दिवे व दोन आरसे बायका दान देतात त

हिराकस—स्त्रीपु शाई रंग तयार करण्याच्या उपयोगाचा एक खनिजपदार्थ, लोहगधकित [हिंदी]

हिराटा—पु (गो) गिराड

हिरामण—पु पोपटांतील एक जात [हिं]

हिरावणें—उकि जबरीनें दुसऱ्यापासून घेणें हिसकाविणें [स ह हरणें-हिरणें]

हिरावळी—स्त्री बायकांची पावसाळ्याची ओढणी (क्रि० पांघरणें) [तुरु० तुर्वी दिरावळ]

हिरासा—वि १ भयभीत 'दरोबस्त शीख हिरासा होऊन पानपतकडे गेले' -दिमरा १ १६४ २ हैराण 'हिरासा आहेत' -दिमरा १ ११७ [फा हिरासान]

हिरिरी—स्त्री १ वेग आवेश, सपाटा झपाटा 'क्रोधाच हिरिरीबरोबर मी एखादा वाईट शब्द बोलले असेन' २ निकराचा हल्ला, आवेशानें तुटून पडणें 'फौजेनें पहिल्या हिरीरीस किल्ला घेतला' [स वीर्य, म ईर हीर]

हिरीस—स्त्री हाव आधाशीपणा [अर हिर्स] हिर्शी—वि लोभी

हिरुनी, हिरौत—न (व) कुटलेले लाल तिखट [वीर्य वती?]

हिरूनफिरून—क्रिवि हरूनफेरून पहा

हिरोळी—स्त्री (कों) एक वेल, हिचे कंद खातात

हिलगड—स्त्री १ (देणेघेणें इ० व्यवहारातील) भानगड, लचाड (क्रि० घालणें, ठेवणें, पडणें, होणें) 'तुमचे आमचे देण्याघेण्याची हिलगड ठेवू नका' २ अडथळा, गुंताडा, गुतागुत [हिलगणें-लोंबणें] हिलगडणें-उकि लोंबकळत ठेवणें, भिजत घोंगडें ठेवणें शेवटपर्यंत पुरें न करणें (काम, फिर्याद इ०) एखादें काम सिद्धीस न जाऊ देता अडथळून पाहणें 'आमच्या लग्नाचें काम त्यानें हिलगडलें' -अकि निकाल न लागता अनिश्चितपणें लोंबत रहाणें हिलगडा, हिलगण, हिलंगवण-पुस्त्री हिलगड हिलगणें, हिलगाव(नि)णें-उकि. हिलगडणें, टिर्रे बांधणें, लोंबत ठेवणें, सरासरी जुडणें, टाचणें (कागदाच्या गड्ड्या इ०), अडकविणें -अकि १ लोंबकळत पडणें, लोंबत राहणें २ गुतणें, अडकणें ३ एखाद्या कामात गुरफटून जाणें 'मी दिवसभर हिलगलो' [हिं हिलगना]

हिलणें—हालणें पहा [हिं हिलाना]

हिलफिरकी—स्त्री (चांभारी) बूट घोटण्याचें एक हत्यार [इ हिल=टाच+फिरकी]

हिलामत—नअव (गा) लग्नातील वरातीचें चवरी, अब्दागीर इ० साहित्य

हिलारी, हिलारणी—स्त्री १ हल्ला, हिरिरी पहा २ दौड, चाल (घोड्याची) (क्रि० देणें)

हिलाल—पु १ दिवटी टेंभा, पलिता, मशाल 'सोयऱ्याचे मंडपात पुरुष व बायका रात्रीचें जाण्यायेण्यास हिलाल दिवट्या अगोदर बातमी राखोन सिद्ध करून ठेवाव्या' -पया २८८ २ चन्द्रकोर, चन्द्रजोत [अर हिलाल्] हिलाल्या-वि मशालजी

हिलावणें—सकि हलविणें

हिल्ला—पु १ लबाडी, युक्ति, कारवाई, ढोंग, बतावणी, सबब टाळाटाळीची युक्ति खोटी अडचण 'त्याम काही एक हिल्यानें दूर घालावयाचें ऐसें मनात आणून लावविलें असेल तर ईश्वर जाणे' -स १० ६६७५ २ निर्वाहाचें साधन (आश्रय, उद्योग, धंदा, रोजगार इ० चें) [अर हीला] ०हरकत-स्त्री १ युक्तिप्रयुक्ति, सबबी, बतावण्या (कर्ज पगार, निकडीचें काम

होता की नव्हता करणें-समूळ नाहींसें करणें ' सगळे मराठे एकचित होऊन इद्रन मदत करतील तर दक्षिणेंत मुसलमान होता की नव्हता असें करून टाकीन -समाजी होती कला-स्त्री पडती कळा होती घरत-स्त्र होता माल-पु बाढल्या प्रमाणांत चांगुलपणा, लायकी, स्मित असणारी वस्तु होती धार-स्त्री उपडलेली धार, मार्ग, उपडा झालेला रस्ता, ( विवाहित स्त्रीचें पोट ( गर्भाशय ) उघडण्याच्या वेळीं म्हणतात ) होती वेळ, काळ-स्त्री १ योग्य संधि, हंगाम 'होती वेळ आली म्हणजे कार्य सहज घडतें ' २ होता काळ पहा होतसाता-क्रिवि होत असतां, एखाद्या स्थितींत असतां, ( विवक्षित गुण वगैरेनें विशिष्ट असतां ' विक्रम राजा राज्य करीत होत्साता कोणीहि दरिद्री नव्हता ' होनेणें-होऊं न जाणें -मनको होयका-वि व्हावयाचें होया-वि होणारा होयाचें-(काव्य) होण्याचें, व्हावयाचें ' जीर्ण सृष्टि होयाची । ' -मोभनु १ ३४ होष्य-होष्यमाण-न होतव्य होय-उद्गा वरें, संमतिदर्शक अव्यय हो ना, होय नाहीं-स्त्री होय कीं नाहीं यांतील एखादें उत्तर, संदिग्धता, गोंधळ, हलकावा अनिश्चितता ( क्रि० म्हणणें, करणें, सांगणें ) होयीस होय म्हणणें-उडविणें-करणें-अधीनपणें परतंत्रपणें रुकार देणें होयकार-पु रुकार, संमति होय नव्हे-स्त्री १ निश्चितपणें बोलणें ( होकारार्थी किंवा नकारार्थी दोहींतून कोणतेंहि एक) (क्रि० करणें, म्हणणें, मागणें) २ विचारपूस, पाहिजे नको इ० चौकशी होय(या)वा-पु विचारलेल्या कोणत्याहि प्रश्नास होय म्हणणारा, दुसऱ्याच्या होस हो लावणारा ज्याला स्वतःचें मत नाहीं असा होरो पु गोंधळ, गडबड एकदम होरो होऊन गेली ' -विक्षिप्त १ ७१ [ हो द्वि ] होरा खरंच-उद्गा अकस्मात आठवण झाली असता निघणारा उद्गार हो हो खरंच आज मला तिकडे जावयाचें आहे नव्हे

होक—न ( व ) भातांतील तण, रान

होकल-ली होकाल—स्त्री ( कु ) १ नवरी २ उपवर मुलगी

होका होकायंत्र—न दिशा ओळखण्याचें लोहचुंबकाचें यंत्र

होका—पु १ हुक्का २ तोफेचे गोळे बाण, सुरुंग वगैरे ' अगणित होके, उडती भराभरा । '-माधव-तारापुरचा संग्राम [ फा ]

होग(गा)ड(र)णें—उक्रि ( कों ) १ अधिकार इ० वरून हाकलून लावणें घालवणें २ संपत्ति, प्रतिष्ठा, आरोग्य इ० नासणें, अव्यवस्थितपणें आपल्या हातून जाईं असें करणें ३ फेंकून देणें भिरकावणें ४ हारवणें

होगा—वि ( कों ) १ भांडखोर, दांडगा, अत्याचारी, लुच्चा २ आळशी, मद सुस्त ३ आवरशक्ति नसलेला हागरा पहा

होट, होंट—पु ओठ, ओष्ठ [ स ओष्ठ प्रा होट्ठ हिं होठ ] म्ह० १ होटात एक पोटांत एक=आत एक बाहेर एक २ होटाबाहेर तें कोटाबाहेर=तोंडांतून बाहेर पडलें की सर्वत्र फुटणें ३ होटास आळ पोटास काळ-खादाड आणि तोंडाळ ( नोकर, आश्रित इ० बद्दल म्हणतात ) होटावर दूध दिसणें-अजून बाल्यदशा असणें होटाचें पाळणें जिरणें-बाल्यावस्था ओलांडणें. होटतुट्या-वि तुटलेल्या ओंठाचा होटाळ-वि जाड ओंठाचा, बायर होणारा होटाळी-स्त्री खारा करतांना चावू नये म्हणून घोड्याच्या खालच्या ओंठास बांधलेली दोरी. ' आपल्यास काय परतु होटाळीवांचून तर्द न जाय '

होटाकर्णें—अक्रि ( तंजा ) उभें राहणें, ओटाकर्णें [ उभे टाकणें ]

होट्यो—न ( गो ) ओटीभरण [ आण टी ]

होड—स्त्री १ पैज, पण, शर्यत ( क्रि० बांधणें, लावणें, मारणें करणें ) २ करार व्यवहार [ दे प्रा होड ] होडत-स्त्री होड होड विडा-पु पैजचा विडा ' होडविडा उचलुनी हस्तकीं । मस्तकीं धरिला । ' -अमृ २१ होडा-पु १ होड २ अहंकार

होंड—न ( का ) पाण्याचें टाकें

होडकी, होडके(गें)—स्त्रीन लहान नाव, होडी, मचवा, तीन त पांच शिडें असणारें गलवत नौका ( गो ) होडगुनी [ स होड्=जाणें ] होडी-स्त्री नाव, नौका [ स होड्=जाणें ] होडकार-पु होडीवाला होडें ताणप-( गो ) १ होडी चालविणें २ निजणें

होंडकी—वि ( व ) शिंग मोडलेली ( गाय म्हैस इ० )

होंडगणें—उक्रि ( राजा ) होडगा फेकणें मारणें

होड(ड)गा-होडागा होडिंगा-पु सोटा, काठी होलपटा पहा होडगा नडग होडिक नाडिक-स्त्री १ मारामारी, हाणाहाणी २ तोंडातोंडी, भांडणतंटा 'ऐसा होता होडिक नाडिक । ' -कथा ६ १८ १० [होडगा=काठी+नडग=अस्वल]

होंडा—पु मोठेपणा हुडा पहा

होंडा—पु खड्डा [ स अध , ओढ तुल० ओंड-खोल ]

होंडा—पु हुडा पहा

होंडी—स्त्री जोंधळ्याची एक जात हुडी पहा

होणजे-से—स्त्री नणद, नणंद म्हणजे-से पहा

होणसणें—क्रि टोंचणें मोसकणें

होतकर-रू—रि पुढें उत्कर्ष पावेल असें ज्याबद्दल वाटतें असा; प्रगतिपर, आशादायक [होणें+कर]

होतवस्तु—स्त्री होती वस्तु पहा

होता, होतृ—पु १ यज्ञ करणारा, यज्ञांत आहुती देणारा. 'ऐसा मानुनी पळता झाला होतृसमूह' २ एक ऋत्विज [स]

होत्र—न. १ हवनीयद्रव्य, आहुती २ होम, विधिपूर्वक आहुती देणें [स]

होदार—न (नाविक) दोरी ताणून बांधण्याची क्रिया

होन—पु सोन्याचें साधारण ३॥ रु किंमतीचें एक नाणें याचे कांहीं प्रकार-शिवराई, पादशाही, सणगीरी, अच्युतराई, रामराई, देवराई, जडमाळ, धारवाडी, कावेरी, पामनायकी, आदवानी, ताडपत्री, निशाणी, उकिरी, सापे, एकेरी इ० [का होन=सोनें सोन्याचें नाणें] होना पायली होणें-पार महाग होणें ०माळ-स्त्री होनांची केलेली गळयांत घालण्याची माळ

होपट—वि पोल, पोकळ –मु०या ?

होपळ होपळसुती—वि १ अव्यवस्थित, मंद, मूर्ख, भोंपळसुती पहा २ पोकळ, निरर्थक

होपारी—स्त्री (व) पाळी, वेळ

होपा(प)ळी—न (कु) सकाळचें कोंवळें ऊन्ह

होंबळकांदा—पु (कु) एक विषारी कंद (औषधी उपयोगाचा)

होबाडके—न (व) थोबाड, मुसकट

होभास—पु (ना) लग्नापूर्वी नवरदेवास, नवरीच्या बापानें कपडे इ० देण्याचा विधि [हो+आपभास]

होवासा—पु काम करून देण्याबद्दलचें आश्वासन, खात्री देणें [हो+वा+असा]

होवाळ—स्त्री (कु) १ लहान तळें २ पाणी साचणारी भातशेतीची जमीन, साचर

होभाग—स्त्री (व) ठराव, करार, समति [हो+भाक]

होम—पु १ यज्ञ, विधीपूर्वक अग्नीत (तूप तांदूळ इ० ची) आहुती देणें; हवन (क्रि० देणें) २ आहुति [स] ०कुंड-न यज्ञकुंड, होम करण्याची जागा होमकुंडीं घालणें-टाकणें देणें-(किंवा) पडणें-सापडणें-आपत्तींत पींडित होटणें किंवा पडणें ०द्रव्य-न होमास लागणारें द्रव्य, हवनद्रव्य ०शाला-ळा-स्त्री अग्निशाला, यज्ञस्थान, यज्ञघर (अग्निहोत्री इ० चें) ०हवन-न होमासंबंधीं सर्व क्रिया व विधी सामान्यतः 'होम हवनें होय कोशवृद्धि।' होमणें-उक्रि होम करणें, जाळणें होमाग्नि-पु होमासाठीं तयार केलेला अग्नि होम्य-वि होमासंबंधीं

होमिओपाथी—स्त्री समचिकित्सा शास्त्र, एक रोग चिकित्सापद्धति. ज्या पदार्थानें शरीरांत रोगलक्षणें उत्पन्न होतात तोच पदार्थ अति सूक्ष्म प्रमाणांत त्या रोगावर योजावयाची पद्धति (इं)

होर—स्त्री १ पावसानें वाहून आलेली माती, केरकचरा इ० या गाळ, खळमळ यानें शेतातील खाचखळगे भरून शेत जमीन सारखी भरून येत तो प्रकार १ वाहून, धुपून आलेली माती, गाळ इ० ०णी-१ वरील होरण्याची क्रिया २ खड्डे, शेत इ० होरण्याकरितां तयें घातलेली माती इ० ची भरती ३ त्या भरतीच्या गाळसाळ इ० वस्तु, गाळ होरणें-उक्रि १ गाळसाळ इ० येऊन शेतजमीनींतील खाडींतील खाचखळगे भरणें-भर घालणें 'पुळणवट जमिनीच्या विहिरी लवकर होरतात' 'येथील खळी होरा, म्हणजे जमीन बराबर होईल' २ आच्छादणें, व्यापणें (अलंकारादिकांनीं शरीर इ०) 'केसांनीं कपाळ अगदीं होरून गेलें' [स आवरण ?]

होरट—स्त्री उग्र वास, घाण, ओरट पहा

होरड—स्त्री पु १ अतिशय हट्ट, हेकाडपणा २ आरडाओरड, गोंगाट होरडी-ड्या-वि १ गोंधळ, गोंगाट करणारा २ फार हट्टी, हटवादी, दुराग्रही

होरप(पा, फ)ळणें—उक्रि भाजणें, पोळणें, हुरपळणें, डागणें [हुरपळ] होरपा-पु (व) कणसें भाजण्याची पहिली पाळी

होरस—स्त्री लग्नात वधूपक्षानें वरपक्षास दिलेली मेजवानी होरसा जेवण-न (गो) विहिणीकरिता केलेली विशेष जवणावळ

होरा—स्त्री १ (ज्यो) मेषादि राशीचें-लग्नाचें अर्ध २ दिवसाचा २४ वा भाग, एक तास, अडीच घटका ३ भविष्य; भावी घटना सांगणें 'राजाला पुत्र झालेला आहे असा त्याचा होरा आहे' ४ मेषादि लग्न ५ ज्योतिषाचा एक प्रकार ६ मुहूर्त 'ऐसेन गुर्वुपूजक साधुनि देईल गर्ग होरा ज्या।' -मोभीष्म १ ७१ ७ अदाज अजमास, अटकळ (क्रि० चालणें, अान यणें, दिसणें, वहाणें) 'माझा होरा या गोष्टीविषयीं चालत नाहीं' [स] ०चक्र-न तासाचें चक्र

होरी—स्त्री १ होळीच्या सणात वसंतोत्सवासंबंधीं व इतर शृंगारविषयक हिंदुस्थानी गाणें हे दीपचंदी किंवा धमार तालात गातात २ (सामा) शृंगारिक गाणें [स होलि हिं]

होरी—स्त्री (जरतार धंदा) एक शेर वळलेलें रेशीम [का होरळु=वळणें हारे]

होरेत—पु (गो) बिजवर नवरा

होलकाडा—पु झोकांडा, झोकांडी, झोक (क्रि० जाणें, खाणें)

**होलगट-ड**—न (तिरस्कारार्थी) हला किंवा होलापक्षी

**होलगट(ड)णें**—उक्रि भिरकावून देणें, फेंकणें, रागानें भिरकावून देणें —अक्रि १ होल्पाडणें, होलपणें, झोंक जाऊन पुढें पडणें २ प्रेताच्या तिरडीपुढें जें मडकें असतें तें स्मशानांत नेऊन फोडल्यावर त्याच्या खापरांतील पाणी पिऊन होलापक्षी एखाद्याच्या पाठीवर बसला किंवा पाठीवरून गेला असतां त्या प्राण्याची कवर शिवा पाट मोडणें **होलगडून पाडणें**-(गाय, बैल इ०) जोरानें ठेंचकाळून पडणें अडखळून कोलमडणें

**होलगडा**—पु काठी, लहान दांडकें

**होलगा, होला**—पु १ एक पक्षी २ वेडा, हला **होलटॅ**-पु (तिरस्कारार्थी) होला पक्षी

**होलप(पा)टणें**—न १ होलगडा २ –क्रि (पत्ते) अखेरचे दोहांपेक्षां अधिक हात सर्व एकदम घेणें (क्रि० मारणें, घेणें पाडणें) —उक्रि १हालपटा (दांडकें) फेकणें, फेकून मारणें (फळें इ० झाडावरून पाडण इ० साठीं) २ हलपटणें पहा **हालप(पा)टा**-पु १ होलगडा २ आचका, हिसका, हिसका देऊन फेकणें (क्रि० मारणें, देणें) [होला]

**होलगा**—पु कुळीथ, हुलगा धान्य

**होला**—पु होलगा पक्षी [गु होलो] ०**कोला**-पु क्षुद्र, भित्रा नेभळट, नालायक माणूस [होल+कोल्हा]

**होलार**—पु महार, मांग इ० जातींचे वाजंत्री व त्यांतील व्यक्ति होलार डफडें वाजवून गातो

**होलाला**—पु लाग, वेग –शर

**होलिका**—स्त्री १ होळीची अधिष्ठात्री देवता, राक्षसी २ होळीचा सण, होळीची गवऱ्या इ० ची रास ढीग होळी, हुताशनी [सं] ०**पूजन**-न वरील व्रताची ०देपूजा **होलिकोत्सव-त्साव-त्साह**-पु होळीचा सण शिमगा

**होवी**—स्त्री (गो) १ ओंवी २ स्तुति (क्रि० गाणें)

**होवर**—पु ओहर, वऱ्हर, वधुवरांचें जोडपें [वधुवर-वहूवर]

**होवरी**—स्त्री (कु) १ सापा ओवरी २ खोली [ओवरी]

**होवळणी**—स्त्री १ होवळ्याचा धंदा २ उपद्व्याप; नसता कारभार **होवळा**-वि पुढारी; सर्व बाबतींत पुढाकार घेणारा तंटेभांडणें तोडणारा लग्नें वगैरे जमवून देणारा इ० २ (क) कारभार करणारा, उपद्व्यापी ३ (चुकीनें) हवळा म्ह० रिकाम टवळा आणि गावचा होवळा

**होवळीक**—न (गो) लग्नमुंजीचें आमंत्रण. **होवळी**-स्त्री (गो) करवली

**होश(ष)-शा**—पु १ उत्साह, कळकळ, उत्सुकता, जोम (कृत्य, धंदा, धाडस इ० संबंधीं) त्याचें राजकारण विध्वस्त जाहलें त्याचा होश गेला।' –रा १० ५९ २ शुद्धि, भान, अवसान, त्राण 'पेंढारी आल्याचें ऐकतांच त्याचा होष गेला, कांहीं सुचेनासें झालें' [फा हुश्]

**होसरणें**—क्रि हालणें, येणें, ओसरणें 'कडकडाट सुटलेंसा। महाकंप होसरला।'–मुमादि ४१ १२१ [ओसरणें]

**होळणी**—स्त्री धुपणीचा रोग [हाळणें] **होळणें**-न धुण्याचा जिन्नस —उक्रि पाखरणें, गळणें सारणें धुणें; ओहोळणें —उक्रि १ धुणें, घोळणें उदा० अंग होळणें (धुणें) २ मारणें —बाळमित्र [का होळु होळे]

**होळन्दी**—स्त्री (गो) होळी (तिरस्कारार्थी)

**होळप**—अक्रि (गो) अपुऱ्या महिन्याची बाळंत होणें, धुपावणें

**होळप(फ)णें**—उक्रि हुरपळणें पहा

**होळपणी**—स्त्री (बायकी) काळजी, चिंता, खेद, मनस्ताप (क्रि० घालणें; करणें) (अनेकवचनी प्रयोग)

**होळवंडी**—स्त्री (बडोदें) नांगरावर बसविलेली शेत सान्याची पद्धत –बडोद्याचे राज्यकर्ते ३५७ [सं हल्य, हल]

**होळा**—पु हवळा पहा

**होळा**—पु मोठी होळी [होळी]

**होळाय**—पु पालन

**होळी**—स्त्री १ होलिका पहा २ (कों) होळींत, मध्यें पुरावयाचें एरंडाचें, पोफळीचें किंवा केळीचें झाड [सं होलिका] ०**करणें**-१ होळी पेटविणें २ (ल) जाळपोळ करणें, सर्वनाश करणें **अंगाची होळी होणें**-राग, ताप इ०नीं अंगाची आग होणें ०**शिपणें**-न होळीच्या दिवसांत पडणारा लहानसा पाऊस **होळीची कर**-स्त्री होळी जळल्यानंतरचा दुसरा दिवस **होळीची पोळी**-स्त्री १ होळीवर पोळी पहिल्यानें बांधण्याचा, ठेवण्याचा हक्क, हा बहुधा मुखत्यार पाटलाचा असतो २ अशा तऱ्हेची पोळी **होळीचे होळकर**-पु अव १ होळीच्या पुढें खळ गडबड, मजा करणारी मंडळी २ अजागळ व अव्यवस्थित लोक ३ (ल) सटरफटर छंदी लोक, फुरसत तमाशा बघण्यासाठीं, खेळण्यासाठीं जमलेले लोक

**होळी**—स्त्री (क) गंज, रास 'गवताच्या दोन होळ्या'

**हौजा**—पु फजिती, बेअब्रू अपमान (क्रि० उडणें, उडविणें, पाडणें) [अर हज्व्]

**हौद**—पु पाणी साठविण्यासाठीं दगडचुनें यांचें बांधीव किंवा धातूचें पात्र २ जमिनींत केलेला खड्डा, गुप्त जागा, टांकें [अर हौद्]

**हौदा**—पु १ हत्तीवर बसण्याकरितां असलेली उघडी कठेदार अंबारी २ कुस्तीसाठीं केलेला चौकोनी हौदाप्रमाणें खळगा, आखाडा [अर हौद्]

हौर—पु १ (राजा) नदीला एकाएकीं आलेला पूर २ ऊर्मि, सुरसुरी (चोळणें, खेळणें इ०तील) और पहा

हौरा—पु (नासिक) लुगड्याचें (दोन्ही काठ सोडून) मधलें पोत

हौरा-री—पुस्त्री पाढरे तीळ हवरा-री पहा

हौलदि(दी)ल—वि भयभीत, गोंधळलेला, किंकर्तव्यमूढ, हवालदिल पहा [फा हवालदिल] हौलदिली-स्त्री भीति, धास्ती, भयचकीत होणें

हौलिका, हौलिकापूजन, हौलिकोत्सव—होलिका इ० पहा

हौस—स्त्री उत्कट इच्छा, महत्त्वाकांक्षा, उत्सुकता, गोडी, आवड; उत्साह, नाद, उमेद [फा होस्, अर हवस्] हौशा-शी-सा-वि १ हौस बाळगणारा, उत्साही २ ख्यालीखुशाली, गाणेंबजावणें इ० नीं आपल्या मनाची हौस पुरविण्याचा स्वभाव असलेला, रसिक हौशे(स)णें-अक्रि हौस असणें, बाळगणें, चटक लागणें, आवड असणें हौसदार-वि १ शोकीन, लहरी, चैनी; विषयासक्त २ महत्त्वाकांक्षी; तीव्र इच्छेचा; हौशा हौसला-पु १ इच्छा, हवा त्याचा मानस-हौसला उत्तम आहे '-रा १० ५९ २ कर्तृत्वशक्ति, उत्साह 'काम मोठें, हौसला थोडा ' -रा ५ ११ ,[अर हौसला] हौसेहौसें-क्रिवि तीव्र इच्छेनें, उत्सुकतेनें

हौसा—पु (को) भाद्रपदात अनुराधा नक्षत्र ज्या दिवशीं असेल त्या दिवसापासून तीन दिवस करावयाचा कुण०यातील गौरीप्रमाणें एक उत्सव

हौळ—स्त्री (व ना) अव्यवस्थित जमाव, टोळी, घोळका, झुंड 'पोरं हौळ जमली बाहेर '

हौला—पु हुला पहा, भाजलेला ओला हरभरा [स होल]

ह्यंगडा—वि (बे) हिजडा, नपुसक [का. हेंगस=बाई, स्त्री]

ह्यंज—पु (बे) ढेंकूळ

ह्यंवाडणें, ह्यंवाडी होणें—अक्रि (बे) कलडणें, उलथणें (गाडी इ०)

ह्यस्तन, ह्यस्य—वि काल्चा; कालच्या दिवसासंबंधीं [स]

ह्याचा—ह्या या दर्शकसर्वनामाचें षष्ठी विभक्तीचें पुल्लिंगी रूप (कु) ह्योचो [हा] ह्यो-दसना (अशिष्ट) ह्या 'ह्यो कायद हातामदीं नेऊनश्यानी टाक '-बाब २ २

ह्याच्यांत येणें—तारुण्यात (विशेषत स्त्रिया) येणें

ह्यासणें—अक्रि मत्स्यास येणें -मनको



# ळ

ळ—मराठी व्यंजनमालेंतील चौतिसावें अक्षर हें कोण त्यादि शब्दाच्या आरंभीं येत नाहीं अक्षरविकास—पहिली व दुसरी अवस्था इ स २ ऱ्या शतकातील नासिकच्या शिलालेखात व तिसरी इ स १२१२ तील चेब्रोलुच्या शिलालेखात

# क्ष

क्ष—मराठी व्यंजनमालेंतील पस्तीसावें अक्षर हें क् आणि ष् या दोन व्यंजनाच्या संयोगानें झालेलें आहे अक्षरविकास—याच्या पाच अवस्था आढळून येतात पहिली इ स २ ऱ्या शतकातील उषवदातच्या नासिक शिलालेखात, दुसरी त्याच वेळच्या रुद्रदामनच्या गिरनार लेखात, तिसरी इ स ४ थ्या शतकातील अलाहाबादच्या समुद्रगुप्ताच्या शिलालेखात, चौथी इ स ६ व्या शतकातील एका ताम्रपत्रात व पाचवी इ स ११ व्या शतकातील चिरवा लेखात आढळते

क्षण—पु १ एका मुहूर्ताचा बारावा भाग ४ मिनिटें, ३० कला २ सूक्ष्म काळ, किंचित, थोडा वेळ, पळ, निमिष ३ श्राद्धाच्या आमंत्रणाकरिता ब्राह्मणाच्या हातावर द्यावयाचे दर्भ (यावरून) ४ ब्राह्मणास श्राद्धाचें आमंत्रण (क्रि० देणें, घेणें) ५ श्राद्धभोजन 'ब्राह्मण क्षणास बसला-आला-गेला ' [स] क्षणणें-क्षण देणें-सक्रि श्राद्धाकरिता हातात दर्भ देऊन ब्राह्मणास आमंत्रण करणें ०प्रभा-स्त्री वीज, विद्युल्लता 'मेघीं स्थिरावली क्षणप्रभा।' ०बुद्धि-वि चचल, अस्थिर, अनिश्चित, मनाचा, बुद्धीचा ०भंगुर-वि एका क्षणात नाश पावणारा, मोडणारा; नाशवत, अशाश्वत, क्षणिक 'अनुभविलेलें क्षणभंगुर सर्वेहि जें सुज्ञजन पहातात।' -मोभीष्म ११४ ०भर-भरि-री-क्रिवि (काव्य) थोडा वेळ, एक क्षण कालापुरतें, पळभर, तिळभर 'दोघास न विसंबे क्षणभरी।' ०विध्वंसी-वि (एका क्षणात विध्वंस होईल असा) क्षणभंगुर नश्वर क्षणाक्षणा-क्षणीं, क्षणोक्षणीं-क्रिवि प्रत्येक क्षणास-क्षणीं, पावलोपावलीं 'परापेक्षा होऊ नये क्षणाक्षणा।' -दा १४ १ २३ क्षणावधि-पु थोडा वेळ, एक क्षण, पळ -क्रिवि एका क्षणात, क्षणभर क्षणिक-वि एक क्षण टिकणारें, अल्प काळ राहणारें नाशवत, नश्वर, चचल 'अपेक्षिजे राज्यसुख। जया लागीं तें ८व क्षणिक।' -ज्ञा १ २६३ क्षणिक बुद्धि-वि क्षणबुद्धि, चचल वृत्तीचा-मनाचा क्षणिक बुद्धि-मति-कल्पना-विचार-निश्चय-स्त्रीपु थोडा वेळ टिकणारी बुद्धि, मति, इ०, चचलपणा, अस्थिरपणा क्षणे(णै)क-क्रिवि (काव्य)

एक क्षण, थोडा वेळ 'क्षणेक तेणें मग ती रुसावी।' –सारह २ ३०

क्षणन—न १ मारणें २ जखमी करणें [स]

क्षत—न जखम व्रण, इजा. –वि व्रण, जखम झालेला, जखमी (शस्त्र इ० नीं) [स क्षण्–मारणें] ०ज–न रक्त (क्षतांतून वाहणारें) ०दृष्टि–स्त्री वैरभाव; प्रतिकूल नजर, मारक दृष्टि –वि अशा तऱ्हेचा भाव ठेवणारा, वैरी ०वृत्ति–वि चरितार्थाचें साधन नसलेला, वेकार ०व्रत–वि व्रतभंग करणारा, शपथ मोडणारा, भ्रष्ट

क्षंता—वि क्षमाशील, सहनशील, सोशिक [स] क्षंतव्य–वि क्षमा करण्याजोगा, क्षम्य

क्षति–ती—स्त्री १ तोटा, नुकसान, नाश २ इजा, जखम, दुखापत ३ (व्यापकार्थी) नागवणूक, ऱ्हास, बिघाड ४ (ल) चिंता, फिकीर (काळजी तोटा, इजा याविषयीं विशेषत नकारार्थी प्रयोग) पर्वा, दरकार, किंमत याअर्थी (क्रि० धरणें बाळगणें) 'त्याची काय मला क्षती?' [स]

क्षत्र—पु १ चार वर्णांतील दुसऱ्या म्हणजे क्षत्रिय वर्णाचा पुरुष २ योद्धा वीरपुरुष –न क्षत्रिय जात 'कर्मे या नैसर्गिकें। क्षत्र जातीसी।' –ज्ञा १८ ८७८ [स] क्षत्रिय–पु १ क्षत्र अर्थ १ पहा 'ब्राह्मण साह्याय्यकर क्षत्रिय जो तोचि सन तोचि तरे।' –मोआदि ३१ ५६ २ दुय्यम प्रत थोडीसी हलकी प्रत दाखविण्यासाठीं कांहीं शब्दांच्या पूर्वी योजावयाचा शब्द उदा० क्षत्रिय हिरा=जरा कमी तेजाचा, पहिल्या प्रतीचा नव्हे असा हिरा [स] क्षत्री–पु (क्षत्रिय शब्दाचा अपभ्रंश) क्षत्रिय खत्री 'तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया।' –ज्ञा ९ ४६० क्षत्रियांतक–पु परशुराम [क्षत्रिय+अंतक]

क्षपणक—पु १ जैन किंवा बौद्धधर्मीय साधु 'नग्न क्षपणक।' –मोआदि २ १०० २ जैन किंवा बौद्ध मतानुयायी [स] ०वाद–पु बौद्ध धर्म, नास्तिक मत; एक पाखंड

क्षपा—स्त्री रात्र [स] ०चर–पु राक्षस

क्षम—वि १ सोशिक, सहनशील, क्षमाशील (समासांत) आघात–क्षम इ० २ शक्त, समर्थ, लायक, योग्य सामाशब्द–निर्वाह–विचार–व्यवहार–क्षम 'भावि तम प्रशमीं न क्षमही होऊनि तज हेंहि सके।' –मोसभा ५ ११ ३ शक्य असलेला; व्यवहार्य आचरणीय [स] क्षमण–न क्षमा 'क्षमण करिं कृपेनें सर्व तू न्यायसारा।' –वामन विराट ८ ६० क्षमणें–क्रि. १ समर्थ होणें 'भ्रमला पळावयासहि नच तो भगदत्त सिंधुर क्षमला।' –मोभीष्म ५ ५४ २ क्षमा करणें क्षमत्व–न १ सोशीकपणा, सहनशीलता, क्षमा करण्याचा धर्म 'तुझेनि क्षमत्व आलें। पृथ्वीयसी।' –ज्ञा १४ ७ २ सामर्थ्य

क्षमा—स्त्री १ अपराध सहन करण्याची क्रिया, धर्म, सहनशीलता, माफी (क्रि० करणें) २ सोशीकपणा, शांति, स्थिरता, सहिष्णुता 'असमोहसहन सिद्धी। क्षमा सत्य।' –ज्ञा १० ८३ ३ पृथ्वी, धरा 'आणि देवाचेनि क्षमत्वें क्षमा आधार जाली आहे या भूतग्रामा।' –ज्ञा ११ ५५९ [स] ०पाळ–पु राजा, भूपति 'त्वां यज्ञधर्म समेतचि कथिलें कीं प्रायश क्षमापाळ।' मोसभा १ ४१ ०वन्त–वान, क्षमिता, क्षमी–वि १ क्षमाशील, दया करणारा; सहनशील 'किंबहुना धैर्यक्षमी। करुणांतीही।' –ज्ञा १३ ४९८. २ समर्थ 'आचरणें नोहे क्षमी। न निघे मनोधर्मी।' –ज्ञा १८ ६५८ क्षमापन–न शांतवन (राग, दु ख इ०चें), समाधान, सांत्वन.

क्षय—पु १ क्षीण, ऱ्हास, अवनति, नाश म्हण० सुखानें पुण्याचा क्षय दु खानें पापाचा क्षय २ नायनाट, लय, नाश, तोटा, अस्तित्व नाहींसें होणें, लोप 'पाप–पुण्य–कुल–धर्म–राज्य–क्षय' ३ एक रोग, शारीरिक ऱ्हास राजयक्ष्मा ४ सूर्य, चंद्र यांच्या बिंबाचा ऱ्हास; तिथिक्षय ५ पृथ्वी प्रळय; लय ६ (बीजगणित) ऋणसंख्या–याच्या उलट वृद्धि–धन–संख्या ७ साठ संवत्सरांपैकीं शेवटचें संवत्सर ८ सूर्योदयानंतर प्रवृत्त जे तिथि, नक्षत्र, योग इ० दुसऱ्या सूर्योदयापूर्वी संपणें 'तिथिक्षय' [स] ०कार–पु कफक्षय, क्षय रोगांतील खोकला ०गामी वि ऱ्हास पावणारा, उत्तरोत्तर खालावलेला, मृत्युपथास लागलेला याच्या उलट वृद्धिगामी ०तिथि स्त्री. १ आज सूर्योदयानंतर सुरू झालेली व उद्या सूर्योदयापूर्वी संपणारी चांद्रमानांतील तिथि, सूर्योदयीं नसणारी तिथि २ मृत माणसाची महिन्याची किंवा वर्षाची मृत्युतिथि, दिवस (चांद्रमानाची) ०दिवस–पु क्षयतिथि ०पक्ष–पु दर महिन्यांतील दुसरा पंधरवडा, वद्यपक्ष, कृष्णपक्ष ०मास–पु ज्या महिन्यात दोन संक्रांती येतात तो अमावास्यांत मास हा क्वचित येतो क्षयमास कार्तिक, मार्गशीर्ष, पौष या तीन महिन्यांत येतो इतर महिन्यांत येत नाहीं –ज्योतिषसार ७ ०रोग–पु राजयक्ष्मा; रोगराज यानें शरीरांतील सर्व धातू उत्तरोत्तर क्षीण होऊन मृत्यु येतो, हा असाध्य मानतात ०रोगी–वि वरील रोग झालेला ०वृद्धि–स्त्री १ ऱ्हास–उत्कर्ष, उतरती–वाढती कळा, कमतरता–वढती, कमी होणें–वाढणें २ (बीजगणित) ऋण–वृद्धिसंख्या, उणें–अधिक संख्या ०सूतक–न (काव्य) मृताशौच, अशौच क्षयाह–पु क्षयतिथि अर्थ. २ पहा क्षयिष्णु–वि नश्वर, अशाश्वत, नाश पावणारें, ऱ्हास पावण्याजोगें क्षयी–वि १ क्षयिष्णु २ क्षयरोगी .

**क्षर**—पु. १ सृष्टींतील सर्व नाशवंत पदार्थ. –गीर १४१ २ सर्व मूर्त. 'तेच क्षराक्षर भरणी दोन्ही । गुरुमंत्रें दृढ मंथुनी।' –एभा १९.७४. [सं.] –वि. १ गळणारें; ठिबकणारें; झिरपणारें. २ झिजणारें, ऱ्हास पावणारें. ३ नाशवंत अशाश्वत. **क्षरण**–न. १ गळती; झिरपा; ठिबकणी. 'अधो द्वारीं दोही। क्षरणें तेंचि।' –माज्ञा १८.३३५. (पाठ). २ हळूहळू नाश; ऱ्हास. **क्षरणें**–अकि. पाझरणें; ठिबकणें; गळणें, झिरपणें; हळू हळू नाहींसें होणें. **क्षराक्षरविचार**–पु. (तत्वज्ञान) शरीर व मन याचा क्षेत्रक्षेत्रज्ञ विचार झाल्यावर मग त्यांतून जें तत्त्व निष्पन्न होतें तें आणि आपल्या भोंवतीं जी दृश्य सृष्टि-ब्रह्मांड आहे तिच्या निरीक्षणानें जें तत्त्व निष्पन्न होतें तें, मिळून दोन्ही एकच कां भिन्न आहेत याचें परीक्षण करणें. –गीर १४१. **क्षरित**–वि. १ गळलेलें; ठिबकलेलें. २ गाळलेलें. **क्षारित**–वि. पाझरविलेलें; ठिबकविलेलें.

**क्षांत**—वि. १ सहन केलेलें; क्षमा केलेलें. २ सोशिक; धीराचा; सहनशील, क्षमाशील. [सं. क्षम्=सोसणें] **क्षांति**–स्त्री. १ क्षमा; माफी. २ सहनशीलता; धीर; सोशिकपणा. ३ शांति. 'उभय सहिष्णुता ते क्षांती । क्षांतीसी क्षिती गुरु केली।' –एभा ७.३६२.

**क्षाती**—स्त्री. कीर्ति; नांव; ख्याति. 'पुनीनें केली क्षाती।' –वसा ७३. [ख्याति]

**क्षात्र**—वि. क्षत्रियासंबंधीं. [सं.] ०**धर्म-व्रत-वृत्ति**–पुन स्त्री. १ क्षत्रियाचा उद्योग, कर्म इ०. २ शौर्य, धैर्य इ० गुण. 'क्षात्रवृत्ति भुंजतां। पाप नाहीं।' –ज्ञा २.२२५.

**क्षानत**—न. (राजा.) अनिष्टसूचक कृत्य इ० (दिवा खालीं पडणें वगैरे).

**क्षार**—पु. १ सहा रसांतील एक. (सामा.) मीठ (खनिज किंवा कृत्रिम). २ खारटपणा. ३ केळीचें सोपट, आघाडा, हळदीचें पान इ० ची राख; अल्क (इं.) अल्कली. ४ पोटॅश, सोडा इ० क्षार पदार्थ. ५ पादेलोण; बीडलवण. ६ अम्ल व अल्कली यांचे रासायनिक संयोगापासून बनलेला पदार्थ. ७ क्षाराचें तीव्र मूलतत्त्व. (इं.) कॉस्टिक अल्कली. –वि. खारट [सं.] ०**ता**–स्त्री. खारटपणा. –ज्ञा १३.९१९. ०**पंचक**–न पळसाचा क्षार, तिळाच्या काडयाचा क्षार, मोरव्याचा क्षार, सज्जीखार व जवखार यांचें सममाग मिश्रण. ०**मेह**–पु. क्षारयुक्त लघवी किंवा तिचा विकार. प्रमेह पहा. **क्षाराब्धि**–पु. क्षारसमुद्र. [क्षार+अब्धि] **क्षारोत्पादक**–वि. क्षार उत्पन्न करणारें (क्लोरीन, आयोडीन इ०). **क्षारोदक**–न. खारट पाणी. [क्षार+उदक]

**क्षालन**—न. धुणें; प्रक्षालन; क्षाळण असें अपभ्रष्ट रूप रूढ आहे. [सं.] **क्षाल(ळ)णें**–उक्रि. प्रक्षाळण करणें; धुणें. **क्षालित**–वि. धुतलेलें. [सं.]

**क्षिणणें**—अकि. क्षीण, अशक्त, खराब होणें; झिजणें. [सं. क्षीण] **क्षित**–वि. खराब झालेलें, ऱ्हास पावलेलें; खालावलेलें.

**क्षिती**—स्त्री. १ पृथ्वी. 'परब्रह्म क्षितीं उतरलें।' –तुगा १०३. २ (संगीत) चौदाव्या श्रुतीचें नाव. ३ खराबी; नासाडी; ऱ्हास; उतरती कळा; क्षय. [सं] **क्षितिज**–न. आकाश जेथें जमीनीस लागलेलें दिसतें तो वर्तुळाकार मर्यादा. **क्षितिजलंबन**–न. खस्थ पदार्थ क्षितिजांत असतां त्याचें असलेलें मोठें लंबन. –सूर्य २५. **क्षितिजसमसूत्र**–वि. क्षितिजाच्या सरळ पातळींत असलेलें; पृथ्वीच्या पृष्ठभागाशीं सपाट असलेलें. **क्षितिज्या**–स्त्री. (ज्यो.) चराशीं जुळणारी द्युज्यासमांतरवृत्ताची भुजज्या. 'उदयापासुन उन्मंडलापर्यंत पोहोंचेतोवर सूर्यास अहोरात्र' वृत्ताचे जे अंश आक्रमावे लागतात त्यांच्या वृत्तावरील (द्युज्याकर्णीय) भुजज्या.' –भाज्यो १४. **क्षितीश**–पु. राजा; भूपति. 'न्यायातें पोषी क्षितीशु।' –ज्ञा १८.१८०४.

**क्षिति**—स्त्री. (मुकीनें) क्षति; चिंता; फिकीर; पर्वा (क्रि० धरणें; बाळगणें) 'साडिव्याची क्षिती मागुता। न करी सर्वथा निजबोधें।' –एभा १०.१८७. क्षति पहा.

**क्षिपक**—वि. फेकणारा; टाकणारा. [सं. क्षिप्–क्षिपक] **क्षिपण**–न. टाकणें; फेंकणें. [सं.] **क्षिप्त**–वि. १ टाकलेलें; फेकलेलें; प्रक्षिप्त. २ (ल.) शिव्यागाळी, शब्द इ०नीं निर्भर्त्सिला गेलेला; निंदित.

**क्षिप्र**—वि. वेगयुक्त; ज्लद; शीघ्र; घाईचा. –क्रिवि. जलदीनें; तावडतोब. [सं.]

**क्षिप्रा**—स्त्री १ खीर. २ उज्जनीची शिप्रा नदी. [सं.]

**क्षिरापत**—स्त्री. (प्र.) खिरापत पहा.

**क्षीण**—वि. १ क्षयी; अशक्त; दुर्बल. २ नाश पावलेला; नाहींसा झालेला; संपलेला. ३ सडपातळ; बारीक; किरकोळ; कृश; रोडया. [सं. क्षि=क्षय होणें] ०**पाप**–वि. ज्याचें पाप नष्ट झालें आहे असा; निष्पाप. ०**पुण्य**–वि. ज्याचें पुण्य खर्च झालें आहे, संपलें आहे असा; ज्याचें पुण्य भोगून झालें आहे, क्षय पावलें आहे असा. ०**शक्ति**–वि. अशक्त; नि शक्त. **क्षीणायु**–वि. मरणोन्मुख; विनाश जवळ आलेला आहे असा; अल्पायु.

**क्षीत**—स्त्री. क्षति; क्षिति; खातर; पर्वा; दरकार. (क्रि० धरणें; बाळगणें). [सं. क्षति]

**क्षीव**—वि. दारू पिऊन उन्मत्त झालेला; झिंगलेला. [सं.]

क्षीर—न १ दूध 'नीरक्षीरातिविलक्षणी स्नान तुला तें घालोनि।' –सौभद्र २ पाणी ३ झाडांचा पांढरा चीक, रस ४ –स्त्री खीर ५ क्षीरसागर [स] ०कीट–पु नासलेल्या दुधांतील कीड ०नीरन्याय–पु एकांत एक पूर्णपणें मिसळून जाणें (दुधांत नीर=पाणी जसें एकरूप होतें तसें) पूर्ण मिळीमता ०नीरविभाग-विवेक–पु हंस पक्षी जसा दूधपाण्याच्या मिश्रणांतून दूध निराळें काढतो तसें सत्यासत्याच्या मिश्रणांतून खरें निवडून काढणें चांगलें वाईटांतून चांगलें शोधणें निवड ०पथ–पु आकाशगंगा (ई) मिल्की वे 'क्षीरपथानें अवलोकन ज्यानें एकवार केलें आहे तो या विषयांतील कोणत्याही गोष्टीचा अंत आप णास स्पष्टपणें दिसून आला आहे, असें म्हणण्यास धजणार नाहीं' –भाग ०वृक्ष–पु ज्यांतून दुधासारखा चीक निघतो असें झाड (वड, रुई, पाकर, उंबर, थोर इ०) ०सागर-सिंधु-समुद्र-अब्धि-अर्णव–पु दुधाचा समुद्र (पौराणिक) सप्तसमुद्र पहा 'क्षीरसिंधु परिसरीं।' –ज्ञा १८ १७५१ 'नातरी क्षीरसमुद्र।' –ज्ञा १७ ३२६ 'परि क्षीरार्णवी कल्लोळ।' –ज्ञा ११ ५३५ ०स्फटिक–पु गोमेद रत्न क्षीरापती–पु विष्णुदेव –शर क्षीराब्धिकन्या-तनया–स्त्री लक्ष्मी देवी. क्षीराब्धि जामात–पु विष्णु क्षीरोदक–न उंची, रेशमी पातळ (वाय-कांचें) शालें शालू, साड्या क्षीरोदक लाख दहा पाटावें।' –मोसभा ५ ८३ क्षीरोदक पाटोळा–पु क्षीरोदक पहा

क्षीरारि—न खिलार –कर

क्षुण्ण—वि १ चुरडलेलें ठेचलेलें चुरडलेलें (हात, पाय, दगड इ० नीं) २ रूढ बराच चोखाळलेला (मार्ग) [सं]

क्षुत त—न शिंक (क्रि० येणें) [ध्व]

क्षुत्—स्त्री क्षुधा, भूक [सं] ०बोध–पु तीव्र भूक लागणें क्षुधेची प्रदीप्तता ०क्षाम–वि भुकेला, भुकेनें व्याकुळ झालेले क्षुत्क्षाम स्तनपानें सुतृपित नव्हता।' –नस्तो १२

क्षुद्र—न न्यून, उणेपणा, वैगुण्य, दोष –वि ल्हान (योग्यता आकार इ० नें) हलकें क्षुल्लक क्षुद्र मत्स्य-प्राणी-ग्राम इ० ' जोडा पुसणें केर काढणें ही क्षुद्रकर्में तुम्हा सारख्यांनीं जातीनें करूं नयेत ' [सं] ०कल्पना–स्त्री कमी महत्त्वाची हलकी कल्पना तर्क विचार ०घटिका–स्त्री घुंगरू घुंगरांची माळ घुमरू लावलेला एक दागिना क्षुद्र घटिका झळ कती।' –वमीस्व ३ ७१ ०दृष्टि–स्त्री हलक बारीकसारीक दोष पाहण्याची प्रवृत्ति कोतें मन, अनुदार वृत्ति –वि उणे पणा काढणारा, क्षुद्रदृष्टि ठेवणारा, छिद्रान्वेषी ०मेह–पु लघवी थोडी होणें असा होणारी लघवी ०रोग पु क्षुद्रक रोग, विकार (यांची २०० पर्यंत संख्या आहे) क्षुद्रान्वेषण क्षुद्रान्वेषी–क्षुद्रदृष्टि पहा क्षुद्रक–क्षुद्र पहा

क्षुधा—स्त्री भूक [सं] क्षुधाक्रांत, क्षुधातुर क्षुधार्त-वि फार भुकेला, भुकेनें व्याकुळ झालेला क्षुधित–वि भुकेला.

क्षुब्ध, क्षुभित—वि क्षोभ पावलेला, घाबरलेला, रागावलेला विकार झालेला चेतलेला (अक्षरशः व ल) [सं क्षुभ्]

क्षुर—पु १ वस्तरा २ गुराच्या (विशेषत घोड्याच्या) पायाचा खुर [सं] ०प्र–पु बाण, इषु 'कामाचे धनुचे क्षुरप्र मनसीं भुवाहनप्रोत्पलें।' –विठ्ल रसमंजरी ११८

क्षुल्लक—न क्षुद्र पहा. –वि १ ल्हान, कमती, अल्प, थोडें २ (ल) हलकें, कमी दर्जाचें, कवडी किंमतीचें, क्षुद्र, (क्रिकेट, माणूस वृत्ति काम, बाब) [सं]

क्षेत्र—न १ शेत २ तीर्थाची जागा, पवित्र व धार्मिक स्थळ, यात्रेचें, देवतेचें ठिकाण, अयोध्या, गया, काशी इ० ३ जागा, स्थळ, स्थान, भूमिभाग ४ (भूमिति) लांबी, रुंदी, उंची यांप्रमाणें मापन करता येणारा पदार्थ, आकृति ५ बारा शालिग्रामाचा संच ६ ज्यांत आत्मा राहतो असें प्राण्याचें शरीर, सविकार व सजीव मनुष्यदेह –गीर १४२ ७ (संतति उत्पत्तीचें स्थळ म्हणून) स्त्री, पत्नी 'जेंवि वित्तक्षत्रीं मीं, मत्क्षेत्रींहि तसें चि संतान।' –मोआदि १९ ३४ ८ लवन कडकडीत उपवास (धार्मिक उपवास मात्र नव्हे) (क्रि० पडणें, होणें घालणें) ९ चोवीस शालिग्राम, अकरा बाण एकवीस नर्मदे गणपती, बारा सूर्यकांत व आठ सुवर्णमुखी देवी इतक्या देवतांचा समूह १० उत्पत्तिस्थान ११ युद्धभूमि रणांगण 'तो ना गवसेचि क्षेत्रीं।' –कथा १ ७ ६९ १२ रेखागणित, भूमिति १३ नकाशा, आकृति [सं] ०गणित–न भूमितिशास्त्र ०ज–पु. स्वस्त्रीच्या ठायीं स्वतःचा भाऊ किंवा भाऊबंद यांच पासून झालेला पुत्र, परवीर्यापासून स्वस्त्री (क्षेत्रा)च्या ठायीं उत्पन्न झालेलें अपत्य नियोगापासून झालेली संतती प्राचीन काळीं हिंदुधर्मशास्त्रांत असलेल्या संततीस कायदेशीर मान्यता असे द्वादशविधपुत्र पहा ०जीवी–वि शेतकरी, शेतीवर उपजीविका करणारा ०तीर्थ–न १ तीर्थक्षेत्र यात्रेचें ठिकाण २ असलेल्या ठिकाणाची यात्रा ०देव–पु तीर्थक्षेत्रांतील देवता. अथवा क्षेत्रदेव पादाती। ठाईंठाईं।' –दा १९ ५ १८ ०पाल-ळ–पु स्थल ग्राम रक्षक देवता स्थानिक देवता ग्रामदेवता ०फल ळ–न १ (भूमिति) कोणतीहि पातळी अथवा क्षेत्र एखाद्या क्षेत्रपरिमाणानें मोजलें असता त्या परिमाणानें निष्पन्न होणारी संख्या २ (ल) निकाल, परिणाम, फळ (काम, व्यापार, उद्योग यांतील) 'पांच पुतळ्या दिल्या काय आणि पंचवीस रुपये दिले काय क्षेत्रफळ एकच' 'आजा मेला नातू झाला क्षेत्रफळ बरोबरच' ०भूमि–स्त्री १ लागवडीची, लागवडीस योग्य अशी जमीन २ धार्मिक, पवित्र जागा, तीर्थक्षेत्र

०यात्रा–स्त्री तीर्थस्नानाची यात्रा, प्रवास ०राशी–स्त्री (भूमिति) कांहीं विशिष्ट आकाराची राशि, सख्या, (भूमितीच्या आकृतीनें दर्शविली जाणारी) ०वास–पु तीर्थक्षेत्राच्या ठिकाणीं रहिवास, वास्तव्य ०वासी–वि क्षेत्रवास करणारा ०संन्यास–पु एखाद्या पुण्यक्षेत्रीं राहून, हे क्षेत्र सोडून मरेपर्यंत कोठेंहि जावयाचें नाहीं असा केलेला नियम, सन्यास घेऊन क्षेत्रीं राहणें ०संन्यासी–वि क्षेत्रसन्यास केलेला ०संस्कार–पुस्त्री क्षेत्राचा गर्भाधान, पुसवन इ० सस्कार सततिरूप फल उत्पन्न होण्यासाठीं धार्मिक विधि ०स्थ–वि क्षेत्र किंवा पवित्र ठिकाण येथील रहिवासी ०क्षेत्रज्ञविचार–पु स्वन ज्या पिंडाच्या, क्षेत्राच्या किंवा शरीराच्या व मनाच्या व्यापाराचें परीक्षण करून त्यावरून क्षेत्रज्ञरूपी आत्मा कसा निष्पन्न होतो याचें विवेचन करणें –गीर १४१ ०ज्ञ–पु आत्मा, जीवात्मा, आत्मा देहात बद्ध असता म्हणजे त्यास क्षेत्रज्ञ म्हणतात' –गीर १९७. क्षेत्राजीव क्षेत्रा–वि शेतांत कष्ट करून उपजीविका चालविणारा शतकरी क्षेत्रोपवास–पु १ क्षेत्रात आल्यावर व मुंडन विधि करण्यापूर्वी करावयाचा उपवास २ (ल) अनपाण्याशिवाय असा कडकडीत उपवास क्षेत्रोपाध्याय–पु क्षेत्राच्या ठिकाणचा पडया, ज्याकडून क्षेत्रातील सर्व धार्मिक विधि करून घेतात

क्षेत्री—पु क्षत्रिय पहा 'आम्ही वीर क्षेत्री' [क्षत्रिय अप]

क्षेप—पु १ टाकणें, फेकणें खर्च करणें, घालविणें 'काल-धन-आयुष्य-तृप्ति-कर्म-धैर्य क्षेप' २ दूर पाठविणें ३ खगोल अक्षाश ४ क्षेपक, ग्रहादिकाचें सिद्ध झालेलें गणित स्पष्ट व्हावें इत्यार्थ त्यात मिळवावा किंवा उणा करावा म्हणून सांगितलेला अकराशि ५ कोणेक ग्रथकाराचे ग्रथात इतरानें घातलेले श्लोक वाक्य इ०, प्रक्षिप्त मजकूर, क्षेपक ६ एकच प्रसग, वेळ एकच गोष्ट, प्रसग, क्रिया इ० याला लागलेला सबध काळ अवकाश 'देता क्षेप, घेता क्षेपें जवता क्षेपीं' खप पहा ७ विलब ८ अनादर [स] ०निक्षेप–क्रिवि न चुकता, खात्रीनें, निश्चयान टाकोटाक खास तों भाऊसाहब क्षेपनिक्षेप आले' –भाब ८८ 'त्यास क्षेपनिक्षेप आज्ञा करून इकडे रवाना करावें' –पेद १५५ ०पात–पु (ज्यो) दोन ग्रहाच्या कक्षा ज्या एका बिंदूतून एकमेकास छेदून जातात तो पात ग्रहकक्षेचा आरोह छेदन बिंदु ०वृत्त–न ग्रहाची कक्षा; विमडल ०सूत्र–न खगोल रेखाशवृत्त क्षेपक–पु क्षेप अर्थ ४,५ पहा –वि टाकणारा, क्षेपणकर्ता [स] क्षेपण–न क्षेप अर्थ १, २ पहा क्षेपणी–स्त्री (काव्य) वल्हें क्षपणी क्षेपणें–उक्रि. १ टाकणें, फेकणें २ दूर पाठविणें क्षेप्ता–वि १ क्षेपक, फेंकणारा, टाकणारा २ पाठविणारा

क्षेम—न १ कल्याण, अभ्युदय, सुख, हित २ स्नेहालिंगन, भेट (क्रि० घेणें, ओढणें) 'येरी म्हणे दमयतिये। उठी क्षेम देई वा इये।' –कथा ११०५५ –वि सुखी, हितकर, कल्याणप्रद [स] क्षेमंकर–वि सुखकर, उत्कर्षकारक, कल्याणदायक क्षेमालिंगन–न मित्रादिकास प्रीतीनें मारलेली मिठी, स्नेहालिंगन; क्षेम अर्थ २ पहा (क्रि० घेणें) क्षेमी–वि आनदी 'तो केवि मार्गी इयें। क्षेमी होए।' –ऋ ३१७

क्षेवणें—सक्रि (महानु) लावणें रेखणें 'वरि टिळा क्षेवणिला चोखदु।' –ऋ ६४ [सं क्षेपण?]

क्षेवी—अ (महानु) क्षणीं, लागलेंच 'प्रथम ज्ञान होत क्षेवी। ईश्वर मायबाप गोंसावी।' –ज्ञाप्र ६६ [स क्षण, क्षेव]

क्षोणी—स्त्री १ पृथ्वी 'उघडवी वशियेचिया क्षोणी।' –ज्ञा १२१२ २ सख्या ०प-पति–पु राजा, भूपति 'म्हणे हस क्षोणीपतिस तुज कोणी सम नसे।' –नल [स]

क्षोद—पु १ चूर्ण, भुकटी, पूड २ विचार, चर्चा [स] ०क्षम वि १ भुकटी करण्यासारखें २ (ल) वादविवाद, चर्चा, विचारविनिमय करण्यासारखें विचारक्षम

क्षोभ—पु १ राग, क्रोध, अतिशय सताप 'देवताक्षोभ'. २ खळबळ, व्यग्रता, प्रक्षोभ, मनाची चलबिचल, गडबड, त्रधा 'ऐसा ज्या सुखाचा आरभु। दावी काठिण्याचा क्षोभु।' –ज्ञा १८७८८, –ज्ञा २३९ ३ (महानु) अनुराग आवडी –शिशु ५७४ ४ हर्ष सतोष (सामा) कोणताहि विकार. [स क्षुभ्-रागावणें] ०क–वि विकारोत्पादक, सताप आणणारा, खळबळ माजविणारा क्षोभणें–क्रि १ रागावणें, क्षुब्ध होणें, चेतणें २ अत करण ची चलबिचल होणें, अस्थिर होणें 'तरी तयांचेनि अपरितोखें। क्षोभावें ना।' –ज्ञा २२६९ ३ (महानु) लुब्ध होणें, विकारवश होणें 'क्षोभे अनयू जिये।' ४ (महानु) मोहवश होणें 'क्षोभे भूपति सवथा सकळही तारुण्य सर्वाजना।' –गस्तो ७३८३ क्षोभना–स्त्री स्फुरण 'जें ज्ञानाची नसे क्षोभना।' –अमृ ७१. क्षोभिणा–स्त्री (सगीत) बाविसाव्या श्रुतीचें नाव क्षोभित–वि क्षुब्ध पहा क्षोभ्य–वि रागावण्याजोगा, क्षुब्ध होण्या चेतण्यासारखा

क्षौद्र—न मध 'क्षौद्र लोणी मिश्र करून शिंगरास पाजावें' –अश्वप ११६७ [स]

क्षौर—पु १ हजामत (डोक्याची) श्मश्रु २ पैतृक-कर्मात किंवा तीर्थाच्या ठिकाणीं शिखासकट केलेली सर्व हजामत [स क्षुर्-कापणें]

क्ष्मा—स्त्री १ पृथ्वी २ क्षमा [ सं ] ०पति–पु राजा; क्षोणीपति

क्ष्वेड—न विष 'कंठीं नीळमणीसमान धरवें तें क्ष्वेड साजें जया।' –निमा १ (सांबशिव स्तुतिध्यान) [ सं ]

---

# ज्ञ

ज्ञ—मराठी व्यंजनमालेतील छत्तिसावें अक्षर हें ज् आणि ञ् या दोन व्यंजनांच्या संयोगानें बनलें आहे क्रमविकास — याच्या तीन अवस्था, पहिली क्षत्रपवंशी राजा रुद्रदामन् याच्या गिरनार शिलालेखांत (इ स २ रें शतक) दुसरी पहिलीचें रूपांतर तिसरी अर्जुन परमार राजा धारानगरें याच्या वेळच्या (इ स १२०८) आरिभा लेखांत आढळते –पु बुधग्रह –वि जाणणारा तज्ज्ञ (समासांत) शास्त्रज्ञ रसज्ञ, सर्वज्ञ इ०

ज्ञपित, ज्ञप्त—वि जाणलेलें; प्रसिद्ध केलेलें; शिकविलेलें [ सं ज्ञा=जाणणें ] ज्ञप्ति–स्त्री १ बुद्धि ज्ञान २ माहीत असणें, जाणीव 'म्हणितलें या ज्ञप्ती। भवाचीना।' –ज्ञा १३ ४० ३ ब्रह्मज्ञानामुळें झालेली जागृति; अंतःकरणांतील स्फुरण –माज्ञा १८ १२०४

ज्ञात—स्त्री जात; ज्ञाति पहा

ज्ञात—वि समजलेला, जाणलेला; ठाऊक असलेला [ सं ज्ञा जाणणें ] ०सिद्धांत–वि शास्त्राशीं पूर्ण परिचित असलेला ज्ञातव्य–वि जाणण्याजोगा समजण्यास ठाऊक असण्यास योग्य, शक्य; जाणीव होण्याजोगें 'तैसें ज्ञानें जेणें। करितां ज्ञातव्यातें पाहाणें।' –ज्ञा १८ ५३३ ज्ञेय पहा ज्ञाता–वि १ जाणणारा समजणारा माहिती असलेला, तज्ज्ञ २ शहाणा, विद्वान् सुज्ञ ज्ञानी [ सं ज्ञा=जाणणें ] ज्ञातृत्व–न १ ज्ञान, वृत्त माहिती २ बुद्धि धारणाशक्ति 'विशाळ ज्ञातृत्वाची बुद्धी।' –दा ११ ४ २०

ज्ञाति—स्त्री १ जात वर्ग प्रकार २ गोत्रज बांधव 'पार्थ म्हणे श्री धर्मावरि धरितिल जे अस्त्रिप्रति ज्ञाति।' –मोभीष्म १० १०६ ३ जाति धर्मकर्माप्रमाणें पडलेला भेद 'ब्राह्मण–वैश्य ज्ञाति' –वि जातिविषयीं–संबंधी ०मेहेत्र पुअ ज्ञातीचे पुढारी

ज्ञान—न १ बुद्धि विषयाचें आकलन करण्याचें सामर्थ्य २ मनोव्यापाराचा विषय, शास्त्र ३ खासगी माहिती ४ विषयग्रहणाचा बुद्धीवर झालेला संस्कार मनावरचा ठसा, समजूत ५ ब्रह्मज्ञान सृष्टींत अनेकप्रकारचे जे अनेक विनाशी पदार्थ आहेत त्या सर्वांत एकच अविनाशी परमेश्वर भरून राहिला आहे असे जाणणें, ब्रह्मात्मैक्यज्ञान –गीर ५१३ अध्यात्मविद्या [ सं ज्ञा–जाणणें ] ०कमळ–न १ एक रांगोळी काढण्याचा प्रकार २ (योग) शरीराच्या ठिकाणीं कल्पिलेल्या आठ कमळांपैकीं प्रत्येक ०कळा–स्त्री बुद्धिवैभव, बुद्धिप्रभाव 'कौशल्य ज्ञानकळा परम।' २ शहाणपणाचा प्रकाश, बुद्धीची जाणिवेची भूमिका, जाणण्याची कला, 'आंगीं ज्ञानकळा आली म्हणजे दुराचार घडत नाहीं' ३ जाणतीकळा पहा ०कक्षेपार–वि मनुष्याच्या बुद्धीच्या आटोक्याच्या बाहेर बुद्धीला अगम्य ०कांड–न शिक्षांत वेदांतील आत्मज्ञानाचें प्रतिपादन केलेला भाग, आरण्यकें व उपनिषदें (यांत यज्ञयागादि कर्में गौण व ब्रह्मज्ञानच काय तें श्रेष्ठ असतें) –गीर २८७ याच्या उलट कर्मकांड ०कोश–पु १ ज्ञानाचा संग्रह साठा २ विविध विषयाची माहिती ज्यांत दिली असते असा कोश, (इं) एन्सायक्लोपीडिया ३ मराठींतील असा ग्रंथ ०गुरु–पु १ ज्ञान देणारा शिकविणारा शिक्षक २ महावाक्योपदेश करून ब्रह्म प्रत्ययास आणून देणारा मोक्षगुरु ०घन–वि परिपूर्ण ज्ञानस्वरूप असलेला ज्ञान नें पूर्णपणें भरलेला 'महाराज राज सद्गुरु ज्ञानघन।' ०चक्षु–दृष्टि–पु बाह्येंद्रियाच्या विषयापलीकडील आत्मस्वरूप जाणण्याचें ज्ञान, बुद्धि मन चक्षु –वि एतद्विशिष्ट (मनुष्य) ०जनक–वि ज्ञान उत्पन्न करणारें ०दाता–पु ज्ञानगुरु –वि ज्ञान दान करणारा ०दिवा–दीप–पु बुद्धिरूपी दिवा 'अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नकोरे।' ०निष्ठा–स्त्री ज्ञानोत्तर सर्व कर्में सोडून देऊन ज्ञानांतच गढून जाण्याची सिद्धावस्थेंतील स्थिति –गीर ४१२ ०परंपरा–स्त्री. १ एकामागून एक येणाऱ्या विचारांमुळें माहितीमुळें झालेलें ज्ञान. २ वाढतें ज्ञान ०मठ–मठी–पुस्त्री १ अध्यात्म ज्ञानाचा अथवा ध्यानयोगाचा अभ्यास करण्यासाठीं बांधलेला आश्रम, एकांतस्थान २ (ल) तुरुंग कारागृह ज्ञानमठांत बसणें– १ सांसारिक बंधनांतून पराङ्मुख होऊन आध्यात्मिक चिंतनांत काळ घालविणें २ स्वतःच्या शहाणपणाबद्दल घमेंड, गर्व बाळगणें ०मार्ग–पु ईश्वर प्राप्तीचा वेदाचा शास्त्रोक्त रास्त मार्ग अव्यक्तोपासनेची साधनावस्थेंतील स्थिति दाखविणारी रीत –गीर ४१२ ०मार्गी वि ज्ञानमार्गाचा अवलंब करणारा ब्रह्मज्ञानाच्या मार्गें असणारा ०माला(ळ–ळा)–स्त्री १ स्वाध्यायास प्रारंभ करतांना शिष्याच्या पुत्राच्या गळ्यांत गुरुकडून किंवा पित्याकडून घातली जाणारी माळ २ ही माळ घालण्याचा संस्कार ३ (ल) जगाचें ज्ञान व्यवहारज्ञान ०यज्ञ–पु ज्ञानप्राप्ति परमेश्वर स्वरूपाचें ज्ञान करून घेऊन त्या ज्ञानाला अनुरूप असा आचरणानें परमेश्वराची प्राप्ति करून घ्यावयाचा मार्ग, साधन –गीर ६८० ०रत्नाची मांदुस–स्त्री ज्ञानी शहाणा माणूस या बद्दल गौरवानें म्हणतात [ ज्ञान+मांदुस=पेटी ] ०लक्षण–न १ ज्ञानसाधनार्थ चिन्ह, खूण २ बुद्धिलक्षण ०वल्ली–स्त्री (वेदें)

भांग. ०वाद-पु. १ (तत्त्वज्ञान) ज्ञानानेंच मोक्ष प्राप्ती होते, मुक्ति मिळते हे तत्त्व; व त्या तत्त्वाचें समर्थन. २ (इं.) नॉस्टिसिझम्. ०वान्-वि. १ शाहाणा, ज्ञानी. २ अध्यात्मज्ञान असणारा; ब्रह्मज्ञानी. ०वायु-पु एक वातरोग. हा झाला असतां माणूस गहन विषयावर विद्वत्तापूर्ण बडबड करीत सुटतो. ०विग्रह-पु ज्ञानरूपी शरीर असलेली (देवता). ०विज्ञान-न. १ आध्यात्मिक ज्ञान आणि आधिभौतिक किंवा शास्त्रीय ज्ञान. २ अध्ययनापासून मिळालेलें ज्ञान आणि अनुभवजन्य किंवा प्रत्यक्ष ज्ञान. ३ वाङ्मय आणि शास्त्र. ०शक्ति-स्त्री. १ ज्ञानेंद्रिय पंचक. २ बुद्धिसामर्थ्य. ०सूर्य, ज्ञानार्क-पु ज्ञानरूपी सूर्य. 'ज्ञानसूर्य उगवला देहामाजी।' ०स्पृश्-वि. ज्ञानाला स्पर्श झालेलें; जाणलेलें; समजलेलें. ज्ञानांजन-न. ज्ञानरूपी अंजन, काजळ; ज्ञानोपदेश. 'नयनीं लेइलें ज्ञानांजन.' ज्ञानाभ्यास-पु अध्यात्मज्ञानाचें चिंतन, ब्रह्मज्ञानाचा अभ्यास, चिंतनमनन ज्ञानाभ्यासी-वि. सदोदित ब्रह्मचिंतन करणारा. याच्या उलट कर्मसंगी. ज्ञानार्थ-पु ज्ञानरूप, ज्ञानाचा विषय. 'हे असो आतां वाऊगा। तो ज्ञानार्थ करूनि गोमटा।' -ज्ञा १४ २६. [ज्ञान+अर्थ] ज्ञानाज्ञान-न. पारलौकिक ज्ञान व (अन्यथा) ऐहिक विषयाचें ज्ञान. -ज्ञा १५. ५०३. [ज्ञान+अज्ञान] ज्ञानी-ज्ञानिया-वि. १ ज्ञाता; शाहणा, जाणणारा; विद्वान; सुज्ञ २ आध्यात्मिक, पारमार्थिक ज्ञान असणारा; ब्रह्मज्ञानी. 'तिज अर्थार्थी जाणिजे। ज्ञानिया चौथा।' -ज्ञा ७.१०९; एभा ११.२४९. [सं. ज्ञानिन्] ज्ञानेंद्रिय-न. ज्याच्याद्वारें वस्तूंचें ज्ञान होतें अशीं त्वचा, नेत्र, जिव्हा, कान, नाक हीं पांच इंद्रियें प्रत्येकीं याच्या उलट कर्मेंद्रिय. या पांचांच्या समूहास ज्ञानेंद्रियपंचक म्हणतात. [सं.] ज्ञानोपदेश-पु. अध्यात्मज्ञान; आत्मज्ञान याचा उपदेश, बोध. (क्रि० करणें; देणें). [सं.] ज्ञानोपासना-स्त्री. उपासनेचा तिसरा प्रकार. वेद व शास्त्रें यांच्यापासून ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न, मार्ग, (कर्मोपासना व आत्मोपासना हे उपासनेचे पहिले दोन प्रकार आहेत). [सं.]

ज्ञापक—वि. ज्ञान करून देणारा; जाणविणारा; माहिती देणारा; ओळख करून देणारा (लेख, शास्त्र, चिन्ह). [सं.] ०निमित्त-न. (तर्क) निदर्शककारण; दर्शविणारें, माहिती करून देणारें कारण) (प्रकाश, नाद). याच्या उलट कारकनिमित्त.

ज्ञापन—न. माहिती करून देणें; दाखविणें; शिकविणें. [सं.]

ज्ञापनीय—वि. माहिती करून देण्यास, दाखविण्यास योग्य, शक्य.

ज्ञापविणें—सक्रि. (काव्य) १ माहिती करून देणें; स्पष्ट करणें; जाणविणें; सुचविणें; सांगणें. २ परिचय करून देणें; शिकविणें. [सं. ज्ञा-ज्ञाप्]

ज्ञापित—वि. १ जाणविलेला; स्पष्ट, उघड केलेला. २ परिचित; माहिती करून दिलेला; शिकविलेला. ३ सुचविलेला; दर्शित. [सं.]

ज्ञाप्य—वि. जाणावयाचा; माहिती करून देण्यासारखा; शिकविण्यासारखा; सांगण्याजोगा; ज्ञापनीय पक्ष. [सं.]

ज्ञेय—वि. माहीत होण्यासारखा; जाणण्याचा (विषय); समजण्यास, जाणण्यास योग्य. 'मनाचें मनपण गेलें। जेथ बोलाचें बोलपण ठेलें। जयामाजि सांपडलें। ज्ञेय दिसे।' -ज्ञा ४.१६३; -ज्ञा १८ ५२९. 'ह्या अनुपम शब्दकोशांतील प्रत्येक शब्द ज्ञेय आहे. एतज्ज्ञानानें जो ज्ञाता तोच सुज्ञ' -शास्त्रीकोश. ०वाद-पु. १ (तत्त्वज्ञान) आध्यात्मिक गोष्टींचा उलगडा एका गूढ तत्त्वज्ञानानें करणाऱ्या एका पाखंडी पंथाचें मत. (इं.) ग्नॉस्टिसिझम्. २ शास्त्रीय ज्ञान हेंच ज्ञेय असें मत. [सं.]

